# शतकाची विचार शैली

## खंड - ३

(अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनातील
अध्यक्षीय भाषणे व त्यांची चिकित्सा)

**रमेश वा. धोंगडे**



दिलीपराज प्रकाशन प्रा. लि.
२५१ क, शनिवार पेठ, पुणे - ४११०३०.

◆ शतकाची विचार-शैली खंड - ३ ◆

SHATAKACHI VICHAR SHAILI KHAND - 3

**प्रकाशक**
राजीव दत्तात्रय बर्वे
मॅनेजिंग डायरेक्टर
दिलीपराज प्रकाशन प्रा. लि.
२५१ क, शनिवार पेठ,
पुणे ४११ ०३०

ISBN - 81 - 7294 - 351 - 2

**मुद्रक**
प्रमोद बापट
स्मिता प्रिंटर्स
१०१९ सदाशिव पेठ,
पुणे ४११०३०

**टाईपसेटिंग**
पितृछाया मुद्रणालय
९०९ रविवार पेठ,
पुणे ४११००२

**मुखपृष्ठ**
सुहास चाडक

**आतील चित्रे**
दीपक संकपाळ / सुधा मोने

# अनुक्रमणिका

# पार्श्वभूमी

## ३.१
## पार्श्वभूमी

१९७६ ते २००० ही तिसरी पायरी विसाव्या शतकाची अखेर राजकीय उत्पातीचा हा काळ १९७७ नंतर केद्रात प्रथमच बिगर कॉग्रेस सरकार आले. ते १९७९ मधे पडले. आणीबाणीने बदनाम झालेल्या इंदिरा गांधी १९८० मधे पुन्हा पंतप्रधान झाल्या. १९८४ मधे त्यांची हत्या झाली. १९८४ ते १९८९ राजीव गांधी पंतप्रधान झाले. १९८९ मधे दुसऱ्यांदा बिगर कॉग्रेस सरकार केद्रामधे आले. पण तेही दोन वर्षात कोसळले. १९९१ मध्ये राजीव गांधीची हत्या झाली आणि कॉग्रेसचे सरकार पुन्हा सत्तेवर आले. १९९७ नंतर पुन्हा बिगर कॉग्रेस सरकार केन्द्रस्थानी आले. महाराष्ट्रात प्रथमच १९९५ मधे बिगर कॉग्रेस शासन आले. हे शासन मराठी माणसाच्या अस्मितेला आवाहन करत सत्तेवर आले. बाबरी मशीद पाडणे, मुंबईमधले बॉम्बस्फोट व दंगली, भूकंप यांनी महाराष्ट्राची पूर्वीची स्थिरसत्ता खिळखिळी झाली. या राजकीय उलथापालथी सर्वकष परिणाम घडविणाऱ्या होत्या. अध्यक्षांच्या भाषणात त्यांचे संदर्भ येतात पण या परिस्थितीवर वैचारिक मंथन झालेले दिसत नाही. उलट राजकीय व्यवस्थेमुळे बदलणाऱ्या सामाजिक स्तरावरील उलथापालथीचे पडसाद साहित्याप्रमाणे अध्यक्षांच्या भाषणातही उमटतात. पहिल्या पायरीवरील राष्ट्रीय विचारांची जागा तिसऱ्या पायरीवर राजकारणजन्य सामाजिक विचारांनी घेतलेली आढळते. अर्थात् यात भारतीय सामाजिक व्यवस्थेपेक्षा महाराष्ट्रातील सामाजिक स्थित्यंतरांवर जास्त लक्ष आहे या अर्थाने १९४७ नतर राष्ट्रवादी विचार मागे पडला तो कायमचाच. मात्र अर्थकारणाने घडणाऱ्या सामाजिक स्थित्यंतराचा आढावा एकाही अध्यक्षाने घेतलेला दिसत नाही. आर्थिक घडामोडीच्या परिणामांचे भान, त्यांचे साहित्यावर, संस्कृतीवर आणि भाषेवर होणारे परिणाम पूर्णपणे दुर्लक्षित झालेले दिसतात. साहित्यविचारामागे एक मोठा राजकीय - सामाजिक-आर्थिक-सास्कृतिक सम्यक् विचार असतो, निदान तो असावा याची पुसटशी जाणीवही दोन-तीन अपवाद वगळता कोणाही अध्यक्षांना नसल्याचेच दिसते. मराठी समाजाची विविध अंगे व्यामिश्र स्वरूपात वाढत असता

विचार मात्र संकुचित स्वरूपात होताना दिसतो.

एकूण २२ संमेलनांतील २२ अध्यक्षांपैकी १८अध्यक्ष हे साहित्यिक आहेत; बरे आणि बेताचे या प्रकारातले. उरलेल्या चौघातील फक्त गं. बा. सरदार आणि य. दि. फडके हे विचारवंत आहेत. साहित्याचे पूर्वीचे व्यापक क्षेत्र तिसऱ्या पायरीवर संकुचित झाल्याचे हे लक्षण आहे. १८ साहित्यिकातील गंगाधर गाडगीळ, नारायण सुर्वे, विश्राम बेडेकर आणि व्यंकटेश माडगूळकर यांची भाषणे किमान साहित्याच्या क्षेत्रात तरी नवीन काही विचार मांडणारी आहेत.

यू. म. पठाण, गं.बा. सरदार, राम शेवाळकर, आणि य. दि. फडके हे चौघं वगळता उरलेल्या १८ साहित्यिक अध्यक्षांपैकी गाडगीळ, माडगूळकर, बेडेकर आणि सुर्वे हे मराठी साहित्यक्षेत्रात मान्यता पावलेले आणि ज्यांच्या साहित्याला 'चांगले' साहित्य म्हणता येईल असे चार साहित्यिक. भावे, चोरघडे, दांडेकर, खरात, पाटील, कानेटकर, पुरोहित, शेळके, मिरासदार व बापट हे मध्यम प्रतीचे आणि ज्यांच्या साहित्याला 'बरे' साहित्य म्हणता येईल असे दहा साहित्यिक. कर्णिक, मंत्री, गोखले, इनामदार हे चार सामान्य स्तरावरचे साहित्यिक तर पठाण आणि शेवाळकर हे किरकोळ पण चिकाटीने सतत लिहिणारे असे दोन लेखक. फक्त गं.बा.सरदार हे विचारवंत समीक्षक. १९९० ते २००० या काळात एक सुर्व्यांचा अपवाद वगळता चांगला साहित्यिक अध्यक्ष झाला नाही हे कशाचे चिन्ह असावे ? विशेषत: या दहा वर्षातील सहा अध्यक्ष हे एक सामान्य प्रतीच्या साहित्यिकात तरी मोडतात किंवा साहित्यिकच नसतात. अध्यक्षांची निवडून येण्याची ताकद आणि निवडून आलेल्याचा साहित्यिक वकूब यात विरोधी नाते असते की काय असा प्रश्न पडावा असे हे विसाव्या शतकातले शेवटचे दशक वाटते.

यापूर्वीच्या दोनही पायऱ्यांवर बहुसंख्य अध्यक्ष आपले नाव, वडलांचे नाव आडनाव असे देताना दिसतात. या पायरीवर २२ पैकी ११ अध्यक्ष आपले नाव व आडनाव देतात. हा बदल केवळ फॅशन म्हणून आलेला की काही एक सांस्कृतिक बदलाचे चिन्ह म्हणून आलेला आहे, याचाही विचार करावा लागेल.

# ३.२ पायरी तीन

## ३.२.१
## व्यावहारिक तपशील

१९७६ ते २००० या २५ वर्षाच्या काळात २२ संमेलन झाली. प्रत्येक संमेलनाचा क्रमांक, अध्यक्ष, वर्ष आणि स्थळ यांची माहिती पुढील तक्त्यात दिली आहे.

| संमेलन क्र. | अध्यक्ष | वर्ष | स्थळ |
|---|---|---|---|
| ५२ | पु.भा.भावे | १९७७ | पुणे |
| ५३ | वा.कृ चोरघडे | १९७९ | चंद्रपूर |
| ५४ | गं.बा. सरदार | १९८० | बार्शी |
| ५५ | गो.नी.दांडेकर | १९८१ फेब्रु. | अकोला |
| ५६ | गंगाधर गाडगीळ | १९८१ डिसे. | रायपूर |
| ५७ | व्यंकटेश माडगूळकर | १९८३ | अंबाजोगाई |
| ५८ | शंकरराव खरात | १९८४ | जळगाव |
| ५९ | शंकर पाटील | १९८५ | नांदेड |
| ६० | विश्राम बेडेकर | १९८६ | मुंबई |
| ६१ | वसंत कानेटकर | १९८८ | ठाणे |
| ६२ | के.ज पुरोहित (शांताराम) | १९८९ | अमरावती |
| ६३ | यू.म. पठाण | १९९० जाने. | पुणे |
| ६४ | मधु मंगेश कर्णिक | १९९० डिसे. | रत्नागिरी |
| ६५ | रमेश मंत्री | १९९२ | कोल्हापूर |
| ६६ | विद्याधर गोखले | १९९३ | सातारा |
| ६७ | राम शेवाळकर | १९९४ | पणजी |
| ६८ | नारायण सुर्वे | १९९५ | परभणी |
| ६९ | शांता. ज. शेळके | १९९६ | आळंदी |

| | | | |
|---|---|---|---|
| ७० | ना. सं. इनामदार | १९९७ | |
| ७१ | द.मा.मिरासदार | १९९८ | परळी वैजनाथ |
| ७२ | वसत बापट | १९९९ | मुंबई |
| ७३ | य. दि. फडके | २००० | बेळगाव |

१९८१ ते १९९० मधे दोन दोन संमेलने झाली तर १९९३ पासून प्रतिवर्षी एक संमेलन झाले हे २२ अध्यक्ष कोणाला उद्देशून भाषण करतात ते पाहू

| अध्यक्ष | महत्वाच्या व्यक्ती + श्रोते यांना उद्देशून श्रोत्यांचा उल्लेख | फक्त श्रोत्यांना उद्देशून | कुणालाही उद्देशून नाही |
|---|---|---|---|
| पु.भा.भावे | - | - | ✓ |
| वा.कृ. चारघडे | - | साहित्यप्रेमी रसिक मित्रांनो, | - |
| गं.बा.सरदार | उद्घाटक कारंथ, स्वागता -ध्यक्ष नामदार सुशिलकुमार शिंदे, आणि मित्रहो | - | - |
| गो.नी.दांडेकर | - | जाणते हो, | - |
| गंगाधर गाडगीळ | - | रसिकहो, | - |
| व्यंकटेश माडगूळकर | - | - | ✓ |
| शंकराराव खरात | - | - | ✓ |
| शंकर पाटील | - | साहित्यप्रेमी बंधुभगिनीनो, | - |
| विश्राम बेडेकर | - | रसिकहो, | - |
| वसंत कानेटकर | - | रसिक मित्रहो, | - |
| के.ज. पुरोहित | पूर्वाध्यक्ष कानेटकर, साहित्य महामंडळाचे अध्यक्ष भागवत, घटक व संलग्न संस्थांचे अधिकारी, स्वागताध्यक्ष रा.सु.गवई व स्वागतसमितीचे सदस्य उद्घाटक माचवे, प्रमुख अतिथी बालकवी बैरागी आणि महाराष्ट्रातून व बाहेरून आलेल्या | - | - |

| | | | |
|---|---|---|---|
| | मराठी वाचकांच्या प्रतिनिधीनो- | | |
| यू.म. पठाण | उद्‌घाटक, स्वागताध्यक्ष,<br>पूर्वाध्यक्ष,महामंडळाचे अध्यक्ष,<br>उपाध्यक्ष व सदस्य, स्वागत<br>समितीचे सदस्य आणि<br>महाराष्ट्रातील व बृहन्महाराष्ट्रातील<br>साहित्यप्रेमी रसिकहो, | - | - |
| मधु मंगेश कर्णिक | उद्‌घाटक, स्वागताध्यक्ष,<br>स्वागतसमितीचे सदम्य, पूर्वाध्यक्ष,<br>महामंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष,<br>व सदस्य, आणि बृहन्महाराष्ट्रातील<br>साहित्यप्रेमी रसिक हो ! | - | - |
| रमेश मंत्री | - | साहित्यप्रेमी बंधूनो<br>आणि भगिनीनो, | - |
| विद्याधर गोखले | - | - | ✓ |
| राम शेवाळकर | - | मित्रहो, | - |
| नारायण सुर्वे | साहित्यप्रेमी बधू-भगिनीनो ।<br>उद्‌घाटक, मान्यवर पदाधिकारी<br>म्वागत समितीचे सदस्य<br>आणि मित्रांनो ! | - | - |
| शांता ज. शेळके | - | साहित्यप्रेमी रसिक<br>बंधुभागिनीनो ! | - |
| ना.सं.इनामदार | - | साहित्यप्रेमी जनहो ! | - |
| द.मा मिरासदार | - | मित्रहो, | - |
| वसंत बापट | - | साहित्यप्रेमी भगिनीनो<br>आणि बंधूनो, | - |
| य दि. फडके | - | मराठी भाषा आणि साहित्य<br>यावर प्रेम असलेल्या मित्रांनो | |

स्वागताध्यक्ष, उद्‌घाटक, इतर मान्यवर आणि श्रोते यांना २२ पैकी ५ अध्यक्ष आवाहन करतात. केवळ श्रोत्यांना आवाहन करणारे अध्यक्ष १३ तर कुणालाही उद्देशून असे भाषण न करणारे अध्यक्ष फक्त ४. श्रोत्यांना आवाहनही त्याच त्याच पद्धतीने उपचार म्हणूनच केलेले असावे. एकंदरीत शिष्टाचाराचे पहिल्या पायरीवरचे

प्राबल्य दुसऱ्या प्रमाणे तिसऱ्या पायरीवरही कमी झालेले दिसते भाषणाच्या मधे आणि शेवटी 'सभ्य हो', 'रसिक हो', 'मित्रहो' असे ८ अध्यक्ष म्हणतात.

स्वतःच्या निवडीबाबत आभार मानणे, आपण मोठे नसल्याचे नम्रपणे म्हणणे, ज्या गावी संमेलन भरले आहे त्याचे ऐतिहासिक आणि वाङ्मयीन महत्त्व सांगणे हा अध्यक्षीय भाषणांचा ढाचा तिसऱ्या पायरीवर पक्का झालेला दिसतो, उरलेल्या भागात सध्याचे साहित्य, त्यातील वाद, मराठी भाषा आणि भाषा व साहित्य यांच्या प्रसारासाठी लोक व शासन यांनी काय करावे याबाबतच्या सूचना हाही ढाचा ठरलेला दिसतो

पु.भा.भावे (१९७७) आपण अध्यक्ष होण्यास पात्र नाही असे म्हणण्यात मतदारांचा अपमान होईल म्हणून तसे म्हणत नाहीत. के. ज. पुरोहित (१९८९) आपण लायक नाही असे अध्यक्षाने म्हणण्यात खोटा नम्रपणा आहे असे मानतात. त्यामुळे आपण तसे काही म्हणणार नाही असे सांगतात. द. मा. मिरासदारही (१९९८) आपली लायकी कमी मानण्यात मतदारांचा अपमान आहे असे मानतात स्वतःकडे न्यूनत्व न घेता विनम्रपणे आणि कृतज्ञतेने अध्यक्षपद स्वीकारण्यात चोरघडे (१९७९), सरदार (१९८०), दांडेकर (१९८१), खरात (१९८४), पठाण (१९९०), कर्णिक (१९९०), शेळके (१९९६), इनामदार (१९९७) फडके (२०००) यांचा समावेश होतो. शंकर पाटील (१९८५) हे या पायरीवरचे एकमेव अध्यक्ष की जे आपल्यापेक्षा लायक असलेले अनेक साहित्यिक पूर्वी आणि आता अध्यक्ष झाले नाहीत याबाबत खंत व्यक्त करतात. पूर्वी राजवाडे, मर्ढेकर, आजगावकर, वि. ल. भावे, राजारामशास्त्री भागवत, विनोबा भावे, साने गुरूजी,' चिं. वि. जोशी, प्रभाकर पाध्ये आणि बोरकर अध्यक्ष झाले नाहीत असा ते उल्लेख करतात. एकंदर तिसऱ्या पायरीवर कृतज्ञता, नम्रपणा असला तरी स्वतःच्या निवडीबाबत निःशक संतुष्टता आहे. हे चिन्ह पुरोहित म्हणतात त्याप्रमाणे नम्रतेचे ढोंग न करण्याचे आहे हे खरे, पण त्यात आत्मप्रौढी आहे हेही खरे.

म्हणूनच या पायरीवरील अध्यक्षांच्या भाषणात स्वनिवेदन हे नव्याने आणि स्पष्टपणे दिसते. याची सुरुवात चोरघड्यां (१९७९) पासून होते. रेग्यांनंतरचे अतिशय प्रामाणिक आणि जिव्हाळ्याचे असे भाषण म्हणजे चोरघड्याचे भाषण हे भाषण नाही, स्वतःशी आणि श्रोत्यांशी केलेला तो संवाद आहे. तिसऱ्या पायरीवर स्वतःच्या साहित्यिक अनुभवांच्या आधारे श्रोत्यांशी संवाद साधण्याची नवी प्रथा पडताना दिसते त्याची दमदार सुरुवात चोरघड्यांपासून होते. दांडेकरांचे (१९८१) सर्व भाषण स्वनिवेदनाचे आहे; फक्त त्यात संवाद कमी आहे. तेवीस पानांपैकी तब्बल सोळा पाने आत्मनिवेदन केल्यावर व्यंकटेश माडगूळकरांना (१९८३) आपण भाषणात थोडेसे आत्मनिवेदन केले असे वाटते. माडगूळकरांच्या भाषणात आत्मप्रेमही डोकावते जंगलात केलेल्या शिकारीचेही ते याच प्रेमातून समर्थन करतात तर आपले 'बनगरवाडी' हे पुस्तक

सामाजिक शास्त्रांचे विद्यार्थीही वापरतात असे अभिमानाने सांगतात. शंकरराव खरात (१९८४) आणि शंकर पाटील (१९८५) हेही अध्यक्षीय भाषणात प्रामुख्याने स्वत:ची जडणघडण कशी झाली हे सांगतात. बेडेकरांच्या भाषणात (१९८६) आत्मनिवेदन नसले तरी वैयक्तिक अनुभवाचे विषयांतर आहे. के. ज. पुरोहित (१९८९) स्वत:च्या जन्मापासून सुरुवात करून, बालपण, नोकरी व मग साहित्य अशा वाटेने आत्मनिवेदन करतात. रा. सु. गवई, राम शेवाळकर आपले विद्यार्थी असल्याचे सांगण्यामागे काय हेतू असावा ? आपण तीस वर्षांपूर्वी नवसाहित्याबद्दल काय सांगितले याची आठवण देणे, कथाकथनाच्या कार्यक्रमात होणाऱ्या गर्दीबाबत नापसंती, ऐतिहासिक विषयांवर व्याख्यानबाजी करणाऱ्यांबाबत नाराजी, लोकप्रिय वाङ्मयाची होणारी वाढ वगैरे तक्रारीमागे आपल्याकडे दुर्लक्ष झाले ही खंत आहे. पुरोहितांच्या एकंदर भाषणात सुप्त आत्मश्लाघा आहे. रमेश मंत्री (१९९२) कोल्हापुरात लहानपणी आपल्या आजूबाजूला कोण थोर कलावंत राहत होते ते सांगतात पण त्याचा संबंध स्वत:च्या कर्तृत्वाशी जोडत नाहीत. सुर्व्यांच्या (१९९५) भाषणात आत्मप्रौढी नाही, साहित्याबाबतची स्वत:ची प्रामाणिक भूमिका मांडण्याची कळकळ आहे हे जरी खरे तरी वेळोवेळी ते 'याची इथे मी नोंद करून ठेवत आहे' असे कशासाठी म्हणतात याचे आश्चर्य वाटते. आपण बालपणापासून वाचत आलेल्या साहित्याचा उल्लेख करत शांता शेळक्यांचे (१९९६) भाषण तेच खरे साहित्य या निष्कर्षावर आणि 'गेले ते दिवस' या हळहळीत संपते. ना. सं. इनामदार (१९९७) आपण ऐतिहासिक कादंबरी लिहिण्यामागे काय कष्ट घेतले हे सांगतात. त्याच्या भाषणाचा शेवट पत्नीचे कौतुक करण्यात होतो — आणि तोही Come madam wife, sit by my side यासारख्या इंग्रजी पद्यप्रयत्नाने। तिसऱ्या पायरीवरचे बहुसंख्य अध्यक्ष असे आत्ममग्न दिसतात. आत्मनिवेदनातून जो काय साहित्यविचार येईल तेवढाच त्यांचा साहित्यविचार, यामुळेच की काय कधीकधी साहित्यविचार हा साहित्याबाबतची स्वत:ची वरवरची मते या स्वरूपात खाली घसरतो.

अध्यक्षीय भाषणात संपूर्ण मराठी साहित्याचा आढावा घेणे, त्यानंतर फक्त समकालीन साहित्याची चर्चा करणे असे टप्पे पहिल्या दोन पायऱ्यांवर दिसतात. तिसऱ्या पायरीवर समकालीन साहित्याचा आढावा घेणेही संपते. अध्यक्षीय निबंध खऱ्या अर्थाने प्रासंगिक भाषण या स्वरूपात येतो, विचारमंथनाची सभा उत्सवी संमेलनात परिणत होते. तिसऱ्या पायरीवरच्या अध्यक्षांना अध्यक्षीय भाषणाकडून श्रोत्यांना असलेल्या माफक अपेक्षेची जाण आलेली दिसते. त्याचा एक फायदा असा की, काहीही महत्त्वाचे सांगायचे नसतानाही लंबेचौडे भाषण करणारे दुसऱ्या पायरीवरील न. वि. गाडगीळांसारखे अध्यक्ष या पायरीवर नाहीत. सरदारांप्रमाणे साहित्यातील एखादा वाद किंवा प्रवाह विस्ताराने मांडणे, कानेटकरांप्रमाणे एखाद्या आकृतिबंधाची चर्चा करणे, आटोपते आत्मनिवेदन करणे किंवा मिरासदार, बापट यांच्याप्रमाणे आपली मते मोघमपणे मांडणे

एवढा छोटासाच आवाका तिसऱ्या पायरीवरील अध्यक्षीय भाषणांचा आहे. शेवाळकर आणि य. दि. फडके यांच्या ३२ पृष्टांचा आणि रमेश मंत्रीच्या ३१ पृष्ठांचा अपवाद वगळता कोणाही अध्यक्षाने ३० पानांची मर्यादा ओलांडलेली नाही. साधारणपणे २० ते २५ पानात बहुसंख्य अध्यक्षांची भाषणे संपतात. सुर्व्यांचे भाषण सर्वात लहान म्हणजे फक्त १६ पृष्ठांचे आहे.

मात्र अशा आत्मनिवेदनपर भाषणांची शैली ही अधिक अनौपचारिक, शब्दांचे अवडंबर न माजवणारी आणि मोकळेपणा असलेली अशी आहे. शेवाळकरांचा अपवाद सोडता तीमधे संस्कृतप्रचुर अशी शिष्ट भाषा दिसत नाही.

# ३.३ वैचारिक-शैली

## ३.३.१
## परस्परसंबंधविषयक

गो. नी. दांडेकरांचा (१९८१) शिक्षणाचे माध्यम आणि त्याचा माणसाच्या संस्कृतीकरणावर दांडगा विश्वास आहे. अर्थात हा भावनिक स्वरूपाचा दृष्टिकोन आहे. इंग्रजी माध्यमामुळे मुले संस्कृत आणि मराठी या भाषांना मुकतात. परिणामत: ती भारतीय संस्कृतीलाच पारखी होतात असा त्यांचा दावा आहे. ही मुलं ज्या मराठी भाषक कुटुंब आणि समाजात राहतात, त्यांच्या आजूबाजूला जे लोक वावरतात, परंपरेने येणाऱ्या अन्न, वस्त्र, निवारा, क्रीडा याबाबतच्या सवयी, सणवार, धर्मश्रद्धा या सर्वांचा परिणाम जणू शून्य. इंग्रजी माध्यमापुढे हे सर्व प्रवाह निष्प्रभ ठरतात असे दांडेकरांना वाटते. याला पुरावा अर्थातच नाही. गंमत म्हणजे महात्मा गांधींची 'डू ऑर डाय' ही घोषणाही या मुलांना माहीत नाही अशी आपण शैक्षणिक अवस्थेतील फार गंभीर उणीव दाखविल्याचे समाधान मानणारे दांडेकर गांधींनी घोषणा इंग्रजीत का केली याने चिंतित होत नाहीत. मातृभाषेच्या शिक्षणाची हेळसांड आपल्याला एका भाषाशास्त्राच्या अभ्यास करणाऱ्या इंग्रजीच्या प्राध्यापकाने कळवून तिचा निषेध केला. एवढा पुरावा त्यांना पुरेसा वाटतो. या महाभागांचे नाव न घेण्यात काय हेतू असावा बरे ? रामायण, कालिदास, ज्ञानेश्वर हे माहीत नसणं म्हणजे भारतीय संस्कृतीच नसणं अशा सोप्या निष्कर्षाप्रत दांडेकर का आले असावेत ? साहित्याचं वाचन करणे म्हणजेच संस्कृतीकरण होणे असा गोड समज साहित्यिक करतात यामागे त्यांचा संस्कृतिविषयक दृष्टिकोन काय असावा हे शोधणेही गरजेचे आहे. व्यंकटेश माडगूळकर (१९८३) हे भाषा व संस्कृतीवर संकीर्तन करण्याच्या फंदात पडत नाहीत. पण आपल्या संस्कृतीबाबत त्यांनी केलेलं एक अवलोकन महत्त्वाचे आहे. 'आपण लोक पिंडानं वाचक नाही, श्रोतेच आहोत. 'वेलरेड्' ह्या इंग्रजी शब्दाला समानार्थी म्हणून आपण 'बहुश्रुत' हा शब्द वापरतो' असं ते म्हणतात. संतवाङ्मयाच्या टिकून राहण्याच्या कारणमीमांसेत माडगूळकरांनी सुचवलेला संस्कृतिविशेष महत्त्वाचा ठरेल.

कानेटकर (१९८८) व्यवहारोपयोगिता आणि सामाजिकता ही भाषेची प्रमुख

अंगे मानतात. त्यांच्या मते भाषेचे सांस्कृतिक रूप अधिक महत्त्वाचे. भाषेचे सांस्कृतिक रूप म्हणजे वैचारिक आणि ललित वाङ्मय (भाषेच्या व्यवहारोपयोगी अंगासही सांस्कृतिक मूल्य असते. उदाहरणार्थ :'गुड मॉर्निंग' आणि 'रामराम' हे स्वागताचे पर्याय समान असले तरी सांस्कृतिक दृष्ट्या त्यातील मूल्ये समान नाहीत. अध्यक्षीय भाषणातील 'लोकहो', 'मित्रहो', 'रसिकहो' या संबोधनान्त रूपांना इंग्रजीत पर्याय नाही. भाषेच्या या सामाजिक वापरामागेही सांस्कृतिक मूल्यांची विभिन्नता आहे. संस्कृती ही जणू काही साहित्य आणि साहित्याची मक्तेदारी हा मराठी साहित्यिकांमधला समज अज्ञानजन्य आहे. समाजाचे ज्ञानसंचित त्या समाजाच्या संस्कृतीची प्रत दाखवते. हे ज्ञान अर्थातच भाषाबद्ध असते. म्हणून वैचारिक वाङ्मयाला केवळ भाषेच्या आधारे सांस्कृतिक मूल्य देणे हेही दोषास्पद आहे. साहित्य आणि संस्कृती यांचा साधा सरळसोट संबंध जोडणे साहित्यिकांना सुखावह वाटत असले तरी तो भाबडेपणा ठरण्याची शक्यता अधिक)

के. ज. पुरोहित (१९८९) वाङ्मयीन संस्कृती आपल्या समाजात आली की समाज एकदम बदलेल असे नाही असे बजावतात. येथे वाङ्मयीन संस्कृती येणे म्हणजे समाजाची साहित्यविषयक जाण वाढणे असा अर्थ पुरोहितांना अभिप्रेत असावा. समाजातील माणसे साहित्याचा आस्वाद घेण्याच्या क्षमतेची झाली म्हणजे भ्रष्टाचार, कामचुकारपणा, स्वार्थीपणा लगेच संपेल असे नाही. पण हळूहळू माणसे स्वत:कडे अगर इतरांकडे माणूस म्हणून पाहण्याला शिकतील, संवेदनशील होतील असे त्यांना वाटते. या दृष्टीने मराठीच्या संवर्धनाचे महत्त्व पुरोहितांना वाटते.

कर्णिक (१९९५) भाषा व साहित्य ही संस्कृतीची दोन लेणी मानतात. यातली अलंकारिकता काढली तर भाषा व साहित्य यातून संस्कृती दिसते असे पर्यायाने म्हणता येईल. पैकी भाषेतून संस्कृती दिसते हा महत्त्वाचा मुद्दा आहे. साधे उदाहरण द्यायचे झाल्यास भाषेतील शिव्यांवरून स्त्री-पुरुष संबंधाबाबत त्या समाजाची काय दृष्टी आहे हे समजते. अर्थात कर्णिकांनी या दृष्टीने विचार केलेला दिसत नाही. शासन व्यवस्थेतून सामाजिक व सांस्कृतिक परिस्थिती घडते असेही कर्णिक म्हणतात. याचा अर्थ असा असावा की कोणत्या सांस्कृतिक कार्यक्रमांना मदत करून शासन त्यांना उत्तेजन देते हे पहायला हवे. पुढे कर्णिक भाषेच्या संवर्धनाची जबाबदारी शासनावर टाकतात. पण शासनाने काय करावे हे स्पष्ट करत नाहीत. आम्हाला इंग्रजी-माध्यम नको कारण त्यातून 'कॉन्व्हेंट संस्कृती' येते असेही कर्णिक म्हणतात. कॉन्व्हेंट स्कूल्स—ख्रिस्ती संस्कार—ख्रिस्ती धर्मप्रसार—इंग्रजीचा वापर—इंग्रजी भाषा अशी संबंध-मालिका यामागे असावी. कॉन्व्हेट संस्कृतीबाबत ओरड करणे सोयीचे असते; ख्रिस्ती धर्मप्रसाराविरुद्ध उघड बोलणे गैरसोयीचे असते; रीतीरिवाजांना फक्त संस्कृती मानून भाषेला त्याबाबत दोषी धरणे सोपे पण अर्धसत्य असते. परभाषा आणि परधर्म यांचे भय तर धरायचे; परभाषेवर टीका करायची पण परधर्माबाबत परकीय संस्कृतीच्या नावे फक्त बोटे

मोडायची यापुढे बहुसंख्य मराठी विचारवंत जात नाहीत.

## ३.३.१ (२)

भाषा हे साहित्याचे माध्यम आहे—(म्हणजे साहित्याचा आशय वेगळा व तो व्यक्त करणारे माध्यम अशी भाषा वेगळी)—अशी अत्यंत भ्रामक भूमिका व्यंकटेश माडगूळकर (१९८३) विश्राम बेडेकर (१९८६) आणि मधु मंगेश कर्णिक (१९९०) घेतात.

ग्रामीण भाषा नैसर्गिक पण शहरी भाषा मात्र कृत्रिम हा अपसमज असल्याचे गंगाधर गाडगीळ (१९८१) स्पष्ट करतात. त्याच्या मते मुळात भाषा हीच कृत्रिम असते. (हे न पटणारे आहे. भाषा वैयक्तिक प्रयत्नाने निर्माण होत नाही. तिच्या अर्थवाहकतेला कार्यकारणभाव नसतो इतकेच म्हणता येईल.) मुळात ग्रंथभाषा ही ग्रामीण बोलीभाषा बोलणाऱ्यांनीच निर्माण केली असते. (हेही खरे नाही. विशिष्ट बोलीभाषा ग्रंथभाषा म्हणून काही सामाजिक-आर्थिक कारणांनी वापरली जाते. मग ती विकसित केली जाते. खरे म्हणजे सामाजिक प्रतिष्ठेखेरीज दोन बोलीभाषात (ग्रामीण विरुद्ध शहरी वगैरे) फरक नसतो एवढाच महत्त्वाचा भाग आहे.) कुठे कुठली भाषा वापरायची याचे औचित्य भाषकांना समाजाकडूनच कळते.

ग्रामीण भाषा प्रत्ययकारी असते तशी शहरी भाषा प्रत्ययकारी नसते असा अपसमज शहरी ग्रामीण साहित्यिकांनी करून घेतला आहे. गाडगीळ त्याची खिल्ली उडवतात. हा अपसमज खरा मानला तर ज्ञानेश्वरीची भाषा ग्रामीण म्हणायला लागेल (आणि ग्रामीण भाषेतही होणाऱ्या रटाळ गप्पाटप्पा प्रत्ययकारी मानाव्या लागतील.)

गाडगीळांना ग्रामीण भाषेला अस्सल मराठी म्हणणेही मान्य नाही. ती पूर्णतः देशी आहे हाही एक अपसमज. (खेडेगावात इंजिन, लाइट, मटेरियल, हायब्रीड यासारखे कितीतरी विदेशी शब्द लोक सहजपणे वापरतात.) साहित्याच्या क्षेत्रात ग्रामीण साहित्यद्वारा ग्रामीण भाषेचा पुरस्कार करणारे साहित्यिक साहित्याच्या क्षेत्रात अस्पृश्यता आणत आहेत असा टोला गाडगीळ मारतात.

भाषेचा वापर व्यवहार, सामाजिक अभिसरण आणि साहित्य या तीनही क्षेत्रात होतो असे सांगून वसंत कानेटकर (१९८८) वैचारिक व ललित साहित्य ही भाषेची सांस्कृतिक रूपे आहेत असे म्हणतात (साहित्य हेच संस्कृती अशा समजुतीवर आधारलेले हे मत आहे.)

विश्राम बेडेकर (१९८६) भाषेला साहित्याचे माध्यम मानतात इतर कलांची माध्यमे बाह्य असतात; भाषा मात्र असे बाह्य माध्यम नसते. (खरे म्हणजे भाषा ही इतर संज्ञापन व्यवस्थांपेक्षा अधिक व्यामिश्र व बलवान असते एवढेच खरे. बेडेकर हेगेलचे मत सांगतात ते असे . काव्य हा सर्व कलात उच्चतम प्रकार आहे. याचेही कारण

भाषेची व्यामिश्रता व आकृति आणि अनुभव जडवस्तूंच्याविना उभी करण्याची ताकद यातच आहे.)

अण्णाभाऊ साठे, लक्ष्मण माने, गायकवाड, बेबी कांबळे यांच्या साहित्यात शिष्टमान्य प्रमाण भाषा आणि बोलीभाषा यांचा मिलाफ झाला आहे तसा दया पवार, शंकरराव खरात यांच्या साहित्यात नाही असे य. दि. फडके (२०००) म्हणतात. अहिराणीत साहित्य-निर्मिती झाली की ती प्रमाणभाषा होईल असेही ते म्हणतात. (साहित्य-निर्मितीमुळे भाषेचे मानक तयार होतात हे खरे, पण त्यामुळे ती लगेच प्रमाण भाषा होते असे नाही.) डॉ. मोहन माजगावकरांचे अहिराणीतील लेखन आपण प्रमाण भाषेत सांगितले तर त्याची परिणामकारकता कमी होते असे ते म्हणतात. बोलीभाषेतला जिवंतपणा साचेबंद प्रमाण भाषेत आणणे अवघड असते. (दलित साहित्यातील बोली भाषेच्या वापराचा गौरव करताना फडके प्रमाण भाषेविषयी अकारण अशास्त्रीय विधाने करतात. फडके म्हणतात मी अहिराणी लेखनातील परिणामकारकता जात असेल तर ती त्यांच्या भाषांतरातील कमकुवतपणाने, प्रमाण भाषेच्या साचेबंदपणामुळे नव्हे. प्रमाण भाषा साचेबंद असली तर अहिराणीला तो दर्जा यावा असे फडक्यांना वाटता कामा नये. साचेबंद प्रमाण मराठीतील सर्वच साहित्य परिणामकारकता गमावून बसायला हवे. मुळात प्रमाण भाषा निर्जीव व बोली भाषा जिवंत हा दावाच असिद्ध आणि अशास्त्रीय आहे.)

फडक्यांचे भाषण अनेक अवतरणांनी भरलेले आहे. कधीकधी ही अवतरणे मुद्दा बाजूलाही ठेवतात. बोली भाषांना अशुद्ध म्हणण्याचे कारण नाही असा कोलत्यांचा (१९६०) मुद्दा फडके अवतरण देऊन मांडतात. त्यानंतर लगेच दुर्गाबाई भागवतांचे (१९७५) अवतरण येते. त्यात प्रमाण भाषेची आवश्यकता आणि नित्यत्व स्पष्ट होते एका अर्थाने ही दोन मते भूमिकांच्या दृष्टिकोनातून परस्पर विरोधी आहेत. बहिणाबाई चौधरीच्या कवितेचे अवतरण सुद्धा असेच अस्थानी आहे. त्यात छापलेल्या मजकुरातून फार तर ज्ञान मिळेल, शहाणपण मिळणार नाही असे बहिणाबाई म्हणतात. फडक्यांचा मुद्दा काय ? तर आज इंटरनेटवर सुद्धा माहिती भरपूर मिळते, पण त्यातून शहाणपण मिळेल असे नाही. कारण ? 'कारण माहितीच्या महाजालाचे माध्यम इंग्रजी आहे' हे !

### ३.३.१ (३)

साहित्य आणि संस्कृती यातील संबंधांबाबत गंगाधर गाडगीळ (१९८१) एक चांगले निरीक्षण नोंदवतात. ते असे म्हणतात की पूर्वी भारतातले लोक रामायण व महाभारत या महाकाव्यांनी जोडले जात असत. (अर्थात येथेही धर्माचे श्रेय साहित्याला देण्याचा प्रयत्न दिसतो. धर्माचे अस्तित्व, त्याचा परिणाम नाकारताना संस्कृती व साहित्य यांचा ढालीसारखा वापर करायचा—धार्मिक संघटनेला सांस्कृतिक एकात्मता म्हणायचे आणि धार्मिक प्रभावाची मुळे साहित्यात शोधायची—हा आधुनिक मराठी

विचारवंतांचा प्रयत्न सहेतुक आहे हे निश्चित, पण तो केविलवाणा आहे.) आता हे जोडण्याचे काम हिंदी चित्रपट करतात. तथापि गाडगीळ हिंदी चित्रपटांचे हे श्रेय मान्य करत नाहीत. त्यांना यात सांस्कृतिक अनारोग्याचे लक्षण दिसते.

(वस्तुत: वाल्मिकी रामायण व तुलसी रामायण यातला गुणवत्ता फरक विचारात घेऊन जोडण्याचे काम पूर्वी नेमके कोणी केले याचा विचार करता आला असता. ज्ञानेश्वरांनीही एका अर्थी ज्ञानेश्वरी लिहून गीता 'लोकप्रिय'च केली. 'लोकप्रिय' गोष्टीना त्यांच्या सांस्कृतिक स्थानाचा विचार न करता केवळ नावे ठेवण्यात वैचारिक चिकित्सेची परवड होते हे काही मराठी विचारवंतांच्या लक्षात येत नाही.)

विश्राम बेडेकर (१९८६) कला आणि साहित्य माणसाच्या अनित्य जीवनातले दिव्य क्षण पकडतात आणि त्यांना अमर करून ठेवतात असे म्हणतात. अशा अमर क्षणांचे भांडार म्हणजे संस्कृती. संस्कृती या संकल्पनेचे उन्नयन करणारा हा दृष्टिकोन आहे मधु मंगेश कर्णिक (१९९०) संस्कृतीची अशीच मर्यादित आणि साधी सोपी कल्पना स्वीकारतात. त्यांच्या मते भाषेतून साहित्यनिर्मिती होते आणि साहित्यातून संस्कृती उदय पावते हे कसे हे मांगण्याची जबाबदारी ते स्वीकारत नाहीत कारण हा क्रम मुळी जुनाच आहे असा त्यांचा दावा.

विद्याधर गोखले (१९९३) साहित्याला संस्कृती निर्माण करण्याचे साधन मानतात आणि संस्कृतीला राष्ट्रीयत्वही बहाल करतात. म्हणजे मराठी साहित्यातून भारतीय संस्कृती निर्माण होते असा हा दावा. याचे स्पष्टीकरण करण्याची गरज गोखल्यांना वाटत नाही. हे असे विचार सर्वांना आपोआपच कळतात असा त्यांचा समज असावा.

बेडेकरांची संस्कृतीसंबंधीची कल्पना फार सीमित आहे तर कर्णिक, गोखले संस्कृती हा शब्दच फार ढिसाळपणे वापरतात. या उलट नारायण सुर्व्यांची (१९९५) स्थिती आहे. साहित्य व संस्कृती यांची चर्चा फक्त विचारवंत व साहित्यिक यांनीच करण्याचे दिवस गेले असे ते स्पष्टपणे म्हणतात नवशिक्षित बहुजन समाज साहित्य आणि संस्कृती यातील संबंधांचा प्रामाणिकपणे नवा अर्थ लावत आहे, त्याला नावे ठेवणे उचित नाही. आपल्याला स्वत:ची ओळख, देशाची ओळख आणि आपण राहतो त्या समाजाची ओळख पटायला आपले साहित्य व आपली संस्कृती कळायला हवी असे सुर्वे म्हणतात सुर्वे संस्कृतीचा व्यापक असा अर्थ करतात भौतिक संस्कृतीच्या विकासामुळे मानवी जीवन सुखकारक होते तर अभौतिक संस्कृतीच्या विकासामुळे मानवी जीवनाला अलौकिकत्व प्राप्त होते असे ते सागतात. सांप्रतच्या मराठी समाजातील सास्कृतिक मागासलेपणावर सुर्वे नेमकेपणाने बोट ठेवतात. फुले, आंबेडकर यांच्यासारखे समाज ढवळून काढणारे विचारवंत होऊनही रूढी, मंत्र, प्रारब्ध, उच्चनीचता हे ओझे मराठी समाज आजही वागवतो आहे. काही थोडे लोक सोडले तर आजही साहित्यिकांची

मानसिकता या ओझ्याखाली आहे. स्वत:च्या वर्गापलीकडची माणसे ते पाहातच नाहीत. मध्यमवर्गातील कनिष्ट वर्ग, कामगार, मजूर हे साहित्यात उपेक्षितच आहेत. (खरे म्हणजे सुर्वे म्हणतात त्या वास्तवाकडे अधिक तार्किकतेने पाहायला हवे. फुले, आंबेडकरांचे विचार दूर ठेवून पारंपरिक सांस्कृतिक बाबी जपणारा आणि स्वत:च्या वर्गापलीकडे न पाहणारा मध्यमवर्गीय साहित्यिकांचा मोठा वर्ग जसा आहे तसाच केवळ फुले, आंबेडकरांचे विचार विभिन्न मार्गानी मांडणारा आणि या विचारांच्या आणि स्वत:च्या उपेक्षित किंवा दलित वर्गापलीकडे न पाहणारा दलित साहित्यिकांचा वर्गही मोठाच आहे. विचारांना वर्ग नसतो, नसावा. असलाच तर ते विचार त्या वर्गापुरतेच मर्यादित्त राहणार. फुले, आंबेडकरांच्या विचारात केवळ वर्गबद्ध विचार कोणता आणि सार्वत्रिक विचार कोणता याची मराठी साहित्यिकांनी आणि विचारवंतांनी मोकळेपणाने फारशी चर्चा केली नाही हे खरेच. विचारांचेही गटबंधन करणारी अशी मराठी संस्कृती का व कशी बनली याचा विचार करणे गरजेचे आहे. अन्यथा सुर्वे करतात ते दोषारोपण यथार्थ असले तरी त्यातून वैचारिक प्रगती होणार नाही.)

### ३.३.१ (४)

साहित्य आणि समाज याबाबत काही अपवाद वगळता पूर्वीच्या सर्व अध्यक्षांनी विचार मांडताना साहित्याची सामाजिक बांधिलकी मानली होती असे गं. बा. सरदार (१९७९) म्हणतात. ह. ना. आपट्यांच्या अध्यक्षीय भाषणातील राष्ट्र आणि साहित्य यांच्या परस्परावलंबित्वाचा अर्थ सरदार साहित्याची सामाजिक बांधिलकी असा करतात. अर्थात् पूर्वीच्या अध्यक्षांच्या सामाजिक दृष्टिकोनात भिन्नता होती हे त्यांना मान्य आहे. (राष्ट्र, समाज या संकल्पना मराठी विचारात फार चिकित्सा करून स्वीकारलेल्या नाहीत त्याचा हा परिणाम असावा.) भारतीय समाजातील जातिव्यवस्थेमुळे सामाजिक अभिसरण होत नाही. म्हणून उच्च वर्गाला दलितांच्या दु:खाची सुतराम् कल्पना नसते. दलितांचे दु:ख समरसतेने उच्च वर्गाला जाणवत नाही, जाणवले तरी त्यात उपरेपणा असतो. उच्च वर्णीयांच्या विलगतेचे आणखीही एक कारण सरदार सांगतात. एके काळी उच्चवर्णीय मध्यमवर्गावर कर्तेपणाची जबाबदारी होती. स्वातंत्र्य मिळवून समाजाची पुनर्बांधणी करण्याची जबाबदारी तो मानत होता. पण स्वातंत्र्यानंतर या वर्गाचे नेतृत्व गेले. परिणामत: या वर्गातील विचारवंत, साहित्यिक, अध्यापक, तंत्रज्ञ अधिकाधिक समाजविन्मुख व उदासीन बनले. त्यांच्या साहित्यात स्ववर्गाच्या संवेदना व अनुभव एवढेच उरले (सरदारांच्या या विवेचनात तथ्य आहे पण ते सर्वसाधारण साहित्य आणि त्याच्या साहित्यिकांबाबत. केवळ नेतृत्व गेल्याने, वर्गदु:खाने प्रतिभावान् व्यक्ती समाजविन्मुख बनत असली तर सत्तेत असणाऱ्या वर्गातूनच साहित्यिक जन्मास येतात असा व्यत्यास मांडावा लागेल. हे खरे नाही. उच्च कलाकृती आणि प्रगल्भ विचार यांचा जनक

वर्गबद्ध मानण्यात व्यक्तीची स्वायत्तता नाकारली जाते.)

सरदार म्हणतात त्या उच्चवर्णीय पिंजऱ्यातला साहित्यिक आपण नाही असे गो. नी. दांडेकरांना (१९८०) सांगावे लागते. आपण लहानपणापासूनच विविध थरातल्या लोकांबरोबर राहून त्यांची दु:खे जाणून घेतली असे ते जाहीरच करतात. (म्हणजे प्रत्यक्ष उपस्थिती असली की उपरेपणा आपोआप जातो असे त्यांना वाटते. सरदारांच्या चिकित्सेमुळे सर्वसामान्य मध्यमवर्गीय लेखक दलितांच्या दु:खाबाबत अधिक कळवळा दाखवू लागला, त्याची विदारकता इतर म्हणतात म्हणून स्वीकारू लागला, निदान ते नाकारण्याचे धाडस करण्याच्या फंदात पडला नाही ही कमाई थोडकी नव्हे)

व्यंकटेश माडगूळकर (१९८३) हीच युक्ती वापरतात. आपण आणि विभिन्न जातीतले आपले मित्र लहानपणी एकाच समाजात एकच जीवन जगलो, आपले खेळगडी कुणबी, रामोशी, मुलाणी, मोमीन, महार, न्हावी, सुतार यांची मुलं होती. त्यामुळे त्यांचे जीवन आपणास उपरे नव्हते असे ते सुचवतात. (सरदारांच्या चिकित्सेने मध्यमवर्गीय लेखकांची एक बचावात्मक भूमिका तयार झाली असे दिसते. पण या भूमिकेतला जो काय प्रामाणिकपणा असेल तो घेतला तर सरदारांची सामाजिक संरचनेची मांडणी दोषास्पद होती असेही दिसते. वर्णव्यवस्थेत सामाजिक अभिसरण शून्य अशी सरदारांची टोकाची भूमिका तर जातीची उतरंड असताही खेडेगावात अठरापगड जातीचे लोक एकमेकात मिसळत असा दांडेकर, माडगूळकर यांचा दुसऱ्या टोकाचा दावा. दांडेकर, माडगूळकर स्वत:चे वैयक्तिक अनुभव दाखले म्हणून देतात; सरदार हिंदू समाजव्यवस्थेची एक संकल्पना मांडून ती गृहित म्हणून स्वीकारतात. यातून एक तथ्यांश निघू शकतो. हिंदू समाजातील वर्णव्यवस्था व्यक्तीला समाजापासून विलग राहण्यास पूरक होती पण समाजात मुक्त वावर असण्यास ती उघड प्रतिबंध करणारीही नव्हती.) मात्र केवळ संचाराने माणसांची दु:खे, त्यांचे अनुभव कळतात असा भाबडेपणा माडगूळकरांकडे नाही. आपल्या बरोबर वाढलेल्या दुसऱ्या एका मित्राचे उदाहरण ते देतात. हे महाभाग कारकून होऊन सेवानिवृत्त झाले; लेखक झाले नाहीत. अनुभवाबरोबर प्रतिभा आणि संवेदनक्षमता हवी असे माडगूळकर म्हणतात. (या दोन भूमिकांमधे आणखी एक गफलत आहे. अनुभवाची दाहकता, विदारकता वगैरे साहित्याच्या बाबतीत वाचक-सापेक्ष असतो हे विसरले जाते. दलित साहित्यातील 'विदारक' अनुभव म्हणजे काय ? ही विदारकता वाचकाला विदारक वाटेल तरच टिकेल हेच खरे.)

मराठी साहित्यिक हे नेहमीच समाजसुधारक—म्हणजे वर्गबद्धतेत न अडकलेले—होते असे वसंत कानेटकर (१९८८) आडवळणाने म्हणतात. याला पुरावे दोन. रानड्यांनी साहित्य संमेलन सुरू केले तशी सामाजिक परिषदही सुरू केली. (१९०१ साली रानड्यांचा मृत्यू झाला आणि सामाजिक परिषदेला वाली उरला नाही. साहित्य संमेलन मात्र साहित्य परिषदेने घेतले असे कानेटकर म्हणतात पण सामाजिक परिषद

बंद होण्यामागची सामाजिक मानसिकता काय असावी असा प्रश्न त्यांना पडत नाही.) हरि नारायण आपटे, देवल हे साहित्यिक समाजसुधारक होते हा कानेटकरांचा दुसरा पुरावा. (कानेटकर सुद्धा एकप्रकारे सरदारांची चिकित्सा फेटाळतात. गंमत म्हणजे सरदारांच्या चिकित्सेत आणखी एक फट आहे. एकीकडे सरदार बहुसंख्य अध्यक्ष सामाजिक बांधिलकी मानणारे होते असे म्हणतात. या अध्यक्षात बहुसंख्य उच्चवर्णीय साहित्यिकच होते. उच्चवर्णीय साहित्यिकांनी हे दलितांच्या जीवनाकडे कधी जवळिकीने पाहिलेच नाही असेही सरदार म्हणतात. त्यांना त्या जीवनाची जाणीव नव्हती. पण सामाजिक बांधिलकी होती याचा अर्थ काय घ्यायचा ? सरदारांचा रोख सामान्य प्रतीचे रंजक साहित्य लिहिणाऱ्या सर्वसाधारण मध्यमवर्गीय साहित्यिकांवर आहे, तर अध्यक्ष झालेले उच्चवर्णीय मध्यमवर्गीय साहित्यिक आपण त्या सामान्य वर्गातले आहोत हे कबूल करायला तयार नाहीत !)

के. ज. पुरोहितांना वाङ्मयाविषयी समाजाला आस्था नाही असे वाटते. ज्ञानेश्वर, तुकाराम यांचा वारसा सांगणाऱ्या आपल्या मराठी समाजाला आज फारशी वाङ्मयीन संस्कृती राहिली नाही असे ते म्हणतात. (खरे म्हणजे पुरोहित म्हणतात ती वाङ्मयीन संस्कृती मराठी समाजात गेल्या शे-दीडशे वर्षांचीच होती. लेखन-वाचन व्यवहाराची ही वाङ्मयीन संस्कृती. ही संस्कृती ज्या शिक्षितांमधे होती त्यांनी ज्ञानेश्वर तुकारामांचा वारसा फारसा मानलाच नाही. तो वारसा मानणारे सारेच शिक्षितही नव्हते. धार्मिक वाङ्मयाचे मौखिक स्वरूपात जतन करणारी संस्कृती आणि इंग्रजी शिक्षणातून निर्माण झालेली लेखन-वाचनाची धर्मनिरपेक्ष संस्कृती या दोन वेगळ्या आहेत. धार्मिक वाङ्मयाच्या उपासकांना—जे संख्येने नेहमीच मोठे होते आणि आहेत—या शिक्षित लेखक-वाचकांच्या गटात ओढणे यात एक खोटे परंपरेचे, घट्टपणे टिकून राहण्याचे समाधान आहे इतकेच. ज्ञानेश्वर-तुकारामांचे वाङ्मय गोडीने आत्मसात करणाऱ्यांच्या पाच-दहा टक्के सुद्धा लोक केशवसुत वा मर्ढेकर वाचत नाहीत आणि वाचणारही नाहीत. मराठी समाजाचा साहित्याशी असणारा संबंध हा इंग्रजी समाज-साहित्य परंपरेसारखा मानण्यात मराठी विचारवंतांनी घाई केली आणि चूकही.)

समाज आणि साहित्य यांना वेगळे करता येत नाही असे मधु मंगेश कर्णिक (१९९०) म्हणतात. समाजातील घडामोडीचे प्रतिसाद साहित्यामध्ये उमटणे अगदी स्वाभाविक आहे अशीही त्यांची खात्री आहे. समाज आणि साहित्य आणि त्यातून घडणारी संस्कृती हे सर्वच गतिशील असतात वगैरे सामान्य विधाने कर्णिक करतात. त्यामागे काही स्वतंत्र विचार, स्वतंत्र विश्लेषण आहे असे नाही. लेखक कलाविष्कारात मुक्त पण तो समाजाभिमुख हवा असा समन्वयी विचार मांडण्याचा ते प्रयत्न करतात (प्रश्न असा आहे की लेखकाची समाजाभिमुखता त्याच्या साहित्यकृतीवरूनच जोखली जाते. व्यक्ती म्हणून तो समाजाभिमुख आहे, की राजकारणी आहे, की उदार धनिक

आहे या गोष्टीना महत्त्वच राहत नाही.) आजच्या बदलत्या समाजाला साहित्यापासून काय हवे याचे भान साहित्यिकांनी ठेवलेच पाहिजे असे जेव्हा कर्णिक म्हणतात तेव्हा नकळतपणे मागणी तसा पुरवठा या स्वरूपाच्या साहित्य-निर्मितीचा आग्रह धरला जातो. देशातले आजचे वाईट वातावरण साहित्याने शुद्ध बनेल असा भाबडा आशावादही कर्णिकांकडे आहे.

संतकवी आणि पंतकवी यांचे साहित्य बहुजन समाजापर्यंत पोहोचविण्याचे काम कीर्तनकारांनी केले असा मुद्दा शेवाळकर (१९९४) मांडतात. शेवाळकरांचे कुटुंब कीर्तनकारांचे. पूर्वरंगात संतकवी व उत्तररंगात पंतकवी येतात असेही ते सांगतात. मुद्रणकलेमुळे ही वक्तृत्व परंपरा मागे पडली. मुद्रणकला ही प्रगत-अवस्था आहे असे शेवाळकर मानतात, ज्ञानदानाचे कार्य वक्तृत्वाऐवजी लेखनकलेने स्वीकारले पण वक्तृत्वकला संपली नाही. समाजाचे प्रबोधन लालित्यपूर्णरीतीने करण्याचे काम अजूनही वक्तृत्वकला करते. दुर्दैवाने मौखिक कलेतील नाटकाला जी दाद आपण देतो ती लालित्यपूर्ण वकृत्वाला देत नाहीत असे शेवाळकर म्हणतात. आरंभीचे सर्व साहित्य मौखिक म्हणून 'वाङ्मय' होते याचीही आठवण शेवाळकर करून देतात. (वक्तृत्व ते लिखित रूप हा साहित्य माध्यमातील बदल आणि त्यांचा समाजाशी असणारा संबंध याबाबतचे शेवाळकरांचे म्हणणे सर्वसाधारणपणे खरे आहे. पण त्यात काही त्रुटीही आहेत. वक्तृत्वातून ज्ञानदान होत होते हे खरे मानले तरी ज्ञाननिर्मिती वक्तृत्वातून होत नव्हती हेही खरे. मौखिक परंपरेने वाङ्मय टिकवण्याचे काम केले; शिक्षणाचा तो परिपाठ होता. पण मौखिक परंपरेने वाङ्मयरचनेचे काम केले असे म्हणणे यथार्थ नाही. मुळात बोलता-बोलता विचार करणे आणि लिहिताना विचार करणे यात विचारांच्या गुणवत्तेतच फरक पडतो. शिवाय मौखिक परंपरा होती याचा अर्थ संहिता-लेखनच नव्हते असा नाही. रामायण, महाभारत यासारखे ग्रंथ, कालिदास, भवभूतीची नाटके, खंडकाव्ये, कौटिलीय अर्थशास्त्रासारखे ग्रंथ हे तोंडी रचले जाणे आणि तोंडीच रहाणे अशक्य. संस्कृत वाङ्मयाविषयीचा हा गैरसमज आहे. केवळ पाठांतर हे ज्ञानार्जन नव्हे आणि आजही व्याख्यान रूपाने ज्ञानदान होतेच. नाटक हे प्रयोजीवी असले तरी त्याचे पाठ्य लिखित-साहित्य असते; अध्यक्षीय निबंध-वाचनासारखे अपवाद सोडल्यास भाषण हे लिखित साहित्य नव्हे. त्यामुळे त्याला नाटकासारखी दाद मिळणे अशक्य आणि तशी अपेक्षा करणे हे साहित्याचे साहित्यत्त्व आणि भाषणातील वक्तृत्व यांची गल्लत करण्यासारखे आहे. वक्तृत्व ही कला आहे पण ती साहित्य-कलेपेक्षा वेगळी आणि मर्यादित आहे. शेवाळकर म्हणतात ते लालित्यपूर्ण वक्तृत्व हे महाराष्ट्रात उदंड आहे. लालित्यपूर्ण याचा बरेचदा अर्थ विचारशून्य, केवळ शब्दांचे अवडंबर असणारे असाच होतो; त्यातून प्रबोधन होणे अवघड आहे. प्रबोधनाचा भास आणि टाईमपास यावरच आज ते जगताना दिसते. शेवाळकरांचे स्वतःचे भाषण हे विचारापेक्षा 'लालित्या'कडेच

अधिक झुकते. 'गोव्याने आपला मराठीपणा पतिव्रतेच्या शीलाइतका जपून ठेवला याचे महाराष्ट्राप्रमाणे मलाही मोहन होते', 'मराठीच्या प्रतिष्ठापनेचा प्रवास चालू आहे', 'संस्कृतचे स्तन्य पिऊनच मराठी कांतिमान झाली', 'कोकणी मराठीचीच धाकटी बहीण आहे. आतापर्यंत दोघीही गुण्यागोविंदाने एकत्रच वाढल्या, खेळल्या, बागडल्या', (सामान्य माणूस साहित्यात) 'आपल्या भरजरी दु:खाची गौर मांडतो', 'साहित्य हा प्रतिभावंत व रसिक यांचे मधुर ऋणानुबंध चिरजीव करणारा सेतू आहे' (कलावंत व रसिक यांची) 'स्नेहभेट जिथे होते, ते ठिकाण अष्टमीच्या चंद्राचे', 'सूर्यबिंब जसे बचकेएवढे असते, पण प्रकाशाने ते त्रैलोक्यालाही तोकडे करून सोडते', 'प्रियतमाच्या भेटीसाठी सर्वांगी आतुर झालेल्या रमणीचे समाधान तिच्या कमनीयतेचे, सौष्ठवाचे, उत्कंठतेचे व विभ्रमांचे तटस्थ स्तवन करून होणार नाही. एकही शब्द न उच्चारता कडकडून दिलेल्या आलिंगनामुळे व आधाशी प्रेमवृष्टीनेच ते होण्याची आशा असते. तसेच कलाकृतीच्या सौंदर्याची चिकित्सा करून, तिच्या रीतीगुण-अलंकाराची प्रशंसा करून तिला न्याय देता येणार नाही, तृप्त होईपर्यंत तिचा आस्वाद घेण्याने व हा अलौकिक आस्वादानुभव समर्थपणे संक्रमित केल्यानेच तो देता येईल' यासारख्या शाब्दिक फुलबाज्यांनी भरलेले आहे. पहिल्या पायरीवर शि. म. परांजप्यांच्या भाषणाबाबत बोलताना आपण त्यातील शाब्दिक डोलारा व विचारांचा अभाव याची दखल घेतली. तीच परंपरा तिसऱ्या पायरीवर विद्याधर गोखले, शेवाळकर चालवताना दिसतात. प्रगती इतकीच की अर्थहीन लैंगिक प्रतिमांचा संस्कृतप्रचुर भाषेत निलाजरेपणाने वापर केला जातो. या असल्या लालित्यपूर्ण वक्तृत्वाला शेवाळकर म्हणतात तशी दाद मिळत नसेल तर मराठी 'साहित्यप्रेमी बंधू आणि भगिनी' ची खरे म्हणजे पाठच थोपटायला हवी.)

नारायण सुर्वे (१९९५) साहित्याचा व जीवनाचा संबंध अतूट मानतात. कादंबरीसारखा वाङ्मयप्रकार हा सामाजिक द्रव्यातून आपले आशयद्रव्य घेतो असे ते म्हणतात. माणूस हा सामाजिक प्राणी असल्याने त्याने निर्मिलेल्या साहित्याचा सामाजिकतेशी संबंध असणारच असे त्यांना वाटते. (माणूस हा समाजात राहातो हे खरे पण म्हणून तो सरसकट समाजप्रिय आहे असे मानणे कितपत यथार्थ आहे ? शिवाय कलाकाराचा व्यक्ती म्हणून सामाजिकतेशी असणारा संबंध हा कलावंत म्हणूनही तसाच असेल असे मानणेही पारखून घ्यायला हव.) सुर्वे जेव्हा 'साहित्याने दखल घेवो न घेवो, समाज अन्यायाविरुद्ध धडक मारतोच' असे म्हणतात तेव्हा एका अर्थाने साहित्याचे दुय्यम स्थान ते मान्य करतात असे म्हटले तर ? सुर्व्यांना कादंबरी हा प्रकार सामाजिकतेशी अधिक संबंधित आहे असे वाटते आणि ते बरोबरही आहे. वसंत बापटांना (१९९९) मात्र समाजाचे चैतन्य त्याच्या कवितेतून प्रकट होते असे वाटते. बापट आपला मुद्दा विस्ताराने मांडत नाहीत. य. दि. फडके (२०००) हे समाजशास्त्राचे अभ्यासक पण

साहित्य व समाज या विषयावर ते बोलत नाहीत.

### ३.३.१ (५)

दुसऱ्या पायरीप्रमाणे या पायरीवरही एक ना. सं. इनामदारांचा (१९९७) अपवाद वगळता कोणीही अध्यक्ष साहित्य व इतिहास यातील संबंधाबाबत बोलत नाही. ह. ना. आपट्यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्यात पूर्वकालीन सत्य आणि सत्याभास यांचे मिश्रण आहे असे इनामदार म्हणतात. पूर्वकालीन सत्य म्हणजे ऐतिहासिक सत्य (खरे म्हणजे पूर्वी सत्य म्हणून स्वीकारलेले असे काही). सत्याभास म्हणजे सत्याचा ललित आविष्कार. स्वातंत्र्यपूर्व काळातील ऐतिहासिक कादंबरी या स्वरूपाची. ऐतिहासिक कादंबरीचा दुसरा टप्पा १९४७ नंतर सुरू होतो. सत्ताधाऱ्यांना पूर्वकालीन सत्य नको होते. ते काय आहे हे साहित्यिकांना ऐतिहासिक साधनांच्या आधारे तपासायचे होते. इतिहासकारांना जे सत्य गवसले नाही ते आपल्याला कादंबरी-लेखनासाठी इतिहासाचा अभ्यास करताना गवसले असा दावा इनामदार करतात. केवळ साधने जमविणे म्हणजे इतिहास नव्हे असे इनामदार म्हणतात. (ही कोपरखळी राजवाडे, सरदेसाई यांना) इतिहाससंशोधन आणि इतिहासकार यातही ते फरक मानतात. इतिहास म्हणजे मानवी प्रगतीच्या प्रवासाची नोद करणारी प्रयोगशाळा आहे आणि सत्य म्हणजे काय घडले ते अशी व्याख्या करून इनामदार आपण इतिहास शोधल्याचे सांगतात. नव्या तपशिलाने जुनी गृहिते हादरतात, उदाहरणार्थ औरंगजेब हा क्रूर, व्यवहारी बादशहा असा समज. पण तो कविता करे असा तपशील इनामदारांना मिळाला. ऐतिहासिक कादंबरी लेखनात इतिहास हे साधन आहे, साध्य नव्हे असे इनामदार म्हणतात (हे जर खरं असेल तर 'मंत्रावेगळा' या आपल्या कादंबरीत इतिहासकारांना जे सत्य गवसले नाही ते आपण शोधले हा दावा गोंधळात टाकणारा ठरतो.) ऐतिहासिक कादंबरीला वाङ्मयीन निकषही लावावे लागतात असे सांगून इनामदार इतिहासरस असा नवा रस मानावा असे म्हणतात. (हे संस्कृत रससिद्धान्ताचे सुलभीकरण. याच न्यायाने प्रादेशिकतारस, विज्ञानरस वगैरे मानावे लागतील.) आपल्या ऐतिहासिक कादंबऱ्यात इतिहासाच्या अवलोकनातून समजलेले नियतीच्या शक्तीचे आणि प्रयत्नवादाच्या मर्यादेचे सूत्र आपण मांडले असे इनामदार म्हणतात.

### ३.३.१ (६)

साहित्य आणि वास्तव यांचे नाते तिसऱ्या पायरीवरील काही अध्यक्षांच्या भाषणात एका वेगळ्याच अंगाने दिसते. आत्मनिवेदन करताना काही अध्यक्ष आपल्या भोवतालच्या परिस्थितीचा आपल्या लेखनावर कसा परिणाम झाला ते सांगतात. गो. नी दांडेकर (१९८१) यांनी बाबा आमट्यांच्या सान्निध्यात कुष्ठरोग्यांची सेवा केली.

त्यातून 'आनंदवनभुवन' ही कादंबरी आली असे दांडेकर म्हणतात. खेड्यातील अस्पृश्यांचे हीन प्रतीचे जीवन, त्यांचे होणारे शोषण दांडेकरांनी पाहिले; या वास्तव्यातून त्यांना 'देवाघरची माणसं' ही कादंबरी स्फुरली. दांडेकरांनी शहराकडे धाव घेण्याच्या वृत्तीने उद्ध्वस्त झालेले कोकण पाहिले आणि त्यातून 'पडघवली' अवतरली. वास्तव पाहून, प्रत्यक्ष अनुभव घेऊनच आपण कादंबरी-लेखन केले असे दांडेकर म्हणतात. (अर्थात् याचा मुख्य हेतू प्रत्यक्ष अनुभव न घेतलेले उच्चवर्णीय लेखक दलितांवर काय लिहिणार या दलित विचारवंतांच्या प्रश्नाला बचावात्मक उत्तर देणे हा आहे; वास्तवाचा साहित्यावर काय परिणाम होतो याबाबतच्या चिंतनाचा हेतू यामागे नाही.)

व्यंकटेश माडगूळकर (१९८३) महार, चांभार, गुराखी, न्हावी अशा आपल्या संवगड्यांनी साधी, जोमदार व निरागस शैली दिली असे म्हणतात (म्हणजे काय केले ? शैलीचे निरागसत्व हा केवळ शब्दखेळ आहे का ?) दुसऱ्या महायुद्धाने सामाजिक जीवनात उलथापालथ झाली (हीही मराठी लेखकांनी दत्तक घेतलेली एक कल्पना). त्यामुळे लोकसंस्कृतीची प्रसारमाध्यमेच असणारे वासुदेव, वाघ्ये, रामदासी वगैरे व्यावसायिक लुप्त झाले. धनगर समाजाच्या अवलोकातून 'झेल्या' हे शब्दचित्र निर्माण झाले असे माडगूळकर म्हणतात. शंकरराव खरात (१९८४) दलित फेडरेशन या पक्षाचे संघटक-सचिव होते. त्यातून दिसलेल्या दलितांच्या जीवनातून 'संतूची पडकी जमीन' ही त्यांची पहिली कथा जन्माला आली. गावकीच्या कामाच्या अनुभवातून 'माणुसकीची हाक' ही कादंबरी तयार झाली. आपल्या कथा-कादंबऱ्यातली सर्वच पात्रं वास्तवातली माणसं होती असे खरात म्हणतात. (पण म्हणून काय झाले याबाबत बोलत नाहीत.)

शंकर पाटील (१९८५) आपले बालपण कोल्हापूरजवळच्या ज्या दोन गावात—पट्टणकोडोली व तारदाळ—गेले त्याचा परिणाम आपल्या लेखनावर झाल्याचे सागतात. आपल्या लेखनावर गाडगीळांच्या नवकथेचा परिणाम झाल्याचेही ते सांगतात. 'सत्यकथे'चे संपादक श्री. पु. भागवत यांच्याशी होणाऱ्या चर्चांचाही परिणाम आपल्या साहित्यावर झाला असे ते म्हणतात. इंग्रजी वाङ्मयाच्या खांद्यावरूनच आपण साहित्यकलेचे जग पाहिले व अनुसरले असे ते प्रांजळपणे मान्य करतात.

बहुजन समाजातील नवीन कवी हे दलित चळवळीतले कार्यकर्ते आहेत असे नारायण सुर्वे (१९८५) म्हणतात. त्यांना जीवनाचे उत्तम भान आहे. वास्तवाच्या या सततच्या जाणीवेची सुर्व्यांना वेगळीच भीती वाटते. निर्मितीतला प्रामाणिकपणा व कलात्मकता विसरण्याचा धोका यातून संभवतो. असे कवी मग फक्त 'शब्दसोयरे' राहतात. (वास्तवाशी—विशेषत: खेड्यापाड्यातील दलित जीवनाशी किंवा बहुजनसमाजाशी येनकेन प्रकारेण नाते जोडण्याचा प्रयत्न एकीकडे उच्चवर्णीय लेखक करतात तर दुसरीकडे सुर्वे वास्तवात अति गुरफटल्याने काव्य हरवण्याची शक्यता वर्तवतात.)

आपल्याला माणसे पाहण्याचा छंद आहे असे सांगून यातूनच आपल्याला लेखन सुचते असे द. मा. मिरासदार (१९९८) म्हणतात. एस्. एम्. जोशी व साने गुरूजी यांनी आपल्याला निष्ठा दिल्या, १९४२ च्या गांधीच्या चळवळीत आपण भाग घेतला, संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात मोरारजी, नेहरू यांना न भिता आपण प्रचार केला, चिनी आक्रमणात (अत्र्यांनी) आपली कुचेष्टा केली तरी आपण समरगीते लिहिली, आणीबाणीमधे आपण इंदिरा गांधीचा धिक्कार करणारी कविता लिहिली वगैरे फुटकळ आठवणी वसंत बापट (१९९९) सांगतात.

तिसऱ्या पायरीवर प्रथमच आपण पाहिलेल्या वास्तवाचा संबंध साहित्यिक आपल्या साहित्यकृतीशी जोडताना दिसतात. काल्पनिक साहित्याकडून वास्तववादी साहित्याकडे जाण्याची ही ओढ अर्थातच पाश्चात्त्य—विशेषत: इंग्रजी साहित्याच्या संपर्कातून वाढलेली दिसते.

## ३.३.१ (७)

मराठी माहित्य आणि राजकारण किंवा राजसत्ता यातील संबंधाबाबत तिसऱ्या पायरीवरही बरेच मतप्रदर्शन आहे.

मराठवाडा विद्यापीठाला डॉ बाबासाहेब आंबेडकरांचे नाव द्यावे असा आग्रह दलितांचा होता, दलितेतर बऱ्याच लोकांचा त्याला विरोध होता. गं. बा. सरदार (१९८०) नामांतराचा पुरस्कार करतात. साहित्य, साहित्य-संमेलन राजकीय आणि मामाजिक प्रश्नांपासून दूर राहू शकत नाही असे सरदार यातून दाखवतात.

महाराष्ट्र शासन दरवर्षी साहित्य पुरस्कार देते. एकदा समितीने निवडलेल्या पुस्तकातील तीन नावे शास ने बदलली. त्याबाबत बरेच वादळ उठले. दुर्गा भागवतांनी पुरस्कार घेऊन साहित्यिकांनी शासनाचे मिंधे होऊ नये असे मत फार पूर्वीपासूनच मांडले. पुरस्कार समितीचे सभासद गो नी. दांडेकर यांच्यावर या प्रसंगी त्यांनी टीका केली. दांडेकर (१९८१) त्याला उत्तर देण्याचा प्रयत्न करतात. पुरस्कार हे करातून जमलेल्या पैशातूनच दिले जातात म्हणून त्यात शासनाचा उपकार होतच नाही असे दांडेकर म्हणतात. शिवाय आपण साहित्य अकादमीचा पुरस्कार घेतला पण त्याचे पैसे समाजोपयोगी कार्य करणाऱ्या संस्थांना वाटले असे दांडेकर म्हणतात. पुरस्कारासाठी निवड करणाऱ्या समितीच्या निर्णयात शासनाने ढवळाढवळ करू नये आणि मग लेखकांनी ते स्वीकारायला हरकत नाही असे त्यांचे मत. मराठवाडा विद्यापीठाच्या नामांतराचा प्रश्नही वाटाघाटी करून सोडवावा असे दांडेकर म्हणतात. एकंदरीने शासनाला वाळीत टाकण्याचे कारण नाही व शासनानेही साहित्य-संस्थांच्या कारभारात हस्तक्षेप करू नये असे दांडेकरांचे म्हणणे आहे.

गंगाधर गाडगीळ (१९८१) शासन व साहित्यिक यांच्या संबंधाबाबत विस्ताराने

बोलतात. आपले सर्व जीवनच राजकारणाने व्यापलेले आहे, जीवनाच्या सर्वच क्षेत्रात सत्ताधारी व विरोधीपक्ष शिरकाव करतात असे गाडगीळ म्हणतात. आपण लोककल्याणापोटी सर्व क्षेत्रात वावरतो असे शासनकर्त्यांचे म्हणणे असते. गाडगीळांना मात्र आपल्या कल्याणात शासनाने फार लक्ष घालू नये असे वाटते. अर्थात याबाबत आपण अल्पमतात आहोत असेही ते म्हणतात. शासनव्याप्त जीवन काही काळ तरी राहणारच असेही त्यांना वाटते. साहित्याचे क्षेत्र शासनाने मागेच व्यापले आहे. आकाशवाणी व दूरदर्शन ही साहित्याच्या अभिव्यक्तीची प्रभावी साधने; शासनाचे पूर्ण नियंत्रण त्यावर आहे. मराठी साहित्याचा शिक्षणक्रम शासन-नियुक्त शिष्टमंडळे करतात. विद्यापीठांवर देखील शासनाचे नियंत्रण असतेच. शिक्षणसंस्थांना शासकीय अनुदान मिळते त्यामुळे त्यांच्यावरही शासनाचा दबाव येतोच. महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृती मंडळ, विश्वकोश मंडळ ही शासनाचीच मंडळे आहेत. प्रकाशन-संस्था खाजगी आहेत पण ग्रंथालये शासकीय अनुदानावरच चालतात. यापैकी बऱ्याच गोष्टी साहित्यिक आणि शिक्षण यांनी वेळोवेळी मागण्या केल्यानेच झाल्या अशी जाणीवही गाडगीळ करून देतात. (गाडगीळांचे हे म्हणणे रास्त आहे. संमेलनाच्या अनेक अध्यक्षांनी सूचना करताना शासनाने मदत करावी असे म्हटले आहे; शासनाकडे अधिकारवाणीने मागण्या केल्या आहेत.)

शासनाने अनुदाने द्यावीत पण त्याचा प्रत्यक्ष प्रभाव नसावा यासाठी दांडेकरांप्रमाणे अनेक साहित्यिक स्वायत्त मंडळांची मागणी करतात (आणि या स्वायत्त मंडळांचे शासननियुक्त अध्यक्ष आपण शासननियंत्रणमुक्त असल्याची शेखी मिरवतात. कधी आपल्याला अनुकूल नसणाऱ्या पक्षाचे मंत्रिमंडळ आले की हेच आधीचे 'स्वतंत्र' अध्यक्ष मग भीतीने राजीनामेही देतात ! म्हणजे पहिले स्वातंत्र्य हे स्वातंत्र्य नसते; दिलजमाई असते हे खरे) गाडगीळांना स्वायत्त-संस्था हा उपाय वाटत नाही. स्वायत्तता हा एक भ्रम आहे. आपण स्वत: एका पुस्तकपरीक्षण मंडळाचे अध्यक्ष होतो पण आपले निर्णय शासनाने धुडकावले हा अनुभव ते याबाबत सांगतात. शिवाय स्वायत्तमंडळात एकाधिकारशाही असते. साहित्याच्या क्षेत्रातील या विविध प्रश्नांवर शासनाशी चर्चा होणे आवश्यक आहे. साहित्यसंमेलनाच्या निमित्ताने ती होणार असेल तर संमेलनातील मंत्र्यांच्या उपस्थितीबाबत नाके मुरडणे योग्य नाही असेही गाडगीळांना वाटते. अनुदान न घेता संमेलन करण्यातून काही साधत नाही. मुख्य म्हणजे शासनाशी संवादच होत नाही.

साहित्यिकांनी मोर्चे काढणे, चळवळ करणे हे त्यांच्या निर्मिती-प्रवृत्तीशी जुळणारे नाही. सक्रीय राजकारणी बरेच आहेत, त्यात साहित्यिकांची भर कशाला ? असे गाडगीळ विचारतात. साहित्यिकांच्या सक्रीय राजकारणाचा फायदा धूर्त राजकारणी करून घेतात; त्यात साहित्याचे नुकसानच होते. संघटनात्मक कार्यात साहित्यिक उणा पडतो यांची असंख्य उदाहरणे आहेत. साहित्यसंस्था या साहित्यिकांच्या हातात राहातच नाहीत (साहित्य परिषदा, साहित्यसंस्था, साहित्य महामंडळ, साहित्य संघ, वाचन

मंडळे वगैरे साहित्यिकांच्या संघटनातील वर्षानुवर्षे पदाधिकारावर असणाऱ्या व्यक्तींच्या नावांकडे एक नजर टाकली तरी अ-साहित्यिकांची या संस्थावरील पकड सहजपणे कळून येईल.)

याला उपाय म्हणजे सामाजिक जीवन बहुकेन्द्रिक असावे असे गाडगीळ म्हणतात. म्हणजे उदाहरणार्थ, अनेक टीव्ही चॅनेल्स असावीत. पाठ्यपुस्तके तयार करण्याची मुभा अनेक लोकांना असावी म्हणजे साहित्यिकांना नवनवे प्रयोग करता येतील. मात्र मराठी साहित्यिक समाजजीवन बहुकेंद्रक करण्याचा प्रयत्न करत नाहीत; उलट ते एककेंद्रक करण्याचाच आग्रह धरतात असे गाडगीळ म्हणतात.

(गाडगीळांचा एकंदर रोख लोकशाही व्यवस्थेत शासनाचा संपर्क सर्वत्र असण्यावर आहे. काहीही केले, कशीही व्यवस्था मांडली तरी शासनाचे कळत-नकळत नियंत्रण येतेच. हे वास्तव आहे. लोकशाही व्यवस्थेत ते अटळ आहे. गाडगीळ म्हणतात त्याप्रमाणे शासनव्याप्त जीवन काही काळ राहणार असे नाही. गाडगीळांनी याचा विस्तारही केलेला नाही. लोकशाही शासनयंत्रणा लोकजीवनाला कमीत कमी व्यापेल अशी असावी हे स्वप्न आहे आणि यात विरोधाभासही आहे. गाडगीळांच्या डोळ्यापुढे अमेरिकेचे उदाहरण असणे शक्य आहे. अमेरिकेत शासनमुक्त जीवन आपाततः दिसेल पण तोही एक भ्रम आहे. आर्थिक शक्ती या शासनाप्रमाणेच इतर व्यवस्था नियंत्रित करतात एवढाच फरक आहे. पण नियंत्रण आर्थिक शक्तीच्या सत्तेचे आहेच हे नाकारता येणार नाही. गुप्त आर्थिक सत्ताप्रवाहापेक्षा उघडपणे दिसणारी लोकशाही शासन सत्ता डोळ्यांना खुपते एवढाच फरक आहे भारतासारख्या देशात शासनाकडून लोकांच्या अपेक्षा वाढत आहेत आणि वाढणार आहेत अस्तित्वासाठी लागणाऱ्या वस्तू तर शासनाने घ्यात्र्यातच पण कौटुंबि क कटकटी, करमणुकीच्या बाबी, अनावश्यक सार्वजनिक उत्सव यात लोकांना शासनाचे संरक्षण आणि शासनाची भरीव मदत असावी असे वाटते. ही परिस्थिती बदलण्याची या व्यवस्थेत शक्यता शून्य. पण गाडगीळांना शासनाशी साहित्यिकांचा, साहित्य-संस्थाचा संबंध येऊच नये असेही मनापासून वाटत नाही शासनाशी विचारविनिमय हवा, त्यासाठी मंत्री संमेलनास यावेत असे ते म्हणतात. फक्त त्यांना वर्चस्व दाखवू नये. ही अपेक्षाही एक स्वप्न आहे. जो पैसा देणार त्याचे वर्चस्व राहणार. विचारविनिमयाची गरज शासनाला आहे असा भाबडा समज बाळगण्याचे कारण नाही. गाडगीळांचा स्वतःचा अनुभव हे सांगतो. शासनाला संस्थेमध्ये, संघटनांमध्ये रस असतो, त्यावर वर्चस्व-किमान स्वतःचा प्रभाव-हवेच असते. राजकीय शहाणपणात यालाच संघटन-कौशल्य, लोकसंपर्क वगैरे म्हणतात. सघटनाच काय प्रतिष्ठित—खरे म्हणजे थोड्या किंवा बऱ्याच लोकांवर प्रभाव पाडणारी—व्यक्ती देखील आपल्या छत्राखाली असावी असे सत्ताधाऱ्यांना वाटते. पूर्वीच्या राजेशाहीतही तसे वाटत असे. राजाश्रयाचे कौतुक साहित्यिकांनी केले, संमेलनाच्या अध्यक्षांनीही केले. मग राजाच्या

जागी मंत्री आला तर बिघडले कुठे ? शासनाचा विटाळच नको अशी टोकाची भूमिका एखादा साहित्यिक व्यक्ती म्हणून घेऊ शकेल; संस्था, संघटना, मंडळे यांना ते परवडणारे नाही आणि अशी व्यक्ती लोकशाही व्यवस्थेत नकळतपणे विरोधी पक्षाच्या गोटात जाऊन बसते त्याचे काय ? कोणत्याही सत्ताधारी पक्षाशी जुळवून घेणारी साहित्यिक व्यक्ती आणि आपल्या राजकीय तत्त्वप्रणाली किंवा राजकीय संबंधानुसार सत्ताधारी किंवा विरोधी पक्षाशी बांधली गेलेली साहित्यिक व्यक्ती यांच्या गुणवत्तेत फरक असला तरी हेतूंमधे फरक नाही.

गाडगीळांना मुक्त अर्थव्यवस्थेची ओढ दिसते. उदाहरणार्थ, पाठ्यपुस्तके करण्याची मुभा सर्वांनाच असावी असे त्यांना वाटते. हे प्रकाशक, साहित्यिक यांच्या आर्थिक लाभासाठी वाटत असेल तर निदान त्यात प्रामाणिकपणा आहे. पण यातून साहित्यिक नवनवे प्रयोग करतील ही वंचना आहे. पाठ्यपुस्तके खाजगी प्रकाशकांकडे असताना साहित्यिकांनी असे काय दिवे लावले ? कोणते नवे प्रयोग केले ? प्रकाशकांची मक्तेदारी होतीच ना ? कोणत्या प्रकाशक संस्थेने पदरी तज्ञ बाळगले होते ? साहित्य लिहिणारा माणूस साहित्याच्या किंवा भाषेच्या अध्यापनात तज्ञ असतो असे कोण म्हणेल ? आजच्या पाठ्यपुस्तक निर्मितीमधे होणारे बदल, विविध धोरणांच्या आधारे दिसणारी परिवर्तनशीलता पूर्वीच्या मुक्त पाठ्यपुस्तक-निर्मितीमधे होती असे सिद्ध करता येईल ? क्षणभर आपण पूर्वीची आणि आत्ताची दोनही प्रकारची पाठ्यपुस्तके असमाधानकारक होती असे मानले तरी दोन्हीच्या किंमतीत प्रचंड तफावत होती हे मान्य करावेच लागेल. बेताचा माल चढ्या किंमतीत घेण्यापेक्षा स्वस्त किंमतीत मिळत असेल तर कमी किंमतीत माल उपलब्ध करून देणारी यंत्रणा नको असे कसे म्हणता येईल ? आत्ताच्या यंत्रणेतील पुस्तकातून तयार होणारे किंवा ही पुस्तके असूनही तयार होणारे विद्यार्थी पूर्वीच्या विद्यार्थ्यांपेक्षा कमी बुद्धिमान आहेत असे तरी म्हणता येईल ? शासनाची मक्तेदारी ऐवजी विशिष्ट व्यक्तीची मक्तेदारी यापलीकडे गाडगीळांची मुक्त अर्थव्यवस्थेची कल्पना जात नाही असे दिसते. ॲडम स्मिथची मुक्त अर्थव्यवस्था आणि केनची संपूर्ण नियंत्रित अर्थव्यवस्था या दोनच टोकांनी आज अर्थविचार होत नाही. बाजारपेठेतील कोणते प्रवाह लोककल्याणकारी आहेत याचा विचार करावाच लागेल, भारतासारख्या गरीब देशात आर्थिक दृष्ट्या कमकुवत गटाचे हित आणि संरक्षण यासाठी शासकीय नियंत्रण दीर्घकाळ आवश्यक राहणार आहे. खरे म्हणजे संपूर्ण स्पर्धात्मक अर्थव्यवस्था हे एक स्वप्न आहे आणि ते सुस्वप्न आहे असेही नाही. गाडगीळांच्या बहुकेन्द्रिकतेच्या उपायातील न्यूनत्व यावरून स्पष्ट व्हावे.)

शासनापुढे भाषा व साहित्य यापेक्षा अधिक महत्त्वाचे प्रश्न असतात असे रमेश मंत्री (१९९२) म्हणतात. त्यामुळे टोकाची भूमिका घेण्यास ते तयार नाहीत. गाडगीळांप्रमाणे रमेश मंत्री (१९९२) शासनाशी साहित्यिकांचे संबंध असण्यात काही गैर मानत

नाहीत. शासनाशी सतत तणावाचेच संबंध असण्याचे कारण नाही असे त्यांना वाटते. सरकार अनुदान देते त्यामुळे त्याच्याशी भांडून फायदा नाही. समानतेच्या पातळीवर शासन व साहित्य-संस्था यांचे संबंध असावेत. सरकार आपले आहे, परकीयांचे नव्हे (गंमत म्हणजे १९४७ पूर्वी कोणत्याच अध्यक्षांनी साहित्यिक भूमिकेतून परकीय सरकारवर टीका केली नाही, फक्त राष्ट्रीयत्वाच्या भूमिकेतून टीका केली.) चर्चा करून प्रश्न सोडविणे मंत्र्यांना शक्य व योग्य वाटते. सरकारशी सतत सहकार्य व तात्त्विक प्रश्नावर परखड मतप्रदर्शन असे धोरण हवे (परखडपणाचा हक्क राखून ठेवला की सहकार्य करण्यातला मिंधेपणा जातो अशी मंत्र्यांची कल्पना दिसते. मतप्रदर्शन वेगळे व आचरण वेगळे असाही एक भ्रामक समज यामधे दिसतो. व्यवहारात मंत्र्यांचे मत मानणारे अनेक साहित्यिक आहेत. पण त्यांच्याबाबत मतप्रदर्शन म्हणजे केवळ वाक्‌दूतपणा ठरतो व सहकार्य म्हणजे लाचारी ठरते. असे होणे हे या भूमिकेतच अनुस्यूत आहे की काय याचा विचार मंत्री करत नाहीत.)

विद्याधर गोखले (१९९३) आपल्या भाषणाचा विषयच 'शासनसंस्था व साहित्य' असा आहे असे म्हणतात. साहित्यसृष्टीची स्वायत्तता जपायला हवी असे ते म्हणतात. म्हणजे काय करायचे ? तर राजकारणाच्या मायापाशांनी जखडले जायचे नाही. (विद्याधर गोखले हे लोकसभेची निवडणूक पक्षीय राजकारणाच्या आधारे लढवून निवडून आले यात त्यांच्या दृष्टीने राजकारणाचा मायापाश नव्हता असे आपण समजायचे) साहित्यिकांनी लोकाश्रयाची पर्वा करावी राजाश्रयाची नव्हे असेही ते सांगतात. भारताच्या उन्नतीच्या काळाची मशागत साहित्यानेच केली. उदाहरणार्थ, शिवाजी महाराजांच्या काळातच रामदास, तुकाराम याच्यासारखे श्रेष्ठ साहित्यिक होते. (पण मग ज्ञानेश्वरीच्या काळाचे काय ? राजकीय दृष्ट्या गे उन्नतीचा मानायचा ? ब्रिटिश आमदानीचा काळ उन्नत मानून केशवसुत, आपटे, देवल, गडकरी यांचे साहित्य चांगले म्हणायचे की काय ? इतिहासाकडे इतके भावनाविवशतेने पहण्याचे कारण काय असावे ? विचारांचे दारिद्र्य ?) गोखल्यांना अभिव्यक्ती-स्वातंत्र्यासाठी लोकशाही हवी, लोकशाहीतील गाडगीळांना दिसणारे सरकारी नियंत्रण त्यांना दिसत नाही. साहित्यिकांनी लोकशाही स्वातंत्र्याचे उपासक व्हावे असा मोघम सल्ला ते देतात. हुकूमशाही व सर्वाधिकारशाही यामधे साहित्याची व संस्कृतीची निकोप वाढ होत नाही. उदाहरणार्थ, साम्यवादी रशियात कवीची ससेहोलपट झाली तर हुकूमशाही असलेल्या पाकिस्तानात साहित्य नाही भारतात कधी हुकूमशाही आली नाही. लेखणी व राजदंड यांनी परस्परांचा मान राखला. अशोक, विक्रमादित्य भोज, शालिवाहन या पुण्यश्लोक राजांच्या राजवटीत अशी आदर्श स्थिती होती. साहित्य व साहित्यिक यांचा वापर करण्याची गरजच या महान् राजांना नव्हती. त्यांच्या काळी साहित्य व संगीत यांना लोकश्रय होता. राजे फक्त या कलांचे कौतुक करत. म्हणूनच आपले चरित्र लिहिण्याची फर्माईश विक्रमादित्याने

कालिदासाला केली नाही. (इतिहासाची बालबोध समज आणि तर्कशुद्ध विचाराला मूठमाती ही गोखल्यांची वैशिष्ट्ये दिसतात. लोकशाहीतच निकोप साहित्य होते असे मानले तर महाराष्ट्रातीलच काय पण जगातील बव्हंश वाङ्मय निकोप वाढीचे नव्हते असे म्हणावे लागेल. राजेशाही ही गोखल्यांना हुकूमशाहीपेक्षा लोकशाहीला जवळची वाटते की काय न कळे. गोखले भलावण करतात लोकशाहीची आणि उदाहरणे देतात राजेशाहीची ! त्यांच्या काळी साहित्य व संगीत लोकाश्रयावर जगत होते त्याला पुरावा काय तर गोखले म्हणतात म्हणून. हे बिचारे राजे दूरदूर उभे राहून साहित्यिकांना उत्तेजन द्यायचे ! गोखले मोगल राजांच्या दरबारात वाढलेल्या हिंदुस्थानी शास्त्रीय संगिताचा, त्यातल्या राजदरबारी असलेल्या संगीतकारांचा उल्लेखही करीत नाहीत. गोखले उन्नत काळ व उन्नत साहित्य यांची जोड घालतात. ज्ञानेश्वर व तुकाराम यांना रहावे लागले त्या हीन समाजाची जबाबदारी मात्र शासनाची नव्हती, असे गोखल्याना वाटत असावे. राजाविरुद्ध बोलण्याचा मज्जाव साहित्यिकांना होता असे भर्तृहरीचे उदाहरण देऊन गोखले सांगतात तेव्हा भारतीय राजेशाहीची आपण आधी भलावण केली हेही ते विसरतात. राजा हा विष्णूचा अवतार मानला गेल्याने राजाविरुद्ध साहित्यिकांनी बोलण्याचा प्रश्नच नव्हता असेही गोखले पुढे म्हणतात. मग अभिव्यक्ती-स्वातंत्र्य राहिलेच कुठे ? साहित्य व साहित्यिक यांचा वापर करण्याची गरजच राजांना वाटली नाही याचा अर्थ साहित्य गंभीरपणे घेतले जात नव्हते असाही होतो हे गोखल्यांना समजू नये ? आणि संस्कृत परंपरेतल्या भाट कवीच्या स्वायत्ततेच्या कल्पनेबाबत गोखले काय म्हणतील ? राजे कविजनांचा रोष ओढवून घेत नसत ही तर गोखल्यांची एक थाप आहे. मागे आपण शेवाळकरांच्या भाषणात शब्दांचे केवळ बुडबुडे पाहिले, त्यात विचारांचा अभाव होता. गोखल्यांचे भाषण असेच शब्दबंबाळ, त्यात अर्धकच्च्या ज्ञानावर आधारलेल्या असंबद्ध गोष्टीना विचार म्हणून मांडण्याचा प्रयत्न आहे.)

सध्याच्या काळात राजकारण महत्त्वाचे झाल्याचे गोखलेही सांगतात. साहित्यिक, पत्रकार यांना संतुष्ट करण्याचे धोरण राजकारणी लोक आखतात कारण त्यांना उपद्रव-मूल्य असते. पण लगेचच साहित्यिक, पत्रकार आपल्या पदरी सरकारी कृपेचा प्रसाद पडावा म्हणून धडपडतात असे म्हणून गोखले यातून ध्येयवादाची आग विझते असे म्हणतात. पुढे सरकार साहित्यावर पुरेसा खर्च करत नाही अशीही गोखल्यांची तक्रार आहे. पदव्या व पारितोषिके आपणास मिळावीत म्हणून साहित्यिक वशिले लावतात. समितीवर नेमण्याचा हट्ट करतात. यातून खरे साहित्यिक बाजूला पडतात. (गोखल्यांच्या या विचारातही गोंधळ आहे. साहित्यिक आणि पत्रकारांनाच फक्त 'बुद्धिजीवी वर्ग' म्हणजे चूक आहे. शिवाय गोखले ज्या लाचारांचा उल्लेख करतात त्यांना 'बुद्धिजीवी' म्हणणे अडाणीपणा आहे. वशिले लावल्याने ध्येयवाद विझतो की ध्येयवाद नसलेली माणसेच वशिल्याचा आधार घेतात ? पुरस्कार, पारितोषिके न मिळालेला साहित्यिक

खरा साहित्यिक असेल तर तो मागे पडतो म्हणजे काय ? पुरस्कार देणे हे साहित्यिकांना येनकेन प्रकारेण लोकांसमोर आणून त्यांना लायकी असो वा नसो मानाच्या जागेवर बसवणे हे स्पष्ट असेल तर प्रसारमाध्यम व शासन यांच्या आधारे 'मोठे' होण्यात खऱ्या साहित्यिकाला रस वा वाटावा ? सरकारी समित्यांवर नेमणूक करवून घेणाऱ्या साहित्यिकांबाबत गोखल्यांना रास्त घृणा आहे. पण ते स्वतः साहित्य व संस्कृती मंडळाचे शासननियुक्त अध्यक्ष झाले त्याचे काय ?)

आपण मात्र या लाचारांच्या यादीत कसे नाही याचा गोखले आवर्जून उल्लेख करतात. दांडेकरांप्रमाणे पारितोषिक स्वीकारून त्याची रक्कम सांस्कृतिक संस्थांना देऊन टाकली की साहित्यिक पापमुक्त होतो अशी गोखल्यांचीही भावना आहे (पण प्रसिद्धी मिळते त्याचे काय ? धनलालसा ही काही एकमेव स्वार्थ-प्रेरणा नव्हे.) आपण १९४२ च्या चळवळीत होतो पण आपण स्वातंत्र्य-सैनिकांचे पेन्शन घेतले नाही असेही ते अभिमानाने सांगतात. आपण सरकारी सदनिका घेतली नाही, 'खासदार-पेन्शन-बिला'ला विरोध केला, 'पूर्व-परिनिरीक्षण-मंडळा'चे अध्यक्षपद सविनय (हेही सांगावे लागते !) नाकारले इत्यादी वैयक्तिक गोष्टीचा उल्लेखही ते करतात. सर्वात केविलवाणा प्रकार म्हणजे स्वतःच्या भारतीयत्वाच्या धारणांसाठी स्वजन आणि प्रियजन यांना दुखावल्याचे दुःखही ते जाहीरपणे मांडतात. (स्वतःची साहित्यिक घडण कशी झाली याबाबतचे भावे, चोरघडे, दांडेकर, माडगूळकर, इनामदार यांची आत्मनिवेदने एकवेळ समजू शकतात. पण आपल्या छोट्या छोट्या कृतीचे भांडवल सार्वजनिकरित्या मांडण्यापर्यंत संमेलन अध्यक्षांची मजल जावी हे कशाचे चिन्ह आहे ?)

साहित्यिकांनी अराजकवादी होऊ नये (का ? ते स्पष्ट नाही. अराजकवाद वाईट हे यामागचे गृहित) पण सरकारचे कठोर परीक्षण करावे असा सल्ला गोखले देतात. यानंतर लगेचच महाराष्ट्र शासनाची पाठही ते थोपटतात. महाराष्ट्र शासनाने नाटकांवर करमणूक कर लादला नाही, विश्वकोश व परिभाषा कोश काढले, साहित्य संस्कृती मंडळ स्वस्तात पुस्तके विकते, शासन राज्य नाट्य-स्पर्धा घेते. वगैरे शासनाच्या निर्णयांचे ते स्वागत करतात, मग काही पुटकळ सूचना वडीलकीच्या नात्याने करतात. (मराठी साहित्याची दखल न घेणारे, साहित्यविषयक प्रश्नांना—राजकारणाच्या अंगाने का होईना—चुकूनही स्पर्श न करणारे दुसऱ्या पायरीवरील न. वि. गाडगीळांच्या भाषणासारखे असे हे सुमार भाषण आहे. यात भाव आहे, आत्मगौरव आहे आणि पत्रकारितेतील प्रासंगिक फोलकटपणाही आहे.)

राष्ट्रीय स्वातंत्र्य, राजकीय प्रश्न यांना मध्यमवर्गीय लेखकाच्या तुटकपणाच्या मानसिकतेने स्पर्शही केला नाही, या वर्गाचा भोवतालच्या अफाट जनसमुदायाशी संपर्कच नसल्याने सम्यक् परिस्थितीचे भान ठेवून जीवनाचा विस्तृत पट ते मांडू शकले नाहीत असे विचार करायला लावणारे एक निरीक्षण नारायण सुर्वे (१९९५)

फडके म्हणतात.

(फडक्यांनी दिलेल्या तपशीलावरून राजकारणी लोकांचा साहित्य-संमेलनावरील दबदबा हळुहळू दादागिरीत परिणत झाला असे दिसते. राजकीय नेत्यांचे आपल्याशी जुळत असते तर ते ठीक पण खटकत असले तर ती लुडबूड असा एकंदर इतर अध्यक्षांप्रमाणेच फडक्यांचा सूर आहे. पंडित नेहरू, यशवंतराव चव्हाण, न. वि. गाडगीळ यांच्या आश्रयाबाबत ते कडवटपणे बोलत नाहीत; खरे म्हणजे दुर्गाबाई भागवतांच्या (१९७५) संमेलनातील राजकीय जुलूमशाहीचा उल्लेख फडक्यांना करता आला असता. तो का केला नाही ? शासनाविरुद्ध आविष्कार स्वातंत्र्याच्या बाजूने परिणामांची पर्वा न करता - किंबहुना तुरुंगावासाची शिक्षा स्वीकारून धीटपणे बोलणाऱ्या दुर्गाबाई भागवत या एकमेव अध्यक्ष. सुरक्षित वातावरणात वाग्युद्ध करणे वेगळे आणि परिणामांची पर्वा न करता जुलूमशाहीत वाग्युद्ध करणे वेगळे. बापट आणि फडके यांची वाग्युद्धे ही सुरक्षिततेची खात्री असतानाच्या वातावरणातील. राजकीय नेतेच हल्ली संमेलने भरवतात हे जसे खरे तसेच अध्यक्ष-निवडीमागेही तत्कालीन सत्ताधारी पक्ष कार्यरत असतात हेही खरे आहे. फडके साहित्य-संमेलनाच्या इतिहासाबाबत बोलतात. पण छापलेला अहवाल (दस्तऐवज) आणि प्रत्यक्ष घटना यात फरक असल्यास खरे काय व का मानावे याचे उत्तर इतिहासकार म्हणून फडके देत नाहीत. खरे म्हणजे लिखित कागदपत्रांचा सामाजिक व राजकीय इतिहास लिहिण्यामध्ये काय आणि कितपत उपयोग आहे या अंगाने काही विचार संशोधक म्हणून फडक्यांकडून अपेक्षित होता.)

राजवाडे आणि केतकर यांना राजाश्रय मिळाला नाही, पण त्यांनी हाती घेतलेले काम सोडले नाही असे फडके म्हणतात. लोकशाहीत साहित्यिकांनी सरकारशी सदैव सहकार्य किंवा कायम असहकार करायचा नसतो. (पण हे कशाच्या आधारावर ठरवायचे ? एक प्रकारे यातून संधिसाधूपणा फोफावणार नाही का ? मंत्री मित्र असले तर सहकार, आपल्या विचारसरणीला धूप न घालणारा पक्ष सत्ताधारी झाला की असहकार, हा तर व्यवहार झाला. यात वैचारिक झेप ती काय ? असे प्रश्न उरतातच) सरकार अनुदान देते म्हणजे उपकार करत नाही असे गंगाधर गाडगीळ, रमेश मंत्री यांच्याप्रमाणे फडक्यांनाही वाटते आपण अजूनही मनाने राजेशाही, एकाधिकारशाही मानतो याची रास्त खंत फडक्यांना आहे. म्हणूनच सरकार आश्रयदाते तर लेखक याचक अशी भूमिका त्यांना मान्य नाही. अगदी अलंकारिक भाषेतही साहित्य संमेलनाला 'सरस्वतीचा दरबार' म्हणणे याच वृत्तीमुळे फडक्यांना मान्य नाही.

## ३.३.१ (८)

मराठी लेखक, कवी आणि मराठी समाज यांतील संबंधाबाबत बोलताना पु.

भा. भावे (१९७७) साहित्यकाराच्या अवमूल्यनाबाबत बोलतात. साहित्यिक हा रिकामटेकडा, बेकार माणूस आहे असे लोकांना वाटते. त्याच्यापेक्षा कारकून बरा, चपराशीही बरा. कारण त्यांच्या हातात थोडीफार सत्ता असते. जगात शास्त्रज्ञ व तत्त्वज्ञ यांना मान मिळतो तो लेखकांनाही मिळावा अशी भाव्यांची अपेक्षा. कारण तिघांनाही कल्पनाशक्ती ही देणगी असते. लेखकांनी कंस वधाची आकाशवाणी कल्पनेने करवली; पुढे शास्त्रज्ञांनी ती कल्पना प्रत्यक्षात उतरवून रेडिओ आणला. (भाव्यांचा हा दावा अर्थातच बालिश आहे. अफलातून कल्पना, विचारहीन कल्पना कुणालाही सुचतात. त्याला लेखकच कशाला ?)

शासकीय पुरस्कार मिळवण्याच्या स्पर्धेन साहित्यिकात हेवेदावे वाढनात व ते लोकांच्या अनादरास पात्र होतात असे विद्याधर गोखले (१९९३) म्हणतात. रसिकमान्यता हीच खरी प्रतिष्ठा असे त्यांना वाटते. (अर्थात येथेही संदिग्धता राहतेच. रसिक कोण ? लोकप्रिय लेखक रसिकमान्य धरायचा की नाही ? गोखल्यांची संगीत नाटके फार लोकप्रिय होती असे नाही. उलट त्यांच्या नाटकाना आवडीने येणारे लोक रसिक होते असेही म्हणता येणार नाही ! म्हणजे संख्येचा प्रश्न परत आलाच. कुठलाही मराठी सिनेमा एक आठवडा चालला तरी त्या शहरात १५ ते १६ हजार प्रेक्षक त्याला लाभलेले असतात एवढे प्रेक्षक मिळायला नाटकाचे २०-२५ प्रयोग व्हावे लागतात. २०-२५ प्रयोग होणारे नाटक रसिकमान्य ठरते तर १ आठवडा चालणारा चित्रपट पडेल ठरतो. म्हणजे संख्या तशी कमी महत्त्वाचीच ) लेखक, कवी यांनी रॉयल्टी कमी घेऊन आणि प्रकाशकांनी फायद्याचे प्रमाण कमी करून वाचकांना स्वस्तात पुस्तके द्यावीत असे गोखले सांगतात. दोघांची बांधिलकी वाचकांशी हवी.

शांता शेळके (१९९६ साहित्यिकांच्या आर्थिक लाभाकडे लक्ष देतात पूर्वी लेखन आंतरिक उर्मीत किंवा हौसेपोटी होत असे, त्यात अर्थलाभाचा हेतू नव्हता असे त्या म्हणतात. आता मात्र पुरस्कार, पारितोषिके यांमार्फत लेखकांना बऱ्यापैकी अर्थप्राप्ती होते. शांता शेळके स्वतः साहित्योपजीवी कवयित्री आहेत. साहित्यावर जगण्यासारखी आज परिस्थिती आहे आणि ही आनंदाची गोष्ट आहे असे त्या म्हणतात. म्हणजे समाज आज साहित्यिकांना प्रतिष्ठा आणि पैसा दोन्ही पुरवतो.

## ३.३ २
## साहित्यविषयक

### ३.३.२ (१)

मराठी साहित्याची परंपरा पहिल्या दोन पायऱ्यांवर सांगितली गेल्यावर तिच्यामधे काही बदल किंवा नवी भर तिसऱ्या पायरीवर घातली जात नाही. ती परंपरा त्याच पद्धतीने परत सांगितली जाते इतकेच.

शंकरराव खरात (१९८४) मात्र मराठी साहित्याची परंपरा बाजूला ठेवून दलित साहित्याची परंपरा सांगतात. १३ व्या शतकातील चोखा मेळा, त्यांच्या पत्नी सोयराबाई, मुलगा कर्ममेळा यांनी अभंगातून अस्पृश्यता, विटाळ या कल्पनांवर हल्ला केला पण या दलित कवीवर सामाजिक परिस्थितीच्या मर्यादा होत्या. (त्या सर्वावरच असतात, अगदी आंबेडकरांवर देखील हे खरात कसे विसरतात ?) ते परंपरागत शास्त्राला शरण गेले. दलितांना स्वत्वाची जाणीव देऊन प्रस्थापित व्यवस्थेविरुद्ध बंड करण्यास शिकवले ते आंबेडकरांनी, आंबेडकर हे महान् साहित्यिक होते व तेच संमेलनाचे अध्यक्ष व्हायला हवे होते. (आंबेडकर विचारवंत होते; त्यांनी वैचारिक लेखन केले हे खरेच आणि विचारवंतांना अपवादाने का होईना अध्यक्षपद मिळते हेही खरे. लक्ष्मणशास्त्री जोशी, आचार्य जावडेकर याच पठडीतले. ते अध्यक्ष झाले मग आंबेडकर झाले असते तर योग्यच होते. मात्र आज साहित्यिक या शब्दाला ललित साहित्य लिहिणारा तो असा जो अर्थ आला आहे त्या अर्थाने आंबेडकर साहित्यिक नव्हते. महाराष्ट्रातील विचारवंतांची पीछेहाट आंबेडकरांएवढी १९२० ते १९६० च्या दरम्यान कुणालाच जाणवली नाही. १९४० नंतर कोणीही अध्यक्ष वैचारिक लेखनातील मागासलेपणाबाबत काहीही बोलत नाही. आंबेडकर अध्यक्ष होते तर मराठीतील वैचारिक लेखनाचा अत्यंत तर्कशुद्ध आढावा त्यांच्या भाषणातून मिळाला असता.)

मराठेशाही दलित शाहिरांची शाहिरी गाजली असे खरात सांगतात. तमाशा व लावण्या ही परंपराही दलित साहित्यिकांचीच. दलित वगनाट्य व दलित सोंगाड्या हीही परंपरा होतीच. आंबेडकर चळवळीत दलितांनी जलसे केले, पथनाट्ये केली. (मात्र मध्यमवर्गीय नाटकांची कोडी दलित नाटकांनी फोडली हा खरातांचा दावा अतिशयोक्त आहे. मुळात मध्यमवर्गीय नाटकांची कोडी झाली होती का हा प्रश्न आहेच. दलितेतर सर्व साहित्य हे मध्यमवर्गीय साहित्य आणि ते सरसकट वाईट, मर्यादित, काल्पनिक होते हे गृहित न तपासताच खरात स्वीकारतात. प्राप्त काळात प्रचलित असलेले समज हे तपासून न पाहता स्वीकारायचे व तेच पुन्हा पुन्हा मांडायचे ही विचारविरोधी वृत्ती मध्यमवर्गीय अध्यक्षांच्या भाषणात जशी दिसते तशी खरातांच्या भाषणातही दिसते. ही परंपरा फारशी स्पृहणीय नाही.)

नव्या दलित साहित्याची परंपरा अवघी ३० वर्षांची—म्हणजे १९५४ पासूनची—आहे असे खरात म्हणतात.

प्रत्येक साहित्य रानदांडगेपणाने साचलेले जीवन ढवळून काढते, नवीन चेतना आणते असे म्हणत विश्राम बेडेकर (१९८६) लोकहितवादी, म. फुले, आगरकर, केशवसुत, मर्ढेकर, आंबेडकर अशी परंपरा मांडतात. (यातील टिळकांचा अनुल्लेख अनवधानाचा वाटत नाही. पहिल्या पायरीवरील बहुसंख्य अध्यक्ष टिळकांच्या 'गीतारहस्या'चा मानदंड म्हणून उल्लेख करतात. १९३०-३५ नंतर हा उल्लेख कमी होतो. तिसऱ्या

पायरीवर बेडेकरांच्या भाषणात टिळकांना पूर्णपणे वगळले जाणे हे 'गीतारहस्या'चे आणि टिळकांच्या एकंदर लिखाणाचे पुनर्मूल्यांकन म्हणायचे का ?)

यू. म. पठाण (१९९०) ज्ञानेश्वर, चक्रधर, सतसाहित्य, त्यातून उगम पावलेल्या लोककला, लोकसंगीत, लोकगीत यांचा उल्लेख करतात.

नारायण सुर्वे (१९९५) स्वातंत्र्य चळवळीत नवसाहित्य, नवसंस्कृती उदयास आली असे सांगून केशवसुत, ह. ना. आपटे, महात्मा फुले, आगरकर, राजवाडे, शाहू महाराज, धो. के. कर्वे, भाऊराव पाटील, महर्षी शिंदे असे विविध क्षेत्रातल्या कर्तबगार मंडळीची नावे घेतात. (राजकीय क्षेत्राचा अपवाद करून न्या. रानडे, गोखले व टिळक यांचा उल्लेख टाळावा असे सुर्व्यांना का वाटले असावे बरे ?) या पिढीचे लेखक नवशिक्षित व मध्यमवर्गीय होते पण त्यांच्या लेखनात उत्स्फूर्तपणा व आत्मीयता होती. पण १९२० ते १९६० च्या कालखंडात या वर्गाचे राष्ट्रीय व महाराष्ट्रीय जीवनाशी असलेले धागे तुटले. सामाजिक भान ठेवणारे व स्वान्त:सुखाय लिहिणारे आत्मकेंद्रित लेखक असे दोन विभाग पडून दुसरा विभाग वरचढ ठरला. मध्यमवर्गीय लेखक हा श्रीमंत नव्हता, गरीब होता. चातुर्वण्याच्या सामाजिक मानसिकतेच्या दबावाखाली तो वावरत होता. आंग्लविद्येने तो आणखी समाजाला दुरावला. स्वत:ला सुरक्षित अलग ठेवणे हेच त्याचे ध्येय होते. असे का झाले याचा विचार व्हायला हवा असे सुर्वे म्हणतात. (खरे म्हणजे १९२० नंतर तो सरदार म्हणतात त्याप्रमाणे सामाजिक नेतृत्वास का मुकला, आत्मकेंद्री असूनही साहित्य क्षेत्रात तो वरचढ का झाला, चातुर्वण्याच्या दबावाखाली तो खरोखर मनापासून वावरत होता का, तो तुटत गेला की त्याला तोडण्यात आले, साहित्य हे एकमेव क्षेत्र असे होते का की जिथे त्याला आक्रमणाची भीती नव्हती किवा लोकशाही व्यवस्थेत उफाळणारी संस्थेची दमदाटी नव्हती, सामाजिक जाणिवेने लिहिणारे यातले लेखक पुन्हा तत्त्वनिष्ठ भूमिकेतून तसे झाले की शिंगे मोडून वासरात वावरण्याच्या धूर्तपणाने—विशेषत: वैचारिक लेखन करणारे- तसे झाले, आंग्लविद्येने केवळ तकलादूपणा आला की प्रचलित भारतीय वा महाराष्ट्रीय विचारसरणी या वर्गाला असंबद्ध व उथळ वाटली याचाही शोध घ्यायला हवा.)

एका बाजूला अन्त्यजाच्या मुलाला पाहणारे केशवसुत, भयाण सामाजिक वास्तव पाहणारे हरिभाऊ, समाजाला फटकारणारे आगरकर व राजवाडे तर दुसरीकडे आपल्याच मर्यादित जगात वावरणारा आत्मकेंद्री लेखक, वाचक व शिक्षक यांचा मध्यमवर्ग हा विरोध सुर्व्यांना दिसतो. केशवसुतांची डोळस परंपरा, व्यापक दृष्टी पुढे का हरवली, ही काय परंपरा झाली याचा शोध घ्यावा असे ते म्हणतात. (याच्यातून निदान एक अर्थ स्पष्ट व्हावा. सामाजिक वास्तवाचे भान ठेवून नवे जग निर्मिण्याचे स्वप्न पाहणारे केशवसुत, आगरकर, राजवाड मध्यमवर्गीय व पुढे संकुचित जगात राहून सोदर्यशास्त्राची चर्चा करणारे लेखक, कवीही मध्यमवर्गीयच. म्हणजे नावे ठेवायची

असली, उपरोध करायचा असला तर विशिष्ट वर्ग पकडणे गैर आहे. कारण विशिष्ट परिस्थितीत तो तसा असतो. त्यामुळे मध्यमवर्गीय कृती (म्हणजे संकुचित वृत्ती) वगैरे वाग्विलास एक अज्ञानातून संभवतात. किंवा मत्सरातून. दुसरे असे की आगरकर, केशवसुत यांचा मध्यमवर्ग ही संकल्पना फसवी आहे. आगरकर, केशवसुत ज्या समाजात, ज्या वर्गात राहत होते तो सर्व वर्ग बंडखोर, प्रागतिक वगैरे होता असे म्हणता येणार नाही. सुदैवाने तो काळ गेल्या १०० वर्षाचाच असल्याने तसे पुरावे उपलब्ध आहेत. उलट नंतरच्या सौदर्यवादी कवीची वृत्ती ही अखिल मध्यमवर्गीय वृत्ती होती असे म्हणणेही चूक आहे. व्यक्ती आणि वर्ग यांचे संबंध इतके सरळसोट असते तर सामाजिक शास्त्रांना प्रश्नच पडले नसते. तिसरे असे की सुर्वे म्हणतात ती संकुचित वृत्ती सामाजिक चिंतनाऐवजी सौदर्यशास्त्रीय विचारात रमली असे जरी खरे मानले तरी सौदर्यशास्त्रीय विचाराचा उगमच संकुचित वृत्तीत किंवा तुटलेपणाच्या जाणीवेत असतो असे म्हणणे धाडसाचे ठरेल. समाजवादाखेरीज दुसरा कोणताही दृष्टिकोन हा बुर्जवा दृष्टिकोन असतो असे म्हणण्यासारखेच हे ढिसाळपणाचे आहे. उद्या समाजाशी फटकून राहणाऱ्या काही व्यक्तींनी योगायोगाने भौतिक-विज्ञानात किंवा गणितामधे रंगून वर्चस्व मिळवले तर गणित किंवा भौतिक विज्ञान हे माणुसघाणेपणातून जन्मते असे म्हणायचे की काय ? सर्वच गोष्टीचे कार्यकारणभाव केवळ वर्गव्यवस्थेत शोधणे सोपे व सोईचे असले तरी लटके आहे.)

ना. सं. इनामदार (१९९७) मराठी ऐतिहासिक कादंबरीची परंपरा सांगतात. इंग्रजी शिक्षणाने नवीन जाण आली, घटनेवर नवा प्रकाश पडला. त्यातून स्वतःचा मागासलेपणा जाणवून विकासाची उर्मी आली. सुरुवातीची ऐतिहासिक कादंबरी राष्ट्रीय वृत्तीतून इतिहासाची पुनर्मांडणी करण्याचा प्रयत्न होता. त्यात परिवर्तनाची आकांक्षा होती. स्वातंत्र्यानंतर, ऐतिहासिक कादंबरीचा ढाचा बदलला ती आदर्शवादी न बनता अधिक डोळस व वास्तवादी झाली.

वसंत बापट (१९९९) भरड साहित्याची परंपराच सांगतात. १९५०-६० पर्यत सपक प्रेमकविता व सांकेतिक निसर्गकवितांनी उच्छाद मांडला होता असे ते म्हणतात. आज उथळ सामाजिक जाणिवेने व विद्रोहाच्या भडक भाषेने उच्छाद मांडला आहे (बापटांचे विधान आपतात· खरे वाटले तरी त्यातल्या अडचणी स्पष्ट आहेत. विद्रोहाची भाषा सौम्य कशी असेल ? असली तर त्याला विद्रोह तरी म्हणतील का ? मर्ढेकरांची भाषा गद्यमय आणि मोडतोडीची म्हणून अनुचित असे तत्कालिनांना वाटलेच होते ! मर्ढेकरांचा निराशेचा सूर म्हणूनच उपरा आहे असेही काही म्हणत होते. ते चूक का बरोबर हा येथे प्रश्न नाही. पण सगळ्याच नव्या प्रयोगावर उथळपणा व भडकपणाचा आरोप होतो हे लक्षात घ्यायला हवे. दुसरी अडचण अशी की एखाद्याची सामाजिक जाणीव ही उथळ आहे किंवा गंभीरप्रकृतीची आहे हे त्याच्या लेखनावरूनच ठरवणार

ना ? ते कोण आणि कसे ठरवणार हे जोवर स्पष्ट होत नाही तोवर बापटांचे म्हणणे केवळ आरोप करण्याच्या थाटातले आहे असे एखादा म्हणू शकेल.)

एकंदरीने मराठी साहित्याची परंपरा सांगण्याची परंपरा तिसऱ्या पायरीवर अधिकच क्षीण होते. याचे कारण परंपरा सांगणे म्हणजे कालानुक्रमाने मानदंड मांडणे एवढाच अर्थ अगदी पहिल्या पायरीपासून अभिप्रेत दिसतो. दुसऱ्या पायरीवर सैद्धान्तिक भूमिकेतून परंपरा मांडण्याचा प्रयत्न काही अध्यक्ष करतात. तिसऱ्या पायरीवर खरात व सुर्वे मराठी साहित्यातील दलित साहित्याची परंपरा सांगण्याचा प्रयत्न करतात. हा प्रयत्न नवा आहे. मात्र संपूर्ण मगठी साहित्याची परंपरा सांगण्याचा प्रयत्न कोणीही अध्यक्ष तिसऱ्या पायरीवर करीत नाही.

## ३.३.२ (१०)

साहित्याचा उपयोग किंवा हेतू याबाबत २२ पैकी १३ अध्यक्ष बोलतात. पहिल्या व दुसऱ्या पायरीवरील याबाबत बोलणाऱ्या अध्यक्षांच्या प्रमाणापेक्षा तिसऱ्या पायरीवर हे प्रमाण वाढले आहे. मात्र मराठी साहित्याची परंपरा सांगण्याचे प्रमाण तिसऱ्या पायरीवर घटले आहे—२२ पैकी फक्त ६ अध्यक्ष—आणि तेही फार त्रोटक स्वरूपात—परंपरेबाबत बोलतात.

पहिल्या पायरीवर राष्ट्रीय वृत्ती जोपासणे, तर दुसऱ्या पायरीवर निर्भेळ आनंद देणे, समाजाची प्रगती करणे, सत्य शोधणे, जीवनाचा अर्थ मांगणे असे साहित्याचे हेतू सांगितले गेल्याचे आपण पाहिले.

वामन चोरघड्यांना (१९७९) साहित्य हे नेहमीच्या धकाधकीच्या जीवनात एक विसावा आहे असे वाटने. साहित्य जीवन सुंदर करते. आपल्याला कळलेले सत्य निर्माण करणे हा साहित्याचा हेतू नाही असे चोरघडे स्पष्ट करतात. त्यांना सत्य ही संकल्पनाच खूप संदिग्ध वाटते. आपण स्वत: खरी दु:खे पाहिली, पचवली असे ते म्हणतात. पण साहित्यातील दु:खाने मा॰ आपण व्यथित झालो; साहित्याचा उपयोग सुखाचे रडणे हाच आहे असे ते म्हणतात. (जीवन, सत्य, वास्तव, दु:ख हे सर्व बाजूला ठेवून चोरघडे साहित्याला या सर्वांपासून अलिप्त असे स्वतंत्र सौंदर्याचे व विसाव्याचे स्थान देतात.)

बहुसख्य लोक मनोरंजनासाठीच साहित्य वाचतात असे सरदार (१९७९) म्हणतात. जगातील सर्वश्रेष्ठ साहित्यकृती पाहिल्या तर केवळ निरामय आनंद देणे एवढेच साहित्याचे कार्य नाही असे दिसते जीवनाचा अर्थ शोधणे व त्याला अर्थपूर्णता आणणे हेही साहित्याचे काम आहे असे ते म्हणतात. जीवनाचा अर्थ पूर्णपणे कुणालाच कळलेला नसतो. पण तो शोधणे व त्याला कलात्मक रूप देणे हे साहित्याचे काम यातूनच साहित्याचा आशय लक्षवेधी ठरतो आणि आशय म्हटला की त्यात सामाजिकता

आलीच. सरदारांच्या मतातील जीवनाला अर्थपूर्णता आणणे हा साहित्याचा हेतू कृतिप्रधानतेकडे नेणारा आहे. समाजाची प्रगती करणे या हेतूशी हा समान आहे.

व्यंकटेश माडगूळकर (१९८३) दहापाच रुपये मिळवण्यासाठी 'मायदेशी माणसं'चे लेखन मौज साप्ताहिकात सुरू केले असे म्हणतात. एकप्रकारे पोट भरण्यासाठी साहित्य-निर्मिती ही भूमिका होती. साहित्याचे कार्य काय याबाबत अनेक मतमतान्तरे असल्याचे माडगूळकर सांगतात. आपल्याला बाजाची पेटी वाजवायलाही हवी आणि सामान ठेवायलाही हवी अशाप्रकारची अपेक्षा आपण साहित्याकडून करतो असे ते म्हणतात. साहित्याचा उपयोग सामाजिक बांधिलकी असणे हे माडगूळकरांना मान्य नाही. सामाजिक बांधिलकी नाही तर साहित्याचा उपयोग काय ? हा प्रश्नच त्यांना मान्य नाही . गुलकंदासाठी गुलाब फुलत नाहीत तसे बांधिलकीसाठी साहित्य निर्माण होत नाही; प्रयोजन असणे, उपयोग असणे ही सामाजिक गरज आहे; ते साहित्याला चिकटवणे आवश्यक नाही. चांगली कथा ऐकून निरागस माणूस आनंदतो, तो लगेच त्याचे तात्पर्य शोधायला धावत नाही. साहित्याविना नुकसान काय होईल ? साहित्य ही माणसाची चांगली सवय आहे. त्याविना माणूस उघडा पडेल. अगदी निर्वाणीच्या वेळीही साहित्याचा उपयोग साधन म्हणून करणे माडगूळकरांना मान्य नाही. (माडगूळकरांच्या दृष्टान्तात काही अडचणी आहेत. वाळवंटात दिसलेलं झेडूचं फूल माडगूळकरांना आनंद देते. पण झेडूची वा गुलाबांची शेती करण्यासाठी लावलेली फुलेही आनंद देतातच. मग बांधिलकीसाठी लिहिलेले साहित्य आनंद देणार नाही असेही नाही. बांधिलकीचा आग्रह अपकारक कसा ?) अशा आग्रहाने साहित्यात वेठबिगार पद्धती येईल अशी भीती माडगूळकरांना वाटते. साहित्याचा उपयोग करण्यात आणखी एक धोका माडगूळकरांना दिसतो. त्या त्या समाजातले प्रश्न हे तात्कालिक असतात. ते प्रश्न संपले की ते साहित्यही कालबाह्य होते म्हणजे साधनभूत साहित्य हे गुणवत्तेमधे कमी प्रतीचेच राहणार म्हणून साहित्याचा उपयोग सामाजिक बांधिलकी, प्रबोधन यासाठी नसावा.

(कलात्मकता ही उपयुक्तवादाच्या विरोधात आहे अशी गृहिते कलावादी व बांधिलकीवादी दोन्ही पक्ष स्वीकारतात. हे आवश्यक आहे का असा प्रश्न विचारता येईल. खरे म्हणजे केवळ आनंदासाठी साहित्यनिर्मिती हाही एक हेतू होतोच. बांधिलकीच्या हेतूला घेतलेले आक्षेप येथेही घेता येतील. निर्हेतुकपणे साहित्य-निर्मिती होते ? आवड आहे म्हणून लिहितो हे उत्तर खऱ्या अर्थाने निर्हेतुकपणे लिहितो असे नाहीच. त्यामुळे आक्षेप घ्यायचाच असेल तर तो बांधिलकी या हेतूलाच घ्यावा लागेल.

संत वाङ्मयाचे उदाहरण बोलके आहे. मराठी साहित्याच्या मान्दडात ज्ञानेश्वर, तुकारामांचे नाव न चुकता सर्व अध्यक्षांनी घेतले आहे. फक्त पु. शि. रेगे संतांनी साहित्यिकीसाठी लेखन केले नाही असे म्हणतात. संत-वाङ्मय साहित्यात बसत

असेल तर केवळ आनंदासाठी ते लिहिले गेले असे म्हणता यायला हवे. संतांनी समाजप्रबोधनासाठी साहित्य लिहिले असे म्हणणे एकवेळ त्यांच्यावर आधुनिकतेचे भलतेच आरोप करणारे आहे असे म्हणता येईल. पण भक्तिमार्गातील साधनेचा तो एक भाग होता हे नाकारता येणार नाही. विठ्ठलास प्रसन्न करण्यासाठी, आध्यात्मिक मार्गातील प्रवासाचा टप्पा म्हणून संतवाङ्मय लिहिले गेले असे म्हटले तर चूक काय ? आणि मग संतानी साहित्याचा साधन म्हणून वापर केला तर ते गुणवत्तेत कमी दर्जाचे होते असे म्हणणार काय ? ते मानदंड या स्वरूपाचे अनेकांनी मान्य केले असल्याने सहेतुकपणे, अगदी त्याकाळच्या भक्तिमार्गातील प्रश्नाना समोर ठेवून लिहिले गेलेले संतसाहित्यही साहित्यत्वात कमी ठरत नाही.

म्हणजे विशिष्ट हेतू असल्या-नसल्याचा प्रत्यक्ष परिणाम साहित्याच्या गुणवत्तेवर होत नाही. गुणवत्तेचे श्रेय भलत्या कारणाला देणे म्हणजे ताजमहालच्या सौंदर्याचे श्रेय नूरजहॉच्या मृत्यूला देण्यामारखे आहे. त्याचबरोबर साहित्यनिर्मिती निर्हेतुक असते हाही भ्रम आहे.)

लहान बाळाशी आईने बोलणे, जात्यावर बसल्यावर ओवी सुचणे, सभेतून उठून गेलेल्या माणसांची कुचेष्टा करणं वगैरे गोष्टी रोजची तोंडी साहित्यरचनाच आहे असे विश्राम बेडेकर (१९८६) म्हणतात. त्याचा हेतू ऐहिक जीवन सुसह्य करणे हा असतो (एखादी गोष्ट सुसह्य करण्यामागे ती असह्य असल्याची कबुली असते. दळण करणे, बाळाशी बोलणे किंवा एकंदर ऐहिक जीवन हे असह्य असने हे गृहित सार्वत्रिक नाही. मात्र सर्वसामान्य माणूस या प्रकारे साहित्यिक असतो, असे म्हटले तर शंकर पाटील (१९८५) म्हणतात तसा तो द्रष्टा वगैरे उरत नाही. ही भूमिका अधिक वास्तव आहे.) प्रवचनवाले, सोगाडे, पुराणिक शब्दचातुर्य वापरून साहित्यच निर्माण करतात. लिखित साहित्य ही ऐहिक सुखापलीकडची प्रेरणा आहे. जीवनप्रेरणेचा आविष्कार म्हणजे साहित्य ही बेडेकराची भूमिका नवी नाही. शास्त्रज्ञ विश्वाचा शोध घेतात तर साहित्यिक मनोविश्वाचा शोध घेतात. दोघांना प्रतिभेमुळेच हे शक्य होते. जीवन हे अनित्य आहे पण त्यातले काही क्षण दिव्य असतात. साहित्य व कला जीवनातले दिव्य क्षण पकडते. संस्कृती म्हणजे अशा अटळ व अमर क्षणांचे भान होय. १८५७ ते १९४७ या काळात महाराष्ट्रात साहित्याने सामाजिक व राजकीय प्रबोधन घडवून आणले असे बेडेकर म्हणतात. त्यात खंबीर मूल्यनिष्ठा होती. (बेडेकर पूर्वाध्यक्ष लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे यासाठी अवतरण देतात. सरदार ह. ना. आपट्यांचे तर खरात आबेडकराचे अवतरण देतात.) मराठी साहित्याने संघराज्याची प्रेरणा दिली. थोडक्यात स्वातंत्र्यपूर्व काळात साहित्याचा उपयोग राष्ट्रीयत्व जागवण्यासाठी झाला असा जुना मुद्दाच बेडेकर मांडतात.

ललित साहित्य प्रबोधन व संस्कार करते असा जुना मुद्दा वसंत कानेटकरही

(१९८८) मांडतात. त्यांचा हा मुद्दा मातृभाषेच्या शिक्षणासाठीचा आहे.

के. ज. पुरोहित (१९८९) आजच्या साहित्याने मानवीकरण करावे असा आग्रह धरतात. ते कसे ? तर समाजात स्त्रीशूद्रांना मानाने वागवले जात नाही त्याचा धिक्कार करून आणि माणूस आहे तसा दाखवून. पूर्वी मानवीकरणाचे काम धर्म करे, आता साहित्याने ते करायला हवे. धर्माचे पूर्वीचे सर्वजीवनव्यापी असे स्वरूप आज राहिले नाही. याचे कारण धर्मातले काव्यतत्त्व संपले. (पुरोहितांचा विचार नवा आहे. साहित्याने समाजातील विषमतेचा धिक्कार करावा असे ते म्हणतात. पण धिक्कार करून मानवीकरण खरेच होते काय ? हा प्रश्न उरतोच. संतांनी असा धिक्कार केला; 'महाभारत' सारख्या महाकाव्यात असे विषमताविरोधी धिक्कार आहेतच. काय झाले त्यातून ? साहित्याने दिलेली संवेदनशीलता साहित्यापुरतीच ठेवण्याचे कसब माणसांनी केव्हाच संपादले आहे. खुद्द अनेक साहित्यिक फक्त साहित्यातच संवेदनाशीलता दाखवतात; व्यवहारात तेही बधीरपणे राहू शकतात याची उदाहरणे उदंड आहेत. तेव्हा साहित्याने विषमतेचा धिक्कार करून वाचकांचे मानवीकरण होणे कठीण दिसते. पुरोहित म्हणतात साहित्याने माणूस सर्वगुणसंपन्न दाखवणे वा दुर्गुणांचा पुतळा दाखवणे हे फार अवास्तव आहे. माणूस आहे तसा दाखवला तर मानवीकरण होते असे पुरोहित म्हणतात. यातही सरसकट जुन्या वाङ्मयाने माणूस दाखवला नाही असे कसे म्हणता येईल ? संस्कृत वाङ्मयातील 'मुद्राराक्षस' 'उत्तररामचरित्रम्' या नाटकांनी मानवीकरण केले का ? शेक्सपिअरच्या नाटकांनी इंग्लंडमधे केव्हाच मानवीकरण व्हायला हवे होते. धर्माचे स्वरूप आज सर्वजीवनव्यापी नाही हे तरी कशावरून ? फार तर सर्वच माणसांच्या बाबतीत ते तसे राहिले नसेल. पण तसे पूर्वी तरी सर्व लोक पूर्णपणे त्या अर्थाने धार्मिक होते असे म्हणणे योग्य होईल का ? पुरोहितांनी दिलेले कारण तर मुळीच टिकणारे नाही. धर्मातील काव्यत्व संपल्याने असे झाले असे ते म्हणतात. म्हणजे ज्या गोष्टीत काव्यत्व ती सर्वजीवनव्यापी बनते असा त्यांचा समज. साहित्यातच काव्यत्व असते हेही त्यांचे गृहित. म्हणून साहित्य धर्माचे स्थान घेईल. याला दोन प्रतिप्रश्न विचारता येतील. आज राजकारण निश्चितपणे सर्वजीवनव्यापी झाले आहे. पुरोहित त्यात काव्यत्व शोधणार काय ? धर्मात पुन्हा काव्यत्व आणून तो सर्वजीवनव्यापी बनवण्याचा प्रयत्न करा असे कोणी म्हटले तर पुरोहित त्याला साथ देतील ?)

पुरोहितांसारखाच पण। पुरोहितांपेक्षाही जास्त भाबडेपणा किंवा स्वप्राळूपणा मधु मंगेश कर्णिक (१९९०) यांच्या दृष्टिकोनात आहे. सध्याचे वातावरण जात्यंध, धर्मांध असे आहे असे ते म्हणतात. (यातला अंध हा मूल्यवाचक शब्द बाजूला काढला तर पूर्वी धर्म आणि जाती यांचा समाजजीवनावर कमी प्रभाव होता असे म्हणता येणार नाही. संतवाङ्मयातील कर्मकांड आणि निव्वळ पांडित्य यांचा केलेला धिक्कार हा जातीय वातावरणाचाच निर्देशक आहे.) हे गढूळ वातावरण साहित्याने दूर होईल असा

साहित्याचा उपयोग कर्णिकांना दिसतो. (इंग्रजी अमदानीत उदयाला आलेल्या लिखित मराठी. वाङ्मयाने १९९० पर्यत हे काम का केले नाही ? असा प्रश्न पडतोच.) साहित्याचे कार्य माणसांना जोडणे हे आहे असे कर्णिक म्हणतात. (साहित्याबाबतची ही मिथके साहिर्त्यिकांना मनापासून मान्य असावीत का ? की त्यांचा उच्चार हाही केवळ एक उपचाराचा भाग आहे ?)

साहित्याचा एकंदर व्यापार हा समाजातील १०-१५ टक्के लोकांसाठीच असतो असे रमेश मंत्री म्हणतात. (म्हणजे ९८-१०० कोटीच्या भारतात ९ ते १५ कोटी लोकांसाठी, महाराष्ट्राची लोकसंख्या १० कोटी असेल तर १० ते १५लाख लोकांसाठी. हा आकडाही मोठा वाटतो. वृत्तपत्रे वाचणाऱ्या लोकांची तरी संख्या एवढी असेल का ? टक्केवारी सांख्यिकीशास्त्राचा आधार न घेता काढण्याची सवय अनेक मराठी विचारवंतात दिसते.) साहित्याला जीवनात कमी स्थान आहे असेही मंत्री म्हणतात. उपयुक्त माहिती हवी असणारे लोक साहित्य हवे असणाऱ्या लोकांपेक्षा संख्येने अधिक आहेत. (पहिल्या पायरीवर अशा पुस्तकांचा वाङ्मयात समावेश होत होता तिसऱ्या पायरीवर साहित्य म्हणजे कविता, नाटक, कादंबरी, कथा, आत्मचरित्र, चरित्र एवढाच अर्थ दिसतो. ललित साहित्य हा शब्द दुसऱ्या पायरीवर याच अर्थाने येऊ लागतो.) वैचारिक लेखन बुद्धीला आवाहन करते तर ललित साहित्य भावनेला. हा जुनाच विचार मंत्री गिरवतात. मात्र यातूनच लगेच समस्यांची जाणीव साहित्यातूनच होते असा विचार ते मांडतात. याचे स्पष्टीकरण अर्थातच नाही. साहित्य भावनांचे शमन (कॅथर्सिस) करते हा बी. ए. च्या इंग्रजी साहित्याच्या विद्यार्थ्यांना ॲरिस्टॉटलचा वर्षानुवर्षे शिकविला जाणारा विचारही ते उद्धृत करतात. साहित्याने सहृदयता व जिव्हाळा येतो. आपण स्वत: साहित्य लिहिले ते पैशासाठी नव्हे तर आनंदासाठी असेही मंत्री म्हणतात. (बरेच साहित्यिक—विशेषत: भरड वाङ्मय लिहिणारे लेखक—हौसेसाठी लेखन करतात हे खरेच.)

विद्याधर गोखले (१९९३) साहित्याच्या उपयोगाबाबत एकदम पहिल्या पायरीवरच्या अध्यक्षांची भूमिका घेतात. राष्ट्राच्या जडणघडणीत साहित्याचे स्थान अत्युच्च आहे असे ते म्हणतात. (हे खरे पण मराठी साहित्याबाबत हे म्हणता येईल का ?) राम शेवाळकर (१९९४) साहित्याने नराचा नारायण होतो असे म्हणतात.

नारायण सुर्वे (१९९५) साहित्य हे माणसाला आनंद देण्याइतकेच त्याला घडवण्याचे व जगण्यासाठी उभे राहण्याचे सामर्थ्य देते असे म्हणतात. द. मा. मिरासदारांना (१९९८) नवनिर्मिती हा साहित्याचा हेतू वाटतो. दलित साहित्यात तेच तेच दु:ख, तीच तीच चीड या गोष्टी येतात हे त्यांना आवडत नाही. (मिरासदारांना नाविन्य हवे ते कशाचे हे स्पष्ट नाही. नवे म्हणजे काय ? खरे म्हणजे साहित्यात प्रेमाचा त्रिकोण, व्यक्ती विरुद्ध समाज यासारखे विषय पुन्हा पुन्हा येतात. त्यात नाविन्य नसते. किंबहुना

साहित्याच्या आकृतिबंधाची संरचनाही ठराविक असते—वाक्याच्या रचनेसारखी. मग नवीन काय असते ? महाभारतातल्या कित्येक थीम्स् (विषय) प्रादेशिक वाङ्मयात पुन्हा पुन्हा येतात तर शेक्सपिअरच्या नाटकातल्या थीम्स्च परत परत इंग्रजी वाङ्मयात पुनरक्त होतात. शिवाय निर्मिती ही नवीन लेखकाच्या दृष्टीने की वाचकाच्या याबाबतही मिरासदार काही म्हणत नाहीत. साहित्यात अंतिम असे काहीच नसते असे एक बुचकळ्यात टाकणारे विधानही मिरासदार करतात.

वसंत बापट (१९९९) साहित्याच्या उपयोगाबाबत बोलत नाहीत. पण त्यांनी प्रचारासाठी त्याचा वापर केल्याची उदाहरणे ते देतात

एकंदरीने कानेटकर, कर्णिक, मंत्री, शेवाळकर, गोखले, मिरासदार साहित्याच्या उपयोगाबाबत सर्वश्रुत अशी विधाने करतात. त्यांत त्यांचा असा विचार शून्यच. बाकीचे अध्यक्ष बांधिलकी, समाजप्रबोधन, आनंद या हेतूंच्या रिंगणात फिरत राहतात.

## ३.३.२ (११)

साहित्याचे मानदंड शोधताना मराठीप्रमाणे संस्कृत व इंग्रजी वाङ्मयाचा उल्लेख दुसऱ्या पायरीवर वा. ल. कुलकर्णीसारखे अध्यक्ष जसा करतात तसाच उल्लेख तिसऱ्या पायरीवरील अध्यक्षही करतात. पु. भा. भावे (१९७७) यांना 'रामायण' व 'महाभारत' ही काव्ये अजोड वाटतात. मराठी साहित्यात ह. ना. आपटे, कृ. प्र. खाडिलकर, रा. ग. गडकरी यांच्याबरोबरच केशवसुत-गडकरी-बालकवी-तांबे यांचीही नावे भावे घेतात.

गं. बा. सरदार (१९८०) मानदंड म्हणून कोणत्या साहित्यकृतीचा उल्लेख करत नाहीत. पण त्यांच्या अवतरणांवरून केशवसुत, मर्ढेकर व नारायण सुर्वे हे त्यांना उल्लेखनीय कवी वाटतात असे दिसते.

गो. नी. दांडेकर (१९८१) जवळजवळ सर्वच समकालीन लेखकांचा उल्लेख करतात—पुरंदऱ्यांपासून तो थेट जी. ए. कुलकर्णी, कानेटकर, नेमाडे यांच्यापर्यंत. वैचारिक वाङ्मयात रा. चिं ढेरे, कुरूंदकर, गं. बा. सरदार, यांचा उल्लेख ते करतात. पूर्वीच्या थोर वैचारिक लेखनात या पायरीवर प्रथमच दांडेकर 'गीतारहस्या'चा उल्लेख करतात. मग सह्याद्री, गाथासप्तशती, आधुनिक भारत, पेशवेकालीन महाराष्ट्र, महाराष्ट्र संस्कृती यांचा उल्लेख येतो.

व्यंकटेश माडगूळकर (१९८३) फक्त केशवसुत व गडकरी यांचा उल्लेख करतात. शंकर पाटील (१९८५) गोडसे भटजीचा 'माझा प्रवास', लक्ष्मीबाई टिळकांची 'स्मृतिचित्रे' जावडेकरांचा 'आधुनिक भारत', गडकऱ्यांचा 'एकच प्याला', जी. ए. कुलकर्णींचे 'हिरवी राने', लिंबाळ्यांचे 'अक्करमाशी', केतकरांचा 'ज्ञानकोश', चित्रावांचा 'चरित्रकोश' आणि दात्यांचा 'शब्दकोश' असे त्यांना आवडणाऱ्या पुस्तकांचे उल्लेख

करतात. विश्राम बेडेकर (१९८६) सावरकरांच्या 'कमला' काव्याचा उल्लेख करतात. गडकऱ्यांचे 'एकच प्याला' त्यांना भीमाशंकरचे शिखर वाटते, गौरीशंकरचे नाही. लोकहितवादी, फुले, आगरकर, केशवसुत, मर्ढेकर, आंबेडकर हे नवी चेतना देणारे लोक. मात्र सद्य काळाबाबत बेडेकर अतिशय निराशेचा सूर लावतात.

के. ज. पुरोहित (१९८९) मानदंडांबाबत एक नवाच मुद्दा मांडतात. मराठीत परंपरेने काही मानदंड मानले गेले हे खरे. अखिल भारतीय साहित्याची संकल्पना दृढ झाली तर हे मानदंड बदलतील, त्यांचे पुनर्मूल्यन होईल, काही मानदंड मानदंडच राहणार नाहीत असे ते म्हणतात. पु. शि. रेग्यांनंतर पुरोहित मराठी साहित्याचे मोठेपण मोठ्या संदर्भात मोजू पाहतात. अखिल भारतीय साहित्याची संकल्पना म्हणजे काय ? पुरोहितांच्या मते भारतात अनेक भाषा पण एक संस्कृती आहे. भाषेचे सांस्कृतिक महत्त्व जाणणारे प्रत्येक भाषिक गटात आहेत. त्यांची संख्या वाढली की अखिल भारतीय साहित्यिक संकल्पना होईल. (हा युक्तिवाद न पटणारा आहे. भाषेचे सांस्कृतिक महत्त्व जाणणे म्हणजे काय ? ते जाणणाऱ्याला भारतीय साहित्यिक संकल्पना कशी काय सुचेल ? आणि मुख्य म्हणजे त्याने मूल्यांकन बदलेल याची खात्री काय ? शिवाय ते चांगले असेलच कशावरून ? कानेटकरांची नाटके गुजरातीत जास्त प्रसिद्ध आहेत. खांडेकरांच्या 'ययाति'ला तमिळ लोकांचा चांगला प्रतिसाद आहे. मराठी टीकाकारांनी या दोहोना फार श्रेष्ठ मानलेले नाही. म्हणजे येथे भारतीय पातळीवर मूल्यांकन वाढलेच. पुरोहितांना मात्र काही मानदंड खाली येतील एवढीच अपेक्षा आहे.)

यू. म. पठाण (१९९०) 'ज्ञानदेवी', 'लीळाचरित्र' व 'श्री. गोविंदप्रभु चरित्र' यांचा गौरवाने उल्लेख करतात. मधु मंगेश कर्णिक बेडेकरांची 'रणांगण', पेडशांची 'एल्गार' यांचा उल्लेख करून मर्ढेकर, भुक्तिबोधांना श्रेष्ठ कवी तर गाडगीळ, गोखले, माडगूळकर, भावे यांना श्रेष्ठ कथाकार मानतात. चिरमुल्यांचे कथाकारात नाव प्रथमच येते. आळेकर, एलकुंचलवार यांचा नवनाटककार म्हणून कर्णिक उल्लेख करतात. रमेश मंत्री (१९९२) मर्ढेकरांनी नव्या जाणिवा आणल्या असे म्हणतात. राम शेवाळकरांना (१९९४) विनोबा उत्तम वैचारिक वाङ्मय लिहितात असे वाटते. शेवाळकरांना श्रेष्ठ साहित्याचे निकष सर्वच साहित्यकृतीना लावणे मान्य नाही. (खरे म्हणजे शेवाळकरांकडे असे निकषच नाहीत. वेगवेगळ्या स्तरावर वेगवेगळ्या कारणासाठी हव्या त्या लोकांची पाठ थोपटण्याची कीर्तनकारी मोकळीक त्यांना हवी आहे. ती द्यायलाही हरकत नाही. कारण कीर्तनकार विचारवंत नसतो; इतरांच्या विचारांची केवळ आरास मांडणारा असतो.)

नारायण सुर्वे (१९९५) ज्ञानोबा - चक्रधर - तुकोबा - चोखोबा - फुले - आगरकर - केशवसुत - मर्ढेकर - कुसुमाग्रज आणि पुढे शहाणे - चित्रे - कोलटकर - नेमाडे असे मानदंड सांगतात. दलित साहित्याने प्रस्थापितांना हादरा देऊन थेट

कुसुमाग्रज व केशवसुतांशी नाते जोडले असे ते म्हणतात. (कुसुमाग्रजाना केशवसुत, मर्ढेकरांएवढे थोर मानणारे सुर्वे बहुधा पहिले अध्यक्ष आहेत.)

शांता शेळके (१९९६) मेघदूत, उत्तररामचरित्र, हॅम्लेट, ह. ना. आपटे, देवल, किर्लोस्कर, गडकरी, वरेरकर ही उत्तुंग शिखरे मानतात. (वरेरकर, किर्लोस्करांना एकदम शेक्सपिअरच्या रांगेत नेऊन बसविणे हा भाबडेपणा मराठी विचारवंतांत नवा नाही.) आजच्या काळातील आरती प्रभू व जी. ए. कुलकर्णी यांची नावे त्या घेतात. द. मा. मिरासदार (१९९८) तर महाभारत - बायबल - शेक्सपिअर - कालिदास असे मोजकेच मानदंड मानतात.

सर्वसाधारणपणे तिसऱ्या पायरीवर मराठीतील मानदंडांचा फार बारकाईने विचार झालेला दिसत नाही. खरे म्हणजे विचारपूर्वक मानदंड मांडण्यातच आलेले नाहीत. आपल्याला आवडलेली आणि आठवणारी पुस्तके सांगत सुटणे आणि समकालीनांची नावे घेऊन खूष ठेवणे असा साधा व्यवहार यामधे आहे.

## ३.३.२ (१२)

पु. भा. भावे (१९७७) भाषेला येणारे रसाळ फळ म्हणजे साहित्य अशी साहित्याची अलंकारिक व्याख्या करतात. भाव्यांना साहित्यात नैतिकतेचे महत्त्व वाटते.

वा. कृ. चोरघडे (१९७९) सौदर्य निर्माण करणारी कला अशी साहित्याची व्याख्या करतात. ज्याच्यात सृजनशीलता महत्त्वाची ते ललित साहित्य. त्यांना लोकसाहित्य महत्त्वाचे वाटते. मात्र परदेशी निकष लावून ते तोलू नये असेही ते म्हणतात.

व्यंकटेश माडगूळकर (१९८३) सर्व लेखन म्हणजे साहित्य नव्हे, सर्व वाचक म्हणजे रसिक नव्हेत, आणि सर्व लेखक म्हणजे साहित्यिक नव्हेत असे म्हणतात. साहित्याची व्याख्या करता येत नाही, त्याचे स्वरूप स्पष्ट करता येते. साहित्य ही दुर्मिळ चीज आहे असा उच्चभ्रू स्वरूपाचा विचार माडगूळकर मांडतात. (माडगूळकरांचे हे विचार संतलेखनाला साहित्य म्हणण्यात अडचण आणणारे आहेत. संतवाङ्मयाला साहित्य म्हटले तर वारकरी रसिक ठरतील किंवा रसिक नसणारे वाचक / श्रोते हे सुद्धा साहित्याला मिळतात असे म्हणावे लागेल. नामाचा गजर करण्यासाठी वाङ्मय असे प्रचारकी हेतूने संतवाङ्मय बाधित होईल आणि आधुनिक मराठी वाङ्मयापेक्षा संतवाङ्मय अधिक मुबलक आणि लोकप्रिय असल्याने त्याची दुर्मिळता सिद्ध होणार नाही. मोजक्या सुशिक्षित माणसांना समजणारे आणि आवडणारे लेखन ते साहित्य ही माडगूळकरांची व्याख्या साहित्य ही तज्ज्ञांसाठी असते, सर्वसामान्यांसाठी नमते अशा टोकाला सहजपणे नेईल.)

अवनतीच्या काळात समाज सावरण्याचे काम साहित्य करते असे सुचवत विश्राम बेडेकर (१९८६) जे उन्नत करते ते साहित्य अशी व्याख्या मान्य करतात.

भाव्यांप्रमाणे अलंकारिक नाही पण तितकीच भावुक अशी साहित्याची व्याख्या मधु मंगेश कर्णिक (१९८०) करतात. त्यांच्या मते साहित्य म्हणजे प्रेम. (या व्याख्येत महाभारत, मॅकबेथ. क्राइम अॅण्ड पनिशमेट, काफ्का वगैरे साहित्यातून बादच होतील.)

केवळ करमणूक करते ते साहित्य नव्हे असे विद्याधर गोखले (१९९३) म्हणतात. स्वरचित 'रंडा-गीतानि काव्यानि' अशी अनावश्यक ओळ उद्धृत करून हे म्हणजे साहित्य नव्हे असेही ते सांगतात. अर्थकारण, समाजकारण हे सर्वच साहित्यामधूनच कळते असा दावा गोखले करतात. (मग अर्थशास्त्र, समाजशास्त्र यांची गरज काय ? पहिल्या पायरीवर हे शास्त्रीय लेखनही वाङ्मय मानले जात होते. दुसऱ्या पायरीवर साहित्य म्हणजे फक्त ललित साहित्य हे सर्वानीच गृहित धरलेले दिसते. गोखल्यांच्या या दाव्यात आणखी एक अडचण आहे. साहित्यात प्रतीत होणारी सामाजिक आणि आर्थिक स्थिती ही वास्तव स्थितीचे हुबेहूब चित्रण करते हा भ्रम आहे. दुसरे असे की मराठी साहित्याने आजवर त्या त्या काळच्या आर्थिक स्थितीचे वर्णन केले असे म्हणता येईल ? उगाच मोठे मोठे दावे करण्यात वक्तृत्व असेल पण विचार नाही.) राष्ट्राची संस्कृती निर्माण करणे, समाजाचे सहजपणे प्रबोधन करणे, ब्रह्मानंदसहोदर असा आनंद देणे आणि मनाचे उन्नयन करणे अशी विविध कामे गोखले सहजपणे साहित्यावर सोपवतात.

राम शेवाळकर (१९९४) वंशपरंपरेने प्रवचनकार असल्यामुळे वक्तृत्वाला साहित्य मानावे असा त्यांचा आग्रह आहे. (वक्तृत्व व साहित्य यात फक्त ते भाषण व लेखन या कौशल्यांचा फरक मानतात कुठलेही लेखन हे जसे साहित्य होणार नाही तसेच कोणतेही वक्तृत्व अगदी प्रवचन सुद्धा साहित्य होणार नाही हे एक. साहित्याला जी एक संरचना लागते, भाषिक घटकांच्या आधारे साहित्यात जी एक वेगळीच संरचना तयार होते ती शेवाळकर ज्याला वक्तृत्व म्हणतात त्यात असत नाही. केवळ शब्दांची आतषबाजी केलेले लिखाण वा भाषण यांना साहित्य म्हणायचे असेल तर प्रश्न वेगळा.) शेवाळकर लिखित साहित्य व वक्तृत्व यात भलतेच साधर्म्य शोधतात— संस्कारशीलतेचे ! रसिक व प्रतिभावंत यांना जोडणारा दुवा म्हणजे साहित्य अशीही साहित्याच्या स्वरूपाला स्पर्शही न करणारी एक व्याख्या शेवाळकर करतात.

साहित्य हा केवळ आनंद देणारा व्यवहार नाही असे नारायण सुर्वे (१९९५) म्हणतात. म्हणजे साहित्याच्या आस्वादनाने आनंद होतच नाही असे नाही पण साहित्य निर्मिती ही केवळ कलानिर्मिती नाही. जीवनाच्या नव्या संवेदनांशी ती निगडीत आहे. (संवेदनशीलतेचा हा मुद्दा दुसऱ्या पायरीवर शिरवाडकरांनी मांडला आहे. दुर्गाबाई भागवत त्याला जाणीव असा शब्द वापरतात.)

साहित्य आणि प्रत्यक्ष वर्तन यांचा संबंध सांगणारे पहिल्या पायरीवरचे वा. म. जोशी, अनुभव आणि प्रामाणिकपणा श्रेष्ठ साहित्याला पुरेसे नाहीत असे सांगणारे

दुसऱ्या पायरीवरचे पु. शि. रेगे यांच्याशी तुलना होऊ शकेल असा नवा विचार तिसऱ्या पायरीवर आढळत नाही. अवनतीच्या काळात समाज सावरण्याचे काम साहित्य करते या बेडेकरांच्या विचारात नाविन्य आहे पण त्याला पुरावा फक्त इंग्रजी साहित्याचा आहे. भावे, कर्णिक, शेवाळकर, गोखले हे तर साहित्याविषयी काहीतरी भारदस्त विधाने करण्यापलीकडे काही करत नाहीत.

## ३.३.२ (१३)

राष्ट्रीयत्व व समाजप्रबोधन आणि साहित्य याबाबतचे वाद पहिल्या पायरीवर तर समाजाभिमुखता विरुद्ध कलावाद असे वाद दुसऱ्या पायरीवर होतात. तिसऱ्या पायरीवर २१ पैकी १८ अध्यक्ष साहित्यातील वादांचा उल्लेख करतात. यू. म. पठाण (१९९०) आणि विद्याधर गोखले (१९९३) हे दोनच अध्यक्ष वाङ्मयीन वादाच्या चर्चेत पडत नाहीत. ना. सं. इनामदार (१९९७) फक्त इतिहास व ऐतिहासिक कादंबरीवर बोलतात.

अश्लीलता, अभिव्यक्ती स्वातंत्र्य, कलावाद, दलित साहित्य, ग्रामीण साहित्य आणि सामाजिक बांधिलकी असे वाद या पायरीवर मांडले जातात. पैकी दलित साहित्य व सामाजिक बांधिलकी एका बाजूला तर कलेची स्वायत्तता, कलेचे सौंदर्य प्राधान्य हे दुसऱ्या बाजूला. म्हणजे मागच्या पायरीवरचा जीवनवाद विरुद्ध कलावाद हेच वाद नव्या संदर्भात पुन्हा मांडले जातात. ग्रामीण साहित्य हे बहुजनांचे तर त्यातील दलित वर्गाचे साहित्य ते दलित साहित्य. अनुभव घेणाऱ्या साहित्यकारांची विभागणी दलित व दलितेतर अशी जातिनिहाय करून दलित साहित्य म्हणजे दलितांच्या अनुभवाबाबतचे साहित्य असा अर्थ न राहता दलित लेखकाने लिहिलेले साहित्य असा अर्थ त्याला प्राप्त होतो. दलितेतर लेखकांचे साहित्य हे मध्यमवर्गीय लेखकांचे साहित्य असा पहिल्या व दुसऱ्या पायरीवरचा समज होता. त्याला या पायरीवर प्रस्थापितांचे साहित्य असेही नाव मिळते. ग्रामीण साहित्य हे ना दलितांचे ना शहरी मध्यमवर्गाचे. ब्राह्मण, मराठा, दलित ही जातीय वर्गवारी सहजपणे साहित्यात येऊन बसते आणि तीही साहित्याच्या अंगाने नव्हे तर लेखकांच्या जन्मजातीने. जातिनिरपेक्ष विचार करण्याची सवय मराठी विचारवंतांमधे नाही असे म्हणण्यापेक्षा मराठी विचारशैली जातीच्या सापळ्यात पुरेशी बंदिस्त आहे असे म्हणता येईल.

गं. बा. सरदार (१९८०) हे दलित साहित्याची भूमिका आणि तिचे समर्थन संयमितपणे पण विस्ताराने करणारे पहिले अध्यक्ष. साहित्य संमेलनाचे मागचे सर्वच अध्यक्ष हे सामाजिक बांधिलकी मानणारे होते असा दावा करून सरदार हरिभाऊ आपट्यांचे विचार उद्‌धृत करतात. (आ. रा. देशपांडे, पु. शि. रेगे यांनी सामाजिक बांधिलकीचा आग्रह धरला असे मानणे वा म्हणणे मुळीच टिकणारे नाही.) हरिभाऊ

आपट्यांच्या उद्धृत भाषणात साहित्य व राष्ट्राची उन्नती यांचे संबंध सांगितले आहेत. सरदार यात सामाजिक बांधिलकी अंतर्भूत आहे असे म्हणतात. वा. म. जोशी मात्र मध्यमवर्गीय साहित्याचा समग्र समाज जीवनाशी संबंध नाही असे म्हणतात. कोणीही अध्यक्ष केवळ कलावादी नाही असे म्हणून सरदार वादातील हवाच काढण्याचा प्रयत्न करतात. मात्र या अध्यक्षांचे सामाजिक दृष्टिकोन भिन्न होते. त्यांची जाणीव व्यापक होती पण समाजाच्या खालच्या थराची दखल ती घेऊ शकली नाही. आत्तापर्यंतचे साहित्य हे उच्चवर्णीय लेखकाचे साहित्य होते व त्याचे वाचकही उच्चवर्णीय होते.

कलात्मक साहित्य-निर्मिती, समाजचिंतन व प्रबोधन, ज्ञानोपासना व ज्ञानप्रसार, मतप्रचार व मनोरंजन या साहित्याच्या प्रेरणा आहेत असे सरदार मानतात. या सर्वच प्रेरणा उपयोगी. उच्च प्रतीच्या वैचारिक व कलात्मक साहित्यात सर्जनशीलता हीच प्रधान असते. साहित्याची स्वायत्तता मानणारे कलावादी साहित्याला सद्य सामाजिक परिस्थितीशी संबद्ध करण्यास तयार नसतात तर साहित्याची जीवनाशी संबद्धता मानणारे बांधिलकीनेच साहित्य टिकते, केवळ कारागिरीने नव्हे असे म्हणतात. सरदारांच्या मते भाषा ही समाजसापेक्ष असते; साहित्य हे भाषेद्वारेच व्यक्त होत असल्याने तेही समाजसापेक्षच असते. लेखकाची सौदर्यदृष्टी व जीवनदृष्टी या दोहोचा ठसा त्याच्या साहित्यावर पडतो. केवळ आकृतिसौदर्याचा आनंद ललित साहित्यातून मिळत नाही; आशय हाच साहित्यात प्रमुख असतो. जीवनाचा अर्थ शोधणे व त्याला अर्थपूर्णता आणणे ही साहित्याची प्रेरणा आहे (सरदारांचा हा विचार रेगे, कुसुमावती देशपांडे, वा. ल. कुलकर्णी, रा. श्री. जोग यांच्या विचाराशी जुळत आहे. सरदार कलेतील सौदर्याचे आवश्यक अस्तित्व नाकारत नाहीत.) आशय म्हटला की त्यात सामाजिकता आलीच. लेखकाच्या मनात आशय पक्का असतो त्याची अभिव्यक्ती यंत्रवत् होत नाही, तीमधे स्पष्टताही थोडी असते. आशय व अभिव्यक्ती या खऱ्या एकच असतात.

सरदारांच्या मते केवळ कल्पकता व अंतस्फूर्तीवर साहित्यकाराचे फार काळ भागत नाही. कल्पकता हळूहळू कमी होते. मग साहित्यिक कारागिरी किंवा पुनरावृत्तीकडे वळतो. हे टाळायचे असेल तर त्याची सामाजिक वास्तवावरची पकड घट्ट हवी. त्यासाठी शास्त्रांचा परिचय हवा, मराठी साहित्यिक इथे कमी पडतात. वा. म. जोशीनी हे निरीक्षण पूर्वी नोदवले आहे. (सरदारांनी पूर्वीच्या अध्यक्षांची भाषणे वाचलेली आहेत. सरदारांसारखे अभ्यासू अध्यक्ष विरळाच) उच्च काव्याला केवळ आर्तत्त्व व भावनाप्राबल्य पुरेसे नाही. सामाजिक घटनांनी केवळ दु:खी होण्यानेही उच्च साहित्य होत नाही. दु:ख का वाटते हे कळले पाहिजे. जसे काही साहित्यकारांमधे फक्त भावना उत्पन्न होतात तसेच काहीकडे फक्त व्यासंगच असतो, भान नसते.

सामाजिक बांधिलकी म्हणजे विशिष्ट राजकीय पक्षाला किंवा राजकीय विचारप्रणालीला बांधून घेणे नव्हे असे सरदार स्पष्टपणे म्हणतात (म्हणजे आंबेडकरवादी

साहित्य, मार्क्सवादी साहित्य या गोष्टी निर्मितीच्या अंगाने निरुपयोगी आहेत असे म्हणावे लागेल.) साहित्यिक म्हणून समाजाशी आपले काही नाते आहे याची जाणीव ठेवून आपल्या वाङ्मयाद्वारे आपली सामाजिक जबाबदारी तन्मयतेने व समर्थपणे पार पाडणे हीच सामाजिक बांधिलकी. व्यक्ती व समाज यांचे संबंध अतूट आहेत. व्यक्ती स्वतंत्र असते म्हणजे ती एकाकी असते असे नव्हे. जोन रॉबिन्सनचा दाखला देत सरदार ज्ञान हे समूहाचे तर कला व शास्त्र हे व्यक्तीचे असते असे म्हणतात. मात्र प्रतिभावंताला त्यांचा साक्षात्कार समाजातच होतो. समाजाशी संपर्क येऊनच व्यक्ती घडते. समूहवादी मार्क्स व स्वयंकेंद्रित व्यक्तीवादी हे दोघेही म्हणूनच टोकाची भूमिका घेणारे ठरतात. (सरदारांचे हे म्हणणे मानले तर मग सामाजिक बांधिलकी मानण्या न मानण्याचा प्रश्नच कुठे उरतो ? ती असतेच. वाङ्मयाद्वारे सामाजिक जबाबदारी पार पाडली हे कोण आणि कसे ठरविणार ?)

'निर्बंधाचा अभाव म्हणजे स्वातंत्र्य' असा स्वातंत्र्याचा निषेधपर अर्थ घेतला जातो असे सरदार म्हणतात. लेखकावर बाह्यनिर्बंध नसावेत. पण स्वातंत्र्य हे साधन-मूल्य आहे; स्वयंसिद्ध अंतिम मूल्य नव्हे. बाह्यबंधने गेली की विकास आपोआपच होतो असेही नाही. (स्वातंत्र्याचा पुरस्कार करणाऱ्या किती नेत्यांची ही भूमिका होती ? स्वातंत्र्य मिळाले की सर्व प्रश्न आपोआप सुटतील हा भाबडेपणा जनमानसात कुणी रूजवला ? स्वतंत्रतेला देवता मानून तिची पूजा, तिच्यासाठी बलिदान या मिथकात तर स्पष्टपणे स्वातंत्र्य स्वयंसिद्ध मूल्यच मानले गेले. राजकीय स्वातंत्र्य हे समूहाचे स्वातंत्र्य व साहित्याच्या संदर्भात आपण व्यक्तीच्या स्वातंत्र्याची चर्चा करतो असा युक्तिवाद करता येईल ?) सरदार स्वातंत्र्य हे स्वयंशासन मानतात. आपल्या प्रगतीसाठी आपणच अंगी शिस्त बाणवणे हे स्वयंशासन. मराठी साहित्यिक यात कमी पडतात. मॅस्लो या मानसशास्त्रज्ञाच्या मते विकास हा कष्टसाध्य असतो. कष्टाचे झेंगट नको असते म्हणून लोक मळलेल्या वाटेने जाणे पसंत करतात. प्रवाहपतित असूनही आपण स्वतंत्र आहोत हा भ्रम असतो. (हा भ्रम मराठी मध्यमवर्गीय साहित्यिकात आहे तसाच दलित साहित्यिकातही आहे. आत्मचरित्र लेखनाखेरीज धगधगता अनुभव व्यक्त होत नाही हा दलित साहित्यिकांचा समज प्रवाहपतितपणाचाच परिणाम. तर क्षुल्लक प्रसंगातून भावनेचे बारीकसारिक पापुद्रे काढत बसणे म्हणजे लघुकथा लिहिणे हा समज मध्यमवर्गीय लेखकांच्या प्रवाहपतितपणाचा परिणाम.) प्रत्येक माणसावर परंपरेने संस्कार होतातच. पण प्रगतीला खीळ घालणारे संस्कार वेगळे करून विकासाचा वेग वाढवणारे संस्कार स्वीकारणे जरूरीचे असते. जाहिराती, प्रचार, कृत्रिमपणे निर्मिलेले वातावरण याद्वारा नकळत निर्णय लादले जातात हेही ओळखयाला हवे.

समाजातील खालच्या थरातील लोकांना जीवनाचे फार वेगळे अनुभव येतात. पण ते व्यक्त करण्याची फुरसद त्यांना नसते आणि आपल्या अनुभवाचा संपूर्ण आशय

त्यांना कळतही नाही ही अनुभव-संपदा वाया जाते. जोपर्यंत या लक्षावधी मूक बांधवांना समर्थपणे बोलता-लिहिता येत नाही तोपर्यंत साहित्य ही उच्चवर्णीयांची मिरास राहणार; ते सर्वार्थाने समृद्ध होणार नाही. सामाजिक परिवर्तन झाल्याखेरीज संधि-समानतेचे तत्त्व पूर्णपणे अंमलात येणार नाही. हे समाजपरिवर्तन घडण्यास मदत करणे हीच लेखकाची सामाजिक बांधिलकी.

(सरदारांचे हे विश्लेषण वरकरणी प्रभावी वाटते पण त्यात त्रुटी आहेत. त्या दूर करता येतील ? खालच्या थरातीलच काय कोणत्याही थरातील अनेक लोकांना आपले अनुभव व्यक्त करण्याची फुरसद नसते आणि त्याच्या आशयाची जाणही नसते. मुख्य म्हणजे प्रत्येकाने अभिव्यक्ती केलीच पाहिजे का ? सरदारांना लक्षावधी साहित्यिक हवेत की काय ? हे अनुभव वाया जातात ही खंत तशी वांझोटी आहे कारण लेखनाची उर्मी प्रत्येकालाच असते हा भ्रम आहे. उर्मी असून ती दाबली जात असेल तरच मामला गंभीर असेल. लोकशाही व्यवस्थेत बळाच्या आधारे अशी उर्मी दाबणे अवघड आहे. जोपर्यंत सर्वांना अभिव्यक्ती करता येत नाही तोपर्यंत साहित्य ही उच्चवर्णीयांची मिरास राहणार हा निष्कर्षही सार्वकालिक नाही मानवी भाषांच्या ज्ञात इतिहासापासून आजपर्यंत सर्वांनी अभिव्यक्ती केल्याचा पुरावा नाही. मग सर्व साहित्यच उच्चवर्णीयांचे होईल. किंबहुना साहित्यिक म्हणजेच उच्चवर्णीय असे म्हणावे लागेल, अन्यथा वर्णाचा आणि अभिव्यक्तीचा संबंध जोडणे अशक्य आहे. सतत खाणारे बहुसंख्य आणि कमी खाणारे अल्पसंख्य असले आणि कमी खाणारे हे उत्तम खेळाडू असले तर कमी खाणे ही खेळाडूंची मिरास होईल का ? साहित्य सर्वार्थाने समृद्ध होणे यात सरदार भाषेचे समग्र साहित्य धरतात. म्हणजे अनेक साहित्यिकांनी वेगवेगळ्या थरातले अनुभव व्यक्त केले की साहित्य सर्वार्थाने आणि सर्वांगाने समृद्ध होणार. पण समूहाचे संचित असलेले असे समग्र साहित्य आणि व्यक्ती निर्माण करत असलेले त्या व्यक्तीचे साहित्य या दोन गोष्टी व्याप्तीच्या दृष्टीने भिन्न आहेत खालच्या थरातले अनुभव साहित्यात न येणे हे समूह साहित्यातील न्यून आहे, व्यक्तिगत साहित्यातील नव्हे त्यामुळे भले उच्चवर्णीय साहित्यकाराने तळागाळातले अनुभव न मांडण्यात दोष कसा राहील ? दलित साहित्यकाराने उच्चवर्णीयांचे अनुभवविश्व अस्पर्श्य ठेवले तर व्यक्ती म्हणून त्याला दोष देता येईल ? लोकशाही व्यवस्थेत संस्थेच्या जोरावर कोणत्याही एका समूहाचे—आर्थिक, धार्मिक, सामाजिक, जातीय—साहित्य उपेक्षिताही येते किंवा त्याचा पुरस्कार करता येतो. त्यात उच्चनीचतेचाच निकष असतो असे कसे म्हणता येईल ? आर्थिक आणि राजकीय सत्ता हाती असणाऱ्यांचा आपोआपच एक वर्ग बनतो—एक जात बनते. तो परिवर्तनाला विरोध करतो. सुबत्तेमुळे तो साहित्यही निर्माण करू शकतो ही उपपत्ती मानली तर साहित्य हे नेहमी सबल घटकाचेच राहणार; दुर्बल घटकांना नेहमीच दाबले जाणार. राजकारण व अर्थकारण याच्यात साहित्याची उगमस्थाने शोधण्याचा हा साम्यवादी

दृष्टिकोन काही अंशी बरोबर असला तरी अपूर्ण आहे; आणि त्याआधारे जातीय उन्नती-अवनतीचे गणित मांडणे पूर्णपणे भ्रामक आहे. खरे म्हणजे साहित्य हे शिक्षणाखालोखाल एकच असे क्षेत्र आहे की तेथे सत्तेच्या आधारे आणि धनदांडगेपणाने फार काळ टिकून राहता येत नाही आणि तेथली मुस्कटदाबी फार संघटितपणेही होत नाही. समाज अहंमन्य, विक्षिप्त, विकृत पुढाऱ्यांना, सत्ताधाऱ्यांना फेकून देतो; अशा साहित्यिकांना मात्र बरेचदा सहन करतो. समाजपरिवर्तनास मदत करणे ही लेखकाची सामाजिक बांधिलकी असे सरदार म्हणतात. पण हा फार मोघम विचार झाला. परिवर्तनाला साहित्याच्या योगे मदत करणे म्हणजे काय ? परिवर्तनाची कल्पना इतकी सुस्पष्ट असते का ? साहित्यातून परिवर्तनाची आस निर्माण होते की साहित्य फक्त साधनाचेच काम करते ? परिवर्तनात केवळ बहुतांचा विचार आहे की कल्याणकारी मूल्यांचा ? कल्याणकारी मूल्यांचा असेल तर श्रेष्ठ साहित्य नेहमीच या अर्थाने बांधिल होते व राहील. ते तसे नाही अशी तक्रार करण्यापेक्षा ते श्रेष्ठ साहित्यच नाही असे म्हणून मोकळे होणे जास्त फायद्याचे. उच्चवर्णीयांचे साहित्य हे संकुचित म्हणून उच्च नसेल तर सामाजिक बांधिलकीची अपेक्षाच असल्या कमअस्सल साहित्याकडून का करावी ?)

कालातीतता आणि कालसापेक्षता याबाबत सरदार एक नवा विचार मांडतात. साहित्य हे कालातीत आहे, त्याचे आवाहन वैश्विक आहे वगैरे म्हणून अनेकदा त्याचा सध्याच्या काळाशी, परिस्थितीशी संबंधच नसल्याचा बहाणा केला जातो. कमअस्सल, करमणूकप्रधान, जीवनाशी असंबद्ध अशा मध्यमप्रतीच्या साहित्याची ही एक पळवाट असते. सरदारांना मात्र शाश्वतता ही काळाच्या क्षणिकतेत मिसळलेली असते असे वाटते. जे क्षणिक असते, तात्कालिक असते, त्याची दृढ पकड घेता आली, तरच शाश्वताचा मागोवा घेता येतो असे सरदार म्हणतात. श्रेष्ठ साहित्याच्या आस्वादनाची उन्मनी अवस्था फार काळ टिकत नाही. रसिक जेव्हा वास्तवाच्या पातळीवर उतरतो तेव्हा साहित्याची कालसापेक्षताच त्याचे लक्ष वेधून घेते.

सरदार साहित्यात ललित साहित्य व वैचारिक साहित्य असा दोन्हीचा समावेश करतात. विचार-प्रवर्तक साहित्य विपुल असेल व समाजात विचारमंथन असेल तर त्याचा भरपूर फायदा ललित साहित्याला होतो. लेखक तज्ञ असण्याची गरज नाही पण त्याला शास्त्रे माहीत हवीत  मराठीत वैचारिक साहित्य जुजबी स्वरूपात आहे असे सरदार स्पष्टपणे म्हणतात. मराठी वैचारिक साहित्यात परभृतता फार आहे. आपल्या विद्वानांना महाराष्ट्रापेक्षा युरोपची माहिती अधिक असते. पूर्वी शब्दप्रामाण्य होते आता आधुनिक पोथीनिष्ठा आहे  पाश्चात्यांचे दडपण आपल्या विद्वानांना झुगारता येत नाही. इंग्रजी विचार व इंग्रजी भाषा यावर आपले विद्वान फार अवलंबून असतात. त्यामुळे मूलभूत असा तत्त्वविचार ते करू शकत नाहीत (हे सर्व खरेच आहे. पण हे असे का होते याचा खुलासा नाही. राजवाड्यापासून मराठी विचारवंतांवर परभृततेचा आरोप

आहे. पण या समाजात ही परभृतता का आली याचा विचार कुणी केला नाही. की परभृततेवर जगणाऱ्यांनाच विद्वान म्हणून प्रस्थापित करण्याची तरतूद मराठी समाजव्यवस्थेत आहे ? या समाजव्यवस्थेने मूलभूत तत्त्वविचार करणाऱ्यांची गळचेपी तर केली नसेल ? इतकी सातत्याने ? सरदार म्हणतात ते विचारमंथन आज तरी या समाजात फारसे दिसत नाही. विचारच नाही तर मंथन कसले ? विद्वत्ता 'प्रदर्शन' मात्र आहे. या प्रदर्शनाला टोळीची सुरक्षितताही असते. मराठी विचारवंत टोळीटोळीने राहतात. आपल्याच विचारांवर पूर्णपणे भिस्त ठेवून उभा राहणारा विद्वान येथे दुर्मिळच. त्यामुळेच येथे खऱ्या अर्थाने वाद होत नाहीत; चिखलफेक होते. बिचाऱ्या ललित साहित्याला यातून कोणते पोषण मिळणार ?)

ग्रामीण साहित्याच्या उदयाचे आणि त्याच्या स्थितीचे विवेचन सरदार विस्ताराने करतात. वाङ्मयाच्याद्वारे सामाजिक जबाबदारी पार पाडणे म्हणजे सामाजिक बांधिलकी मानणे असे ते पुन्हा सांगतात. मराठी साहित्य अजूनही (१९८० मधे) पांढरपेशा मध्यमवर्गीय वृत्तीचे आहे असे ते म्हणतात काळाची गरज ओळखण्यास मराठी साहित्य कमी पडले (येथे सरदारांची भूमिका टोकाची वाटते. मुळात आपला अनुभव अभिव्यक्त करणे हे साहित्याचे मुख्य प्रयोजन मानले तर मध्यमवर्गीय साहित्यिक ग्रामीण साहित्य लिहीलच कसा ? व्यंकटेश माडगूळकर, श्री. म. माटे यांनी ते लिहिण्याचा प्रयत्न केला तरी त्यांचा अनुभव हा सच्चा नाही असा आरोप पुढे झालाच. ज्याचा साक्षात् अनुभव त्याचेच ते साहित्य हे मानले तर मग मध्यमवर्गीय लेखकांनी काळाची गरज ओळखली नाही या तक्रारीला अर्थच रहात नाही. ग्रामीण लेखकांनी लिहिले नाही—त्यांना कदाचित् तशी संधी मिळाली नाही—आणि मध्यमवर्ग आपले अनुभव लिहीत राहिला ही वास्तविके आहेत. त्यात दोषारोप करणार कसा ? आमचा अनुभव तुम्हाला नाही, तुम्ही त्यावर लिहिले तर ते कृत्रिम साहित्य, पण तुम्ही जे लिहिता त्यात आमचा अनुभव नाही ही मध्यमवर्गीय लेखकांविषयीची ओरड एक प्रचारकी स्वरूपाची तरी होईल किंवा अन्याय्य.) प्रचलित साहित्याच्या कोतेपणातून दलित साहित्य संमेलने वेगळी घेण्याची निकड तयार झाली (खरे म्हणजे याहीपेक्षा यामागचे कारण गंभीर आहे. दलित समाज आणि मध्यमवर्गीय समाज यांच्यात सामाजिक अभिसरण शून्य. जातिव्यवस्थेमुळे पूर्वीही ते फारसे नव्हते. संमेलन, यात्रा, उरूस हे सामाजिक समारंभाचे प्रसंग. दोन समाजात दळणवळणच नसल्याने अखिल मराठी साहित्य संमेलन होणे कल्पनेतच शक्य होते. एकवेळ साहित्यिक इकडून तिकडे जातील आणि जातात. पण प्रेक्षकांचा वर्ग हा ठराविक थरातीलच असतो. दलित संमलेनाला तरी मध्यमवर्गीय प्रेक्षक कुठे असतो ? आपापल्या समाजाचे समारंभ करण्याची भारतीय परंपरा जुनी आहे. साहित्य संमेलने यात सामील झाली हे मानायला हवे)

सरदारांच्या मते १९३० पासूनच्या मराठी वाङ्मयाची स्थितिशीलता त्याच्या

प्रगतीला हानिकारक ठरली. १९३२च्या कोल्हापूर संमेलनात व १९४१ च्या सोलापूर संमेलनात 'साहित्यिकांनी बहुजनोपयोगी साहित्य निर्माण करावे' असा ठराव पास झाला. पण त्याची कार्यवाही झाली नाही. (साहित्य संमेलनात केलेले ठराव हे कार्यवाहीत आणायचे असतात किंवा आणता येतात हा समज भाबडा आहे. खरे म्हणजे संमेलन अध्यक्षांना ते माहीतही असते. दुसरे असे की संमेलनाने निर्णय करायचे आणि साहित्यिकांनी घरी जाऊन त्याची अंमलबजावणी करण्यासाठी साहित्य लिहायचे ही साहित्य-निर्मितीविषयीची अपेक्षा थक्क करणारी आहे. यातून काय प्रतीचे साहित्य निर्माण होणार ? तिसरे असे की ठराव करून ते मांडणारे लोक हा विशिष्ट पदाधिकाऱ्यांचा एक गट असतो. त्यामुळे त्या ठरावाला सर्वसामान्य साहित्यिकाचा मन:पूर्वक पाठिंबा असतो हाही एक भ्रमच आहे. निदर्शने करून ठराव मांडून पास करून घेण्याचा प्रकारही साहित्य संमेलनात नवा नाही. ठराव मांडून पास करून घेणे हे एक सत्तासंघर्षातील विजयाचे केवळ चिन्ह असते; त्यात विचारांचा प्रामाणिकपणा आणि सामाजिक मतपरिवर्तन यांचा मागमूसही नसतो.) मराठी साहित्य हे विस्ताराने कमी आणि गुणवत्तेतही कमी आहे. सरदारांच्या मते मराठीत प्रतिभावंत साहित्यिक आहेत. पण दोन-तीन कादंबऱ्या प्रसिद्ध झाल्या की त्यांच्या प्रतिभेचा विकास खुंटतो. नवनिर्मिती थांबते. कलात्मकता संपते. शिल्लक राहते ते तंत्रनैपुण्य व कारागिरी. शिवाय समाजातील बहुसंख्य लोक करमणुकीसाठीच वाचतात. कलात्मकतेची जाण असणारे आणि विचारांची पारख असणारे वाचक अगदीच थोडे असतात. खालच्या थरातील वाचकालाही साहित्यात आपल्या जीवनाचे दर्शन नसल्याने साहित्य हे करमणुकीसाठीचेच वाटते. यातून साहित्य हे समाजनिरपेक्ष असते अशी भूमिका बनते. या परिस्थितीचे मूळ परंपरागत जातिव्यवस्थेत आहे. (सरदार उच्चवर्गातील वाचक व खालच्या थरातील वाचक असा फरक करतात. उच्च वर्गातील वाचक अनभिज्ञ तर खालच्या थरातील वाचक दिशाभूल झालेला. यातून साहित्य हे मनोरंजनासाठी ही भूमिका व्यापक प्रमाणात पसरते. मुळात वाचकांची ही वर्गवारी टिकणारी नाही. उच्च वर्गीय वाचकाला मध्यमवर्गीय साहित्य स्वत:च्या जीवनाशी संबंधित असूनही तो मनोरंजनवादी का व्हावा ? उलट खालच्या थरातील वाचकाला त्याच्या जीवनाशी संबंधित साहित्य दिले तर तो मात्र दिशाभूल करून घेणार नाही व मनोरंजनवादी अनभिज्ञ वाचक होणार नाही याची खात्री काय ? एकंदर मराठी समाजाची बौद्धिक पातळी जर सरदार म्हणतात तशी सामान्य असेल तर त्याचे सर्व खापर केवळ जातिव्यवस्थेवर फोडता येईल का ? व्यक्तीच्या सर्वच यशापयशांचे श्रेय वा उत्तरदायित्व केवळ सामाजिक परिस्थितीत शोधण्याच्या टोकाच्या साम्यवादी विचारसरणीचा हा परिणाम आहे. यात आपण नकळतपणे व्यक्तीची स्वायत्तता नाकारतो हे का उमजू नये ?)

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर बहुजन वर्ग शिक्षित झाला. साहजिकच उच्चवर्गाचे राजकीय

नेतृत्व गेले (ही कारणमीमांसाही अचंबित करणारी. यात शिक्षणानेही वरच्या काय किंवा खालच्या काय कोणत्याच वर्गाची जातीयता संपली नाही हे मान्य करण्यासारखे आहे. सरदारांना याविषयी खेद न वाटता हे असे होणारच असे वाटणे हा विशिष्ट मतप्रणालीच्या दडपणाचा परिणाम तर नसावा ?) त्यामुळे उच्चवर्ग उदासीन झाला. खालच्या थरातील लोकांशी त्याचे देणे-घेणेच राहिले नाही. त्यांचे दु:खही त्याला आपलेपणाने समजून घेता आले नाही. (सरदार म्हणतात तशा नवशिक्षित बहुजन समाजाने नाकारलेल्या उच्च वर्गाने स्वत:चे दु:ख विसरून पुन्हा स्वत:ला झिडकारणाऱ्या खालच्या वर्गाचे दु:ख समजून घ्यायचे ही अपेक्षा सामाजिक स्तरावर भलतीच आदर्शवादी वाटते. उच्च वर्गाच्या उदासीनतेची सरदारांनी केलेली कारणमीमांसा यथार्थ मानली तरी त्यांनी व्यक्त केलेली अपेक्षा तर्कशुद्ध वाटत नाही. संतांची उदारता वर्गामध्ये नसते, ती फक्त व्यक्तीमधे संभवते.)

गेल्या दहा-बारा वर्षात (म्हणजे १९६५-६६ पासून) ग्रामीण लेखकांची एक नवी पिढी उदयाला आली असे सरदार म्हणतात. या ग्रामीण वर्गात शहरातला कष्टकरी सुद्धा मोडतो. (मग ग्रामीण हा शब्द का वापरावा ? आर्थिक दृष्ट्या दुर्बल असा वर्ग असे का म्हणू नये ? केवळ ग्रामीण भागात उच्चवर्ग नाही म्हणून ? पण मग खेड्यातील श्रीमंत वर्ग 'शहरी' का म्हणू नये ? त्याचे अस्तित्व, त्याची मानसिकता हीही जातिनिष्ठ आहे असे कबूल करण्यात काय अडचण आहे ?) १९३० पासून बहुजनसमाजातून साहित्यिक निर्माण होऊ लागले. त्यांचे वरच्या वर्गाशी जुळले पण तळाचे खरे ग्रामीण जीवन त्यांना कळले नाही. आजचा ग्रामीण साहित्यिकही खालच्या थरातूनच येतो आहे पण त्याचेही आदर्श प्रस्थापित वर्गातीलच आहेत. (म्हणजे प्रस्थापितांशी जुळवून न घेणे हा एकमेव नकारात्मक निकष अस्सल ग्रामीणपणा जोखण्याचा आहे की काय ? प्रस्थापितांशी जुळवून घेण्याचे वैषम्य सरदारांना एवढे का वाटावे ? प्रस्थापितांनीही त्यांना सामावून घेतले असण्याची शक्यता कशी नाकारता येईल ? तसे असेल तर उच्च वर्ग परिवर्तनशील आहे असे म्हणावे लागेल आणि शहरी उच्च वर्गाला बुर्जवा म्हणून न हिणवता त्याची प्रशंसा करण्याचे पाप घडेल ही साम्यवादी भीती तर यामागे नाही ? वर्गविहीन समाजरचनेसाठी वर्गकलह सतत जोपासावा हे साम्यवादी सूत्र या मागे नसेल कशावरून ? भारतीय संदर्भात 'वर्गा'च्या ठिकाणी 'जात' घातली की आणखीनच मजा. प्रत्यक्षात वर्गही गेले नाहीत, जातही गेली नाही आणि त्याची ऐतिहासिक उपपत्ती मात्र इतिहासजमा झाली. विचारांचा हा पराभव, हा अपुरेपणा स्वीकारण्याचे धाडस मराठी विचारवंत कधी करणार ?) मात्र लगेचच नारायण सुर्वे, गजमल माळी यांच्यासारखे काही साहित्यिक प्रस्थापित मध्यमवर्गीय आदर्शाबाबत असमाधानी आहेत असेही सरदार म्हणतात. त्यांना करंदीकर, कुसुमाग्रज, मर्ढेकर आपले वाटत नाहीत. (यानिमित्ताने सरदारांनी किमान या प्रस्थापितांचे एक नवे

मूल्यमापन केले यात समाधान मानले पाहिजे. मर्ढेकरांचा गिरणी कामगार, त्याची मानसिकता ही अस्सल नव्हती असा याचा अर्थ होतो. खरे म्हणजे मर्ढेकरांनी स्वत:च्या (शहरी ?) मध्यमवर्गीय मानसिकतेतून फक्त या बाबत चिंतन केले. मर्ढेकरांना थेट क्रांतिकारक ठरविण्याची घाई मानदंड शोधताना झाली हेही खरेच. गंमत म्हणजे याच भाषणात सरदारही मर्ढेकरांचा उल्लेख आदर्श म्हणूनच करतात ! नारायण सुर्वे (१९९५) तर अध्यक्षीय भाषणात दलित साहित्याने थेट केशवसुत, कुसुमाग्रज व मर्ढेकरांशी नाते जोडले असे म्हणतात !) ग्रामीण लेखकही पांढरपेशेपणाच्या मोहात कळत नकळत पडतात. हे थांबवायचे असेल तर डोळस ग्रामीण वाचकच हवा असे सरदारांना वाटते. (थोडक्यात सरदार ज्या संकुचित, विकासहीन मध्यमवर्गीय साहित्याचे विवेचन करतात ते तसेच टिकले आहे, बिचारे ग्रामीण साहित्यिकही त्यांच्या आदर्शाच्या प्रेमात पडले आहेत, वाचकही तसलेच सामान्य प्रतीचे असल्याने तेही हे संकुचित साहित्यच स्वीकारतात अशी एक कल्पित कोडी सरदारांनी तयार केली आहे. यावर उपाय ? एक, मध्यमवर्गीय साहित्यिकांनी आपला अवमान विसरून खालच्या थरातील लोकांचे दु:ख समजून घ्यावे किंवा खालच्या थरातील डोळस वाचकांची संख्या वाढवून हे संकुचित साहित्य उपेक्षित करावे ! आज हा बहुसंख्य शहरी व ग्रामीण समाज कोणते भरड वाङ्मय वाचतो हे लक्षात घेतले तर या वैचारिक आग्रहांचा पोकळपणा लक्षात येईल.)

आंबेडकरांनी सुरू केलेल्या चळवळीतून दलित साहित्य निर्माण झाले असे सरदार म्हणतात. स्वातंत्र्य, समता व बंधुता ही मूल्ये परंपरेने अस्पृश्य मानलेल्या, दबावाखाली ठेवलेल्या दलित समाजालाही मिळाली पाहिजेत. स्वातंत्र्य मिळाल्यानंतर या समाजाचे स्वत्व जागे झाले. अन्यायाविरुद्ध ठामपणे उभे राहणारे विद्रोही साहित्य यातून जन्माला आले. दलित साहित्याने शब्दांचा शस्त्रासारखा वापर केला. ते आवश्यकच होते. प्रस्थापित व्यवस्थेला नकार देण्याची सुरुवातीची वृत्ती साहिजिकच होती. सरदारांना यापुढे विधायक दृष्टीने समाजाची पुनर्मांडणी करण्याचे कार्य दलित साहित्याने करावे असे वाटते. व्यासंग वाढवून विविध ज्ञान संपादन करणे दलित साहित्यिकांना आवश्यक आहे असे ते म्हणतात. मराठवाडा विद्यापीठाचे नाव डॉ. बाबासाहेब आंबेडकर विद्यापीठ असे करून दलितांच्या अस्मितेला समाजाने सन्मानित करावे असे ते म्हणतात.

वामन चोरघड्यांना (१९७९) दलित साहित्य व ललित साहित्य हा फरक खोटा वाटतो. साहित्याला धर्म असू शकतो, 'जात' असूच शकत नाही असे ते म्हणतात. जातिभेद, जातिवाद असे शब्द साहित्याला लागू झाले की ते मेले वा. म जोशीप्रमाणे चोरघडे लेखकाच्या चारित्र्याला महत्त्व देतात. संघर्षापेक्षा समन्वय त्यांना महत्त्वाचा वाटतो.

आपल्याला दलिताच्या जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव आहे असे म्हणून गो. नी.

दांडेकर (१९८१) आपण अस्पृश्यतेचा प्रश्न साहित्याच्या माध्यमातून मांडल्याचे सांगतात. दलित साहित्यात प्रक्षोभ आहे म्हणून प्रक्षोभ हा दहावा रस मानावा असे ते रससिद्धान्ताच्या फंदात न पडता सांगतात. (ना. सं. इनामदार (१९९७) पुढे इतिहास हाही रस मानावा असे म्हणतात. रसाचे स्थान दिले की आपण त्या त्या साहित्याचा सन्मान केला अशी बालबोध भूमिका यामागे आहेच, पण रससिद्धान्ताचे वरवरचे आकलनही त्यात आहे. प्रक्षोभ रसाचे भाव, अनुभाव साहित्यशास्त्रींनी शोधावेत असे म्हणून दांडेकर मोकळे होतात ते यामुळेच.) चोखामेळ्यापासून ते आंबडेकरांपर्यंतच्या दलित साहित्यात हा रस आहे. (आंबेडकरांच्या तर्कशुद्ध विचारांना प्रक्षोभ रसात गुंडाळून टाकण्याचा हा समन्वय चिन्त्य आहे.) दलित वाङ्मयातील आक्रस्ताळेपणा हळूहळू कमी होऊन ते उच्च प्रतीचे वाङ्मय होईल असेही दांडेकर म्हणतात. विद्यापीठांनी पाली व बौद्ध वाङ्मयाचा अभ्यास करावा असे ते सुचवतात. मराठवाडा विद्यापीठांच्या नामांतराचा प्रश्न वाटाघाटी करून सोडवावा असे ते म्हणतात.

सामाजिक बांधिलकीची किंवा सरदारांच्या विरुद्धची अशी दुसरी बाजू गंगाधर गाडगीळ (१९८१) व व्यंकटेश माडगूळकर (१९८३) विस्ताराने मांडतात. सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनेचे दुष्परिणाम मराठी साहित्यावर झालेले दिसतात असे गाडगीळांना वाटते. साहित्यात सहजपणे समाजदर्शन येतेच. पण प्रत्येक विषयात ते येईलच असे नाही. उदाहरणार्थ, वार्धक्य, किशोरावस्था हे विषय असताना सामाजिक चिंतन येणार नाही. (का येणार नाही ? वृद्धांची मानसिक अवस्था ही समाजरचनेचा परिणाम असू शकतो. किशोरवयीन प्रश्न सुद्धा सामाजिक व्यवस्थेच्या आधारे पाहता येतीलच.) गाडगीळ मनोविश्व आणि वास्तव यात फरक करतात. (भोवतालचे साक्षात् जग आणि मनाने निर्माण केलेले जग असा हा फरक आहे.) साहित्यात केवळ साक्षात् वास्तवच महत्त्वाचे मानणे गाडगीळांना योग्य वाटत नाही.

गाडगीळ बांधिलकीच्या पुरस्कारामागील काही दोष सांगतात. बांधिलकीत व्यक्तिदु:ख गौण मानले जाते. (वर्ग ही संकल्पना वास्तव वाटल्याने तसे होत असावे.) उदाहरणार्थ, विशिष्ट समाजाचे दारिद्र्य बांधिलकीमधे साहित्याचा विषय ठरते; विशिष्ट व्यक्तीचे दु:ख तसे ठरत नाही. (व्यक्तीचे दु:ख हे वर्गाचे प्रातिनिधिक दु:ख असते.) गाडगीळांच्या मते वस्तुत: व्यक्तीचे दु:खच शाश्वत असते, समाजाचे दु:ख दूर करता येते. दारिद्र्य दूर करता येते, वार्धक्याचे दु:ख कायमच रहाते. अस्पृश्यता हा विशिष्ट समाजरचनेचा भाग आहे आणि अन्याय्य आहे त्याचे साहित्यात होणारे भेदक चित्रणही गाडगीळांना स्वागतार्ह वाटते पण या समाजरचनेमागे स्वामित्वाची हाव हा प्रमुख हेतू आहे. या मूळ प्रवृत्तीचा निषेध व्हायला पाहिजे दलित साहित्यात सवर्णाचा निषेध होतो पण स्वामित्त्व-लालसेचा निषेध होत नाही. मध्यमवर्गीय साहित्य हे व्यक्तिकेंद्री म्हणून ते दुय्यम मानणे गैर आहे. तसे मग ग्रामीण साहित्यही फक्त ग्रामीण जीवनाचा विचार

करते म्हणून संकुचित मानावे लागेल. मध्यमवर्गीय काय, ग्रामीण काय किंवा दलित काय, खरा प्रतिभावान समग्र जीवनाचा ध्यास घेतो. (अडचण अशी की मध्यमवर्गीयात प्रतिभावान नाही आणि दलितातही प्रतिभावान नाही. मराठी साहित्य हे प्रामुख्याने मध्यमप्रतीच्या साहित्याचे जग आहे. त्यामुळे त्या साहित्यात त्या त्या वर्गाचेच जीवन येते, समग्र जीवनाचा ध्यास त्यात नसतोच. मग असल्या मध्यमप्रतीच्या किंवा चांगल्या पण अलौकिक नसलेल्या साहित्याला प्रतिष्ठा मिळत असेल तर त्याच तोलामोलाच्या दलित वा ग्रामीण साहित्याला ती मिळावी असे का वाटू नये ? मूळ स्पर्धा ही मध्यमस्तरावरची आहे. खांडेकर, फडके प्रतिष्ठित होतात तर अण्णाभाऊ साठे, बाबुराव बागुल किंवा शंकर पाटील, आनंद यादव हेही प्रतिष्ठित का होऊ नयेत ? खरे म्हणजे ओरडतो त्याचे विकते या न्यायाने आज तेही प्रतिष्ठित झाले हा फायदा दुर्लक्षिता येईल ?) सामाजिक बांधिलकी कामगार वा ग्रामीण वर्गाला असते हा भ्रम आहे. कामगार वर्ग व्यापक समाजजीवनाचा विचार करतो असे आज तरी दिसत नाही. मध्यमवर्गीय साहित्य समाजातल्या बहुसंख्य लोकांना आपले वाटत नाही म्हणून ते संकुचित आहे असे म्हणणे हेही गैर आहे. साहित्य आपले आहे असे वाटण्यापेक्षा साहित्याविषयी आपुलकी वाटणे, त्यातील अनुभवाची उत्कट प्रतीती येणे महत्त्वाचे. (येथे थोडा घोटाळा होण्याचा संभव आहे. आपल्याच जीवनाचे चित्र साहित्यात दिसावे ही अपेक्षा चूकच. पण सरदार तसे म्हणत नाहीत. ते आपल्या जीवनाशी संबद्ध असावे असे म्हणतात. ती संबद्धता नसली तर साहित्य केवळ मनोरंजन होते असे सरदार म्हणतात. मध्यमवर्गीय जीवन कोणत्या अर्थाने ग्रामीण वाचकाला संबद्ध वाटत नाही हा कळीचा प्रश्न आहे. गाडगीळ म्हणतात त्याप्रमाणे समग्र जीवनाची संबद्धता घेतली तर आपल्याला अपरिचित अशा जीवनाच्या साहित्यातील अनुभवाने काही बिघडणार नाही. सरदार हा मुद्दा स्पष्ट करत नाहीत.) आपल्या जीवनाशी निगडीत नसल्या तरी व्यंकटेश माडगूळकरांच्या ग्रामीण कथा व सुर्व्यांच्या कविता गाडगिळांना आवडतात, गाडगिळांच्या कथा आवडणारे दलितही आहेत असे गाडगीळ म्हणतात. त्यामुळे बांधिलकीची हाकाटी पिटणाऱ्यांना साहित्यच वाचता येत नाही असा निष्कर्ष ते काढतात.

ग्रामीण जीवनाचे सत्य चित्रण मध्यमवर्गीय साहित्यिक करू शकत नाही असे सरदारांनी सुचवले आहे. गाडगीळांना हा दावा मान्य नाही. (सरदारांना परकायाप्रवेश हे मिथक वाटत असावे. हॅम्लेट, ऑथेल्लो, लिअर, रिचर्ड द थर्ड या विभिन्न व्यक्तीच्या विरुद्ध टोकाच्या जीवनाचे आकलन शेक्सपिअरला कसे काय झाले ? रोममधे नसूनही रोमचा अनुभव त्याला कसा आला ? अर्थात् पुन्हा हे अलौकिक साहित्यालाच लागू पडते, मध्यम प्रतीच्या साहित्याला नाही.) ग्रामीण लेखकाला ग्रामीण जीवन पूर्णपणे कळलेले असते हा देखील चुकीचा समज आहे. मुंबईचे जीवन ज्यांना कळले नाही

असे अनेक मध्यमवर्गीय लेखकही आहेत. (यातील 'जीवन कळणे' ही कल्पनाही संदिग्धच आहे.)

सामाजिक बांधिलकीवाले साहित्यात बोली भाषेचा आग्रह धरतात हेही गैर आहे. साहित्यिकाचे भाषिक विश्व विशालच हवे असे गाडगीळ म्हणतात. तुकारामांची भाषा आपली नसतेच; आपण ती आपलीशी करतो. ग्रामीण भाषेतही अनेक शहरी शब्द येतातच. दलित कवीनी तुकारामांपासून मर्ढेकरांपर्यतची भाषा घेतली असेही गाडगीळ म्हणतात. ग्रामीण भाषा नैसर्गिक व शहरी भाषा मात्र कृत्रिम हाही गैरसमज आहे. तशी भाषा हीच मुळात कृत्रिम असते. मुळात एखादी ग्रामीण भाषाच पुढे शहरी बनते.

सामाजिक वास्तवाचे बांधिलकीच्या नैतिक भूमिकेवरून दर्शन घडविणे हे साहित्याचे कार्य आहे असे बांधिलकी मानणारे म्हणतात. (येथे हे स्पष्ट करायला हवे की सरदार स्वयंकेंद्रित व्यक्तिवाद व समूहवाद हे दोन्ही टोकाचे मानतात. व्यक्तीची प्रतिष्ठा व सामाजिक बांधिलकी या दोहोचा पुरस्कार तारतम्याने करायला हवा ही सरदारांची भूमिका. गाडगीळ व्यक्तिनिष्ठतेचे महत्त्व साहित्याला आवश्यक मानतात. प्रतिभावान साहित्यिकाच्या व्यक्तिनिष्ठ भूमिकेतच समग्र समाज जीवनाचा विचार असतो, त्यासाठी खास वर्गविचाराला चिकटण्याचे कारण नाही असे गाडगीळ म्हणतात. म्हणजे एका अर्थाने दोघांनाही दोन्ही बाजू मान्य आहेत. खरे म्हणजे साहित्याचा साधन म्हणून वापर करून सामाजिक जबाबदारी पार पाडण्याच्या सरदारांच्या बांधिलकीबाबत वाद घालता येईल; वास्तव जीवनाच्या संबद्धतेबाबतही वाद घालता येईल; उलट मनोविश्व ही काय भानगड आहे, ते वास्तवापासून वेगळे असते का याबाबतही वाद घालता येईल. पण हे वाद घातले जात नाहीत.) बांधिलकी मानणाऱ्यांनी आधी बांधिलकीची आपली जाण यथायोग्य आहे की नाही याची तपासणी करावी असे गाडगीळ म्हणतात. स्वत:ची भूमिका समाजहितास उपयोगी आहे का हेही त्यांनी तपासावे. समाजात दारिद्र्य आहे, विषमता आहे. पण समाजात औद्योगिक प्रगती आहे, समाजाची घटना बदलते आहे हेही खरे केवळ चळवळ करून विषमता जाणार नाही, आर्थिक प्रगती मात्र खुंटेल हा समग्र विचार बांधिलकीवाले का करत नाहीत ? (गाडगीळ हळूहळू बांधिलकीवाल्यांना कम्युनिस्ट किंवा समाजवादी कामगार चळवळ करणाऱ्यांच्या पंक्तीत नेऊन बसवतात.)

बांधिलकीच्या नावाखाली चालणाऱ्या विद्वेषाच्या राजकारणावर गाडगीळ प्रकाश टाकतात. त्यांच्या मते बांधिलकीवाले वाटेल त्याच्यात सामाजिक अन्याय शोधतात. उदाहरणार्थ, एखाद्याने संस्कृतप्रचुर शैली वापरली की लगेच तो सामाजिक अन्यायाचा भाग आहे असे म्हटले जाते. बांधिलकीवाल्यांना सर्व धनिक स्वार्थी व सर्व गरीब इतरांच्या कारवायांमुळे झाले असे वाटते. कष्टाने श्रीमंत होता येते व आळसाने दारिद्र्य येते हे त्यांना समजत नाही. या अशा टोकाच्या असंयमित भूमिकेमुळे बांधिलकीवाले

समाजात द्वेषभावना पसरवतात. माणूस केवळ समाजाकरिता जगत नाही, माणूस म्हणजे मुंगी नव्हे हे बांधिलकीवाल्यांना कळत नाही. बांधिलकीच्या नावाखाली साहित्यात राजकारण आणले जाते असा एक गंभीर आरोप गाडगीळ करतात. (साहित्यिकांचे गट बनतात. त्या गटाचे अनुयायी होतात. हे गट मग राजकारणाच्या अंगाने साहित्यक्षेत्रात दबदबा निर्माण करतात. खरे म्हणजे दलित साहित्य हे दलितांच्या राजकीय चळवळीबरोबरच सुरू झाले. दलित चळवळीतले कार्यकर्ते उघडपणे साम्यवादी कार्यकर्त्याप्रमाणे साहित्याचा प्रचार-साधन म्हणूनच वापर करतात. ते साहित्य अभिजात वगैरे असण्याची त्यांचीच अपेक्षा नसते. त्याने राजकीय काम केले की बस्)

दलित साहित्यात विद्वेषयुक्त कवितांचे पेवच फुटले असे म्हणून गाडगीळ त्यातल्या ढोबळपणावर बोट ठेवतात. केवळ तळमळ म्हणजे अनुभव नव्हे. अर्थात्, दलितांमधले प्रतिभावान अशा लाटेत वाहून जात नाहीत, ते सच्चेपणाने साहित्य-निर्मिती करतात असेही गाडगीळ म्हणतात. लाटेबरोबर वाहून जाण्याची वृत्ती महाराष्ट्राच्या स्वभावातच नाही असे गाडगिळांचे निरीक्षण आहे. (गाडगिळांचे हे निरीक्षण महत्त्वाचे आहे. महाराष्ट्राने कधी कुणाला पूर्णपणे, आंधळेपणाने स्वीकारले नाही. गांधी, नेहरूंचे राजकारण महाराष्ट्राने साशंकतेनेच पाहिले. महाराष्ट्रात व्यक्तिमहात्म्याचे राजकारण फार काळ चालत नाही. दुसऱ्याचे दोष शोधण्याच्या वृत्तीमुळे मराठी माणूस सहसा भाबडेपणा करत नाही. मराठी माणूस फारसा परंपरावादी नाही; जास्त व्यवहारवादी आहे. म्हणूनच संतवाङ्‌मयाची बंडखोरी त्याने स्वीकारली पण संतांना त्यांच्या काळात टीका, बहिष्कार या व्यवहाराचीही चव दिली. भारावलेपण हे महाराष्ट्राच्या स्वभावात नाही; तो अधिक उपयुक्ततावादी आहे. मराठी वाङ्‌मयाच्या मध्यम प्रतीमागे हेही एक कारण आहे. अर्थात् येथेही महाराष्ट्र हा एक वर्ग कल्पून त्याबाबत सर्वसाधारण मते मांडणे धोक्याचेच आहे हे लक्षात घ्यायला हवे.)

गंगाधर गाडगिळांनंतर साहित्याची स्वायत्तता उचलून धरून बांधिलकीवर टीका करणारे दुसरे अध्यक्ष म्हणजे व्यंकटेश माडगूळकर (१९८३). 'माणदेशी माणसं' ही व्यक्तिचित्रे प्रथमत: पैशासाठी लिहिली. तळागाळातल्या लोकांची स्थिती वेशीवर टांगण्यासाठी लिहिली नाहीत असे माडगूळकर प्रांजळपणे म्हणतात. आपण समाजकार्य करणारा कार्यकर्ता नव्हतोच असेही ते सांगतात. 'बनगरवाडी' ही कादंबरी समाजशास्त्राचे विद्यार्थी अभ्यासतात म्हणजे तिच्यातील सामाजिक दस्तऐवज विश्वासार्ह असणार, पण लेखक त्यासाठी कादंबरी लिहित नाही. (येथे सरदार काय म्हणतील ? साहित्याची निर्मिती ही बांधिलकीच्या भावनेतून होत नाही असं माडगूळकर म्हणतात. बांधिलकी असली की साहित्य निर्माण होते हाही भ्रम. म्हणजे साहित्य निर्मितीच्या प्रत्यक्ष प्रक्रियेशी बांधिलकीचा संबंध नाही. सरदारांनाही हे मान्य व्हावे. फक्त तशी जाण लेखकाला हवी असा त्यांचा आग्रह. पण मग समाज-जीवनाचीच का, अर्थव्यवहार,

व्यापार, उद्योगधंदे, राजकीय उलाढाली या सगळ्यांची जाण असणे चांगलेच नाही का ?) फुलाचं फुलणं ही नैसर्गिक प्रक्रिया आहे; साहित्य-निर्मिती तशीच. साहित्याला प्रयोजन असे नसते. जगात कित्येकांची निर्मिती-क्षमता उजेडात येत नाही. (टॉमस ग्रेने म्हटल्याप्रमाणे कितीतरी रत्ने सागरतळी तशीच राहतात. कितीतरी फुले आडरानी फुलतात पण कुणाच्या दृष्टीस पडत नाहीत.) पण त्याने निर्मिती थांबत नाही. आपण स्वत: मात्र पैशासाठी लेखन करण्यास उद्युक्त झालो असे माडगूळकर कबूल करतात. (अन् पुढे प्रसिद्धीसाठी.) समाजातील प्रश्न, त्यातील संघर्ष याला लेखक साक्षी असतोच. पण तो कोणतेही झेंडे खांद्यावर घेत नाही. पु. ल. देशपांड्यांप्रमाणे माडगूळकरांना लेखकाला इतर साहित्य वाचून (म्हणजे इंग्रजीच.) साहित्य लिहिण्याची उर्मी येते असे वाटते. साहित्यिकानं पुस्तके, माणसे आणि निसर्ग वाचावेत. माडगूळकरांना जात, प्रांत, भाषा याद्वारे विभागणी करणे मान्य नाही. निसर्गाप्रमाणे सर्व मानवी समाज एकच आहे असे ते म्हणतात. त्यामुळे संपूर्ण मानवी समाजाशीच साहित्यिकांची बांधिलकी असते (म्हणजे काय ? माडगूळकर हे स्पष्ट करत नाहीत. लेखक सर्व मानवी समाजाचं देणं लागतो, तो सर्व मानवी समाजाच्या सुखदु:खाशी निगडीत असतो हे व्यावहारिक पातळीवर खरे नाही. माडगूळकर 'बनगरवाडी' लिहू शकले. गॉर्कीची 'आई', स्टेनबॅकची 'ऑफ माइस अॅण्ड मेन' लिहू शकले नाहीत ते का ? दूरचे जाऊ द्या. आसाममधील आदिवासीचे, बिहारमधील खाणकामगारांचे दु:ख त्यांना कसे समजणार ? संपूर्ण मानवी समाजाची माहिती व त्याच्याशी संपर्कही नसताना अखिल मानव जातीच्या सुखदु:खांबाबत लेखकाला संवेदनशीलता असते असे म्हणणे जरा जास्तच आहे. सरदार लेखक ज्या समाजात जन्मला त्या समाजाबाबतच्या त्याच्या कर्तव्याची जाण याला बांधिलकी मानून बांधिलकीची व्याप्ती अगदी नेमकी व स्पष्ट करतात.) भाषा हे सामाजिक विनिमयाचे साधन आहे, तीच भाषा साहित्याचे माध्यमही असते. यातूनच साहित्याच्या मागे बांधिलकीचं टुमणं लावलं जातं असं माडगूळकर म्हणतात. रंग, रेषा हे चित्रकलेचं माध्यम; त्याचा सामाजिक विनिमयाशी संबंध नाही. म्हणून माकडाचं चित्र 'मराठी' वगैरे नसते. साहित्यानं मात्र 'मराठी' असावे, त्याचे मराठी समाजाशी नाते असावे असा आग्रह धरला जातो. (थोडक्यात संस्कृतिबद्ध अशी भाषा साहित्य निर्मितीमधे मात्र विशिष्ट संस्कृतीच्या पलीकडे जाते, विशिष्ट समाजाच्या पलीकडे जाते असा माडगूळकर दावा करतात. पण भाषा संस्कृतीची बंधन ओलांडू शकते, भाषेद्वारे कळणाऱ्या गोष्टी या संस्कृतीच्या रंगाने नटलेल्या नसतात हा भ्रम असण्याची शक्यता आहे. शेवटी 'वैश्विक', 'अखिल मानव जाती', 'मानवी समाज', 'माणूस' या संकल्पनाही भाषाबद्ध आहेत. माडगूळकरांच्या भूमिकेमधून असे दोन प्रश्न उभे राहतात. एक, भाषा—मग ती साहित्याची का असेना—संस्कृतीची बंधने खरोखरच झुगारू शकते का ? आणि दोन, विशिष्ट समाजाचा घटक असणारा साहित्यिक माणूस अखिल

मानव जातीच्या सुखदुःखांशी खरेच तन्मय होऊ शकतो का ? साहित्य हे अखिल मानवजातीसाठी मानले तर बांधिलकीचे पाश गळून पडतील हा माडगूळकरांचा समज म्हणूनच कदाचित् केवळ शाब्दिक चलाखी ठरू शकेल.)

बांधिलकी कार्यकर्त्याला असते, साहित्यिकाला नसते असे माडगूळकर म्हणतात. एक प्रकारे साहित्याची स्वायत्तमूल्ये मानून माडगूळकर कलावादी भूमिका स्वीकारतात. साहित्याचा जर सामाजिक प्रश्नांशी, सामाजिक संघर्षाशी, सामाजिक परिवर्तनाशी बांधलेपणा नसला तर मग साहित्य हवेच कशाला ? या प्रश्नाला माडगूळकरांचे उत्तरही मोघम आहे. साहित्य वाचणे, ते आवडणे किंवा ते निर्माण करणे ही माणसाची एक चांगली सवय आहे असे ते म्हणतात. चांगल्या सवयी नसल्या तर माणूस उघडा पडेल. (पडला तर पडला, काय बिघडते ? या प्रश्नाला माडगूळकर काय उत्तर देतील ? सवयीची वस्त्रे ही अखेर सांस्कृतिकच ना ? म्हणजे येथे संस्कृती मानायची पण साहित्य मात्र त्यापलीकडे जाते असेही म्हणायचे यात विरोधाभास आहे. चांगल्या सवयींनी माणूस झाकला जातो हे एक गोधळात टाकणारे रूपक आहे. साहित्यिक म्हणून साहित्यिकाला साहित्य-निर्मिती चांगली सवय वाटणे स्वाभाविक आहे. पण तसे सर्वांनाच वाटणार नाही आणि सर्वांनाच वाटले तर साहित्य-निर्मितीची व्याख्या बदलायला लागेल.)

राजकारण आणि समाजकारण यांचे प्रचंड वर्चस्व आले की साहित्यात वेठबिगार पद्धती सुरू होते असे माडगूळकर म्हणतात. (बांधिलकी मानणे म्हणजे बाह्य दडपण मानणे अशी माडगूळकरांची कल्पना दिसते. मध्यमवर्गीय साहित्यावर ज्या पद्धतीने इतर वर्गीयांनी टीका केली त्याचा हा परिणाम असावा. त्या अर्थाने बांधिलकीबाबत आक्षेप घेता येईल. सरदार यालाच समूहवादी भूमिका म्हणतात. सरदार व्यक्तिवादाकडून स्वयंशासनाकडे वळतात. या स्वयंशासनाचा एक धागा म्हणजे बांधिलकी. सरदारांची बांधिलकीबाबतची कल्पना माडगूळकरांपेक्षा जास्त प्रगल्भ व संयमित दिसते.)

निर्वाणीच्या वेळीही साहित्याचा साधन म्हणून उपयोग करू नये का ? असा एक महत्त्वाचा प्रश्न माडगूळकर विचारतात. त्याला त्यांचे उत्तर 'करावा' असे आहे. पण अशा साहित्याची गुणवत्ता कमी असणार अशी त्यांची खात्री आहे. कारण साधनभूत साहित्य हे तात्कालिक प्रश्नांचा विचार करते. ते प्रश्न संपले की त्या साहित्याची उपयुक्तताही संपते. (वरेरकरांची 'सोन्याचा कळस', 'हाच मुलाचा बाप' किंवा रांगणेकरांचे 'कुलवधू' अशी नाटके आज कोण करेल आणि कोण पाहील ?) कुसुमाग्रजांची 'गर्जा जयजयकार' ही कविता प्रचार गीतापेक्षा वेगळी ती या अर्थाने असे उदाहरण माडगूळकर देतात. (नीटपणे विचार केला तर माडगूळकरांनी दिलेल्या उदाहरणातच साहित्य हे समाजनिष्ठ-खरे म्हणजे ती ती संस्कृती-निष्ठ-असते हे दिसेल. 'संहारक काळी, तुज देती बळीच आव्हान', 'सरणावरती आज आमुची

पेटताच प्रेते', 'आता कर ओकारा, तांडव गिळावया घास' यांचा परिणाम युरोपियन संस्कृतीमधल्या माणसावर काय होईल ? अखिल मानव जातीला या ओळी काय आवाहन करणार ? विशिष्ट कालसापेक्षता, स्थलसापेक्षता यांच्या आधारावरच कलाकृतीचा काळातील, स्थलातील आशय जाणवू शकतो असे सरदार म्हणतात ते अशा उदाहरणातून जाणवते.)

साहित्याचं वर्गीकरण मध्यमवर्गीय, ग्रामीण, दलित असे समाजवर्णनानुसार होते तसेच आविष्काराच्या उत्क्रांतीनुसारही करता येते असे म्हणून माडगूळकर नियमानुसारी, अद्‌भूतरम्य, वास्तववादी, अस्तित्ववादी, मानववादी, अतिवास्तववादी असे वर्गीकरण करतात. (यात उत्क्रांती काय हा प्रश्नच आहे.) रा. श्री. जोगांनी (१९६०) दुसऱ्या पायरीवर अशाच स्वरूपाचे वर्गीकरण केले आहे) ग्रामीण साहित्य व दलित साहित्य हे वास्तववादी साहित्य आहे असे माडगूळकरांना वाटते. मराठी वाङ्मय अद्याप वास्तववादाच्या पुढे गेले नाही असे त्यांना वाटते. (माडगूळकर बांधिलकी झटकून टाकताना कलेची स्वायत्तता आणि वैश्विकता हे जुने मुद्देच मांडतात. पण त्यात कच्चे दुवेही ठेवतात. दुसरीकडे त्यांना समीक्षा 'पाण्यावरची अक्षरे' अशा स्वरूपाची वाटते. मराठी साहित्यिकात दिसणारी आत्मप्रौढी फार जुनी आहे. केशवसुत, मर्ढेकर यांच्यातही ती दिसते.)

शंकरराव खरात (१९८४) स्वत: दलित असल्याने दलितांच्या जीवनाचा अनुभव आपल्याला आहे असे म्हणतात. ते स्वत: कार्यकर्ता असल्यामुळे दलित समाजातील इतरांचे अनुभवही त्यांना समजले. मध्यमवर्गीय लेखकाचे दलित जीवनाचे अनुभव काल्पनिक असतात असा त्यांचा आक्षेप. (खरात स्वत:चा अनुभव, कामातून येणारा इतर दलितांचा अनुभव व मध्यमवर्गीय लेखकाचा काल्पनिक अनुभव असा फरक करतात. प्रश्न असा आहे की कामातून येणारा इतर दलितांचा अनुभव लक्षात घेऊनही त्यांनी साहित्य लिहिले. जे खरातांना जमले ते मध्यमवर्गीय लेखकाला जमणार नाही कशावरून ? मध्यमवर्गीयाला मात्र इतरांचे अनुभव नाहीच समजणार हे कसे ? अनुभव समजायला जात लागते ? याचा एक युक्तिवाद असा करता येईल की जातीचा दृष्टिकोन आला तरच जातीचा अनुभव घेता येतो. त्रयस्थ दृष्टिकोन उपयोगाचा नाही. हे मान्य करणे अवघड आहे. दुसरे असे की त्रयस्थ दृष्टिकोन हा कोणत्याही अनुभवाबाबत त्याज्य मानणे चुकीचेच आहे उदाहरणार्थ, आसाम मधल्या तिवा जमातीत लहान मुलावर वाघाने हल्ला केला तर ती देवाची शिक्षा आहे असे मानले जाते त्या मुलावर उपचार होत नाहीत आता या अनुभवातील [illegible] त्रयस्थ दृष्टिकोनाविना कळणारच नाही. तिवा दृष्टिकोनातूनच हा अनुभव घेण्याचा आग्रह मूर्खपणाचा होईल. 'ज्याचं जळतं त्यालाच कळतं' ही म्हण व्यवहारात कदाचित् काही प्रसंगी खरी असेल पण साहित्याच्या क्षेत्रात ती खरी ठरली तर साहित्याचं प्रयोजनच उरणार नाही.)

शंकरराव खरातांचा सारा भर प्रत्यक्ष अनुभवावर आहे (अनुभवाच्या या

स्तोमाची हेटाळणी दुसऱ्या पायरीवर अनेक अध्यक्षांनी केली आहे.) खरात स्वतः मात्र गावातले व गावकुसाबाहेरचे जीवन या दोहोचा अनुभव आपल्याला आहे असा दावा करतात. अनुभवाविना साहित्य संभवत नाही. (पु. ल. देशपांडे, व्यंकटेश माडगूळकर उलट साहित्य वाचूनही साहित्य लिहिता येते असे म्हणतात.)

दलित साहित्याची गरज काय ? याचे उत्तर आंबेडकरांनीच दिले आहे असे खरात म्हणतात. काय आहे हे उत्तर ? दलितांनी आपली लेखणी आपल्या प्रश्नापुरतीच मर्यादित करू नये, उपेक्षितांचे मोठे जग आहे, त्या उपेक्षितांचे जीवन साहित्याद्वारे उन्नत केले पाहिजे असे आंबेडकर म्हणतात. यातच खरी मानवता आहे. (खरे म्हणजे आंबेडकर साहित्याचा साधन म्हणून काय वापर करावा याविषयी बोलतात. ते येथे दलित साहित्य वेगळे काढून त्याविषयी बोलत नाहीत.)

पाश्चिमात्य देशात समाजरचना वर्गपद्धतीवर आधारलेली आहे तर भारतात ती जातिव्यवस्थेवर आधारलेली आहे. त्यामुळे भारतात कलाकृतीच्या अनुभवाचा आशय हा जातिविशिष्ट आहे. प्रत्येक जातीचा अनुभव वेगळा, त्याची कलाकृती वेगळी. म्हणून दलित साहित्य हे वेगळे मानावे लागेल. (पाश्चात्य देशात कलाकृतीच्या अनुभवाचा आशय वर्गविशिष्ट असतो का ? अनुभवाचा आशय म्हणजे काय ? कलाकृतीचे आस्वादनही जातिविशिष्ट होते का ? असे प्रश्न याबाबत विचारता येतील.) मध्यमवर्गीय लेखकांचे दलित जीवनावरचे लेखन हे निरीक्षण व सहानुभूतीवर आधारित. त्यांना दलित जीवनाचा प्रत्यक्ष अनुभव नाही. त्यांनी प्रस्थापित रुढीविरुद्ध आवाज उठवला नाही. आम्हा दलितांचे दुःख त्यांना कळणारच नाही असे खरात म्हणतात. दलित साहित्य हा 'मी' चा शोध आहे. दलित हे इतर समाजापेक्षा वेगळे असल्याने नागर, ग्रामीण साहित्यापेक्षा दलित साहित्य वेगळे असणारच.

(सरदारांपासून तो खरातांपर्यंतच्या चर्चेत दलितांचा अनुभव विशिष्ट आहे आणि इतरांना त्याची कल्पना येणार नाही असे एक सूत्र आहे. यामागे अनुभव हा प्रत्यक्षच हवा हा हट्ट आहे. या हट्टामागे आमच्या जीवनावर इतरांनी लुडबूड करून लिहू नये अशी एक सूचना आहे. दलित जीवनावरचे भाष्यकार फक्त आम्हीच. बरेचदा अशी शंका येते की स्पर्धेच्या भीतीमुळे हे सवतेसुभे काढण्याचे तंत्र तर निपजले नसेल ? दलित साहित्याची उपेक्षा करू नका, दलित साहित्यिकांनाही साहित्यिक माना येथवर ठीक आहे. पण आम्हा दलितांसारखे लेखन दलितेतरांना येणारच नाही हा दावा फोल आहे. स्वतःचे साहित्यिक अस्तित्व आवर्जून सागण्याचा प्रयत्न करण्याचा तो एक भाग असावा. दुसरी एक शंका अशी की साहित्यातून अनुभवाला येणारे दुःख आणि व्यक्तीचे तात्कालिक दुःख यात फार मोठी तफावत होते त्यावेळी साहित्य हे कुचकामी वाटते. अर्थात् हे साहित्य मध्यमप्रतीचेच ! मध्यमवर्गीय साहित्य दलितांना त्यामुळे कुचकामी वाटत असावे आणि ते सहाजिकही आहे. साहित्यात साहित्यिकाचा

'मीपणा' राहात नाही असे रेगे म्हणतात. अभिजात साहित्यात साहित्यिक 'मी' च्या पलीकडचे पहातो. उच्च साहित्यात व्यावहारिक 'मी' वर मात करून केवळ संवेदनशील साक्षी अशा स्वरूपाचा 'मी' ठरतो. व्यावहारिक 'मी' न विसरण्याचा दोष दलित साहित्य, स्त्रीवादी साहित्य यात राहतो. आवाज उठवणे, नवसमाज निर्मिणे, भवितव्य घडवणे अशी सामाजिक कामे आपण करतो असे एक खोटे समाधानही असा 'मी'पणा असणारा साहित्यिक मानू लागतो. हे सर्व शक्य आहे आणि ते घडतही आहे. पण ते साहित्य मध्यम प्रतीचे वा भरड साहित्य याच स्वरूपात राहते. तात्कालिकतेखेरीज शाश्वतता नाही असे सरदार म्हणतात. ते खरेच. पण केवळ तात्कालिकता शाश्वतता गाठू शकणार नाही हेही खरे. सरदारांनी यादृष्टीने दलित साहित्यिकांना दिलेल्या धोक्याच्या सूचना महत्त्वाच्या आहेत.)

दलित साहित्य सामाजिक बांधिलकी मानते आणि ते जीवनवादी आहे असे खरात म्हणतात. (मुळात नागर साहित्य हे कलावादी असा आरोप होता. त्याने सामाजिक बांधिलकी मानावी हा आग्रह होता. आता दलित साहित्य बांधिलकी मानते हे गृहित पुढे आले. मध्यमवर्गातील कलावाद विरुद्ध जीवनवाद हा आता मध्यमवर्गाचे वाङ्मय विरुद्ध दलित वाङ्मय या स्वरूपात मांडला गेला. सरदार तर सर्व अध्यक्षांनी बांधिलकी मानलीच आहे असे म्हणतात. म्हणजे पूर्वी बांधिलकी होतीच. अशा परिस्थितीत कलावाद हा अल्पकाळचा, अल्प लोकांचा असायला हवा. त्याच्या विरुद्ध समस्त दलित वाङ्मयाने दंड थोपटून उभे राहण्याचे कारण काय असावे ? की कलावाद क्षीण नव्हताच ?) दलित साहित्यातील व्यक्तीचे दु:ख हे दलित समाजाचे दु:ख असल्याने दलित साहित्य समाजाभिमुखी आहे असे म्हणतात. (याचा एक अर्थ असा की दलित समाजात सर्वच व्यक्ती सारख्या आहेत. सामाजिक रचनेने त्यांचे व्यक्तित्त्व दबले गेल्याने व्यक्तिविभिन्नता त्यात संभवत नाही. हे खरेही असावे. भरडल्या जाणाऱ्या समाजात एक प्रकारची बधिरता येऊन व्यक्ती साचेबंद होते. या अर्थाने दलित व्यक्तीचे दु:ख सर्व दलित समाजाचे होते. अन्यथा कोणते व्यक्तिदु:ख समाजाचे प्रतिनिधित्व करणारे दु:ख व कोणते खास व्यक्तिनिष्ठ असे दु:ख हे ठरवण्याच्या कसोट्या द्याव्या लागतील. कलाकृतीतली व्यक्ती आणि तिचे वास्तवातील व्यक्तिप्रकाराशी साधर्म्य यावर किती भर द्यायचा हा प्रश्न आहेच )

दलित साहित्याला समीक्षेचे इतर निकष लावू नयेत दलितांच्या अनुभवाचा उत्कट आविष्कार दलित साहित्य करते की नाही एवढा एकच निकष त्याला लावावा असे खरात म्हणतात. (परिणामत: कोणत्याही अनुभवाचे लेखन हे साहित्य ठरेल. दलित साहित्यात हे होतेही आहे.) मराठेशाहीतील शाहिरी, लावणी, तमाशा, वग ही दलित साहित्याची परंपरा आहे असे म्हणतात. (एकीकडे सरदार सामाजिक अन्यायाखाली दलित दबले गेले होते, शिक्षण नसल्याने त्यांच्या दु:खाला वाचा फुटत नव्हती,

स्वातंत्र्यानंतर शिक्षणामुळे ते जागृत होऊन साहित्य लिहू लागले असे म्हणतात तर दुसरीकडे खरात पेशवाई काळापासून दलित साहित्य निर्माण करत होते असे म्हणतात. यातले खरे काय ? प्रचंड शोषण आणि दबाव असताना माणसे साहित्य लिहिणे शक्य नाही. बंडखोरी होणे किंवा करणे याचाच अर्थ प्रस्थापित सत्ता झुगारण्याइतके बळ असणे. शाहिरी करणारे किंवा लावण्या रचणारे दलित कवी हे सरदार म्हणतात त्याप्रमाणे वंचित आणि शोषित असण्याची कितपत शक्यता आहे ? भारतात जातिविशिष्ट साहित्य आहे असे खरात म्हणतात. याचाच अर्थ सर्वसाधारण समाजरचनेत एखादा समाज तळाला असला तरी त्या समाजात अंतर्गत स्वातंत्र्य असते असाच होतो. साम्यवादी विचारसरणीत भांडवलदार, त्यांचे क्रौर्य, शोषण, पिळवणूक या 'संकल्पना' आहेत, ती वास्तविके त्याच रूपात असतील असे नाही. अनेक मराठी विचारवंत समाजरचनेविषयी जेव्हा बोलतात तेव्हा ती समाजरचनाच मुळी त्यांनी कल्पनेने उभी केलेली असते, त्याला भरभक्कम सामाजिक दस्तऐवजाचा पुरावा फारसा नसतोच.)

समाज समपातळीवर आला की नागर-दलित-ग्रामीण यातले अंतर कमी होईल असे खरातांना वाटते. शहरांमधे आज 'वर्ग' वाढत आहेत—कामगार वर्ग, मजूर वर्ग वगैरे. यातून वर्गीय साहित्य निर्माण होईल. (पण दलित साहित्य तर प्रामुख्याने शहरातून—विशेषत: मुंबईतून—उदयास आले; जातिबद्ध ग्रामीण भागातून नाही. हे लक्षणीय आहे. सोयीचे होते तेव्हा आणि संघटितपणाचा फायदा होणार असतो तेव्हा शहरात जातही वापरली जाते, टाकली जात नाही. दुसरे असे की जातीच्या संदर्भात साहित्याचा विचार करताना सरदार काय किंवा खरात काय प्रस्थापित साहित्याचा उल्लेख 'मध्यमवर्गीय' साहित्य असा करतात. मध्मयवर्गीय साहित्याची हेटाळणी अगदी पहिल्या पायरीवर सुद्धा होते. पण यात जातीचा उल्लेख होत नाही. म्हणजे हे मध्यमवर्गीय साहित्य हेच प्रस्थापित म्हणून पहिल्यापासून मिरवले जात होते, त्यावर टीका होऊनही फारसा परिणाम झाला नाही. दलित साहित्याने साहित्याचीच एक नवीन परंपरा मांडावी असा विचार तिसऱ्या पायरीवर आला पण प्रस्थापित साहित्य तसेच राहिले.) शंकरराव खरात शेवटी प्रस्थापित विरुद्ध दलित यात समन्वयाची आवश्यकता आहे अशी भूमिका घेतात.

शंकर पाटील (१९८५) दलित वाङ्मयाविषयी प्रत्यक्ष असे बोलत नाहीत. पण अनुभवाचे टुमणे त्यांना मान्य नाही. कलाकाराची दृष्टीच वेगळी असते. त्याला वेगळेच काही दिसते. ते व्यक्त करण्याचे 'भाषा' हे केवळ माध्यम. मुळात 'दिव्यदृष्टी', हेच साहित्याचे कारण. लेखनाची धुंदी असली की अनुभवाचा तुटवडा नसतो. दलित साहित्यिक जे भोगलं, अनुभवलं तेवढेच लिहितात. मग त्यांचे लेखनच थांबते. (दलित आत्मचरित्रकारांचे प्रत्यक्षात असे झाले आहे हे खरे.) अनुभवांचा वेगळेपणा न संपणारा. स्वीच एकच असला तरी त्यावरून पडणारा उजेड कमी-जास्त, बहुरंगी असू शकतो.

अनुभव प्रत्यक्षच घ्यायला पाहिजे असे मुळीच नाही. (शंकर पाटील हे ग्रामीण साहित्याचे लेखक. त्यांचा हा विचार थेट मध्यमवर्गीय. कलावाद हा मध्यमवर्गाचा हा भ्रम आहे हे कळून यावे. अनुभव विशिष्ट पातळीवरून घेणे, तो व्यक्त करणे, आणि ती अभिव्यक्ती वाचकाला आपलीशी वाटणे, ही साखळी मध्यमवर्गीय साहित्य आणि दलित वाचक यात जुळली नाही हा खरा वादाचा पाया आहे. मध्यमवर्गाची 'दिव्यदृष्टी' दलितांना खोटी दृष्टी किंवा अपुरी दृष्टी वाटली त्याचे काय ?)

विश्राम बेडेकर (१९८६) अनुभवांचा वेगळेपणा मानतात, अनुभवाकडे बघण्याच्या दृष्टिकोनातील भेदही मानतात. पण लेखन करताना खरा साहित्यिक लिंगभेद, जातिभेद यांची जाणीव ठेवून लिहू लागला तर ते साहित्य प्रचारकी किंवा बांधिलकीचे होते. बेडेकर बांधिलकीचे साहित्य म्हणजे प्रचारकीचे साहित्य असे स्पष्टपणे म्हणतात. मात्र दलित साहित्य हे देशी वाणाचे साहित्य आहे असेही ते म्हणतात (यात अर्थातच विसंगती आहे. स्वत:च्या दलितत्वाची पूर्ण जाण ठेवूनच—किंबहुना त्याने पेटून उठतच—दलित साहित्यिक लेखन करतो. मग ते बेडेकरांच्या विचारानुसार प्रचारकी व्हायला हवे. प्रचारकी साहित्य देशी वाणाचे आहे असे म्हणण्यात प्रचारकीपणाचा दोष कमी होतो काय ?) दलित साहित्यिकांनी मन विकसित करावे, अभ्यास करावा असा सरदारांप्रमाणे बेडेकरांचाही सल्ला आहे. बौद्ध धर्माने अस्पृश्यता नाकारली, आधुनिक काळात हिंदू समाजातील अस्पृश्यतेला कंटाळून दलितांनी बौद्ध धर्म स्वीकारला. पण मग बौद्ध धर्मीय जपानमधे अस्पृश्यता का राहिली असा प्रश्न बेडेकर विचारतात. घाणीमधे काम करणाऱ्यांना भारत, युरोप व जपान या सर्वच ठिकाणी अस्पृश्य मानले गेले. औद्योगिक क्रांती पूर्ण झाल्यावर युरोपिअन समाजातील अस्पृश्यता गेली. (बेडेकर येथे एक वेगळा विचार मांडताहेत. अस्पृश्यता हा हिंदू धर्माचा अविभाज्य भाग असा एक समज, आंबेडकरांनी तो प्रखरपणे मांडला. यात अस्पृश्यतेची सांगड धर्माशी घालण्यात आली. बेडेकरांच्या मते ती सामाजिक अविकसिततेशी जोडली आहे. औद्योगिकरण पूर्ण झाले की ती आपोआप जात )

कोणत्याही साहित्यात जेव्हा नवचैतन्य येते, नवी लाट येते तेव्हा धसमुसळेपणा होतोच. दलित साहित्यातील सुरुवातीचा क्षोभ हा असा भांबावून टाकणारा होता असे बेडेकर म्हणतात.

वसंत कानेटकरांना (१९८८) आजच्या सामाजिक अध:पतनावरची प्रतिक्रिया म्हणजे दलित साहित्य आहे असे वाटते (अर्थात् लाचलुचपत, भ्रष्टाचार, निर्घृण खून, चंगळवादासाठी काहीही करण्याची तयारी वगैरे अध:पतनाचा संबंध दलित साहित्याशी कसा जोडणार हे स्पष्ट होत नाही. उच्चवर्णियांनी दिलेल्या माणुसकीहीन वागणुकीवरची प्रतिक्रियाच दलित साहित्यात प्रामुख्याने येते. कानेटकरांचे विधान हे कदाचित् शाब्दिक चलाखीचे असावे; त्यात विचार नाही.) अशी तीव्र प्रतिक्रिया स्त्री-मुक्ती चळवळीमधेही

दिसते असे कानेटकर म्हणतात. पण स्त्री-मुक्ती चळवळ पांढरपेशा स्त्रियांपुरतीच मर्यादित आहे तर दलित साहित्य पुरुष लेखकापुरतेच प्रामुख्याने मर्यादित आहे. 'दलित स्त्रियांच्या चाबकाचे फटकारे दलित पुरुषांनाही लागतील' अशी आशा त्यांना वाटते. (यात 'वट्ट निघाल्याचे' समाधान मानायचे एवढेच ?)

दलितांचे सौदर्यशास्त्रही वेगळे हे मात्र कानेटकरांना मान्य नाही. (दलित साहित्याने मध्यमवर्गीय समीक्षेच्या कसोट्यांना आव्हान दिले असे यापूर्वी शंकरराव खरात म्हणाले. त्याचा अर्थ मध्यमवर्गीय समीक्षेला वैचारिक विस्ताराची आवश्यकता होती एवढाच आहे.) कोणतेही शास्त्र विद्रोहातून वा विद्वेषातून जन्माला येत नाही असे कानेटकर म्हणतात. १९४२ मधे साहित्य क्रांतीच्या कल्पनेने झपाटून गेले (हे खरे नाही हे आपण पहिल्या पायरीवर पाहिलेच.) कुसुमाग्रजांसारखे कवी या क्रांतीचे उद्‌गाते. इतर सामान्य कवीनी त्यांचे अनुकरण केले पण त्यातील कृत्रिमता लपू शकली नाही. स्वातंत्र्यानंतर 'वैफल्या'चे पर्व आले. मर्ढेकर त्याचे उद्‌गाते. इतर सामान्य कवी त्यांचेच अनुकरण करत (दुसऱ्या पायरीवर अनेक अध्यक्षांनी त्याबाबत तक्रार केली आहे) म्हणजे खरे कवी व कांगावखोर कवी यातला फरक सौदर्यशास्त्राला दाखवावाच लागेल. क्रांती, वैफल्य हे विषय होते, साहित्याची मूल्ये नव्हती. त्याप्रमाणेच दलितांचे दु:ख, ग्रामीणांचे अनुभव हे विषय आहेत; ती मूल्ये नव्हेत. दलित साहित्यातील चांगल्या-वाईटाची प्रतवारी सौदर्यशास्त्राला लावावीच लागेल असे कानेटकर म्हणतात. (दलितांचा वादविषय सौदर्यशास्त्र चालू ठेवावे की नाही हा नाहीच. त्यांना ही समीक्षाच अमान्य आहे. त्यामुळे कानेटकरांचे हे म्हणणे फारसे उपयुक्त नाही. शंकरराव खरातांनी पांढरपेशीय समीक्षेला ध्यानात घेण्यासारखे काही चांगले प्रश्न विचारले आहेत. कानेटकरांनी त्यांना उत्तरे देणे सयुक्तिक ठरले असते.)

लेखकाची बांधिलकी त्याच्या व्यक्तिगत अनुभवाशी असते अशी एक नेहमीची मखलाशी कानेटकर करतात. मात्र लगेचच अनुभवाची मुळे समाजातच असतात व दलित साहित्याने दु:खवेदनेच्या आधारेच सामाजिक बांधिलकी साहित्यात आणली असेही कानेटकर म्हणतात. साहित्य संमेलनाबरोबर न्यायमूर्ती रानड्यांनीच सुरू केलेली सामाजिक परिषदही भरवली तर बरे असे कानेटकर म्हणतात.

के. ज. पुरोहितांना (१९८९) दलित साहित्य आक्रोशी, कच्चे करकरीत वाटते. कलात्मकतेला आवश्यक असलेली तटस्थता व रचनासौदर्य त्यात नाही. मराठी साहित्याच्या मूळ प्रवाहापासून फुटून निघण्याची वृत्ती त्यात आहे पण कालांतराने ते मराठी साहित्याच्या प्रवाहातच मिसळेल असे पुरोहितांना वाटते. बंडखोरी ही तात्पुरती असते; प्रस्थापित व्यवस्था तीही सामावून घेते. (हे चांगले आहे असे पुरोहितांना वाटते. पण प्रस्थापितांची ही खेळी असते असे दलितांना वाटते त्याचे काय ? ज्ञानेश्वर, तुकाराम या संतांना वाळीत टाकणाऱ्या प्रस्थापित व्यवस्थेने ते टिकून राहताच त्यांना

हुषारीने मुख्य प्रवाहातच स्थान दिले याचे वैषम्य आजही काही विचारवंतांना वाटते. समन्वय हा प्रस्थापितपणामधे बदल असतो की गिळंकृत करण्याचा पवित्रा असतो ? हा प्रश्न वादाचाच आहे.)

दलित साहित्यात इतरत्र क्वचित आढळणारा असा लेखक व वाचक यातील जिव्हाळ्याचा संबंध पुरोहितांना मोलाचा वाटतो. दलित साहित्य काळजालाच हात घालते. (सरदार ज्याला जीवनाशी संबद्धता आणि उत्कटता म्हणतात त्याचाच हा भाग आहे.)

पुरोहित ग्रामीण किंवा जनवादी साहित्यावर टीका करतात. हे साहित्य काल्पनिक शत्रूच्या अंगावर धावून जाते. कवीची समाजाशी बांधिलकी नसेल तर त्याचा उपयोगच काय ? असे म्हणून प्लेटो त्याच्या आदर्श राज्यव्यवस्थेतून कवीची हकालपट्टी करतो. साहित्यातील सामाजिकतेचा आग्रह हा राजकारणासाठीच केला जातो. (पण हा आग्रह दलित साहित्यिक जास्त आणि उघडपणे करतात. पुरोहित दलितांना वगळून ग्रामीण साहित्यावरच का आक्षेप घेत असावेत ?) मात्र लगेच दलित व ग्रामीण साहित्यिकांना निदान साहित्याविषयी आस्था आहे असा समाधानाचा सूरही येतो. इतरत्र साहित्याविषयी आस्थाच नाही

कौतुक करत करत हळूच एक धपाटा मारायचा यासारखी दलित साहित्याबाबतची भूमिका दांडेकर, पुरोहित यांच्याप्रमाणे मधु मंगेश कर्णिकही (१९९०) घेतात. साहित्याद्वारे उपेक्षितांचे जीवन उन्नत करण्यास झटा हा डॉ. आंबेडकरांचा सल्ला दलित साहित्यिकांनी मानला असे कर्णिक म्हणतात. त्यांनी साहित्याचा साधन म्हणूनच वापर केला. दलित साहित्य व ग्रामीण साहित्य या एकाच झाडाच्या दोन फांद्या आहेत. पण राजकीय आणि सामाजिक वातावरणाचा परिणाम म्हणून आपण या मूळ झाडापासून वेगळ्या आहेत असे मानू लागलो (मूळ झाडापासून की एकमेकाहून ?) या साहित्याची उपेक्षा प्रस्थापित समीक्षेने केली. परिणामत: प्रस्थापित सौदर्यशास्त्रच नको असे म्हणत दलित विचारवंत कौरुप्यशास्त्र रचण्याच्या टोकापर्यंत गेले. मात्र लगेच काही समीक्षकांनी दलित साहित्याच्या समीक्षेत त्याची भलावण केली असे म्हणत असतानाच कर्णिक यात समीक्षेपेक्षा कौतुक अधिक होते असे म्हणतात. आता दलित व ग्रामीण साहित्याचा विचार गंभीरपणे केला पाहिजे असे म्हणून कर्णिक आग्रह व अभिनिवेश चळवळीला योग्य असला तरी साहित्यनिर्मितीला नाही असे म्हणतात. अभिनिवेश आता पुरे झाला. याची वकिलीही फार झाली. नकार व विद्रोह ही काही काळ वापरण्याचीच हत्यारे आहेत. विशुद्ध साहित्याचा स्त्रोत एकच असावा, त्यात दलित, ग्रामीण, जनवादी, ख्रिस्ती असे वर्णभेद व वर्गभेद नकोत. (झाले ते छान झाले पण बास झाले; आता पुन्हा प्रस्थापित साहित्य व्यवस्थेत सामावले जाणे हेच बरे असा एकंदर चतुराईचा पवित्रा कर्णिक घेतात.) कर्णिकांना सर्व ग्रामिणाचे एक 'बहुजनसाहित्य' करावे असे मात्र वाटते. (फक्त नगरे

वगळण्याचे कारण ? ग्रामीण साहित्य संमेलनाचे एकदा अध्यक्षपद मिळाले होते म्हणून ?)

दलित साहित्य असा शब्दप्रयोग न करता 'अवकाशाच्या ओसाडीतील अनंत मूक पडसादांना आता प्रथमच वाचा फुटत आहे' असे अलंकारिक भाषेत राम शेवाळकर (१९९४) त्याचा उल्लेख करतात. श्रेष्ठ कलाकृतींचे निकष याला लावू नयेत. अनुभवाचा सच्चेपणा हाच त्याचा निकष आहे, पांढरपेशांनी आपल्या क्षीण कसोट्या त्याला लावू नयेत अशी दलित साहित्यिकांची मते शेवाळकर मांडतात. पण या अशा नव्या अनुभवांच्या साहित्यात ते कशाचा समावेश करतात हे पहाणे उद्‌बोधक ठरेल. दलित आत्मकथने त्यात येतात (केवळ एक भाग म्हणून !) खेरीज वसंत वरखेडकर, ग. प्र. प्रधान, अनिल अवचट, शरदिनी डहाणूकर आणि यशवत पाठक हेही यात येतात ! मार्क्सवाद, आंबेडकरवाद, पुरोगामी अशी केवळ नावे उच्चारून साहित्य श्रेष्ठ होत नसते असेही शेवाळकर सांगतात.

निकषांच्या बाबतीत शेवाळकरांचा विचार असा: साहित्याची प्रथम प्रतवारी करून मग निकष ठरवावेत (प्रतवारीला जणू निकषांची गरजच नाही !) श्रेष्ठ साहित्य, चांगले साहित्य, प्रबोधनात्मक साहित्य, प्रचारात्मक साहित्य, करमणुकीचे साहित्य अशी आधी प्रतवारी लावावी. मग त्या त्या साहित्याचे निकष शोधावेत. ते वेगवेगळे असतील. (हा शुद्ध वैचारिक भोंगळपणा आहे ! दवबिंदूची तुलना सागराशी नको असे लालित्यपूर्ण बोलल्यावर आपला मुद्दा सिद्ध झाला असेही शेवाळकरांना वाटते. पाणी म्हणजे काय हे ठरवायला दवबिंदूही चालेल व समुद्रही असा विचार या लालित्य-पंडितांना का सुचू नये ?)

दलित साहित्याला पुन्हा 'सूर्यकुलोत्पन्न साहित्य' असे लालित्यपूर्ण नाव देऊन त्याला न्याय मिळायला उशीर झाला असे एकीकडे शेवाळकर म्हणतात. उलट दुसरीकडे चुकीच्या मुद्यावर त्याची प्रशंसा झाली असेही ते म्हणतात. मात्र दलित साहित्याचे वेगळेपण कशात आहे, ते मोठे का, कोणत्या प्रस्थापित समीक्षेने त्याची उपेक्षा केली, कोणी चुकीची प्रशंसा केली, ती चुकीची का, दलित साहित्याच्या उदयामागचे कारण काय या कशाचीही चर्चा शेवाळकर करत नाहीत.

नारायण सुर्वे (१९९५) बहुजन समाजातील नवकवी हे राजकीय-सामाजिक चळवळीतले सक्रिय कार्यकर्ते आहेत हे लक्षात आणून देतात. या लेखकांना त्यामुळे जीवनाचा उत्तम अनुभव आहे. अर्थात चळवळीत सक्रीय राहण्यातला धोकाही सुर्वे जाणतात. चळवळीच्या अनुषंगाने केलेल्या लेखनात निर्मितीचा प्रामाणिकपणा व काव्यात्मकता विसरली जाते. दलित लेखकांनी निर्मितीच्या उत्साहास अभ्यासाची जोड द्यायला हवी असे सुर्वे म्हणतात. त्यासाठी विविध कलाकृती वाचायला हव्यात. (सरदार काय किंवा सुर्वे काय साहित्य-निर्मितीच्या प्रक्रियेतील अभ्यासाचा भाग दोघेही आवर्जून

सांगतात. दलित लेखकांच्या अनुभवाचे मोल, त्याची अपूर्वता ते जाणतात. पण तेवढ्यावर साहित्य-निर्मितीचे भागत नाही. कलात्मकता कष्टसाध्य आहे, उत्स्फूर्त नाही असे दोघांचे मत. सामाजिक बांधिलकी मानणाऱ्यांच्या या विचारात सुरुवातीपासूनच परिपक्वता आहे. रशियन राज्यक्रांतीच्या आरंभीही साहित्याबाबत अशी परिपक्व भूमिका होती. रशियन रूपवादी हे चळवळीतले सक्रिय कार्यकर्ते होते. पुढे चळवळ केवळ राजकीय कार्यकर्त्यांच्या हातात गेली. त्यांना प्रचारापलीकडे साहित्याचे महत्त्वच वाटत नव्हते. कलात्मक-निर्मितीवर घाला पडला तो पुढे या केवळ सत्तासंघर्ष करणाऱ्या नेतृत्वाकडून. दलित-साहित्याच्या आरंभी सरदार, सुर्वे यांच्यात अशीच जागरूकता दिसते; साहित्याचे कलात्मक रूप ते नाकारत नाहीत. पण पुढे दलित चळवळही साहित्यिक विचारवंतांच्या हातातून जाऊन केवळ दलित राजकारणी लोकांच्या हातात जाणारच नाही कशावरून ? चिन्हे तर तशीच दिसतात. पण एक फरक महत्त्वाचा. रशियन क्रांतिकारकांप्रमाणे सत्तेच्या फारसे जवळ ते अद्यापही नाहीत. कदाचित् यातूनच दलित मानसिकता विवेकी होण्याची शक्यता आहे.)

ग्रामीण, दलित, ख्रिस्ती, कामगार अशी वेगवेगळी व्यासपीठे साहित्यिकांना मिळण्यात सुर्व्यांना गैर काही वाटत नाही. (ते स्वतः १९९५ मधे अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते तर १९९९ मधे या संमेलनाला विरोध करणाऱ्या 'सकल' संमेलनातही ते सामील होते. कर्णिकांप्रमाणे आपण पूर्वी ज्या संमेलनाचे अध्यक्ष होतो त्याला नावे न ठेवण्याचा शिष्टाचार सुर्वे पाळत असावेत.) अशा छोट्या-मोठ्या वेगळ्या संमेलनांमुळे वेगवेगळे समाज घटक सांस्कृतिक प्रश्नांभोवती एकत्र येतात हे चांगलेच आहे असे त्यांना वाटते. पण याचबरोबर सांस्कृतिक किंवा सामाजिक संघटनातून लेखक जन्माला येतो हा भ्रम आहे असेही सुर्वे स्पष्ट करतात. (सुर्वे येथे एकदम कलावादी भूमिका घेणाऱ्यांसारखे वाटतात.) सरदार किंवा त्यापेक्षा खरातांप्रमाणे प्रस्थापित साहित्याला नावे न ठेवता सुर्वे मराठी साहित्याचे भविष्य काळातले रूप आशादायक आहे असे मानतात.

सामाजिक बांधिलकी मानणाऱ्यांना कदाचित् ऐतिहासिक कादंबरी पलायनवाद वाटत असेल. ना. सं. इनामदार (१९९७) ऐतिहासिक कादंबरीवरील या आक्षेपाचा उल्लेख करतात. मागच्या गोष्टी उगाळत बसण्यापेक्षा सद्य स्थितीतील प्रश्नांना साहित्यिकाने सामोरे जावे असा हा विचार. इनामदार भूतकाळ व वर्तमानकाळ ही विभागणीच मानवी जीवन-प्रवाहात गैरलागू, कृत्रिम आहे असे म्हणून हा आक्षेप फेटाळतात. (मौज अशी की सामाजिक बांधिलकीवाल्यांनी ऐतिहासिक कादंबरीकडे दुर्लक्षच केले आहे. सरदार हरिभाऊ आपट्यांच्या सामाजिक विषयावरच्या कादंबऱ्यांचा उल्लेख करतात पण त्यांच्या ऐतिहासिक कादंबरीविषयी काहीही बोलत नाहीत. सुर्वे फक्त कवितेबाबतच बोलतात. खरात दलित लेखनाचे समर्थन करतात पण दलित लेखक भूतकाळाविषयी गप्प का

याचा विचारही करत नाही. बांधिलकीवाल्यांना सांप्रतचे प्रश्न महत्त्वाचे वाटतात व साहित्याने त्याची दखल घ्यावी एवढाच त्यांचा आग्रह. कलावादी, मनोरंजनवादी साहित्य झोडपणे म्हणून सोपे जाते; मध्मयवर्गीयांच्या संकुचित वृत्तीला नावे ठेवणेही शक्य होते. पण याच मध्यमवर्गाने लिहिलेले ऐतिहासिक विषयांवरचे साहित्य कलावादी नव्हते. ते केवळ मनोरंजनवादीही नव्हते. सामाजिक प्रबोधनाचे ते एक साधन होते. त्याचा विचार का टाळला जातो ? सामाजिक बांधिलकी हे स्तोम आहे असे म्हणणारे गाडगीळ, माडगूळकर देखील ऐतिहासिक कादंबऱ्यांचा स्वतःच्या मतांच्या समर्थनार्थ उल्लेखही करत नाही. खरे म्हणजे प्रत्यक्ष अनुभव घेण्यावरचा जोर ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या क्षेत्रात अशक्यच आहे. मग ऐतिहासिक कादंबऱ्यांना साहित्यत्वच नाकारायचे का ? इतरांचे साहित्य वाचूनही साहित्य लेखनास स्फूर्ती येते असे म्हणणारे दुसऱ्या पायरीवरचे पु. ल. देशपांडे किंवा या पायरीवरचे शंकर पाटील, सुर्वे इतिहास-वाचनाने साहित्य-लेखन संभवते असे का म्हणत नाहीत ? ऐतिहासिक कादंबरीतील कालसापेक्षता वर्तमानाची की भूतकाळाची ? असा सरदारांना प्रश्न विचारता येईल. ती वर्तमानकाळाची मानली तर इनामदार म्हणतात त्याप्रमाणे इतिहासबाह्य हेतूंनी केलेले ते लेखन ठरून त्याची ऐतिहासिकता संशयास्पद होईल. उलट ती भूतकाळाची सापेक्षता मानली तर सरदार म्हणतात त्या लेखक रहात असलेल्या समाजाशी तिचे नाते न राहिल्याने बांधिलकीच संपेल. बांधिलकी, साक्षात् अनुभव, वाचनातून साहित्य-लेखनाकडे वगैरे गोष्टींच्या चर्चेत ऐतिहासिक कादंबरीचा मराठी विचारवंतांना विसर पडावा हे आश्चर्य आहे. उलट इनामदारांसारखे ऐतिहासिक कादंबरी-लेखन करणारे अध्यक्ष या मुद्द्यांना स्वतःच्या लेखन-विषयक जाणिवांमधे पूर्ण बगल देतात हेही आश्चर्यच. ग्रामीण साहित्याचा पुरस्कार करणाऱ्यांनी ऐतिहासिक कादंबरी नागरी की ग्रामीण याचाही कुठे विचार केलेला दिसत नाही. आपापल्या परिघात फिरणारे विचारवंत विचारांनाही रिंगणाबाहेर जाऊ देत नाहीत हे कशाचे द्योतक आहे ?)

द. मा. मिरासदार (१९९८) पूर्वी पांढरपेशेच शिकलेले असल्याने साहित्यही त्या वर्गाचे होते असे म्हणतात. शिक्षणाचा प्रसार वाढल्यावर 'दलित', 'ग्रामीण' असे नवे प्रवाह आले. साहित्यात असे भेद मानावे का ? याला मिरासदारांची दोन उत्तरे. एक, साहित्य फक्त साहित्यच असते. दोन, आपले सामाजिक जीवनच या भेदांनी ग्रासलेले असल्याने ते भेद मान्य करावे लागतात. (कविता छंदयुक्त असावी की नाही ? या प्रश्नालाही मिरासदार दोन्ही बाजूंनी उत्तरे देतात. प्रश्नांना दोन्ही बाजूची उत्तरे देऊन प्रश्नाला हुकांडी देणे अशी शैली मिरासदारांच्या भाषणात बरेचदा दिसते. माहीत असलेले उलट-सुलट विचार किंवा मते मांडणे आणि विशिष्ट भूमिका घेऊन विचारांचा पाठपुरावा करणे या दोन पर्यायात पहिला पर्याय सोपा आणि सर्वसामान्य अध्यक्ष तोच स्वीकारतात.)

महाराष्ट्राची मुख्य जनता ग्रामीण भागात आहे. त्यामुळे त्यांच्या भाषेत त्यांच्या अनुभवावर लिहिलेले असे ग्रामीण साहित्य हेच खरे साहित्य या मताचा उल्लेखही मिरासदार करतात. मिरासदारांना हे मत फारसे रुचत नसावे. श्री. म. माटे, व्यंकटेश माडगूळकर यांनी प्रथम ग्रामीण साहित्य लेखनास सुरुवात केली आणि ते स्वत: 'ग्रामीण' नव्हते याची आठवण ते करून देतात. शिवाय आज शहरी व ग्रामीण हा भेदच राहिलेला नाही त्यामुळे ग्रामीण साहित्य वेगळे मानायचेही कारण नाही. (पूर्वीचे खेड्यात राहिलेले ब्राह्मण शहरात राहू लागल्यावर ग्रामीण विषयावर लिहीत; आज गावातून शहरात स्थानिक झालेले सुशिक्षित ब्राह्मणेतर व दलितेतर साहित्यिक तेच करतात हे खरेच. म्हणजे साक्षात अनुभव सतत घेऊन अधिकाधिक ज्वलंत साहित्य लिहिण्यासाठी लेखकांनी शहरी-सुख, शहरातील मध्यमवर्गीय संस्कृती टाळली असे उदाहरण दिसत नाही. त्यामुळे 'ग्रामीण', 'दलित' वगैरे अनुभवांबाबतची वकिली ही फक्त कागदावर राहते.)

दलित साहित्याचे स्वागत शहरी मध्यमवर्गीय, सुशिक्षित समाजानेच प्रथम केले असे मिरासदार म्हणतात. पण पुढे दलित साहित्य म्हणजे केवळ विद्रोह, केवळ चिडचीड असे दलित लेखकाना वाटू लागल्याने त्या साहित्यात एकसुरीपणा आला. या साहित्यात तोचतोचपणा आहे, नवनिर्मिती नाही. समाज व शासन आज दलितांचे जीवन सुधारण्यासाठी भरीव कामगिरी करत असूनही त्याचे चित्रण मात्र दलित साहित्यात नाही असा एक नवा मुद्दा मिरासदार मांडतात. (म्हणजे आजच्या जीवनाशी 'संबद्धता' या साहित्यात नाही असा याचा अर्थ होतो. बांधिलकीवाल्यांना अडचणीत आणणारा हा विचार आहे.) दलितांच्या जीवनावर दलितच लिहू शकतात हा खरातांचा मुद्दा माडगूळकरांप्रमाणे मिरासदारही फेटाळून लावतात. दलित समाजात सामर्थ्यवान लेखक पैदा झाला तर मात्र तो दलित जीवनावर अधिक प्रत्ययकारी लिहू शकेल हे मात्र मिरासदारांना मान्य आहे. (म्हणजे नकळतपणे प्रत्यक्ष अनुभव हा कल्पित किंवा सांगोवांगीच्या अनुभवापेक्षा चांगल्या साहित्यकृतीस उपकारक हे मिरासदार मान्य करतात. येथेही नेहमीप्रमाणे मिरासदार दोनही बाजूंची मते मांडून मोकळे होतात.)

बोरकर, कुसुमाग्रज, मर्ढेकर, रेगे, इंदिरा संत यांनी जुन्या मळवाटांऐवजी नव्या वाटा निर्माण केल्या. त्याप्रमाणे दलित कवितेनेही मराठी साहित्याच्या साचलेल्या पाण्यावर नवे संस्कार केले असे वसंत बापट (१९९९) म्हणतात. मात्र दलित साहित्य वेगळे मानायला बापट तयार नाहीत. दलित साहित्यिक आत्मचरित्र लिहून संपतोच. याचे कारण दलित साहित्याला दलितेतर साहित्यापासून आपण वेगळे काढतो. (म्हणजे बापटांच्या म्हणण्याप्रमाणे आत्मचरित्र लिहिणाऱ्या दलित लेखकाला प्रस्थापितांनी जर सामावून घेतले असते तर तोही पुढे निसर्ग कविता, समर गीते लिहून ताळ्यावर आला असता दलितांनी दलितेतर जीवनावर लिहले असे बापट म्हणतातच. पण दलितांनाच

प्रस्थापित साहित्य-प्रवाहात यायचे नाही त्याचे काय ? दलित साहित्यिक असे पुन्हा पुन्हा म्हणत असतानाही बापट तिकडे दुर्लक्ष का करतात ? त्यांनी वेगळे राहण्याच्या पापाचे खापरही पुन्हा प्रस्थापित मध्यमवर्गीय साहित्यावर का फोडायचे ? के. ज. पुरोहित जनवादी साहित्यिक काल्पनिक शत्रूच्या अंगावर तुटून पडतात असे म्हणतात. दलित साहित्याचा पुरस्कार करणारे दलित व सवर्ण साहित्यिकही अशाच एका काल्पनिक 'प्रस्थापित मध्यमवर्गा'वर सतत दोषारोप करतात. बापट हे यापैकीच एक) वसंत कानेटकरांप्रमाणेच बापटांना स्त्रीवादी साहित्य हा दलित साहित्यावरचा उतारा वाटतो.

मर्ढेकरांची कविता गचाळ असे म्हणण्याची हिम्मत दुसऱ्या पायरीवर झाली नाही. मात्र मर्ढेकरसोडून इतर नवकाव्यावर सगळ्यांनीच कृतकतेचा, जीवनविन्मुखतेचा आरोप केला. या नादात मर्ढेकरांच्या कवितेचे फक्त देव्हारे माजले; तिची वस्तुनिष्ठ समीक्षा झाली नाही. मर्ढेकरांना केशवसुतांनंतरचा 'मैलाचा दगड' बनवून मराठी विचारवंत कृतकृत्य झाले. याच पद्धतीची वैचारिक प्रतिक्रिया सामाजिक बांधिलकी आणि दलित साहित्य या संबंधात दिसते. दलित आत्मचरित्रे विशिष्ट जीवनावरचीच आहेत, वाचताना कंटाळा येतो असे म्हणण्याचे धाडस तिसऱ्या पायरीवर कोणी करत नाही. त्यातल्या त्यात सुर्व्यांची पाठ थोपटण्याची पद्धत दिसते. एवढे झाले की मग बांधिलकी मानणाऱ्यांवर टीका करायला आणि नाव न घेता दलित आत्मचरित्रातील तोचतोचपणावर बोट ठेवायला विचारवंत मोकळे. म्हणजे मर्ढेकर थोर पण नवकाव्य वाईट, सुर्वे थोर पण आत्मचरित्रे, त्यातील अर्वाच्य भाषा वाईट असे दोनही डगरींवर पाय ठेवायला मराठी विचारवंत पाहिल्यापासूनच तयार. याला वैचारिक भीरुता म्हणायचे की लबाडी ?

य. दि. फडके (२०००) सयाजीराव गायकवाड, श्री. म. माटे यांची अवतरणे देत मराठी साहित्य हे ब्राह्मणी व शहरी आहे हे जुने मत मांडतात (मात्र माटे हे बुद्धीच्या अनेक व्यवहारातील वर्चस्वाबाबत बोलतात, केवळ साहित्यबाबत नव्हे हे फडक्यांनीच दिलेल्या अवतरणातून दिसते. महाराष्ट्रातील विद्या-क्षेत्र आणि मराठी साहित्य-क्षेत्र या दोन गोष्टी गल्लत करता कामा नये.) १९६० पूर्वी मध्यमवर्गीय प्रतिष्ठित समीक्षक दलित लेखनाची दखलही घेत नसत असे सांगताना फडके कुसुमावती देशपांडे १८५० ते १९५० या काळातील मराठी कादंबरीचा आढावा घेताना अण्णाभाऊ साठे यांचा उल्लेखही करीत नाहीत असे उदाहरण देतात. दलितांना केवळ दारिद्रयनिर्मूलन नको आहे. त्यांना समानतेची वागणूक हवी. दलित साहित्य हे परिवर्तनाचे साधन आहे तसे ग्रामीण साहित्य नाही. असा मुद्दा फडके मांडतात.

कला व वास्तव, कला व जीवन यातील संबंधाबाबत पहिल्या पायरीपासूनच वाद घातलेले दिसतात. हे अपेक्षितही आहे. कारण पाश्चात्य साहित्य-समीक्षेत, हे वाद खूप जुने आहेत. शिवाय कलाविष्कार व सभ्यता, सदभिरुची यांच्यातील संबंधाबाबत कोणत्याही काळी व कोणत्याही देशात विचार होणे अपरिहार्यच आहे. अगदी जुन्या

संस्कृत साहित्यविचारातही भामह, वामन 'अग्राम्यत्वम्' या नावाखाली सभ्यतेचा विचार करताना दिसतात. असभ्य असा वाटणारा अनुभवच नाकारायचा हे कलावादाचे अतिरेकी टोक; तर आहे त्या स्वरूपात आहे तसाच अप्रिय अनुभव व्यक्त करायचा हे वास्तववादाचे अतिरेकी टोक. कलेचा, कलात्मकतेचा प्रश्न या दोन टोकांमधे हिंदकळताना दिसतो. संस्कृतीची पुटे किती चढवायची याचा प्रतिवाद जीवनाबाबत सम्यक् भूमिका घेणे का नाकारायचे असा केला जाताना दिसतो.

पहिल्या पायरीवर वा. म. जोशी नैतिकतेचा मुद्दा आग्रहाने मांडतात; इतका की श्रेष्ठ कलाकृती आणि लेखकाचे चारित्र्य यात संबंध असायलाच हवा असे ते म्हणतात. माधवराव पटवर्धन पाश्चात्त्यांकडून आलेला नवनीतिवाद धर्माच्या विरोधात आहे असे मत मांडतात. दुसऱ्या पायरीवर केवळ सौदर्योपासक असणारा कवी हा प्रतिक्रांतिकारक आहे असे जावडेकर म्हणतात. कुसुमावती देशपांड्यांना कवितेने केवळ सौदर्याच्या मागे लागणे मान्य नाही आ. रा. देशपांडे मात्र साहित्याकडून संस्कृतिपोषणाची अपेक्षा करू नये असे म्हणतात. शिरवाडकर साहित्याच्या सहेतुकतेचा मुद्दा मांडताना केवळ सौदर्यनिर्मितीचा मुद्दा फेटाळून लावतात. वा. ल. कुलकर्णी साहित्य जीवनसापेक्ष आहे पण जीवनावलंबी नाही असे म्हणतात. निखळ कलावादाचा पुरस्कार तसा कोणीच अध्यक्ष करीत नाही.

वास्तवाला नियम नसतात पण कलेला नियम असतात म्हणून ती सुंदर व संयमित असते असा दावा पु. भा. भावे (१९७७) करतात. याला उदाहरण म्हणून गाढवाचे नैसर्गिक नाचणे सुंदर नव्हे पण उदयशंकर यांचा नाच कलात्मक म्हणून सुंदर असतो असे ते सांगतात. कला हे पूर्णपणे वास्तव नसतेच; ती कृत्रिम असतेच. कलेत निवड असते, वास्तवतेत ती नसते. गटाराचे चित्र कुणी दिवाणखान्यात लावत नाही. उच्च कलाकृतीपासून उच्च आनंद मिळतो; नीचपासून नीच. मोठी कलाकृती मोठा आशय मागते. कलाकृतीतील व्यक्तिरेखेच्या उंचीवरून कलाकृतीचीही उंची ठरते. रामशास्त्री जर भ्रष्ट असता तर 'भाऊबंदकी' नाटक उंची गाठू शकले नसते. (भाव्यांच्या या मतांमागे व्यक्तिनिष्ठ नीतिनियमांचा आणि अभिरूचीचा आग्रह आहे. भाव्यांचे म्हणणे ग्राह्य धरले तर शेक्सपिअरची ऑथेल्लो, मॅकबेथ नाटके, दोस्तयेवस्कीचे 'क्राइम ॲण्ड पॅशन' मोडीत काढावे लागेल. जे नैसर्गिक, अकृत्रिम ते नियमहीन व असुंदर हे विधान तर टिकणारेच नाही. झाडून मारे निसर्ग-कवी निसर्ग किती सुंदर तर मानव-निर्मित (नियमबद्ध) जग कसे रटाळ, शुष्क हे सांगत असतात. दिवाणखान्यात फक्त सूर्योदयाची, नदीची, फुलांची चित्रे लावावीत या मागणीमागे एक प्रकारची बालिश अभिरुची आहे. वास्तवातून केलेली भावेकृत निवड हा एक प्रकारचा पलायनवादच नव्हे तर संवेदनहीनतेचाही नमुना होऊ शकेल. तिसऱ्या पायरीवरचे पहिलेच भाषण इतके अप्रगल्भ आहे हे कशाचे सूचन असावे ?)

कला, साहित्य हे सुंदर जीवन आहे, साहित्यातील कला जीवन सुंदर करते असा विचार वामन चोरघडे (१९७९) मांडतात. जीवनाच्या धकाधकीपासून सुटका करणारे असे विरंगुळा या स्वरूपाचे साहित्य असते असा त्यांचा रोख आहे. चोरघड्यांच्या मते वास्तववाद हा खरा नाहीच. वास्तववाद म्हणजे सत्य निर्माण करणे असेल तर मुळात सत्य म्हणजे काय हे सांगणे अशक्य आहे. (चोरघड्यांच्या या विचारात तथ्य आहे. वास्तव हेच मुळी निरपेक्ष असे वास्तव असू शकते का ? मानवी जाणिवेविना वास्तव अस्तित्वात असते का ? हे तत्त्वज्ञानातले प्रश्न आहेतच आणि मानवी जाणिवेमुळेच वास्तव असेल तर त्याचे रूप जाणिवेनुसार बदलणारे असेल का ?) आपण जे अनुभवले ते सत्य मानणे हे अज्ञान आहे असे चोरघडे म्हणतात. जे घडले ते सांगणे म्हणजे सत्यकथन हाही भ्रमच.

गं. बा. सरदार (१९७९) मागे म्हटल्याप्रमाणे कलाकृतीमधील सौदर्याचे आवश्यक अस्तित्व नाकारत नाहीत पण जीवनविषयक चिंतन व जीवन अर्थपूर्ण करण्याची उर्मी यातूनच श्रेष्ठ कलाकृती संभवते असे त्यांना वाटते. ललित साहित्यातून केवळ आकृतिसौदर्याचा आनंद मिळत नाही. सौदर्यशास्त्रामधे साहित्याची इतिश्री करणे म्हणूनच त्यांना मान्य नाही.

प्रतिभा, संवेदनशीलता व अनुभव या तीन रसायनातून साहित्य होते असे व्यंकटेश माडगूळकर (१९८३) म्हणतात. मराठी साहित्याची उत्क्रांती नियमानुसारी साहित्य, अद्भूतरम्य साहित्य अशी होते. आता ती वास्तववादी साहित्य या टप्प्यावर आहे. दलित साहित्य हे वास्तववादाचा प्रामाणिक आविष्कार आहे.

विश्राम बेडेकर (१९८६) प्रतिभा व प्रज्ञा या दोहोतून साहित्यनिर्मिती होते असे म्हणतात. भावनामयी प्रज्ञा म्हणजेच संवेदनशीलता. हा विचार पौवार्त्य आहे. स्थिर मनच साहित्य निर्माण करू शकते. (स्थिर मनालाच विवेक सुचतो; रेगे म्हणूनच साहित्य व विवेक यांचे नाते जोडतात.) मानसिक संघर्ष, मानसिक वेदना यातून साहित्य संभवते हा पाश्चात्त्य विचार आहे. (दोन्ही खरे मानता येतील ? साहित्याची प्रतवारी त्यातून ठरेल ? वेदनापीडित आणि वेदनारहित (शांत) या मनाच्या दोन टोकाच्या अवस्था. या दोहोतूनही साहित्य-निर्मिती संभवते ?) मात्र चांगले साहित्य टिकेलच असे नाही. कित्येक चांगले साहित्य कालाच्या ओघात लपून जाते. (टॉमस ग्रेच्या कवितेत म्हटल्याप्रमाणे अप्रसिद्ध असे मिल्टन मूकपणे तसेच राहिले असतील. रेगे वा. ल. कुलकर्णी यांच्याप्रमाणे बेडेकर साहित्य टिकण्यामागे नियतीवादी भूमिका घेतात.) अनेकार्यता हे साहित्याचे बलस्थान आहे (खरे म्हणजे ते भाषेचे बलस्थान आहे.)

मनोरंजन करणारे साहित्य उत्तम चित्रण करते; ते चांगले साहित्य असते असे वसंत कानेटकर (१९८८) म्हणतात. मात्र श्रेष्ठ साहित्यात चित्रण व चिंतन यांचा मिलाफ असतो. कलाविलास व आध्यात्मविचार यातून श्रेष्ठ साहित्य संभवते.

द. मा. मिरासदार (१९९८) रंजकता व प्रसाद हे साहित्याचे गुण मानतात. साहित्य 'स्वान्तसुखाय' हे फक्त लेखकाच्या बाबतीत खरे, वाचकांच्या नव्हे. अभिजात साहित्य थोडेच असते—व्यास, वाल्मिकी, शेक्सपिअर, कालिदास यांचे. पण तेही रंजक असतेच. विनोदी साहित्य अभिजात साहित्यात मोडत नाही याचे दु:ख मिरासदारांना वाटते. अभिजात साहित्यातील स्वभाव वैविध्य विनोदी साहित्यात असते. (विनोदी साहित्य अभिजात नसेल पण निदान त्याला चांगले साहित्य म्हणावे, भरताड साहित्यापेक्षा त्याचा दर्जा वरचा आहे असा मिरासदारांचा आग्रह. याच भूमिकेतून ते गरजेच्या काव्याचाही पुरस्कार करतात.)

वसंत बापटांना (१९९९) कविता हे भाषेचे उत्कट रूप वाटते. कवितेचे सौंदर्य अघळपघळपणा, पुनउक्ती टाळण्यात आहे. आज कविता छंदमुक्त झाल्याने ती चैतन्यहीन झाली आहे असे बापट म्हणतात. (त्रोटक पण गद्यमय भाषेत भावनिक विचार—तोही दुसऱ्याला ओरबाडणारा, स्वत:बाबत अनुकंपेची भीक मागणारा—मांडणे म्हणजे कविता करणे असे समीकरण आज भरड कवितेबाबत मांडता येईल हे खरे. पण छंदोमय रचनेने ही परिस्थिती सुधारेल असे नाही. कवितेचे बाहुल्य हे समाजातील वाढत्या आत्मकेंद्रीपणाचा परिणाम तर नसेल ?) अनुभवसंपन्नता नसेल तर साहित्य पोकळ होते असे बापट म्हणतात. तात्कालिक विषयावर आज जास्त कविता लिहिल्या जातात. काळ व समाज यांचे प्रतिबिंब साहित्यात पडते हे खरे, पण साहित्य त्याही पलीकडे जाते असे बापट म्हणतात. म्हणून प्रत्येक दशकाची कविता मोजणे त्यांना आवडत नाही.

मिरासदारांप्रमाणे रमेश मंत्र्यांनाही (१९९२) विनोदाला श्रेष्ठ साहित्यात स्थान नाही याचे दु:ख वाटते. मात्र 'काव्यशास्त्रविनोदेन' या संस्कृत अवतरणातील 'विनोद' याचा भलताच अर्थ लावून ते विनोदी साहित्याची वकीली करतात.

एकंदर कलावादी भूमिका तिसऱ्या पायरीवरही समर्थपणे मांडली जात नाही. सामाजिक बांधिलकीच्या छायेखालीच साहिन्यातील सौंदर्याचा कसाबसा विचार होतो. तसे पाहिले तर तिसऱ्या पायरीवरचा एकंदरच साहित्यविचार हा बांधिलकीने झाकोळलेला आहे.

मंत्री, मिरासदार, शेवाळकर हे उघडपणे तर भावे, दांडेकर, व्यंकटेश माडगूळकर हे अभावितपणे मध्यमप्रतीच्या रंजनप्रधान साहित्याचा विचार व समर्थन करतात. भावे, दांडेकर, माडगूळकर, कानेटकर, पुरोहित, शंकर पाटील हे स्वत:च्याच कथांचा उल्लेख करतात. दांडेकर, दीपा गोवारीकर, बाळ गाडगीळ यांचा, बेडेकर पु. य. देशपांडे यांचा, शेवाळकर वासंती मुझुमदार यांचा तर शांता शेळके श्रीनिवास पाटणकर, जी. एन्. जोशी यांचा उल्लेख करतात. समकालिनातून मानदंड शोधणे अवघड असले तरी साहित्यातील किमान गुणवत्तेची पारख इतकी सामान्य असावी ?

अश्लीलता आणि आविष्कारस्वातंत्र्य याबाबतची जुनीच मते तिसऱ्या पायरीवर आळवली जातात. 'फुलाच्या मायची...' सारख्या पंक्तीचे उदाहरण देत पु. भा. भावे (१९७७) नवतेच्या नावावर गलिच्छ लेखन होते आहे असे म्हणतात. कवितेला छंद नसणे म्हणूनच या लोकांना सोयीचे. साहित्यात संयम व सूचकता हवी, उघडा-नागडा आविष्कार नको. कलाकार पूर्ण स्वतंत्र हवा हे खरे पण याचा अर्थ तो शिव्या द्यायला मोकळा आहे असे नाही. कलेची बंधने हवीत आणि समाजकल्याणाचा निकषही हवा. (हा सारा युक्तिवाद भुसभुशीत पायावर उभा आहे. नवता हे गलिच्छपणाचे छत्र कसे होऊ शकते ? सूचकता विरुद्ध स्पष्ट आविष्कार हाच फरक पारंपरिक संकेतानुसार केलेला आविष्कार व संकेत मोडण्याची क्रांती असाही मांडता येईल. सामान्य वकूबाच्या कवीने क्रांतिकारकाचा आव आणला तर बिघडले कुठे ? अनुकरण आणि स्वयंसिद्धता यात फरक करणे अवघड नाही. भाषा ही गलिच्छ नसतेच; प्रमाण भाषेत सभ्य व गलिच्छ, योग्य व चुकीचे असे भेद होतात. पण प्रमाण भाषेचे हे कृत्रिम भेद साहित्याने का मानावेत ? साहित्य हे प्रमाण भाषेच्या औचित्य कल्पनेनुसार लिहिले जावे हा आग्रह लेखकाच्याच नव्हे तर साहित्य-निर्मितीच्या स्व-तंत्रावर आघात करणारा आहे. कलेची बंधने भावे सांगू शकतील ? समाजकल्याण ही तर फारच संदिग्ध, व्यक्तिनिष्ठ आणि साहित्याशी असंबद्ध अशी कल्पना आहे. भावे त्याचेही निकष देत नाहीत. कारण ते देणे शक्य नाही. बांधिलकीवाले आणि बांधिलकी विरोधक हे दोघेही समाजकल्याणाच्या घसरड्या पायावर शाश्वत साहित्याबाबतच्या आपल्या विचारांची उभारणी करतात हे साम्य दोघांनीही खोलवर जाऊन विचार करण्याची तसदी न घेतल्याचा परिणाम आहे असे म्हटले तर ?)

गो. नी. दांडेकर (१९८१) साहित्याने फक्त शिव द्यावे असे म्हणतात. ते स्वत: संघाचे प्रचारक होते, त्यामुळे राष्ट्राच्या हिताचेच लेखन त्यांनी केले. अश्लीलतेला लोक नावे ठेवतात पण ते वाचतात. त्यांना घाण गोष्टी ऐकण्याची उत्सुकता असते. (दांडेकर मनुष्यस्वभावाबाबत बोलतात.) भव्य, दिव्य असे साहित्य लिहून अश्लील साहित्याला उत्तर द्यावे असे ते म्हणतात. वाचकांनीच बहिष्कार टाकून सुमार साहित्याची निर्मिती थांबवावी असं व्यंकटेश माडगूळकर म्हणतात. (हे शक्य नाही. प्रत्येक समाजात गरज-वाङ्मय असतेच. माडगूळकर ज्या इंग्रजी साहित्याचा पुन्हा पुन्हा संदर्भ देतात त्या इंग्रजी समाजातही सुमार साहित्य उदंड आहे.) आजच्या ढासळत्या मूल्य-व्यवस्थेच्या समाजात उच्च मूल्ये दाखवणारे साहित्य संभवणे अशक्यच आहे असे बेडेकर (१९८६) म्हणतात. पातिव्रत्य हे सनातन मूल्य आज आपण विधवाविवाह व घटस्फोट या कायद्यांनी निकालात काढले. समता व स्वातंत्र्य यांचा केवळ उच्चार आपण करतो. पण जिथे समता असते तिथे व्यक्तिस्वातंत्र्य हरपते आणि जिथे स्वातंत्र्य असते तिथे समता येत नाही हे आपण विचारात घेत नाही. आज आपण माणुसकी

विसरलो. पण या पडझडीने निराश होण्याचे कारण नाही. पुन्हा मूल्याची कदर होऊन उच्च साहित्य निर्माण होईल (बेडेकरांचे हे स्वगत वार्धक्यसुलभ भावनांचे कल्लोळ या स्वरूपाचे आहे.)

के. ज. पुरोहित (१९८९) अभिव्यक्ती-स्वातंत्र्याचा जोरदार पुरस्कार करतात. डॉ. आंबेडकरांच्या रामायणावरील लेखनावर बंदी नको असे ते म्हणतात. नेहरूंच्या काळात मेननच्या 'रामा रिटोल्ड' या पुस्तकावर बंदी यावी याचे त्यांना आश्चर्य वाटते. पुरातनकाळी लेखनाचे भरपूर स्वातंत्र्य होते. ते आज नाही. कुसुमाग्रजांची 'सर्वात्मका परमेश्वरा' ही चांगली कविता पाठ्यपुस्तकातून काढणे गैर आहे (पण हा अभिव्यक्ती-स्वातंत्र्याचा प्रश्न कुठे आहे ? कविता प्रकाशनावर बंदी नव्हती. पाठ्यपुस्तकाचे निवड-निकष चुकीचे एवढेच म्हणता येईल.) पूर्वीच्या जातिबद्ध समाजातही अभिव्यक्ती स्वातंत्र्य होते. म्हणूनच जनाबाई लिहू शकली. विचारांचा मुकाबला विचाराने करावा असे म्हणून शेवाळकर (१९९४) अभिव्यक्ती-स्वातंत्र्याचा पुरस्कार करतात. पण त्यांना काळजी वाटते ती रशदी, तसलीमा या मुस्लिम लेखकांच्या मुस्लिम राष्ट्रातील गळचेपेची. मराठी साहित्य विश्वाबाबत ते बोलत नाहीत. विचारवंत प्रत्यक्ष झुंडशाहीचा प्रतिकार करत नाहीत असे शेवाळकर म्हणतात. प्रतिकूल टीकेचे टीकाकारांचे स्वातंत्र्य लेखकांना रुचत नाही. (एकंदर प्रत्येकजण सोयीप्रमाणे स्वातंत्र्याचा अर्थ लावतो हा शेवाळकरांचा मुद्दा.) वाचकसापेक्षतेमुळे स्वातंत्र्याचा प्रश्न निर्माण होतो. एखाद्या कलाकृतीचा लहानसा भागही वाचकाला बोचतो व त्यातून सर्व कृतीच निकालात निघते. लेखकाने अभिव्यक्ती स्वातंत्र्याचे मूल्य चुकवण्याची तयारी ठेवावी असा सल्ला शेवाळकर देतात. (म्हणजे काय करावे ? बहिष्कार, टीका, मारामारी, पुस्तके जाळणे सहन करावे एवढेच ?) आविष्कार-स्वातंत्र्याची मागणी ही समग्र स्वातंत्र्याच्या मागणीचा एक भाग आहे असे शेवाळकर म्हणतात. आविष्कार स्वातंत्र्यवाल्यांनी समग्र स्वातंत्र्याचा पुरस्कार केला पाहिजे. 'रिडल्स ऑफ रामायण' या डॉ. आंबेडकरांच्या ग्रंथावरील बंदीची मागणी व मनुस्मृती जाळणे या लढाया परस्पर विरोधी प्रेरणेच्या आहेत. सर्वांनाच स्वातंत्र्य द्यायला हवे (शेवाळकर याचाही फारसा खोलवर विचार करत नाहीत. खरे म्हणजे अशा तऱ्हेची बंदी घालण्याची मागणी जातीय विद्वेष पसरवून त्याचा राजकीय लाभ उठवणाऱ्या तथाकथित सामाजिक संघटनांकडून केली जाते. कुसुमाग्रजांच्या कवितेवर रान उठवणारे मूठभर लोक मुस्लिमांना चेतवणारे. डॉ. आबेडकरांच्या रिडल्सवर रान उठवणारे हिंदूंना चेतवणारे तर डॉ. कोलत्यांच्या लीळाचरित्रावर रान उठवणारे एका विशिष्ट पंथाला चेतवणारे. ते संघटित असल्याने संघटितपणे मते गमावण्याची भीती जातिबद्ध समाजातील लोकशाही शासनाला वाटते; किंवा अशा संघटनांना खुष करून आपल्याकडे वळवण्याचा मोह शासनाला होतो. लोकक्षोभातून होणारी बंदीची मागणी आणि या गटटोळ्यांची बंदीची मागणी यात फरक आहे. पहिल्यात जनमताला वळण

लावण्याची जबाबदारी राज्यकर्ते व समाजधुरिणांवर पडते; दुसऱ्यात क्षुद्र राजकीय फायदा उठवून लोकशाही व्यवस्थेला धक्का न लावू देण्याच्या नैतिक व कायदेशीर कर्तव्याचे शासनाकडून पालन होणे आवश्यक असते. दोनही मागण्या स्पष्टपणे धुडकावण्याची कारणमीमांसा देऊनच विचारवंतांनी आविष्कार-स्वातंत्र्याची मागणी करायला हवी. विचारवंतांच्या या मवाळ भूमिकेनेच दुसऱ्या पायरीवर दुर्गाबाई भागवत म्हणतात त्याप्रमाणे विचारवंतांचा आज शासनाला धाकच वाटत नाही. याची पुढची पायरी म्हणजे लेखकांना खाजगी स्वरूपात धमकावण्याची. तीही लवकरच येण्याची चिन्हे आहेत. एकेक '-वादी' विचारवंत आज त्या त्या कार्यकर्त्यांच्या संरक्षणातच विचार व्यक्त करताना दिसतात याचे कारणही ही दहशतीची चाहूल हेच आहे. 'मी कुठलाही '-वादी' नाही आणि कोणत्याही विरोधी विचारांचा माणूस हा माझा शत्रू नाही; किंबहुना विचारमंथनास आवश्यक असा तो विरुद्ध बाजूचा केवळ 'खेळाडू' आहे' अशी वैचारिक औदार्याची भूमिका स्पष्टपणे का मांडली जात नाही ? सभेचे तानमान पाहून विचार-स्वातंत्र्याचा पुरस्कार करणे किंवा आपल्या विचारांची आक्रमकता कमी-जास्त करणे यात व्यावहारिक चातुर्य आहे पण विचारांशी प्रामाणिकपणा नाही. मुसलमानी अमदानीत काय, किंवा ब्रिटिश अमदानीत काय, किंवा आज लोकशाही व्यवस्थेतील जाति-संस्था-बळ रचनेत काय, काही अपवाद वगळता मराठी साहित्यिक-विचारवंत प्रामुख्याने चतुराईनेच राहिला हे नाकारता येईल ?)

पूर्वकालीन सत्य तपासून ऐतिहासिक सत्य मांडताना स्वकीय राज्यकर्ते, जनमत, जातीय गट यांच्या दडपणातून ऐतिहासिक कादंबरीकाराला स्वत:चा मार्ग कसा काढावा लागतो याचे वर्णन ना. सं. इनामदार (१९९७) करतात पण येथेही स्पष्टवक्तेपणाचा अभावच दिसतो.

नग्नतेच्या अतिरेकाला कंटाळूनच ती आपोआप हद्पार होईल असे वसंत बापट (१९९९) म्हणतात. नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क इत्यादी देशात लैंगिक विकृतीचे दर्शन जाहीरपणे केले जाते. त्यावर निर्बंध नाहीत. पण सहनशील वृत्तीने हा अतिरेक सहन केल्यानेच त्या देशातले लोकमत आता नग्नतेच्या दर्शनाला विटले आहे. अश्लीलतेवर निर्बंध घालण्यापेक्षा समाजालाच ती नकोशी झाली की तिला असा आळा बसतो असे बापट म्हणतात. मात्र बीभत्सतेचे खुले स्वागत करावे असा याचा अर्थ नाही समाजातील सदभिरुची वाढवून अश्लीलतेपेक्षा कलात्मक सौंदर्याची समाजात आस निर्माण झाली की हा प्रश्न सुटेल. (बापटांचा हा आशावाद स्तुत्य आहे पण यामागची गृहिते निसटली आहेत. ज्या नॉर्वे, स्वीडनची उदाहरणे बापट देतात ती अ-वास्तव आहेत. या देशातील कायदे, बापट म्हणतात तसे लोकमत तयार झाल्याचे पुरावे, बापट ज्याला लैंगिक विकृती म्हणतात त्याकडे पाहण्याची पाश्चिमात्त्य पद्धती याबाबत बापट काहीही सांगत नाहीत. वर्तमानपत्रात वाचलेली एखादी फुटकळ बातमी किंवा परदेशात

स्वत:ला किंवा परिचिताला आलेला एखादा अनुभव या आधारावर कोणत्याही पुराव्याविना सर्वसाधारण निष्कर्ष काढण्याची वाईट खोड मराठी विचारवंतांना आहे. त्याचे हे एक उदाहरण. द. मा. मिरासदार (१९९८) कलकत्त्यात राहणाऱ्या परप्रांतीय माणसास बंगाली शिकावेच लागते असे विधान याच पद्धतीने करतात. आमच्या सर्वेक्षणात मात्र 'कलकत्त्यात राहून बंगाली आले नाही तर अडते काय ?' या प्रश्नाला अनेक व्यक्तींनी 'नाही' असे उत्तर दिल्याचे आढळले. विचारवंत जेव्हा वास्तविकांऐवजी मतांच्या आधारावर बोलतात तेव्हा एकंदर वैचारिक शिस्तीबाबतच शंका येते. हिंदी चित्रपटातील हिंसा व ओंगळपणा यांना लवकरच लोक विटतील असे बापट म्हणतात ते कशाच्या आधारावर ? यातला एक कच्चा दुवा स्पष्ट आहे. अतिरेकाने उबग एका विशिष्ट पिढीला विशिष्ट वयानंतर येणे शक्य आहे पण पिढी म्हणजे सर्व समाज नव्हे. नव्या पिढीला अश्लीलतेचा कंटाळा येईपर्यंत परत अनुभव घ्यावाच लागणार. म्हणजे जोपर्यंत समाजातल्या पिढ्या या बदलत्या आहेत तोपर्यंत उबग येईपर्यंतचे अश्लीलतेचे दर्शन चालूच राहणार. बापटांची समाजविषयक धारणा स्थितिशील दिसते. याचाच दुसरा परिणाम म्हणजे समाजाची सदभिरुची वाढत जाण्याबाबतचा भाबडा आशावाद. व्यक्तीची वाढ, तिचा विकास यात व्यक्ती ही प्रत्यक्ष आणि निश्चित असते; समाजाचा विकास, त्याची वाढ यातील व्यक्तिसमूह हे सांकल्पनिक आणि अनित्य असतात. समाज जन्मला, वाढला, मेला असे होत नाही. यावरून हा फरक स्पष्ट व्हावा.

एकंदर अश्लीलतेपायी आविष्कार-स्वातंत्र्यावर बंधने आणणे हा मार्ग नव्हे एवढी प्रगल्भता सर्व अध्यक्षांमधे आहे. अश्लीलतेचा निषेध आहे पण त्यासाठी कायदे करण्याची मागणी नाही. समाजच अश्लीलतेला प्राधान्य देणार नाही अशी एक भाबडी आशाही सर्व अध्यक्षात आहे. याचे कारण अर्थातच समाजाच्या सर्वंकष गरजांचे व जीवनाचे अज्ञान हे आहे. भरड वाङ्मय, लोकप्रिय वाङ्मय आणि सरळ लैंगिक विषयावरचे भावना चाळवणारे लेखन याची चणचण आजही महाराष्ट्रात नाही. समाजातील सर्व थरातील लोकांना ब्लूफिल्म्सूचे आकर्षण आहे. साहित्यिकांनी त्याचा विचार करावा असे नव्हे. पण साहित्यिक ज्याला सदभिरुचीचे वाङ्मय म्हणतात, किंवा ते आपण निर्माण करतो असा दावा करतात त्याचे एकंदर समाजात स्थान काय याचे भान यातून यायला हवे. बेडेकर या भानामुळे खिन्न होतात; वाचकांचा घसरता दर्जा आणि संस्था यामुळे चोरघडे कटु बोलतात. पण भावे, विद्याधर गोखले, गो. नी. दांडेकर यासारखे अध्यक्ष मराठी साहित्याचे हे मर्यादित विश्व फार भव्य, दिव्य आहे या कल्पनाविलासात गुंतून राहण्याचे पसंत करतात.

याखेरीज इतर काही विषयांवर अल्प स्वरूपात काही अध्यक्ष या पायरीवर मते मांडतात. विश्राम बेडेकर (१९८६) साहित्य व चित्रपट यांची तुलना करतात. पहिल्या पायरीवर खांडेकर चित्रपटाचा साहित्यामधे समावेश करतात. बेडेकरांना मात्र साहित्य

हे अनेकार्थततेच्या दृष्टीने चित्रपटापेक्षा श्रेष्ठ वाटते.

वसंत कानेटकर (१९८८) शोकात्मिका हा महान वैफल्यविचार आहे असे म्हणतात. व्यक्ती विरुद्ध नियती यातील तीव्र संघर्ष चित्रित करण्याचा तो एक प्रयत्न आहे असे म्हणतात. मात्र पाश्चात्त्य शोकात्मिकेत 'दुदैवी चूक' घडून शोकान्त होतो तर त्यांच्या 'हिमालयाची सावली', 'विषवृक्षाची छाया' यामधे 'दुदैवी निवड' हे शोकान्ताचे कारण होते. शोकान्तिकेत कलाविलास व अध्यात्मविचार दोन्ही असतात. संस्कृत वाङ्मयात शोकात्मिका नाही हे त्यांना मान्य नाही. 'उत्तरगमचरित्र' मधे शोकात्मिकेची बीजे आहेत. (कानेटकरांची ही मते नवीन नाहीत. शोकात्मिकेबाबत असे विचार मराठी समीक्षकांनी केलेले आहेत.)

के. ज. पुरोहित (१९८९) साहित्यात देशीपणा हवा असे म्हणतात. मात्र देशीपणा म्हणजे मागासलेपणा नव्हे, आंधळा अभिमान नव्हे. देशीपणा म्हणजे सच्चेपणा, मातीची जाण. (एक प्रकारची बांधिलकी असे तर नव्हे ? ज्या सामाजिक बांधिलकीच्या आग्रहावर पुरोहित टीका करतात त्या आग्रहात देशीपणा हा एक भाग आहेच.)

साहित्यात सामान्य माणूस हाच केन्द्रस्थानी असतो असे पुरोहित व शेवाळकर दोघेही म्हणतात. (हाही विचार जुना आहे.)

काव्यातील छंदयुक्ततेचे कौतुक शांता शेळके, द. मा. मिरासदार व वसंत बापट यांना वाटते. शेळक्यांना तर शाळा, कॉलेजातल्या त्यांच्या काळी असलेल्या गेय कविता आजही आठवतात व त्यांची त्या तारीफ करतात शांताबाई शेळक्यांचे भाषण कोणताही विचार असा न मांडता जुन्या आठवणी काढीत बसण्यातच संपते. पूर्वी कसे सगळे छान छान होते, आजही कसे काही साहित्यिक, समीक्षक छान छान आहेत, पण बंद पडलेल्या 'सत्यकथे'चे संपादक श्री पु भागवतांना आलेला हताशपणाही कसा खरा आहे, तरीपण मराठी साहित्य कसे नवीन प्रतिभावंतांनी फुलवले जात आहे असले अगदी सामान्य स्वरूपाचे वर्णन म्हणजे शांता शेळके यांचे भाषण. कुठल्याही वादाला जराही स्पर्श न करता भावुकतेने व्यक्त केलेले मनोगत असे त्याचे स्वरूप. भावुकता, आत्मनिवेदन चोरघड्यांच्या भाषणातही आहे पण साहित्याविषयीची एक ठाम भूमिका त्यात आहे.

गं. बा. सरदार आणि गंगाधर गाडगीळ या दोनच अध्यक्षात साहित्यातील वाद साक्षेपाने मांडण्याची क्षमता दिसते. विश्राम बेडेकर, व्यंकटेश माडगूळकर, नारायण सुर्वे व काही अंशी के. ज. पुरोहित व शंकरराव खरात यांच्या भाषणात एखाद-दुसरा महत्त्वाचा मुद्दा मांडला जातो. बाकीचे अध्यक्ष वेळ साजरी करण्यासाठी काही वादांबाबतची सर्वज्ञात अशी मते मांडून मोकळे होतात.

**३.३.२ (१४)**

साहित्य संमेलन कशासाठी ? हा प्रश्नच तिसऱ्या पायरीवर फारसा विचारात घेतला जात नाही. संमेलन हे होतेच ही बाब सर्वसाधारणपणे स्वीकारलेली दिसते.

पु. भा. भावे (१९७७) संमेलनाच्या उपयोगाबाबत बोलत नाहीत. पण वीस रुपये भरून कोणीही सभासद होऊन मतदार होऊ शकतो हे त्यांना खटकते. लोकशाहीला वाईट म्हणता येत नाही. (विचारवंत सुद्धा पायाभूत कल्पनांना धक्का लावायला कचरतात.) पण तरी मतदानावर थोडेफार निर्बंध हवेत असे त्यांना वाटते.

छोट्या-मोठ्या गावात साहित्य मंडळे असतात. ती समाजप्रबोधनाचे काम करतात. अशा संस्थांच्या कार्यात एकसूत्रीपणा आणण्याचे काम संमेलनाचे असा एक नवा मुद्दा गं. बा. सरदार (१९८०) मांडतात. मध्यवर्ती साहित्य संस्था व संमेलन या दोहोचे हे महत्त्वाचे काम आहे. साहित्य संमेलन हे प्रबोधनाच्या चळवळीची सांस्कृतिक आघाडी व्हावी अशी न्यायमूर्ती रानडे यांची अपेक्षा होती. पण संमेलनाचे आजचे स्वरूप या अपेक्षेची पूर्ती करू शकत नाही. संमेलनात औपचारिकपणा फार वाढला आहे. नवा अनुभव वगैरे अशा संमेलनात येणे अशक्यच आहे. संमेलनात लोक जिव्हाळ्याने एकत्र येतात. संमेलनाची ती किमान अट आहे. पण मराठी साहित्य संमेलनात आज जिव्हाळाही आढळत नाही. जातीचा बंदिस्तपणा तसाच राहतो. (सरदारांची ही टीका यथार्थ आहे.) प्रचलित मराठी साहित्य क्षेत्रात नव्यांना वाव नसल्याने ते वेगळी संमेलने घेतात. दलित संमेलन, ग्रामीण संमेलन, महिला संमेलन ही त्याचीच उदाहरणे. ती साहित्य-निर्मितीला पोषकही असतात. मात्र सर्वांनी कधीतरी एकत्र यावे यासाठी असे संमेलन हवे असेही सरदारांना वाटते. गो. नी. दांडेकरांनाही (१९८१) वेगवेगळी संमेलने भरवण्यात गैर काही वाटत नाही. पण मराठी साहित्य संमेलनात सर्वांनी एकत्र यावे असे त्यांनाही वाटते.

गंगाधर गाडगीळांना (१९८१) साहित्यातल्या निरनिराळ्या प्रवाहांची आणि प्रश्नांची नोद घेणे हे साहित्य संमेलनाचे कार्य आहे असे वाटते. साहित्य संमेलनाच्या आजच्या स्वरूपाबाबत सरदारांप्रमाणेच तेही असमाधानी आहेत. पण त्याची चर्चा किंवा साहित्य संस्था व शासन यांच्या संबंधाबाबतची चर्चा आपण करणार नाही असे ते म्हणतात.

विश्राम बेडेकर (१९८६) यांना साहित्य संमेलन हे निर्मितिकारांचे संमेलन वाटते. आपण केवळ वाचक वा रसिक नाही असे ते श्रोत्यांना म्हणतात. श्रोते हे निर्मातेच आहेत. रोजच्या जीवनात आपण लेखा वा तोडी अशा रचना करतोच. समान कळपातले पक्षी म्हणूनच आपण संमेलनात एकत्र येतो. साहित्य संमेलनाचा अध्यक्ष हा वैचारिक चळवळीचे नेतृत्त्व करतो असे वसंत कानेटकर (१९८८) म्हणतात. (हा दावा फारच महत्त्वाकांक्षी आहे. लोक विचार घेऊन चळवळ करतात. ती वैचारिक चळवळ नव्हे. विचारमंथन याला लक्षणेने चळवळ म्हणता येईल. पण त्यात नेता

लागत नाही. विशिष्ट विचार प्रणाली ही अनेकांच्या विचार-अभिव्यक्तीतून सिद्ध होते. साहित्य संमलनाने असले काही काम केलेले नाही. अध्यक्षांनी नवीन विचार मांडले तरी पुरे.) साहित्य संमेलनाची गरज काय ? या प्रश्नाला ठाणेकरांनी संमेलन भरवून उत्तर दिले असे कानेटकर म्हणतात. (यात शब्दचातुर्य आहे; विचार नाही.) ब्रिटिश काळात ॲंग्लो-इंडियन वृत्तपत्रे असा प्रश्न विचारीत. आता आपलेच विद्वान हा प्रश्न विचारतात. १८७८त न्यायमूर्ती रानडे व लोकहितवादी यांनी सुरू केलेले हे साहित्य संमेलन ग्रंथकारांची साहित्यिक चळवळ आहे (पुन्हा येथे ग्रंथकारांची साहित्यिक चळवळ म्हणजे काय ? ग्रंथकारांची अ-साहित्यिक चळवळ असेल ? एकत्र येणे याला चळवळ म्हणायचे ? असे प्रश्न पडतातच) रानड्यांनी तत्कालीन टीकेला भीक घातली नाही. संमेलनाच्या व्यवस्थेवर तेव्हापासूनच टीका होई. (असे का व्हावे ? मराठी माणसांना 'व्यवस्थापन' जमत नाही की कोणत्याही व्यवस्थेत असमाधानी राहणे हा मराठी माणसांचा स्वभाव आहे ?) लो. टिळकांनी सुरू केलेला गणेश व शिवजयंती उत्सव, रानड्यांनी सुरू केलेले साहित्य संमेलन, सामाजिक परिषद या गोष्टींमागे समाजाला जागे करण्याचा हेतू होता. समाज हा 'शिलावस्थेकडे' जातो असे कांटचे वचन कानेटकर सांगतात. अजगरासारखा पहुडलेल्या निष्क्रिय समाजाला जागे करावे लागते. पेशवाईच्या अखेरीस समाज असा ऱ्हासमान होता; आजही तीच अवस्था आहे. यावर उपाय काय ? समाजाचे मंडळीकरण करावे असे राजवाडे म्हणतात. कानेटकरांच्या मते साहित्य संमेलन हे मंडळीकरणाचाच भाग आहे. थोडक्यात साहित्य संमेलनाने समाजास जाग आणता येते असा कानेटकरांचा दावा. (कल्पना आणि वास्तव या दोहोची दखल घेऊन मराठी साहित्यकार विचार का करीत नसावेत ? पहिल्या पायरीवर प्रारंभ असल्याने संमेलनाची वेगवेगळी उद्दिष्टे मांडणे समजू शकते. पण तिसऱ्या पायरीवर गतकालाचा आढावा व संमेलनाचे सांप्रतकालीन स्वरूप यांचा विचार का केला जात नाही ?) प्रबोधन व बंड या संमेलनाच्या प्रेरणा आहेत असे म्हणून वेगवेगळ्या संमेलनांचे समर्थन कानेटकर करतात. दलित साहित्य संमेलनही चांगलेच. फक्त तेथे विद्रोह असावा, विद्वेष नसावा (ही पुन्हा फुसकी शाब्दिक आतषबाजी आहे. विद्रोह म्हणजे काय ? द्वेष, संताप, चीड याविना विद्रोह असेलच कसा ? शिवाय विद्रोह ही दलित साहित्य निर्मितीमागील उर्मी आहे, साहित्य संमेलनाचे ते कारण नव्हे. स्पर्धात्मक भावना, प्रस्थापितांच्या संमेलनाचा एकंदर राग आणि आपले स्वतंत्र सांस्कृतिक व्यासपीठ असण्याची इच्छा यामधून दलित साहित्य संमेलन उदयास आले; आपले वेगळेपण जपत दलितांनी अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात सहभागी व्हावे या अपेक्षेतच विरोधाभास आहे.)

अयोध्याकांड, मुंबई बॉम्बस्फोट, मराठवाड्यातील भूकंप या नैसर्गिक व मानवनिर्मित आपत्तीतून मन सुन्न करणारा विध्वंस, मानवी हत्या झाली असे असताना साहित्य

संमेलनासारखे सोहोळे हवेतच कशाला असा प्रश्न कोणी विचारेल असे राम शेवाळकर (१९९४) म्हणतात. विध्वंसानंतर निर्मितीची उर्मी येतेच असे उत्तर देत संमेलनामुळे संस्कृती पुन्हा उभारी घेते असे ते सांगतात. (खरे म्हणजे सरदार म्हणतात त्या सामाजिक जीवनाबाबतच्या संवेदनशीलतेचा, समाज जीवनाशी साहित्य आणि साहित्यिक यांच्या संबद्धतेचा, एकंदर सामाजिक बांधिलकीचा कस लावणारा हा प्रश्न आहे. संमेलनाचे समर्थन इतक्या सहजपणे करता येईल ? दुसरीकडे अशा आपत्तीनी दुखावून संमेलन घेतले नाही तर भारतासारख्या आपत्तीग्रस्त देशात दरवर्षीच संमेलन स्थगित करावे लागेल. परदुःखाबाबत सहानुभूती दाखवून पुन्हा नित्यक्रमात दंग होणे हा सर्वसामान्य माणसाचा स्वभाव असतो; त्याला जनरीती असेही म्हणतात. साहित्यिक हे संमेलनाबाबत सर्वसामान्य माणसाचेच वर्तन करतात हे प्रांजळपणे कबूल करायला हवे. साहित्यिकांची संवेदनशीलता ही साहित्यनिर्मितीपुरतीच मर्यादित असावी का ? बऱ्याच लेखकांचे याला 'होय' असेच उत्तर असेल, आहे. वा. म. जोशीसारखा एखादाच लेखक वैयक्तिक नैतिकतेचा आग्रह धरेल. समाजरचनेत न्यायासाठी बदल करण्याचे सामाजिक कर्तव्य साहित्यिकांचे आहे असे सरदार म्हणतात. पण विध्वंस झालेल्या समाज बाधवांचेबाबत साहित्यिकांनी काय करावे ? शेवाळकरांच्या संमेलन घेण्याच्या समर्थनात कुणाला व्यावहारिक शहाणपण दिसेल, कुणाला त्याची चीड येईल, तर कुणाला त्यात ढोंग दिसेल. याचा विचार विचारवंत का करत नसावेत ?)

शांता शेळक्यांनी (१९९६) उद्‌धृत केलेल्या संमेलनावरील आक्षेपातून साहित्य संमेलनाचे पहिल्या व दुसऱ्या पायरीवरील स्वरूप पूर्णपणे बदललेले दिसते. साहित्य संमेलन ही केवळ जत्रा आहे असे टीकाकार म्हणतात. वेळ व पैसा यांचा तो अपव्यय आहे. (लाखो रुपये खर्च करून भपकेबाजपणाने संमेलने भरवली जातात, लेखक-कवींना भरघोस मानधन देण्यात येते, सुग्रास भोजनाची व्यवस्था केली जाते, जाहिरात, प्रसिद्धी यावर पैसा खर्च होतो. याचा अंतिम उपयोग काय ? असा टीकाकारांचा प्रश्न.) शांताबाई शेळके याला काय उत्तर देतात ? तर इतरत्रही असाच पैशाचा अपव्यय आपण करतोच; मग इथे झाला तर बिघडले कुठे ? हे. संमेलनाचा उपयोग आनंद मिळणे हा. (शेवाळकर, शांता शेळके यांचे संमेलनाबाबतचे समर्थन पाहिले तर साहित्यिकांची व्यक्ती म्हणून संवेदनशीलता बधिर झाली आहे की काय अशी रास्त शंका यावी. दुःख जाणणे, दुःख सांगणे, दया दाखवणे, माया करणे हे फक्त शाब्दिक निर्मितीच्या जगात; प्रत्यक्षात इकडे पाठ फिरवून मौज करणे हेच खरे अशी ही भूमिका तर नव्हे ? इतरत्र अपव्यय होतो म्हणून येथे अपव्यय झाला तर काय बिघडले ? हा पक्ष विचार म्हणून धक्कादायक आहे. इतरत्र चोऱ्या होतात म्हणून आपण चोरी करावी ? इतरत्र भ्रष्टाचार आहे म्हणून आपण थोडा भ्रष्टाचार करावा ? कसोटीच्या क्षणी इतर लोक स्वत्त्व विसरतात म्हणून आपणही विसरावे ? आणि हे कशासाठी ?

तर आनंदासाठी. हा कोणत्या प्रतीचा आनंद आहे ? बेफिकिरीचा ? वास्तवाकडे पाठ फिरवण्याचा ? मनाच्या निबरपणाचा ? तिसऱ्या पायरीवरील अध्यक्षांची ही वृत्ती रोम जळत असता फिडल वाजवत आनंद लुटणाऱ्या नीरोसारखी आहे असे म्हटले तर ? नकळत साहित्यिक प्रवाहपतितत्वाचा आणि आत्मसंतुष्टतेचा पुरस्कार करत साहित्याची व्यर्थता तर सिद्ध करत नाहीत ? आधुनिक मराठी साहित्यात श्रेष्ठ अशी कलाकृती नाही असे दुसऱ्या पायरीवर रेगे म्हणतात. तिसऱ्या पायरीवर साहित्यिकांची अशी दिसणारी मानसिकता पाहिली तर ती निर्माण होण्याची सुतराम शक्यता नाही असे म्हणता येईल.)

जुन्या पिढीतील लेखकांना भेटण्याची साहित्य-संमेलन ही एक संधी आहे. आपल्या पूज्य साहित्यिक दैवतांना पाहण्याचा हा अपूर्व योग आहे असेही शांता शेळके म्हणतात. (साहित्यिकांचे हे दैवीकरण हाही एक काल्पनिक विश्व उभारण्याचाच भाग आहे. मराठी लेखक हवे तितक्यावेळा सहजपणे भेटतात, दिसतात. कारण बहुसंख्य साहित्यिक हे 'जत्रां'च्या शोधात सदासर्वकाळ असतात. पूर्वी सतत कविता करत हिंडणाऱ्या, कवितांची भेडाळी घेऊन फिरणाऱ्या सामान्य कवीची चेष्टा व्हायची. आज ही मंडळी कवितेऐवजी साहित्य समारंभ, साहित्य पुरस्काराचे नाना सोहोळे, तथाकथित प्रकट मुलाखती, प्रकाशन समारंभ, गल्लोगल्लीचे मेळावे, मंडळे, विविध लेखकांच्या जयंत्या, पुण्यतिथ्या, साठी-सत्तरीचे कौतुक सोहोळे अशा दररोज कुठे ना कुठे असणाऱ्या सार्वजनिक प्रसंगात न चुकता हजेरी लावतात. त्यांचे दर्शन दुर्लभ कसे ? आणि या दर्शनाचा आनंद तो काय असावा ? संमेलनामुळे लेखकात ऋणानुबंध निर्माण होतात असे शांता शेळके म्हणतात. हे खरे की खोटे हे साहित्यिकच जाणोत. पण व्यावहारिक हितसंबंधाची जपणूक होणे आणि पुढच्या समारंभाच्या सुपाऱ्या मिळणे हे मात्र निश्चित घडते.)

शांता शेळक्यांचा दलित, ग्रामीण, विभागीय, उपनगरीय अशा वेगवेगळ्या संमेलनांना विरोध नाही. फक्त अखिल भारतीय साहित्य संमेलनासही त्यांनी यावे असा शेवाळकर, कानेटकर यांच्यासारखाच त्यांचा आग्रह आहे. (शांता शेळके संमेलनाची उपयुक्तता फक्त लेखकांच्या अंगानेच पाहतात. वस्तुतः संमेलनात रसिक, वाचक, बघे हा वर्ग फार मोठा असतो. त्यांना संमेलनाचा काय फायदा याविषयी शेळके बोलत नाहीत. जमलेले श्रोते सर्व लेखकच आहेत अशी त्यांची समजूत तर नसावी ?)

द. मा. मिरासदारांना (१९९८) साहित्य संमेलनात अनेक विषयांवर चर्चा होतात म्हणून ते उपयुक्त वाटते. संमेलनातील चर्चास्थाने ही न्यायालये नव्हेत. तेथे अंतिम निर्णय होतोच असे नाही. मात्र प्रबोधन जरूर होते असे ते म्हणतात. साहित्य संमेलन हा मातृभाषेचा महोत्सव आहे (म्हणजे काय ?), समाजातील ती एक महत्त्वाची सांस्कृतिक घटना आहे असे त्यांना वाटते. साहित्य संमेलनात साहित्याच्या विकासाचा आढावा घेतला जातो, आकृतिबंधाची चिकित्सा होते, साहित्यातले चांगले-वाईट

ठरविले जाते असे एक मत आहे असे वसंत बापट (१९९९) म्हणतात. पण साहित्य मुळात भाषेवर अवलंबून असल्याने संमेलनात भाषेचा विचार व्हावा असे बापटांना वाटते.

एकंदरीत समाजाचे प्रबोधन करणे, साहित्य प्रश्नांची चर्चा करणे ही संमेलनाची उद्दिष्टे या तिसऱ्या पायरीवर सांगितली जातात. संमेलन हा एक महत्त्वाचा सांस्कृतिक सोहळा आहे असे काहीही विश्लेषण न देता एक मत मांडले जाते. वेगवेगळ्या संमेलनांना विरोध नको, पण या संमेलनात सर्वांनी एकत्र यावे हा आग्रह धरला जातो. ही एक दिलासा देणारी वृत्ती आहे मात्र संमेलनाच्या स्वरूपाबाबत सर्वत्र टीका होते असे दिसते आणि अध्यक्ष तिकडे दुर्लक्ष करून संमेलनात सामील होतात असेही एक वेगळेच चित्र या पायरीवर दिसते. संमेलनातील साहित्यविषयक भागाचा ऱ्हास आणि तरीही तो एक सांस्कृतिक सोहळा आहे असे मानण्याची वृत्ती यातून नाव देवाचे पण जत्रा मौजेची अशा स्वरूपाकडे साहित्य संमेलनही चालले आहे हे निश्चित. भारतीय परंपरेत अनेक ठिकाणी मूळ हेतू बाजूला पडून अनेक सामाजिक प्रसंग केवळ उत्सवात विलीन झालेले दिसतात—सण, जयंत्या, पुण्यतिथ्या, लग्न-सोहोळे, जत्रा, उरूस, नववर्षदिनासारखे धर्मनिरपेक्ष उत्सव ही याची उदाहरणे. साहित्य संमेलन याच रांगेत जाऊन बमत असताना त्याचा गंभीरपणे विचार होत नाही विचारवंत निर्बुद्ध उत्सवप्रियतेत मन:पूर्वक सामील होत नाहीत असे म्हणतात. येथे ते होतात यातून काय समजायचे बरे ?

## ३.३.२ (१५)

अध्यक्षांनी साहित्यावर होणारी कोणती टीका मांडली, त्याला काय उत्तरे दिली, स्वत: कोणती टीका केली याबाबत तिसऱ्या पायरीवर काय दिसते ?

नवलेखक फक्त शिव्या देतात, त्यांच्यात संयम व सूचकता नाही, नवकाव्य हे गद्य आहे अशी टीका पु. भा भावे (१९७७) करतात. गो. नी. दांडेकर (१९८१) काही टीकाकार ज्ञानेश्वरांना 'द्विजशूद्र' कल्पना वापरल्याबद्दल दोष देतात असे म्हणतात. दांडेकरांना तो केवळ दृष्टान्त वाटतो. ज्ञानेश्वरांना जातिव्यवस्था मान्य होती असा याचा अर्थ नव्हे असे ते म्हणतात. आपल्या स्वत:च्या लेखनातील पात्रांमधे व्यमिश्रता नाही हे टीकाकारांचे मत दांडेकरांना मान्य आहे. काही टीकाकार मला आपला मानीत नाहीत याचे वैषम्य त्यांना वाटत नाही. आपण बहुजनांचे लेखक आहोत असे ते म्हणतात. (टीकाकार विरुद्ध बहुजन, समीक्षेतील मूल्यमापन व लोकप्रियता या गोष्टीची गल्लत दांडेकरांप्रमाणे अनेक साहित्यिक करतात. पण आत्मवंचनेपलीकडे त्यातून काही साध्य होत नाही. आपल्याच साहित्यकृतीविषयी विस्ताराने आणि भावुकतेने बोलणारे दांडेकर हे पहिले अध्यक्ष आहेत. दुसऱ्या पायरीवर आ. रा. देशपांडे आपली मते मांडताना आपण स्वत:च्या साहित्यविषयी बोलत नाही आहोत असे आवर्जून सांगतात. देशपांडे ते दांडेकर हा प्रवास वैचारिक दृष्ट्या, वस्तुनिष्ठ विचार ते आत्मकेंद्री भावुकता या

स्वरूपाचा आहे.) दांडेकर आत्मसंतुष्ट आहेत, नार्सिसस आहेत असा आरोप टीकाकार करतात असे दांडेकर म्हणतात. याला त्यांचे उत्तर काय ? तर, ज्यांना त्यांचे जीवन माहीत आहे ते असं म्हणणार नाहीत हे ! (या उलट वयाच्या आठव्या वर्षापर्यंत रानजंगलात वाढलेल्या आपल्याला मराठी भाषा देखील येत नव्हती असे सांगणारे चोरघडे त्याचा स्वत:च्या साहित्याच्या समर्थनार्थ वापर करीत नाहीत. चोरघड्यांचे आत्मनिवेदन हा अध्यक्षीय भाषणाचा अनोखा नमुना आहे. त्यात कमालीचा प्रांजळपणा आहे, पण विचारही आहे. चोरघडे आत्मनिवदेनात आत्मरत होत नाहीत; दांडेकर सर्वकाळ आत्मरतच राहतात.)

दांडेकर टीकाकारांचे त्यांच्याविषयीचे आणखी एक मत मांडतात : दांडेकरांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या पुनरुज्जीवनवादी, पलायनवादी आहेत. याला दांडेकरांचे उत्तर काय ? तर आजचे जीवन दूर पळून जाण्यासारखेच आहे ! पूर्वजांचे स्मरण करणे योग्य असे ते म्हणतात. तिसरे म्हणजे शिवाजीच्या जीवनावर कादंबऱ्या लिहिण्यासाठी त्यांनी तीनशे ग्रंथ वाचले व सारा महाराष्ट्र पालथा घातला. (साहित्य विषयक टीकेला अ-साहित्यिक उत्तरे कशी देतात याचे उत्तम उदारहरण म्हणजे दांडेकरांचे भाषण. ग्रंथ वाचणारा माणूस, प्रवास करणारा माणूस पलायनवादी नसतो हे कसे ? शिवाय हा आरोप कादंबऱ्यांच्या संबंधातला आहे !) आपण वर्तमानकाळावरही लिहितो असे दांडेकर म्हणतात. एखाद्या विशिष्ट विषयांवरच लिहा असे म्हणणे ही तानाशाही झाली. दांडेकर तिचा जाहीर धिक्कार करतात. (अर्थात ही तानशाही काल्पनिक कारण मराठी साहित्याबाबत असा टोकाचा आग्रह धरणारा बलवंत वाचकांचा गट नाही की टीकाकारांचा.)

गंगाधर गाडगीळांना (१९८१) मराठी साहित्य बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनेच्या आहारी गेले आहे असे वाटते. मात्र नवे दलित साहित्य डोळस असल्याचे ते म्हणतात. ग्रामीण साहित्यही आक्रस्ताळेपणात अडकले होते. पण महानोरांसारखे कवी त्या लाटेत सापडले नाहीत. गाडगीळ बांधिलकीपासून दूर राहून उत्तम लेखन करणाऱ्यात जी. ए. कुलकर्णी, आरती प्रभू यांची गणना करतात.

व्यंकटेश माडगूळकर (१९८३) पक्षी, प्राणी व वनजीवन याकडे साहित्यिक अद्याप वळलेच नाहीत अशी तक्रार करतात. (या विषयांवर शास्त्रीय माहिती देण्यास माडगूळकर साहित्य म्हणणार नाहीत. या विषयांवर ललित-लेख लिहिणे हे साहित्य असे ते मानत असावेत. आज अशा तऱ्हेचे भरपूर लेखन मराठीत होते. पण त्याची गणना उच्च साहित्यात होत नाही, होणार नाही. शास्त्रीय किंवा वैचारिक लेखन, अर्धसाहित्य आणि साहित्य असे तीन प्रकार मानावे लागतील.)

शंकरराव खरात (१९८४) मध्यमवर्गीय लेखकांचे दलित आणि ग्रामीण जीवनावरचे साहित्य हे काल्पनिक म्हणून उथळ आहे असे म्हणतात (गंमत म्हणजे गंगाधर गाडगीळांना श्री. म. माटे, र. वा. दिघे, व्यंकटेश माडगूळकर हे ग्रामीण

विषयावर उत्तम साहित्य लिहिणारे लेखक वाटतात. येथे गाडगीळ बरोबर की खरात बरोबर हा प्रश्न विचारण्यापेक्षा साहित्याची महात्मता वाचक-सापेक्ष असते का हा प्रश्न विचारणे योग्य ठरेल. दलित लेखक जेव्हा आमची समीक्षाही वेगळी, आमचे कौरुप्यशास्त्र आहे असे म्हणतात तेव्हाही हा वाचक-सापेक्षतेचा प्रश्न उभा रहातोच. जातिबद्ध समाज हा एकजिनसी नसल्याने जातिनिष्ठ अशी वाचकसापेक्षता येणे अपरिहार्य होते की काय ?) मध्यमवर्गीय साहित्यिकांचे अनुभवविश्व संकुचित आहे; त्यांच्या अनुभवविश्वात बदल होत नाही. त्यामुळे ते साहित्य निर्जीव बनते (भरड साहित्याच्या उदयाचे हे खरे कारण. पण मग दलितांचे अनुभवविश्व फार विशाल असते असे तरी कशाच्या आधारावर म्हणायचे ? अनुभव वर्गबद्ध असेल तर तो दलितांचा काय किंवा मध्यमवर्गीयांचा काय, संकुचितच राहणार) या कोडलेपणामुळेच मध्यमवर्गीय साहित्यात लैंगिक विकृती, पलायनवाद, शून्यवाद येतात असे खरात म्हणतात. (खरातांचे हे निरीक्षण विचार करण्यासारखे आहे. मर्ढेकरांचा शून्यवाद, पेडसे, चित्रे यांच्या साहित्यातील लैंगिक विकृती, दांडेकर, इनामदार यांच्या ऐतिहासिक कादंबरी लेखनातला पलायनवाद या अंगाने जाणवतो.) मध्यमवर्गीय साहित्य हे जीवनाभिमुख नाही, ते एकाच वर्तुळात फिरत राहते. (पण हे भरड साहित्य व मध्यम साहित्याच्या बाबतच खरे आहे. उच्च साहित्यावर हा आरोप टिकणार नाही. दलित साहित्यातील भरड व मध्यम प्रतीच्या साहित्यातही हे दोष येतात. याचाच अर्थ पुन्हा साहित्य हे व्यक्तीची निर्मिती असते, जात वा वर्गाची नव्हे या निष्कर्षाकडे वळावे लागते. अभिजात साहित्यामधे मध्यमवर्गीय अनुभवाला स्थानच नाही किंवा मध्यमवर्गीयात प्रतिभावान साहित्यिक निपजणारच नाही अशी अनुमाने यातून काढणे सर्वथा चुकीच होईल.)

शंकर पाटील (१९८५) १९६५ नंतर मराठी कथा मागे पडली असे म्हणतात. (पाटील गंगाधर गाडगीळांना नवकथेचे प्रणेते मांडतात; 'सत्यकथे'च्या नवकथाकारांवरच्या ऋणाचा उल्लेख करतात आणि नवकथा १९७५ नंतर संपली असेही म्हणतात. पुढे शांता शेळके (१९९६) 'सत्यकथे'सारखी दर्जेदार मासिके बंद पडल्याने व्यथित होतात. पण १९६५ नंतर 'सत्यकथा' असूनही नवकथा का मागे पडावी हा प्रश्न उरतोच. खरे म्हणजे १९७५ नंतर नवकथाकारांची पहिली पिढी मागे पडली. पण १९७५ नंतरही नव्या पिढीचे कथाकार मराठीत होतेच.) याचे कारण समाजाच्या भिन्न स्तरातून लेखक येत नाहीत हे. पण नव्या दमाची दलित आत्मचरित्रे १९७५ पासून आली. (मग कथा हा आकृतिबंध मागे का पडला याची कारणे शोधायला हवीत. दलित संवेदनेला कथेपेक्षा आत्मचरित्र सोयीचे का वाटले ? त्यावर कलात्मकतेची बंधने आवश्यक नसतात म्हणून ? सामान्य निवेदन—कलात्मक पण सच्चे मनोगत—कलात्मक, कृत्रिम असे लबाडीचे स्वसमर्थन या तीनही पातळ्यांवर आत्मचरित्र तगू शकते म्हणून ?) दलित लेखकांचा अनोखा अनुभव, त्यांची भाषा यांचे कौतुक करत

खरात दलितांनी केवळ आत्मचरित्रात अडकून राहू नये असे सुचवतात.

वसंत कानेटकरांना (१९८८) जागतिक वाङ्मयात मराठी साहित्याचे मोल काय हा वादाचा विषय वाटतो (पण पु. शि. रेग्यांप्रमाणे ते नगण्य आहे असे मात्र त्यांना वाटत नाही. ही मानसिकता सावध पण वेगळी आहे.) मात्र मराठी मनावर संस्कार करण्याचे सामर्थ्य त्यात आहे असे त्यांना वाटते.

गेल्या चाळीस वर्षातील मराठी साहित्यातील नवकथा व नवकवितेने पूर्वीच्या कृत्रिम, साचलेपणाच्या साहित्यावर हल्ला करून क्रांती केली असे के. ज. पुरोहित (१९८९) म्हणतात. मात्र लवकरच नवसाहित्य हे आत्मलक्षी व रूपवादी झाले. त्यात जीवनानुभव नव्हता. आकृतिवाद व लयतत्त्वाचा साहित्य व समीक्षेवर गेली ४० वर्षे मोठा प्रभाव पडला. (थोडक्यात दुसऱ्या पायरीपासून मराठी साहित्य जीवनापासून दुरावून कृत्रिम कलाकुसरीत अडकले.) यात साहित्याचे रूप समजून घेण्याचा प्रयत्न आहे. पण केवळ रूपाला किती महत्त्व द्यायचे हा प्रश्न आहेच असे पुरोहित म्हणतात. आकृतिवाद हा ॲरिस्टॉटलपासून दिसतो. मात्र ॲरिस्टॉटल कला आपल्याला 'जाण' देते हेही मानतो. कला आनंद व ज्ञान देते. भाषा हे सामाजिक माध्यम असल्याने साहित्यातून सामाजिक जाण यायला हवी (हा तर्क विचित्र आहे. ज्याचे माध्यम त्याची जाण असे कलाकृतीत असते काय ?) आकृतिवादाने सामाजिक जाण आणण्याकडे दुर्लक्ष केले. त्यामुळेच बहुसंख्य वाचकांशी साहित्याचा संबंधच उरला नाही. यामुळेच वाचक लोकप्रिय अशा खपाच्या वाङ्मयाकडे वळतात. (हा तर्कही विवाद्य आहे. सामाजिक जाण नसल्यामुळे बहुसंख्य लोक साहित्याकडे पाठ फिरवतात हे मानले तर लोकप्रिय अशा भरड वाङ्मयात सामाजिक जाण असते असे म्हणावे लागेल. वस्तुत: चांगले अभिजात साहित्य असतानाही लोकप्रिय साहित्य असतेच. त्याला गरज-वाङ्मय म्हणतात ते याचमुळे. लोकप्रिय गरज वाङ्मयाच्या निर्मितीचे कारण आकृतिवादाच्या प्रसारात शोधणे गैर आहे.)

सामाजिक जाण असेल तर लोक ते वाचतील ? पुरोहितांना त्याची खात्री नाही. चांगले साहित्य लोक वाचत नाहीत अशी बरोबर उलटी तक्रार पुरोहितच करतात. (मुळात चांगले साहित्य म्हणजे काय ? हा विचार स्पष्ट नाही.) लोकांना काय हवे हे जाणून घेऊन लेखकाने लिहावे असेही पुरोहितांना वाटत नाही. (मग लोकांना सामाजिक जाण आणून देणारे साहित्य आवडते हे कळलेच कसे ? शिवाय तसे साहित्य लिहावे या सूचनेत एकप्रकारचा लोकानुनय आहेच. अन्यथा आकृतिवाद्यांना नावे ठेवणार कशी ? ते तर बिचारे वाचकांचे अस्तित्वच जमेस घरत नाहीत) वाचकाने लेखकाकडे जावे, लेखकाने वाचकाकडे जाऊ नये असे ते म्हणतात (यात थोडीशी घमेंड असल्याचा वास येतो.)

नवीन लेखन ही एक टूम आहे असा एक समज आहे असे पुरोहित म्हणतात.

आकृतिवादी किंवा लयतत्त्ववादी लेखकांनी तो दृढ करू नये. आपल्याकडे नववाङ्मयाची प्रेरणा परिस्थितीपेक्षा वाचनातून होते. नववाङ्मय फार आत्मरत झाले ते आकृतिवादाने. मराठी जीवनाशी त्याचा संबंध उरला नाही. (हाच तर आक्षेप सामाजिक बांधिलकीवाले नववाङ्मयावर घेतात. वाचनाने लेखनाची स्फूर्ती येते हा विचार दुसऱ्या पायरीवर पु. ल. देशपांडेही मांडतात. व्यंकटेश माडगूळकर त्याचा पुनरुच्चार करतात. के. ज. पुरोहितही त्याचा उल्लेख करतात पण वेगळ्या अंगाने वाचनातून स्फूर्त झालेले साहित्य हे अनुकरणाच्या पलीकडे जात नाही. भाषांतर, रूपांतर व अनुकरण यातच ही स्फूर्ती बहुधा परिणत होते. पु. ल. देशपांडे यांचे साहित्य-लेखन या प्रकारचे आहे. पण साहित्य-निर्मितीमागच्या या प्रेरणेचे फार कौतुक करणे धोक्याचे आहे. वाचून वाचून लिहायला लागणे, पाहून पाहून अभिनय करण्यात पडणे वगैरे प्रकार दुय्यम स्थानावरचे आहेत. पुरोहित म्हणतात त्याप्रमाणे अशा वाङ्मय-निर्मितीचा संबंध प्रत्यक्ष जीवनाशी नसतो. बांधिलकीवाले ज्याला काल्पनिक विश्वात रमणारे साहित्य म्हणतात ते काल्पनिक विश्व हे खरे म्हणजे स्वकल्पनेतून आलेले नसतेच, ते अनुकरणातून आलेले असेच बरेचदा दिसते. अनुईच्या 'बेकेट' मधील कल्पनारचित ऐतिहासिक जग आणि कानेटकरांच्या 'बेइमान' मधील कल्पनारचित उद्योगपतीचे जग यात गुणात्मक फरक पडतो तो स्व-रचित विरुद्ध अनुकरण या मूळ प्रक्रियेमुळे.)

आकृतिवादी लेखकांपेक्षा वाङ्मय वठवून दाखवणाऱ्या मंडळींनी अभिरुचीचे अधिक नुकसान केले आहे असे पुरोहित म्हणतात. त्यांचा रोख कथाकथनाच्या कार्यक्रमावर आहे. कथाकथनाने वाङ्मय लोकांपर्यंत पोहोचते हे त्यांना मान्य. प्रयोगजीवी कलेलाही त्यांचा आक्षेप नाही पण कथाकथनात कथेचे कथापण हरवते. (म्हणजे काय होते ? मिरासदारांच्या विनोदी कथा या वाचण्यापेक्षा ऐकण्यात मजा आहे असे कोणी म्हटले तर ? कळसेकरांच्या कविता फक्त ऐकतानाच बऱ्या वाटतात असे कोणी म्हटले तर ? उलट जी. ए. कुलकर्ण्यांच्या कथेचे वाचन/कथन किंवा मर्ढेकरांच्या कवितेचे प्रकट वाचन हे बरे वाटत नाही. शेवाळकर एकीकडे कीर्तन-प्रवचनाला वाङ्मय म्हणा असे सांगतात तर इकडे पुरोहितांना वाङ्मय फक्त लेखन-वाचन या स्वरूपातच हवे. यात विरोधाभास नाही; साहित्याच्या स्वरूपाविषयीचा हा प्रश्न आहे. मौखिक परंपरेतून लिखित परंपरेत साहित्य येण्यात फक्त संप्रेषण-मार्गाचा फरक नव्हता, साहित्याच्या अंतर्गत स्वरूपात फेरबदल करणारा तो प्रवास आहे, याची चर्चा मराठी विचारवंतांकडून अपेक्षित असणे स्वाभाविक नाही का ? केवळ कथापण हरवते, काव्यत्व हरवते या शेऱ्यातून हाती काही लागत नाही. कारण मग प्रश्न येतो: कथापण म्हणजे काय ? काव्यत्त्व म्हणजे काय ?) वठवण्याच्या कलेमुळे साहित्य मनोरंजनाकडे झुकते असे पुरोहित म्हणत असतानाच मनोरंजन वाईट नव्हे असेही ते म्हणतात. पु. ल. देशपांडे यांच्या 'बटाट्याची चाळ' याचा प्रयोग त्यांना आवडतो, पण प्रयोग पाहिल्यावर

प्रेक्षकाला वाचनाची ओढ लागली पाहिजे (हे जरा विचित्रच आहे. नाटक पाहणे आणि नाटक वाचणे हे समान नव्हेत किंवा त्यात प्राधान्य-गौणत्वाचाही भाग नाही. वाचन ही केवळ प्रत्यक्ष प्रयोग पाहण्याच्या कृतीला एक पर्याय आहे अशी बाजू घेऊन कोणी वाचनाच्या गौणत्वावर हल्ला केला तर ? भाषेचे लिखित स्वरूप हे प्रधान-रूप नाही याचा त्याला यासाठी आधार घेता येईल. हे मत कसे खोडणार ? पुरोहितांची अडचण व्यावहारिक दिसते. पु. ल. देशपांड्यांच्या प्रयोगाला तर नावे ठेवता येत नाहीत व स्वत:च्या कथांचे कथाकथन होत नाही ही ती अडचण असावी. यात वैचारिक भूमिका आहे असे नाही. म्हणूनच 'कथा ही कथा म्हणूनच वाचली पाहिजे' अशा विधेय-द्विरूक्तीच्या विधानावर ते थांबतात.)

आपण जे करत नाही ते बरेच नव्हे अशी नकळतपणे भूमिका घेऊन पुरोहित मराठी नाटकांची स्थिती बरी नाही, ती उधारउसनवारीवरच चालतात, आपल्याकडे उत्तम वक्ते आहेत पण वक्तृत्त्वाची पातळी सामान्य आहे, साहित्यावरील व्याख्यानातून साहित्याची फक्त वक्तृत्वपूर्ण माहिती होते, पण त्यातून साहित्यानुभव वाढत नाही अशी टीका करतात. (मात्र ही टीका लिखित साहित्यालाही लागू पडते याचा विसर त्यांना पडतो. गंमत म्हणजे अध्यक्षीय विचार हे संमेलनात 'भाषणा'तूनच मांडावे लागतात त्याला मात्र ते तयार दिसतात.)

दूरदर्शन, आकाशवाणी ही माध्यमे वाङ्मयीन संस्कृतीस घातक आहेत असे पुरोहित म्हणतात. लेखक पैशाने मिंधे होतात, दूरदर्शन गाजर गवताप्रमाणे वाढत आहे वगैरे सामान्य स्वरूपाची टीका पुढे सुरू होते. यावरचे उपायही सामान्यच आहेत— म्हणजे सरकारने प्रकाशन संस्थांना मदत करणे, 'सत्यकथा' बंद पडू न देणे वगैरे. (कदाचित् पुरोहित लोकप्रिय भरड वाङ्मयावर टीका करत आहेत असे मानले तर ? तर मग त्यांची साहित्यविषयक कल्पना 'उच्चभ्रूंना आवडणारे वाङ्मय' अशी मर्यादित होईल. साहित्य समजण्यास रसिकता जोपासावी लागते असे म्हणण्यात साहित्य हे अशा रसिकता जोपासलेल्या विशिष्ट लोकांसाठीच आहे असा सुप्त भाव आहे.)

यू. म. पठाण (१९९०) संतसाहित्याने जगाला दिपवले असे गौरवोद्गार काढतात. (पठाणांचे जग केवढे ? आफ्रिका, रशिया, अमेरिका, मध्य आशिया या भागात आपले संतवाङ्मय पोहोचले की काय ? जगाचे सोडा, संतवाङ्मयाने सर्व भारतीय दिपून गेले असे कशाच्या आधारावर म्हणायचे ? दणदणीत अतिव्याप्त विधाने करणे म्हणजे विचार मांडणे अशी कल्पना पु. भा. भावे, विद्याधर गोखले, शेवाळकर, पठाण अशा अध्यक्षांची दिसते आणि तिसऱ्या पायरीवर ती स्पष्टपणे जाणवते.) संतसाहित्याने समाजप्रबोधन केले, त्याने स्त्रीशूद्रांना समानता दिली.

पठाण संतसाहित्यावरील आक्षेपांचा प्रथम उल्लेख करतात. (हे आक्षेप कोणी, कुठे, कोणत्या संदर्भात घेतले हे मात्र सांगत नाहीत.) संतसाहित्य हे निवृत्तीवादी आहे,

ते कालबाह्य आहे, संतांनी वर्णावर्ण विषमता स्वीकारली होती, संतसाहित्यात पोथीप्रामाण्य व कर्मकांड आहे, त्याचे मध्ययुगीन मराठी दुर्बोध आहे असे हे आक्षेप. यातील काही आक्षेपांना आपण या आधीच्या भागात उत्तरे दिली आहेत असेही पठाण म्हणतात. म्हणजे उदाहरणार्थ संतांनी समानतेची शिकवण दिली, त्यांनी लोकभाषा वापरली. (वस्तुत: ही उत्तरे नव्हेतच. वैदिक धर्मातील चातुर्वण्य व्यवस्था संतांनी मानली का नाकारली याचे उत्तर कोठे आहे ? मध्ययुगीन लोकभाषा आज दुर्बोध वाटते त्याचे काय ?) मात्र संतवाङ्मय कालबाह्य आहे का याचे उत्तर पठाण देतात. त्यांच्या मते संत साहित्यात उदात्त विचार आहेत व उदात्त विचार कालबाह्य होत नाहीत. विकारावर मात करून मनावर नियंत्रण ठेवा हे संतसाहित्य शिकवते. त्याची गरज आजही आहे. सत्-असत्‌चा विवेक संत करतात. तो आज केला तर समाजातील कितीतरी प्रश्न सुटतील (हा एक शुद्ध भाबडेपणा आहे किंवा खोटेपणा आहे असे कोणी म्हटले तर ? प्रचंड लोकसंख्या, नियोजनाचा अभाव, बेकारी यासारखे आजचे प्रश्न सत्-असत्‌चा विवेक करून कसे सुटणार ? शालेय व महाविद्यालयीन अभ्यासक्रमात संतसाहित्याचा अंतर्भाव करून मनावर संस्कार करता येतील हे खरे का ? मुळात संतसाहित्याचा अफाट विस्तार आहे. संस्कार व्हायचाच तर एका तरी संताच्या शिकवणुकीचे पूर्ण आकलन व्हायला हवे. शालेय किंवा महाविद्यालयीन शिक्षणात हे होणार नाही. चार-दोन अभंग पाठ्यपुस्तकात घालण्यावर संतसाहित्याचे पठाणांसारखे पुरस्कर्ते समाधान मानतात यामागे काय मानसिकता आहे ? दुसरे असे की साहित्याचा अभ्यास आणि विशिष्ट तत्त्वज्ञानाचे अध्ययन यांची गल्लत का करावी ? संतसाहित्याच्या अभ्यासकांचेच उदाहरण घेतले तर ते फार साधु वृत्तीचे आहेत, सत्-असत्‌चा विवेक करणारे आहेत, दर्याद्र, नि:स्पृह वगैरे आहेत असे छातीठोकपणे सांगता येईल ? किंबहुना ते तसे नाहीत असे मात्र छातीठोकपणे सांगता येईल. पठाणांना हे माहीत नसेल असे नाही. तरीही त्यांनी आक्षेपांना दिलेल्या या वरकरणी उत्तरांतून सूज्ञ माणसाने काय समजावे ? दुसऱ्या पायरीवर शं. दा. पेंडसे संतसाहित्यावर भावुकपणे बोलतात. ती भावुकताही पठाणांच्या भाषणात नाही. उलट तर्कशुद्ध विचारांचेही अस्तित्व कुठे जाणवत नाही. उदाहरणार्थ, संतांनी आध्यात्मिक लोकशाही आणली हा जुनाच विचार काहीही विवेचन न करता पठाण मांडतात.)

संतसाहित्याचे संग्रह करणाऱ्या विविध केंद्रांचे पठाणांनी दिलेले संदर्भ उपयुक्त आहेत. आपण स्वत: उर्वरित आयुष्यात संतसाहित्याचा संग्रह आणि त्याचे जतन हे काम करणार आहोत अशा वैयक्तिक निर्णयावर पठाणांचे भाषण संपते. आधुनिक साहित्यातील प्रस्थापितांचे साहित्य, ग्रामीण व दलित साहित्य, जनवादी साहित्य, बालवाङ्मय या सर्वांचीच भलावण पठाण करतात. शांता शेळक्यांसारखे सारे कसे छान छान अशा स्वरूपाचे चित्र ते रेखाटतात.

दुसऱ्या महायुद्धापूर्वी असलेले रविकिरणमंडळ, फडके-खांडेकर यांचे साहित्य हे जुने साहित्य तर १९४५ ते १९६५ मधले साहित्य हे नवे साहित्य असे मधु मंगेश कर्णिक (१९९०) म्हणतात. नव्या साहित्याने जुने साहित्य नाकारले कारण नव्या जाणिवा निर्माण झाल्या. पाश्चात्य साहित्यातील वैफल्याचा परिणाम मराठी साहित्यावर झाला. (या तथाकथित नव्या जाणिवांचे, वैफल्यग्रस्त मानसिकतेचे दर्शन मर्ढेकरांच्या काव्यात दिसते. पण सर्वच अध्यक्ष मर्ढेकरांना थोर कवी मानतात व इतरांना मात्र पाश्चात्य जाणिवांचे अनुकरण करणारे कवी मानतात. मर्ढेकर आणि इतर कवी यातील फरक कोणी सांगत नाही किंवा मर्ढेकरांच्या कवितेतील जीवनविषयक दृष्टिकोन एका अर्थी आयात केलेलाच होता असे म्हणण्याचे धाडसही कोणी करत नाही. मराठी साहित्यकारांची अशी दुटप्पी वृत्ती कशामुळे बनली असेल ? केशवसुत—मर्ढेकर— आणि पुढे शिरवाडकर यांचे दबदबे निर्माण करण्यामागे मराठी संस्कृतीतले कोणते प्रवाह कार्यरत होते ? शिवाय हे कवितेच्या बाबतच का झाले ? गडकऱ्यांचा नाट्यक्षेत्रातला दबदबा तत्कालिन साहित्य-जगात निर्माण केला गेला पण तो पुढे टिकला नाही. हरिभाऊ आपट्यांचा दबदबा कादंबरीलेखनात झालाच नाही. फक्त कवितेच्या बाबतीत असे का झाले ? या प्रश्नांचा विचार मराठी विचारवंतांनी फारसा केला नाही हे खरे.) मिरासदार, शंकर पाटील आणि आपण स्वत: यांची ग्रामीण कथा खरी ग्रामीण कथा नव्हती असे कर्णिक कबूल करतात. बोराडे, यादव, महानोर हे खरे ग्रामीण साहित्यिक. महात्मा फुले, कर्मवीर भाऊराव पाटील व डॉ. बाबासाहेब आंबडेकर यांच्या विचारातून निर्माण झालेली पिढी १९६५-७० मधे नव्याने लिहू लागली. जी. ए. कुलकर्णींच्या कथेवर पाश्चात्य विचारांचा, साहित्याचा प्रभाव होता तर खानोलकरांचे साहित्य अस्सल देशी वाणाचे होते असे कर्णिक म्हणतात. मराठी समीक्षकांनी ग्रामीण व दलित साहित्याची प्रथम दखलच घेतली नाही. नंतर त्याचे फक्त कौतुक केले पण समीक्षा केली नाही. समीक्षक कठीण लेखकांच्या मागे लागतात पण आपल्यासारख्या सोप्या लेखकांची समीक्षाच होत नाही अशी तक्रार कर्णिक करतात. (प्रश्न 'कठीण' विरुद्ध 'सोपा' याचा आहे की चांगले साहित्य विरुद्ध गरज साहित्य याचा आहे ? पु. ल. देशपांड्यांचे विनोदी लेखन 'सोप्या' गटात घेऊन कर्णिक आपल्या गटाला प्रतिष्ठा देऊ पाहतात हे मात्र खरे.) आस्वादक समीक्षा, भाषाविज्ञानाधिष्ठित समीक्षा, मनोवैज्ञानिक समीक्षा वगैरे प्रकार कर्णिकांना फारसे मानवत नाहीत. समीक्षकांचे न्यून दाखवण्यासाठी केशवसुतांच्या कवितेमधे भाषेचा ओबडधोबडपणा आहे, त्यात वृत्तशैथिल्य आहे असे म्हणणाऱ्या तत्कालिन समीक्षकाचे एक अवतरण ते देतात (पण (न. चिं. केळकरांचे) हे मत खोटे आहे असे सिद्ध करत नाहीत. केशवसुत, मर्ढेकर यांना हात न लावणे हेच बरे अशी भाबडी भूमिका या मागे आहे.) उलट त्यांच्या आवडीच्या दोन-चार आस्वादक समीक्षकांची ते स्तुतीही करतात. (सोपे वाङ्मय व सोपी, कौतुकाची समीक्षा आणि

वैयक्तिक जिव्हाळ्याच्या अनुषंगाने साहित्याची भलावण पण वैचारिक दृष्ट्या अत्यंत ढिसाळ असा एकंदर मामला कर्णिकांच्या टीकेत आहे.)

१९३२ साली सयाजीराव गायकवाडांनी मराठी साहित्य हे विशिष्ट वर्गाचे (म्हणजे ब्राह्मण वर्गाचे किंवा पुढे त्याला 'मध्यम वर्ग' असे गोडस नाव मिळाले त्याचे) असल्याची टीका केली होती त्याचा संदर्भ देऊन रमेश मंत्री (१९९२) गेल्या ६० वर्षात मराठी साहित्यातील अनुभवकक्षा रुंदावल्याचे सांगतात (मंत्री गायकवाडांचे मत मांडतात. पण १९७९ साली गं. बा. सरदार अजूनही मराठी साहित्य हे पांढरपेशा मध्यमवर्गीय मनोवृत्तीचे आहे असे म्हणतात तिकडे का लक्ष देत नाहीत ?) नभोवाणी व दूरदर्शन ही साहित्य-प्रसाराची साधने आहेत असे के. ज. पुरोहितांच्या बरोबर उलटे मत ते मांडतात. इंग्रजी माध्यमाच्या शाळा असल्या तरी मराठी आहेच असे आशादायी चित्र ते रेखाटतात (एक बरे आहे. उठसूट इंग्रजी माध्यमाने मराठीची गळचेपी झाली, होते हे जुने व सततचे रडगाणे मंत्री गात नाहीत.) मराठी साहित्यामधे सामाजिक जाणीव आहे असे मंत्री म्हणतात. १९३२ च्या संमेलनात गायकवाडांनी दर्यावर्दीपणावर मराठीत पुस्तक नाही असे म्हटले होते. आता त्यावर २५ पुस्तके आहेत. सर्व वर्गाचे व सर्व व्यवसायाचे लोक मराठीत लिहितात. हे लक्षण चांगले आहे. (मंत्री पुन्हा एकदा साहित्यामधे केवळ ललित साहित्य न घालता इतर वैचारिक लेखनाचाही अंतर्भाव करतात.) दुसऱ्या महायुद्धातून आलेल्या निराशेने मर्ढेकरांचे काव्य भरलेले आहे. ते वास्तववादी काव्य आहे. त्याआधीचे बालकवी हे आनंद देणाऱ्या निसर्ग-कविता लिहीत. मराठी लेखिकांची परंपरा जुनी आहे. पूर्वी स्त्रिया आत्मचरित्रे लिहीत; पण त्यात पतीच्या सेवेचे कौतुक होते. आता स्त्रिया स्वतंत्र व्यक्ती म्हणून लिहितात. स्त्रीवादी आत्मचरित्रात पुरुषांच्या उणिवांचे मुक्तपणे विश्लेषण होते. इतर प्रांतात न दिसणारी अशी स्वतंत्र वृत्ती मराठी लेखिकांमधे आहे असे मंत्री म्हणतात. सुरुवातीचे दलित लेखन हे ढोबळ स्वरूपाचे होते. पण आता त्यात डोळसपणा आला आहे. धर्मांतर करूनही जातता जात नाही असे विदारक सत्य आज दलित साहित्यात मांडले जाते. गुणवत्तेने मराठी दलित साहित्य भारतात श्रेष्ठ आहे. आपण पक्षी व वन्यजीवन यावर लिहीत नाही असे व्यंकटेश माडगूळकर (१९८३) मधे म्हणतात तर १९९२ मधे मंत्री या विषयांवर मराठीत चांगले लेखन सुरू झाल्याचे सांगून माडगूळकरांचेच नाव घेतात (आपण ज्यावर लिहितो तो विषय उपेक्षित आहे असे म्हणण्याची पद्धत मराठी विचारवंतात दिसते. उदाहरणार्थ, ना. सं. इनामदारांना ऐतिहासिक कादंबरी उपेक्षित वाटते, गो. नी. दांडेकरांना बोधवाङ्मय उपेक्षित वाटते, तर कर्णिकांना 'सोपे' लेखन उपेक्षित राहते असे वाटते. मंत्र्यांनाही विनोदी वाङ्मयाची उपेक्षा जाणवतेच. यामागे आपल्या विषयाचा प्रचार करण्याचा हेतू असावा.) मराठी नाटके इतर भारतीय भाषातील नाटकांपेक्षा श्रेष्ठ आहेत. पण मराठी कादंबरी मात्र त्यामानाने मागे आहे असे मंत्री

म्हणतात. मराठीची पूर्वीची चित्रपट परंपरा सुद्धा आता मागे पडली आहे.

आवेशपूर्ण गद्यप्राय उद्‌गार म्हणजे नवकाव्य असे राम शेवाळकर (१९९४) म्हणतात. त्याला लयतालाचे बंधन नाही. कवित्व आवश्यक नाही. बांधिलकी, सामाजिक आशय व काव्यात्मकता हे नवे निकष पण तेही कदाचित् जातील. कवितेबाबतच्या नाजुकसाजूक कल्पना मागे पडल्या. मर्ढेकर, सुर्वेच नव्हेत तर महानोर, ग्रेस यांचे काव्यही आकृतिवाद्यांना अवघड वाटते. मराठीतील कोशवाङ्मयाचे शेवाळकर कौतुक करतात. बारीकसारिक वस्तुसंग्रहालयांची नावे घेताना राजा केळकर संग्रहालय मात्र राहून जाते.

नव्या समाजाचे साहित्य ते नवसाहित्य अशी व्याख्या नारायण सुर्वे (१९९५) करतात. बाबुराव बागुलांच्या कथा, नामदेव ढसाळ, यशवंत मनोहर यांच्या कविता, लक्ष्मण माने, दया पवार यांचे लेखन, रावसाहेब कसबे व जनार्दन वाघमारे यांची समीक्षा हे नवे साहित्य—१९६० ते १९८० च्या कालखंडातले. स्त्रीवादी साहित्य नवेच. या नव्या साहित्याने प्रस्थापितांना हादरवून सोडले, वैचारिक कलह सुरू केले. पूर्वी साहित्यिकाने साहित्यिक म्हणूनच रहावे अशी भूमिका होती. नवसाहित्याचा साहित्यिक राजकारण व समाजकारण यांचे भान असलेला कार्यकर्ता होता. साहित्य हे जगण्याचे सामर्थ्य देते यावर त्याचा विश्वास होता. पूर्वी साहित्याने मूल्यांची प्रतिष्ठा न ठेवल्याने केवळ सौंदर्य व आनंद यांचा आग्रह धरल्याने जीवनात अमानवता व पाशवीपणा वाढत गेला असे सुर्वे म्हणतात. (पहिल्या पायरीवरील वा. म. जोशीप्रमाणे साहित्य व नैतिकता यांचा दृढ संबंध आहे असे सुर्वे मानतात.) नव्या साहित्याने सुखासीन प्रवृत्ती व पायघोळ इंग्रजी झग्याखाली मिरवणाऱ्या समीक्षेलाही नाकारले. १९६० पूर्वीच्या मध्यमवर्गीय लेखनात संपूर्ण महाराष्ट्राचे चित्रण होतच नव्हते, फक्त तसा आभास निर्माण केला जात होता. ते साहित्य स्वप्नरंजनात्मक वास्तवात गुंतले होते. नवसाहित्याने यातून साहित्याला वास्तवाकडे खेचून आणले. १९६० ते १९८० हा काळ बहुजनांच्या वाङ्मयनिर्मितीचा रसरशीत कालखंड होता असे सुर्वे म्हणतात. आज या साहित्याला पुन्हा एकदा थांबलेपण आले आहे. नवकवीमधे कार्यकर्ते आहेत पण त्यांत अभ्यासाचा अभाव आहे. त्यांच्या लेखनात त्यामुळे रितेपण आहे. बहुजन समाजातील साहित्याच्या उगमाचा, विस्ताराचा आणि त्याला आलेल्या मरगळीचा नेटकेपणाने सुर्वे आढावा घेतात.

शांता शेळके (१९९६) फार अभावानेच आणि अतिशय संयमाने टीका करताना दिसतात. रविकिरण मंडळातील कवीनी 'न्याहरीचा वखुत होईल', 'तिन्हीसांजा', 'भलरी', 'लेजीम' सारख्या ग्रामीण जीवनावर कविता लिहिल्या पण त्या कृतक ग्रामीण कविता होत्या असे त्या म्हणतात. कृषिजीवनाचा अस्सल अनुभव असलेले अनेक दुय्यम दर्जाचे कवी लिहू लागले (नकळतपणे केवळ अनुभवाची अस्सलता ही साहित्यिकतेचा

दावा करू शकत नाही असे यातून कळते.) वेगवेगळ्या वाचनमाला चालविणारे १९३० ते १९४० च्या सुमाराचे लेखक हे सामान्य प्रतीचे होते तरी त्यांची भाषा मराठमोळा होती (पहिल्या पायरीवर आणि दुसऱ्या पायरीवरही मासिके व माला यामुळे सामान्य प्रतीचे साहित्य मराठीत पैदा होते अशी तक्रार आलेली आहे; शांता शेळके वाईटातले चांगले शोधतात ते असे. पु. शि. रेगे सुद्धा सामान्य काव्यातही काव्यगुण शोधतात.) पूर्वी लेखक केवळ हौसेपोटी लेखन करीत; आज लेखकांना भरपूर पारितोषिके मिळतात असेही शांता शेळके म्हणतात.

कविता श्रेष्ठ की गीत श्रेष्ठ या वादाचा शांता शेळके उल्लेख करतात. (खरा वाद गीत हे कविता आहे का असा आहे. दुसऱ्या पायरीवर गीतलेखकाला काव्यलेखनाचा सन्मान मिळत नाही अशी खंत ग. दि. माडगूळकर करतात. गीतात काव्यात्मकतेचा अंश असतोच; पद्यमय रचना ही काव्यात्मकतेचे एक अंग आहे. पण केवळ पद्यमय रचना म्हणजे काव्य नव्हे. संस्कृतातील सर्वच ग्रंथ स्मृति-सुलभ होण्यासाठी पद्यात रचले गेले. पाणिनीचे व्याकरण, काव्यशास्त्रावरचे वामन, रूद्रट, भामह यांचे ग्रंथ, भरताचे नाट्यशास्त्र, एवढेच काय कौटिलीय अर्थशास्त्रातील अनेक भाग पद्यमय आहेत. पण ते काव्य आहे असा दावा संस्कृत साहित्यशास्त्रकारांनी कधी केला नाही. पद्यमयतेत गेयता सुलभ होते—जरी गेयतेला केवळ पद्यमयता लागते असे नव्हे. म्हणून गीतात पद्यमयता असते. भाषेची नैसर्गिक लय ही अक्षरगणवृत्ते आणि मात्रावृत्ते यात पकडण्याचा यशस्वी प्रयत्न मराठी कवितेने प्रारंभीच्या काळात केला. छंदमुक्त काव्य नंतर आले. पण छंदमुक्तता म्हणजे लय नसणेच हेही खरे नाही. छंदोमयता, छंदमुक्तता, गेय-रचना या सर्व भाषेची लय पकडण्याच्या क्लुप्त्या आहेत. लय असणे ही काव्यात्मकतेची आवश्यक मागणी आहे पण ती पुरेशी मागणी नव्हे. छंदमुक्त आणि काव्यहीन रचना जशी संभवते तशीच गेय पण काव्यहीन रचनाही संभवते. त्यामुळे गीतकाराला थेट चांगला कवी मानणे शक्यही नाही. 'नक्षिदार अति रम्य मंडपी । जमली सारी थोर मंडळी' या माडगूळकरांच्या गीतरचनेत किंवा 'कशी इकडचं घेऊ नाव । माझं गुपित मजला ठाव । तिरक्या पावलांचा झाला ग भोवरा । भरून भरून आभाळ आलंय् ।' या शांता शेळक्यांच्या गीतरचनेत काव्य कसं शोधणार ? कवितेला जो एक भाव असतो, जो विचार असतो तो अखंड असतो; गीतात शब्दांच्या जोडणीत हे अखंडत्व हरवते; कशानंतर काहीही येते. गीत आणि काव्यातील साधर्म्य आणि वैधर्म्य यांचा विचार ना ग. दि. माडगूळकरांनी मांडला, ना शांता शेळक्यांनी.) या वादात ग. दि. माडगूळकर उपेक्षित राहिले असे शांता शेळके म्हणतात. (खरे म्हणजे हा वाद संमेलनाच्या अध्यक्षपदावरून प्रथम ग. दि. माडगूळकरांनीच मांडला. ग. दि. माडगूळकर आणि शांना शेळके हे दोन गीतकार साहित्य संमेलनाचे अध्यक्ष झाले यात गीतकारांची उपेक्षा झाली हे कसे ?)

नाविन्याच्या हव्यासापोटी कित्येक तरुण कवी केवळ अनुकरण करतात आणि त्यांची कविता सामान्य ठरते असे शांता शेळके म्हणतात. मराठीत मर्ढेकरांची खूप अनुकरणे झाली; दलित कवितेत नारायण सुर्व्यांचे अनुकरण झाले. मात्र आपण पूर्वी ऐकलेल्या प्रसिद्ध वचनांचे पुनर्योजन करणे म्हणजे श्रुतयोजन अशी व्याख्या करून त्या श्रुतयोजनाचे समर्थन करतात. ज्ञानेश्वर, तुकाराम श्रुतयोजन करतात; गडकरी, पु. ल. देशपांडे श्रुतयोजन करतात. चांगले वाङ्मय वाचून ते मनात मुरते. मग काही दिवसांनी ते वेगळ्या रूपाने प्रकटही होते. हे श्रुतयोजन, वाङ्मय-चौर्य नव्हे. (परंपरेने आलेले विचार, प्रतिमा, उपमा हे सांस्कृतिक संचित असते. संस्कृतीचा विशेष म्हणून या गोष्टी विशिष्ट संस्कृतीत पुन्हा पुन्हा प्रकट होतात. साहित्याच्या संदर्भात याला श्रुतयोजन म्हणावे असे शांता शेळके म्हणतात. निर्मितीकाराच्या भूमिकेतून मांडलेला हा मुद्दा महत्त्वाचा आहे. साहित्यात तसे संपूर्ण नवीन असे काही नसते. पण त्या त्या कलाकृतीत जुन्याचे पुनरागमन नवीनच असते. भारतीय साहित्यात रामायण, महाभारत यांच्या विविध आवृत्त्या निघाल्या आणि तरीही त्या स्वतंत्र रचना होत्या. तुलसीदासांचे रामायण हे वाल्मिकीचे रामायण नव्हे आणि 'ज्ञानेश्वरी' ही 'भगवद्‌गीता' नव्हे हे खरेच. मात्र श्रुतयोजन आणि वाङ्मय-चौर्य यांच्यातील साधर्म्य-वैधर्म्याचा विचार व्हायला हवा. तेंडुलकरांच्या नाटकांचे मूळ स्रोत मराठी समीक्षकांनी शोधून काढले. व्यंकटेश माडगूळकरांच्या 'सत्तांतर' चा मूळ उगमही समीक्षकांनी दाखवला. पु. ल. देशपांड्यांच्या तर सर्वच नाट्यकृती परकीय नाटकांवर बेतलेल्या. या सर्वांना केवळ श्रुतयोजन म्हणायचे ? दुसऱ्याची कृती जशीच्या तशी आपल्या नावावर छापणे एवढी वाङ्मयचौर्याची व्याप्ती मर्यादित करायची की काय ? साहित्यिक जेव्हा दुसऱ्याचा माल साफसूफ करून, डागडुजी करून, नवीन शब्दरचनेने नटवून-थटवून आकर्षक पद्धतीने मागणीनुसार पुरवण्याची भूमिका घेतो तेव्हा श्रुतयोजन हेच निर्मितीचे प्रमुख अंग बनते असे म्हटले तर ? गाथासप्तशती पासून ते कालिदासापर्यंतच्या संस्कृत काव्याचे आधार घेत शांता शेळके स्वत: गीतरचना करतात. त्याला श्रुतयोजन म्हटले तरी ही निर्मिती दुय्यम स्वरूपाची राहते हे नाकारता येणार नाही. ज्ञानेश्वर, तुकारामांना त्या गटात ओढण्यात गफलत आहे. ज्ञानेश्वर उघडपणे गीतेचाच भावार्थ सांगण्याची भूमिका घेतात. त्यात श्रुतयोजनाचा प्रश्नच येत नाही. तुकारामांच्या अभंगात परंपरेने आलेल्या कथा, दाखले, उपमा येतात पण त्याखेरीजही स्वत:चे असे बरेच काही येते. शिवाय पु. शि. रेगे म्हणतात त्याप्रमाणे संतांनी कधी साहित्यिकीचा दावा केला नाही. इंग्रजी अंमलात सुरू झालेले आधुनिक मराठी वाङ्मय हे परपुष्ट आहे अशी टीका पहिल्या पायरीपासूनच होताना दिसते. वा. म. जोशी वाङ्मय चौर्याचा उल्लेख करतात. श्रुतयोजन हे काही त्याचे समर्थन ठरणार नाही. किंबहुना श्रुतयोजन बाजूला टाकल्याखेरीज अस्सल मराठी साहित्यनिर्मिती होणारही नाही.)

मर्ढेकरांनी जुन्या परिचित कवितांचे विरुपीकरण करून कविता लिहिली असे शांता शेळके म्हणतात. (पण विरुपीकरणाचा श्रुतयोजनाशी संबंध जोडण्याचे कारण नाही. वाचकांच्या संवेदनशीलतेला धक्का देण्याचा विरूपीकरण हा मार्ग आहे. पण त्याचा संबंध संवेदनशीलतेशी आहे, परिचित पंक्तीच्या केवळ स्मृतीशी नाही.) मराठीत परभाषेतील साहित्याचा मोठ्या प्रमाणावर अनुवाद व्हावा असेही शांता शेळक्यांना वाटते.

ना. सं. इनामदार (१९९७) स्वातंत्र्यपूर्व काळातील ऐतिहासिक कादंबरी— विशेषत: हरिभाऊ आपट्यांची कादंबरी आदर्शवादात अडकून पडली होती असे म्हणतात. आधुनिक मराठी ऐतिहासिक कादंबरीत असा आदर्शवाद नाही. ती ऐतिहासिक सत्य शोधते असे त्यांचे मत आहे. (राष्ट्रप्रेमाच्या प्रेरणेने इतिहास सांगणे याला इनामदार आदर्शवाद म्हणताना दिसतात. ती त्या काळची गरज होती असेही ते म्हणतात. इतिहाससंशोधकांनी फक्त साधने जमविली, ते इतिहासकार नव्हते असाही त्यांचा दावा आहे. म्हणजे राजवाडे, सरदेसाई हे संग्रहकार. त्या साधनातून, दस्तऐवजातून जो दिसतो तो खरा इतिहास असा त्यांचा दावा. पण हा दावा टिकणारा नाही. वास्तविकातून अर्थान्तरण करण्याचा प्रयत्न हाच मुळी सहेतुक असतो; तो केवळ वस्तुनिष्ठ नसतो. पूर्व घटनांचा, कागदपत्रांचा अर्थ लावणे, त्यात सुसूत्रता शोधणे हे इतिहासकाराचे कामच आहे. अर्थ लावणे म्हणजे अर्थान्तरण करणे आले की व्यक्तिनिष्ठता पूर्णपणे बाजूला ठेवताच येत नाही. इनामदारांचे ऐतिहासिक मत्य हे आपट्याच्या आदर्शवादापेक्षा कमी व्यक्तिनिष्ठ असेल पण ते पूर्णपणे वस्तुनिष्ठ आहे असे मानणे हा भ्रम आहे.)

द. मा. मिरासदारांच्या (१९९८) मते प्र. के. अत्रे आणि चिं. वि. जोशी हे शाब्दिक कोट्या करत नाहीत; त्यांचा विनोद स्वभावनिष्ठ व प्रसंगनिष्ठ असतो (मिरासदारांचे हे मत अत्र्यांबाबत पटणे अवघड आहे. अत्र्यांची अनेक पात्रे स्वत:चा स्वभाव, स्थान विसरून लेखकाच्या शाब्दिक कोट्या मुक्तपणे करतात.) चिं. वि जोशी अनुभवातली विसंगती बरोबर पकडतात. आपण स्वत: कोटी वापरत नाही असे मिरासदार म्हणतात. गंगाधर गाडगीळांचे अवतरण देत श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांची पांडुतात्या, सुदामा ही पात्रे फार ढोबळ आहेत असे ते म्हणतात या उलट चिं. वि. जोश्यांच्या चिमणराव, काऊ यांना स्वत:ची स्वभाववैशिष्ट्ये आहेत.

वसंत बापटांना (१९९९) आजची कविता छंदहीन असल्याने चैतन्यहीन वाटते. पूर्वी कवी इतरांचे अनुकरण करत, आता ते स्वत:चेच अनुकरण करतात. तात्कालिक विषयावर लोक कविता लिहितात आणि समीक्षकही तिचे कौतुक करतात. (समाज संबद्धता बापटांना नको असे दिसते. बापटांची समरगीते तात्कालिक नव्हती ? बापटांच्या प्रेमगीतात कोणती शाश्वतता आहे बरे ?) कविता नीट शिकवलीही जात

नाही अशी बापटांची तक्रार आहे. गद्यप्राय ओळीच्या चवडी म्हणजे आजची कविता. कविसंमेलने, कवितांच्या मैफली यांचा कवीला नाद लागणे वाईट. (स्वत: बापटांनी मात्र पाडगावकर, विं. दा. करंदीकर यांच्या संयुक्त प्रयोगात काव्यवाचनाचे भरपूर प्रयोग केले. अनेक संमेलनातही कविता गायल्या. उपदेश करताना मराठी विचारवंत आपले वर्तन सहजपणे विसरतात हे आश्चर्यच.)

नवकाव्य, समीक्षा, परभृतता, वाङ्मयचौर्य, बहुजन की अभिजन, मध्यमवर्गाचे मर्यादित अनुभव क्षेत्र, पद्यमयता हे जुनेच विषय या तिसऱ्या पायरीवर टीकेसाठी वापरले जातात. पहिल्या पायरीवर ही टीका वाचकाच्या भूमिकेतून प्रामुख्याने होते. दुसऱ्या पायरीवर साहित्यिक अध्यक्ष स्वत:ची साहित्यिक भूमिका मांडत साहित्यावर टीका करतो. दुसऱ्या पायरीवरील टीका अधिक प्रगल्भ, विस्तृत आणि सैद्धान्तिक आहे. तिसऱ्या पायरीवर मात्र टीकेचे स्वरूप फार वरवरचे आहे. त्यात शेरेबाजी डोकावते. तिसऱ्या पायरीवर साहित्याबाबत सैद्धान्तिक भूमिका नाही, साहित्याचा विचार इतर ज्ञानशाखांच्या संदर्भात होत नाही, टीकेची पातळी फारच सुमार आहे आणि समर्थनाचे स्वरूप कौतुक एवढेच आहे. एकंदरच साहित्यावरील टीकेचा विषय फारसा वैचारिक पद्धतीने हाताळलेला नाही.

### ३.३.२ (१६)

मराठीत चांगले साहित्य कसे निर्माण होईल ? या प्रश्नाचा फारसा विचार पहिल्या व दुसऱ्या पायरीवर झाला नाही. परभाषेतील—विशेषत: इंग्रजीमधील—साहित्याचे भाषांतर करणे हाच यावर प्रमुख उपाय सांगितला गेला. प्र. के. अत्रे साहित्य हा हौसेचा मामला न राहता तो एक व्यवसाय व्हावा असे म्हणतात. पु. शि. रेग्यांना मराठी वाचकांची संख्या व रसिकता वाढणे अगत्याचे वाटते. तिसऱ्या पायरीवर २२ पैकी ९ अध्यक्ष या प्रश्नांची दखल घेतात. म्हणजे संख्येच्या दृष्टीने या प्रश्नाकडे पाहण्यात सुधारणा आहे.

वा. कृ. चोरघडे (१९७९) एक नवीन मुद्दा मांडतात. शिक्षणात मराठी माध्यम होईपर्यंत मराठी साहित्य वाढणारच नाही असे त्यांना वाटते. (म्हणजे अखेर मराठी वाचक वाढायला हवेत हेच तात्पर्य.) सध्याची साहित्य-निर्मितीची स्थिती फक्त प्रकाशक, टीकाकार व संपादक यांना अनुकूल आहे. लेखकाकडून पैसे घेऊन प्रकाशन करण्याचा प्रकार चोरघड्यांना धक्कादायक वाटतो. अगोदरच तयार असलेले पन्नाशीचे लेखक प्रकाशक मिळवतात. नवीन लेखक त्यामुळे घडतच नाहीत. पूर्वी प्रकाशक व लेखक यांचे संबंध जिव्हाळ्याचे, मैत्रीचे होते. प्रकाशक लेखकाची काळजी घेत. आता ते राहिले नाही. (चोरघड्याना साहित्याची व्यावहारिक बाजू, साहित्यनिर्मितीमागचे अर्थकारण चांगले वाटत नाही. खरे म्हणजे पूर्वीही प्रकाशकांनी धंदा सोडला, केवळ साहित्यप्रेमाने

प्रकाशन व्यवसाय केला असे नाहीच. फक्त हे जगच एवढे लहान होते की व्यक्तिगत संबंध महत्त्वाचे बनत. अर्थात त्याचा तोटाही होता. आपल्या नात्यागोत्यातला, मित्रपरिवारातला, गावाकडचा, निदान आपल्या जाती-पोटजातीतला लेखक प्रकाशकांना जवळचा वाटे. मध्यमवर्गीय साहित्य सातत्याने टिकण्यात प्रकाशन-व्यवसायाचा या दृष्टीने हातभारच लागला. आजही दलित साहित्याचे, ग्रामीण साहित्याचे प्रकाशक त्याच वर्गातले असतात. त्याला अपवाद ज्यांच्या धंद्याचा पसारा वाढला आहे अशा काही मोजक्या प्रकाशकांचा. हौसेमुळे ज्यांना आपले साहित्यही प्रसिद्ध व्हावे असे वाटते त्यांनी ते स्वखर्चाने प्रसिद्ध केले तर बिघडले कुठे ? लेखक सारे प्रतिभावान पण गरीब आणि प्रकाशक सारे श्रीमंत आणि गुणग्राही अशी चोरघड्यांना वाटत असलेली आदर्श स्थिती पूर्वीही नव्हती आणि आजही नाही.)

गो. नी. दांडेकरांना भारतीय भाषातील विविध साहित्यकृतीची भाषांतरे मराठीत व्हावीत असे वाटते. केवळ कमिशन बघून ग्रंथालयांनी पुस्तकांची निवड करू नये; पुस्तकांची गुणवत्ता बघावी असे ते म्हणतात. परप्रांतीय प्रकाशकांना, मासिकांना महाराष्ट्रीय लोकांनी उत्तेजन द्यावे. (म्हणजे काय करावे ? इथल्याच प्रकाशकांचा व्यवसाय नीट चालत नाही असेही म्हटले जाते. म्हणून शासनाने त्यांची पुस्तके विकत घेऊन वाटावीत असे रेगे, शंकर पाटील वगैरे म्हणतात. परप्रांतीयांना मदत करा हे म्हणणे सोपे, व्यवहारात अवघड. परप्रांतीयांचा मराठी स्त्री-संशोधकांबाबतचा कटू अनुभव दांडेकरांच्या कानापर्यंत पोहोचला नाही ? गंमत म्हणजे मराठीतले पी. एच्. डी. चे प्रबंध प्रकाशित करण्याची सूचना दांडेकर आवर्जून करतात.)

केरळप्रमाणे साहित्यिकांनी सहकारी प्रकाशन संस्था काढावी असा साहित्य-प्रसाराचा उपाय व्यंकटेश माडगूळकर सुचवतात. (सहकारी संस्थातही व्यक्तीची मक्तेदारी येऊ शकते हा अनुभव जमेस धरायचाच नाही ?) साहित्य संस्कृती मंडळ नवीन लेखकांची पुस्तके छापते पण त्यांचा दर्जा चांगला नसतो. (एकंदरच मराठी विचारवंत शासनाने यंव करावे त्यंव करावे असे सतत उपदेशपर बोलतात. त्याचवेळी त्यातले धोके लक्षात घेत नाही. शासनही स्वतःच्या काही फायद्यांसाठी या सूचनांचा स्वीकार करून कार्यवाही करते. मग त्यावर टीका करण्यास परत हेच लोक पुढे सरसावतात. महाराष्ट्र राज्य निर्मिती, पुणे विद्यापीठ, साहित्य संस्कृती मंडळ, मराठी माध्यमाचा आग्रह, पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ आणि राज्य मराठी विकास परिषद या सर्वच बाबतीत हा अनुभव आहे. हे मराठी विचारवंतांचे वैचारिक दौर्बल्य म्हणावे की मराठी संस्कृतीचा वृत्तिविशेष म्हणावा ?) प्रत्येक घरी ग्रंथालय असले तर वाचनाची आवड वाढून साहित्य-निर्मितीला त्याचा फायदा होईल असे माडगूळकर म्हणतात. लेखकांनी स्वतःच्या अनुभवाशी प्रामाणिकपणा राखला तर चांगले साहित्य निर्माण होईल असाही विश्वास त्यांना वाटतो.

शंकर पाटील (१९८५) चांगले साहित्य निर्माण होण्यासाठी काही व्यावहारिक उपाय सुचवतात. त्यात चांगले मासिक काढणे, पारितोषिकांची रक्कम वाढवणे, शासनाने ग्रंथ खरेदी करणे, उत्तम प्रकाशनास पारितोषिक देणे हे ते उपाय.

के. ज. पुरोहितांना (१९८९) टी. व्ही संस्कृती वाढणे, 'सत्यकथा', 'हंस' सारखी मासिके बंद पडणे, प्रकाशन व्यवसायाला ओहोटी लागणे ही सर्व लक्षणे साहित्याच्या ऱ्हासाची लक्षणे वाटतात. यावर उपाय ? साहित्य हे संस्कृतीचे वाहन आहे यावर सर्वांची श्रद्धा बसायला हवी (हा उपाय कसा हे मात्र स्पष्ट होत नाही.) अर्थात त्यासाठी साहित्याचा दर्जा चांगला हवा (पण मग हा दर्जा घसरला म्हणून ही आपत्ती आली असे मानावे काय ?) सरकारने साक्षरतेबरोबर सुशिक्षितपणाही वाढवावा (हेही काम सरकारचे ! शासन हे संस्कृतीचा एक भाग आहे की संस्कृती हे शासनाचे केवळ एक खाते आहे ? आणि शासनाने सुशिक्षितपणा वाढवण्यासाठी नेमके काय करावे ?) साहित्य संस्कृती मंडळाची पुस्तके फुकट वाटणे, प्रकाशन संस्थांना संरक्षण देणे, महाराष्ट्राबाहेरच्या साहित्य संस्थांना मदत करणे असेही उपाय ते सुचवतात. (हा सर्व आतबट्ट्याचा व्यवहार आहे. साहित्यिकांसह समाजातील प्रत्येक लहान-मोठ्या गटाने शासनाकडे आर्थिक संरक्षण मागण्यात अर्थव्यवस्थेचे काय होईल इकडे कोणीच फारसे लक्ष देत नाही. जे टिकत नाही—मग ते मासिक असो, प्रकाशन-संस्था असो, छोटा उद्योग असो—ते मरू द्यावे ही भूमिका नेहमीच टाळणे अर्थशास्त्रदृष्ट्या कितपत शहाणपणाचे आहे ? शासनाने संस्कृती जगवावी, जपावी यामधे संस्कृती म्हणजे एक अबल पण मौलिक अशी काही चीज आहे आणि साहित्यिक वगैरे मंडळीच ती जाणतात अशी भूमिका आहे. वस्तुत: संस्कृती ही एकंदर सामाजिक व्यवहारातून, समाजाने स्वीकारलेल्या मूल्यातून प्रतीत होणारी गोष्ट आहे. ती नेहमी असतेच.)

शासनावर सर्वच गोष्टीबाबत अवलंबून राहण्याची शासनाकडे सतत काही तरी मागत राहण्याची वृत्ती दुसऱ्या व तिसऱ्या पायरीवर प्रकर्षाने जाणवते. शासनाने संस्कृती व साहित्य यावर शेतीप्रमाणे पैसे खर्च करावेत असा अव्यवहार्य सल्ला मधु मंगेश कर्णिक (१९९०) देतात. ग्रंथालयांना, मासिके चालवणाऱ्यांना शासनाने आर्थिक मदत करावी. 'सत्यकथा' बंद पडल्याचे अतोनात दु:ख त्यांना होते. ('सत्यकथे'चे असणे नसणे हे थेट मराठी साहित्य व संस्कृतीच्या असण्या-नसण्याशी तिसऱ्या पायरीवरचे बरेच अध्यक्ष जोडतात. याचे एक कारण असे की यातले बरेचसे साहित्यिक 'सत्यकथे'चे लेखक होते आणि 'सत्यकथे'मधे आपले साहित्य प्रसिद्ध होणे म्हणजे आपण प्रतिभावान आहोत असा समज 'सत्यकथे'ने पद्धतशीरपणे करून दिला होता. पहिल्या पायरीवर मराठी साहित्य हे मध्यमवर्गाचे मर्यादित साहित्य असा प्रवाद होता. १९५५ ते ८० च्या काळात मराठी साहित्य म्हणजे 'सत्यकथे'च्या लेखकांचे साहित्य असा मराठी साहित्याचा आवाका आणखी संकुचित झाला. सहा कोटी मराठी माणसांचे

साहित्य वार्षिक सुमारे फक्त १२०० पानातून आविष्कृत होते यात काही अनैसर्गिकता आहे, काही सांस्कृतिक दबाव आहे असे म्हणण्याचे किंवा तसा विचार करण्याचे संमेलन अध्यक्षांना सुचणे शक्य नव्हते. ज्यांना सुचले ते अध्यक्ष झाले नाहीत. दलित कविता 'सत्यकथे'तून येऊ लागली. पण पुढे दलित साहित्य हे 'सत्यकथे'च्या चौकटीतून बाहेर पडले हे लक्षणीय आहे. याच काळातील अनियतकालिकांची चळवळ ही सुद्धा हा संकुचितपणा न पटणाऱ्या साहित्यिकांची होती. मध्यमवर्गीय साहित्य—'सत्यकथे'सारख्या चार-दोन नियतकालिकात बद्ध होणारे साहित्य—अनियतकालिकांची अल्पजीवी चळवळ—दलित व ग्रामीण साहित्याचा स्वतंत्र रेटा—मध्यमवर्गीय साहित्यासकट सर्वच साहित्यांचे गटवार विभाजन हा प्रवास विचार करण्यासारखा आहे.)

रमेश मंत्री (१९९२) मासिके बंद पडली पण साप्ताहिके खूप चालतात असे म्हणतात. लाखोच्या घरात साप्ताहिके जातात महिन्यातून एकदा तरी या साप्ताहिकांनी चांगले साहित्य द्यावे म्हणजे चांगल्या साहित्य-निर्मितीस उत्तेजन मिळेल असे ते म्हणतात. (अर्थात् साहित्याने ही चोरवाट शोधावी असा याचा अर्थ होतो. यातून साप्ताहिकांचा खप घटणार नाही कशावरून ? मुख्य म्हणजे साहित्य माथी मारून ते वाढीला लागेल ही कल्पनाच साहित्याच्या क्षीण प्रभावाची कबुली नाही का ?) मराठीसाठी स्वतंत्र साहित्य अकादमी स्थापावी अशीही एक सूचना मंत्री करतात. परभाषकांशी आदानप्रदान करावे, भरपूर प्रवास करावा, प्रवासाने जाणिवा रुंदावून चांगले साहित्य निर्माण होते असे त्यांना वाटते (या वरवरच्या उपायांनी खरेच चांगले साहित्य निर्माण होईल असे वाटणे हा भाबडेपणा आहे.)

विद्याधर गोखल्यांना (१९९३) कागदाच्या किंमती वाढल्याने पुस्तकांच्या किंमती वाढल्या व म्हणून लोक पुस्तके विकत घेत नाहीत त्यामुळे चांगले साहित्य निर्माण होत नाही असे वाटते. टी. व्ही. च्या प्रसारावर उपाय म्हणून ग्रंथालये वाढवावीत असे त्यांना वाटते. ५००० ग्रंथालयांना शासन फक्त १००० रूपयांची वार्षिक अनुदाने देते आणि या ग्रंथालयातील ग्रंथनिवड समित्या वशिलेबाजीने भलतीच पुस्तके निवडतात अशी तक्रार ते करतात. मराठी ग्रंथप्रसार फार क्षीण आहे. ११००-१२०० ची पहिली प्रत खपण्यासच खूप दिवस लागतात. (मात्र प्रकाशक खरेच ११००-१२०० प्रती काढतात का याबाबत त्यांना शंका येत नाही.) सहकारी प्रकाशन संस्था काढून साहित्यिकांनी ही कोंडी फोडावी असे त्यांना वाटते. (इतरांनी केलेल्या सूचनाच गोखले अघळपघळ पद्धतीने करतात. गंमत म्हणजे लेखकांच्या सहकारी प्रकाशन संस्थेला शासनाने मदत करावी ही मागणी आहेच.)

शांता शळके (१९९६) साहित्याच्या पीछेहाटीला दूरदर्शनला जबाबदार धरतात. चांगली मासिके व भरपूर ग्रंथालये हवीत अशी त्यांची मागणी आहे.

य. दि. फडके (२०००) १९६० नंतर महाराष्ट्र शासनाने चांगले साहित्य

निर्माण होण्यास कसा हातभार लावला याचा आढावा घेतात (येथे राजकीय नेतृत्वाचे संमेलनांवरचे आक्रमण हा मुद्दा विसरायचा की काय ? या दोहोत संबंध नसतील ? शासन चांगले प्रयत्न करते आणि वाईटही असे म्हणायचे की शासनाचे काही प्रयत्न काही अध्यक्षांना आवडतात, काही आवडत नाही एवढेच म्हणायचे ?) 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ' शासनाने स्थापले. शब्दकोश व इतर ग्रंथासाठी भाषा सल्लागार मंडळ स्थापने (या सर्व कमिट्यांवर साहित्यकांची वर्णी लागल्यावर ते शासनाविषयी बरे बोलतील असाही या मागे हेतू नसेल कशावरून ?) फडके स्वतः १९९० ते १९९५ या काळात साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष होते. आपण अनेक प्रकल्पांना चालना दिली पण १९९५ नंतर त्यातील काही प्रकाशित झाले नाहीत ही त्यांची तक्रार (म्हणजे पुढचे अध्यक्ष तडफदार नव्हते हा ध्वनी) शासन मंडळाला लाखो रुपये देते पण तरी काही प्रकल्प पूर्ण होत नाहीत. याला साहित्यिकच जबाबदार आहेत असे मराठी शब्दकोश प्रकल्पाचा फडक्यांनी घेतलेल्या अनुभवावरून ते निष्कर्ष काढतात. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्यानंतर विश्वकोशाचे काम थंडावले हे दुसरे उदाहरण. मंडळाचे प्रकाशित ग्रंथ वितरित करण्याची व्यवस्था सदोष असल्याने पुस्तके धूळ खात पडतात असेही फडके सांगतात. महाराष्ट्र शासन नियतकालिकांना अनुदान देते. (फडके स्वतः अध्यक्ष असताना मराठी शब्दकोशाबाबत काही करू शकले नाहीत; वाङ्मयकोशाबाबतही त्यांचे प्रयत्न असफल झाले असे ते म्हणतात. पण मग इतर अध्यक्षांचीही हीच अडचण नसेल कशावरून ? मुख्य म्हणजे शासकीय मदत असतानाही साहित्यिकांचे प्रयत्न अपुरे का पडतात याचा विचार करायला हवा होता.)

तिसऱ्या पायरीवरच्या सूचनात एकंदरीत साहित्यनिर्मितीच्या विचारापेक्षा ग्रंथवितरणाच्या अर्थकारणाचा विचार जास्त आहे. त्यामुळे बहुतेक सर्व सूचना या तात्कालिक व व्यावहारिक स्वरूपाच्या आहेत. शासनाकडून मदतीची अपेक्षा आहे. मराठी माणूस आज साहित्य वाचायलाच तयार नाही म्हणून त्याला भुलवून वाचते कसे करावे असा विचार प्रामुख्याने होताना दिसतो. साहित्य ही समाजाची सांस्कृतिक गरज असते असे कुणाला वाटत नाही. औषधाप्रमाणे गोड बोलून, चकवून समाजाला साहित्य पाजायचे अशी भूमिका मात्र आहे. यात आपण निर्माण करतो ते आणि समाज जे सुखासुखी, आपण होऊन स्वीकारत नाही ते साहित्य चांगलेच आहे असे गृहित आहे. समाजाची सांस्कृतिक उंची आणि साहित्याची साहित्यिकता यात संबंध मानला जात नाही. चुकार मुलाला बळेबळे सन्मार्गाला लावण्याच्या प्रयत्नासारखा साहित्य-प्रसाराचा प्रयत्न मान्य दिसतो. शिवाय यात शासनाची भरघोस मदत हवी. रेशनसारखे स्वस्त दरात ग्रंथ घरोघर बळेच पाठवून लोक साहित्यप्रेमी होतील आणि हे रेशनचे साहित्य सकस असेल असे दोन भ्रम यामागे आहेत. मराठी माणसांच्या समग्र आर्थिक व्यवहारात साहित्याच्या अर्थव्यवहाराचा विचार झाला असता तर व्यावहारिक सूचनाही

मौलिक ठरल्या असल्या. पण तसे होत नाही. तुटीच्या अर्थसंकल्पात साहित्यप्रसारासाठी मोठी रक्कम देऊन तूट वाढविण्याच्याच सूचना जास्त आहेत. जे कालौघात लोकेच्छेने टिकते ते अभिजात साहित्य अशी भूमिका या विचारवंतांना मान्य नाही. आर्थिक मदतीने साहित्य पसरविता येते, टिकवता येते व शेवटी तेच श्रेष्ठ साहित्य म्हणून उरते असा गोड गैरसमज येथे दिसतो. त्याला कारणेही आहेत. स्वातंत्र्यानंतर शासकीय कौतुकाचे झरे इतके पाझरले की सामान्य वकूबांच्या लेखकांना आपण थोर असल्याचे भास होऊ लागले; संमेलनाचे अध्यक्ष झालो की थोर, अजरामर साहित्यिक झालो असेही भास त्यांना होऊ लागले. गेल्या पन्नास वर्षात त्या त्या काळात गौरवून घेतलेल्या साहित्यिकांच्या साहित्याचे आज काय स्थान आहे एवढा विचार जरी सुचला असता तरी साहित्यिकांचे पाय जमिनीवर राहिले असते. चांगले साहित्य निर्माण होण्यासाठी साहित्यिकांच्या मनोवृत्तीची, संवेदनशीलतेची आणि वाचकप्रतिसादाची चर्चा यामुळेच फार दूर राहते.

भाषेचा व्यवहारात वापर वाढला की तीमधले साहित्य आपोआप बहरते या मताचा के. ज. पुरोहित (१९८९) उल्लेख करतात. पण दुसऱ्या पायरीवर कुसुमावती देशपांड्यांनी उत्तम साहित्य-निर्मितीसाठी साहित्याच्या अध्यापनाचा विचार करायला हवा हा मांडलेला महत्त्वाचा विचार तिसऱ्या पायरीवर कुणीही करत नाही.

## ३.३.३
## भाषाविषयक

### ३.३.३ (१७)

संपूर्ण स्वातंत्र्य-राष्ट्रवाद-प्रांताभिमान या टप्प्यातून पहिल्या व दुसऱ्या पायऱ्यांवर मराठी भाषेचा विचार झाला. प्रथम मराठीवरील इंग्रजीच्या आक्रमणाचा, मग संस्कृतच्या आक्रमणाचा आणि मग हिंदीच्या आक्रमणाचाही विचार व निषेध या पायऱ्यांवर झाला. मराठी भाषिक अस्मितेशी प्रथम स्वातंत्र्याचा, मग स्वदेशाचा व स्वधर्माचा आणि मग स्वप्रांताचा संबंध जोडण्यात आला. स्वातंत्र्य, राष्ट्रभाषा, प्रांतरचना, राज्यभाषा, मराठी विद्यापीठ, मराठी माध्यम, राजभाषा हे विषय या अनुषंगाने चर्चेला आले. पहिल्या पायरीवर पटवर्धन व दुसऱ्या पायरीवर प्रियोळकर यांची संपूर्ण अध्यक्षीय भाषणे केवळ मराठी भाषेचा विचार करणारी होती तर पहिल्या पायरीवर माडखोलकरांचे भाषण केवळ संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीसंदर्भात होते.

पहिल्या पायरीवर ३१ पैकी २१ अध्यक्ष, दुसऱ्या पायरीवर २० पैकी १७ अध्यक्ष तर तिसऱ्या पायरीवर २२ पैकी १८ अध्यक्ष मराठी भाषेविषयी बोलतात. अर्थात् खास भाषेविषयी असे चिंतन अल्प प्रमाणात होते.

आकड्यांनी गणित आणि अक्षरांनी भाषा व साहित्य होते असा अगदी सोपा

विचार पु. भा. भावे (१९७७) मांडतात. पण पुढे गणित भाषेविना अशक्य असेही ते म्हणतात. लहान मुलाला ऐकून ऐकून भाषा आपोआप येते. (हे खरे, पण ते का घडते याची उत्सुकता भाव्यांना नाही.) आठ-दहा महिन्यात हुषार मुलाला भाषा येते व इतरांना ती एक दोन वर्षात येते असेही कोणताही प्रत्यक्ष पुरावा न देता ते सांगतात. भाषेचा माणसावर सतत परिणाम होतो. त्याची उदाहरणे मात्र भावे, रामदास, गडकरी यांच्या वाङ्मयातून देतात ! भाव्यांचा एकंदर विचार भावनिक वळणाचा आहे. भाषेचा वापर फक्त मनुष्यप्राण्यात आहे हे सत्य गं. बा. सरदार (१९७९) सांगतात. पण यावरून मग ते भाषा माणसाच्या संस्कृतीचे, सुधारणांचे वाहक आहे असे म्हणतात. व्यंकटेश माडगूळकरही (१९८३) भाषा हे साहित्याचे माध्यम व सामाजिक विनिमयाचे साधन मानतात. (वस्तुत: भाषेचा हा वापर आहे. वापर ही वस्तूची व्याख्या होऊ शकत नाही. भाषेला साहित्याचे माध्यम म्हणण्यात साहित्य ही चीज वेगळी व भाषा वेगळी हा अर्थ येतो. हे वेगळेपण सिद्ध करणे अशक्य आहे.)

माणसे रोज दैनंदिन जीवनात बोलतात तेही मौखिक साहित्यच असते असा एक वेगळा विचार विश्राम बेडेकर (१९८६) मांडतात. भाषेतील वाक्प्रचार, म्हणी या मौखिक साहित्याच्या खुणा आहेत. समाजातील परंपरेने आलेले मौखिक साहित्य हे अशा रीतीने भाषेत संचित होते (हे खरेच आहे. 'माझा वेळ वाया घालवू नकोस', 'किती वेळ खर्च केलास ?', 'जरा वेळ वाचवायला शिका', 'मला थोडा वेळ देशील ?' या दैनंदिन भाषेत वापरल्या जाणाऱ्या वाक्यातही 'वेळ म्हणजे पैसा' असे रुपक दडलेले आहे. हे साहित्यच; फक्त ती व्यक्तीची साहित्यकृती नव्हे. 'साप म्हणू नये धाकला, नवरा म्हणू नये आपला' या म्हणीतील तुलना, समांतर रचना ही साहित्याचीच खूण.)

भाषाशास्त्र सांगते की मातृभाषा ही एकच अशी भाषा आहे की जी शिकावी व शिकवावी लागत नाही असे वसंत कानेटकर (१९८८) म्हणतात. (येथे मातृभाषा म्हणजे जन्मदात्या आईची भाषा असा अर्थ न घेता लहानपणापासून मुलाच्या कानावर जी भाषा पडते ती भाषा असा अर्थ घेतला तरच कानेटकरांचे विधान भाषाशास्त्रीय विधान होईल. कानेटकर शालेय शिक्षणात मराठी माध्यमाचा आग्रह या संदर्भात करतात. पण मग जी भाषा शिकवावी लागत नाही ती शाळेत शिकवण्याचा आग्रह करण्यात विसंगती येते. तिचे निराकरण कानेटकर करत नाहीत.) मातृभाषा नीट आली तर परभाषा किंवा दुसरी भाषा येऊ शकते असेही एक विधान कानेटकर करतात. (हे खरे नाही. मातृभाषेवर बेताचे प्रभुत्त्व व परभाषेवर उत्तम प्रभुत्व अशी परिस्थिती उद्‌भवायलाच नको. पण ती उद्‌भवते.)

भाषेबाबत बोलताना मराठी विचारवंत भाषाविज्ञानाचा उल्लेख करतात. पण तो फार जुजबी स्वरूपाचा आहे. भाषेला सामाजिक संस्था मानून भाषेच्या संरचनेबाबतचे

१९६० पर्यंतच्या पाश्चात्त्य भाषाविज्ञानाचे सिद्धान्त किंवा त्यानंतरचे भाषिक क्षमतेबाबतचे भाषाविज्ञानातील सिद्धान्त यांचा गंधही एकाही अध्यक्षाला नाही. खरे म्हणजे भाषा व साहित्य, भाषा व समाज, भाषा व संस्कृती याबाबतचे मूलभूत विचार यायोगे मांडता आले असते. भाषेबाबत बोलताना विसाव्या शतकातील भाषाविज्ञानाच्या प्रगतीचा ढोबळ परिचयही मराठी विचारवंतांना असू नये हे कशाचे लक्षण आहे बरे ?

मराठीवरील इतर भाषांचे आक्रमण आणि मराठी माध्यम हे अध्यक्षांच्या आवडीचे विषय. शिवाय श्रोत्यांना आकर्षक वाटणारे. विद्यापीठातील सर्वच विषयात मराठी हे माध्यम असावे असे स्वप्न वामन चोरघड्यांचे (१९७९) आहे. या मागच्या व्यावहारिक अडचणी या दूर करण्यासारख्या आहेच. त्यांचा बागुलबुवा करून मराठी माध्यमाला विरोध करणे त्यांना मंजूर नाही. विरोधाचे खरे कारण काय ? चोरघड्यांच्या मते मराठी माणसात जाज्वल्य देशभावना नाही हेच. आपली शिक्षण पद्धती इंग्रजांनी घालून दिलेल्या छापाची म्हणून उष्टी. ती बदलायला हवी. शुद्ध मराठी शिकवायचे असेल तर शिक्षणात संस्कृत व संगीत यांचा समावेश हवा. ज्याला इंग्रजी येत नाही तो वेडा असे ठरवणारी प्रचलित शिक्षण पद्धती मोडायला हवी. (मराठीतली चांगली बालगीते टाकून इंग्रजी माध्यमाच्या शाळातील छोटी मुले जेव्हा न समजणारी परकीय बडबडगीते म्हणतात तेव्हा किंचित भावाकुल होऊन चोरघडे मनापासून त्यावर टीका करतात. यात आपण आपली जनसंस्कृती गमावतो आहोत यांनी ते व्याकुळ होतात.)

शंकर पाटील (१९८५) स्वतंत्र मराठी विद्यापीठ काढा अशी मागणी करतात (त्याने काय होणार ? अनेक वर्षे मराठी विद्यापीठाची मागणी करून अखेर पुणे विद्यापीठ निघाले. तेथे मराठीचे काय झाले ? पुन्हा तोच प्रयोग करायचा ? कशासाठी ?) मराठी अध्यापन शास्त्र संशोधन संस्था काढावी अशीही मागणी ते करतात. साहित्य संस्कृती मंडळ बंद करून त्याऐवजी मराठी अकादमी काढण्याची मागणी ते करतात. (अशा ढीगभर मागण्या कोणीही करील. विचारवंतांनी त्याची पार्श्वभूमी, त्याचे समर्थन आणि त्याचा पुढे करून घेता येणारा उपयोग याची स्पष्ट कल्पना द्यायला हवी. ते काम कुणीच करत नाही. चार-दोन संस्था काढून चार-दोन मराठीच्या लोकांना नोकरी मिळेल, यापलीकडे फायदा काय ? आणि तो झाला नाहीच. शासनाने राज्य मराठी विकास परिषद काढली. दोन-चार वृद्ध, वयस्क लोकांना पैसा व प्रसिद्धी मिळवण्याची संधी यातून उपलब्ध झाली. प्रत्यक्षात मराठीचा विकास काय झाला ? आपण अनुभवांनी शिकणारच नाही की काय ?) साहित्य संस्कृती मंडळ नव्या लेखकांना मार्गदर्शन करण्यासाठी शिबिरे घेते. ती बंद करा असे पाटील म्हणतात. (त्यापेक्षा त्यातील उणिवा दाखवून सुधारणा करण्याचा विचार मांडता आला असता.) त्याऐवजी लेखकांना शिष्यवृत्त्या द्या असे ते सुचवतात (विद्यापीठ अनुदान मंडळाच्या शिष्यवृत्त्या मराठी प्राध्यापकांनी घेतल्या. लाखो रुपये खर्च केले. पदरात काय पडले ? मराठीच्या

नावावर धूळफेक करून पैसा कमावणे, मजा करणे एवढाच उद्योग या क्षेत्रातील मंडळी प्रामुख्याने करतात. पाटील त्याची दखल का घेत नाहीत बरे ?) लेखकांच्या वास्तू जतन करण्याचा सल्लाही ते देतात. (कशासाठी ? कोणत्या लेखकांच्या ? त्याने काय साध्य होणार ? मंत्र्यांना बोलावून, वास्तूमधे पुतळा व तैलचित्र लावून, वर एक पाटी रंगवून समारंभ घडवणे यापलीकडे यातून आजवर काय साध्य झाले याचा आढावा मराठी विचारवंत कधी घेणार ? की तो न घेता अशा सूचना करण्यात काही वेगळेच हेतू आहेत ? एखाद्या शासकीय संस्थेत आपली वर्णी लागत नाही म्हणून ती बंद करून आपल्याला प्रवेश मिळेल अशी नवी संस्था काढा इतपतच या मागण्यांचे प्रयोजन आहे असे म्हटले तर ?)

वसंत कानेटकरांना (१९८८) मातृभाषा समाजाला समाजपण देते असे वाटते. समाजाला बांधून ठेवण्याची शक्ती भाषेत आहे, धर्मात नाही असे कालेलकरांचे मत ते मांडतात. म्हणून बांगला देशने पाकिस्तानात असतानाही उर्दू स्वीकारली नाही. (पण पाकिस्तानातील उर्दू भाषक शिया व सुनी एकमेकांचे गळे घोटतात त्याचे काय ? इस्लाम धर्माच्या प्रेमाने भिन्न भाषक मध्य आशियाई देश एकत्र येतात त्याचे काय ? आणि जन्मत: बहुभाषक असणारे कोणत्या एका भाषेला मातृभाषा मानून तीवर प्रेम करणार ?) दक्षिण भारतात हिंदीचा राष्ट्रभाषा म्हणून स्वीकार करायला लोक•तयार नाहीत याचा दिल्लीकरांनी विचार करावा असा इशारा ते देतात (१९८८ पर्यंत दिल्लीकरांनी हे चांगले जाणले होते. राष्ट्रप्रेम म्हणजे एक भाषा हे गणित चुकल्याचे या आधीच केंद्र सरकारला समजले होते.) मराठी भाषकांचे मराठी प्रेम मुळातच कमी असे कानेटकर म्हणतात (त्यापेक्षा महाराष्ट्रानेही हिंदी स्वीकारू नये असे कानेटकर स्पष्टपणे का म्हणत नाहीत ? मराठी माणसे जास्त व्यवहारी आहेत असे म्हटले तर ? सुखी जीवन व त्यासाठी अर्थार्जन हे व्यक्तीचे प्रमुख उद्दिष्ठ असते; पर्यायाने समाजाचे. त्याच्या आड येणाऱ्या स्थानप्रेम, भाषाप्रेम, रीतीप्रेम, धर्मप्रेम कमीअधिक प्रमाणात व कमीअधिक कालांतरात बाजूला सारल्या जातात.) मातृभाषेची हेळसांड अनर्थकारक आहे हे शाळा-कॉलेजांनी लक्षात घ्यावे असेही ते म्हणतात (या सूचनाच अस्थानी आहेत. शासकीय किंवा विद्यापीठीय अभ्यासक्रम आणि शैक्षणिक धोरण राबण्यापलीकडे शाळा-कॉलेजना गत्यंतर नसते ही साधी गोष्ट का विसरावी ?) इंग्रजी माध्यमाच्या शाळातील मुलांना भाषेच्याबाबत आत्मविश्वास नसल्याने ती 'बटलरी इंग्लिश' वापरतात. त्यांना निर्मितीक्षमता येत नाही असे कानेटकर म्हणतात (कानेटकरांच्या या म्हणण्यात तथ्य आहे. पण त्याचे कारण भाषाअध्यापनातील त्रुटी हे आहे. मराठी माध्यमाच्या शाळातील मुलांना मराठीच्या वापराबाबत आत्मविश्वास असतो, ती मराठीत सृजनशील असतात असे तरी कुठे आहे ? व्यवहाराची भाषा, वर्गाबाहेरच्या कार्यातील भाषा, खेळगड्यांची भाषा आणि शिक्षणाचे भाषामाध्यम यात समानता असल्यास अध्ययन

सुकर होते हे खरे; पण अन्यथा अध्ययन अशक्य हे खोटे. शिवाय शालेय स्तरावरील भाषाध्यापनाची परिणामकारकता व गुणवत्ता या गोष्टी मोलाच्या आहेत)

राजवाड्यांची मराठीच्या स्थितीविषयीची मते कानेटकर पुन्हा उद्धृत करतात. नंतर अशोक केळकरांची मते ते मांडतात. (त्यातून त्यांना काय सांगायचे आहे हे स्पष्ट होत नाही.) मराठी माणसांनी मराठीत विचार गेल्या सहा-सात शतकात केला नाही असे केळकर म्हणतात (हेही खरे नाही. एकनाथ, नामदेव, तुकाराम यांच्या वाङ्मयाचे काय ? शिवाय संस्कृत हे माध्यम म्हणण्यापेक्षा संस्कृतचे शिक्षण हेच शिक्षण होते. त्याकाळचा सामाजिक, राजकीय, शैक्षणिक असा कोणताच दस्तऐवज आज पुरेसा उपलब्ध नाही. पण म्हणून मराठीत विचारच झाला नाही हे कसे म्हणणार ?) स्वतःचे प्रगल्भ विचार एकवेळ इंग्रजीत मांडले तरी चालतील. कारण या विचारवंतांना मराठीत विचार मांडण्याची उर्मी कधीतरी येईल असे केळकरांचे मत कानेटकर मांडतात. (म्हणजे केळकरांचा भर विचार करण्यावर आहे, केवळ भाषेच्या माध्यमावर नाही. मुळात एखादा समाज सात-आठ शतके विचारच करत नाही असे अनुमान काढणे धाडसाचे आहे. शिवाय कानेटकरांचा मुद्दा मराठी माध्यमाच्या आग्रहाचा आहे. दुभाषीपणाने विचारच खुंटतो असे केळकर म्हणत नाहीत. विचार खुंटला असे जरी मान्य केले तरी एकभाषीपणाने ही आपत्ती आली नसती असे म्हणता येईल ? मराठी भाषकांचा संस्कृत व इंग्रजीचा माध्यम म्हणून स्वीकार आणि त्यांचा तथाकथित स्वतंत्र विचार न करण्याचा पायंडा यातील संबंध ना कानेटकर स्पष्ट करतात, ना केळकर. तसे करणे शक्यही नाही. त्यामुळे कानेटकरांच्या अवतरणे देण्यातून फारसे काही साधत नाही. शिवाय प्रगल्भ आणि स्वतंत्र विचार कशाला म्हणायचे ? केळकर नारळीकर, धनंजयराव गाडगीळ त्यांच्या प्रगल्भतेची उदाहरणे देतात. पण त्यापूर्वीच्या न्या. रानडे, टिळक, आगरकर, डॉ. आंबेडकर, डॉ. केतकर, राजवाडे या दुभाषकांच्या विचारांचे काय ? इंग्रजी बोलीभाषा झाल्याने आपण इंग्रजीतून विचार करू लागलो, हा भ्रम आहे असा विचार दुसऱ्या पायरीवर जावडेकरांनी आधीच मांडला आहे. त्यांच्या मते आपण खोल विचारच करेनासे झालो. केळकर यात फक्त सात शतकांच्या कालावधीची पुस्ती जोडतात.)

ललित साहित्य प्रबोधन व संस्कार करते म्हणून मराठी भाषा व साहित्य शिक्षणात हवे असे कानेटकर म्हणतात. (मग हाच नियम इंग्रजी ललित साहित्याला लावला तर ?)

भाषिक चळवळी सांस्कृतिक हव्यात, राजकीय नकोत असे म्हणून के. ज. पुरोहित (१९८९) पूर्वी संस्कृतपासून मराठीची सुटका करायची होती, आता इंग्रजीपासून तिची सुटका करायची आहे असे म्हणतात. संस्कृत निदान आपली भाषा होती; इंग्रजी ही परकी म्हणून तिचे आक्रमण जास्त वाईट (गंमत म्हणजे स्वतःच्या भाषणात इंग्रजी

ग्रंथकारांचा सर्वात जास्त आधार घेणारे व उल्लेख करणारे अध्यक्ष म्हणजे के. ज. पुरोहित. पुरोहित म्हणतात तशी इंग्रजीपासून मराठीची सुटका करायची म्हणजे काय करायचे ? कारण इंग्रजी पूर्णपणे बाजूला ठेवणेही त्यांना मान्य नाही.)

ज्ञानेश्वर, तुकारामांनी लोकभाषेचा—मराठीचा पुरस्कार केला, बुद्धाने पालीचा व महावीरांनी अर्धमागधीचा पुरस्कार केला असे यू. म. पठाण (१९९०) म्हणतात. (पण ज्ञानेश्वरांनंतरच्या काळातच पर्शियनचा प्रभाव मराठीवर पडला तो कसा ? बौद्ध विचारवंतांनी पुढे संस्कृतात ग्रंथ लिहिले ते कसे ? अमरकोशाचा कर्ता बौद्ध होता.) मराठीच्या अध्यापनात विविध स्तरांवर सुसूत्रता व समवाय हवा असे म्हणून प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक अभ्यासक्रमात तो आहे असे ते सांगतात. महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही सर्व विद्यापीठात मराठीच्या विद्वानांची नेमणूक करावी अशी माफक सूचना पठाण करतात. आपण सर्व प्रयत्न करून टी. व्ही. चे आक्रमण थोपवू असाही सल्ला ते देतात. (पठाणांच्या एकंदर सूचना फार मोघम व वरवरच्या आहेत. त्याच्यामागे फार मोठे चिंतन आहे असे नव्हे.)

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेमुळे ग्रामीण जनतेला राज्यसत्तेत भाग मिळाला, त्यातून सत्तेचे विकेंद्रीकरण झाले, शिक्षण वाढले, कारखानदारी वाढली, पन्नास वर्षापूर्वीची मराठी भाषकांची २ कोटीची संख्या ६ कोटी झाली, खेड्यांचे शहरीकरण झाले, परप्रांतीय शहरात आल्याने हिंदी व इंग्रजीचे प्रस्थ वाढले अशी एक कारणपरंपरा मधु मंगेश कर्णिक (१९९०) मांडतात.

मराठीच्या मस्तकावर राजभाषेचा मुकुट आहे पण अंगावर लक्तरे आहेत हे कुसुमाग्रजांचे बोल ते उद्धृत करतात. संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीमागे मराठी भाषेचा अभिमान होता तरी असे का व्हावे याचे उत्तर १९६४ च्या संमेलनात कुसुमाग्रज राज्यकर्त्यांचा हा दोष आहे असे देतात. कर्णिक तेच उत्तर आजही देतात. शासनाचे शिक्षणविषयक धोरण व रोजगारविषयक धोरण यामुळे इंग्रजीचे प्रस्थ वाढले असे कर्णिक म्हणतात. हिंदीचा विकास करण्याची जबाबदारी घटनेने केंद्र सरकारवर आहे पण राज्यांच्या भाषांच्या विकासाची जबाबदारी कुणाची ते स्पष्ट होत नाही.

महत्त्वाकांक्षी मराठी समाज हा नवीन क्षितिजे धुंडाळत परदेशात गेला. इंग्रजी ही आंतरराष्ट्रीय भाषा असल्याने ती शिकणे आवश्यकच होते. मराठी भाषक यात मागे राहिले नाहीत. इंग्रजी माध्यमाच्या शाळेत गेल्याने मराठी भाषा व साहित्यावर वाईट परिणाम होत नाही असे स्पष्टपणे म्हणणारे रमेश मंत्री (१९९२) हे पहिले अध्यक्ष. कॉन्व्हेन्ट स्कूल्स्‌मधे जाणारी मराठी मुले घरी मराठीच बोलतात, वर्तमानपत्रे, टी व्ही, रेडियो या माध्यमातून—त्यांचा मराठीशीच संपर्क येतो असे मंत्री म्हणतात. शिवाय कॉन्व्हेंट स्कूल्स् संख्येने फार नाहीत. शिक्षण प्रसाराने मराठीत शिक्षण घेणारे लाखो विद्यार्थी आहेत. महाविद्यालयात ५॥ लाख विद्यार्थी आहेत आणि त्यातले बहुसंख्य

मराठीच वापरतात (मंत्र्यांचे म्हणणे खरे आहे महाराष्ट्रात आज सुमारे ६०,००० शाळा मराठी माध्यमाच्या तर इंग्रजी माध्यमाच्या शाळा सुमारे ५ ते ७ हजार इतक्या आहेत. बालभारतीच्या मराठीच्या पुस्तकाच्या प्रती २०,०००,०० लाख निघतात तर इंग्रजी पाठ्यपुस्तकाच्या प्रती १,०००,०० एवढ्याच असतात. इंग्रजी माध्यमाविरुद्ध ओरड करणाऱ्या अध्यक्षांची मुले, नातवंडे इंग्रजी शिकून परदेशात स्थायिकही झाली याचा उल्लेख कोणी का करत नाही ? मराठीचा दिंडोरा पिटत जागतिक मराठी परिषदेची स्थापना करणारे पत्रकार नातवाला इंग्रजी माध्यमाच्या शाळेत प्रवेश मिळावा म्हणून मंत्रालयात जातात ही माहिती किती लोकांना आहे ? बेडेकर आपला मुलगा परदेशस्थ झाला असे म्हणतात साहित्यिकांनी आपल्या मुला-नातवंडांचे स्वातंत्र्य हिरावून घ्यावे असे नव्हे. पण आपला जो सल्ला घरातले लोक मानत नाहीत तो बाहेरच्या समाजाने का मानावा एवढा विचार करण्यास काय हरकत आहे ?) मराठीत शास्त्रीय परिभाषा तयार करून तिचा वापर सर्व क्षेत्रात करावा, राज्यकारभार, न्यायालये यातही मराठी वापरावे असे मंत्री म्हणतात, मात्र त्यासाठी इग्रजीकडे पाठ फिरवण्याची गरज नाही ते शक्यही नाही. व्यंकटेश माडगूळकरांप्रमाणे रमेश मंत्र्याचांही साहित्य संस्कृती मडळावर राग आहे. ते बद करून स्वतंत्र साहित्य अकादमी काढावी असे ते म्हणतात. (याची कारणे मात्र तेही देत नाहीत साहित्य संस्कृती मंडळात काय सुधारणा कराव्यात हा विचार मराठी विचारवत का करत नाहीत ? मराठी अकादमी म्हणजे काय, ती स्थापून काय वेगळे करणार याचीही चर्चा कुठे नाही )

संयुक्त महाराष्ट्राची स्थापना, मराठीचा राजभाषेचा दर्जा, जागतिक मराठी परिषद, राज्य मराठी विकास परिषद यामार्गे शासनाने मराठीचा विकास आपल्यापरीने केला असे राम शेवाळकर (१९९४) म्हणतात. पण तिचा विकास न होण्यास आपणच जबाबदार आहोत. १९६४ मधे कुसुमाग्रजानी केलेली तक्रार अजूनही दूर झालेली नाही. संस्कृतचे महत्त्व कमी झाल्याचेही दु:ख शेवाळकरांना होते. त्यांचा इंग्रजीवर राग आहे. गोव्यातही कोकणीबरोबर मराठीला राजभाषेचा मान द्यावा असे ते म्हणतात. खाजगी बोलण्यात कोकणी व व्यासपीठावर मराठी हा फरक केलाच पाहिजे असेही ते म्हणतात (मग तो फरक इंग्रजी-मराठी संदर्भात झाला तर त्याला विरोध का ? हा प्रश्न त्याना पडत नाही )

नारायण सुर्वे (१९९५) मराठी भाषा मरणार की जगणार याची पूर्वीपासून सतत चर्चा होत आली पण मुख्यत: निरक्षर असलेल्या मराठी समाजाची काळजी मात्र कोणी केली नाही असे म्हणतात शिक्षणाचे माध्यम मराठीच हवे हे दत्तो वामन पोतदारांचे मत उद्धृत करून पोतदारांनी सुचविलेल्या अष्टसूत्री कार्यक्रमाला ते पाठिंबा देतात. यात मराठीत बोलणे, मराठी वृत्तपत्र विकत घेणे, मराठीत लेखन करणे वगैरे व्यावहारिक गोष्टीचा समावेश आहे.

द. मा. मिरासदारांना (१९९८) मराठीच्या भवितव्याची चिंता वाटते. विज्ञान, कारखाने व उद्योग यामुळे इंग्रजीचे महत्त्व वाढले असे ते म्हणतात. पारतंत्र्याच्या काळात आपण देशी भाषा व राष्ट्रीय शिक्षण यांचा जयघोष केला. नंतर स्वातंत्र्य आले, भाषावार प्रांतरचनाही झाल्या. पण मराठी मागेच राहिली. इंग्रजी शाळांचेच प्रस्थ आज वाढते आहे. (स्वातंत्र्य, राष्ट्रीयत्त्व यांची सांगड मराठी भाषेच्या विकासाशी घालता आली नाही हे अपयश मिरासदारांना दिसते. या अपयशाने ते दिङ्मूढ झाले आहेत.) प्रथम मातृभाषा व मग इतर भाषा हे शिक्षणशास्त्रातील मूलभूत तत्त्व आपण फेकून दिले असे ते म्हणतात. (हे मूलभूत तत्त्व आहे असे कोण म्हणते ?) मराठीचा वापर शासनात होत नाही, मुंबईत मराठी भाषा ऐकू येत नाही असे ते सांगतात. आपला स्वत:चा नातू इंग्रजी माध्यमाच्या शाळेत शिकतो असे कबूल करून मराठी वाचवण्यासाठी मराठी माणसांची मानसिकता बदलायला हवी असा उपाय ते सांगतात. इंग्रजी टाळता येणार नाही हे त्यांना मान्य पण मराठी कशी टिकवायची याचे उत्तर त्यांच्याकडे नाही. (मानसिकता बदलायची म्हणजे काय करायचे ? मुळात ही मानसिकता काय आहे व कशी आहे याची चर्चा मिरासदार करत नाहीत.)

मातृभाषेच्या अवहेलनेमुळे आपले प्रचंड नुकसान झाले आहे असे वसंत बापट (१९९९) म्हणतात. प्रत्येक संमेलनात मराठीच्या नावे गळा काढला जातो ते आता पुरे. शिक्षण, शासन व व्यवहारात मराठीला रक्तक्षय झाला आहे. इंग्रजी शाळा वाढत आहेत. आपला समाज ढोंगी आहे असे बापट म्हणतात. आपण संस्कार शिबिरे भरवतो पण मुलांना अंगाई देखील मराठीत म्हणत नाही. इंग्रजी माध्यमांच्या शाळात शिकलेले हुषार लोक परदेशी जातील पण बाकीच्या गळाठ्याचे काय ? त्याला धड इंग्रजीही येत नाही ना मराठी. इंग्रजीतले शेक्सपिअर वगैरे त्याला माहीत नाही. लोकप्रिय पेपरबॅक कादंबऱ्या व कॉमिक्स तो वाचतो. (बापटांचा आक्षेप नेमका कशावर आहे ? हुषार मुले परदेशी गेल्याचे त्यांना दु:ख नाही आणि मराठी माध्यमातली हुषार मुले परदेशी जात नाहीत की काय ? गळाठ्याला मराठी शिकवून तरी काय फरक पडणार आहे ? मुळात निर्यातीचा माल व इथेच खपवण्याचा माल अशी विभागणी करणाऱ्या शैक्षणिक व्यवस्थेचा विचार का करू नये ? तरुण सुशिक्षितांनी परदेशी जावे की न जावे ? का जावे ? का न जावे ? त्यासंदर्भात भाषेचा विचार काय करणार ? भाषेचे अध्यापन कसे हवे ? या प्रश्नांची थेट उत्तरे कोणीही विचारवंत देत नाही. मराठी साहित्य संमेलनात मराठीचा उदोउदो करायचा, कच्च्या इंग्रजी शिकलेल्यांची टिंगल करायची, पालक व शासनावर दोषारोप करून मोकळे व्हायचे हे सभेमधे ठीक असले तरी यात केवळ ढोंगच नाही, भीरुता आहे. संमेलनातील अध्यक्षांचे भाषाविषयक उद्‌गार ऐकून एखादा तरी तरुण प्रभावित होतो की नाही, शंकाच आहे. मग हे सातत्याने करत राहण्याचे कारण काय ?)

मातृभाषेतूनच उत्तम शिक्षण मिळते असा इतर अध्यक्षांसारखा बापटांचाही विश्वास आहे. (पन्नास वर्षात हे निष्कर्ष तपासून पाहण्याची गरज कुणालाही वाटली नाही. मराठी विकास परिषदेलाही नाही. खरे म्हणजे हे अशा संस्थेचे काम. पण कुठे ज्ञानेश्वरी छाप, कुठे व्याकरणकारांची चरित्रे छाप, कुठे सूची छाप असल्या फुटकळ गोष्टी करून या संस्थेने आपली अकार्यक्षमता लवकरच सिद्ध केली. भाषा, संस्कृती आणि समाज यांचा सर्वकष विचार न करणारे नेतृत्त्व लाभले की संस्कृती मंडळ काय, विकास परिषद काय किंवा मराठी अकादमी काय अशा खंडीभर संस्था शासनाने काढल्या तरी सार्वजनिक पैशाचा अपव्यय होण्यापलीकडे यातून काही निष्पन्न होणार नाही हे खरे.)

माध्यम स्वीकारण्याचे स्वातंत्र्यच ठेवू नये असा एक अतिरेकी विचार बापट मांडतात. (गंमत म्हणजे इतरत्र बापट भाषणात व्यक्तीस्वातंत्र्याचा शाब्दिक पुरस्कार करतात.) सर्व विद्याशास्त्रात मराठीचा एक पेपर सक्तीचा करावा एवढ्या माफक, पोटभरू मागणीवरच हा विचार संपतो. इंग्रजीविना उच्च शिक्षण नाही हा भ्रम आहे असे बापट म्हणतात. जगात अनेक देशात इंग्रजी नाही असेही ते ठोकून देतात. पण लगेच इंग्रजी भाषा म्हणून शिका, माध्यम म्हणून वापरू नका असेही ते म्हणतात. प्राथमिक शिक्षणापासूनच मराठीची हेळसांड होते अशी बापटांची तक्रार आहे. प्राथमिक स्तरावर मुलांना अनेक भाषा व अंकगणित शिकवावे असे त्यांना वाटते. प्राथमिक शिक्षणात लेखन, वाचन, व अंकगणित हवे (ऐकणे व बोलणे नको ? सभोवतालच्या परिस्थितीचे आकलन करणे, तिच्याशी जुळवून घेणे हेही नको ? ज्या क्षेत्राचा आपला अभ्यास नाही अशा क्षेत्रांविषयी दाणदाण विधाने करण्याचे मराठी साहित्यिकांचे धाडस अभूतपूर्वच आहे.) भाषाशिक्षणात उच्च स्तर व निम्न स्तर त्यांना मान्य नाही. (इंग्रजीचे सोडा पण गुजराती, तमिळ, हिंदी भाषक मुलांनी उच्च स्तरीय मराठी शिकायचे ?) सुशिक्षित लोक इंग्रजी शब्द वापरून इंग्रजी न येणाऱ्या लोकांना फसवतात असाही एक सर्वसाधारण नियम बापट शोधून काढतात.

य. दि. फडके (२०००) मराठीचा राजभाषा म्हणून अद्याप वापर नाही, इंग्रजीचे प्रस्थ वाढले आहे, मराठी ग्रंथ-निर्मिती वाढली पाहिजे, मराठीवर पूर्वी फार्सीचा परिणाम होता, शुद्ध मराठी व अशुद्ध मराठी हा भेद पूर्वीही होता, व्याकरण लेखनाची परंपरा टिकवली पाहिजे, मराठी लेखनात संस्कृतचे नियम नकोत, आज मराठीवर इंग्रजीचे आक्रमण होत आहे, महाराष्ट्र शासनाने अनेक संस्था काढून मराठीच्या विकासाला हातभार लावला आहे, पहिलीपासून महाराष्ट्र शासनाने इंग्रजी अध्यापन सुरू करण्यात बहुधा चूक केली आहे, वगैरे सर्वज्ञात जुने मुद्देच मांडतात. मात्र ते मांडताना विनाकारण चिपळूणकर, फुले, राजवाडे, दुर्गा भागवत, माधवराव पटवर्धन वगैरेची चिक्कार अवतरणे ते देतात. यातून अध्यक्षांनी बरेच वाचले आहे एवढेच

कळते; नवा विचार, स्वतंत्र चर्चा येत नाही. (एकीकडे फडक्यांना प्रमाणभाषेची जरुरी मान्य असल्याचे दिसते तर दुसरीकडे बहुजन समाजाच्या भाषेची कड घेत ते 'ब्राह्मणी' भाषा व साहिन्य यावर टीका करतात, -ही 'ब्राह्मणी' भाषा व साहित्यच प्रमाण झाले आहे हे दुर्लक्षून !)

मराठी माध्यम, इंग्रजीची गरज पण तिची भीती, मराठीचा प्रसार याबाबतच्या एकंदर चर्चेतून काही वृत्ती स्पष्ट होतात.

प्रमाण मराठी ही मातृभाषा हे एक गृहित. मराठीच्या बोली, आदिवासी भाषा, द्वैभाषिक मराठी भाषकांच्या दोन भाषा या सर्वांना बाजूला सारून महाराष्ट्रात सर्व लोकांची प्रमाण मराठी ही मातृभाषा आहे हा समज करून घेतला जातो. १९६१ च्या जनगणनेनुसार भारतात १६५२ मातृभाषा असून शिक्षणात यातल्या जेमतेम ५० भाषा वापरल्या जातात. शिक्षणाचे माध्यम मातृभाषा हवे असे म्हणणाऱ्या साहित्यिक विचारवंतांना हे भान नाही. इंग्रजी माध्यमाला विरोध करण्यासाठी मराठी माध्यमाचा आग्रह धरताना मातृभाषेचा प्रामाणिक आग्रह हा प्रमाण-मराठीच्या आग्रहाविरुद्ध जाईल याची कल्पना या विद्वानांना नाही.

बहुभाषिकत्व—किमान द्विभाषिकत्व—भारतीय समाजाप्रमाणेच मराठी समाजात प्राबल्याने दिसते. मातृभाषेखेरीज मग त्यात प्रमाण मराठीचा समावेश झाला काय, किंवा इंग्रजीचा झाला काय. त्याने बिघडत नाही. मात्र गरज म्हणून आलेले नैसर्गिक बहुभाषिकत्व व शिक्षण व्यवस्थेने लादलेले नियोजित बहुभाषिकत्व यात फरक केला पाहिजे. पहिल्यामधे सामाजिक सलोखा व सुसवाद राखला जातो, दुसऱ्यामधे मालक-नोकर, उच्च-नीच हा भाव रहातो. संमेलनाचे अध्यक्ष शिक्षणातल्या मराठी, इंग्रजी, हिंदी बाबत बोलतात. याचाच अर्थ बहुभाषिकत्वाच्या नियोजनाच्या भूमिकेतून ते बोलतात. माध्यमाचा पर्याय नको, अमुक एक भाषा सक्तीची करावी वगैरे मागण्या या मालकीच्या भावनेतून केल्या गेल्या आहेत. मूठभर साहित्यिकांचे मध्यम वा सामान्य प्रतीचे साहित्य इतरांनी वाचण्यासाठी किंवा त्यांच्या सामाजिक प्रतिष्ठेसाठी या मागण्या होत आहेत हे ध्यानात घेतले पाहिजे. बेळगावातले मराठी भाषक कानडी बोलतात ते कानडी हा सक्तीचा विषय आहे म्हणून नव्हे तर गरजेपोटी सांगली जवळच्या हरिपूर गावातले बहुसंख्य कानडी भाषक मराठी बोलतात तेही गरजेपोटी. देगलूर आणि आसपासच्या भागातले मराठी भाषक तेलुगू बोलतात, शिकतात तेही गरजेपोटी. धुळे, जळगाव, नाशिक या भागातले अहिराणी भाषक मराठी शिकतात, बोलतात तेही गरजेपोटी—स्वयंखुशीने. खरे म्हणजे हे सर्व लोक मराठी भाषक किंवा कन्नड भाषक किंवा अहिराणी भाषक आहेत हे म्हणणेच अयोग्य आहे. ते कन्नड-मराठी, तेलुगु-मराठी, अहिराणी-मराठी तर विदर्भात हिंदी-मराठी असे द्विभाषक आहेत. भाषांचे शिक्षण आणि माध्यमाची निवड ही सामाजिक गरज लक्षात घेऊनच शिक्षण-व्यवस्थेत करू द्यावी,

शिक्षणव्यवस्थेने खोट्या गरजा निर्माण करण्याच्या फंदात पडू नये.

आर्थिक सुबत्ता आणि उच्च शिक्षण यात सांगड सहजपणे बसते असे भारतात दिसते. आर्थिक दृष्ट्या कमकुवत असलेल्या वर्गाला उच्च शिक्षण उपलब्ध करून देण्यासाठी मराठीचा आग्रह धरावा असे वाटणे कितपत सयुक्तिक आहे ? उच्च-शिक्षणाचे प्रलोभन कमकुवत वर्गाला चांगल्या नोकरीसाठीच वाटते आणि चांगली नोकरी व इंग्रजी ही सांगड गेल्या पन्नास वर्षात तुटली तर नाहीच, उलट आणखी घट्ट झाली. अशा परिस्थितीत तो इंग्रजी माध्यमाकडे धाव घेतो ती इंग्रजीच्या प्रेमाने नव्हे तर तिच्या उपयुक्ततेमुळे. या वर्गाला मराठीचा आग्रह धरून इंग्रजीपासून दूर नेणे शक्य नाही. उच्च शिक्षणात सर्वत्र मराठीचा पेपर ठेवण्यात या परिस्थितीच्या आकलनाचा अभाव आहे. मराठी माध्यमवाल्यांनी इंग्रजी शिक्षणाची उत्तम सोय केली, किमान इंग्रजी माध्यमाच्या विद्यार्थ्याइतके इंग्रजी येण्याची खात्री दिली तरच इंग्रजीसह मराठी टिकेल, इंग्रजीच्या बदल्यात मराठी हा विचार लोकशाही व्यवस्थेत टिकणार नाही.

दुसरे असे की आज कमकुवत वर्ग हा निकषांवर न ठरता जातीच्या आधारावर ठरविला जात आहे. अशा परिस्थितीत जातिनिहाय कमकुवत वर्गाला मध्यमवर्गीय साहित्यिक विचारवतांनी मराठी माध्यमाचा आग्रह धरण्यामागे ढोंगबाजी वाटते आणि ते सहाजिकही आहे. एकटे रमेश मंत्री याबाबत वास्तववादी भूमिका घेतात.

म्हणजे आर्थिकदृष्ट्या कमकुवत आणि जातीच्या निकषावर ठरविलेला कमकुवत या दोनही वर्गाना इंग्रजी-माध्यमापासून परावृत्त करणे म्हणजे आपल्याला चांगली संधी नाकारणे असे वाटणे स्वाभाविक आहे. या मानसिकतेची दखल मराठी विचारवंत घेत नाहीत. नुसते मराठी माणसाची मानसिकता बदलायला हवी असे मोघमपणे बोलण्यात काहीही साध्य होणार नाही.

विविध गटांच्या बोलीभाषा, अल्पसंख्य भाषकांच्या भाषा आणि त्यांच्या संस्कृती जपणे, जतन करणे, वाढवणे या खर्चिक गोष्टी एक प्रकारच्या चैनी आहेत; त्या विकसनशील देशांना परवडतील का ? असा एक प्रश्न विचारता येण्यासारखा आहे. शिवाय या आदिवासी, अल्पसंख्य लोकांना मोठ्या प्रवाहात सामील व्हायचेच नाही हे कशावरून ? आदिवासीची संस्कृती जपा हे शहरी विद्वानांनी म्हणणे म्हणजे त्यांना त्याच जीवनात राहू द्या असे म्हणणे नाही का ? लोककला जपा म्हणजे फार तर त्यांचे प्रयोग शहरातल्या उच्चभ्रूंना दाखवा पण त्याहून सुधारित कला त्यांना शिकवू नका असाही अर्थ होत नाही ? आणि त्यांना काय हवे काय नको हे बहुभाषक, बहुसंख्यक काय म्हणून ठरवणार ? उद्या कमकुवत गटांनीच आम्हाला इंग्रजी माध्यम हवे असे म्हटले तर बळजबरीने त्यांच्या माथी मराठी माध्यम मारायचे ? विकसनशील देशातील छोट्या भाषा, छोट्या संस्कृती जपा, त्यावर संशोधन करा असे म्हणणाऱ्या अमेरिकन, युरोपिअन विद्वानांनी स्वतःच्या देशात काय केले ? रेड इंडियनांच्या किती संस्कृती,

किती भाषा जपल्या ? कृष्णवर्णीयांच्या मातृभाषा इंग्रजीला श्वेत इंग्रजीच्या विद्यापीठात किंवा श्वेतवर्णीयांच्या शिक्षणव्यवस्थेत काय स्थान आहे ? केवळ अमेरिकन किंवा युरोपिअन विद्वान म्हणतात म्हणून ते सर्व स्वीकारणे धोक्याचे आहे.

मराठीच्या शिक्षणाच्या संदर्भात महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळावर काही अध्यक्षांनी मतप्रदर्शन केले आहे. महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक मंडळ हे पहिली ते आठवी या प्राथमिक शिक्षणाच्या स्तरावरील वर्गासाठी सर्व विषयांची पाठ्यपुस्तके तयार करते. प्रत्येक विषयासाठी एक विशेष अधिकारी असतो. प्रत्येक विषयासाठी तज्ज्ञ समिती असते. या तज्ज्ञ समितीत एक प्राथमिक शिक्षक, एक माध्यमिक शिक्षक, एक उच्च माध्यमिक शिक्षक आणि एक विद्यापीठीय स्तरावरचा विशेषज्ञ असतो. पाठ्यपुस्तकाचा कच्चा खर्डा त्या त्या वर्गाच्या महाराष्ट्रातील विविध जिल्ह्यातील शिक्षकांपुढे ठेवण्यात येतो. गरज पडल्यास अन्य तज्ज्ञांना निमंत्रित करण्याचीही मुभा असते. साहित्य संमेलनाचे १९८५ चे अध्यक्ष शंकर पाटील या मंडळात नोकरीला होते व मराठी समितीचे अध्यक्ष होते. संमेलनाच्या अध्यक्षातील यू. म. पठाण व राम शेवाळकर हेही मराठी समितीचे अध्यक्ष होते. नारायण सुर्वे आणि शांता शेळके हे आमंत्रित सभासद होते. या पार्श्वभूमीवर संमेलन अध्यक्षांची बालभारती या मराठीच्या पाठ्यपुस्तकांच्या मालिकेवरील विधाने विचारात घेणे बरे होईल.

साहित्यासाठी क्रमिक पुस्तके तयार करणारी शासननियंत्रित संघटना एकच. यामुळे एखाद्या साहित्यिकाला मराठीच्या क्रमिक पुस्तकांच्या स्वरूपाबाबत काही नवे धाडसी प्रयोग करावेसे वाटले तर त्याला तशी संधी मिळत नाही असे गंगाधर गाडगीळ (१९८१) म्हणतात. मंडळ नसताना साहित्यिकांनी काही धाडसी प्रयोग केल्याचे दिसत नाही. मराठी समितीवरील साहित्यिकांनीही ते केलेले दिसत नाहीत. जेव्हा लाखो मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न असतो तेव्हा एखाद्या साहित्यिकाचे धाडसी प्रयोग अंगाशी येण्याचाच संभव जास्त. साहित्यिकांना शिक्षणशास्त्रातले खूप कळते असेही नाही. मराठी पाठ्यपुस्तके तयार करणे हे मंडळाचे एक काम. इंग्रजी, विज्ञान, गणित, इतिहास, भूगोल यांची शास्त्रशुद्ध पाठ्यपुस्तकेही मंडळ तयार करते. केवळ मराठी साहित्यिकांच्या धाडसी पण बेभरवशाच्या प्रयोगशीलतेसाठी या सर्वांवर पाणी सोडायचे की काय ?

सार्वजनिक व खाजगी या दोन्ही क्षेत्रात उद्योगधंदे हवेत असे सरकार म्हणते. पण सरकारचा विचार आणि वर्तन यामधे विसंगती आहे असे विश्राम बेडेकर (१९८६) म्हणतात. का ? तर पाठ्यपुस्तके तयार करणे हा एक सरकारी उद्योग. पण त्या क्षेत्रात जाणत्या खाजगी माणसांना काम करायला वाव नाही म्हणून. यात दोन गफलती आहेत. अशा जाणत्या खाजगी माणसांना बालभारतीत सरकार मज्जाव करत नाही. मराठी समितीचे अध्यक्ष आणि विशेषाधिकारी कोणाही जाणत्याला आमंत्रित करायला

मोकळे आहेत आणि अध्यक्ष हे तर साहित्यिकच असतात. एका जाणत्या साहित्यिकाने दुसऱ्या जाणत्या साहित्यिकाला न बोलावणे यात सरकार दोषी कसे ? दुसरी गफलत अशी की बालभारती हा सरकारी उद्योगधंदा नव्हे. ती सरकारी पाठिंबा असणारी स्वायत्त संस्था आहे. नफा मिळवणे हे तिचे उद्दिष्ट नाही. बालभारतीच्या किंमतीमधे तेवढी पृष्ठे असणारे, तेवढी रंगीत चित्रे असणारे पाठ्यपुस्तक कोणता खाजगी प्रकाशक देऊ शकेल ? बालभारतीच्या पाठ्यपुस्तकांबाबत विधानसभेत लक्षवेधी प्रश्न विचारले जातात, वृत्तपत्रात हितसंबंधी लोकांना खरी खोटी ओरड करता येते; सरकारी धंद्याची ही जोखीम कोणता खाजगी प्रकाशक स्वीकारेल ? गंगाधर गाडगीळांप्रमाणे मुक्त व्यापारस्पर्धा याबाबत काही साहित्यिकांना हवी आहे, पण मुक्त व्यापारस्पर्धेचे तोटे मात्र त्यांना नकोत. कारण प्रकाशन व्यवसायाला सरकारने संरक्षण द्यावे ही उफराटी मागणीही तेच साहित्यिक करतात.

महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक-निर्मिती मडळाचे काम चांगले चालले आहे असे यू. म. पठाण (१९९०) म्हणतात. अ-मराठी भाषकांसाठी मराठी पुस्तक करण्यासाठी वेगळी समिती नेमावी असे ते सुचवतात. (मात्र त्याची कारणे देत नाहीत. आणखी एका साहित्यिकाला अध्यक्ष होण्याची संधी हे कारण तर नसावे !) मराठी पाठ्यपुस्तके तयार करताना भाषातज्ञांचे साहाय्य घ्यावे असे ते म्हणतात. (अर्थात् पठाण स्वत: अध्यक्ष असताना त्यांनी कोणत्या भाषातज्ञांचे साहाय्य घेतले हे ते सांगत नाहीत किंवा पाठ्यपुस्तक निर्मितीसाठी भाषातज्ञ हा प्रामुख्याने हवा की साहित्यिक हाही विचार ते करत नाहीत. पण किमान साहित्यिक हे भाषातज्ञ असतातच अशी इतर अध्यक्षांप्रमाणे पठाणांची गैरसमजूत नाही हे यातून दिसते.)

पाठ्यपुस्तकातील मराठी भाषा अधिक सोपी, सुगम हवी. झोपडपट्टीत राहाणाऱ्या मुलाच्या झोपडीला खिडकी नसते. त्याला 'तावदान' किंवा 'झडप' हे शब्द माहीत नसतात, तेव्हा असे बहुसंख्य मुलांना अपरिचित शब्द पाठ्यपुस्तककारांनी टाळायला हवेत असे मधु मंगेश कर्णिक (१९९०) म्हणतात. (कर्णिकांच्या या विधानातील भोगळपणा स्पष्ट आहे. पाठ्यपुस्तकातील मराठी भाषा अधिक सोपी, सुगम हवी असे म्हणताना कोणापेक्षा अधिक हे स्पष्ट नाही शिवाय कर्णिक मराठीच्या पाठ्यपुस्तकाबाबत बोलतात की गणित, विज्ञान यांच्या मराठीतील पाठ्यपुस्तकांबाबत बोलताना हे स्पष्ट नाही. या दोहोवर एकच आक्षेप घेता येणार नाही. झोपडपट्टीतील मुलगा हा पाठ्यपुस्तक लेखनाचा केंद्रबिंदू आहे असे कर्णिक सुचवतात की काय ? तोही एक विद्यार्थी आहे एवढेच खरे. शिक्षणाचे उद्दिष्ट परिचित गोष्टीकडून अपरिचित गोष्टीकडे जाणे हेही आहे. झोपडपट्टीतल्या मुलाला खिडकी हा शब्दच येणार नाही हे शिक्षणविषयक अज्ञान आहे. प्रत्येक पाठ्यपुस्तकात असणाऱ्या ज्ञानेश्वरांच्या 'पसायदाना'तील शब्द झोपडपट्टीच काय कोणत्याही स्थानी राहणाऱ्या मराठी मुलाला परिचित नसतात. मग

कर्णिक ते काढून टाका असे म्हणतील ? सर्वसाधारणपणे मुलांना मराठीतले कोणते शब्द परिचित असतात याचे संशोधन साहित्य संस्कृती मंडळ, मराठी विकास परिषद यांनी का केले नाही असा सवाल खरे म्हणजे करायला हवा. कारण अशा संशोधनाविना परिचित-अपरिचित शब्द ही संकल्पना व्यक्तिनिष्ठ राहणार आहे. विविध संस्था-स्थापनांची सरकारकडे मागणी करण्यापूर्वी मराठीचे अध्ययन, अध्यापन, तिची सांप्रतची स्थिती, शब्दकोश, तिच्या बोली, साहित्याचे अध्यापन, त्याचे आकलन, निर्मितीला उत्तेजन देणारा विशेष अभ्यासक्रम याबाबत विचार करून या संस्थांकडून काय अपेक्षित आहे व या अपेक्षा अशा संस्थांविना पूर्ण होणे अवघड आहे असे मराठी विचारवंतांनी स्पष्ट केले असते तर साहित्यिकांच्या मागण्यांना शैक्षणिक वजन आले असते. ते न झाल्याने अशा संस्था स्थापन करून, विद्यापीठे काढून, संतवाङ्मयाची विविध अध्यासने काढून हाती काही लागत नाही आणि पूर्वीचे प्रश्न तसेच उरतात. साहित्य संमेलनाचे किमान एक प्रयोजन अशा गोष्टीची गंभीरपणे चर्चा करून काही निष्कर्षाप्रत येणे असेही असावे असे वाटणे गैर आहे का ?)

कुठलेही विश्लेषण न करता, पुरावे न देता पत्रकाराच्या थाटात विद्याधर गोखले पाठ्यपुस्तक मंडळ व त्याची पाठ्यपुस्तके मोडीत काढतात. मराठीच्या अभिवृद्धीसाठी पाठ्यपुस्तके व अभ्यासक्रमात परिवर्तन होण्याची जरूरी आहे असे ते म्हणतात. (पाठ्यपुस्तके आणि समग्र भाषेची अभिवृद्धी यातील संबंध काय याचे मार्गदर्शन मात्र कुठेही नाही.) पाठ्यपुस्तकनिर्मितीची एक योजना साहित्य महामंडळाने नामवंत साहित्यिकांची मदत घेऊन करावी व सरकारकडे पाठवावी असे ते सुचवतात (अध्यक्षपदाच्या वर्षाच्या कारकिर्दीत गोखले हे काम स्वत:च करू शकले नसते काय ?) आजच्या अभ्यासक्रमात व पाठ्यपुस्तकात अभिजात साहित्याचे पुरेसे प्रतिबिंब आढळत नाही असे गोखले म्हणतात. (गोखल्यांनी किती पाठ्यपुस्तकांचा अभ्यास केला हे ते सांगत नाहीत. भाषा-अध्यापन आणि साहित्य-अध्यापन या दोनही गोष्टीचा मेळ अभ्यासक्रमात करायचा असतो. त्यामुळे पाठ्यपुस्तक म्हणजे केवळ अभिजात साहित्याचे प्रतिबिंब पाडणारा आरसा नव्हे. गोखले मराठीतल्या कुठल्या साहित्याला अभिजातपणाचा दर्जा देतात ?) कोणतेही नेमके विधान न करणारे गोखले पुढे मात्र एक नेमके विधान करतात : आचार्य अत्रे व वि. द. घाटे यांनी निर्माण केलेली पाठ्यपुस्तके त्यांना अजोड, आदर्श वाटतात.

नवयुग वाचनमालेच्या पहिल्या पुस्तकात 'गारुडी' नावाचा पाठ आहे. पाठाच्या शेवटी गारुडी एक छोटीशी कवटी काढून ही भीमाची कवटी आहे असे म्हणतो. मुले विचारतात, भीम खूप मोठा होता मग कवटी एवढी लहान कशी ? भीम लहान असताना त्याची काढून घेतलेली ही कवटी आहे असे गारुडी उत्तर देतो. हा अत्र्यांचा विनोद, मोठ्या माणसांना कळणारा. पाच वर्षाच्या मुलाला हा विनोद कळत असे ?

दुसरीच्या पुस्तकात 'हरण व हरिणी' असा पाठ आहे. दोघे वाळवंटात येतात. तहान लागते. शेवटी घोटभर पाण्याचे डबके त्यांना दिसते. एकालाच पुरणारे पाणी म्हणून दोघेही ते पीत नाहीत. शेवटी दोघे मरतात. ही कथा काय मुलांच्या भावविश्वाची आहे ? यातून मुलांनी काय समजायचे ! नर-मादीच्या प्रेमाची उत्कटता ? 'आमचा बाळू' या तिसरीच्या पाठ्यपुस्तकातील पाठात पाहुण्यांनी पैसे देऊन आणायला सांगितलेले चारही पेढे बाळू कसे खातो हे सांगितले आहे. विनोद करण्याच्या भरात मुले यातून काय काय अर्थ काढतील याची पर्वा संपादकांना नाही. 'वाहवा ग ऊबाई' मधे संवादातील मुलीच्या डोक्यात खंडीभर उवा ठेवल्या आहेत. ही मुलगी भावाने उवांबद्दल सांगितलेली माहिती ऐकते आणि शेवटी डोके खाजवतच आश्चर्य व्यक्त करते. पाठात शेवटी 'उवा कशा नाहीशा कराव्यात ?' असा प्रश्न आहे पण बिचाऱ्या गंगूला त्याबाबत काहीही सांगितले जात नाही. गेय असणारी कोणतीही कविता मुलांना आवडते; तेथे कवितेचे काव्य म्हणून आकलन अपेक्षित नसते. पण गोखले काय किंवा पुढे शांता शेळके काय लहानपणी सहाजिकपणे लक्षात राहिलेल्या कविता, काव्य म्हणून छान होत्या असे म्हणतात तेव्हा विचार करावा लागतो. दुसरीच्या पुस्तकातील संजीवनी या कवयित्रीची 'कोण' ह्या कवितेमधे किंवा तिसरीच्या पुस्तकातील कुसुमाग्रजांची 'चिनी फेरीवाला' या कवितेत काय काव्य आहे ? बालपणीच्या आठवणींनी वृद्ध वयात हळहळणे समजू शकते पण त्या हळहळीचा राग सांप्रतच्या पाठ्यपुस्तकावर काढण्यात निरागसता नाही आणि विचारही नाही.

अध्यक्षीय भाषण तयार करताना अध्यक्षांनी जमवलेली माहिती किमान खरी आहे हे तपासून पाहण्याची अपेक्षा असते. अध्यक्षीय भाषणांचे विश्वासार्हतेच्या मुद्द्यांसाठी आधार घेतले जातात. माहिती कुठून मिळवली हे सांगण्याचीही खरी शिस्त हवी. पण किमान मिळवलेली माहिती चुकीची नसावी. पाठ्यपुस्तक मंडळाकडे पाठ्यपुस्तक निर्मितीशिवाय अभ्यासक्रमाच्या नवनिर्मितीचे कामही दिलेले आहे असे वसंत बापट (१९९९) म्हणतात. पण या मंडळाने अभ्यासक्रम निर्मितीत शून्य काम केले असे म्हणून या मंडळावर कोणत्या व्यक्ती नेमल्या जातात असा सवाल बापट करतात. मंडळावर प्रतिनिधित्व जिल्हावार किंवा जातवार ठरवले जाते, नवा शैक्षणिक विचार करणारी माणसे त्यात नसतात, पाठ्यपुस्तकात वशिल्यांच्या पाठांची घुसखोरी होते असे विद्याधर गोखलेही म्हणतात. (मुळात पाठ्यपुस्तकमंडळ अभ्यासक्रम तयार करते ही माहितीच चुकीची आहे. अभ्यासक्रम महाराष्ट्र राज्य शिक्षणशास्त्र संशोधन व प्रशिक्षण संस्था तयार करते. या संस्थेला राष्ट्रीय शिक्षणशास्त्र संशोधन व प्रशिक्षण संस्थेचे मार्गदर्शन असते. राष्ट्रीय स्तरावरचे शैक्षणिक धोरण लक्षात घेऊन अभ्यासक्रम तयार केले जातात. पाठ्यपुस्तकमंडळ या अभ्यासक्रमांना अनुसरून पाठ्यपुस्तके तयार करते. त्यामुळे अभ्यासक्रम न केल्याचा त्याला दोष देणे अन्यायाचे आहे. १९८५ चे

नवे राष्ट्रीय शिक्षण धोरण यशपाल समितीच्या वृत्तान्तावर आधारित होते. १९९५ चा क्षमताधिष्ठित नवा अभ्यासक्रम परदेशी आणि देशी तज्ज्ञांनी आखलेला. त्यांच्या तज्ज्ञपणाची बापटांनी स्पष्टपणे तपासणी करावी; लोकशाही व्यवस्थेत ते आवश्यकच आहे. पण केवळ शेरे मारून आपण तज्ज्ञ असल्याचा आव आणणे गैर आहे. बापट मंडळाचे प्रतिनिधी व विशिष्ट अभ्यास समितीचे सभासद यात गल्लत करतात. अभ्यास समितीवर प्रांतवार व जातवार नियुक्ती होते हेही खरे. पण लोकशाही व्यवस्थेचा तो भाग आहे. मात्र शिक्षणाचा विचार करणारी माणसे त्यात नसतात हे बापट कशाच्या आधारावर म्हणतात ? जातवार किंवा स्थानवार प्रतिनिधित्व म्हणजेच तज्ज्ञपणाला सोडचिठ्ठी असे बापट का मानतात ? गोखल्यांनी स्वत: पाठ निवडले तरी तेही गोखल्यांच्या वशिल्याने आले अशी कुणालीही ओरड करता येईल. वशिलेबाजीने पाठांची निवड होते म्हणजे काय होते ? गोखले ते सिद्ध करू शकतात की त्यांना फक्त संशय आहे ? व्यासपीठ आणि माईक मिळाला की आपण बोलू ती वेदवाणी अशा थाटात तिसऱ्या पायरीवर बोलण्याची रीत बळावते आहे हे ऱ्हासमान वैचारिक संस्कृतीचे लक्षण मानावे काय ?)

आदिवासी मुलांना पहिली तीन वर्षे त्यांच्या भाषेत शिक्षण द्यावे ही एकमेव चांगली सूचना बापट करतात. बापटांना नियोजनपूर्वक मराठी वाढायला हवी. इंग्रजी व हिंदीचे मराठीवर आक्रमण होते आहे असे म्हणणारे बापट मराठीची महासनद मांडताना तिला 'मॅग्ना चार्ट' म्हणण्याचे विसरत नाही.

राजभाषा म्हणून मराठीची सद्यस्थिती हाही एक चर्चेचा विषय दिसतो. चिपळूणकरांपासून ते सावरकरांपर्यंत मराठी शुद्ध करण्याचे प्रयत्न वाया गेले असे पु. भा. भावे (१९७७) म्हणतात. भाव्यांना संस्कृत हवी पण इंग्रजी नको. सहा कोटी मराठी भाषकात केवळ दोन कोटी साक्षर आहेत असे गं. बा. सरदार (१९७९) म्हणतात. प्रमुख दैनिकांचा खप १॥ ते २ लाखांवर नाही. एकूण ५० ते ६० लाख लोक वर्तमानपत्रे वाचतात. पण लोकप्रिय साहित्याची पहिली आवृत्ती ३००० व वैचारिक ग्रंथांची ११०० एवढीच असते. ही स्थिती स्पृहणीय नाही. गो. नी. दांडेकरांना (१९८१) मराठी माणसे मराठी बोलत नाहीत, मराठी वाचत नाहीत त्यामुळे मराठीची दयनीय स्थिती आहे असे वाटते. शासन, न्यायालय, विद्यापीठ या क्षेत्रात कुठेच मराठी नाही. मराठीत शास्त्रीय लिखाण नाही. मुंबईत फोर्टमधे मराठी बोलून भागत नाही. मुंबईची संस्कृतीच मराठीपण हरवून बसली आहे. शंकर पाटील (१९८५) शासनात मराठीचा वापर हवा असा आग्रह धरतात. स्वतंत्र मराठी विद्यापीठ काढावे असेही सुचवतात. (पुणे विद्यापीठ स्थापनेचा अनुभव काही शिकवत नाही की काय ?) दलित साहित्याने मराठीत नवीन शब्द आणून ती समृद्ध केली असे ते म्हणतात. (येथे मराठी म्हणजे प्रमाण मराठी असा अर्थ घेतला तरच या विधानाला अर्थ राहतो. कारण दलितांचे मराठी हे मराठीच आहे. वेगवेगळ्या बोली भाषेतले शब्द घेऊन प्रमाण मराठी

समृद्ध करण्याची कल्पना जुनी आहे. पण अशा कृत्रिम प्रयत्नाने किंवा चार-सहा लोकांच्या आग्रहाने प्रमाणभाषेत बदल घडतो असे दिसत नाही.)

१९८६ साली विश्राम बेडेकर शासन व्यवहारात आज ८० टक्के मराठीचा वापर आहे असे एक मत उद्धृत करतात. पण हे मराठी बोजड आहे असे त्यांना वाटते. न्यायदानातही मराठी वापरावी असा त्यांचा आग्रह. दीडशे वर्षे इंग्रजी शिकूनही चांगले इंग्रजी लिहिणारा लेखक मराठीत नाही असे ते प्रांजळपणे कबूल करतात. (पहिल्या पायरीवर श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हेच म्हणत होते. मात्र १८५७ ते १९४७ मधील मराठी लेखकांचे बेडेकर कौतुक करतात.) तांत्रिकशिक्षणासाठी इंग्रजी हवे या मताचा उल्लेख ते करतात. पण आपल्याला फक्त तंत्रविशारदच हवेत का असा त्यांचा प्रतिप्रश्न आहे. (भाषेबाबतचे बेडेकरांचे विचार पुढे भरकटत जातात. मराठीतील वाक्प्रचारांच्या आधारे एका अमेरिकन स्त्रीने मराठी भाषा कशी हिंसक आहे असे गंमतीने म्हटले याचे बेडेकरांना अप्रूप वाटते. वास्तविक याचा मराठीच्या स्थितीबाबतच्या विचाराशी काहीही संबंध नाही. हे काही फार मोठे संशोधन आहे असेही नव्हे.) राजवाड्यांच्या 'मुमूर्षू' मराठीचा उल्लेख करत के. ज. पुरोहित राजवाड्यांप्रमाणे महाराष्ट्रात इंग्रजीची पिजिन राहील असे म्हणतात (ही भीती अनाठायी आहे. पिजिन होण्यासाठी आवश्यक असणारे इंग्रजी भाषकांचे वर्चस्व व मराठी भाषकांचे हीनत्व आणि या दोन भाषक-समाजांचा उद्योग, धंदा, मजुरी वगैरेसाठी येणारा संपर्क आज अशक्य आहे. शिवाय पिजिनचा वापर मर्यादित क्षेत्रात होतो; मूळ भाषा जात नाही. तिसरे असे की पिजिन मातृभाषा नसते; ती मातृभाषा होताच तिला क्रिओलचे स्वरूप येते. पिजिनबाबतची ही माहिती आज उपलब्ध आहे. शिवाय भाषा-मिश्रण म्हणजे पिजिन नव्हे.) सहा कोटी मराठी भाषकांच्या मराठीचे संवधन होणे आवश्यक आहे. त्यासाठी राज्य मराठी विकास संस्था स्थापन व्हायला हवी. (ती पढे झालीही. पण भाषेच्या संवर्धनापेक्षा फुटकळ साहित्यविषयक कामेच या संस्थेने केली. भाषा संवर्धन, भाषा विकास हा साहित्यिकांचा प्रांत नाही, सेवानिवृत्त मराठी प्राध्यापकांचा तर नाहीच नाही; तेथे भाषावैज्ञानिकच हवेत ही साधी गोष्ट समजत नाही की हेतुतः दुर्लक्षिली जाते ?) उपयुक्ततेच्या दृष्टीने मराठीचे महत्त्व कमी असे पुरोहित मानतात. मग मराठीचे संवर्धन कशासाठी ? तर संस्कृतीच्या आविष्काराची ती भाषा आहे म्हणून (संस्कृती हे एक मिथक झालेले दिसते. मराठीचे उपयुक्ततेच्या दृष्टीनेच महत्त्व वाढवायला हवे.)

पुरोहितांप्रमाणे पठाणांनाही (१९९०) मराठी भाषा विकास संस्था स्थापून मराठीचा विकास होईलसे वाटते.

य. दि. फडके (२०००) बेळगावात साहित्य संमेलन झाल्याने बेळगाव कर्नाटकात समाविष्ट करण्यात आल्याच्या अन्यायाचा उल्लेख करतात. फडक्यांच्या भाषणातील एक-तृतियांश भाग बेळगाव प्रश्नाने व्यापला आहे. बेळगाव शहर व

बेळगाव जिल्हा यात कर्नाटक शासनाने जाणूनबुजून गल्लत केली. महाराष्ट्रातील राजकीय पक्षांनी फक्त निवडणुकीपुरते सीमाप्रश्नाचे भांडवल केले, केंद्र शासनाला हा प्रश्न सोडवण्याची निकड कधीच वाटली नाही वगैरे मुद्दे अनेक तपशील देत य. दि. फडके मांडतात. हा प्रश्न घटनेच्या १४३ व्या कलमानुसार सर्वोच्च न्यायालयाकडे सोपवावा असे त्यांचे मत.

## ३.३.४
## इतर

फक्त माणसाला साहित्याची, तत्त्वज्ञानाची भूक असते, गाढवाला ती नसते असे म्हणत पु. भा. भावे (१९७७) माणूस व गाढव यातला भेद विस्ताराने मांडतात. 'परिणाम ? होय-परिणाम ! होत नाही का परिणाम ?' 'ह्या देशात विष्णुशास्त्री, टिळक, सावरकर, खाडिलकर, शिवरामपंत उगाचच का उत्पन्न झाले ?', 'महाराष्ट्राच्या घडणीत ज्ञानेश्वरांचा आणि तुकारामांचा काहीच का वाटा नाही ?' असे वक्तृत्त्वपूर्ण प्रश्न विचारत लहान मुलाला समजावून सांगावे तसे पु. भा. भावे बोलतात. भाव्यांचे भाषण हा असा बालसंवाद आहे. त्यात विचारांची प्रगल्भता नाही.

वामन चोरघड्यांचे (१९७९) भाषण अतिशय प्रामाणिकपणाचे भाषण आहे. साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद मिळावे ही साहित्यिकाची अखेरची इच्छा असते असे ते कबूल करतात. पण पुढे अध्यक्षीय भाषणाचा काही परिणाम होतो यावर आपला विश्वास नाही असेही ते सांगतात. 'कोण काय बोलतो, हे कोणी बघत नाही. कसा बोलतो, तेवढेच बघतात आणि आपापल्या राज्यात निघून जातात' हे त्यांचे बोल परखड आहेत.

चोरघडे वाचनाचे दोन प्रकार मानतात. एक. दुसऱ्यापुढे ज्ञान मांडण्यासाठी वाचणे. दोन, स्वत:साठी वाचन करणे. यालाच ते प्रत्ययकारी वाचन म्हणतात. स्वत:विषयी अज्ञान असणे हे प्राथमिक अज्ञान, आपण अज्ञानी आहोत हे न कळणे हा 'अज्ञानवर्ग' तर आपण 'अज्ञानवर्गा'त सामील आहोत हे नाकारणे 'अज्ञानघन' असे म्हणून 'अज्ञानघन' म्हणजेच विद्वत्ता असा टोला चोरघडे मारतात. त्यांच्या भाषणात स्वानुभव आहे, भरपूर आहे. 'म्हशीवर पाऊस पडावा तसा शांतपणे' आपल्याला आग्रहाने वाचून दाखविणाऱ्या नवलेखकांच्या कथा आपण ऐकतो असे ते सहजपणे सांगतात. पण चोरघड्यांचा स्वानुभव आत्मस्तुतीकडे वळत नाही. 'कवितेतील मला काहीही कळत नाही. नाटकातील—विषयापुरते' कळते असे ते नि:संकोचपणे म्हणतात. सध्या प्रचंड साहित्य-निर्मिती होते पण त्याला वाचकच नाहीत, साहित्यनिर्मिती ही एक फॅशन होते आहे, येथील ७० कोटी लोकांना हा देश आपला आहे असे वाटत नाही,

शिक्षण स्वस्त झाल्याने त्याची किंमत राहिली नाही अशी अनेक कटु सत्ये त्यांच्या भाषणात सांगितली जातात. पु. शि. रेग्यांनंतर चोरघड्यांचे भाषण प्रामाणिकपणा व जिव्हाळा या दोन वैशिष्ट्यांनी लक्षात राहाते. खरे म्हणजे हे भाषण नाहीच. 'भाषण वाचून दाखवणे वेदनाकारक आहे' असे चोरघडेच म्हणतात. श्रोत्यांशी मित्रत्त्वाच्या नात्याने केलेला तो संवाद आहे. म्हणूनच ते अवघ्या १६ पृष्ठांचे आहे. तिसऱ्या पायरीवर अशी स्वानुभव सांगणारी, साहित्यदृष्ट्या मोलाची अशी भाषणे येतील अशी आशा निर्माण होते. दांडेकर, माडगूळकर, बेडेकर त्या दिशेने जातातही. पण चोरघड्यांचा पारदर्शीपणा या भाषणातून संपत जाताना दिसतो

नवागतांनी धीर धरावा, महाराष्ट्र गुणांची कदर करतो असा मराठी समाजाची चांगली बाजू दाखविणारा मुद्दा गो. नी. दांडेकर (१९८१) मांडतात.

गंगाधर गाडगीळ मराठी समाजाची आणखी एक बाजू मांडतात. मराठी भाषक भांडखोर आहेत पण त्यांची विनोदबुद्धी शाबूत आहे असे ते म्हणतात. रायपूरला संमेलन घेऊन लगेच मराठी व हिंदी साहित्याचा अभ्यास होणार नाही हे गाडगीळांना माहीत आहे. पण भारतीय लोक साहित्याने एकत्र यावेत असे त्याना वाटते. पूर्वी रामायण, महाभारत या महाकाव्यांनी देश जोडला होता. (पूर्वी का ? आता नाही ?) आज हे काम हिंदी चित्रपट करतात हा सांस्कृतिक ऱ्हास आहे असे गाडगीळांना वाटते (वस्तुत: रामायण, महाभारताच्या विविध भाषिक, प्रांतिक व वर्गीय आवृत्त्या निघाल्या. तो त्या महाकाव्यांचा व तज्जन्य धर्मभावनेचा परिणाम होता हिंदी चित्रपट याही लोकप्रिय स्तरावरच्या रामायण, महाभारताच्या आवृत्त्याच आहेत. पातिव्रत्य, प्रेम, वडिलधाऱ्यांचा सन्मान, अधर्माचे पारिपत्य ही मूल्येच हिंदी चित्रपटात दिसतात. त्यामुळेच ते लोकप्रिय आहेत )

आत्मस्तुतीपर आत्मनिवेदनात कधी धक्कादायक गोष्टीही दिसतात. व्यंकटेश माडगूळकर (१९८३) निसर्ग, प्राणी यांचे चित्रण मराठी साहित्यात नाही असं म्हणत असताना लहानपणी मित्रांबरोबर शिकारीचा खेळ खेळल्याचे सांगतात. आता हा खेळ कालबाह्य झाला आहे. ज्यानं शिकार केली नाही त्याच्या शिक्षणात अपुरेपणा आहे असंही त्यांना वाटते. (प्राण्यांवर प्रेम - संवेदनशीलता - साहित्य - आणि शिकारीची आवड यात काही सहजसंबंध नाहीत प्राण्यांवर बंदूक रोखणारा माणूस हा निसर्गाकडे संवेदनशीलतेने पाहणारा साहित्यिक असू शकते ? ) अनुभवाशी प्रामाणिक राहा असा संदेशही माडगूळकर नवलेखकांना देतात. २३ पानातील १६ पाने झाल्यावर आत्तापर्यंत आपण थोडं आत्मनिवेदन केले असे माडगूळकर म्हणतात. स्वत:च्या परदेशी वाऱ्यांचे उल्लेख या छोट्या निवेदनात भरपूर आहेत. पहिली १६ पाने ही लिखित असावीत कारण त्रिकोणासारख्या आकृत्याचा त्यात वापर आहे. पण १६ पानांनंतरचा भाग वक्तृत्वाचा आहे. (तिसऱ्या पायरीवर एकंदरच वक्तृत्व फार, विचार कमी. चोरघडे

म्हणतात त्याप्रमाणे श्रोतेही अध्यक्ष 'कसे' बोलतो हेच पाहतात. गं. बा. सरदारांचा अपवाद वगळता अध्यक्षीय भाषण साहित्यविषयक वैचारिक निबंध-लेखन असल्याचे दिसत नाही. पहिली पायरी व तिसरी पायरी यातला गंभीर विचार मांडणी विरुद्ध हलक्या फुलक्या गप्पा हा विरोध लक्षणीय आहे.)

शंकरराव खरात (१९८४) साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद उशिरा का होईना एका दलित साहित्यिकाला मिळाले याबाबत समाधानी आहेत. दलित साहित्य गेल्या तीस वर्षातले. (१९०५ ला पाहिले साहित्य संमेलन. त्यापूर्वी ३० वर्षे म्हणजे १८७५ पासून. या काळातच नव्या मराठी गद्याचा उदय झाला. म्हणजे अगदी मध्यमवर्गीय साहित्यालाही संमेलनाची संधी ३० वर्षांनी आली. स्त्रीवादी साहित्य १९८० पासूनचे म्हणून २०१० च्या सुमारास स्त्रीवादी लेखिका संमेलनाध्यक्ष होण्यास हरकत नसावी असे म्हटले तर ?)

वसंत कानेटकरांच्या (१९८८) भाषणाच्या सुरुवातीच्या भागातून संमेलनाची व्यावहारिक बाजू किती काळी आहे हे दिसते. आपल्यावेळी एका श्रीमंत नगरसम्राटाने संमेलनाला मदत देण्याचे नाकारले. पण ठाणेकरांनी संमेलन भरवले. कानेटकरांच्या निवडीच्या वैधतेबाबतही वादंग माजले. निवडणुकीला उभे राहणे म्हणजे अब्रू घालवणे, वृत्तपत्रे अध्यक्षाची पूर्णपणे टवाळी करतात वगैरे अनुभव कानेटकर सांगतात. (पु. भा. भावे यांच्यापासून संमेलनावर, अध्यक्ष निवडीवर लोकक्षोभाचे प्रदर्शन होऊ लागले. १९७७ ते १९८८ हा काळ या दृष्टीने वादंगाचा. पुढेही तुरळक वादंग झाले. १९९९ मधे बापट अध्यक्ष झाल्यावरही त्याचवेळी दोन समांतर समेलने मुंबईतच घेतली गेली. तिसऱ्या पायरीवर संमेलनाचे राजकारण प्रकर्षाने पुढे आले.)

आपण अध्यक्ष झालो यात सार्थकता आल्याचे चोरघड्यांप्रमाणे के. ज. पुरोहितही (१९८९) म्हणतात. (आपण कथेच्या क्षेत्रात महत्त्वाचे आहोत, आपण मानसन्मान घेत नाही, राम शेवाळकर, सुरेश भट हे आपले विद्यार्थी आहेत, आपण एका मताने निवडून आलो, विदर्भ महाविद्यालयाला कथासंग्रह अर्पण करणारे आपण एकमेव साहित्यिक अशी अनेक आत्मप्रौढीयुक्त विधाने पुरोहितांच्या भाषणात आहेत आणि त्याचबरोबर सद्यस्थितीबाबत ते कमालीचे नाराजही आहेत.) अमेरिकेत जाणारा तरुण हा उपभोगवादी आहे असे त्यांना वाटते. डॉक्टर, प्राध्यापक हे जोडधंदा म्हणून साहित्य लिहितात याबाबतही ते नाराज आहेत. आपण विविध विचार स्वीकारतो हे सांगण्यासाठी, स्वत:च्या कथेच्या महत्तेसाठी पुरोहित लांबलचक अवतरणे देतात (त्यांचे एकंदर भाषणच फारसे मुद्दे नसलेले व अनेक अनावश्यक अवतरणे असलेले आहे. पुरोहितांच्या भाषणात समकालीन कथाकार, नाटककार, कवी यांचा उल्लेख नाही; मराठी साहित्याच्या परंपरेचा आढावा नाही; खरे म्हणजे मराठी साहित्यविश्वाला कुठेही स्पर्श केलेला नाही. आहे ते फक्त स्वत:च्या साहित्यावरचे प्रेम आणि इतरांविषयीच्या

तक्रारी.)

स्थल माहात्म्य, त्या स्थलातील साहित्यिकांचे माहात्म्य याबरोबरच तिसऱ्या पायरीवर त्या त्या वर्षाचे माहात्म्य सांगण्याचा पायंडा पडताना दिसतो. यू. म. पठाण हे १९९० चे अध्यक्ष. १९९० चे महात्म्य ते सांगतात. ज्ञानेश्वरीचे ते ७०० वे वर्ष, महात्मा फुल्यांचे शताब्दी वर्ष, डॉ. आंबेडकरांचे जन्मशताब्दी वर्ष वगैरे. डिसेंबर १९९० मधे पुढचे संमेलन होते. त्याचे अध्यक्ष कर्णिक पुन्हा हे वर्ष माहात्म्य सांगतात. १९९६ च्या अध्यक्ष शांता शेळके ह्या १९९६ हे ज्ञानेश्वरांच्या समाधीचे सप्तशताब्दी वर्ष आहे असे सांगतात. द. मा. मिरासदार (१९९८) हे आपली निवड अत्रे जन्मशताब्दीच्या वर्षात झाली असे म्हणून आनंद व्यक्त करतात. वसंत बापटांना १९९९ मधे साने गुरुजी जन्मशताब्दीचे स्मरण होते.

आपल्याला मिळालेल्या विविध पुरस्कारांची रक्कम आपण विविध साहित्य-संस्थांना दिली, आपण स्वातंत्र्य-सैनिक होतो पण स्वातंत्र्य-सैनिकाचे पेन्शन मात्र घेत नाही, आपण सरकारी कोट्यातून मिळणारी सदनिका मागितली नाही, आपण लोकसभेत खासदार-पेन्शनला विरोध केला वगैरे आत्मप्रौढीची विधाने विद्याधर गोखले (१९९३) यांच्या भाषणातही भरपूर आहे आपण आत्मश्लाघेचा दोष पत्करून हे बोलत आहोत असे गोखलेच म्हणतात. शासनाकडे अनेक गोष्टी मागायच्या तर खऱ्या पण भाषणात ताठपणाही ठेवायचा अशी एकदर वृत्ती गोखल्यांच्या भाषणात दिसते.

'गोव्याने आपला मराठीपणा पतिव्रतेच्या शीलाइतका जपून ठेवला', 'या कामरूपिणीने राजभाषेचा विश्वास संपादून.. आपला कस वाढवला', 'त्या भाषेच्या गर्भात त्या विशिष्ट सस्कृतीची बीजे विद्यमान असतात', 'वाढत्या वयाबरोबर धाकटीला उत्पन्न झालेल्या गरजांच्या पूर्तीसाठी काही सोयी-सवलती मिळाल्या, तर त्याचा मोठीला आनंदच वाटेल , 'स्वत. जन्मदात्यालाच अज्ञात राहिलेल्या आपल्या लावण्यकला ती (कलाकृती) एखाद्या विश्वासू रसिकाजवळच प्रेमाने प्रकट करते', 'कलाकृतीचे जन्मरहस्य समजून घेण्याने, तिचे बलस्थान जाणून घेण्याने व कलेकलेने प्रगट होणाऱ्या तिच्या लावण्याचे हळुवार चुबन घेण्यानेच तिचे अवतारकार्य कृतार्थ होत असते' 'स्वत:च्या रूपहृदयाचा एखादा उन्मेष ती (साहित्यकृती) मोनालिसाच्या स्मिताप्रमाणे हळूच प्रगट करते.' अशी तरुण स्त्रीच्या बाह्यसौंदर्याला आवाहन करणाऱ्या प्रतिमा राम शेवाळकरांच्या (१९९४) भाषणात जागोजाग विखुरल्या आहेत विचारांना फाटा देण्यासाठी लालित्याचा बडेजाव आणि लालित्याच्या नावाखाली लैंगिक आकर्षणाचे चोरटे आविष्कार अशी एकंदर ऱ्हासमय वाटचाल मराठी लेखनात दिसते त्याचे उत्तम प्रातिनिधित्व शेवाळकरांच्या भाषणात आहे.)

जातीय शक्तीचे देशावर आलेले सावट, धर्मांध शक्तीची होणारी वाढ, धनदांडग्यांना मिळणारे स्वातंत्र्य अशा आजच्या सामाजिक परिस्थितीचे नेमके चित्रण नारायण सुर्वे

(१९९५) करतात. सुर्वे विचारवंत म्हणून एकांगी नाहीत. दलितवर्गही स्वकेंद्री बनला आहे असे ते म्हणतात. आत्मकेंद्री, भोगवादी बाजारू अर्थतत्त्वज्ञान एकंदर समाजाने स्वीकारल्याची खंत त्यांना वाटते. ह्या तत्त्वज्ञानाने माणसे गोंधळत आहेत; हा गोंधळ वाढावा म्हणून पद्धतशीर रचना करण्यात येत आहे; या कोलाहलात असुरक्षितता, द्वेषभाव वाढतो आहे; विचारातून विचार न वाढता उदासवाणेपणा, तुच्छतावाद वाढतो आहे असे सुर्वे म्हणतात. साहित्यिकाला या सांप्रत जीवनाकडे पाठ फिरवून चालणार नाही हे सुर्व्यांचे मत (पठाण, कर्णिक, मंत्री, गोखले, शेवाळकर यांच्या सलग भाषणानंतर सुर्व्यांचे आलेले भाषण हा विरळ असा सुखद धक्का देणारा अनुभव आहे.)

आपल्याला मिळालेल्या शालेय शिक्षणाची, महाविद्यालयीन शिक्षणाची, या शिक्षणपद्धतीने नेमलेल्या पाठ्यपुस्तकांची मुक्तकंठाने स्तुती करून कृतज्ञता व्यक्त करणाऱ्या शांता शेळके या तिसऱ्या पायरीवरच्या खऱ्या समाधानी अध्यक्ष. त्यांच्या भाषणातही आत्मनिवेदन आहे पण आत्मप्रौढी नाही. स्वत:विषयी बोलतांना त्या 'आपण' हा शब्द वापरून 'स्व' वर्गात श्रोत्यांचाही समावेश करतात. यामुळे भाषणाचा सूर आपुलकीचा, संवादाचा राहतो. शांता शेळक्यांना अनुभवास आलेल्या सर्वच गोष्टी आवडतात. त्यांच्या भाषणात कुठे कटुता नाही, चिडचीड नाही. त्यावर प्रसन्न व्यक्तिमत्त्वाचा ठसा आहे. 'आणखी एक गोष्ट सांगायची आहे' यासारख्या वाक्यांनी हे स्मृतींना उजाळा देणारे भाषण आहे हे जाणवते. सहजपणे वेगवेगळ्या कविता उद्‌धृत करणे हेही या भाषणाचे एक वैशिष्ट्य आहे.

आपल्या घडणीत बायकोचा वाटा मोठा आहे असे म्हणून तिचे जाहीरपणे आभार मानणारे ना. सं. इनामदार (१९९०) हे सत्तर संमेलनातील पहिले अध्यक्ष. अध्यक्ष हा तीन दिवसांचा गणपती असतो असे मिरासदार म्हणतात. अध्यक्षाला किमान सौजन्याची परंपरा चालवता येईल असे त्यांना वाटते. पूर्वी ही परंपरा वामन मल्हार जोशी, वि. स. खांडेकर, रा. श्री. जोग, वा. ल. कुलकर्णी यांनी चालविली. गो. पु. देशपांडे यांचे नाव न घेता ज्ञानपीठ विजेत्या खांडेकरांबाबत त्यांनी काढलेल्या उद्‌गारात मिरासदारांना सौजन्यहीनता जाणवते. सध्याचे सौजन्यहीन असे साहित्य-क्षेत्रातील वातावरण बदलण्याचा प्रयत्न अध्यक्षांनी करावा असे त्यांना वाटते. (मात्र या प्रश्नाची दुसरी बाजू लक्षात घेणे आवश्यक आहे. सौजन्याच्या दबावाखाली ढोंग फोफावते; ढोंगाचे बुरखे फाडल्याविना नवीन विचारांचा मार्ग मोकळा होत नाही.)

तिसऱ्या पायरीवर इंग्रजी पारिभाषिक शब्दांना नवे मराठी पारिभाषिक शब्द सुचवले आहेत.

allusion : श्रुतयोजन

consumerism : उपभोगवाद

demogogy : भंपकगिरी
identity . ओळख
imitative : अनुकृतिपर
impersonal poetry : अवैयक्तिक कविता
Lotus-eater's land : आराम प्रदेश
maturity : प्रगल्भता
microfilming : सूक्ष्मचित्रीकरण
performing art : वठवण्याची कला
rebarbarization : धसमुसळेपणा
self-conscious : आत्मलक्षी
smutty jokes : कमरेखालचे विनोद
spiritual : अध्यात्मवादी
sublime : भव्योदात्त
surealism . अतिवास्तववाद
television : प्रकाशवाणी
tragedy : शोकात्मिका
wisdom · शहाणपण

# ४. वैचारिक-शैली

वैचारिक-शैली म्हणजे काय याचे उत्तर द्यायला हवे. शैली म्हणजे रीती. विचार करण्याची रीती कशी आहे हा पहिला भाग. यानुसार विचार-रीतीचे चार प्रकार मानता येतील, (क) वास्तविकांवर आधारित असा अनुमानित-विचार. हा अनुमानित-विचार आणि वास्तविके यांच्यामधे कोणती प्रक्रिया येते ? अनुमानित-विचार होण्यासाठी : १) वास्तविकांची ओळख पटायला हवी. म्हणजेच वास्तविक कशाला म्हणायचे हं समजायला हवे. पाच सेंटीमीटर पाऊस झाला—जोराचा पाऊस पडला—जमीन भिजली या एकाच वास्तविकाच्या तीन वेगवेगळ्या ओळखी आहेत. २) वास्तविकांमधे खरेपणा असावा. प्रत्यक्ष पाहिलेली गोष्ट हे वास्तविक जास्त खरे वाटते. पण प्रत्यक्ष प्रचिती हे वास्तविकाचे एकमेव लक्षण नव्हे. 'तो मेला' हे वास्तविक. पूर्णत: खरे असते तर 'तो खंगून मेला' यात खरेपणाबाबत शंका येऊ शकते. ३) एखाद्या विचारामागे किती वास्तविके घेतली आहेत किंवा कोणत्या वास्तविकांची निवड केली आहे हे पहायला हवे. ४) ज्ञात अशी पूर्व वास्तविके कोणती घेतली आणि कोणती नवीन वास्तविके शोधली हा फरक ध्यानात घ्यायला हवा. ५) शेवटी सर्व वास्तविकांची चिकित्सा काय केली, त्यात कार्यकारणभाव शोधला किंवा कसे हे पाहणे महत्त्वाचे. अनुमानित-विचारात वरील गोष्टीची दखल न घेतल्याने तदनुसारी दोष निर्माण होतात : १. वास्तविकांची नेमकी ओळख न पटणे म्हणजेच वास्तविकांच्या अनिश्चिततेचा दोष २. खोटी वास्तविके आधार म्हणून वापरणे. ३. पुरेशी वास्तविके न घेणे किंवा अयोग्य, अनाठायी वास्तविके घेणे. ४. वास्तविक जुने-नवे हा फरक न करणे. म्हणजे उदाहरणार्थ, जुने वास्तविक नवीन मानणे. ५. वास्तविकात कार्य-कारण किंवा इतर कुठलेही संबंध शोधता न येणे.

विचाराचा दुसरा प्रकार असा : (ख) सर्व परिस्थितीचा साकल्याने आवाका येऊन सुचणारा असा साकल्य-विचार. साकल्य-विचारात (१) परिस्थितीचे, भोवतालचे विविध पैलू माहीत असणे (२) परिस्थितीचे शक्यतो नीट आकलन होणे आणि (३) आपातत: उत्स्फूर्त अशा विचारामागच्या सांकल्पनिक रचनेचे भान असणे किंवा (४) विचार सिद्ध आहे असे गृहित धरून वास्तविकांचा फक्त आधार शोधणे आणि (५) त्याच संकल्पनांचा वेगळा व्यूह रचून वेगळा विचार मांडता येणे या गोष्टी महत्त्वाच्या

असतात. यातील चौथा विशेष हा साकल्य-विचाराला कमीपणा आणणारा. वरील गोष्टींची दखल घेण्याने पुढील दोष संभवतात : (१) परिस्थितीच्या संश्लिष्टतेचा अभाव म्हणून परिस्थितीचे सुलभीकरण. (२) परिस्थितीबाबत अज्ञान असणे. (३) संकल्पनांचा ढिसाळ व्यूह, अमूर्त संकल्पनांचा अभाव, संकल्पना व्यूह नसणे (४) गृहित विचाराला जुजबी किंवा असंबद्ध वास्तविकांचे आधार देणे किंवा (५) संकल्पनांच्या व्यूहातून फक्त एकच विचार संभवणे.

(ग) विचाराचा तिसरा प्रकार म्हणजे इतरांनी मांडलेला विचार विना चिकित्सा आहे तसा स्वीकारणे. याला अनुकरण-विचार म्हणता येईल. या विचारांची प्रक्रिया पुढील गुणांनी युक्त असते : (१) मूळ विचार कोणाचा याचा नेमका पत्ता असणे. (२) त्या विचाराचे श्रेय त्याच्या कर्त्याला देणे. (३) मूळ विचाराचा संदर्भ शाबूत ठेवणे. हे गुण बाजूला सारल्यास पुढील दोष निर्माण होतात : (१) विचाराचा पत्ता, पूर्वेतिहास न शोधणे. (२) त्या विचाराचे श्रेय लाटणे. (३) मूळ विचाराचा संदर्भ सोडून भलत्याच संदर्भात तो मांडणे.

(घ) यात विचार नसतो विचाराचा आभास निर्माण केला जातो. (१) खोटी समीकरणे मांडणे आणि (२) शब्दावडंबर करून विचार असल्याचा आव आणणे हे दोष यात दिसतात.

आत्तापर्यंत अध्यक्षांनी मांडलेल्या विचारांची वर्गवारी या दृष्टीने करता येईल.

□□□

| पायरी | क्षेत्र | विचार |
|---|---|---|
| १ | १ (१) भाषा व संस्कृती | १. मराठी संस्कृतीचा उगम पूर्व महाराष्ट्रात झाला पण आज पूर्व महाराष्ट्र उपेक्षित आहे. (माडखोलकर) |
| २ | १ (१) भाषा व संस्कृती | २. जगाची संस्कृती एक आहे (जावडेकर) |
| | | ३. भारतीय संस्कृती ही संस्कृतमुळे एक आहे. (प्रियोळकर) |
| | | ४. भाषा आणि राहणी म्हणजे संस्कृती (क्षीरसागर) |
| ३ | १ (१) भाषा व संस्कृती | ५. भाषेचे सांस्कृतिक रूप म्हणजे वैचारिक आणि ललित वाङ्मय. (कानेटकर) |
| | | ६. परभाषेतून परकीय संस्कृती येते (दांडेकर, कर्णिक) |
| १ | १(२) साहित्य आणि भाषा | ७. मराठी कथा-कादंबरीतील लेखनाची इंग्रजी धाटणी (कीर्तिकर) |
| | | ८. जोरकस सामाजिक, राजकीय विचारामुळे जोरकस काव्य (केळकर) |
| | | ९. भाषा हा जनतेचा धर्म व साहित्य ही तिची संस्कृती (अत्रे) |
| २ | १ (२) साहित्य आणि भाषा | १०. वाङ्मयाच्या संवर्धनाने भाषा प्रगल्भ होते. |
| ३ | १ (२) साहित्य आणि भाषा | ११. भाषा हे साहित्याचे माध्यम (माडगूळकर, बेडेकर, कर्णिक) |
| | | १२. साहित्य जीवनातले दिव्य क्षण पकडते अशा क्षणांचे भांडार म्हणजे संस्कृती (बेडेकर) |
| | | १३ भाषेतून साहित्य-निर्मिती आणि साहित्यातून संस्कृती-निर्मिती. (कर्णिक) |
| | | १४. साहित्यातून संस्कृती निर्माण होते (गोखले) |
| १ | १ (३) साहित्य आणि संस्कृती | १५. प्रत्येक संस्कृती त्या काळातील वाङ्मयात दिसते. (कोल्हटकर) |
| | | १६. प्रत्येक संस्कृती दोन्ही परंपरा |

| प्रकार | गुण | दोष |
|---|---|---|
| क | | (५) दोन वास्तविकात कार्यकारण भाव नाही |
| ख | | (३) संकल्पना व्यूह नाही. |
| ख | | (३) संकल्पना व्यूह नाही. |
| ख | | (१) परिस्थितीच्या संश्लिष्टतेचा अभाव<br>(२) परिस्थितीबाबत आहे |
| ख | | (३) संकल्पना व्यूह नाही |
| ख | | |
| क | | (१) वास्तविकांची अनिश्चितता<br>(२) पुरेशी वास्तविके न देणे |
| क | (५) कार्यकारणभाव | |
| घ | | (१) खोटी समीकरणे<br>(२) शब्दावडंबर |
| ख | | (४) संकल्पना व्यूह नसणे |
| ग | | (१) मूळ विचार कोणाचा हे न सांगणे<br>(२) श्रेय लावणे |
| ख | | |
| ग | | |
| ख | | (३) संकल्पना व्यूह नाही. |
| ख | ४. वास्तविकांचा आधार शोधणे, इंग्रजी वाङ्मय भरभराट, ऱ्हास | |
| ख | | |

| | |
|---|---|
| | दोन्ही सर्जनशील असतात (लक्ष्मणशास्त्री जोशी) |
| | १७. साहित्यातून संस्कृतीचे पोषण होते (आ. रा. देशपांडे) |
| | १८. भारतीय संस्कृतीत चारित्र्य महत्त्वाचे. तेच वाङ्मयात. पाश्चात्त्य संस्कृती व साहित्यात विकृती. (आ. रा. देशपांडे) |
| | १९. साहित्य व संस्कृती जीवनाबाबत स्वीकाराची भावना निर्माण करते. (क्षीरसागर) |
| | २०. साहित्यातून समाजाची संस्कृती दिसते (क्षीरसागर) |
| | २१. अभिजात साहित्यात संस्कृती टिकून राहते. (कुसुमावती देशपांडे) |
| १ १ (४) साहित्य आणि समाज | २२. समाजाची अवस्था व साहित्याची अवस्था परस्परावलंबी (आपटे, माटे) साहित्यात समाजहित हवे. |
| २ १ (४) साहित्य आणि समाज | २३. आजच्या काळात उच्च वाङ्मय अशक्य (यशवंत) |
| | २४. वाङ्मय हा समाजाचा आरसा (प्रियोळकर) |
| | २५. अभिजात वाङ्मयाला सामाजिक मूल्ये जास्त असतात. (वा. ल. कुलकर्णी) |
| | २६. साहित्यकृती व सामाजिक परिस्थिती यात सरळ संबंध नसतात. (वा. ल. कुलकर्णी) |
| ३ | २७. साहित्याला सामाजिक बांधिलकी असते (गं. बा. सरदार) |
| ३ १ (५) साहित्य आणि इतिहास | २८. ऐतिहासिक कादंबरी लेखनात इतिहास हे साधन आहे, साध्य नव्हे (ना. सं. इनामदार) |
| १ १ (६) साहित्य आणि वास्तव | २९. साहित्यात वास्तवाचे प्रतिबिंब, पण ते मोहक. कथा-कादंबऱ्यातले हे प्रतिबिंब काव्यात आवश्यक नाही (चापेकर) |
| | ३०. जीवनाशी असंबद्ध वाङ्मय श्रेष्ठ नसते. (खांडेकर) |

| | | |
|---|---|---|
| ख | | |
| ख | | (४) संकल्पना व्यूह नाही |
| ख | | (१) परिस्थितीची संश्लिष्टता नाही. सुलभीकरण. |
| ख | | |
| ग | | |
| (पहा १२) | | |
| क | | |
| ख | | (३) संकल्पना व्यूह नाही. |
| क | | |
| ग | | |
| ख | | (४) विचाराचा खरेपणा गृहित वास्तविकांचा आधार नाही |
| ख | | (४) गृहित-आधार नाही. |
| ख | (१) परिस्थितीचे विविध पैलू ज्ञान<br>(२) परिस्थितीचे आकलन.<br>(३) सांकल्पनिक रचना | |
| ख | | |
| ख | | |
| ख | | |

| | |
|---|---|
| २ १ (६) | ३१. माणसांच्या मुक्या दु:खांना वाचा फोडणे हे साहित्याचे काम (दुर्गा भागवत) |
| ३ | ३२. साहित्यिक कार्यकर्ता झाला तर कलात्मकता हरवण्याचा व प्रामाणिकपणा धोका असतो. (सुर्वे) |
| १ १ (७) साहित्य आणि राजकारण | ३३. राजकीय घडामोडींचा संबंध साहित्याशी नसतो (कोल्हटकर) |
| | ३४. राजकीय उत्कर्ष असतानाच चांगले वाङ्मय निर्माण होते. (शि. म. परांजपे) |
| | ३५. राजकीय घडामोडींचा परिणाम १९२० नंतर मराठी साहित्यावर नाही. (परांजपे, केळकर, खांडेकर) |
| | ३६. साहित्याचा वापर राजकारणासाठी करावा (वरेरकर) |
| २ | ३७. १९२० पूर्वी राजकीय व सामाजिक निष्ठा मराठीत प्रभावी. पण गांधीवादी निष्ठा न स्वीकारल्याने कलावाद वाढला (जावडेकर) |
| | ३८. साहित्य व राजकारण यात संबंध नाही असे म्हणतात साहित्याच्या बाजूने अज्ञान वा राजकारणाच्या बाजूने धूर्तपणा आहे. (शिरवाडकर) |
| | ३९. व्यापक राजकीय प्रश्न हे अखेरीस सांस्कृतिक प्रश्न असतात म्हणून ते साहित्याशी संबंधित. (शिरवाडकर) |
| ३ | ४०. सर्व जीवन राजकारणमय. शासनाशी संघर्षापेक्षा संवाद हवा. यासाठी सामाजिक जीवन बहुकेन्द्रक हवे. (गाडगीळ) |
| १ १ (८) लेखक, कवी आणि समाज | ४१. मराठी साहित्याला लोकाश्रय नगण्य. (कीर्तिकर, आपटे, कोल्हटकर) |
| | ४२. चारित्र्यवान लेखकाचा समाजाला धाक हवा (वा. म. जोशी) |
| | ४३. लेखकवर्ग कंपूशाहीने राहतो. (खांडेकर) |
| | ४४. साहित्याची वाचक सापेक्षता : जसे वाचक तसे साहित्य (खांडेकर) |
| | ४५. बहुजनसमाज साहित्यातून मार्गदर्शन मागतो (वरेरकर) |
| २ | ४६. जनमानसात आज लेखकाला पूर्वीचा मान नाही |

| | | |
|---|---|---|
| १ | २ (९) परंपरा | ४७. मराठी साहित्याची परभृततेची परंपरा. संस्कृत मग इंग्रजी (केळकर) |
| | | ४८. परंपरा नाही. मराठी वाङ्मय बाल्यावस्थेत. (कोल्हटकर) |
| | | ४९. आधुनिक वाङ्मय फक्त पांढरपेशांचे (गायकवाड) |
| २ | २ (९) परंपरा | ५०. ज्ञानेश्वर ते टिळक यात मराठी वाङ्मयाचा प्रमुख विषय गीता. (लक्ष्मणशास्त्री जोशी) |
| | | ५१. मुसलमानी आक्रमण परतविण्याची प्रवृत्ती संतवाङ्मयाने केली. (जोशी) |
| | | ५२. परलोकवादापेक्षा इहलोकवाद मानवू लागल्याची खूण म्हणजे आधुनिक मराठी कविता. |
| १ | २ (१०) साहित्याचा उपयोग व हेतू | ५३. सत्य, सौदर्य व सौजन्य हे वाङ्मयाचे हेतू. वाङ्मय आनंद देते. (वा. म. जोशी) |
| | | ५४. हा आनंद सुसंस्कृत रसिकाचा. खेरीज राष्ट्रीयत्व जोपासणे, समाज सुधारणे, सौंदर्य दाखवणे हेही हेतू. (चापेकर) |
| | | ५५. साहित्यामुळेच राष्ट्र टिकते (अत्रे) |
| २ | २ (१०) साहित्याचा उपयोग व हेतू | ५६. साहित्य सत्य शोधते, जीवनाचा अर्थ लावते (ग. दि. माडगूळकर, पु. ल. देशपांडे) |
| ३ | २ (१०) साहित्याचा उपयोग व हेतू | ५७. साहित्य जीवनाचा अर्थ देतानाच कृतिप्रधान बनते (सरदार) |
| | | ५८. उपयोग असणे ही सामाजिक गरज आहे. ती साहित्याला चिकटवू नये. (व्यंकटेश माडगूळकर) |
| १ | २ (११) मानदंड | ५९. मराठीत सुसंस्कृत लेखक व सुसंस्कृत वाचक यांची वाण म्हणून श्रेष्ठ साहित्य नाही (वा. म. जोशी) |
| | | ६०. प्रेम या एकमेव विषयामुळे मराठी साहित्याची भाषा पल्लेदार व नाटकी झाली. (चापेकर) |
| | | ६१. लोकप्रियता हा श्रेष्ठ वाङ्मयाचा निकष नाही |
| २ | २ (१०) मानदंड | ६२. देश, काळ, परिस्थिती याचा साहित्य-निर्मितीशी संबंध जोडण्याचा बुद्धिवादी प्रयत्न रंजक असला तरी खरा नाही. (वा. ल. कुलकर्णी) |
| | | ६३. अलौकिक साहित्य कृतींची लौकिक कार्यकारण |

| | | |
|---|---|---|
| | | मीमांसा करणे शहाणपणाचे नाही. |
| ३ | २ (११) मानदंड | ६४. अखिल भारतीय साहित्याची संकल्पना दृढ झाली तर मराठी साहित्यातील मानदंडाचे पुनर्मूल्यन होईल (के. ज. पुरोहित) |
| १ | २ (१२) साहित्याची व्याख्या | ६५. संतवाङ्मय अध्यात्म-विचारासाठी रचले गेले, काव्य म्हणून रचले गेले नाही. (कीर्तिकर) |
| | | ६६. सविकल्प समाधी उत्पन्न करू शकते ते वाङ्मय (केळकर) |
| | | ६७. उच्च जीवन जगणे हे प्रथम महत्त्वाचे. साहित्य लिहिणे हे दुय्यम महत्त्वाचे (वा. म. जोशी) |
| २ | २ (१२) साहित्याची व्याख्या | ६८. प्रेरणा भावनिक व प्रकटीकरण बौद्धिक किंवा दोन्ही भावनिक झाले की ललित साहित्य (कृ. पां. कुलकर्णी) |
| | | ६९. भारतीय स्वातंत्र्य चळवळीचा केन्द्रबिंदू म्हणून मराठी साहित्य जन्मले (लक्ष्मणशास्त्री जोशी) |
| | | ७०. भावनांची सरमिसळ करून तत्त्वज्ञानाचे सिद्धान्त मांडणे म्हणजे साहित्य (शं. दा. पेंडसे) |
| | | ७१. कुतूहल हे साहित्याचे मूळ. (रा. श्री. जोग) |
| | | ७२. साहित्य म्हणजे मानवी मनाने केलेली प्रतिसृष्टी (वा. ल. कुलकर्णी) |
| | | ७३. प्रत्येक वेळी नवे रूप देणारे साहित्य हे अलौकिक साहित्य. आधुनिक मराठी साहित्यात अलौकिक साहित्यकृती नाही. (पु. शि. रेगे) |
| | | ७४. रंजकता आल्यावर साहित्य ही श्रेष्ठ कृती रहात नाही. जाणीव हा साहित्याचा पाया. (दुर्गा भागवत) |
| ३ | २ (१२) साहित्याची व्याख्या | ७५. उन्नत करते ते साहित्य. (विश्राम बेडेकर) |
| १ | २ (१३) वाद | ७६. पद्यरचना सामर्थ्य म्हणजे कवित्त्व नव्हे. (ग. ज. आगाशे) |
| | | ७७. रस हा काव्याचा आत्मा. (शि. म. परांजपे) |
| | | ७८. अश्लीलता विरोधाच्या नावाखाली विचार स्वातंत्र्य दडपणे अयोग्य. (चापेकर) |
| | | ७९. समाजच अभिरूचीचे नियंत्रण करतो |

| | | |
|---|---|---|
| | | (न. र. फाटक) |
| २ | २ (१३) वाद | ८०. केवळ सौदर्योपासक असणारा कवी हा प्रतिक्रांतिकारक आहे. (जावडेकर) |
| | | ८१. आजच्या सामान्य अनुभव-कक्षा शेक्सपिअरच्या अनुभव-कक्षेपेक्षा विस्तारीत आहेत (शिरवाडकर) |
| | | ८२. खोल अनुभव असेल तरच श्रष्ठ साहित्य निर्माण होते. (शिरवाडकर) |
| | | ८३. अनुभवाचे 'बुजगावणे' साहित्याला लावणे अयोग्य (पु. शि. रेगे) |
| | | ८४. आत्मनिष्ठ अशा साहित्याची कलामीमांसा वस्तुनिष्ठ शास्त्राने करणे योग्य नाही. (पु. शि. रेगे) |
| ३ | २ (१३) वाद | ८५. तात्कालिकाची घट्ट पकड असल्याखेरीज साहित्यिकाला शाश्वताचा मागोवा घेता येत नाही. (गं. बा. सरदार) |
| | | ८६. वाङ्मयाच्याद्वारे सामाजिक जबाबदारी पार पाडणे म्हणजे सामाजिक बांधिलकी. (गं. बा. सरदार) |
| | | ८७. बांधिलकीत व्यक्तिदु:ख गौण मानले जाते; समाजाचे दु:ख प्रधान मानले जाते. पण व्यक्ति-दु:खच शाश्वत असते (गंगाधर गाडगीळ) |
| | | ८८. साधनभूत साहित्य हे तात्कालिक प्रश्नांचा विचार करते. त्याची गुणवत्ता कमी. (व्यंकटेश माडगूळकर) |
| | | ८९. दलित समाज हा इतर समाजापासून वेगळा असल्याने दलित साहित्य वेगळे असणारच (शंकरराव खरात) |
| | | ९०. सांस्कृतिक किंवा सामाजिक संघटनातून लेखक जन्माला येतो हा भ्रम आहे. (नारायण सुर्वे) |
| | | ९१. समाज व शासन आज दलितांचे जीवन सुधारण्यासाठी भरीव कामगिरी करत असूनही त्याचे चित्रण मात्र दलित साहित्यात येत नाही. (द. मा. मिरासदार) |
| | | ९२. आपण जे अनुभवले ते सत्य मानणे हे अज्ञान आहे. (वामन चोरघडे) |
| | | ९३. ललित साहित्यातून केवळ आकृतिसौदर्याचा |

आनंद मिळत नाही. (गं. बा. सरदार)

९४. समता व स्वातंत्र्य यांचा केवळ उच्चार आपण करतो. पण जिथे समता असते तिथे व्यक्तिस्वातंत्र्य हरपते आणि जिथे स्वातंत्र्य असते तिथे समता येत नाही हे आपण विचारात घेत नाही. (विश्राम बेडेकर)

२ २ (१४) संमेलनाचा हेतू ९५. नवक्रांतीचे वातावरण निर्माण करण्यासाठी साहित्यसंमेलन हवे; संमेलनामुळे प्रतिक्रांतिकारक शक्तींना पायबंद बसेल. (जावडेकर)

३ २ (१४) संमेलनाचा हेतू ९६. मराठी साहित्य संमेलनात आज जिव्हाळाही आढळत नाही. जातीचा बंदिस्तपणा तसाच राहतो (गं. बा. सरदार)

१ २ (१५) साहित्यावरची टीका ९७. मराठी लेखकांची अनुभव-क्षेत्रेच मर्यादित. (वा. म. जोशी)

९८. महाराष्ट्रात राजकारण नाही, समाजकारण नाही. त्यामुळे साहित्यात फक्त प्रेमकारणच राहिले त्यातून नटवी, पल्लेदार मराठी उदयास आली (चापेकर)

९९. आधुनिक वाङ्मय हे कामगंड झालेल्यांचे वाङ्मय. वैवाहिक जीवनाविषयीचे असमाधान हे संपूर्ण सामाजिक असमाधान नव्हे. (पटवर्धन)

१००. मध्यमवर्गीय लेखकांची मनोवृत्ती पराभूतांची मनोवृत्ती आहे; साने गुरुजी, य. गो. जोशी त्यामुळे दैववादी बनतात.

१०१. मराठी वाङ्मयाचा वास्तवाशी संबंध नाही. नाटक कादंबऱ्यात स्वास्थ्य, समृद्धी असते; समाजात मात्र दारिद्र्य, उपासमार दिसते. (श्री. म. माटे)

२ २ (१५) साहित्यावरची टीका १०२. महाराष्ट्रीय जनतेने भांडवलशाही नाकारली आहे (जावडेकर)

१०३. नवकाव्य जास्त प्राज्ञिक आहे, कमी प्रातिनिधिक आहे. (कृ. पां. कुलकर्णी)

१०४. मराठीत उत्तम दु:खान्तिका नाही याचे कारण उच्च व्यक्तीचा बळी जातो हे पाहणे आपल्याला सहन होत नाही आणि आपला पुनर्जन्मावर विश्वास

आहे. (लक्ष्मणशास्त्री जोशी)

१०५. लेखकांच्या अव्यवस्थित प्रज्ञेमुळे आधुनिक साहित्य दुर्बोध होते. (आ. रा. देशपांडे)

१०६. सौदर्यशास्त्र एकांगी व संकुचित झाले आहे. (आ. रा. देशपांडे)

१०७. आजची कविता म्हणजे वैयक्तिक जीवनातल्या विस्कळित संवेदनांचा चिल्लर खुर्दा चिवडीत बसणे. ( आ. रा. देशपांडे)

१०८. लोकहितवादीपासून मराठी लेखनात असहिष्णुतेची परंपरा सुरू झाली. (रा. श्री. जोग)

१०९. सौदर्याबाबत व्यक्तिनिष्ठता स्वीकारल्याने विरूपाच्या दर्शनाचे समर्थन साहित्यात होते आहे.

११०.सांप्रतच्या मराठी जीवनाची परवड ही महायुद्धांनी नव्हे तर आपल्याच नालायकीमुळे झाली. पण हे समजून त्याचे दर्शन घडविण्याची हिंमतच साहित्यात नाही. (कुसुमावती देशपांडे)

१११. साहित्याची मूळ प्रेरणा म्हणजे प्राकृतिक जिजीविषा (पु. शि. रेगे)

११२. आपण वेगळे होऊन स्वत:च्या गूढ प्रेरणा जेथे जागतात ते खरे साहित्य (पु. शि. रेगे)

११३. अनिर्बंध सुरक्षितता कल्पून, असुरक्षिततेची आव्हाने स्वीकारत माणूस जेव्हा भावी सुखाची रम्य चित्रे रेखाटतो तेव्हा रोमॅन्टिसिझमचा जन्म होतो. (दुर्गा भागवत)

३ २ (१५) साहित्यावरची टीका

११४. संतांनी आध्यात्मिक लोकशाही आणली. (यू. म. पठाण)

१ २ (१६) चांगल्या साहित्याची निर्मिती

११५. भाषांतरांनी मराठी साहित्य सुधारेल (कीर्तिकर)

११६. साहित्य-लेखन हा जोडधंदा आहे. बुद्धिमान माणसांचा तो एकमेव व्यवसाय झाल्यासच चांगले

| | | |
|---|---|---|
| ख | (३) सांकल्पनिक रचना | |
| ख | (३) श्लिष्ट संकल्पना रचना | |
| ख | (३) परिस्थितीचे नीट आकलन | |
| क | | (३) पुरेशी वास्तविके नाही |
| क | (५) कार्यकारणभाव | |
| ख | | (४) गृहित विचाराला आधार नाही. |
| ख | | |
| ख | (१) परिस्थितीचे विविध पैलू माहित<br>(३) सांकल्पनिक रचना | |
| ख | | |
| ग | | (१) मूळ विचाराचा पत्ता न देणे<br>(२) त्याचे श्रेय लादणे. |
| ख | | (४) वास्तविकांचा आधार नाही. |
| ख | | |

साहित्य निर्माण होईल. (प्र. के. अत्रे)

१ ३ (१७) भाषा

११७. मराठीचा संस्कृतशी काही बाबतीतला संबंध गाभ्याचा आहे तर मराठीच्या काही गोष्टी संस्कृतच्या गाभ्यापासून दूर आहेत. (वैद्य)

११८. व्याकरणकार व कोशकारांनी भाषेची फक्त दखल घ्यावी. ती शुद्ध करण्याचा उद्योग करू नये (ह. ना. आपटे)

११९. इंग्रजीतून शिक्षण व संस्कृतचे कौतुक यामुळे देशी भाषा मागे पडल्या. (आगाशे)

१२०. भाषा व वाङ्मय सुधारण्यास स्वराज्याची आवश्यकता नाही. (कोल्हटकर)

१२१. लोकसंख्या वाढीने भाषाभिवृद्धी (परांजपे)

१२२. राज्याभिवृद्धीने भाषाभिवृद्धी (कोल्हटकर)

१२३. शास्त्रे भाषेतच वाढली तर परिभाषा आपोआप तयार होते. (वा. म. जोशी)

१२४. स्वभाषेतून शिक्षण मिळाल्यासच राष्ट्राची प्रगती होते. (केतकर)

१२५. राष्ट्रापुढे धर्म व भाषा दोन्ही गौण हव्यात (पटवर्धन)

१२६. भारतीय ऐक्य भाषाधिष्ठित नाही (पोतदार)

१२७. बहुजन समाजाचा विद्यापीठाशी संबंधच येत नसल्याने मराठीसाठी विद्यापीठ स्थापून मराठीचे संरक्षण होणार नाही. (ना. सी. फडके)

१२८. मराठी समाजाइतका स्वभाषेचा अभिमान इतर प्रांतात नाही. (न. र. फाटक)

१२९. मराठीत फार्सी शब्द नकोत. हिंदी राष्ट्रभाषा हवी. (सावरकर, पटवर्धन)

१३०. पारिभाषिक शब्द विशेषनामांसारखे भाषांतरित होत नाहीत. (न. र. फाटक)

२ ३ (१७) भाषा

१३१. प्रांतिक भाषांच्या विकासासाठी प्रांतिक स्वायत्तता हवी, ती भारतीय एकतेला नडणार नाही (श्री.के.क्षीरसागर)

१३२. कोकणी ही मराठीची बोली आहे. (प्रियोळकर)

क (१) अनिश्चित वास्तविके
(३) पुरेशी वास्तविके नाहीत

ख

ख (२) परिस्थितीचे नीट आकलन

ख (४) वास्तविकांचा आधार

ख
ख (४) वास्तविकांचा आधार
ख (४) वास्तविकांचा आधार

ख (४) वास्तविकांचा आधार नाही.

ख

ख
क (२) वास्तविकांचा खरेपणा
(५) कार्य-कारण संबंध

क (२) खोटी वास्तविके.

ख (२) परिस्थितीबाबत अज्ञान
(३) संश्लिष्टतेचा अभाव

ख

ख (२) परिस्थितीचे नीट आकलन

क (१) वास्तविकांची ओळख.

१३३. व्युत्पत्ती शुद्धलेखनाच्या बोकांडी बसवू नये. लेखन उच्चारानुसारीच हवे. (वि. द. घाटे)

१ ४ इतर

१३४. लेखकाच्या चारित्र्याची आणि लेखनाच्या बरे-वाईटपणाची गल्लत करू नये. (किबे)

१३५. टागोरांचे फाजील कौतुक करण्यापेक्षा तुकारामांकडे लक्ष द्या. (अणे)

१३६. हिंदूंचे धार्मिक जीवन सांघिक न होता वैयक्तिक होते; त्यामुळे राष्ट्रसंघटन होत नाही. (पटवर्धन)

१३७. नैतिक मूल्ये नसलेले राष्ट्र परतंत्र होते. (शं. दा. पेंडसे)

१३८. लेखक, राष्ट्रपुरुष हे निर्मितीच्या विशिष्ट क्षणीच थोर असतात, एरवी ती सामान्य माणसेच असतात (पु. ल. देशपांडे)

३

१३९. 'अज्ञानघन' म्हणजे विद्वत्ता (वा. कृ. चोरघडे)

१४०. येथील ७० कोटी लोकांना हा देश आपला आहे असे वाटत नाही. (वा. कृ. चोरघडे)

१४१. मराठी भाषक भांडखोर आहेत पण त्यांची विनोदबुद्धी शाबूत आहे. (गंगाधर गाडगीळ)

१४२. पूर्वी रामायण, महाभारत या महाकाव्यांनी देश जोडला होता. आज हे काम हिंदी चित्रपट करतात. हा सांस्कृतिक ऱ्हास आहे. (गंगाधर गाडगीळ)

## परस्परसंबंध विषयक

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पहिले ८ प्रश्न | क : १२ | ख : ३० | ग : ३ | घ : १ | ४६ |
| साहित्यविषयक ९ ते १६ | क : २२ | ख : ४२ | ग : ४ | घ : २ | ७० |
| भाषेबाबात | क : ४ | ख : १३ | - | - | १७ |
| इतर | क : २ | ख : ७ | - | - | ९ |
| एकूण | क : ४० | ख : ९२ | ७ | ३ | १४२ |

| क : गुण युक्त | क : दोष युक्त | क : उर्वरित | ख : गुण | ख : दोष युक्त | ख : उर्वरित | गुण युक्त | दोष | उर्वरित युक्त | युक्त | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ११ | १७ | १२ | २६ | १९ | ४७ | ३ | ० | ४ | ३ | १४२ |

विचारांची मोजदाद काटेकोरपणे केलेली नाही. जे विचार त्या त्या प्रश्नासंदर्भात महत्त्वाचे आहेत त्यांचीच दखल घेतली आहे. थोडक्यात एकंदर ७३ अध्यक्षीय भाषणात एकूण १४२ विचार आहेत असे नव्हे तर १४२ महत्त्वाचे विचार आहेत. अनुकरण-विचारांची पूर्ण गणती केलेली नाही. त्यातून फारसे काही हाती लागणार नाही. शिवाय अनुकरण-विचार आणि मते यात फारसा फरक रहात नाही. म्हणून अनुकरण-विचारातील गुण दाखविणारे व इतर दृष्टीने महत्त्वाचे असे सातच विचार घेतले आहेत. विचारांच्या आभासाबाबतही हेच म्हणता येईल. त्यांची संख्या प्रत्यक्षात मोठी आहे. पण नमुन्यादाखल तीनच विचार घेतले आहेत.

म्हणजे मुख्य भर अनुमानित-विचार आणि साकल्य-विचार या प्रकारांवर आहे. त्यातही निवड करताना त्यांचे महत्त्व लक्षात घेतले आहे. गुण-दोष जिथे स्पष्टपणे जाणवतात तेथेच दिले आहेत. जिथे ही स्पष्टता नाही त्या विचारांचा एकंदर संदर्भ लक्षात घेऊन प्रकार ठरविला आहे. असे संदर्भ मिळणे अवघड नाही. 'म्हणून', 'यामुळे', 'यावरून असे दिसते' 'एकंदर पाहता' वगैरे प्रयोग अनुमानित-विचारांकडे बोट दाखवतात. उलट एखाद्या विषयावर एकदम करण्यात आलेले भाष्य हे साकल्य-विचाराकडे अधिक झुकते. गुण-दोष न दाखविलेल्या विचार-प्रकारांना तालिकेमधे उर्वरित या शीर्षकाखाली घातले आहे.

विचारांची एकंदर रीती लक्षात येण्यासाठी १४२ विचारांचे विश्लेषण पुरेसे आहे. या विश्लेषणाला धक्का लागेल असे निष्कर्ष संख्या वाढवून किंवा विश्लेषणाची अन्य पद्धती अवलंबून निघण्याची शक्यता फार कमी.

अनुमानित-विचारात निगमन पद्धतीचा वापर जास्त आहे तर साकल्य-विचारात निगमन पद्धतीने तर्क करण्याची प्रवृत्ती जास्त दिसते. अनुमानित-विचार व साकल्य-विचार यांचे प्रमाण सर्वसाधारणपणे २ : ५ असे पडतो. म्हणजे साकल्य-विचार जास्त प्रबळ आहे. मराठी विचारवंतांना 'विचार सुचतो' किंवा 'असा विचार मनात येतो'; ते क्वचितच 'अशा विचाराप्रत येतात' किंवा 'यातून निष्कर्षाप्रत येतात.'

अनुमानित विचारात विचार-प्रक्रियेचे गुणविशेष ९२ पैकी २६ विचारात आहे. चापेकर, वा. म. जोशी, आ. रा. देशपांडे, गं. बा. सरदार हे विचारवंत या गुणविशेषांच्या बाबतीत उल्लेखनीय आहेत. तर जावडेकर, शं. दा. पेंडसे, क्षीरसागर यांच्या साकल्प-विचारातले दोष लक्षात येण्यासारखे आहेत. दोषयुक्त असे १९ विचार व ज्या विचारांच्या प्रक्रियेतील गुणदोष निश्चितपणे सांगता येत नाहीं असे उर्वरित ४७ विचार यांची बेरीज करता ९२ पैकी ६६ साकल्य-विचार हे विचार-शैलीच्या दृष्टीने अशक्त आहेत. मते, दुसऱ्याची मते, परंपरेने आलेले विचार आहेत तसे स्वीकारणे, सर्वसामान्य माणसाला वाटते माहीत आहे तेच बोलणे अशा कारणांनी ही अशक्तता येते.

एखाद्या विषयाचे अनेकविध पैलू माहीत आहेत असे क्वचितच आढळते.

दोन-चार अध्यक्षांचा अपवाद वगळता संपूर्ण परिस्थितीचे नीट आकलनही दिसत नाही. उदाहरणार्थ, संयुक्त महाराष्ट्राची मागणी करण्यामागे दिलेली कारणे एक तर राजकीय स्वरूपाची किंवा फार जुजबी आहेत. भाषा-भाषावार प्रांत-साहित्य यांचा फार खोलवर विचारच होत नाही. संकल्पनांचा व्यूह रचून विचार मांडण्याचा तर पूर्ण अभावच दिसतो. अमूर्त कल्पनांचे ओझे मराठी विचारवंतांना फारसे पेलत नाही. त्यामानाने उत्स्फूर्तपणे प्रथम विचार मांडून मग त्याला थोड्याशा वास्तविकांचा आधार शोधणे याकडे कल जास्त आहे. साहित्य व समाज यांचे संबंध सांगताना समाज या संकल्पनेची मांडणी वर्ग, जाती, संस्था, समाजाचे स्तरांचे विश्लेषण, शोषण-शोषित, आर्थिक सत्ता-सामाजिक प्रतिष्ठा, परंपरा-नवता, स्वीकार - अस्वीकार - पळवाट, मामाजिक व्यवहार - सामाजिक अभिसरण, व्यक्ती- गट - समूह - समाज यासारख्या संकल्पना निश्चित करून त्या आधारे करता आली असती. पण आपण मांडलेला विचार हा सिद्ध असून त्याला एक-दोन वास्तविकांचा आधार शोधला की झाले अशीच वृत्ती एकंदरीने दिसते. संकल्पना-व्यूह रचून विचारांच्या विविध शक्यता पडताळण्यातला आनंद मराठी विचारवंतांनी फारसा उपभोगलाच नाही.

अनुमानित-विचार हे अनुभवसिद्ध असतात. वास्तविकांचा भक्कम आधार त्यांना लागतोच पण शिवाय वास्तविकात परस्पर संबंध, विशेषत: कार्य-कारण संबंध शोधावे लागतात. वास्तविके शोधणे हे चिकाटीचे काम असते. म्हणूनच त्याचे प्रमाण साकल्य-विचारांच्या निम्म्यापेक्षाही कमी आहे. अनुमानित विचारात वस्तुनिष्ठता जास्त असते. भावनिक आवाहन करणाऱ्या भाषणात वस्तुनिष्ठता नसली तरी चालते. शिवाय सुचेल तसे बोलण्याची मोकळीक अनुमानित विचारात राहत नाही. मुख्य म्हणजे अनुमानित-विचार करण्यासाठी एक प्रकारची शिस्त लागते. अनुमानित-विचार हा साकल्य-विचारापेक्षा मुळातच श्रेष्ठ नसला तरी अनुमानित-विचार हा जास्त विश्वासार्ह वाटतो. त्याच वास्तवांचा वापर करून वेगळा विचार माडणे ही अधिक कठीण गोष्ट असते.

४० अनुमानित-विचारात विचार-प्रक्रियेत दोष असणाऱ्यांची संख्या जास्त आहे. त्यातही वास्तविकांचा अभाव किंवा पुरेशी वास्तविके न देणे हा दोष पहिल्या पायरीवरच्या कीर्तिकरांपासून ते तिसऱ्या पायरीवरच्या मिरासदारांपर्यंत समप्रमाणात आढळतो. यात एरवी चागले म्हणून समजले जाणारे विचारवत आहेत. उदाहरणार्थ, 'अभिजात वाड्मयाला सामाजिक मूल्ये जास्त असतात' या वा. ल. कुलकर्णी यांच्या, 'गांधीवादी निष्ठा न स्वीकारल्याने कलावाद वाढला' या जावडेकरांच्या, 'आधुनिक वाङ्मय हे कामगंड झालेल्यांचे वाङ्मय आहे.' या पटवर्धनांच्या, 'स्वभाषेतून शिक्षण मिळाल्यासच राष्ट्राची प्रगती होते' या केतकरांच्या, तर 'मराठा समाजाइतका स्वभाषेचा अभिमान इतर प्रांतात नाही' या न र. फाटकांच्या विचारामागे पुरेशी वास्तविके नाहीत.

कार्य-कारण संबंध जोडण्याचा गुणविशेष काही अनुमानित-विचारात आहे. पण त्यात वास्तविकांची संख्या दोन पेक्षा जास्त जात नाही. इंग्रजी शिक्षणातून मिळणाऱ्या इंग्रजी वाङ्मयाने मराठी विचारवंतांना संवेदनशीलता मिळाली. स्वातंत्र्यानंतर साहित्यिक विचारवंत द्रष्टेपणाच्या आविर्भावात वैश्विक सत्ये मांडू लागले. अर्थात यातही इंग्रजी वाङ्मयाचा प्रभाव होताच. पण स्वातंत्र्यपूर्व काळात काय किंवा स्वातंत्र्य मिळाल्यानंतरच्या काळात काय विज्ञान-शिक्षण व विज्ञान-पद्धती याचा संपर्क साहित्यिक विचारवंतांना झालाच नाही. निगमन पद्धतीने अनुमाने काढण्याची शिस्तही त्यामुळे लागली नाही. अनुमानित-विचारांचे गौणत्व हे यामुळे आले. लो. टिळकांनंतर राजकारणात वैचारिक नेतृत्व संपले; स्फुरणाऱ्या आतल्या आवाजाचे नेतृत्व आले असे डॉ. आंबेडकर म्हणतात; मराठी साहित्यिकांच्या साहित्यविषयक चिंतनात पहिल्यापासूनच स्फुरणाऱ्या कल्पनांना विचाराचे स्थान प्राप्त झाले. रानडे, टिळक, आगरकर, फुले, आंबेडकर यांच्यानंतर मराठीत वैचारिक वाङ्मयाला आलेली मरगळ ही एकप्रकारे अपेक्षितच होती.

मात्र मराठी साहित्यिकांनी साहित्य-विचारात काही गोष्टीचे सातत्य ठेवले आणि आधीच्या लोकांकडून मिळालेले विचार-संचित पुढच्यांना देण्याचे महत्त्वाचे कार्यही केले.

प्रत्येक पायरीवरील प्रत्येक प्रश्नाच्या चर्चाचा घेतलेला आढावा फिरून एकदा पाहिल्यास प्रत्येक प्रश्नास दोन-चार उत्तरे देण्यात येतात असे दिसते. उदाहरणार्थ, साहित्याचा उपयोग काय ? तर राष्ट्रीयत्वाची भावना जागवणे, आनंद देणे, समाजप्रबोधन करणे, मनोविकास घडवणे वगैरे. मग हीच उत्तरे वेगवेगळे अध्यक्ष वेगवेगळ्या पायऱ्यांवर पुन्हा आळवतात. त्यात भर घालणे, त्यावर टीका करणे, त्याची वेगळी उपपत्ती मांडणे, त्याचा विस्तार करणे वगैरे गोष्टी होत नाहीत. तो स्वयंसिद्ध विचार म्हणून स्वीकारला व मांडला जातो. साकल्य-विचारांचे प्राबल्य यामुळेही दिसते.

उपस्थित मान्यवरांचा उल्लेख करून भाषण करणे—श्रोत्यांना उद्देशून बोलणे—कुणालाही उल्लेख न करता भाषणास सुरुवात करणे अशी वाटचाल एक ते तीन पायऱ्यांवर दिसते हे आपण पाहिले. यालाच समांतर अशा अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल कृतज्ञता व समाधान — पद मिळाल्याचा अभिमान — आणि आपली लायकी गृहित धरण्याचा अहंकार या वृत्तीही दिसतात. भाषणाच्या लेखनाखाली स्वत:चे संपूर्ण नाव देणे—वडलांचे नाव गाळणे हा बदल आणि तर्कशुद्ध विचार करणे—वक्तृत्वपूर्ण बोलणे—आत्मनिवेदन करणे—आत्मप्रशंसा करणे हा बदल यात नाते आहे. पहिल्या पायरीवर समकालीनांवर घसरणारे अध्यक्ष संख्येने जास्त आहेत; दुसऱ्या पायरीवर नावे घेऊन प्रशंसा व नावे न घेता टीका करणारे अध्यक्ष आहेत; तिसऱ्या पायरीवर स्वत:च्याच वाङ्मयाचा पुरस्कार करणारे अध्यक्ष जास्त आहेत. १९५४ पर्यंत विचारवंत किंवा चांगले साहित्यिक अध्यक्षपदी येतात. पुढे या स्थानी फक्त साहित्यिक येतात.

१९७८ पासून दोन-चार अपवाद वगळता गरज साहित्य लिहिणारे अध्यक्ष होतात. यात आमंत्रित अध्यक्ष ते चुरशीची निवडणूक लढवून येणारे राजकारणी अध्यक्ष असाही प्रवास आहे. (सरदार, गाडगीळ, सुर्वे यांचे मोजके अपवाद वगळता तिसऱ्या पायरीवर विचार करणारे अध्यक्षच नाहीत.) साहित्याचा विचार करणाऱ्या विद्वानांचे संमेलन ते पैसा खर्च करून उत्सवी स्वरूपात होणारे संमेलन हा प्रवासही याला समांतर आहे. (वैचारिक परभृततेपेक्षा वैचारिक उन्हाळा परवडला असेही कोणी म्हणू शकेल.) भाषांतर आणि उसनवारीवर चाललेले १९३० पर्यंतचे वाङ्मय, त्यानंतरचे मध्यमवर्गीयांचे स्थितिशील वाङ्मय आणि मग विद्रोही असे दलित वाङ्मय हे मराठी वाङ्मयाचे टप्पे अध्यक्षीय भाषणातून जाणवतात. वैचारिक-वाङ्मयाचा १९३० नंतरचा ऱ्हास आणि केवळ कलावादी वाङ्मयाचा उगम यातले कार्यकारण संबंधही काही अध्यक्षांना जाणवतात. विपुल वैचारिक साहित्याविना चांगले ललित साहित्य अशक्य आहे, साहित्याची कालातीतता तत्कालिन क्षण घट्ट पकडून ठेवण्यावर अवलंबून असते, जीवनाचा सर्वकष विचार जीवनसंबद्ध राहून करणारे ते साहित्य असे मौलिक निष्कर्षही अध्यक्षीय भाषणातून निघतात. पण अशी जमेची बाजू कमी आहे. पूर्वी पांगारकर, राजवाडे, गडकरी, चिं. वि. जोशी हे विचारवंत वा साहित्यिक लायकी असूनही अध्यक्ष झाले नाहीत याची खंत होती. नंतर ही खंत मावळली. आज भालचंद्र नेमाडे, गंगाधर पानतावणे, रा. ग. जाधव, द. भि. कुळकर्णी, मंगेश पाडगावकर या त्यातल्या त्यात चांगल्या साहित्यिकांची वा विचारवंतांची लायक व्यक्ती म्हणून नाव घेण्याचीही गरज सामान्य वकूबाच्या अध्यक्षांना वाटत नाही. पंधरा-वीस पानांच्या मजकुरात अध्यक्षीय भाषणाचा उपचार उरकला जातो. स्थितिशील समाजाच्या निष्प्रभ गतिशीलतेचे मराठी साहित्य संमेलन हे प्रतिक आहे; शतकाच्या मराठी विचार-शैलीचा तो चालता-बोलता इतिहास आहे.

# पुणे : १९७७

# पु. भा. भावे

पुणे येथे भरणारे हे मराठी साहित्य संमेलनाचे बावन्नावे अधिवेशन आहे. ह्या अधिवेशनाचा अध्यक्ष म्हणून आपण मला निवडून दिलेत ह्याविषयी मी आपणास मन:पूर्वक धन्यवाद देतो. मराठी लेखकाला मिळू शकणारा हा मोठ्यातला मोठा सन्मान आहे. ह्या सन्मानास मी पात्र नाही असे म्हणण्याची पद्धत आहे. पण तसे मी म्हटले तर आपल्या पदरी गाजरपारखीपणा येतो तेव्हा तसे काही म्हणून आपल्या रसिकतेचा व निर्णयशक्तीचा मी अपमान करणार नाही. खरे म्हणजे पुण्याने मला निवडून दिले, ह्याचा मला विशेष अभिमान वाटतो. पुणे हे तसे फार चोखंदळ आणि कठीण गाव आहे. पुण्याने मला निवडले, म्हणजे जगात आता मला कुठेही भय उरले नाही.

पुणे हे मोठ्या परंपरा असलेले नगर आहे. पुणे हे परंपरा निर्माण करणारे नगर आहे. शिवछत्रपतीनी इथे एक पूज्य परंपरा निर्माण केली ती परंपरा लोकमान्य टिळकांनी पुढे चालवली. 'केसरी'ची गर्जना इथे दणाणली स्वातंत्र्यवीर सावरकरांनी परदेशी कपड्यांची होळी इथे केली. रॅण्डसारख्या अत्याचारी राजकर्त्यांना प्राणदंड देणारे ह्या देशातले पहिले शस्त्राचारी क्रांतिकारक इथे झाले. दामोदर, वासुदेव आणि बाळकृष्ण हे तीन चाफेकर बंधू आणि त्यांचे जिवलग मित्र रानडे हातात गीता घेऊन ते देशधर्माच्या नावाने इथे फासावर चढले. हौतात्म्याची परंपरा त्यांनी निर्माण केली. समाजसुधारणेचा पाया भरणारे न्यायमूर्ती रानडे, लोकहितवादी, फुले, आगरकर, कर्वे, विठ्ठल रामजी शिंदे—साऱ्यांचे कर्तृत्व इथलेच । जे राजकारणाचे आणि समाजकारणाचे तेच साहित्यकारणाच ! मोठेमोठे साहित्य दिग्गज इथे होऊन गेले. मराठी भाषेचे शिवाजी, निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर इथले ! त्यांनीच ह्या मृतवत पडलेल्या समाजाला स्वदेश, स्वधर्म व स्वभाषा ह्यांच्या नावाने तुतारी फुंकून जाग आणली. आद्य मराठी कादंबरीकार हरी नारायण आपटे इथले ! नाट्याचार्य खाडिलकर व गडकरी इथले, साहित्याचार्य केळकर इथले, दिवाकर इथले, आचार्य अत्रे इथले, डॉक्टर श्रीधर व्यंकटेश केतकर इथले, आणि संपूर्ण स्वातंत्र्याचे उद्‌गाते काळकर्ते शिवरामपंत परांजपेही इथले ! नावे तरी घ्यावीत किती ? हे इवलेसे गाव पुणे ! पण ताऱ्यांनी खचलेल्या अनंत आकाशाने हेवा करावा अशी नरनक्षत्रे येथे तळपून गेली. त्यांनी प्रकाशाची एक

परंपरा निर्माण केली. क्रांतिकारकांनी, स्वातंत्र्यवाद्यांनी, सुधारणावाद्यांनी आणि साहित्यिकांनी ! कुणी नाक उडवून म्हणेल, "साहित्यिकांनी ? साहित्यिकांनी प्रकाशाची परंपरा निर्माण केली ? उजेड पडला...क्रांतिकारक — सुधारक — स्वातंत्र्यवीर — यांचे एक ठीक आहे, पण लेखकांनी इथे कसले दिवे लावले ? लेखक म्हणजे चंगीभंगी, चमत्कारिक, बावळट जात ! ज्याला ह्या जगात दुसरे काहीच करता येत नाही, तो मनुष्य लेखक किंवा कवी होतो; कथा कादंबऱ्या लिहितो. कादंबरी म्हणजे खोटेनाटे, हे आपले समीकरण ठरलेले आहे. अमुक एक मनुष्य कादंबरी रचून सांगतो म्हणजेच तो थापा मारतो....एखादा मनुष्य कथाकादंबरीकार आहे, म्हणजेच तो बेकार आहे."

मला स्वत:ला हा अनुभव आहे. अनेकदा मला माणसे विचारतात की "तुम्ही काय करता ?" मी त्यांना सांगतो, "मी लिहितो. गोष्टी, कादंबऱ्या, नाटके, निबंध वगैरे लिहितो !" तेव्हा ते म्हणतात, "ते आम्हांला ठाऊक आहे हो ! पण तुम्ही काय करता काय ?" मी त्यांना उत्तर देतो, "मी बोलतो !" त्यावर पुन्हा ते म्हणतात, "तेही आम्हाला ठाऊक आहे ! आज तुमच्या व्याख्यानाचे प्रसिद्धीपत्रक पाहिले ! पण तुम्ही करता काय ?" मी जर त्यांना सांगितलं की, "मी मंत्री आहे !" तर मग जास्त बोलण्याचे काही कारणच नाही ! मंत्री म्हणजे इहलोकीचा प्रतिपरमेश्वर ! माणूस मंत्री झाल्यावर आणखी काय व्हायचे राहिले ? मग तो झाला दगड लावायला, दौरे करायला आणि मोटार-विमानातून फिरायला मोकळा ! पण मी तर काही मंत्री नाही. मंत्री होण्याचा संभव नाही. पण मी जर सांगू शकलो की मी 'प्रांत साहेब आहे !' किंवा 'सबरजिस्ट्रार आहे !' तरी त्यांना वाटेल की हा काही उपयोगाचा माणूस आहे. हा काहीतरी करतो ! प्रांत किंवा सबरजिस्ट्रार ! वा....वा: ! सबरजिस्ट्रार ही मोठी प्रसिद्धच जागा आहे — तिथे खूपच खटपटी कराव्या लागतात ! पण मी तर प्रांत साहेबही नाही किंवा सबरजिस्ट्रार नाही ! होण्याचा काही संभव नाही ! पण मी जर सांगू शकलो की मी 'चौथ्या वर्गाचा अधिकारी आहे, म्हणजे क्लास फोर ऑफिसर आहे — म्हणजेच चपराशी आहे. संस्थानिकांसारखा अंगरखा घालून आणि कमरेला जंबिया खोचून साहेबाचे दार राखीत असतो !' तरी लोकांना वाटेल की हा फार महत्त्वाचा माणूस आहे. हा महादेवापुढचा नंदी आहे. हा बरेच काम करू शकतो आणि करतो !

पण मी लेखक आहे म्हणून सांगितले म्हणजे संपले सारे ! बोलणे किंवा लिहिणे हे काही उपयोगाचे काम आहे, असे अनेकांना वाटत नाही. शास्त्रज्ञाचे महत्त्व आज बहुतेकांना पटलेले आहे. आगगाड्या, विमाने, अणुगोलक ही सारी शास्त्रज्ञांची कृपा आहे. क्षणात लाख माणसांचे भस्म करून टाकतील अशी शस्त्रे त्यांनी शोधून ठेवली आहेत. तेव्हा त्यांचे कर्तृत्व आणि महत्त्व नाकारून कसे चालेल ? त्यांच्यामुळेच तर आज माणूस चंद्रावर गेला, पण लेखकाने अशी कोणती तलवार मारली ? त्याचे कर्तृत्व कोणते ? त्याचा समाजाला उपयोग काय ? ढोबळ बुद्धीच्या माणसांना हा

उपयोग कळलेला नाही. विचार करणाऱ्यांना कळलेला आहे. शास्त्रज्ञ, तत्त्वज्ञ, लेखक ह्या साऱ्यांचाच समाजाला उपयोग आहे. सारेच आपापल्यापरीने महत्त्वाचे आहेत. शास्त्रज्ञामुळे माणूस चंद्रावर गेला हे तर खरेच आहे. पण त्यापूर्वीच लेखक चंद्रावर गेलेला होता. त्याची तरल कल्पना तिथवर जाऊन पोहोचलेली होती. सरासरी शंभर वर्षापूर्वीच जूल्स व्हर्न (Jules Verne) नामक फ्रेंच लेखकाने चंद्रप्रवासाविषयी एक कादंबरी लिहून टाकली होती. तेव्हा ती कादंबरी होती, आज ते सत्य आहे ! तेव्हा ती कल्पना होती, आज ती वस्तुस्थिती आहे. व्हर्न नामक तेव्हा भंगड मानल्या गेलेल्या एका लेखकापासून शास्त्रज्ञांनी प्रेरणा घेतली असणे अगदी शक्य आहे ! साहित्यिक आणि शास्त्रज्ञ ह्या दोघांनाही तीव्र कल्पनाशक्ती लागते. दोघांचीही काही दिवास्वप्ने असतात. गृहीतकृत्ये असतात. दोघेही कोणत्यातरी एका वेडाने म्हणा की ध्येयाने म्हणा झपाटलेले असतात, आणि दोघेही आजन्म त्या ध्येयामागे धावत सुटतात. शास्त्रज्ञ म्हणतो की, "हे बालगंधर्वांचे गाणे, हा सैगलचा स्वर, हे स्वातंत्र्यवीर सावकारांचे प्रस्फूर्त शब्द, मी नाही, नाहीसे होऊ देणार—नाही मरू देणार ! ते मी एका तबकडीवर एका पट्टीवर धरून ठेवीन—मी असे काहीतरी करीन की ज्यामुळे हे शब्द सहस्रावधी कोसांवरून एखाद्या बंद खोलीतही ऐकू येतील ! हे शब्द मी अनेक पिढ्यांना ऐकवीन—हे शब्द मी अमर करीन !" आणि एखादा मार्कोनी, एखादा एडिसन हे अघटित करूनच दाखवितो ! न्यूयॉर्कचा शब्द, लंडनचा शब्द, दिल्लीचा शब्द, तुम्हाला नुसती कळ फिरविली की घर बसल्या ऐकू येतो ! मार्कोनी, एडिसनला प्रथम लोकांनी वेड्यातच काढले असेल. जसे ख्रिस्ती पाद्र्यांनी गॅलिलिओ, कोपर्निकसला वेड्यात व पाखंड्यात काढले ! त्यांचा छळ केला ! जड बुद्धीचे सामान्य, असामान्य प्रतिभावंतांना असेच पायदळी तुडवितात — व मग प्रचिती पटली यंत्रावर गाणे वाजू लागले, उपयोग कळला, म्हणजे डोक्यावर घेतात. ज्यांना लाथ मारली त्यांचेच पाय धरू लागतात. मग एडिसन त्यांना मोठा वाटतो. मार्कोनी मोठा वाटतो ! "पुराणांतरीची आकाशवाणी मात्र खरी नाही. त्या केवळ भाकड कथा !" का म्हणून भाकड कथा ? 'कंसा, तुझा शत्रू दिवसामासांनी गोकुळात वाढतो आहे ! !' ही भाकड कथा काय म्हणून ? ही तर तीच कल्पना आहे, जी शास्त्रज्ञापूर्वीच लेखकाला स्फुरली. म्हणजे लेखक व शास्त्रज्ञ ही दोन टोके शेवटी कुठेतरी एकत्र मिळतात. दोघेही एकमेकांना पूरक असू शकतात. पुढारलेल्या माणसांना ह्या दोघांचाही उपयोग आहे, दोघांचीही आवश्यकता आहे.

जिला आपण मानवी प्रगती म्हणतो, तिला दोन पाय आहेत. अक्षर हा एक पाय व आकडा हा दुसरा पाय ! एक, दोन, तीन, चार हे आकडे गणित ह्या आकड्यातून निघते. समीकरणे मांडली जातात व ती अंती माणसाला चंद्रावर नेतात. अ — आ — इ — ई — उ — ऊ — ही अक्षरे ह्या अक्षरांतून वाङ्मय जन्माला

येते. भास्कराचार्य, आर्यभट्ट, न्यूटन, आईन्स्टाइन ही निर्मिती आकड्यांची व व्यास, वाल्मिकी, भवभूती, कालिदास, शेक्सपिअर ही निर्मिती अक्षरांची ! एकपरीने आकड्यापेक्षाही अक्षराची महती मोठी आहे. उपयुक्तता मोठी आहे ! अक्षराविना माणसाचे होणार कसे ? भाषेविना माणसाचे चालणार कसे ? भाषेविना मानवी व्यवहार कठीण ! अक्षराविना मानवी प्रगती कठीण ! ज्यांना बोलता येत नाही, असे मुके आपण पाहिले आहेत का ? ज्यांना ऐकू येत नाही, म्हणून बोलताही येत नाही, असे मूकबधिर (Deaf Mutes) आपण पाहिले आहेत काय ? पाहिले असाल तर भाषेचे महत्त्व आपणास तत्काळ कळेल ! गणितसुद्धा शेवटी भाषेच्या माध्यमातूनच समजावून सांगावे लागते ! माणूस आपल्या भावना व विचार शब्दांनीच व्यक्त करीत असतो ! 'आई, मला भूक लागली !' असे म्हणताच आले नाही तर ? — 'आम्हांलाच मते द्या व विजयी करा !' असे सांगताच आले नाही तर ? 'प्रिये, माझे तुझ्यावर फारफार प्रेम आहे ! माझ्याशी लग्न करशील का ?' हा प्रश्न विचारताच आला नाही तर ? — तर सारेच काम मोठे कठीण झाले असते ! माणूस नुसत्या खाणाखुणा कुठवर करणार ? कधीकधी खाणाखुणा ठीक आहेत. पण शेवटी त्याला भाषा लागते, अक्षरे लागतात, शब्द लागतात ! म्हणून आपल्या परंपरेत 'ॐ'कार पहिला आहे. बायबलात म्हटले आहे, 'First there was word The word was that of god, the word was god !' ('प्रथम शब्द उत्पन्न झाला, तो शब्द ईश्वराचा होता, तो शब्दच ईश्वर होता !') असे शब्दाचे माहात्म्य आहे. असे हे भाषेचे महत्त्व आहे. माणसावर पहिला संस्कार शब्दांचा आणि भाषेचाच होत असतो. नुकत्याच जन्मलेल्या मुलाशी त्याची आई सारखी बोलत असते. त्याला गाणी म्हणत असते. मातेचे बोलणे ऐकता ऐकता मूल भाषा शिकून जाते. संस्कार ग्रहण करीत असते. मुलाला मुळाक्षरे येत नाहीत, व्याकरण येत नाही. तरी ते व्याकरणशुद्ध भाषा बोलू लागते. हे सगळे नुसते ऐकून ऐकून होते. प्रखर बुद्धीची मुले आठ-दहा महिन्यांत बोलू लागतात. वर्ष-दोन वर्षात तर कोणतेही मूल कोणतीही भाषा आत्मसात करते ! तामिळ मूल तामिळ भाषा, इंग्लिश मूल इंग्लिश भाषा, मराठी मूल मराठी भाषा, वर्षदोन वर्षात शिकते. ही भाषा त्याला स्वत्व देते. भाषेच्या दाराने मूल माणसाच्या जगात-सुसंस्कृत माणसाच्या जगात प्रवेश करते. त्या भाषेला येणारे रसाळ फळ म्हणजे साहित्य !

साहित्यिक, तत्त्वज्ञ, शास्त्रज्ञ केवळ माणसांच्या जगात उत्पन्न होतात. मनुष्य आणि पशू ह्यातला हा मुख्य भेद आहे. माणूस एखाद्या स्वप्नासाठी, एखाद्या ध्येयासाठी, कल्पनेसाठी वेडा होऊन जातो ! अस्वस्थ होऊन जातो. गाढव तसे होत नाही ! देशात राज्य इंग्रजांचे आहे, की अल्लाउद्दीन खिलजीचे आहे, की औरंगजेबाचे आहे, ह्याची चिंता गाढवाला नसते. ती चिंता एखाद्या शिवाजीला पडते, प्रतापला पडते, टिळकांना पडते ! देशधर्मावरील अन्यायाच्या व अत्याचाराच्या कल्पनेमुळे ही माणसे कष्टी

होतात, संतप्त होऊन जातात, कृती करतात ! तळमळून बोलतात आणि लिहितात. एखादा शिवरामपंत परांजपे, एखादा टिळक, एखादा विष्णुशास्त्री चिपळूणकर ! गाढव असे काही करत नाही. ते शांतपणे गवत खात बसते. गवत मिळाले तर गवत, नाहीतर 'ब्लिट्झ' किंवा 'फिल्मफेअर'चा अंक ! त्या अंकातल्या हेमामालिनीच्या चित्राकडे गाढवे ढुंकूनही पाहत नाहीत ! तिलाही ते खाऊन टाकतात ! पोट भरल्याशी काम ! पण केवळ पोट भरल्यामुळे माणसाचे समाधान होत नाही. त्याला अन्य भुका आहेत आणि एका परीने त्या भुका पोटाच्या भुकेपेक्षा अधिक तीव्र व अधिक महत्त्वाच्या आहेत. त्याला धर्माची भूक आहे, तत्त्वज्ञानाची भूक आहे, संगीताची आहे, साहित्याची आहे । माणसाचे माणूसपण त्याच्या ह्या भुकांतच आहे. अन्नाचे महत्त्व अर्थात कमी नाही. अन्नाला आपण पूर्णब्रह्म म्हणतो. उदरभरणाला 'यज्ञकर्म' म्हणतो ! तसं ते एका संदर्भात आहेही ! एरवी सुसंस्कृत माणसाच्या दृष्टीने अन्न हे एक साधन आहे ! जिवंत राहण्याचे साधन, जिवंत राहून धर्म, शास्त्र, संगीत, साहित्य यासंबंधीच्या भुका भागविण्याचे साधन ! ह्या भुका रेड्याला किंवा बोकडाला नसतात. बोकड कधी गाणं म्हणत नाही, की रेडा नृत्य करीत नाही. पुस्तके लिहिणारे किंवा पुस्तक वाचणारे गाढव कोणी कधी पाहिले आहे काय ? —नाही. गाढवे पुस्तके लिहीत नाहीत किंवा पुस्तके वाचीत नाहीत. ते त्यांना जमत नाही. त्यात त्यांना आनंद नाही ! खाणे, पिणे, झोपणे, प्रजोत्पादन करणे ह्यातला आनंद त्यांना ठाऊक आहे. तो आनंद तर आपल्यालाही ठाऊक आहे. तेवढ्यापुरते आपण पशू आहोत. पण तेवढे आपल्याला पुरत नाही. केवळ खाणे, पिणे, झोपणे ह्यापलीकडचा आनंद आपण शोधत असतो कुणी देशसेवेत आनंद शोधतो, तर कुणी शास्त्रसेवेत, कुणी संगीतात, तर कुणी साहित्यात । आणि ह्या सगळ्यांचा माणसावर परिणाम होत असतो.

परिणाम ? होय — परिणाम ! होत नाही का परिणाम ? विज्ञानशास्त्राचा माणसावर परिणाम होत नाही का ? अणुगोलकाचा परिणाम होत नाही ? संगीताचा परिणाम होत नाही ? — होतो — होतो — माणसावरच काय, वनस्पतीवरदेखील संगीताचा परिणाम होतो. आणि साहित्य ? आणि शब्द ? शब्दांचा माणसावर काहीच परिणाम होत नाही का ?

'गाढव आहेस तू अगदी !' 'तू अप्सरेसारखी सुंदर दिसतेस ! अरे आग लागली आग !' ह्या शब्दांचा माणसांवर काहीच का परिणाम होत नाही ? मग व्यर्थच माणसाने शब्द शोधून काढले. व्यर्थच त्याला वाणीचे वरदान मिळाले. व्यर्थच त्याने साहित्य निर्माण केले ! 'बुडाला औरंग्या पापी, म्लेच्छ संहार जाहला, उदंड जाहले पाणी, स्नानसंध्या करावया !' ह्या रामदासांच्या कल्लोळमय शब्दांचा काहीच का परिणाम होत नाही ? — काहीच का परिणाम झाला नाही ? 'दया तिचे नाव भूतांचे पालन आणि निर्दाळण कंटकांचे' हे तुकाराममहाराजांचे शब्द वायाच गेले का ?

'एकच प्याला'तला सुधाकर शेवटी मूल मारतो, सिंधूला मारून टाकतो व स्वत:ही मरतो. त्याचा दारूचा पेला उचलून दाखवत रामलाल म्हणतो, "सुधाकराचं असं ह्या जगात आता काय राहिलं आहे ? सर्वस्वासकट तीन जीव ज्यात बुडाले, तो हा दारूचा एकच प्याला !"

हे शब्द ऐकताक्षणी माणसाच्या डोळ्यांत खळकन पाणी येते. ती रडू लागतात. त्यांच्यावर परिणाम होतो. रामलालचे शब्द त्यांना काही सांगून जातात, त्यांच्यावर काही संस्कार करून जातात. नाट्याचार्य खाडिलकर, हरिभाऊ आपटे, राम गणेश गडकरी, विष्णुशास्त्री चिपळूणकर, शिवरामपंत परांजपे, ह्यांनी जे काही लिहिले, त्याचा आमच्यावर काहीच का परिणाम झाला नाही ? इतके का आम्ही दगड आहोत ? आणि दगडही पुरेशी आच लागली म्हणजे वितळतो. त्याचाही रस होतो आणि ज्वाला पर्वताच्या मुखातून वाहू लागतो. दगडाला कलाकाराची छिन्नी लागली म्हणजे त्यातून निर्माण होतात वेरूळची लेणी ! त्या लेण्यांचा माणसावर काहीच परिणाम होत नाही का ? आणि शब्दांची लेणी अगदी निरर्थकच असतात का ? शब्द एखादी भव्य कल्पना जपत आणि जिवंत ठेवीत नाहीत का ? शब्द माणसाला चेतवीत नाहीत का ?

ह्या देशात विष्णुशास्त्री, टिळक, सावरकर, खाडिलकर, शिवरामपंत उगाचच का उत्पन्न झाले ? हे केवळ थोर देशभक्त नव्हते — तर थोर साहित्यिकही होते. त्यांचा माझ्यासारख्यांवर फार परिणाम झाला. त्यांनी अनेकांच्या जीवनाच्या दिशाच बदलून टाकल्या  त्यांनी अनेकांना प्रेरणा दिल्या, अनेकांसमोर करणीने व लेखणीने उज्ज्वल आदर्श उभे केले, अनेकांना घडविले. हे माणसाला घडविण्याचे सामर्थ्य शब्दांत आहे, वाङ्मयात आहे.

महाराष्ट्राच्या घडणीत ज्ञानेश्वराचा आणि तुकारामाचा काहीच का वाटा नाही ? व्यास, वाल्मिकीनी हिंदुस्थानवर कसलाच परिणाम केला नाही का ? उलट मला तर वाटते की रामायण, महाभारताने ह्या देशातल्या शेकडो पिढ्यांना प्रेरणा दिली, आकार दिला. त्यांचे मार्गदर्शन केले. 'सीतेसारखी साध्वी', 'गमासारखा एकवचनी', 'भीष्मासारखा संयमी', 'कर्णासारखा उदार', 'कुंभकर्णासारखा झोपाळू' ह्यांच्यासारखे शब्दप्रयोग आमच्या भाषेचा एक भाग होऊन बसले व आम्हांला काहीतरी सांगत राहिले. रामायण व महाभारत हे आमचे केवळ धर्मग्रंथ नाहीत, त्या फार मोठ्या ललितकृतीही आहेत ! कला आणि आशय ह्या दोन्ही दृष्टीना अजोड असलेले महाभारतासारखे दुसरे पुस्तक माझ्या वाचनात नाही !

रामायण आणि महाभारत ! कुणी म्हणेल, ती जुनी पुस्तके झाली. मी म्हणतो, ती पुस्तके जुनी झालेलीच नाहीत. ती चिरतरुण पुस्तके आहेत. नवे आणि जुने हा भेद मी महत्त्वाचा मानीत नाही. चांगले आणि वाईट, सुंदर आणि कुरूप, उत्तुंग आणि उथळ, उत्कट आणि कोमट हा भेद मी मानतो. नवे आणि जुने ह्या शब्दांना तसा

फारसा अर्थ नाही. आजच्या ह्या नव्या जगात वेगळे आणि विशेष असे काय झाले आहे ? आज काय बाभळीला आंबे येतात, की डुकराच्या पोटी सिंह जन्म घेतात ? पूर्वी माणसाला नाक, कान, डोळे, हात, पाय होते, तसेच ते आजही आहेत. काम, क्रोध, मद, मत्सर ह्यांनी पूर्वी माणूस ग्रासलेला होता व आजही आहे. पूर्वी माणूस प्रेम करीत होता आणि आजही तो प्रेम करतो. पूर्वी माणूस त्याग करीत होता आणि आजही तो त्याग करतो. पृर्वी माणूस लढत होता, आणि आजही तो लढतो. पूर्वी तो तीरकमानीने लढत असेल, तर आज अणुगोलकाने लढतो इतकेच ! पण त्याची युद्ध करण्याची प्रवृत्ती आजही गेलेली नाही. खरे म्हणजे माणसाच्या साऱ्या मूलभूत प्रवृत्ती लक्ष वर्षापूर्वी होत्या, तशाच त्या आज आहेत. बदल असलाच तर तो अगदी वरवरचा आहे आणि तो बदलही संशयास्पद आहे.

माणसाचा स्वभाव मूलत: होता तसाच आहे आणि माणूस हा ललितवाङ्मयाचा विषय आहे. माणसाचा स्वभाव फारसा बदललेला नाही ! तेव्हा ललितवाङ्मयाचा स्वभावही फारसा बदलणार नाही, बदलण्याचे कारण नाही ! असे आहे म्हणूनच रामायण, महाभारतातील पात्रे व प्रसंग आपणांला आजही अगदी ओळखीची वाटतात. आजही आपण त्यांच्या सुखदु:खाशी एकरूप होऊन जातो. म्हणूनच रामायण-महाभारत जुने झालेले नाही आणि जुने होणार नाही !

नवतेच्या नावावर आज हवे ते गलिच्छ लिखाण केले जाते. कलाहीन आणि दुर्बोध गलिच्छतेचाच एक पंथ बनविण्याचा आज अनेकाचा खटाटोप आहे. त्यांच्या ह्या बीभत्सतेला आता खरोखरच काही ताल्तंत्र उरलेला नाही. नुकतीच एका दिवाळी अंकात मी एक कविता वाचली. मी कविता म्हणतो. पण ती छंदोबद्ध रचना नव्हती. अशा रचनेला थोडा अभ्यास लागतो. थोडा प्रयास पडतो. तर त्या होत्या नुसत्या तोडून लिहिलेल्या गद्य ओळी. त्यातले पहिले शब्द होते. 'फुलांच्या मायची...' पुढचा शब्द उच्चारणे मला शक्य नाही. तो होता एक सर्वांना ठाऊक असलेला स्त्रीलिंगवाचक शब्द ! तो शब्द वाचून मी थक्क झालो. केशवसुत, गडकरी, तांबे, बालकवी ह्यांच्या कवितेवर पोसलेली आमची पिढी ! असा शब्द कवितेत येऊ शकतो हे आमच्या कधी स्वप्नात नाही ! पण त्या वीराने तो बेधडक वापरून टाकला होता ! अशा अपशब्दांचे आज कुणाला काही वाटताना दिसत नाही ! 'साल्या', 'च्यायला', 'भांचोद' ह्यांचा पुष्पवर्षाव अनेक नाटक-कादंबऱ्यातून चालू असतो । आता हरिभाऊ आपटे, खाडिलकर, गडकरी ह्यांना शिव्या येत नसतील असे नाही त्यांना उत्तम शिव्या येत असतील. ज्यांच्या तोंडात शिव्या शोभतील अशी दुष्ट पात्रेही हरिभाऊंनी उत्पन्न केली आहेत. 'मायेच्या बाजारा'तला 'बाळासाहेब' हा त्यांपैकी आहे. तो पद्मेला 'Strumpet' आणि 'Whore' ह्या इंग्रजी शिव्या देतो आणि तिथेच तो थांबतो. शिव्यांच्या जागी हरिभाऊंसारखे लेखक नुसती तारकाचिन्हे किंवा फुल्या टाकतात । वाचकांनी आपल्या मनातल्या

शिव्या तिथे घालाव्यात.

हरिभाऊ, खाडिलकर किंवा गडकरी आपल्या कलाकृतींतून अर्वाच्य शिव्या वापरीत नाहीत आणि तरीही ते परिणामात उणे पडत नाहीत. सुधाकर बोलूनचालून दारुडा होता. त्याच्या तोंडात हव्या त्या अभद्र शिव्या चालू शकल्या असत्या. 'आर्य मदिरामंडळात' गडकऱ्यांना गलिच्छ शिव्यांचा पाऊस पाडता आला असता. पण तसे ते करीत नाहीत आणि तरीही ते रसोत्कर्ष साधतात. 'एकच प्याला', 'कीचकवध' किंवा 'भाऊबंदकी' माणसाच्या काळजाला हात घालतात.

आणि हेच लेखकाला साधायचे असते. त्याला परिणाम साधायचा असतो. भावनिक आघात करायचा असतो. त्यासाठी शिवीगाळ आवश्यक नाही. तिथे मोठ्या कलेची आवश्यकता आहे. संयम आणि सूचकता हे मोठ्या कलाकाराचे लक्षण आहे. आमच्या नवलेखनात ह्या गुणांचा ठणठणाट आहे. आमच्या अनेक नव्या लेखकांना केवळ शिव्या तेवढ्या येतात. मोठ्या सत्त्वाचे लेखन त्यांना पेलतच नाही ! सत्त्वाची आणि कलेची उणीव ते शिवीगाळीने भरून काढू पाहतात. बीभत्स शिव्या तर वाटेवरचा मवालीही देऊ शकतो. त्यासाठी मोठा लेखक कशाला पाहिजे ? बोलणाऱ्याला थोडी जास्त सवड असते, थोड्या सैलपणे तो बोलू शकतो. एखादा प्रसंग शिवी देण्याचाच असतो, तेव्हा तो शिवीही देऊ शकतो. पण लिखित शब्दाला मर्यादा पाळाव्या लागतात. कलाकाराला कलेची पथ्ये पाळावी लागतात. पण वारा प्यालेल्या आमच्या अनेक नवलेखकांना हे ठाऊकच नाही ! ते म्हणतात-कलाकार स्वतंत्र असला पाहिजे. त्याच्यावर कुठलेही बंधन नको - तो पूर्णपणे स्वतंत्र असला पाहिजे.

आता कलाकारांचे स्वातंत्र्य तर मीही काही एका संदर्भात मानतो. शास्त्रज्ञ, तत्त्वज्ञ, लेखक हा स्वतंत्र असलाच पाहिजे. कुठल्याही स्टॅलिन अथवा माओचा तो दास असता कामा नये ! कुठल्याही माथेफिरू मताचा तो भाट असता कामा नये ! कालिदासाने 'शाकुंतल' कसे लिहायचे, भवभूतीने 'उत्तररामचरित्र' कसे लिहायचे, हे त्याला कोण सांगणार ? एखादा गावचा कोतवाल सांगणार काय ? एखादा स्टॅलिन किंवा माओ सांगणार काय ? ही कल्पनाच हास्यास्पद आहे. प्रेते फाडणे हे एके काळी आक्षेपार्ह मानले जात असे. विलायतेतही शवविच्छेदन समाजाला मान्य नव्हते. पण समाजाच्या व वैद्यकशास्त्राच्या हितासाठी शवविच्छेदन करण्याचे शल्यविशारदाचे स्वातंत्र्य कसे हिरावून घेता येईल ? एखाद्या हत्यारी वधकाचे शस्त्र तुम्हांला काढून घेता येईल, एखाद्या वैद्याचे नव्हे. कारण वैद्य आपले शस्त्र समाजहितासाठी वापरीत असतो. तेव्हा इथे निकष आहे तो समाजकल्याणाचा ! ह्याच अर्थाने लेखकही स्वतंत्र असला पाहिजे. पण लेखकाचे वा अन्य कुणाचेही स्वातंत्र्य अमर्याद नसते. अमर्याद असू शकत नाही, हे येथे आपण ध्यानात ठेवले पाहिजे ! समजा, ऐन मध्यरात्री मी घराच्या छपरावर उभा राहून एखादे टिनपाट बडवू लागलो तर माझा शेजारी मला हटकतो—"अरे, तू ऐन

मध्यरात्री छपरावर उभा राहून टिनपाट का बडवतोस ?'' ''छप्पर माझे आहे. टिनपाट माझे आहे. हात माझे आहेत. माझ्या छपरावर उभे राहून माझे टिनपाट बडवायला मी स्वतंत्र आहे.'' असे 'स्वातंत्र्यवादी' उत्तर मी त्याला दिले तर तो म्हणू शकेल की ''अरे दीड शहाण्या, छप्पर तुझे असले, टिनपाट तुझे असले आणि हातही तुझे असले, तरी ह्या वेळी तुला टिनपाट ठोकता येणार नाही. कारण, ही लोकांची झोपायची वेळ आहे. तुझ्या धिंगाण्यामुळे आमची झोप मोडते. तू टिनपाट बडवायला स्वतंत्र असशील, तर लोक झोपी जायला स्वतंत्र आहेत. त्यांची झोप मोडण्याचा तुला काहीएक अधिकार नाही.''

ह्याचा अर्थ असा की, एकाच्या स्वातंत्र्यावर दुसऱ्याच्या स्वातंत्र्याच्या मर्यादा पडत असतात. एकाच्या अधिकारावर दुसऱ्याच्या अधिकाराची बंधने पडत असतात. मोठा प्रतिभावंत लेखक झाला तरी त्याला समाजाचे काही नियम पाळावेच लागतात. भारतीय दंडविधानापासून अगदी मोठ्यातला मोठा लेखक मुक्त नाही.

तर ह्या विश्वात पूर्णपणे स्वतंत्र असे काहीच नाही. पृथ्वी स्वतंत्र नाही, चंद्र स्वतंत्र नाही, सागर स्वतंत्र नाही, की वारे स्वतंत्र नाहीत. पृथ्वीला ठरलेल्या कक्षेत ठरीव फेरे द्यावे लागतात. समुद्राची भरती-ओहोटी ठरलेल्या वेळी होते. प्रत्येक ऋतूत वारे ठरलेल्या दिशेने वाहतात ! तेव्हा वारे स्वतंत्र आहेत, तारे स्वतंत्र आहेत, हे केवळ अलंकारिक बोलणे झाले. तसे पूर्णपणे स्वतंत्र कोणीच नाही. ह्या विश्वात सारेच नियमांनी बांधलेले आहे.

कलेलासुद्धा तिचे नियम आहेत. तिची पथ्ये आहेत. तिची बंधने आणि मर्यादा आहेत. एखादे गाढव हवे तसे चौखूर उधळले तर 'अहाहा ! काय उदयशंकर नाचतो आहे !' असे कुणी म्हणणार नाही. ते गाढव हवे तसे ओरडू लागले तर 'वा—वा: ! काय पंडित ओंकारनाथ गाताहेत !' अशी कुणी त्याची स्तुती करणार नाही ! कारण, मनमानेल तशा लाथा झाडणे म्हणजे नृत्य नव्हे, हवे तसे ओरडणे, म्हणणे, गाणे नव्हे ! गाण्याला गाण्याचे नियम आहेत, नाचण्याला नाचण्याचे नियम आहेत ! चित्रकलेला चित्रकलेचे नियम आहेत ! ललित लेखनालाही ललित लेखनाचे नियम आहेत, संकेत आहेत, पथ्ये आहेत !

तेव्हा वास्तववादाचे नाव सांगून हवे तसे लिहिता येणार नाही ! त्या लिहिण्याला कुणी कलात्मक लिहिणे म्हणणार नाही ! कला ही पूर्णपणे वास्तव कधीच नसते. 'एकच प्याला'तल्या 'सुधाकरा'ला किंवा 'आर्य मदिरामंडळा'च्या सदस्यांना कुणी खरीखुरी दारू वास्तवतेच्या नावाने देत नाही. ते कुणाला परवडणार नाही. दारू न पिताच दारुड्यासारखे अडखळत बोलणे, आणि झोकांड्या खात चालणे, ह्याला कला म्हणतात ! एरवी प्रत्यक्षात पुष्कळसे दारुडे उचक्या देतच असतात, ओकत असतात आणि गटारात गात असतात ! पण ती कला नव्हे. ते वास्तव ! दारूचा थेंबही न घेता सुधाकर आणि तळीराम ह्या दारुड्यांचे जे दर्शन बोडस आणि भांडारकर घडवीत, ती

कला ! कुत्र्याचे कुत्र्यासारखे भुंकणे ही कला नव्हे. माणसाने कुत्र्यासारखे भुंकणे ही कला. कुत्र्याचे भुंकणे आणि कुत्र्यासारखे भुंकणे असे हे वास्तव आणि कला ह्यांतले अंतर आहे. तेव्हा वास्तव वाटणारे अवास्तव, खरे वाटणारे खोटे, अकृत्रिम वाटणारे कृत्रिम, हेच कलेचे स्वरूप आहे. चित्रकार, गायक, लेखक, सारखी निवड करीत असतात. रंगाची निवड, प्रसंगांची निवड, शब्दांची निवड, लय, ताल, सूर ह्यांची निवड, पात्रांची व भावनांची निवड ! आणि निवड म्हटली म्हणजे वास्तवता संपली आणि अतिवास्तवता तर अगदी पूर्णपणे संपली.

जगात शौचकूप आहेत हे सत्य आहे. उकिरडे आणि गटारे आहेत हे सत्य आहे. गटाराचे चित्र एक चित्र म्हणून चांगले असू शकते. पण माझ्या बैठकीत मी ते गटाराचे वा उकिरड्याचे चित्र लावून ठेवणार नाही ! कारण ते चित्र पाहून माझ्या मनाला उद्वेग वाटेल, मला शिसारी येईल. मी माझ्या बैठकीत गंगेचे चित्र लावीन, एखाद्या टवटवीत उद्यानाचे चित्र लावीन. एक कलाकृती म्हणून ही दोन्ही चित्रे—गटाराचे व गंगेचे—एकाच तोलाची असली तरी मी चित्र लावीन ते गंगेचे—गटाराचे नव्हे ! गंगेचे ते चित्र मला पुन्हा पुन्हा पाहावेसे वाटेल, गटाराचे वारंवार पाहावेसे वाटणार नाही ! मला त्याचा वीट येईल. गंगेचे चित्र पाहून मला एक वेगळा आनंद होईल. वेगळेच भाव माझ्या मनात जागे होतील. ते भाव नीच असणार नाहीत, तो आनंद उच्च प्रकारचा असेल.

म्हणजे कलाकृतीपासून मिळणाऱ्या आनंदाचेही उच्च आणि नीच, वरिष्ठ आणि कनिष्ठ असे प्रकार असतात की काय ? असतात ! कला आणि विषय, कला आणि नीती, कला आणि आशय ह्यांचे काही संबंध आहेत काय ? — आहेत ! फार जवळचे संबंध आहेत. मोठी कलाकृती मोठा आशय मागत असते. मोठ्या आशयाचा मोठ्या नैतिकतेशी व मोठ्या चारित्र्याशी सबंध असतो. रामायणातून एकवचनी राम वजा केला, महापतिव्रता सीता वजा केली, शुद्धचरित भरत वजा केला आणि मागे ठेवली मंथरा, मागे ठेवली कैकेयी, मागे ठेवले वाली, सुग्रीव व त्यांची माकडे तर रामायण हे मोठे पुस्तक होईल की लहान ? सीतेच्या जागी आपण जॅकेलीन केनेडीची प्रतिष्ठापना केली तर काय होईल ? वनवासी रामासाठी त्याचे सिंहासन जपत बसणाऱ्या भरताच्या जागी आपण सख्ख्या भावांच्या प्रेताच्या पायऱ्या करून सिंहासन गाठणारा एखादा औरंगजेब दाखविला तर रामायण मोठे होईल की लहान ? मला वाटते, रामायण मग लहान होईल. महाभारतातून कृष्ण वजा केला, भीमार्जुन वजा केले, भीष्म व विदुर वजा केले, द्रौपदी, कुंती, गांधारी व विदुला वजा केली, आणि मागे ठेवला भावजयीच्या निरीला हात घालणारा दुःशासन, मागे ठेवला तिला मांडी दाखविणारा दुर्योधन, मागे ठेवला शकुनी, अश्वत्थामा व जयद्रथ, तर महाभारताची काय गत होईल ? तो मग एक उच्च आनंद देणारा महाग्रंथ राहील काय ? ती मग एक महान

ललितकृती असेल काय ? मला वाटते, असणार नाही !

कारण, कोणत्याही ललितकृतीची उंची त्या ललितकृतीतील भावनेच्या, कल्पनेच्या व व्यक्तीरेखांच्या उंचीइतकी असते. चोर, डाकू, हत्याऱ्यांच्या गुप्तचरकथांना म्हणूनच फाशीची उंची असत नाही ! त्यांच्या वाचनाने क्षणाची करमणूक होत असेल ! पण मोठा आनंद मिळत नाही. चांगला संस्कार होत नाही ! एखाद्या सुंदर बाजारबसवीकडे पाहून माणसाचे शरीर चाळविले जाते, त्याच्या वासना चाळविल्या जातात पण त्याच्यातल्या श्रेष्ठ मानवी व दैवी भावना जाग्या होतात, त्या एखाद्या पद्‌मिनीसारख्या महापतिव्रतेकडे पाहून ! ह्याचा अर्थ लेखकाने केवळ पतिव्रताच रंगवाव्यात काय ? चांगले तेच दाखवावे काय ? त्याने काय केवळ फुलेच रंगवावीत ? काटे, गटारे, चोर, डाकू, त्याने रंगवूच नयेत काय ? असे नव्हे. पतिव्रतेसमवेतच कुलटा, साधूसमवेतच भोदू व वीर पुरुषासमवेतच विश्वासघातकी, पळपुटे रंगविणे लेखकाला प्राप्त आहे. कुठलाही विषय सामान्यत: लेखकाला वर्ज्य नाही. मी एकांगी व एकरंगी चित्रणाचा कैवारी नाही. रामायण व महाभारत ही एकांगी वा एकरंगी पुस्तके नाहीत. भांडण आहे ते कलेची पथ्ये व मर्यादा पाळण्याविषयी ! मी स्वत: फाळणीच्या पार्श्वभूमीवर अनेक गोष्टी लिहिल्या आहेत. बलात्कार, जाळपोळ, रक्तपात व लूट ह्याविषयी लिहिणे तेव्हा मला भागच होते. पण तसे करताना मी मर्यादा पाळल्या आहेत की नाहीत व तरीही परिणाम साधला आहे की नाही....हा मुख्य प्रश्न आहे.

नाट्याचार्य खाडिलकरांच्या 'भाऊबंदकी' तली सगळी पात्रे काय सज्जन आहेत ? त्यात आनंदीबाई आहे, रघुनाथराव आहे, नमकशास्त्री, चमकशास्त्री आहेत व तुळ्या पवार आहे. पण 'भाऊबंदकी'ची उंची ही रामशास्त्र्यांच्या चारित्र्याची उंची आहे. समजा, रामशास्त्री चळले असते तर ? भ्रष्ट झाले असते तर ? कल्पना करा - आनंदीबाई शास्त्रीणबाईकडे जातात आणि म्हणतात—

"ठाऊक आहे ना शास्त्रीणबाई ? तुमच्या ह्यांनी आमच्या ह्यांना देहदंडाची शिक्षा सांगितली आहे !"

"ऐकत आहे खरं !" शास्त्रीणबाई उत्तरतात. त्यावर आनंदीबाई म्हणतात—

"तुमच्या ह्यांना जरा चार गोष्टी सांगा. नारायण तर जिवानिशी गेलाच आहे, गंगा विधवा झालीच आहे ! त्यात आणखी माझ्या कपाळीचं कुंकू पुसण्याचं पाप का करता ? त्यापेक्षा असं करा !"

"काय करू बाईसाहेब ?"

"शास्त्रीबुवा आधी पाणके होते. आता न्यायाधीश झाले. त्यांना म्हणावं जरा शहाणपणाने वागा. ह्यांच्या उगाचच जीवावर उठू नका म्हणावं. ह्यांना प्राणदंड दिल्यामुळे काही नारायण पुन्हा जिवंत होत नाही. तेव्हा असं सांगा..."

"काय सांगायचं बाईमहाराज ?"

"सांगा म्हणावं की, नारायण पर्वतीवरून पोट फुगेपर्यंत साखरभात खाऊन आला. पेग येत होती म्हणून डुलक्या घेतच वाड्यात शिरला. तिथे सुमेरसिंग, खरकसिंग, तुळ्या पवार वगैरे केळी खात बसले होते. सालपटे इकडे तिकडे फेकत होते. त्या सालपटावरून नारायणाचा पाय घसरला आणि तो गारद्यांच्या नागव्या तलवारीवर जाऊन पडला आणि नारायण गेला. अपघातानं गेला. त्याला कुणीसुद्धा मारलं नाही !"

"काय ! सांगता काय, बाईसाहेब !"

"बरोबर सांगते. असंच सांगायला पाहिजे. असं सांगा आणि काय हवं ते मागून घ्या ! दहा कोट रुपये देऊ ? वीस गावे इनाम देऊ ? पालखी देऊ, हत्ती देऊ, लाहोरला वकील म्हणून नेमणूक करू ? विचार करून काय ते ठरवा, शास्त्रीणबाई ! नीट विचार करा ! गंगा विधवा झालीच आहे, आमच्या ह्यांना तुमच्या ह्यांनी देहान्ताची शिक्षा दिली तर मीही विधवा होईन. पण मी एकटीच विधवा होणार नाही शास्त्रीणबाई. विधवा तुम्हीही व्हाल. माझ्यापाशी आणखी सुमेरसिंग, खरकसिंग आहेत ! तेव्हा नीट विचार करा !"

समजा ह्या धमकीला शास्त्रीणबाई घाबरल्या. समजा शास्त्रीबुवाही घाबरले. त्यांना दहा कोट रुपये, वीस गावे व पालखी अब्दागिरीचा मोह पडला, नारायणराव अपघाताने मेला असा निर्णय त्यांनी दिला व मग ते जन्मभर तुळशीबागेत प्रवचने करीत राहिले. —विषय ? 'सत्यमेव जयते ।' हा विषय. म्हणजे रामशास्त्रीचा बहुमोल जीव वाचला. त्यांना पैसा-अडका मिळाला. पण त्यांचे चारित्र्य बाटले. भ्रष्ट न्यायाधीश हा नाटकाचा विषय होऊ शकत नाही काय ? होऊ शकतो. पण शीलाचा उकिरडा करणाऱ्या अशा न्यायाधीशाच्या दर्शनाने मनाला आनंद होत नाही.

'राघोबा, तुझ्यासारख्या हत्यांना संरक्षण देण्यासाठी ऋषिमुनींनी आपली शास्त्रे निर्माण केली नाहीत । राघोबा, सत्तेच्या लोभापायी तुझ्या पदरात घातलेल्या पुत्रवत पुतण्याच्या रक्ताचा टिळा तू कपाळी लावलास । महाराष्ट्रात जन्म घेऊन तू मोगलासारखा वागलास । राघोबा, ह्या तुझ्या पापाला एकच शिक्षा आहे आणि ती शिक्षा प्राणदंडाची आहे । तुझ्या सत्तेच्या सिंहासनापेक्षा माझे सत्याचे व न्यायाचे सिंहासन अधिक पवित्र आहे. त्या न्यायाच्या नावाने मी तुला प्राणाताची शिक्षा देतो !'

रामशास्त्रीचे हे दर्शन अगदी वेगळे आहे. मूर्तिमंत उदात्ततेचे दर्शन आहे. ह्या सत्त्वधीर रामशास्त्र्यांच्या दर्शनाने अगावर रोमांच उभे राहतात. त्यांच्या शब्दांनी माणसाला एक दिव्य आनंद मिळतो. ह्या आनंदाची जातच वेगळी आहे. नैतिकतेशी व आशयाशी संबद्ध अशी ती जात आहे.

तर मग काय कलेला काहीच महत्त्व नाही ? आहे, फार महत्त्व आहे. 'भारतीय दंडविधानात' आशय पुष्कळ आहे पण ती कलाकृती नव्हे. उत्तम कलाकृतीत आशय

व कला ह्यांचा संगम व्हावा लागतो. आशयविना कला दुबळी आहे व कलेविना आशय पांगळा आहे.

मोठ्या सत्त्वाचा आशय पेलायला तितक्याच मोठ्या सत्त्वाचा कलाकार लागतो. भगवान श्रीकृष्ण हे माझे पूज्य व प्रिय दैवत आहे. घरात लावायला ह्या श्रीकृष्णाचे चित्र मी गेली कित्येक वर्ष शोधत आहे. पण अद्याप ते मला सापडलेले नाही. पाय वाकडे करून उभे असलेले लांब केसांचे एखादे बायकी पोर म्हणजे भगवान श्रीकृष्ण नव्हे. कृष्ण हा पूर्णावतार आहे...तो बहुरंगी आहे ! अर्जुनाला गीता सांगणारा कृष्ण वेगळा, कंसाला मारणारा कृष्ण वेगळा, द्रौपदीचा तारणहार कृष्ण वेगळा, यशोदेचा कृष्ण वेगळा, देवकीचा वेगळा, राधेचा वेगळा व कुब्जेचा वेगळा ! चांदण्यात नाचणारा, फुलांच्या माळा घालणारा, बासरी वाजविणारा कृष्ण वेगळा, व कालियामर्दन करणारा कृष्ण वेगळा ! कालयवन मागे लागला म्हणून धावत सुटणारा कृष्ण वेगळा, जरासंध व दुर्योधनाचा अंत घडवून आणणारा कृष्ण वेगळा व सोन्याची द्वारका वसविणारा वा त्या द्वारकेचा शेवट शांतपणे पचविणारा कृष्ण वेगळा ! कृष्ण चरित्राला कितीतरी पैलू आहेत. कृष्ण राजकारणी होता, सिंहासनाचा निर्माता होता. ते तोडणारा होता. कृष्ण योद्धा होता, तत्त्वज्ञ होता, धर्मज्ञ होता, मुत्सद्दी होता, योगेश्वर होता, नृत्य संगीतावर प्रेम करणारा होता. उत्तम मित्र, उत्तम पती, उत्तम पुत्र व उत्तम बंधू होता ! कृष्ण होता पूर्णपुरुष ! ह्या पूर्णपुरुषाचे मला पटेल असे चित्र अद्याप तरी कुणी रंगांनी साकार केलेले नाही ! कारण कृष्ण यथातथ्य रंगवू शकणारा चित्रकार तशाच मोठ्या सत्त्वाचा पाहिजे ! कल्पनेने तरी त्याला कृष्णचरित्राच्या सखोल आशयापर्यंत जाता आले पाहिजे व तो आशय कलेच्या माध्यमातून साकार करता आला पाहिजे.

मी वाट पाहतो आहे ती अशा कलाकारांची ! मी वाट पाहतो आहे ती व्यास, वाल्मिकी, कालिदास, भवभूती ह्यांच्या परंपरेत शोभतील अशा थोर लेखकांची व कवींची ! आणि ह्या लेखकांना व कवींना ओळखतील अशा जाणत्या वाचकांचीही मी वाट पाहतो आहे. ह्या परंपरापुनीत पुण्यात मी ही प्रार्थना करतो आहे. मोठ्या सत्त्वाच्या लेखकांसाठी प्रार्थना मोठ्या सत्त्वाच्या वाचकांसाठी प्रार्थना !

माझे आणखीही काही मागणे आहे. ते मागणे शुद्ध भाषेविषयी आहे. ब्रिटिश राज्यात झाली नसेल अशी मराठीची उपेक्षा व विटंबना आज चालू आहे. देवभाषा संस्कृतकडे आम्ही पाठ फिरवतो आहोत. शुद्धाशुद्धतेचा आम्हांला विसर पडला आहे. इंग्लिश शब्दांनी आमची भाषा आम्ही जागोजाग डागळतो आहोत. अनेक सुंदर म्हणींनी भरलेले रसाळ, स्वच्छ मराठी आता आमच्या शिकलेल्या बायकांना बोलता येत नाही ! मुळातच आमची भाषा बिघडते आहे. विष्णुशास्त्री चिपळूणकरांपासून स्वातंत्र्यवीर सावरकरांपर्यंत अनेकांनी भाषादूषणाविषयी जो अट्टहास केला, तो जसा काही व्यर्थच गेला ! ही स्थिती भयंकर आहे. तिच्यावर त्वरित उपाय झाला पाहिजे.

आणखी शेवटचे एक मागणे. ते अगदी गद्य स्वरूपाचे मागणे आहे, पण फार महत्त्वाचे आहे. साहित्य संमेलनासाठी अध्यक्ष निवडण्याची आजची पद्धत फार सदोष आहे. ती बदलली पाहिजे. एखाद्याने दहा वीस रुपये भरावेत, मतदानाचा अधिकार मिळवावा हे अगदी योग्य नव्हे. तसेच म्हणाल तर प्रत्येक वयात आलेल्या मूर्खालाही मतदानाचा अधिकार असणे, हा दोष आपल्या लोकराज्यात्मक पद्धतीचाच आहे. बरे, अशिक्षित मतदार हे नेहमी मूर्खपणाचेच निर्णय घेतो असेही काही नाही. परंतु ही निवडणूक साहित्यप्रेमी रसिकांची व साहित्यिकांची आहे. येथे पैसा हा एकच निकष असता कामा नये. ह्या संबंधात जागरूक जाणत्यांनी अवश्य सूचना कराव्यात. पुन्हा एकदा मी आपणा सर्वांचे आभार मानतो. धन्यवाद ।

# चंद्रपूर : १९७९

# प्रा. वा. कृ. चोरघडे

साहित्यप्रेमी रसिक मित्रांनो,

आज माझ्या उतरत्या वयामध्ये आपण मला जो हा बहुमान दिला, त्याबद्दल केवळ आभाराचे शब्द वापरले, तर त्यात माझ्या हृदयभावनांचा पुरेपूर अर्थ येईलच, असे नाही, 'मराठी'पुरते बोलावयाचे, तर हा माझा गौरव साहित्याच्या निकषावर अत्युच्च गौरव आहे यानंतर साहित्यसेवकाची फारशी आकांक्षा नसते.

हा गौरव वामन चोरघडे या व्यक्तीचा नव्हे ! मी सरस्वतीच्या कृपेने जाणीवपूर्वक कथा-लेखन केले त्या कथा-सुंदरीचा हा गौरव असल्यामुळे आणि मी केवळ निमित्त आहे, म्हणून या कथा-सुंदरीला मी प्रकट वंदन करतो. नाही तर, 'हृष्टा· द्रृप्यति द्रृप्त· धर्म अतिक्राम्यति' अशी गत व्हावयाची । ती होऊ द्यावयाची नाही, असा प्रयत्न मी करणार आहे आणि साहित्यबाह्य गोष्टी या भाषणात येऊ नयेत हा कटाक्ष मी पाळणार आहे

हे व्यासपीठ, हा सुशोभित, सुगंधित, सुव्यवस्थित मंडप । आपण सगळे अगत्याने वेळेवर या सोहळ्याला आलेला आहात, नीटनेटकेपणे ठेवणीचे कपडे घालून, शक्यतो आपण चांगले दिसावे, असा प्रयत्न करून आलेले आहात. मी जेव्हा या मंडपात चौफेर नजर टाकतो तेव्हा एका आगळ्यावेगळ्या सौदर्याचा साक्षात्कार मला होत आहे या मंडपाबाहेरील जीवन याहून वेगळे आहे. त्या जीवनाची क्षणभर आठवण विसरून काही सुंदर अपेक्षा बाळगून येथे आपण आ·ना आहात. जीवन सर्वत्र सारखेच । पण ते जितके सुंदर करता येईल, तितके ते करता आले पाहिजे. यालाच मी साहित्यातील कला मानतो जीवन म्हणजे इंग्रजीत ज्याला आपण 'लाईफ' म्हणतो, ते नव्हे । इंग्रजी शब्दाचे अर्थही आपण आपल्या संस्कृतीप्रमाणे लावीत असतो असे म्हणतात, की 'लाईफ इज ए गिफ्ट ऑफ नेचर, ब्यूटिफुल लिव्हिंग इज द गिफ्ट ऑफ विसडम्' या 'ब्यूटिफुल लिव्हिंग'ला मी साहित्यात्मक, कलात्मक जीवन असे म्हणतो.

आजूबाजूला आपल्यासमोर अनेक प्रश्न उभे आहेत पावलोपावली आपल्याला संघर्ष करावा लागत आहे. केवळ जगण्यासाठी अक्षरश· उरस्फोड आपण करतो. तरीही आपल्याला हसावेसे वाटते, क्षणभर विरंगुळा मिळावा, विसावा मिळावा यासाठी आपण धडपडतो. ज्या कोणा साधनाच्या भरवशावर असे आपण करतो ते साधन

म्हणजे 'साहित्य', असे मी मानतो. मग ते साधन लिखित असो की, ओठावर आलेले उद्‌गार असोत। मी जेव्हाजेव्हा 'साहित्य' हा शब्द इथे वापरीन तेव्हा ते ललित-साहित्य असेल, क्रिएटिव्ह लिटरेचर असेल! जीवनाचे आपल्या मनावर मनाच्या आवाक्याप्रमाणे जे प्रतिबिंब उठेल, त्यातूनच ललित-साहित्य निर्माण होईल. आपण ज्याला सत्य म्हणतो ते सत्य शब्दित करणे म्हणजे ललित-साहित्य-निर्मिती नव्हे! वास्तववाद ज्याला आजच्या रूढ अर्थाने म्हणण्यात येते तो 'वास्तववाद' खरा असेलच असे नाही. जीवनात मला काहीतरी दिसले ते मला चमत्कृतिजनक वाटले, ते मी शब्दित केले, तर मी सत्य बोललो येवढेच म्हणता येईल सत्य म्हणजे काय, मला ठाऊक नाही. सत्याची व्याख्या गेल्या तीन हजार वर्षापासून निखळपणे कोणाला करता आली नाही. माझ्या कथालेखनाच्या जाणीव-जोपासनेसाठी आवश्यक म्हणून मी माझ्या कामापुरते सर्व प्रकारच्या साहित्याचे वाचन केले आहे. मी त्याचा जाणता आहे, असे नाही; तज्ज्ञही नाही, वाचनाचेही प्रकार असतात, हे मला गेल्या दोन वर्षापासूनच कळू लागले आहे आजवर मी दुसऱ्यापुढे माझे ज्ञान मांडण्यासाठीच वाचन केले. संस्कृत, मराठी, इंग्रजी साहित्य मी वाचले तेव्हा मी हुरळून गेलो होतो. आणि कधी मी स्वत: हे लोकांसमोर मांडून मिरवीन, असे मला होत असे. परवा परवापर्यत लोक मला तज्ज्ञ, विद्वान समजत असत. शांकरभाष्य, पतंजली योगसूत्रे, मंत्र-वाडमय, ज्ञानेश्वरी, रामदास, नामदेव, तुकाराम, म. गांधी, विनोबा, म. फुले, डॉ. आंबेडकर यांच्यावर व्याख्याने देऊन मी मिरविलो. श्रोत्यांनी माझ्या पाठीवर शाबासकीची थाप देताच मला आनंद होत असे. पण आता मी स्वत:साठी म्हणून जेव्हा वाचतो तेव्हा मी किती व्यर्थ तोडपाटीलकी केली, ते कळते. पश्चात्ताप होतो. कारण आता जेव्हा वाचू लागतो तेव्हा मला वाटते, की आपल्याला काहीही कळत नव्हते! भगवद्‌गीता उघडतो आणि 'स्थितप्रज्ञा'च्या लक्षणावर येताच अडून बसतो महिना-दोन महिने. पुढचा श्लोक वाचायला आपण योग्य नाही, असे वाटू लागते. लोकांसाठी केलेले वाचन आणि प्रत्ययकारी वाचन यातला फरक कळू लागल्यावर आपण स्वत:साठी काहीच वाचले नाही, लोकांसाठीच वाचले, असे वाटू लागते. 'विचारपोथी'मध्ये विनोबांचे एक वाक्य परवा जेव्हा पुन्हा वाचले तेव्हा 'न द्यावा जिथे पाय तेथे दिला, बहू लाजलो भान येता मला' असे वाटू लागते. ते वाक्य असे आहे : ''आत्मविषयक अज्ञान हे प्राथमिक अज्ञान. आपल्या ठिकाणी हे अज्ञान आहे, याची जाणीव नसणे, म्हणजे ते 'अज्ञानाचे अज्ञान', किंवा गणिताच्या भाषेत 'अज्ञानवर्ग.' आपण या अज्ञानवर्गात सामील आहोत, या गोष्टीचा इन्कार करणे म्हणजे 'अज्ञानघन' यालाच 'विद्वत्ता' म्हणतात.''

जीवनाचा अनुभव वेगळा आणि अनुभूती वेगळी! मी जे पाहिले, जे अनुभविले ते सत्य आहे, असे जर साहित्यात मानले, तर असे सत्य असणारा जो 'मी' त्याची योग्यता बघावी लागेल. मी जो अनुभव घेतो तो माझ्या पंचज्ञानेंद्रियांनी आणि पंचकर्मेंद्रियांनी!

'मन' हे अकरावे इंद्रिय मानले जाते. या अकराही इंद्रियांची शक्ती कमीजास्त असते. साहित्यातील 'वास्तव' हे वेगळे असते हे उदाहरणांनी मला स्पष्ट करता येईल. माझी आई लहानपणी मला औषध देताना सांगायची की, कडूलिंबाची निंबोळी इतकी गोड असते की ती कडू लागते. याचा अर्थ मला फार उशीरा कळला. पण त्यामुळे साहित्यातील 'सत्या'चा बोध झाला. इतर कोणताही उद्योग नसल्यामुळे आणि स्वेच्छ्या जीवन व्यतीत करण्याची मला जेव्हा संधी मिळाली तेव्हा मला आनंद झाला. पण माझ्या इष्टमित्रांना आणि डॉक्टरांनादेखील अशी काळजी वाटू लागली की, वयाची त्रेसष्ट वर्षे सतत उद्योगात असणारा मनुष्य, आता वेळ कसा घालवील ? म्हणून माझ्या मुलाने एका मानसोपचार तज्ञाला माझ्याशी गप्पा मारायला पाठविले. मी त्याला एकच विनंती केली की बाबारे, तू तुझा उद्योग कर आणि मला माझ्यासाठी जगू दे. आता असा अनुभव येतो आहे की, मला कोठे जायला, काही नवीन करायला सवडच मिळत नाही. मी इतका कामात असतो की म्हणून गतिमान भोवरा जसा स्थिर दिसावा, तसा मी रिकामा असतो.

या माझ्या फावल्या वेळात तरुण, होतकरू लेखक-लेखिका जेव्हा माझ्याकडे येतात तेव्हा मला फार आनंद होतो. कोणी माझ्याकडे मुद्दाम येते तेव्हा कसे सुखासुखी वाटते ! रिकामा असल्यामुळे ते जर कामाचे विचारू लागले, तर बरे वाटते. कोणी आपण रचलेल्या कविता वाचून दाखवितात, एखादी एकांकिका वाचून दाखवितात, एखादी कथा वाचून दाखवितात. कवितेतले मला काहीही कळत नाही. नाटकातील-विषयापुरते कळते. कथेच्या बाबतीत मी टीकाकार नसलो, तरी निर्मितीच्या अनुभवाने काही अनुभूती मला मिळाल्या आहेत कोणीतरी 'ती' कोणीतरी 'तो' आपली कथा वाचून दाखवितो. म्हशीवर पाऊस पडावा तसा ती मी शांतपणे ऐकतो. पण माझा अभिप्राय विचारला की, मी भीतभीत स.ागता—आणि माझ्या दुर्दैवाने हेच प्रसंग जास्त येतात—मी सांगतो की, बाबारे किंवा बाई5ग, ही कथा फाडून टाक. यातलं काही खरं नाही. तेव्हा मला हमखास उत्तर मिळते की, "खऱ्याबाबत मी काही बोलू देणार नाही हं ? कारण हा प्रसंग माझ्या शेजारी, माझ्या डोळ्यादेखत घडला आहे. अगदी सत्यकथाच समजा ! शब्द फक्त माझे आहेत." त्यावर मग मला नाईलाजाने सांगावे लागते की, "जे तुझ्या डोळ्यादेखत घडले अन् शेजारी घडले, म्हणूनच ते खरे नाही. तू डॉक्टरकडे जाऊन तुझे डोळे तपासून घे." आज असंख्य कथांची निर्मिती अशा रीतीने होत असते.

विदर्भ साहित्य संघाच्या १९६४ सालच्या पुसद येथील रौप्यमहोत्सवी अधिवेशनात अध्यक्ष म्हणून भाषण करताना काही प्रश्न मी उपस्थित केले होते, काही विधाने केली होती. ते प्रश्न अजून सुटले नाहीत. पंधरा वर्षे लोटल्यावरही मी केलेल्या विधानांचे निराकरण झालेले नाही. साहित्याच्या व्यासपीठावरून केलेल्या भाषणाचे काही चीज

होते, यावरील माझा विश्वास नाहीसा झाला आहे. कोण काय बोलतो, हे कोणी बघत नाही. कसा बोलतो, तेवढेच बघतात आणि आपापल्या राज्यात निघून जातात. काय आणि कसे, या दोन शब्दांत महदंतर आहे.

त्या भाषणात मी असे विधान केले होते की, "आज वाचकवर्ग वाढला पण अभिरुची वाढली नाही." आज दुर्दैवाने दुसरे विधान मला करावे लागते आणि ते दुसरे विधान म्हणजे आज अभिरुची तर जाऊ द्या पण मासिकांच्या संख्येत वाढ झाली; वृत्तपत्रे उदंड निघू लागली, लेखक तर लोकसंख्येच्या अनुपानापेक्षाही अधिक वाढले. प्रकाशकांची संख्या वाढली पण ज्याच्यासाठी हा सगळा आटापिटा करावयाचा तो वाचकवर्गच कमी झाला आहे. आणि सगळीकडे अर्थशास्त्रातील बाजार, नफा-तोटा आणि त्या अनुषगाने साहित्यसेवा, सरकारतर्फे अनुदाने, बक्षिसे, प्रौढ शिक्षणाच्या धडक मोहिमा, हे सुरू झाले आहे. पण हा आटापिटा ज्या ध्येयासाठी आपण करीत असतो ते ध्येय म्हणजे वाचनाची अभिरुची वाढविणे, तेच उन्हाळ्यातील ओढ्यागत आटले आहे. माझ्या पिढीपर्यत वाचणे, सांगणे, भाषण देणे या गोष्टीना प्रतिष्ठा होती. आता वेगळ्याच गोष्टीना प्रतिष्ठा लाभली आहे. त्यामुळे वृत्तपत्रांबाबत बोलण्याचा मला अधिकार नाही, पण मासिके,—प्रकाशक यांचा अनुभव १९३२ पासून मी घेतल्यामुळे त्यावर मला थोडे बोलता येईल, असे वाटते. अजूनही काही मासिके, वृत्तपत्रे लेखकाच्या लेखनाला मानधन देतात. पण त्यांना दर तीन महिन्यांनी आपल्या मासिकात छापावे लागते की, आता सहा महिने तरी लेखकांनी आपले ललित-साहित्य पाठवू नये कारण आमच्याजवळ अगोदरच भरपूर साहित्य जमा झाले आहे. या स्थितीचा फायदा घेऊन काही नवनवीन साप्ताहिके, मासिके निघत आहेत. आणि लेखकाला पैसे देण्याऐवजी लेखकाकडूनच पैसे घेऊन त्यांचे लिखाण छापत आहेत. अशाप्रकारे पाच-दहा कविता, पाच-दहा कथा प्रकाशित झाल्या की, बिचाऱ्या लेखकाला वाटते आपला कथासंग्रह, कवितासंग्रह पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्याची लायकी आपल्यात आली. मग ते प्रकाशकाकडे जातात किंवा अन्य मार्गाने प्रकाशित करतात आणि आपली पुस्तके प्रसिद्ध होऊनदेखील आपल्याला कोणी लेखक मानत नाही, कवी मानत नाही म्हणून कांगावा करीत असतात. ही परिस्थिती भयंकर आहे लेखन, लेखक, प्रकाशन ही एकमेकांचे दुवे सांधणारी साखळी असली पाहिजे. परंतु स्वातंत्र्योत्तर काळात इतकी प्रगती होऊनदखील हे सगळे दुवे निखळून गेले आहेत. लेखकांना का लिहावे, कसे लिहावे याचा विचार करण्याची जबाबदारी वाटत नाही. संपादकांना जे चांगले लिहितात त्याना पुढे आणले पाहिजे, याचीही जबाबदारी वाटत नाही आणि प्रकाशकांसमोर माझी पुस्तके खपतील की नाही, येवढाच विचार असतो. या विचारासाठी पुस्तकांचा खप कसा वाढेल, यावर सध्या चर्चासत्रे चालू होतात. पुस्तके स्वस्त झाली की खपतील, या मेलेल्या अर्थशास्त्राच्या सिद्धांताचा आधार घेऊन सरकारने यात काही केलेच पाहिजे; कारण हे जनतेचे सरकार

आहे — म्हणजे आमचे सरकार आहे, असे ठराव केले जातात.

हे असे का होते, याचा मी माझ्यापरीने विचार करण्याचा प्रयत्न करतो. तो आपल्याला आवडेलच, ही मला खात्री नाही. तसा माझा आग्रहही नाही. आपण माझे भाषण वाचून त्यावर विचार करावा, अशी विनंतीही मी करीत नाही आणि आपण माझ्या भाषणाचा विचार का केला नाही म्हणून न्यायालयीन चौकशीची मागणीही सरकारकडे करणार नाही. केवळ कर्तव्य म्हणून माझ्या शक्तीप्रमाणे मी माझे विचार मांडतो.

(१) एका कवीची एक अतिशय सुंदर कविता आहे. जेव्हा मी 'उत्तररामचरित' वाचतो, जेव्हा मी शरदबाबू वाचतो तेव्हा त्यांनी रंगविलेली सुखदु:खे मला जाणवतात. सुखाने सुखावतो, दु:खाने डोळे भरून येतात. माझ्या वास्तव जीवनामध्ये माझ्या आयुष्यात मी कमी दु:खे भोगली नाहीत पण शपथेवर सांगतो, ती दु:खे भोगीत असताना माझ्या डोळ्यात टिपूसही आले नाही पण साहित्यातील दु:ख आत्मसात करताकरताच माझे डोळे भरून येतात याबाबतीत मी खरा म्हणजे वयाने मोठा झालोच नाही. ज्याला इंग्रजीत 'आय् क्यू' म्हणतात—मराठीत काय म्हणतात मला माहीत नाही-त्या 'आय् क्यू'च्या तुलनेने माझा आणि माझ्या नातवंडाच्या 'आय् क्यू' सारखाच आहे. शिक्षणशास्त्रात संस्कार करून माझ्या नातवंडाला जेव्हा गोष्ट सांगतो—"एक होता वाघ त्याला तहान लागली होती. तो जंगलातील ओढ्यावर गेला. तेथे त्याने एक माणूस ओढ्याचे पाणी पिताना बघितलं" —तो नातू मला चटकन् विचारतो, "आजोबा, तो वाघ जर त्या माणसाला खाणार असेल, तर मला तुम्ही दुसरी गोष्ट सांगा." त्या नातवंडाला मी अधिकच पोटाशी धरतो आणि सांसारिक जीवनामध्ये मी पुष्कळच कमाविले, असे वाटून जाते. साहित्यातील दु:खे वाचताना जेव्हा माझे डोळे भरून येतात तेव्हा मला मिळणारे सुख अवर्णनीयच असते असे सुखाचे रडणे हेच साहित्याचे लेणे आहे !

त्या कवितेचा उल्लेख राहूनच गेला कवितेच्या ओळी आहेत, "अशी पाखरे येती, स्मृती ठेऊनी जाती." माझे डोळे भरत असतानाच मला जाणीव होते की, आता "अशी पाखरे येती स्मृती **घेऊनी** जाती." यावरून काय ते ओळखण्याची जाण मला आली आहे. आपल्यावर कशाचे सावट पडलेले आहे, हे मी ओळखतो. मन हळवे झाले आहे "कोई उम्मीद बर नही आता कोई सूरत नजर नही आती" असे मी वारंवार म्हणतो.

—आणि या माझ्या अंत्यक्षणा एक स्वप्न साकार व्हावे, असे मला वाटते. ते साकार होण्यासाठी मी गेली ३५ वर्षे माझ्यापरीने प्रयत्न केला. आता ते स्वप्न प्रत्यक्षात आणण्यासाठी मी आपणापुढे खरोखरच पदर पसरतो. ते स्वप्न प्रत्यक्षात आले नाही, तर वाईट स्वप्ने पडत राहणार आहेत– ती मला नव्हे तर तुम्हाला ! आणि ती स्वप्ने साकार होणे अशक्य होऊन बसायचे आहे ! स्वाराच्या घोड्याच्या समोरच्या पायाच्या नालेचा एक खिळा निखळला त्यामुळे काय गोंधळ झाला, ही कथा आपल्या मराठी भाषिकांना माहीत नसेल, तर आपले आजी-आजोबा, आई-बाप मरायच्या अगोदर

विचारून तरी घ्या !

माझे स्वप्न कोणते ते सांगून टाकतो. ते स्वप्न आहे-कमीत कमी महाराष्ट्रात विद्यापीठाच्या क्षेत्रातील सर्व विषयांत मराठी माध्यम सुरू व्हावे. मराठी माध्यमातून विज्ञानाचे शिक्षण देता येत नाही, अशी ज्यांची कल्पना आहे त्यांना उत्तरे मिळाली आहेत, एक त्यांचा अनुल्लंघनीय प्रश्न सात वर्षे माझे स्वत:चे रक्त आटवून मी सोडविला आहे. इतर सुधारलेल्या देशांत सर्व प्रकारचे ज्ञान त्यांच्या भाषेत देता येते. फक्त भारतालाच देता येत नाही. याचा एवढाच अर्थ मी मानतो की, आपण भारतात आहोत. या भारताला स्वतंत्र करण्यासाठी सर्व भारताची भूमी भिजेल, इतके आपले रक्त सांडले आहे आणि भारतात राहण्यावाचून आपल्याला गत्यंतर नाही. मी तर स्वच्छ आरोप करेन की, आपल्याला देश नावाची वस्तू असावी असे कोणाला वाटतच नाही. रेल्वेत लिहिलेले असते —"यह गाडी भारत की राष्ट्रीय संपत्ती है । इसे नष्ट न करे ।" त्या वाक्याला आपण काय प्रतिसाद देतो, हा अनुभव प्रत्येकाने घेतला आहे. आणि मला काय त्याचे-हीच वृत्ती स्वीकारली आहे ! मला माझ्या लहानपणी वाचून पाठ केलेली आणि आपणापैकी पुष्कळांना पाठ असलेली वॉल्टर स्कॉटची कविता आठवते. तो विचारतो, या पृथ्वीतलावर असा एखादा तरी मनुष्य असेल काय की जो हा माझा देश आहे असे म्हणत नाही ? आपण आत्मा अमर आहे, असे मानतो. आत्म्याचा अंश प्रत्येक जीवमात्रात आहे, असे आपले तत्त्वज्ञान सांगते. हे तत्त्वज्ञानात नसेल तर कदाचित कलेचा आविष्कार असेल । कारण माणसाने सर्वप्रथम जो कलेचा आविष्कार केला तो म्हणजे त्याने दगडात 'देव' पाहिला. एवढे प्रचंड काव्य दुसरे अजून माझ्या प्रचितीला आले नाही. "सुंदर ते ध्यान उभे विटेवरी । कर कटेवरी ठेवूनिया ।" हे तुकारामाचे वचन मी वाचतो, तेव्हा मला मोक्ष मिळविण्यासाठी ईश्वराला आळविण्याऐवजी तुकारामाच्या आत्म्यालाच आवाहन करावेसे वाटते. मी मनोमन म्हणतो—

*"मागे नमस्कार पुढे कडे हि*
*असो नमस्कार जिथे जिथे तू*
*उत्साह सामर्थ्य तुझे अनंत*
*तू सर्व की सर्व तुझ्या चि पोटी ।"*

ते असेच होते. कारण मनाची पाखरे स्मृती घेऊन कोठे उडून गेली, हे ठाऊक नाही. मला सांगायचे होते वॉल्टर स्कॉटबद्दल ! वॉल्टर स्कॉटला, नेपोलियनला, रुडियार्ड किपलिंगला, सावरकरांना मी असे ठामपणे सांगू इच्छितो की बाबांनो, एखादाच माणूस काय, या विश्वात असा एक देश आहे की जेथील सत्तर कोटी लोकांना हा आपला देश आहे, असे वाटतच नाही. आपल्या देशातील भाषांना कायावाचामने प्रतिष्ठा मिळावी, असे वाटतच नाही. मातृभाषा म्हणजे आईची भाषा !

पण ही आईच आता 'मदर' किंवा 'ममी' होऊन गेल्यामुळे तिला प्रतिष्ठा द्यावी, तिच्या आचरविचारांना प्रतिष्ठा लाभावी, असे वाटतच नाही. मातृभाषा ही शिक्षणाची मातृभाषा झाल्याशिवाय भारतीय माणूस स्वतंत्र विचार करूच शकत नाही. तो जे पदार्थविज्ञान शिकतो, जे रसायनशास्त्र शिकतो त्याला ते ज्ञान भारतातील व्यवहाराला लागू पडू शकते, हे कळूच शकत नाही. त्याच्या मनात एखादी तात्त्विक शंका आली, तर तिचे निराकरण तो येन केन प्रकारेण परदेशात जाऊन करून येतो. भारतात आला की सन्मानाचे हारतुरे स्वीकारून भारतातच लठ्ठ पगाराची नोकरी मिळते काय असे प्रयत्न करतो, ती मिळाली नाही तर माझ्या ज्ञानाला भारतात वाव नाही, असे "आढ्योऽभि ज्ञानवानोऽस्मि" असे म्हणत परदेशी जाण्याची खटपट करतो. इथला आनंद त्याला मानवत नाही. परकीय देशात नागरिकत्व मिळवून आपली अस्मिता डागळली तरी 'मला काय त्याचे,' असे मानतो. हीच ती साकारलेली वाईट स्वप्ने ! त्याच्या अगोदर पडलेल्या स्वप्नाने आकार घेतला नाही म्हणून ही दुरवस्था ! काय करू, किती उदाहरणे देऊ, असे मला झाले आहे. पण तो मोह मला आवरलाच पाहिजे. आणि कमीत कमी महाराष्ट्रात सर्व विषयांत 'मातृभाषा' माध्यम झाले पाहिजे, असे मी तुम्हा सर्वांच्या अंतरात्म्याला आवाहन करतो. सुदैवाने या महाराष्ट्राने देशकारणात खूप भाग घेतला आहे. राजकारण हा शब्द मी वापरत नाही. हे देशकारण आहे, असे मी मानतो. वादविवादाचे दिवस संपले आहेत. कृतीची वेळ आली आहे. तसे जर झाले नाही, तर मर्त्य मानवावर त्याचे काय परिणाम होतील, हे मला ठाऊक नाही. पण अक्षरवाङ्मयावर त्याचा विपरीत परिणाम होईल, हे मी ज्योतिषशास्त्र न जाणताही भविष्य बघत आहे.

(२) भारताच्या शिक्षणपद्धतीत आमूलाग्र बदल व्हायला हवा. त्यासाठी कोणाचे उष्टे टाकून दिलेले, शिळेपाके खायला नको. मग १० + २ + ३ च्या स्वरूपात असो की ५ + ३ + २ असो ! भारताच्या राजकारणाने अशी शपथच घेऊन टाकली आहे की, एक-दोन पिढ्यांना नि:स्वत्व करून त्यांचे बलिदान केल्याशिवाय भारतीय शिक्षण पद्धती उष्टी-खरकटीच ठेवावी !

(३) भारतीय लोकसाहित्याचे भारतीय निकषांवर संवर्धन झाले पाहिजे. मराठी वाङ्मयाचा माझ्या पिढीचा किंवा त्यापुढचाही टीकाकार किंवा समीक्षक परकीय निकषांवरच अवलंबून आहे. सतत कर्मरत असणाऱ्या लोकांनी मनाला आनंद आणि विरंगुळा वाटावा म्हणून उत्स्फूर्त ओठातून काढलेला शब्द म्हणजे 'वाणी-विलास' अशी मी लोकसाहित्याची व्याख्या करतो. मराठीतील लोकसाहित्य फक्त संग्रहित झाले पाहिजे. त्याचा कसनिकष पाश्चिमात्य टीकाकारांच्या व्याख्यांतून नसावा, असे विधान मी पंचावन्न वर्षेत अनुभूती घेऊन करीत आहे. अधिक चर्चा करायची, तर तो स्वतंत्र विषय ठरेल.

(४) भारतीय अस्मितेच्या आधारावरच भारतीय साहित्याचा आणि मराठी

अस्मितेच्या आधारावरच मराठी साहित्याचा विकास व्हायला हवा. मातृभाषा माध्यमाने इंग्रजीचा बागुलबोवा नाहीसा होऊन मराठी अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य मिळाले, तर महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यात साहित्यसोनियाच्या खाणी निर्माण होतील, यावर विश्वास असू द्या, हे मी भारतीय अस्मितेच्या शपथेवर सांगत आहे.

(५) तसे झाले तर मराठी टीकाकारांची, संपादकांची, प्रकाशकांची जबाबदारी आणि सुखेनैव जगण्याचा काळ संपणार आहे. माझ्यावेळचे प्रकाशक दुसऱ्याची हितकामना सांभाळीत सांभाळीत ज्ञानेश्वरांच्या आदेशाप्रमाणे आपला स्वार्थ साधत असत. मी तर साधा खेड्यातला माणूस, वयाची आठ वर्षेपर्यंत मराठी भाषाही येत नसलेला ! पण मला लेखक म्हणून पुढे कोणी आणले ? —तर 'प्रतिभा'कार ह. वि मोटे यांनी, 'ज्योत्स्ना'कार वि. स खांडेकर, वा. रा. ढवळे यांनी, 'सत्यकथे'च्या वि. पु.-श्री. पुं. नी ! त्यांनी कौतुक केले, माझी पुस्तके प्रकाशित केली. आज माझ्यासमोर येथे ज्यांना मला खूप बघावेसे वाटते ते ह. वि. मोटे नाहीत. कारण ते अमेरिकेला गेले आहेत. खांडेकर नाहीत. त्यावेळच्या प्रकाशकांचे वागणे असे असायचे की, माझे प्रकाशक हरिभाऊ मोटे, कै. बा. ग. ढवळे आणि आज माझ्या भाग्याने येथे उपस्थित असलेले कॉन्टिनेन्टलचे अनंत अंबादास कुळकर्णी हे माझे प्रकाशक राहिलेच नव्हते ! माझे मित्र, स्नेही बंधु-बांधव होऊन गेले. त्यांचे ते इनाम मला तरी वंदनीय वाटते. त्या सर्वांचे ऋण आता त्यांचे प्रतिनिधी म्हणून माझे मित्र अनंतराव कुळकर्णी याच्याजवळ आज आपणा सर्वांदेखत मी व्यक्त करतो. आता अनंतरावांनी लकडा लावला आहे, "वामनराव, तुमच्या आणि माझ्या हयातीत तुमच्याबद्दल काहीतरी लिहून काढा ! आणि मित्रऋण फेडा !"

असे संपादक-प्रकाशक नवनवीन लेखकांना पुढे आणण्याची खटपट करतात काय ? मला तर असे दिसते की, अगोदरच प्रसिद्ध झालेले मान्यवर, पन्नाशीला आलेले लेखकच ते विनासायास निवडतात—नव्हे मिळवितात ! मग नवीन लेखकांना पुढे यायला काय यातना सहन कराव्या लागतात, याची जाण कोणी ठेवायची ? बाबांनो, चांगले चुंगले लिहिणारे नव्या दमाचे खूप लेखक आहेत. त्यांचे चुकले तर त्यांचा कान धरण्याचा अधिकार त्यांचेवतीने मी तुम्हाला देतो. कारण मी त्यांच्या वेदना, धडपड गेली कित्येक वर्षे बघतो आहे आणि मी निरपेक्ष झाल्यापासून त्यांच्या वेदनांनी माझ्या डोळ्यात पाणी येते आहे. या भारतामध्ये उद्योगधंदा हा निखळ उद्योगधंदाच राहणार आहे की पोटाचा उद्योग हे व्रत व्हायचे आहे, याची कसोटी लावण्याची आणि लागण्याची वेळ आली आहे. सावधान ! रात्र वैऱ्याची आहेच पण यापुढे दिवसही वैऱ्याचा व्हावयाचा आहे.

*(६) याच अनुषंगाने दलित साहित्याबद्दल आपण मला काही बोलू द्यावे, अशी* मी विनंती करतो. विस्तृतपणे मला बोलायचे नाही. कारण याच संमेलनात माझ्याहून

अधिकारी माणसे त्यावर चर्चा करणार आहेत. मी केवळ माझे मत मांडणार आहे. ललित साहित्य आणि दलित साहित्य असा फरक माझ्या वृत्तिदोषामुळे किंवा निर्मितीच्या समवेदनेमुळे मला करताच आला नाही.

साहित्यप्रदेशी असे कोणी करीत असेल, असे मला वाटत नाही. साहित्याला धर्म असू शकतो, 'जात' असूच शकत नाही जातिभेद, जातिवाद असे शब्द साहित्याला लागू झाले की साहित्य मेले ! चांगले वाचणे दुर्मिळ झाले आहे. त्यात काही चांगले वाचायला मिळाले, तर ज्याच्या अत करणातून जो उद्‌गार निघाला ते अंत:करण बघावेसे वाटते कारण, साहित्याच्या खऱ्या वाचकाला केशवसुतांनी "कोणीही पुसणार नाहि, कवि तो होता कसा आननी ?", असे शुद्ध मराठीत ठणकावून सांगितले आहे. व्यक्ती महत्त्वाची नसते, तिचे चारित्र्य महत्त्वाचे असते. 'वेद' हे अपौरुषेय आहेत, असे जे सांगितले जाते ते केवळ वेदांकडेच आपले लक्ष केंद्रित व्हावे म्हणून ! हा इतिहास फार जुना आहे. समन्वयाची भावनाही तितकीच जुनी आहे. प्राचीन आर्यांनी व्रात्य लोकांना ज्या समन्वयाने आपल्यात सामावून घेतले, तो इतिहास राजकीय आणि समाजधुरीणांनी जरूर नजरेखालून घालावा. मंत्रवाङ्मय जर बघितले तर त्यात साहित्य, संगीत आणि वाणीविलास येवढेच बघितले गेले आहे. गायत्री मंत्र, महामृत्युंजयाचा जप, अथर्वशीर्ष हे कोणी रचले याचा शोध न घेताच तो मंत्र जपत जपत आपल्या येथील लोक मानवातून महात्मा झाले आहेत. रामदासांनी गायत्री मंत्राचा चोवीस कोटी जप केला, रामनाम कित्येकांनी घेऊन आपला उद्धार करून घेतला. 'तुलसी रामायणा'त तुलसीदासांनी सांगितले — राम केवळ एकाच स्त्रीचा उद्धार करू शकला. (म्हणजे अहिल्येचा !) पण 'रामनाम' कोटी कोटी लोकांचा उद्धार करते झाले. संस्कृत कोणी वाचावे अन् कोणी नाही याचा ऊहापोह ज्यांनी केला त्यांना वाणीमध्ये, शब्दामध्ये स्पष्ट उच्चार आणि संगीतही अभिप्रेत होते. सामवेद उच्चाराच्या शुद्ध संगीतमय मंत्रासाठीच निर्माण झाला. मी ॐ या शब्दाचा रोज उच्चार करतो पण त्याच्यातून लहरी निर्माण होत नाहीत ध्वनिमुद्रिका निघाल्यानतर लहरीचा परिणाम कसा होतो, होतो की नाही हा विज्ञानाने सिद्ध झालेला विषय आहे लहरींनी समाज शुद्ध होतो याला शास्त्रीय बैठक आहे. मानवजातीने बोलायला सुरुवात केली ती ॐ या अक्षरातून ! माझ्यावेळचे शिक्षण तोडी होते तरीदेखील माझा ॐ चा उच्चार लहरत नाही पण माझे मित्र श्री. राम चितळकर ऊर्फ सी. रामचद्र याच्या मुखातून निघालेला उच्चार, अनुभवायला येतील इतक्या लहरी निर्माण करतो खरोखरच मराठी भाषेचे शुद्ध शिक्षण घ्यावयाचे असेल, तर शिक्षणात संस्कृत आणि संगीत यांचा अंतर्भाव होणे अत्यंत आवश्यक आहे याचा आधार परकीय लोकांच्या वाङ्मयात शोधण्याचे काहीही कारण नाही. खलिल जिब्रानचे *'नॉट ए लीफ् टर्न्स एलो बट विथ दि स्लायटेस्ट नॉलेज ऑफ दि ट्री' हा शुद्ध वाणीचा काव्यमय पण व्यावहारिक आविष्कार आहे*

(७) मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी आणि जीवनाच्या सकसतेसाठी एक अत्यंत आवश्यक गोष्ट म्हणजे, शिक्षण स्वस्त व्हायला नको ! कमीत कमी विद्या ही कष्टसाध्य तरी असावी. सहज मिळणाऱ्या विद्येची परिणती आज आपल्यालाही अन् परकीय राष्ट्रांनाही जाणवत आहे. शास्त्रीय शिक्षणपद्धतीने सुधारलेल्या पाश्चिमात्य राष्ट्रांतही हिप्पीज निर्माण होत आहेत आणि त्यांची संख्या भारतात लोढ्यालोढ्याने येत आहे. आणि आपण त्यांना मन:शांती देणारे शिक्षण देऊ शकू, असे शहाणपण मिळवीत आहोत. तसे आपण शहाणेच आहोत. यावेळी मला शौकत थानवीची गोष्ट आठवते. पण विस्तारभयास्तव नको. आपण त्यांच्याच शिक्षणपद्धतीचा अंगीकार करून आपले शहाणपण वाढविण्याचा प्रयत्न करीत आहोत. ज्याला इंग्रजी येते तो शहाणा, ज्याला येत नाही तो वेडा, असे एक छान समीकरण झाले आहे. आणि तेच जर खेड्यापाड्यापर्यंत जाणार असेल, तर बौद्धिक प्रदूषणाशिवाय भारताच्या नव्या पिढीच्या वाट्याला काहीही येणार नाही. उलट माझ्यासारखे लक्षावधी जे गरिबीशी झगडत झगडत शिकत आले त्यांना आपण वेडे आहोत, असेच वाटू लागेल. मानसिक रोगतज्ज्ञांची चंगळ होईल पण खेड्यातून शिकणारी मुले ओझ्याने पिचून अकाली थकून नि:सत्व होऊन जातील. वयाची आठ वर्षेपर्यंत मराठी भाषाही येत नसलेला रानाजंगलातला मी मुलगा— इकडे आम्ही म्हणणार 'मुले म्हणजे फुले,' आमची भारतीय संस्कृती— आमची थोर परंपरा. शहरात शिकायला आल्यानंतर पुस्तकांची हमाली करणार आणि शिकणार काय, तर 'पुशी कॅट पुशी कॅट वेअर हॅड यू बीन,' जणू आमच्या लोकसाहित्याच्या मानेला नखच लागले आहे !

(८) आम्ही शिकून सवरून एकाच उद्योगाला लागलो आहोत आणि तो उद्योग म्हणजे चारित्र्यहननाचा ! जातिभेद-जातिवाद यांचा बाऊ करीत करीत, सर्वेषां अविरोधेन ब्रह्मकर्माणि साधयेत ! विसरून आम्ही शिकणार काय, तर आधुनिक सुधारलेल्या समाजात निर्माण झालेले नॉन कॉम्पिटिंग ग्रुप्स ! सगळेच वैऱ्याचा दिवस करणारे आहे !

(९) आमच्यामध्ये एक नवा लेखकवर्ग निर्माण होत आहे. त्यात पुरुषही आहेत, स्त्रियाही आहेत. असा एक स्त्री-समाज निर्माण होत आहे की, ज्यांना भरपूर सवड असते. चांगले स्थळ मिळावे म्हणून शिक्षण घेतलेले असते. त्या शिक्षणाशी व्यवहाराचा संबंध नसल्यामुळे सवडच सवड असते. ही मंडळी सध्या लेखक व्हायला साधना करावी लागते हे विसरून लेखन करीत आहेत. त्यांच्या कथा-कविता वाचल्यानंतर कोणाची कीव करावी—देशाची, समाजाची, त्यांची, की आपणच एखादा दगड डोक्यावर आपटून मोक्ष मिळवावा, असे वाटू लागते. या मुद्याचे विस्तारभयास्तव केवळ दिग्दर्शनच करतो.

ज्याला आज दलित साहित्य समजले जाते आणि ज्याला मी माझ्या प्राणाची शपथ घेऊन साहित्यच मानतो, त्याची कदर करणे हे कर्तव्यच नव्हे तर धर्म आहे असे

मी मानतो. आपल्या या मराठीच्या देशात कित्येक मुसलमान आहेत, त्यांना उर्दू तर सोडाच पण धड हिंदीही येत नाही. मराठीशिवाय घरीदारी दुसरी भाषा त्यांना बोलता येत नाही, असे लेखक संख्येने थोडे असले तरी उभारीने लिहीत आहेत. त्यांची कदर व्हायला हवी. नाहीतर 'माझा मराठा बोल' आणि काळही आपल्याला क्षमा करणार नाही. जीवनातील संघर्ष समन्वयानेच मिटवावयाचे असतात आणि मुख्य असे की वर उल्लेखिलेले सगळे साहित्य हे कोणत्याही समीक्षकाच्या परकीय सिद्धांतावर आधारलेले नाही. ते याच मराठी जमिनीवर सांडलेल्या अश्रूंवर, रक्तावर उगवलेले आहे. साहित्याच्या भूमीला अश्रू आणि रक्ताचे खत किती मानवते ही साक्ष, मराठी भाषेचा पहिला शिलालेख ९३४ सालचा सापडला तेव्हापासून मराठी साहित्याने दिली आहे. जे आपल्या रक्तामासातून उगवले त्याची कदर केली नाही, तर रक्त आणि अश्रू यांना अर्थच उरणार नाही.

रसिकांनो, तुम्हाला कंटाळा यावा, असा माझा सुतराम उद्देश नाही. मला तुमच्याशी मोकळेपणाने बोलता आले असते, तर तुम्हांला काळाचे भान राहणार नाही असे मी करू शकलो असतो. असे मी केले आहे यात अर्थवाद नसून वस्तुस्थिती आहे. पण मला आपल्यापुढे माझे भाषण वाचून दाखवावयाचे आहे. या वेदना कशा असतात, याचा अनुभव मी घेत आहे. संमेलनाच्या अध्यक्षाचे भाषण जबाबदारीने करावे लागते, असे मानले जात असल्यामुळे माझा नाईलाज आहे ही जबाबदारी कशी असते याचा अनुभव मला नाही. १९३२ ते १९७८ म्हणजे उणीपुरी ४६ वर्षे मराठी साहित्यगंगेच्या तीर्थमय जीवनात मी आंघोळ केली आहे. त्यामुळे लाभणारी स्वच्छता, अनुभव, अनुभूती मी कोणत्या शब्दात कशी आणि किती व्यक्त करावी याची जाण आणि भान मी विसरलो आहे. तुम्ही मात्र विसरू नका ! आजच्या माझ्या आयुष्याच्या या पहिल्यावहिल्या क्षणी तुमच्या हृदयाचा ठाव घेण्याची आणि माझ्या हृदयात ते सामावून घेण्याची प्रबल इच्छा मला झाली. भुकावलेले वासरू दावणीतून मोकळे झाल्याबरोबर आईच्या स्तनाला ढुशा देते आणि गाय त्यामुळे दुखावत नाही उलट सुखावते. श्रोत्यांना गाय-माय मी मानतो. म्हणूनच तुमच्याकडून सहनशीलतेची अपेक्षा करतो. तुम्हाला मी गाय म्हटले म्हणून रागावून 'आम्हाला शेपूट आहे का' असे मला विचारू नका. असे विचारण्याच्या प्रथेमुळेच आज सामाजिक चारित्र्यहनन होत आहे. ज्ञानेश्वरांनी श्रोत्यांना आळवले तसे "अमृताशी पैजा" जिंकणारे मधुर, कोमल, सुगंधी शब्द मजजवळ नाहीत. पण तुम्हांला माता म्हणून माझ्या सर्व दोषांचे प्रायश्चित्त मी घेतो. तुम्ही माझे वेडेवाकुडे बोल ज्या मनाच्या औदार्याने ऐकले, त्या तुमच्या उदार आणि चांगल्या मनाला नमस्कार करतो. एकदा, दोनदा-अगदी त्रिवार ! —आणि आपला निरोप घेतो.

□□□

# बार्शी : १९८०

# गं. बा. सरदार

संमेलनाचे उद्घाटक डॉ. शिवराम कारंथ

स्वागताध्यक्ष नामदार सुशीलकुमार शिंदे आणि मित्रहो,

आपल्या मराठी साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद आतापर्यंत मोठमोठ्या प्रतिभासंपन्न साहित्यिकांनी व ज्ञानवृद्ध विचारवंतांनी भूषविले आहे. यंदा या पदासाठी आपण माझी निवड केली हा मी माझा बहुमान समजतो. ज्यांनी माझी निवड केली त्या मतदारांचे आणि आपण तिला मान्यता दिलीत, याबद्दल आपणा सर्वांचे मी मन·पूर्वक आभार मानतो. जिथे हे संमेलन आज भरत आहे ते बार्शी गाव ही व्यवहारोपयोगी मालाची बाजारपेठ आहे, तशी ती भक्तीची उतारपेठही आहे. भक्तिसंप्रदायाचे हे पुरातन केंद्र आहे. चक्रधर, ज्ञानेश्वर व नामदेव हे महाराष्ट्रातील भागवतधर्माचे आद्यप्रणेते होत. त्यांनी पारमार्थिक क्षेत्रात का होईना, समतेच्या तत्त्वाचा प्रथम उद्घोष केला. त्यांच्या समता दिंडीतील एक निष्ठावंत पाईक जोगा परमानंद हे बार्शीचे रहिवासी होते. या प्रसंगी मला बार्शीच्या आणखी एक साहित्यिक सुपुत्राची आठवण होते. हे साहित्यिक म्हणजे माझे मित्र व खंदे क्रांतिकारक लोकशाहीर अमर शेख हे होत. संयुक्त महाराष्ट्राच्या आंदोलनातील त्यांची कामगिरी केवळ अविस्मरणीय अशी आहे. त्यांनी आयुष्यभर कष्टकऱ्यांची, किसान-कामगारांची गीते तन्मयतेने गाइली. 'एखादा लढवय्या तळहातावर शीर घेऊन जसा लढतो, तसे अमर शेख आपले काव्य गातात,' असे आचार्य अत्रे यांनी त्यांच्या चैतन्यमय व स्फूर्तिदायक काव्यगायनाचे वैशिष्ट्य सांगितले आहे. 'नव्या जगापुढती नवा आळवू राग' अशी त्यांच्या काव्यनिर्मितीमागील प्रेरणा होती  मी त्यांच्या पवित्र स्मृतीला अभिवादन करतो

बार्शीच्या सांस्कृतिक विकासासाठी आज अनेक सार्वजनिक संस्था प्रयत्नशील आहेत. त्यात शिक्षणसंस्था आहेत, सार्वजनिक वाचनालय आहे, मराठी साहित्य मंडळ आहे, आणि इतर अनेक लहान-मोठ्या सामाजिक संस्था आहेत. व्याख्याने, परिसंवाद, स्पर्धा, प्रदर्शन, कथाकथन, काव्यगायन, नाट्यदर्शन अशा अनेकविध कार्यक्रमांच्याद्वारे येथील मराठी साहित्य मंडळ सामाजिक प्रबोधनाचे व साहित्यप्रसाराचे कार्य निरलसपणे करीत आहे. मंडळाचे हे कार्य नि.संशय गौरवास्पद आहे. या संस्थेतील कार्यकर्त्यांच्या

व्यापक सामाजिक जाणिवेबद्दल आणि कर्तव्यदक्षतेबद्दल त्यांना जितके धन्यवाद द्यावेत तितके थोडेच आहेत. तालुक्यातालुक्याच्या ठिकाणी अशा कितीतरी लहान-लहान संस्था, गाजावाजा न करता फार मोठे वाङ्मयीन कार्य करीत आहेत. त्यांच्या कार्यात एकसूत्रीपणा आणणे हे मध्यवर्ती साहित्यसंस्थेचे व साहित्यसंमेलनाचे काम आहे असे मला वाटते.

## संमेलनाची परंपरा

पहिले मराठी साहित्य संमेलन पुणे येथे इ. स. १८७८ मध्ये 'मराठी ग्रंथकारांची सभा' या नावाने भरले होते. हे संमेलन भरविण्यात लोकहितवादी व न्यायमूर्ती रानडे यांचा पुढाकार होता. या पहिल्या अधिवेशनाचे सूत्रचालकही रानडे हेच होते. या घटनेला एक विशेष अर्थ आहे असे मला वाटते. रानडे हे आधुनिक महाराष्ट्राचे जनक होते. त्यांनीच येथील सामाजिक प्रबोधनाच्या चळवळीचा पाया घातला. सामाजिक जीवनाच्या प्रत्येक अंगाची स्वायत्तता त्यांना मान्य होती. पण त्याबरोबरच ही निरनिराळी अंगे एकमेकांशी निगडित आहेत हेदेखील त्यांनी ओळखले होते. म्हणून त्यांनी या सर्व अंगोपांगांच्या परस्परसंबंधाचे परिशीलन करून त्यांना एकत्र गुंफणाऱ्या आधुनिक युगतत्त्वाचा अचूक वेध घेतला होता. त्यामुळे धर्म, साहित्य, इतिहास, कुटुंबधारणा, राजकारण, अर्थव्यवहार इत्यादी अनेकविध विषयांवरील त्यांच्या विचारांतून एक सलग व सर्वकष जीवनविषयक दृष्टिकोन सर्वत्र आढळतो. सामाजिक प्रबोधनाचे कार्य सातत्याने व नेटकेपणाने चालू राहावे म्हणून त्यांनी सर्वसंग्राहक वृत्तीने महाराष्ट्राच्या संस्थात्मक जीवनाची पद्धतशीर उभारणी केली.

*"Ranade wanted to vitalize the conscience of the Hindu Society which had become moribund as well as morbid. Ranade aimed to create a real social democracy."* जडतेने ग्रासल्यामुळे कुंठित झालेल्या व विकृत बनलेल्या हिंदू समाजाच्या सदसद्विवेकबुद्धीला संजीवन देण्याची रानडे यांची धडपड होती. खरीखुरी सामाजिक लोकशाही येथे अस्तित्वात आणण्याचे त्यांचे उद्दिष्ट होते. अशा शब्दात डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी रानडे यांचा गौरव केला आहे. अशा विशालबुद्धीच्या व विधायक दृष्टीच्या समाजचिंतकाने आपल्या या साहित्यसंमेलनाची मुहूर्तमेढ रोवली आहे. हे संमेलन ही प्रबोधनाच्या चळवळीची सांस्कृतिक आघाडी व्हावी अशी त्यांची अपेक्षा होती. त्यांची ही भूमिका ध्यानात ठेवूनच पुढील काळातही संमेलनाची वाटचाल होत राहिल्याचे दिसून येते. बेळगाव येथे १९२९ साली भरलेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष काळकर्ते शिवरामपंत परांजपे आपल्या अध्यक्षीय भाषणात काय म्हणतात ते पाहा. "आपल्या भाषाभिवृद्धीचे निरनिराळ्या लोकांकडून वैयक्तिक प्रयत्न चाललेलेच असतात. परंतु त्या भिन्नभिन्न प्रयत्नांचे एकीकरण व्हावे, त्यांच्यात एकसूत्रीपणा उत्पन्न व्हावा, आणि त्यांना हल्लीच्या आपल्या राष्ट्रीय आकांक्षांच्या दृष्टीने

सुसंघटित स्वरूप यावे, हाच मुख्यत्वेकरून असली सामुदायिक संमेलने भरविण्यातील मुख्य हेतू असतो.''

गेल्या शंभर वर्षातील संमेलनात जी भाषणे झाली, जे प्रश्न चर्चिले गेले, जे ठराव मांडण्यात आले, ते पाहिले की, त्यात भाग घेणाऱ्या लोकांची साहित्याची कल्पना किती व्यापक होती ते दिसून येते. शिवाय साहित्याचे क्षेत्र स्वायत्त असले, तरी स्वयंपूर्ण नाही याचा कुणालाच कधी विसर पडला नव्हता. साहित्याचे प्रयोजन, त्याचे लक्षण, त्यातील बोधपूर्व व अबोधपूर्व अंश, काव्यानंदाचे स्वरूप, साहित्यातील अश्लीलता इत्यादी ललित वाङ्मयविषयक मूलभूत प्रश्न, भाषाशुद्धी, लिपिसुधारणा, विज्ञानाची परिभाषा, लेखनाचे नियम इत्यादी आनुषंगिक प्रश्न, तसेच मुद्रणस्वातंत्र्य, जप्त वाङ्मयावरील बंदी उठविण्याचा प्रश्न, दुर्मिळ ग्रंथांचे रक्षण व पुनर्मुद्रण, शिक्षणाचे माध्यम, शिक्षणप्रसार, मराठी विद्यापीठ, सयुक्त महाराष्ट्र यासारखे मराठी भाषेच्या विकासाच्या आणि साहित्याच्या प्रगतीच्या व प्रसाराच्या दृष्टीने अत्यंत जिव्हाळ्याचे प्रश्न, अशा त्रिविध स्वरूपाच्या अनेक प्रश्नांचा या व्यामपीठावरून तत्परतेने परामर्श घेण्यात आला आहे.

संमेलनाच्या पूर्वाध्यक्षाची नावे आणि त्याचे वाङ्मयीन कार्य जरी बघितले तरी त्यामधून याच साहित्यविषयक व्यापक जाणिवेचा प्रत्यय येतो. या मालिकेत जसे प्रख्यात कादंबरीकार, कथालेखक, नाटककार, कवी आहेत, तसेच व्यासंगी संशोधक, समीक्षक, समाजचिंतक, कोशकार व पत्रपंडितही आहेत. काही थोडे अपवाद वगळले, तर यांपैकी बहुतेक सर्वजण साहित्यिकाची सामाजिक बाधिलकी मानणारे होते. यात जे ललित वाङ्मयाचे उपासक होते ते स्वत: प्रतिभावंत होते, कलेची महती ओळखणारे होते तरीदेखील त्यांनी केवळ कलावादाचा पुरस्कार केला नाही. हरिभाऊ आपटे हे मराठील श्रेष्ठ कादंबरीकार होते याबद्दल दुमत होण्याचे कारण नाही. त्यांनी अकोल्याच्या साहित्यसंमेलनातील आपल्या अध्यक्षीय भाषणात ''हे वाङ्मय राष्ट्राच्या उन्नतीचे कारणही आहे आणि कार्यही आहे. राष्ट्राचा जसजमा उत्कर्ष होतो, तसतसा वाङ्मयाचा उत्कर्ष होतो, आणि वाङ्मयाला जितके जितके उज्ज्वल व उन्नत स्वरूप येत जाईल, तितके तितके राष्ट्राच्या उन्नतीला व उज्ज्वलतेला ते कारण होते, —'' असे म्हटले आहे. त्यांच्या या विचारात सामाजिक बांधीलकीचे तत्त्व अतर्भूत आहे हे अगदी उघड आहे. इतर अध्यक्षांची भाषणं वाचली, तर त्यांतूनही त्यांची समाजाभिमुखना दिसून आल्याखेरीज राहत नाही. अर्थातच या सर्वांचे सामाजिक दृष्टिकोन सारखे नव्हते. त्यांत पुष्कळच मतभिन्नता होती. परंतु यांपैकी कुणालाही समाजनिरपेक्ष असे तथाकथित निखळ कलात्मक साहित्य अभिप्रेत नव्हते. या मान्यवर साहित्यिकांची जाणीव व्यापक होती म्हणजे काय, ते आपण समजून घेतले पाहिजे. सामाजिक जीवनाच्या राजकीय, आर्थिक, सांस्कृतिक अशा अनेकविध क्षेत्रांशी ती संपर्क साधणारी होती परंतु समाजाच्या कनिष्ठ

जातीतील व खालच्या थरांतील लोकांच्या जीवनाशी ती खरोखरच तादात्म्य पावली होती असे म्हणता येणार नाही. आताआतापर्यंत आपल्या आधुनिक वाङ्मयाचे लेखक व वाचक बहुतांशी उच्चवर्णीयच होते. अजूनही आपले साहित्य, विषयाची निवड व रचनेचे तंत्र यांत थोडाबहुत फरक पडला असला, तरी पांढरपेक्षा मध्यमवर्गीय मनोवृत्तीची कक्षा ओलांडून पलीकडे गेलेले नाही. देशातील एकंदर परिस्थिती आज खूपच बदलली आहे; आणि निरनिराळ्या थरांतील लोकांत सर्वांगीण विकासाची आकांक्षा निर्माण झाली आहे. तेव्हा आता सामाजिक बांधिलकीच्या किंवा लोकाभिमुखतेच्या कल्पनेत आमूलाग्र बदल घडवून आणण्याची वेळ आली आहे. सामाजिक बांधिलकी याचा अर्थ शासनाच्या, एका विशिष्ट राजकीय पक्षाच्या किंवा जुन्यानव्या संप्रदायाच्या प्रचाराला स्वत:ला जुंपून घेणे असा नाही, तर साहित्यिक म्हणून समाजाशी आपले काही नाते आहे याची जाणीव ठेवून, आपल्या वाड्मयीन माध्यमाच्या द्वारे आपली सामाजिक जबाबदारी तन्मयतेने व समर्थपणे पार पाडणे हीच वस्तुत: सामाजिक बांधिलकी होय.

या दिशेने आपण समग्र वाड्मयाची पाहणी करू लागलो, तर त्याच्या निर्मितीमागील वेगवेगळ्या प्रेरणा आपल्या दृष्टिपथात येतात. त्यांपैकी कलात्मक साहित्याची निर्मिती, समाजचिंतन व प्रबोधन, ज्ञानोपासना व ज्ञानप्रसार, मतप्रचार आणि मनोरंजन या प्रमुख प्रेरणा होत. समाजाच्या धारणेला व प्रगतीला या सर्वच प्रेरणांची गरज आहे. मात्र या प्रेरणा एकमेकींपासून अगदी अलग आहेत असे नाही. प्रचारात्मक लेखनातही साहित्यगुण आढळतात. ज्ञानप्रसार करणाऱ्या वाङ्मयात कल्पकतेला मज्जाव आहे असे कुणी म्हणणार नाही. मात्र उच्चप्रतीच्या वैचारिक व कलात्मक वाङ्मयात सर्जनशीलतेला प्राधान्य असते. विचारप्रधान साहित्य जितके सकस व समृद्ध असेल, कलात्मक साहित्य जितके अकृत्रिम व आशयघन. प्रतीतिसुभग व प्रभावी असेल, तितक्या प्रमाणात या दोन्ही प्रकारच्या साहित्याची बाकीच्या वाड्मयावर छाप पडल्याशिवाय राहत नाही. त्यामुळे साहजिकच या वाड्मयाची पातळी उंचावते व त्याची गुणवत्ता वाढीस लागते.

साहित्यसंमेलनाच्या चळवळीमागील प्रेरणा अशी व्यापक आहे. पहिले संमेलन झाल्याला आता शंभर वर्षे होऊन गेली. या प्रदीर्घ कालावधीतील आपल्या साहित्यसाधनेची परिणती कशात झाली आहे ? आज आपण नेमके कुठे येऊन ठेपलो आहोत ? यापुढची वाटचाल कोणत्या दिशेने करणे श्रेयस्कर होईल ? इत्यादी प्रश्न खरोखरच महत्त्वाचे आहेत आणि त्यांची उत्तरे आपण कसोशीने शोधली पाहिजेत. या संदर्भात मला जे विचार सुचतात ते मी आपल्यापुढे ठेवणार आहे. या प्रसगी मी नवे काही सांगणार आहे असे नाही. रामदासांनी म्हटल्याप्रमाणे 'संदेहवृत्ति न भंगे। म्हणोनि बोलिलेचि बोलावे लागे' अशी वास्तविक माझी मन:स्थिती आहे. मराठी भाषा व साहित्य यांच्या प्रसाराच्या दृष्टीने ज्या गोष्टीकडे लक्ष देणे मला निकडीचे वाटते,

त्यांचाच मी येथे थोडक्यात ऊहापोह करणार आहे. ते करताना माझ्या दृष्टीपुढे प्रामुख्याने ज्यात नवनिर्मितीला प्राधान्य आहे, असे स्वातंत्र्योत्तर काळातील ललित वाङ्मय व विचारप्रधान साहित्य आहे.

## मराठी साहित्य आणि संक्रमणकाळाचे आव्हान

गेल्या तीन दशकात आणि त्यातही संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतरच्या वीस वर्षांत आपल्या समाजात फार मोठे स्थित्यंतर घडून आले आहे. राजकीय चळवळी आणि सार्वत्रिक निवडणुका यामुळे खेड्यापाड्यात जागृती होऊन जनसामान्यांना आपल्या राजकीय व सामाजिक हक्कांची जाणीव झाली आहे. जीवनसमृद्धीच्या त्यांच्या आकांक्षा पालवल्या आहेत. सत्ता व संपत्ती यांत जास्तीत जास्त वाटा मिळावा म्हणून समाजाचा प्रत्येक घटक प्रयत्नशील आहे. आर्थिक विषमता वाढत असल्याने वेगवेगळ्या घटकातील तणाव उत्तरोत्तर तीव्रतर होत आहेत त्याचबरोबर या काळात शिक्षणाचा प्रसार खूप झपाट्याने झाला आहे. तालुक्यातालुक्यात महाविद्यालये निघाली आहेत. त्यामुळे ग्रामीण परिसरात एक बहुजातीय व बहुवर्गीय असा नवशिक्षित समाज निर्माण झाला आहे. त्यांपैकी अनेक संवेदनक्षम व चिंतनशील तरुण आपले मनोगत वाङ्मयीन माध्यमातून प्रगट करण्यास उद्युक्त होत आहेत ग्रामीण जीवनाशी त्यांचे जवळचे व जिव्हाळ्याचे संबंध आहेत. आपल्या आप्तस्वकीयाची हलाखी ते रोजच्या रोज प्रत्यक्ष पाहत आहेत आधुनिक शिक्षणामुळे त्याना नवविचाराची व नव्या मूल्यसरणीची ओळख पटली आहे. प्रथमच समाजतळाच्या थरातून एक नवा जिज्ञासू वाचक व उदयोन्मुख लेखकवर्ग अस्तित्वात आला आहे त्याच्या जिज्ञासेला खाद्य पुरवण्याची व त्याची सांस्कृतिक भूक भागवण्याची कामगिरी सध्याचे मराठी साहित्य बजावीत आहे का ? काळाच्या प्रवाहाशी संवादी अशी भूमिका घेण्याची समयज्ञता आपल्या साहित्यिकांनी दाखवली आहे का ? हे प्रश्न आपणास यापुढे डावलता येणार नाहीत. त्यांची चिकित्सा करताना साहित्याच्या प्रभावक्षेत्राचा विस्तार आणि त्याचा गुणात्मक विकास अशा दोन्ही बाजू लक्षात घेतल्या पाहिजेत.

महाराष्ट्राची लोकसंख्या स्थूलमानाने सहा कोटीच्या जवळपास आहे. त्यांपैकी सुमारे दोन कोटी लोक तरी साक्षर आहेत. मराठीतील प्रमुख लोकप्रिय दैनिकांचा खप दीड-दोन लाखांच्या घरात आहे अशा आठ-दहा मोठ्या वृत्तपत्रांच्या बरोबरच जिल्हा-पत्रांचा वाचकवर्ग जमेस धरला म्हणजे मराठी समाजात किमान पन्नास-साठ लाख लोक तरी वर्तमानपत्र वाचणारे आहेत, असे म्हटले तर त्यात चूक होण्याचा संभव नाही. या पार्श्वभूमीवर मराठी ग्रंथप्रसाराकडे नजर टाकली तर काय दिसून येते ? मराठी साहित्यातील लोकप्रिय लेखकाच्या ललितकृतीची सामान्यत: तीन हजारांची आवृत्ती निघते. विचारप्रधान ग्रंथाची आवृत्ती तर बहुधा अकराशेचीच असते हे चित्र समाधानकारक आहे असे

कुणीही म्हणणार नाही  वृत्तपत्रवाचकाची संख्या इतकी मोठी असण्याचे कारण केवळ शिक्षणप्रसार हे नसून, राजकीय जागृतीमुळे ग्रामीण समाजातही देशातील घडामोडी जाणून घेण्याची उत्सुकता निर्माण झालेली आहे आणि म्हणूनच त्याला वर्तमानपत्र वाचण्याची गोडी लागली आहे. मात्र ज्यांच्यापर्यंत वृत्तपत्रे जाऊन पोचलेली नाहीत असे फार मोठे लोकसमूह अजूनही आपल्या देशात आहेत. तरीसुद्धा वृत्तपत्रसृष्टीची अलीकडच्या काळात पुष्कळच वाढ झालेली आहे. त्या मानाने विचारप्रधान व कलात्मक वाङ्मयाचे क्षेत्र का विस्तारले नाही, हा खरा प्रश्न आहे. गेल्या वीस-पंचवीस वर्षांत महाराष्ट्रात जो नवा वाचक निर्माण झाला आहे आणि जो नवा लेखक पुढे येण्यासाठी धडपडत आहे, त्यांना प्रचलित मराठी साहित्यक्षेत्रात पुरेसा वाव मिळेल असा विश्वास वाटत नाही. त्यामुळे ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, ख्रिस्ती साहित्य, महिलांचे साहित्य, नवोदितांचे साहित्य, या वाङ्मयीन प्रवाहांनी आपापले विभक्त संसार थाटले आणि त्यांच्या प्रतिनिधींची स्वतंत्र संमेलनने भरू लागली आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषद, विदर्भ साहित्य संघ, मुंबई मराठी साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद, आंध्र प्रदेश मराठी साहित्य परिषद, मध्यप्रदेश साहित्य संघ यांसारख्या महामंडळाच्या प्रदेशवार घटकसंस्थाचे अस्तित्व आणि त्यांची विभागीय संमेलने व मेळावे हे सामाजिक एकात्मतेच्या कार्याला आणि जातिधर्मनिरपेक्ष अशा व्यापक साहित्य-निर्मितीला पोषकच आहेत. कारण त्यात त्या त्या प्रदेशातील सर्व जातींचे, धर्मांचे व थरांचे लोक तत्त्वत: भाग घेऊ शकतात. परंतु ग्रामीण, दलित यांसारख्या उपेक्षित समाजघटकांच्या संमेलनाची स्थिती तशी नाही. त्यांचा उदय हा प्रतिष्ठित समाजातील वाङ्मयोपासकांच्या जाणिवांतील कोतेपणाचा, कालबाह्यतेचा द्योतक आहे. काळाची गरज ओळखण्याच्या बाबतीत मराठी साहित्य थिटे पडले आहे. सन १९३० पासूनच्या अर्धशतकातील मराठी वाङ्मयाची स्थितिशीलता त्याच्या सर्वांगीण प्रगतीला विघातक ठरली आहे  साहित्यातील या त्रुटीची जाणीव मराठी लेखकांना अजिबात नव्हती असे म्हणता येत नाही  १९३२ साली कोल्हापूरच्या संमेलनात व १९४१ साली सोलापूरच्या संमेलनात आपल्या साहित्यातील ही उणीव दाखवणारे ठराव पास झाले आहेत. सोलापूरच्या संमेलनातील ठरावामधला महत्त्वाचा भाग असा : "नव्यानेच अक्षरओळख झालेल्या व बहुतांशी प्रौढ असलेल्या जनतेची राजकीय, सामाजिक, धार्मिक, सर्वांगीण उन्नती होईल, त्यांना जीवनाकडे पाहण्याची नवी दृष्टी येईल, त्यांच्यातील रूढिप्रियता नष्ट होईल नि त्यांना मूलभूत हक्कांची जाणीव होईल नि त्याचबरोबर कर्तव्याचीही ओळख होईल अशा प्रकारचे वाङ्मय निर्माण होणे जरूर आहे. हल्लीचे आघाडीवरचे साहित्यिक नि नियतकालिके यांची दृष्टी या बहुजनसमाजाकडे वळलेली नाही, त्यांचे वाङ्मय पुढारलेल्या वर्गासाठीच आहे. त्यांचा विनोद नि शास्त्रीय दृष्टिकोन बहुजनसमाजाच्या आटोक्यातील नाही. तरी नव्या युगाचा ओघ लक्षात घेऊनच नवोदित लेखकांनी नि हल्लीच्या

मान्यवर साहित्यिकांनी असे बहुजनोपयोगी साहित्य निर्माण करण्याकडे विशेष लक्ष पुरवावे अशी या सभेची विनंती आहे.'' हा ठराव संमत झाल्यानंतर इतका काळ लोटला, बाहेरच्या परिस्थितीत केवढा तरी बदल घडून आला, परंतु साहित्याच्या क्षेत्रात मूलग्राही दृष्टीने त्याची काही दखल घेतली गेली आहे असे आढळत नाही.

गुणोत्कर्षाच्या दृष्टीने विचार केला तर त्यातूनही जो निष्कर्ष निघतो, तो खचितच उत्साहवर्धक नाही. गेल्या पंचवीस-तीस वर्षांत मराठी साहित्यात प्रतिभासंपन्न लेखक पुढे आले नाहीत असे नाही आपल्या पहिल्याच ग्रंथाने ज्यांनी वाचकांच्या मनात मोठ्या अपेक्षा निर्माण केल्या होत्या, असे कितीतरी साहित्यिक आजही विद्यमान आहेत. परंतु वाचकांच्या अपेक्षा त्याना बहुतांशी पूर्ण करता आलेल्या नाहीत. हे लेखक अव्वल दर्जाचे असले, तरी त्यांच्या दोन-तीन साहित्यकृती प्रसिद्ध होतात न होतात तोच त्यांच्या प्रतिभेचा विकास खुंटतो, त्यांच्या नवनिर्माणक्षमतेला ओहोटी लागते. कलात्मकता संपुष्टात येते, शिल्लक राहते ते तंत्रनैपुण्य व कारागिरी. साहजिकच पुढच्या लेखनात साचेबंदपणामुळे तोचतोपणा जाणवू लागतो. हे साहित्यिक प्रथितयश व सिद्धहस्त असल्याने त्यांच्या लेखनाला नेहमीच मागणी असते, आणि मागणी तसा पुरवठा या न्यायाने ते लिहीत राहतात. आपल्या समाजातील बहुसंख्य लोक मनोरंजनासाठीच वाचतात नियतकालिकांचा वाचकवर्ग संख्येने मोठा आहे त्या मानाने ग्रंथांचा वाचकवर्ग पुष्कळ कमी आहे त्यातही कलात्मकतेची जाण असणारे आणि विचारांची मौलिकता पारखणारे वाचक अगदीच थोडे त्यामुळे सर्वसामान्य वाचक हाती येईल ते वाचतो. त्याची घटकाभर करमणूक होते पण त्याची वाङ्मयाची समज वाढली, त्याच्या विचारांना परिपक्वता आली असे घडत नाही खालच्या थरांतील वाचक हा जेव्हा हे वाङ्मय वाचतो, तेव्हा त्याचा आपल्या जीवनाशी काही संबंध नाही असे त्याच्या ध्यानात येते, आणि मग मनोरंजन हेच काय ते वाङ्मयाचे खरे प्रयोजन, असा त्याचा ग्रह बनतो. त्यामुळे साहित्याच्या समाजनिरपेक्षतेच्या भूमिकेला जास्त बळकटी येते. साहित्यिकाच्या वैयक्तिक दोषांचा वा दुबळेपणाचा हा परिपाक आहे अशी समजूत करून घेणे योग्य नाही. साहित्यक्षेत्रातील या प्रतिकूल परिस्थितीचे मूळ आपल्या परंपरागत जातिव्यवस्थेतील बंदिस्तपणात आहे आपल्या अनुभवाचे क्षेत्र सामान्यत: अगदी संकुचित असते आपल्या जीवनाची चाकोरी ठरून गेलेली असते. या जीवनक्रमात नव्या नव्या अर्थपूर्ण अनुभवाची भर सहसा पडत नाही. पूर्ववयात जमा झालेली अनुभवाची शिदोरी अल्पावकाशातच संपून जाते. शिक्षणाच्या, व्यवसायाच्या, सभासंमेलनाच्या निमित्ताने वेगवेगळ्या जातीतील व थरांतील माणसे वारंवार एकत्र येतात. पण सामूहिक व्यवहारातील या संपर्कात औपचारिकतेचा व रूढ संकेतांचा भाग बराच असतो. त्यातून आंतरिक जवळीक व जिव्हाळा क्वचितच निर्माण होतो. अशा प्रकारे आपल्या जीवनसरणीत सामाजिक अभिसरणाचा अभाव असल्याने आपल्यातील

प्रतिभाशाली लेखकाची अनुभूतीही संस्कारजड व नेमस्त स्वरूपाची असते. त्यामुळे पददलितांच्या दु:खाविषयी आपल्यातील उच्चवर्णीय साहित्यिकाला जरी मनापासून सहानुभूती वाटली, तरी तिच्यात एक प्रकारचा उपरेपणा राहतो; ती त्याच्या मनोविश्वाचा भाग बनू शकत नाही. शिवाय या अलगतेच्या वृत्तीचा उलगडा होण्यासाठी गेल्या अर्धशतकात आपल्या देशात, विशेषत: महाराष्ट्रात जे सामाजिक स्थित्यंतर घडून आले, ते लक्षात घ्यावयास हवे. एके काळी आपणच आधुनिक भारताचे शिल्पकार आहोत, येथील समाजाची बदलत्या परिस्थितीच्या संदर्भात पुनर्घटना करण्याची ऐतिहासिक स्वरूपाची कामगिरी नियतीने आपल्याकडे सोपवली आहे, असा आत्मविश्वास हीच महाराष्ट्रातील उच्चवर्णीय मध्यमवर्गाच्या ध्येयवादामागील प्रेरणा होती. परंतु आता मूलगामी समाजपरिवर्तनाच्या आंदोलनाचे नेतृत्व पूर्वीसारखे केवळ या मध्यमवर्गाकडे राहिलेले नाही. उलट या प्रक्रियेत त्याला दुय्यम स्थान प्राप्त झाले आहे. म्हणून या वर्गातील विचारवंत, साहित्यिक, अध्यापक व तंत्रविद्याविशारद दिवसेदिवस अधिकाधिक उदासीन व असामाजिक वृत्तीचे बनत चाललेले आहेत.

## ललित वाङ्मय : आशय आणि अभिव्यक्ती

मराठी साहित्याच्या प्रगतीची दिशा शोधताना अर्थातच कलात्मक वाङ्मयाच्या विवेचनाला अग्रक्रम दिला पाहिजे. या बाबतीत ललित साहित्याचा आशय व अभिव्यक्ती, साहित्य व्यक्तिनिष्ठ की समाजसापेक्ष, लेखकाचे स्वातंत्र्य आणि बांधिलकी हे तीन प्रश्न विशेष महत्त्वाचे आहेत. साहित्य व इतर ललितकला यातील फरक प्रथम लक्षात घेतला पाहिजे. चित्र, शिल्प, संगीत इत्यादी कलांचे मूलद्रव्य रंग, रेषा, आकृती, स्वर यांचा मनुष्याला स्वभावत:च प्रत्यक्ष अनुभव येतो. त्यातील सौदर्याचा आस्वाद कलातत्त्वाची जाण असल्याखेरीज घेता येत नाही हे खरे, तरी रंगरूप माणसाला न शिकताही दिसत असते; स्वर ऐकू येत असतात; पण भाषा ही शिकावीच लागते, तिचे संकेत समजून घ्यावे लागतात आणि भाषेची घडण ही सामूहिक व्यवहारातून होत असते. म्हणून भाषेचा समाजाच्या जीवनपद्धतीशी व संस्कृतीशी घनिष्ठ संबंध असतो. वास्तविक पाहता कोणतीच कला पूर्णतया समाजनिरपेक्ष असत नाही. तरीदेखील साहित्यकलेची समाजसापेक्षता कितीतरी पटीने जास्त असते. प्रत्येक कलाकृतीवर तिच्या निर्मात्याच्या व्यक्तित्वाचा ठसा उमटत असतो. इतर कलांच्या क्षेत्रात मुख्यत: तो त्याच्या सौदर्यदृष्टीचा ठसा असतो. साहित्यात मात्र लेखकाच्या सौदर्यदृष्टीबरोबर त्याच्या संस्कारित जीवनदृष्टीचा ठसा उमटल्याखेरीज राहत नाही. साहित्याचा मुख्य विषय बहुधा माणूस हाच असतो. त्यामुळे वाङ्मयात त्याच्या प्रेरणा, विचार, भावना, आकांक्षा यांचे प्रत्ययकारी चित्रण येते. साहित्यात लेखकाच्या दृष्टिकोनामुळेच जिवंतपणा येतो. ललित साहित्यापासून होणारा आनंद हा केवळ आकृतिसौदर्याचा असत नाही. त्याच्या आशयाची अपूर्वता,

मौलिकता व अंत:संगती यांचाही या आल्हाददायकतेत प्रमुख वाटा असतो. किंबहुना आशय आणि आकृतिबंद यांचा एकजीवपणा, अद्वैत हेच कलात्मक साहित्याच्या यशस्वितेचे मुख्य गमक होय. जगातील सर्वश्रेष्ठ साहित्यकृती पाहिल्या, तर केवळ निरामय आनंद देणे एवढेच त्यांचे कार्य नव्हते. मानवी जीवनाचा अर्थ शोधणे व त्याला अर्थपूर्णता आणणे ही प्रेरणादेखील त्यांत अंतर्भूत होती असे दिसून येते. जीवनाचा अर्थ संपूर्णपणे कुणालाच कळलेला नाही. माणसाच्या जीवनसत्याच्या सम्यक आकलनातही अखेरपर्यंत अपूर्णता राहणारच. पण म्हणून त्याची पूर्णतेची ओढ थांबली, त्याचा शोध संपला असे कधी घडणार नाही. या शोधातून त्याला जे कडूगोड, भलेबुरे अनुभव येतील त्यांना कलात्मक रूप देण्याची साहित्यिकाची स्वाभाविक प्रवृत्ती असते. त्यामुळेच ललितसाहित्याचा आशयही रसिकाचे लक्ष वेधून घेतल्याखेरीज राहत नाही; आणि आशय म्हटला की त्यात सामाजिकता ओतप्रोत भरून राहिलेली असते.

येथेच आणखी एक गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते. ललितलेखकाला आपल्या साहित्यातून जे व्यक्त करायचे असते ते दीर्घकाळ त्याच्या मनात घोळत असले, तरी त्याचे स्वरूप प्राय: अस्फुट व धूसर असे असते. प्रत्यक्ष लेखनाच्या प्रक्रियेमध्येच त्याला अधिकाधिक स्पष्टता येत जाते, ते सुमूर्त व संपन्न बनते. कलाकृतीच्या द्वारे जे व्यक्त करायचे ते अगोदरच लेखकाच्या मनात पुरतेपणी तयार झालेले असते; आणि लेखनाच्या प्रक्रियेमधून ते यांत्रिकतेने जसेच्या तसे शब्दात उतरते असे कधी घडत नाही. उलट वाङ्मयकृती सिद्ध झाल्यावरच लेखकाला आपल्याला जे सांगायचे होते, चित्रित करायचे होते ते हेच अशी साक्षात मनोमन ओळख पटते. ज्ञानेश्वरांनी शब्दाचा महिमा वर्णन करताना 'अमूर्ताचा विशदु । आरिसा नव्हे ?' असे म्हटले आहे. यावरून एक गोष्ट स्पष्ट होईल की, आशय आणि अभिव्यक्ती ही संकल्पनेच्या पातळीवर वेगळी करता आली, तरी ती प्रत्यक्षात एकमेकांत मिळून गेलेली असतात.

ललित लेखकांच्या निर्माणक्षमतेला मर्यादा का पडतात ? अल्पावकाशातच त्यांच्या कल्पकतेला ओहोटी का लागते ? या प्रश्नाचा आपण उलगडा केला पाहिजे. स्वत:चे अनुभव, चिंतन आणि विद्याव्यासंग याच्या साहाय्याने आपल्याभोवतालच्या सामाजिक वास्तवाची दृढ पकड घेता आल्याखेरीज केवळ कल्पकता व अंत:स्फूर्ती यांच्यावर विसंबून राहून कुणालाही उच्च प्रतीचे कलात्मक साहित्य निर्माण करता येणार नाही. सृष्टीतील घडामोडीचे आणि सामाजिक जीवनातील वेगवेगळ्या प्रवाहांचे सत्यस्वरूप शोधणाऱ्या शास्त्रांचा अगदी प्राथमिक स्वरूपात का होईना, परिचय असल्याखेरीज लेखकाची जीवनदृष्टी वस्तुनिष्ठ व सर्वस्पर्शी होणार नाही. या बाबतीत मराठी साहित्यिक उदासीन आहेत. त्यांचे वास्तवाचे आकलन पुष्कळच तोकडे पडते. मडगावच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष वामन मल्हार जोशी यांनी आपल्या भाषणात या प्रश्नासंबंधी जे मत व्यक्त केले, ते ह्या संदर्भात मला येथे नमूद करावेसे वाटते.

*"आधुनिक कवी लहानसहान शब्दचित्रे फार चांगली काढतात व संसारातील सामान्य अनुभवांमधील सौदर्य उत्तम रीतीने दाखवितात. काही कवीची काव्ये वाचली* असता त्यात प्रेमाची, स्वातंत्र्याची स्तुती गायिलेली दिसते; पण प्रेम म्हणजे काय, स्वातंत्र्य म्हणजे काय इत्यादी गोष्टीचा त्यांनी खोल विचार केलेला नसावा अशी शंका येते. काही कवी संसारातील हरएक दु:ख, संकट, आपत्ती, विसंगती वगैरे पाहून आर्तोद्गार काढतात व ते मनापासून आल्यामुळे ते हृदयस्पर्शी होतात यात शंका नाही. तथापि या कवीना स्नेहभावाने असे सांगावेसे वाटते की, उच्चतम काव्याला केवळ आर्तत्व किंवा भावनाप्राबल्य पुरे होत नाही...खोल व दीर्घकालीन विचार, अंतर्मुख निरीक्षण, अंत:शोधन, आत्मसंयमन, ध्येयनिष्ठा इत्यादी गुणांच्या अभावी केवळ भावनांच्या जोरावर 'Paradise Lost'सारखी काव्ये निर्माण होणे शक्य नव्हते. आधुनिक कवी समाजातील काही प्रकारांकडे पाहून रागावतात, त्यांचे हृदय कळवळून येते. परंतु हे प्रकार का होतात, ते नष्ट करणे कसे व कितपत शक्य आहे वगैरेचा ते फारसा विचार करीत नाहीत. अल्पविचारजन्य भावनाक्षोभावर किंवा आर्तत्वावर विसंबून ते राहतात हे बरे नव्हे." यात काव्यासंबंधी जे म्हटले आहे ते सर्व प्रकारच्या ललित वाङ्मयाला लागू पडल्यासारखे आहे. आज पन्नास वर्षांनंतरही साहित्यक्षेत्रात काही लक्षणीय बदल झालेला नाही. आपल्या साहित्यिकांत व्यासंगाचा अभाव आहे याचे मुख्य कारण त्यांना महत्त्व व आवश्यकता पटलेली नाही. काही लेखक व्यासंगी असले, तरी बदलत्या परिस्थितीचे सतत भान ठेवून सामाजिक जीवनाकडे पाहण्याची आपली दृष्टी पायाशुद्ध व प्रचलित कालमानाशी सुसंगत राखण्याची ते बहुधा खबरदारी घेत नाहीत शिवाय पूर्वसंस्कार आणि हितसंबंध यांच्या दडपणामुळेही सामाजिक जीवनातील विविध प्रवृत्तीचे त्यांना यथार्थ आकलन करून घेता येत नाही ज्ञानेश्वरानी म्हटल्याप्रमाणे 'म्हणौनि ज्ञान ते चि आंधारे । ज्ञानासि करिति' त्यांचे ज्ञानच त्यातील अतर्गत सबलतेमुळे खऱ्या ज्ञानाला झाकून टाकते.

### व्यक्ती आणि समाज

साहित्यविचारातील दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे व्यक्ती आणि समाज यांचा संबंध. ललितसाहित्य हे व्यक्तिनिष्ठ का समाजसापेक्ष हा प्रश्न पुष्कळदा चुकीच्या पद्धतीने मांडला जातो. कलात्मक साहित्याची घडण ही लेखकाच्या व्यक्तित्वाचे रंगरूप घेऊनच होत असते यात शंका नाही. व्यक्ती ही स्वतंत्र असली, तरी एकाकी असत नाही. समाजाचा मूलभूत घटक म्हणूनच ती सर्वत्र वावरत असते. व्यक्ती आणि समाज यांचा संबंध अतूट असतो. त्यांना एकमेकांपासून अलग करणे हा वस्तुस्थितीचा विपर्यास म्हणावा लागेल. समाज हीच काही, त्याचे घटक असलेल्या व्यक्तीच्याहून निराळी अशी स्वतंत्र वस्तू नाही त्याचबरोबर हेही लक्षात घेतले पाहिजे की, सुट्या

सुट्या व्यक्तीची बेरीज किंवा समुदाय म्हणजेही समाज नव्हे. माणसामाणसांच्या वेगवेगळ्या क्षेत्रातील आणि वेगवेगळ्या पातळीवरील संबंधांतून व्यक्ती आणि समाज यांचे अस्तित्व सिद्ध होत असते. मनुष्याच्या व्यक्तित्वाची घडण आणि विकास सामाजिक जीवनातूनच होतो. जोन रॉबिन्सन या प्रख्यात लेखिकेने म्हटल्याप्रमाणे,

*"The group is the locus of knowledge and experience far exceeding that of the individual member. It is in the group that experience is pooled and the generations linked."* ज्ञान व अनुभव हे व्यक्तींपेक्षा कितीतरी पटीने जास्त प्रमाणात समूहात एकवटलेले असतात. पिढ्यान्‌पिढ्यांच्या अनुभवाचे संचित जतन करण्याचे कार्य समूहच करीत असतो; आणि तोच त्यांना सातत्याने जोडणारा दुवा ठरतो. परंपरागत ज्ञानाचा फायदा न मिळता प्रत्येक व्यक्तीला हरएक बाबतीत जर स्वतःच नव्याने ज्ञान संपादावे लागले तर निर्घृण जीवनकलहात तिला टिकून राहणे अशक्य होईल मनुष्य अशा तऱ्हेने समाजावर अवलंबून असला, तरी एखाद्या मोठ्या यंत्राचा भाग निर्जीवपणे त्याच्याशी जोडलेला असतो तशी त्याची स्थिती नसते. संवेदन, विचार, भावना, किंबहुना त्याचे सगळे अंतर्विश्व हे खास त्याचे असत, बरेचसे स्वतंत्र असते. तसे पाहिले तर व्यक्ती हेच समाजातील निर्मितीचे केंद्र असते वैज्ञानिक शोध आणि जगातील सर्वश्रेष्ठ कलाकृती हे व्यक्तीच्या सर्जनशीलतेचे फलित आहे. मात्र प्रतिभावंताला आपल्या सर्जनशीलतेचा जो साक्षात्कार होतो तोदेखील समाजातच. सामाजिकता हे तर मनुष्याचे व्यवच्छेदक लक्षणच आहे. "Man is by nature a civic animal" माणूस हा स्वभावतःच राजकीय-सामाजिक प्रवृत्तीचा प्राणी आहे हे ॲरिस्टॉटलचे वचन सर्वश्रुत आहे. त्याचा आशय विशद करताना कार्ल मार्क्स यांनी त्यात थोडी, पण अर्थपूर्ण भर घातली आहे.

*"Man is in the most literal sense a zoon politikon, not merely a social animal, but an animal which can develop into an individual only in society."* मनुष्य हा राजकीय-सामाजिक जाणिवा असलेला प्राणी आहे हे तर स्पष्टच आहे. पण त्याचे वास्तविक आगळेपण त्याला समाजाशी संपर्क साधूनच आपले व्यक्तित्व घडवता येते यात आहे. व्यक्ती आणि समाज यांचा संबंध हा द्वंद्वात्मक स्वरूपाचा आहे. शिवशक्तीसंबंधाचे विवरण करताना 'जे एकचि नव्हे एकसरे । दोघां दोनीपण नाही पुरे' असे जे ज्ञानेश्वरांनी म्हटले आह ते या बाबतीत लागू पडते. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन व्यक्तीची प्रतिष्ठा आणि सामाजिक बांधिलकी यांचा पुरस्कार करताना ते तारतम्य बाळगावयास हवे, ते बरेचसे साहित्यिक बाळगत नाहीत. ते पुष्कळदा अगदी टोकाची भूमिका घेतात. त्यांपैकी काही समूहवादाने झपाटलेले असतात; तर काही परंपरानिष्ठ रूढिपूजक असतात. त्यांना व्यक्तीच्या प्रतिष्ठेच्या तत्त्वाची विशेष मातब्बरी नसते. स्वयंकेंद्रित व्यक्तिवादी लोकांना सामाजिक बांधिलकीचे

तत्त्व हे अनिष्ट व जाचक वाटते. या बाबतीत साहित्यचिंतकांनी अधिक समतोल, व्यापक व वास्तवलक्षी दृष्टिकोण आत्मसात करण्याची आवश्यकता आहे.

## लेखकाचे स्वातंत्र्य आणि बांधिलकी

अलीकडे वारंवार चर्चिला जाणारा आणखी एक साहित्यविषयक प्रश्न अत्यंत महत्त्वाचा आहे, आणि त्याची बारकाईने छाननी करण्याची आज गरज आहे. स्वातंत्र्य हा शब्द उच्चारल्याबरोबर स्वाभाविकपणेच 'निर्बंधांचा अभाव म्हणजे स्वातंत्र्य' असा निषेधपर अर्थ मनात येतो. शासन, धर्मसंस्था आणि रूढी यांच्या जुलमी निर्बंधांविरुद्ध गेल्या तीन-चार शतकांत जगात तो सर्वत्र झगडा झाला, त्यामुळे स्वातंत्र्याचा हा निषेधपर अर्थच लोकांच्या मनांत विशेषत्वाने स्थिरावला आहे. लेखक, तत्त्वचिंतक, कलावंत यांच्या आविष्कारस्वातंत्र्यावर कोणत्याही बाह्य संघटित शक्तीकडून निर्बंध लादले जाऊ नयेत, याबद्दल कुणाचाही मतभेद असणार नाही. परंतु कलोपासना आणि विचारसाधना यांच्या परिपूर्तीसाठी स्वातंत्र्याची ही निषेधपर कल्पना पुरेशी आहे का ? की स्वातंत्र्याच्या भावरूप आशयावर अधिक भर देण्याची आवश्यकता आहे ? हे प्रश्न आपण प्रथम विचारात घेतले पाहिजेत.

स्वातंत्र्य हे मुळातच साधन-मूल्य आहे, स्वत:सिद्ध अंतिम मूल्य नव्हे बाह्य बंधनामुळे किंवा परतंत्रतेमुळे माणसाच्या नैसर्गिक प्रेरणांच्या परिपूर्तीला व जन्मजात गुणांच्या व शक्तीच्या विकासाला अडथळा येतो साहित्यिकाच्या आत्मविकासाच्या व आत्माविष्काराच्या प्रवृत्तीची कुचंबणा होते. म्हणून अशा निर्बंधांविरुद्ध आणि ते निर्बंध लादणाऱ्या शक्तीविरुद्ध लढा द्यावाच लागतो, परंतु एवढ्याने भागत नाही. बाह्य बंधने झुगारून दिली म्हणजे आपोआप विकास होतो हा समज दिशाभूल करणारा आहे. व्यक्तीच्या आणि समाजाच्या विकासाचे काही नियम असतात. ते जाणून घेऊन तत्परतेने आत्मसात केल्याखेरीज विकास होत नाही. 'नियमन मनुजासाठी, मानव नसे नियमनासाठी' हे सत्य आहे. परंतु नियमन कशासाठी ते सांगताना या वचनात केशवसुतांनी नियमनाची आवश्यकताही प्रतिपादिली आहे. या दृष्टीने पाहता स्वातंत्र्य म्हणजे स्वयंशासन होय. आपल्या विशिष्ट क्षेत्रातील आपल्या स्वत:च्या प्रगतीसाठी हवी असलेली शिस्त आपण आपल्या अंगी बाणवून घेतली पाहिजे. या बाबतीत आपले साहित्यिक पुरेसे प्रयत्नशील असतात असे दिसत नाही. प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ एब्रहॅम एच मस्लो यांच्या मताप्रमाणे विकास हा बहुधा कष्टसाध्यच असतो.

*"We must appreciate that many people choose the worse rather than the better, that growth is often a painful process and may for this reason be shunned, that we are afraid of our own best possibilities in addition to our loving then .... "* विकास हा कष्टप्रद असल्याने तो टाळण्याची

माणसांची प्रवृत्ती असते. आपल्या ठिकाणी असलेल्या शक्यतांचे माणसाला आकर्षण असते, आणि त्यांची भीतीही वाटत असते. मळलेल्या वाटेने जाणे सोपे असते. त्यामुळे त्याच वाटेकडे त्याचे पाय वळतात. स्वातंत्र्य म्हटले की, आपला मार्ग आपण शोधण्याची आणि तो जागरूकतेने अनुसरण्याची जबाबदारी येऊन पडते. माणसाला पुष्कळदा ती नकोशी वाटते. कितीतरी लोक प्रवाहपतित असतात. पण आपण स्वतंत्र आहोत अशा भ्रमात ते वावरतात पूर्वसंस्कार, रूढी, जुनेनवे संकेत यांच्या पाशात ते गुंतलेले असतात संस्काररहित असे कोरे मन असू शकत नाही. परंतु प्रगतीला खीळ घालणारे संस्कार आणि विकासाच्या प्रक्रियेला चालना देऊन त्याचा वेग वाढवणारे संस्कार यांतील फरक उमगला पाहिजे. शिवाय सध्याच्या सुसंघटित सामाजिक जीवनात जाहिरातबाजी, प्रचार, सहेतुक वातावरण-निर्मिती यांच्या द्वारा माणसावर त्याच्या नकळत कितीतरी निर्णय लादले जात असतात, अभावितपणे त्याच्यावर नको ते संस्कार होत असतात. अशा स्थितीत प्रत्येक स्वातंत्र्यप्रेमी व्यक्तीने या प्रच्छन्न परवशतेच्या बाबतीतही सदैव जागरूक राहण्याची किती गरज आहे हे सहज ध्यानात येईल.

या संदर्भात आणखी एका गोष्टीकडे लक्ष वेधावयास हवे. स्वातंत्र्य असले तरी ते उपभोगण्याची क्षमता व संधी नसेल तर त्याचा काहीच उपयोग होत नाही. स्वातंत्र्य हे एक श्रेष्ठ जीवनमूल्य आहे असे म्हटले, तर समाजातील सर्वांना त्याचा लाभ घेता आला पाहिजे ही गोष्ट मान्य करावी लागते. आपल्या देशात असे असंख्य लोक आहेत की ज्यांच्या जीवनात लेखन-भाषण-स्वातंत्र्याला यत्किंचितही वाव नाही. दिवसभर खपून कसेबसे पोट भरण्यातच त्यांची सर्व शक्ती खर्च होते. आपल्या सांस्कृतिक विकास करून घेण्याइतकी उसंतच त्यांना नसते. शिवाय त्याला प्रेरक व पोषक होईल असे वातावरणही त्यांना क्वचितच लाभते. प्रत्यक्ष व्यवहारात त्यांना अनुभव येतच असतात. त्यांच्या या अनुभवांची जात अभिजात मराठी वाङ्मयातून चित्रित होणाऱ्या अनुभवांपेक्षा अगदी वेगळी असते. परंतु ह्या अनुभवांचा संपूर्ण आशय बहुधा त्यांच्या ध्यानातच येत नाही. मग त्यांना त्याला कलात्मक रूप देणे शक्य झाले नाही तर काहीच नवल नाही. अर्थातच ही सारी अनुभव-संपदा वाया जाते. मराठी साहित्याच्या एकारलेपणाचे हे एक प्रमुख कारण आहे

*"अवकाशाच्या ओसाडीत*
*पडसाद मुके जे आजवरी*
*होतिल ते वाचाल सत्वरी"*

केशवसुतांचे हे स्वप्न हवेतच विरून गेले आहे. तसे पाहिले तर हे स्वप्न कुणा राजकीय नेत्याचे किंवा सामाजिक कार्यकर्त्याचे नसून एका जातिवंत साहित्यिकाचे, सौंदर्यलक्षी कलोपासकाचे आहे. जोपर्यंत निरनिराळ्या थरांतील आपल्या लक्षावधी मूक बांधवांना

समर्थपणे लिहिता-बोलता येत नाही, तोपर्यंत साहित्य ही उच्चवर्णियांचीच मिरास राहणार; ते सर्वार्थाने कधीच समृद्ध होणार नाही. त्यासाठी या लोकांचा स्वातंत्र्याचा मूलभूत हक्क, जो आज असून नसल्यासारखा झाला आहे, तो उपभोगण्याची संधी व क्षमता त्यांना मिळवून दिली पाहिजे. याचा अर्थ असा की स्वातंत्र्याला समतेची, संधि-समानतेचे तत्त्वाची जोड दिली पाहिजे. "स्वातंत्र्य, समता व बंधुता ही तीन तत्त्वे वेगवेगळी नाहीत. त्या तिघांचा मिळून एक संच आहे. त्या तिघांची एक त्रिगुणात्मक मूर्ती आहे. ती एकमेकांपासून अलग करण्याचा प्रयत्न केला तर लोकशाहीचा मूळ हेतू नष्ट होऊन जाईल" या डॉ आंबेडकरांच्या उक्तीचा हाच इत्यर्थ आहे. सध्याच्या सामाजिक स्थितीत आमूलाग्र परिवर्तन घडून आल्याखेरीज संधि-समानतेचे तत्त्व पूर्णपणे अमलात येण्याचा तिळमात्र संभव नाही. म्हणून मराठी साहित्याच्या अभिवृद्धीच्या दृष्टीनेही लेखकाची बांधिलकी समाजपरिवर्तनाशी असली पाहिजे. आपल्या साहित्यक्षेत्रात गुणोत्कर्षाच्या व प्रसाराच्या बाबतीत जी एक कोंडी झालेली दिसते, तिचे मुख्य कारण म्हणजे मराठी लेखकांना समाजाच्या गतितत्त्वाचा बोध झालेला नाही. त्यामुळे साहजिकच त्यांना सम्यक जीवनदृष्टी लाभत नाही, आणि म्हणूनच त्यांना समाजपरिवर्तनाची निकडही तीव्रतेने जाणवत नाही.

निरनिराळ्या कालखंडातील साहित्यविचारांचे परिशीलन केले तर त्यावरूनही साहित्य आणि समाजजीवन यांचा संबंध किती दृढ असतो ते स्पष्ट होईल. ज्ञानेश्वर, तुकाराम, मोरोपंत, केशवसुत, मर्ढेकर, सुर्वे, नामदेव ढसाळ यांच्या साहित्यविषयक कल्पना सारख्या नाहीत. त्यांचा काळ वेगळा, त्यांची परिस्थिती वेगळी, त्यांच्या साहित्यनिर्मितीमागील प्रेरणाही वेगवेगळ्या आहेत. तेव्हा अक्षरसाहित्य, साहित्याचे शाश्वत मूल्य, या संकल्पनाही पारखून घेतल्या पाहिजेत. उच्च प्रतीच्या कलात्मक वाङ्‌मयाचा आस्वाद घेताना सहृदय व रसिक वाचक तल्लीन होऊन जातो. त्या तंद्रीत तो स्वत:लाही विसरतो. 'हर्षखेद ते मावळले' अशी त्याची स्थिती होऊन तो कलानंदात निमग्न होतो. परंतु ही त्याची उन्मनी अवस्था फार काळ टिकत नाही. अल्पावकाशातच ती संपुष्टात येऊन तो वास्तवाच्या पातळीवर उतरतो. मग मात्र साहित्यातील कालसापेक्षतेचा अंश त्याचे लक्ष वेधून घेतो. साहित्यातील कालसापेक्ष व कालातीत आशय यात तम:प्रकाशवत विरोध आहे ही समजूत निराधार आहे. सृष्टीतील क्षर आणि अक्षर तत्त्वांप्रमाणे साहित्यातील तात्कालिक व चिरंतन, क्षणिक व शाश्वत हे एकमेकात मिसळलेले असतात. तसे पाहिले तर असंख्य क्षणांच्या परिवर्तनशील प्रवाहात शाश्वत दडलेले असते. जे क्षणिक असते, तात्कालिक असते, त्याची दृढ पकड घेता आली, तरच शाश्वताचा मागोवा घेता येतो. क्षणाक्षणाचे अनुभव त्यांना आधारभूत असणाऱ्या जीवनाच्या प्रवाहापासून बाजूला काढले तर क्षणिक आणि शाश्वत हे दोन्ही रिते व अर्थशून्य होऊन जातील. शाश्वत मूल्य असलेल्या श्रेष्ठ साहित्याचा निर्माता उत्कट व

उत्तुंग मनोवस्थेचे क्षण पकडूनच आपल्या प्रतिभासामर्थ्याने त्यातून एक सुश्लिष्ट कलाकृती तयार करत असतो. तिच्यापासून मिळणारा आनंद हा तिचे अंतरंग व बाह्यांग, तिच्यातील तात्कालिक व चिरंतन या सर्वांच्या मनोज्ञ मिलाफातून झालेला आनंद असतो. इतकेच नव्हे तर जे पुन्हा पुन्हा वाचावेसे वाटते अशा अक्षरवाङ्मयाचा रसिकाच्या मनावर जो कायमचा ठसा उमटतो, तो बहुतांशी आशयनिष्ठच असतो.

## विचारप्रवर्तक वाङ्मय

आपल्या भाषेत विचारप्रवर्तक वाङ्मय विपुलतेने उपलब्ध असेल आणि समाजात विचारमंथनाला पोषक वातावरण असेल, तर त्याचा ललित लेखकाच्या प्रतिभेवर योग्य तो संस्कार होऊन तिचा पद्धतशीर व सातत्याने विकास होऊ शकतो. स्वत: ललितलेखक अनेकविध शास्त्रांत तज्ज्ञ असणे शक्य नाही, व त्याच्यापासून तशी अपेक्षा करणेही बरोबर नाही. परंतु सामाजिक वास्तवाचे विश्लेषण करण्यासाठी आवश्यक तितका त्याचा या शास्त्रांशी परिचय असला पाहिजे. गेल्या चारशे वर्षांत पाश्चात्त्य देशांत विद्यावंतांनी तत्त्वज्ञानाच्या आणि विज्ञानाच्या क्षेत्रांत जी गरुडझेप घेतली, जे प्रबोधनपर साहित्य निर्माण केले, तेथे वेगवेगळ्या विचार-संप्रदायांत जे संघर्ष झाले, त्यांचे अवलोकन आपण केले, तर त्या मानाने आपल्या वैचारिक साहित्याचा जुजबीपणा तीव्रतेने जाणवतो. स्वातंत्र्य मिळून तीस वर्षे झाली तरी आपल्या देशातील ज्ञानोपासकांची व विचारवंताची परभृतता अजूनही गेलेली नाही. एवढ्या मोठ्या खंडप्राय देशात ज्या घडामोडी चालू आहेत, त्यातून जे गुंतागुंतीचे प्रश्न आपल्यापुढे उभे ठाकले आहेत, त्यांचे सत्यस्वरूप विशद करण्याची, त्यांची उकल करण्याचे मार्ग शोधण्याची जबाबदारी वास्तविक आपल्या बुद्धिमंतांनी पार पाडावयास हवी. धर्म, तत्त्वज्ञान, इतिहास, राजकारण इत्यादी क्षेत्रात मूलगामी संशोधनाची गरज आहे. आपल्या जुन्या सामाजिक संस्थांचे ऐतिहासिक दृष्टीने फारसे संशोधन झालेले नाही. आपल्या ज्ञानोपासकांना बहुधा महाराष्ट्रापेक्षा युरोपची अधिक तपशीलवार माहिती असते. येथील वास्तवाला भिडणारे स्वतंत्र वृत्तीचे विचारवंत अगदीच थोडे आहेत. पाश्चात्य देशांतील अद्ययावत ज्ञान, विशेषत: त्यांची चिकित्सापद्धती आपण स्वीकारली पाहिजे. पूर्वी आपल्या ज्ञानोपासनेत शब्दप्रामाण्याचे प्रस्थ होते. आता आधुनिक वळणाची नवी पोथीनिष्ठा रूढ होऊ पाहत आहे. पाश्चात्य देशातील वेगवेगळ्या विचारसंप्रदायांचे आणि त्यांच्या प्रमाणग्रंथांचे अवास्तव दडपण झुगारून देण्याची अजूनही आपल्या अभ्यासकांची तयारी नाही. त्यामुळे इंग्रजी भाषेतील वैचारिक साहित्यावर सर्वस्वी विसंबून राहण्याची आपल्यातील उच्चभ्रू बुद्धिमंतांना सवय जडली आहे. इंग्रजी ग्रंथांचा व्यासंग, इंग्रजीतून विचार करण्याचा नेहमीचा परिपाठ यामुळे आपल्या विद्यावंतांची मराठी भाषाही इंग्रजी वळणाची बनली आहे. दिवसानुदिवस येथील जनजीवनापासून या वर्गातील लोक अधिकाधिक दूर जात

आहेत. तसे म्हणावे तर येथे ज्ञानाच्या वेगवेगळ्या प्रांतात उच्च पातळीवर मूलभूत तात्त्विक व औपपत्तिक विचार पुढे गेला आहे असे दिसत नाही. 'ज्ञान हीच शक्ती आहे,' या सूत्रवचनाचा वारंवार उद्घोष चालू आहे; पण प्रत्यक्ष सामाजिक जीवनात त्यात कुठेही प्रत्यय येत नाही.

कोशवाङ्मयाच्या बाबतीत मात्र मराठी भाषापंडितांनी आजतागायत बजावलेली कामगिरी निःसंशय अभिमानास्पद अशी आहे. महाराष्ट्रातील व्यासंगी विद्यावंतांनी दूरगामी दृष्टीने स्वतः झीज सोसून मराठी ग्रंथभांडारात ज्ञानकोश, व्यावहारिक ज्ञानकोश, सुलभ विश्वकोश, चरित्रकोश, व्यायाम-कोश, संस्कृतिकोश, तत्त्वज्ञान-महाकोश, वाङ्मयकोश, मराठी ग्रंथसूची, मराठी नियतकालिकांची सूची यासारख्या संदर्भग्रंथांची बहुमोल भर घातलेली आहे. विविध स्वरूपांच्या या साधनग्रंथांमुळे लोकशिक्षण करू इच्छिणाऱ्या कार्यकर्त्यांची मोठी सोय झाली आहे. हे ज्ञान जर शेकडो लहानलहान पुस्तिकांच्या द्वारे सुबोध व चित्तवेधक पद्धतीने खेड्यापाड्यांतील अगदी तळच्या थरांपर्यंत पोचवले नाही, तर या निष्ठावंत ज्ञानोपासकांची तपस्या वाया गेली असेच म्हणावे लागेल. एकीकडे आपल्या देशात नवा इतिहास घडतो आहे, जुन्यानव्या प्रेरणांच्या व प्रवृत्तीच्या संघर्षातून व समन्वयातून सर्वसामान्य लोकांची जीवनही ढवळून निघत आहे, तर दुसरीकडे वरिष्ठ नेत्यांपासून सामान्य कार्यकर्त्यांपर्यंत सर्वच द्विङ्मूढ झाले आहेत; प्रवाहपतित बनले आहेत. प्रबोधनाचे कार्य तर जवळजवळ थांबल्यागतच आहे. समाजपरिवर्तनाच्या प्रक्रियेतील मोक्याच्या वळणावर ज्ञानप्रसाराला आणि विचार-जागृतीला इतके खालचे स्थान असावे ही खरोखरीच खेदाची गोष्ट आहे. आपण लोकशाही जीवनपद्धती स्वीकारली आहे. त्यासाठी आवश्यक असलेले लोकशिक्षण करण्याची सुसंघटित व प्रभावी यंत्रणा आपल्यापाशी नसेल तर जनतेत योग्य निवड करण्याची व सत्ताधीशांवर अंकुश ठेवण्याची क्षमता कुठून येणार ? आणि मग लोकशाही तरी यशस्वी कशी होणार ?

## विज्ञानप्रसारक वाङ्मय

आपण नेहमीच सध्याचे युग हे विज्ञानयुग आहे असे म्हणतो. विज्ञान हा आजकाल परवलीचा शब्द झाला आहे. विज्ञानशक्तीचा ज्याला आपल्या नित्याच्या जीवनात थोडाबहुत प्रत्यय आलेला नाही असा माणूस अगदी मागासलेल्या भागातही आता सापडणार नाही. तरीसुद्धा अंधश्रद्धा, धर्मभोळेपणा, रूढिदास्य, चमत्कारांची ओढ, बुवाबाजी इत्यादी गोष्टींचे प्राबल्य समाजात सर्वत्र वाढत्या प्रमाणात दिसून येते. ग्रामीण परिसरातील अशिक्षित जनताच नव्हे तर पुढारलेल्या शहरी सुशिक्षितही या गोष्टींच्या प्रभावाखाली खेचले जात आहेत. याची नुसती कारणमीमांसा करून भागणार नाही, तर हे कसे सुधारता येईल याचाही शोध घेतला पाहिजे. प्रथमतः विज्ञानशक्ती

आणि विज्ञानदृष्टी, तसेच विज्ञान आणि तंत्रविद्या यातील फरक आपण सर्वांच्या निदर्शनास आणून दिला पाहिजे; त्याखेरीज खऱ्या विज्ञाननिष्ठेचे संस्कार येथील जनमानसावर होणार नाहीत. कित्येकदा तर विज्ञानाचे जे अभ्यासक आणि अध्यापक तेच मुळी विज्ञानदृष्टीला पारखे झालेले असतात. त्यामुळे वैज्ञानिक दृष्टिकोन म्हणजे नेमके काय यासंबंधी सर्वसामान्य लोकांच्या मनात जास्तच गोंधळ माजतो.

समाजात विज्ञानाचा प्रसार करण्यासाठी अलीकडे मराठी विज्ञान परिषद, मराठी विज्ञान महासंघ, कणाद विज्ञानप्रतिष्ठान अशा काही संस्था स्थापन झालेल्या आहेत. व्याख्याने, चर्चासत्रे, मेळावे, संमेलने, प्रकाशने यांच्या द्वारे त्यांनी आपले कार्य धिमेपणाने चालू ठेवले आहे सृष्टिज्ञान, विज्ञानयुग यांसारखी नियतकालिके तर विज्ञानप्रसारालाच वाहिलेली आहेत. काळाची गरज ओळखून या सर्वांनी हाती घेतलेले हे कार्य खचितच प्रशंसनीय आहे. परंतु त्याला मोठ्या प्रमाणावर चालना मिळावी म्हणून महाराष्ट्रातील शिक्षणसंस्था, साहित्यसंस्था, प्रकाशनसंस्था, वृत्तसंस्था यांनी संघटितपणे अधिक प्रयत्नशील होण्याची आज खरी आवश्यकता आहे. अनेकविध विज्ञानशाखांची लोकांना अद्ययावत माहिती करून देण्याचे काम नि:संशय महत्त्वाचे आहे. जगातील वैज्ञानिक प्रगतीचा व तंत्रज्ञानाचा आपल्या लोकांना जितका परिचय होईल तितका हवाच आहे. पण त्याबरोबरच लोकांच्या मनावर विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन कसा बिंबवता येईल याकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. त्यांच्या नित्याच्या जीवनातील प्रसंगांना धरून यासाठी प्रयत्न केल्यास ते अधिक फलदायी होतील. शिवाय निसर्गविज्ञानाइतकेच समाजविज्ञानाचे महत्त्वही लोकांना पटवून देणे अगत्याचे आहे. पुष्कळ लोकांची अशी समजूत असते की, विज्ञाननिष्ठ दृष्टिकोन हा फक्त अनेकविध विज्ञानशाखांतील विषयांशीच निगडित असतो परंतु ती चुकीची आहे. धर्म, इतिहास, साहित्य, अर्थव्यवहार, सामाजिक संस्था, राजकीय घडामोडी या सर्वांचे परिशीलन विज्ञाननिष्ठ दृष्टीने केले पाहिजे. इतकेच नव्हे, तर विज्ञानप्रसाराला विघातक ठरणाऱ्या अंधश्रद्धांविरुद्ध वेळप्रसंगी झगडण्याचीही तयारी ठेवली पाहिजे. विज्ञानोपासकांकडून या बाबतीत पुरेसे प्रयत्न झालेले नाहीत. वैज्ञानिक परिभाषेचा बाऊ करून लोकशिक्षणाच्या कार्याची उपेक्षा करणे श्रेयस्कर नाही. डॉ. जयंत नारळीकर यांनी आपल्या लेखनातून व भाषणांतून या विषयासंबंधी जे विचार व्यक्त केले आहेत ते वाचून विज्ञानाच्या अभ्यासकांना आपल्या सामाजिक कर्तव्याची ओळख पटेल असे माझे मत आहे "विज्ञान प्रसार मातृभाषेतून झाला तरच प्रभावी ठरेल असे माझे मत आहे. विज्ञान म्हणजे काहीतरी अनाकलनीय गोष्ट आहे ही भावना जनमनातून दूर करायला त्या जनमनात होणारे विचार ज्या भाषेत होतात ती भाषा वापरणे आवश्यक आहे. म्हणून महाराष्ट्रात ह्या दृष्टीने मराठीतून लोकाभिमुख विज्ञान-साहित्य निर्माण झाले पाहिजे. असे साहित्य तयार करायला आपल्याला परदेशांतील अनुभवांचा निश्चितच फायदा

होईल. पण परदेशी साहित्य निव्वळ भाषांतर करून चालणार नाही. त्याला भारतीय-त्यातूनही स्थानिक स्वरूप देणे आवश्यक आहे.'' डॉ. जयंत नारळीकर यांनी आपल्या 'यक्षांची देणगी' या कथासंग्रहाच्या प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे आइन्स्टाइन, एडिंगटन, जेम्स जीन्स यांच्यासारखे जगद्‌विख्यात शास्त्रज्ञही आपले ज्ञान सोप्या भाषेत जनसामान्यांपर्यंत पोचवण्याचा प्रयत्न करतात. मग महाराष्ट्रातील विज्ञानोपासकांना हे काम करण्याची इच्छा का होऊ नये ?

## ग्रामीण साहित्य

मराठी वाङ्‌मयाच्या भवितव्याचा विचार करताना गेली दोन वर्षे ग्रामीण साहित्यसंमेलन कोणत्या उद्देशाने भरवले जाते ते पाहिले पाहिजे. मागील दहा-पंधरा वर्षांत ग्रामीण लेखकांची एक नवी पिढी उदयाला आलेली दिसते. 'ग्रामीण' ही संज्ञा केवळ स्थलवाचक अर्थाने न घेता तिच्याच शहरात राहूनही अत्यंत विपन्नावस्थेत दिवस कंठणाऱ्या कष्टकरी वर्गाचाही समावेश करावयास हवा. कारण खेड्यातील तसेच शहरातील समाजही दुभंगलेला आहे. खेड्यातील नवोदित सधन वर्गाचे शहरातील प्रस्थापित वर्गाशी जवळचे नाते आहे. तसेच शहरात, झोपडपट्टीत राहणाऱ्या लोकांची अवस्था मोलमजुरी करणाऱ्या ग्रामीण लोकांच्याप्रमाणेच हलाखीची आहे ग्रामीण साहित्य संमेलनाच्या संयोजकांनी काढलेल्या पत्रकातही अशीच व्यापक दृष्टी ठेवलेली आहे.

"आपल्या महाराष्ट्रीय समाजातील बहुतेक महत्त्वाची वार्षिके, मासिके, साप्ताहिके, दैनिके इत्यादी विविध नियतकालिके आणि प्रकाशनसंस्थाही मोठमोठ्या शहरांमधूनच निघत असतात. या नियतकालिकांच्या आणि प्रकाशनसंस्थांच्या समोरही प्रामुख्याने शहरी वाचकवर्ग असतो. त्यामुळे शहरी वाचकवर्गाला योग्य असेच वैचारिक, सामाजिक व ललितलेखन बव्हंशी त्यांच्याकडून प्रसिद्ध केले जाते. याचा अंतिम परिणाम ग्रामीण समाजाचे प्रश्न, विचार, जागृती, चळवळी, टीकालेखन व ललितलेखन यांच्याकडे दुर्लक्ष करण्यात होतो. त्यामुळे नव्याने जागृत झालेल्या ग्रामीण लेखकाला आपले विचार व्यक्त करावयाला, प्रश्न मांडावयाला व ललितलेखन प्रसिद्ध करावयला अजूनही महाराष्ट्रात मुक्त व्यासपीठ मिळू शकलेले नाही

शहरामधील दुर्बल समाजाच्या व्यथा आणि आकाक्षा चित्रित करणारा एक नवा लेखकवर्गही पुढे येऊ लागला आहे. त्याचे नाते ग्रामीण लेखकाशी मिळते-जुळते असे आहे. या दोन्ही प्रकारच्या लेखकवर्गाचे प्रश्न सारखेच आहेत. या नव्या लेखकवर्गालाही अशा व्यासपीठाची आज गरज भासत आहे.''

तसे पाहिले तर सन १९३० पासून बहुजनसमाजातून मराठी साहित्यिकांचा एक वर्ग उदयास आला होता. तेव्हाही सांस्कृतिक जीवनाचे नेतृत्व उच्चवर्णियांकडेच होते. परंतु राजकीय चळवळीचे क्षेत्र उत्तरोत्तर विस्तारत होते, आणि आज ना उद्या

येथील राजकारणाची सूत्रे बहुजनसमाजातील पुढाऱ्यांच्या हाती जाणार याबद्दल कुणालाच शंका नव्हती. शिवाय नव्याने पुढे येऊ पाहणारे बरेचसे लेखक हे बहुजनसमाजाच्या वरच्या थरातील होते. त्यांना जुन्या परंपरेतील काही गोष्टी बोचत होत्या, तरी ग्रामीण समाजाच्या अगदी तळच्या थरांतील लोकांशी ते खऱ्या अर्थाने समरस झाले होते असे आढळत नाही. त्यांचे लेखन जुन्या वळणाचेच होते आणि प्रस्थापित साहित्याच्या प्रवाहात ते सहजपणे सामावले गेले.

आता नव्याने पुढे येणारा एक लेखकवर्ग हा समाजाच्या अगदी खालच्या थरातून येतो आहे. त्याचे अनुभवविश्व अगदी वेगळे आहे. तरीसुद्धा त्याच्यापुढे प्रस्थापित वाङ्मयातील यशस्वी लेखकाचाच आदर्श असतो. प्रारंभी तरी त्यांचे प्रस्थापित अनुकरण करीतच तो लेखनास सुरवात करतो. याच वाङ्मयाचे संस्कार त्याच्यावर सदोदित होत राहतात. परंतु त्याच्या भोवतालचे दाहक व प्रक्षोभजनक वास्तव आणि आपल्या मध्यमवर्गीय साहित्यातील ग्रामीण जीवनाचे निर्जीव व अतिरंजित चित्रण यांतील विसंवाद त्याला खटकू लागतो. हे साहित्य त्याला परके व असमाधानकारक वाटू लागते. या बाबतीत शहरी कामगारवस्तीत वाढलेले नारायण सुर्वे आणि खेड्यातील अत्यंत गरिबीच्या परिस्थितीतून पुढे आलेले गजमल माळी या दोघा साहित्यिकांची साक्ष पुरेशी आहे.

"ह्या काळात मर्ढेकर, कुसुमाग्रज, मुक्तिबोध व विंदा करंदीकर हे कवी मला जवळचे वाटायचे. ह्या कवीचा सूर कुठेतरी माझ्या मनाशी जुळतो आहे असे सतत वाटत राहायचे. त्यांची स्पष्ट अभिव्यक्ती मला आवडे. मर्ढेकर तर रोकडेच बोलत. तरीही हे कवी मला समाधान देत नसत. ते जे लिहायचे अथवा वर्णन करायचे तेवढेच सत्य नव्हते. त्यांचे जग वेगळे असे न्या जगातील माणसांच्या भावना वेगळ्या असत. ह्याही पलीकडे एक अफाट जग उभे होते. ज्या जगात मी उभा होतो, त्या जगाविषयी ते बोलत, पण ते अंत:करणाला भिडत नव्हते आणि मग मी विषण्ण होई."

*"मला नाही भेटली*
*माझ्या बापाची ही असहाय्य तीव्र वेदना*
*मराठी कवितेच्या वाहत्या प्रवाहातून*
*मला नाही भेटलं*
*"माझ्या आईचं दु:ख सबंध सारस्वताच्या बागांतून.*
*मला नाही भेटलं कोणीही रानात राबणारं.*
*नाही फिरवलेत आपले मखमली हात*
*या मराठी कवितेनं*
*वाळलेल्या रक्तहीन देहांवरून !"*

यातला पहिला उतारा नारायण सुर्वे यांच्या 'जाहीरनामा' या पुस्तकातील आहे, आणि दुसरे अवतरण 'नागफणा आणि सूर्य' या गजमळ माळी यांच्या प्रदीर्घ कवितेतील आहे. अशा या असमाधानातून तळच्या थरातील लेखकांच्या वाटचालीचे पुढचे स्वरूप ठरत जाते. अभिव्यक्तीचे नवे नवे प्रकार त्यांना शोधावे लागतात. अर्थातच सर्वांना आपल्या नैसर्गिक प्रतिभेचा पूर्ण विकास करून घेता येतो असे नाही. प्रतिकूल परिस्थितीमुळे विद्याव्यासंगाची आणि विचारविनिमयाची संधीच पुष्कळांना मिळत नाही. त्यांची प्रतिभा फुलण्यापूर्वीच कोमेजून जाते. ग्रामीण परिसरातील लेखकाच्या आत्मविकासाच्या मार्गात अनेक अडचणी येतात. शिवाय प्रचलित शिक्षणपद्धतीमुळे विशिष्ट विचारसरणी, संस्कार, भाषा यांचे त्यांच्यावर दडपण पडते. कळत नकळत त्याचे पांढरपेशीकरण होऊ लागते. स्थितिप्रिय समाजात त्याला समानधर्मी सोबती भेटत नाहीत. गतानुगतिकतेमुळे लोकांकडूनही त्याला प्रतिसाद मिळत नाही. अशा तऱ्हेने एकाकी पडलेल्या लेखकाला स्वतःच्या अनुभूतीशी व जीवननिष्ठेशी इमान राखणे फार कठीण जाते. जरा कुठे त्याला आत्मविश्वास वाटू लागतो, तोच त्याच्यापुढे अनेकविध प्रलोभने उभी ठाकतात. त्यांना तो बळी पडण्याचा धोका संभवतो. ग्रामीण भागातील लेखकाला त्याच्याच जगातील नवा सहृदय व डोळस वाचकवर्ग लाभल्याखेरीज त्याचे वाङ्मय कसदार व समृद्ध होणार नाही. सध्या तरी या लेखकाची व वाचकाची बौद्धिक उपासमारच होत आहे. त्यांचे शिक्षण व संस्कारण यासाठी जितके संघटित प्रयत्न व्हावयास हवेत तितके होताना कुठे दिसत नाहीत कै. कृ. भा. बाबर यांच्या प्रेरणेने जवळजवळ गेली तीस वर्षे 'समाज शिक्षण माला' डॉ. सरोजनी बाबर यांच्या संपादकत्वाखाली दर महिन्याला नियमितपणे निघत आहे. या मालेत आतापर्यंत तीनशे पन्नास पुस्तिका प्रसिद्ध झाल्या आहेत. ही माला सुरू झाली त्या वेळच्या परिस्थितीत आता पुष्कळच फरक पडला आहे. त्या दृष्टीने विषयांची निवड आणि मांडणी यात बराचसा बदल करावा लागेल. पण या मालेतील लोकशिक्षणाची तळमळ व उभारी आणि ती चालू ठेवण्यात दिसून येणारी व्रतभावना ही खरोखर गौरवास्पद आहेत.

### दलित साहित्य

दलित साहित्याच्या चळवळीवर गेली दहा-बारा वर्षे बरेच बोलले जात आहे, उलटसुलट प्रतिक्रिया व्यक्त होत आहेत. सर्वांचे लक्ष वेधून घेणारी जणू एक जोरदार लाटच दलित साहित्याच्या रूपाने मराठी वाडमयात आलेली आहे. डॉ. आंबेडकरांच्या चळवळीमुळे दलित समाज खडबडून जागा झाला. पिढ्यान्‌पिढ्या हिरावून घेण्यात आलेल्या स्वतःच्या नैसर्गिक मानवी अधिकारांची त्याला जाणीव झाली. अस्पृश्यता आणि सामाजिक विषमता ही ईश्वरदत्त किंवा निसर्गनिर्मित नसून ती मनुष्यकृत आहेत हे दलितांना कळून चुकले, आणि संघटितपणे झगडून, आपल्यावर होणाऱ्या या

अन्यायाला व जुलमाला मूठमाती देण्याची त्यांनी उमेद बाळगली. स्वातंत्र्योत्तर काळात जन्मलेल्या दलित तरुणांना शैक्षणिक सवलतीमुळे आधुनिक शिक्षणाचा लाभ झाला. बाहेरच्या शहरी जगाशी त्यांचा संपर्क आला. सामाजिक न्याय, स्वातंत्र्य व समता या सर्वश्रेष्ठ मूल्यांचे महत्त्व त्यांना उमगले. आपला देश स्वतंत्र झाला तरी अजूनही दलितांचे दैन्यदुःख संपले नाही; पिढ्यान्‌पिढ्या होत आलेले त्यांचे शोषण थांबले नाही. राजकीय सुधारणांच्या संदर्भात लोकमान्य टिळकांनी 'उजाडले, पण सूर्य कोठे आहे ?' असा प्रश्न विचारला होता. स्वातंत्र्योत्तर काळातील भोवतालची परिस्थिती पाहताना या नवजागृत संवेदनशील दलित तरुणांनाही हाच प्रश्न सतावत आहे. स्वातंत्र्याचा प्रकाश आपल्या गरीब अस्पृश्य बांधवांच्या झोपडीत का जाऊन पोचला नाही ? त्यांचे सारे जग आजतागायत अंधारानेच ग्रासलेले आहे.

*"उठा तुमच्या जगावर सूर्य उगवला आहे*
*त्यांना कोणी जागे केले*
*आणि ते डोळे चोळीत उठले*
*पाहू लागले उगवता सूर्य*
*ते आश्चर्यचकित झाले*
*त्यांना दिसत होता फक्त अंधार*
*पूर्वीइतकाच भयानक."*

हा उद्‌गार दलित साहित्यिकांच्या भ्रमनिरासाचा द्योतक आहे. डॉ. आंबेडकरांचे व्यक्तित्व, विचार आणि कार्य यांनी प्रभावित होऊन त्यानी आपल्यातील न्यूनगंड, दुबळेपणा व लाचारी झटकून टाकली आणि ते संघर्षाच्या पावित्र्यात उभे राहिले. त्यांच्या या नव्या जाणिवांचे व युयुत्सू वृत्तीचे पडसाद त्यांच्या साहित्यात जागोजाग उमटले आहेत.

*"नरकाच्या कोडवाड्यात*
*किती दिवस राहायचं आम्ही ?*
*श्वास घुसमटत !*
*मुक्त छंदाच्या संजीवनीने*
*आम्ही जिवंत झालो आहोत—*
*—तुमच्या पापाचे छिनाल घट फोडण्यासाठी !*
*—शब्द म्हणाले*
*अंधाराने सूर्य पाहिला तेव्हा."*

या दलित कवीच्या उक्तीतून त्याच्यातील नवजागृतीचे व नव्या जाणिवांचे दर्शन घडते.

सामाजिक जीवनाच्या हरएक क्षेत्रात आमूलाग्र परिवर्तन घडून येण्याची सर्वांत

जास्त गरज दलितांना आहे. धार्मिक, सामाजिक, आर्थिक व राजकीय अशा सर्वंकष क्रांतीची त्यांनाच खरी निकड आहे. शेकडो वर्षे त्यांच्यावर लादल्या गेलेल्या अस्पृश्यतेविरुद्ध, त्यांच्या मनुष्यत्वाची विटंबना करणाऱ्या परंपरेविरुद्ध त्यांच्या मनात विद्रोहाची भावना उद्‌भवली असली, तर ते स्वाभाविकच आहे. मात्र बाहेरच्या जगातील प्रतिगामी शक्तीविरुद्ध लढा देत असतानाच आपल्या स्वत:च्या अंत:करणातील पूर्वसंस्काराविरुद्धही दलित साहित्यिकांना झगडावे लागत आहे. कोणताही क्रांतिकारक संघर्ष हा तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे 'रात्री-दिवस आम्हां युद्धाचा प्रसंग । अंतर्बाह्य जग आणि मन' असा दुहेरी स्वरूपाचा असतो. आपल्या स्वत·च्याच तीक्ष्णतर नखांनी आपले हृदय फाडून मी त्याचे चिवट दोर काढले आहेत, आणि—

*''गाठ मारुनी वैराची*
*गोफण केली छान*
*कठिण शब्द या धोंड्यांनी*
*करितो हाणाहाण ।''*

केशवसुतांच्या कवितेतील या वैराचीच सध्याच्या बदललेल्या परिस्थितीत दलित साहित्यातील विद्रोहात परिणती झाली आहे कालामानानुसार ह्या विद्रोहाचा आशय काहीसा वेगळा आहे हे तर खरेच. परतु शब्द हे शस्त्र म्हणून वापरणाऱ्या संघर्षप्रवण मराठी साहित्यिकांच्या वाङ्‌मयाशी त्याचे जवळचे नाते आहे. केशवसुतांच्या वाणीतील त्वेष आणि बंडखोरपणा याचे दलित साहित्यिकाना अतीव आकर्षण आहे म्हणूनच त्यांना ते अतिविद्रोही कवी मानतात.

*''आणि प्रथापुत्रांच्या लाथेखालील प्रजेसाठी*
*एकाकी जळत प्रतिमा जाळत राहिलास*
*त्या तुझ्या **विद्रोहाच्या** तळ्यावर*
*आमच्या नतमस्तकांची नम्रता नोदवून*
*तुझ्या स्वप्नांचे शिल्प आम्ही कोरू लागलो आहोत ''*

केशवसुतांची स्वप्ने सत्यसृष्टीत उतरवण्यासाठी आम्ही धडपडतो आहोत, ह्या दलित कवीचा दावा त्याच्या विशुद्ध क्रांतिकारक दृष्टीचाच निदर्शक आहे

दलित साहित्याने आपल्या विद्रोहाच्या स्फोटकतेतील सुप्त सामर्थ्य ओळखले आहे. या साहित्यात नवा प्रक्षोभक आशय आहे, आणि त्याची तितकीच जोरदार अभिव्यक्ती आहे. शतकानुशतके अलक्षित व उपेक्षित राहिलेल्या आपल्या विदारक अनुभवविश्वाचा आविष्कार त्यांनी प्रभावीपणे मराठी साहित्याला आणला आहे. दलित साहित्याच्या सध्याच्या स्थितीत समाजपरिवर्तनाला उपकारक ठरणारी निषेधपरता व

नकारप्रवृत्ती यांना प्राधान्य मिळाले तर ते स्वाभाविकच आहे. कारण कोणत्याही क्रांतिकारक साहित्याचा तो आवश्यक भाग असतो. जुन्या कालबाह्य झालेल्या परंपरेवर प्रहार केल्याखेरीज, तिच्यातील जीर्णांश निपटून काढल्याखेरीज परिवर्तन होत नाही. परंतु सामाजिक क्रांतीचे दुसरेही एक विधायक अंग असते. त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. जुने कष्ट करीत असतानाच त्याच्या जागी नवे कसे निर्माण करायचे याचाही विचार करावा लागतो. शिवाय नवे म्हटले तरी ते काही स्वयंभूपणे शून्यातून अस्तित्वात येत नाही. वास्तवाच्या आधारेच त्याची उभारणी होऊ शकते. जुन्याची पाळेमुळे वास्तवात इतकी खोलवर गेलेली असतात की, जुने नष्ट करताना वास्तवाची पुनर्घटना करण्याचा प्रश्न उपस्थित होतो. जुने कधीच एकदम नष्ट होत नाही; इतकेच नव्हे तर परिवर्तनाच्या प्रक्रियेमधून जुन्यातील सत्त्वांश नव्या चौकटीत, नव्या व्यवस्थेत अंतर्भूत होतो. जुन्यातील काही अंश जेव्हा नव्या व्यवस्थेचा घटक बनतो, तेव्हा त्याचे जुनेपण संपलेले असते. त्याचे स्वरूप बदलते; त्याला नवा अर्थ प्राप्त होतो. जीवनाच्या प्रत्यक्ष परिवर्तनामध्ये अशा प्रकारे सातत्य असतेच. 'जुने जाऊं द्या मरणालागुनि' असे बजावणारे केशवसुतच 'जुन्यांतून जी निष्पत्ति नवी, काय नव्हे ती श्रेयस्कारक ?' असे का म्हणतात ते समजून घ्यावयास हवे. हा केवळ भावनेचा प्रश्न नाही. भावनोत्कटतेची, प्रक्षोभाची तर गरज आहेच. परंतु त्याबरोबर सामाजिक परिवर्तनाचे स्वरूप व प्रक्रियाही जाणून घ्यावयास हवी. त्यासाठी केवळ भारतीय समाजाच्या स्थितिगतीचेच नव्हे, तर जगात इतरत्र झालेल्या मुक्तिसंग्रामांचे व क्रांतीकारक आंदोलनांचे परिशीलन केले पाहिजे.

दलित साहित्याचा हा प्रारंभकाल आहे. त्याचा उत्तरोत्तर विकास होत जावा, ते अधिकाधिक कसदार व कलात्मक व्हावे म्हणून या नवोदित लेखकांना एक सूचना करावीशी वाटते. दलित साहित्याच्या मु[illegible]शी जी बंडखोरपणाची प्रेरणा आहे ते त्याचे प्राणतत्त्वच आहे. पण फक्त तेवढ्यावर विसंबून राहणे हितावह होणार नाही. तत्त्वचिंतन, विद्याव्यासंग, तंत्रसाधना, भाषाप्रभुत्व या गोष्टींचीही दलि[illegible] वाङ्मयाच्या प्रगतीला आवश्यकता आहे. त्यांच्याकडे दुर्लक्ष करण्यात हशील नाही. आपले साहित्य ही एका मोठ्या व्यापक चळवळीची आघाडी आहे याचा दलित साहित्यिकांनी क्षणभरही स्वतःला विसर पडू देता कामा नये. त्याची वाढ खुंटू नये, त्याचा प्रभाव कमी होऊ नये म्हणून त्यांनी सदैव जागरूक राहिले पाहिजे

दलित साहित्याच्या संदर्भातच येथे मराठवाडा [illegible]पीठाच्या नामांतराच्या प्रश्नाचा उल्लेख करणे उचित ठरेल या विद्यापीठाला 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, असे नाव द्यावे' असा ठराव महाराष्ट्र विधिमंडळाच्या दोन्ही सभागृहांनी एकमताने मंजूर केलेला आहे. महाराष्ट्रातील अनेक राजकीय पक्ष, सामाजिक संस्था, श्रमिक संघटना आणि युवक संघटना यांनी या ठरावाला पाठिंबा दर्शीवला आहे. खुद्द मराठवाड्यातील बऱ्याच संस्थांनी ही मागणी उचलून धरलेली आहे. शासनाचे प्रतिनिधीही

आम्ही या निर्णयाला बांधलेलो आहोत असे वारंवार सांगत आहेत. तेव्हा या निर्णयाची त्वरित अंमलबजावणी करणे हे शासनाचे कर्तव्य आहे.

हा प्रश्न आता केवळ नामांतराचा राहिलेला नाही, तर तो लोकशाही जीवनपद्धतीच्या जोपासनेचा व सामाजिक समतेच्या तत्त्वांची बूज राखण्याचा प्रश्न बनला आहे. तो साहित्यक्षेत्राच्या बाहेरचा आहे असेही म्हणता येणार नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकर हे एक कर्तबगार राष्ट्रीय नेते तर होतेच, पण ते श्रेष्ठ समाजचिंतक व प्रभावी पत्रकारही होते. 'बहिष्कृत भारत' या मराठी मासिकाचे ते संपादक होते. त्यासाठी त्यांनी स्वत: लिहिलेल्या अग्रलेखांचा सग्रह नुकताच प्रसिद्ध झाला आहे. तमेच त्यांच्यापासून स्फूर्ती घेऊन निर्माण झालेला दलित साहित्याचा प्रवाह आपल्या पृथगात्मतेने सर्वांचे लक्ष वेधून घेत आहे महाराष्ट्रातील सामाजिक एकात्मतेच्या दृष्टीने हा प्रश्न लवकरात लवकर सोडवला गेला पाहिजे. मराठवाडा विद्यापीठाच्या नावामागे डॉ आंबेडकरांचे नाव जोडल्याने मराठवाड्याच्या अस्मितेला बाधा येणार नाही, उलट तिचा गौरवच होईल.

## उपसंहार

साहित्याचे माध्यम जी भाषा तिची निर्मिती आणि विकास यात मनुष्याच्या प्रगतीचे रहस्य साठवलेले आहे. भाषा म्हणज नुसते शब्द नव्हेत, तर शब्दांच्या साह्याने आपल्या अंत:करणातील आशय प्रकट करण्याची धाटणी, शैली म्हणजे भाषा होय. मनुष्य हा हत्यार निर्माण करणारा प्राणी आहे अशी त्याची व्याख्या केली जात असे पण चिंपान्झी जातीची माकडे आपल्या गरजेपुरती हत्यारे बनवतात असे आढळून आले आहे. मनुष्येतर प्राणी हावभावांच्या द्वारे आपले मनोगत व्यक्त करतात. पण भाषेचा वापर हे मात्र खास मानवी समाजाचे वैशिष्ट्य आहे.

'It is language that makyth man' मनुष्याचा हा भाषाव्यवहार रोजच्या साध्यासुध्या कामापासून तो अत्युच्च पातळीवरील कलाविलास आणि तत्त्वमीमांसा यांच्यापर्यंत चालू असतो. भाषा ही माणसाच्या सुधारणेची व सस्कृतीची वाहक आहे. साहित्यिकाचा तर सदोदित भाषेशीच संबंध येतो म्हणूनच तुकारामांनी 'शब्दचि आमुच्या जीवाचे जीवन' असे म्हटले आहे. म्हणून प्रत्येक लेखकाने आपल्या भाषामाध्यमाचे पावित्र्य व प्रतिष्ठा साभाळली पाहिजे

*''लोभ जीभेचा जळूं दे*
*दे थिजूं विद्वेष सारा,*
*द्रौपदीचे सत्त्व माझ्या*
*लाभुं दे भाषाशरीरा*
*जाउं दे कार्पण्य 'मी'चे,*

*दे धरूं सर्वांस पोटी,*
*भावनेला येउं दे गा*
*शास्त्र—काट्याची कसोटी—''*

मराठीतील एक श्रेष्ठ कवी व सौदर्यमीमांसक मर्ढेकर यांचा हा साहित्यविषयक दृष्टिकोण सदैव ध्यानात ठेवण्याजोगा आहे. विचाराला भावनेची जोड हवी; आणि भावनेला विचाराचे पाठबळ हवे. आपण जे अनुभवले, आपल्याला ज्याची मनोमन प्रचिती आली, त्याला छेद जाईल असा कोणताच सूर आपल्या साहित्यातून निघू नये म्हणून प्रत्येक लेखकाने दक्षता घेतली पाहिजे. आपल्या अभिव्यक्तीच्या स्वातंत्र्यावर त्याने कुठलेही अंतर्गत व बाह्य दडपण येऊ देता कामा नये. त्यासाठी पडेल ती किंमत देण्याची तयारी हीच लेखकाच्या साहित्यनिष्ठेची खरी कसोटी म्हटली पाहिजे

वास्तविक पाहता साहित्याची निर्मिती आणि आस्वाद हा एक शोधच आहे. जीवनसत्याचा व विश्वनियामक तत्त्वाचा तो शोध आहे, आणि त्यांची मनुष्यमात्राला स्वभावत:च ओढ असते. तेव्हा आपल्या मराठी साहित्याचे क्षेत्र नेहमीच जातिनिरपेक्ष राहिले पाहिजे. त्यात निरनिराळ्या जातीच्या व धर्मांच्या लोकांना नि:संकोचपणे वावरता येईल असे खुले व स्वागतशील वातावरण आपण निर्माण करावयास हवे. धर्मांतराच्या बाबतीत सक्ती ही केव्हाही निषेधार्हच. पण जे कधीकाळी दुसऱ्या धर्मात गेले, ते आपल्या भाषेला व देशाला परके झाले असे घडलेले नाही. महानुभाव, वारकरी, दत्त, रामदासी या भक्तिसंप्रदायांप्रमाणेच मुसलमान, ख्रिस्ती, जैन, लिंगायत या धर्मपंथांच्या उपासकांनीही मराठी भाषेची सेवा केली आहे, मराठी साहित्यात भर घातली आहे. मी ख्रिस्ती झालो, पण ''मी इंग्रज झालो नाही, किंवा माझ्या मनातून स्वदेशाभिमान गेला नाही'' हे बाबा पदमनजी यांचे उद्गार खचितच अर्थपूर्ण आहेत. रे. टिळक यांना मराठी भाषा व भारतीय सस्कृती यांबद्दल किती आत्मीयता होती ते सर्वश्रुत आहे. डिसेबर १९७७ मध्ये सोलापूर येथे भरलेल्या महाराष्ट्र ख्रिस्ती संमेलनाचे अध्यक्ष रॉक कार्व्हालो यानी आपल्या भाषणात तर धर्मनिरपेक्षतेचा आवर्जून पुरस्कार केला आहे. ''मराठीच्या त्या भव्य अशा मुख्य प्रवाहात मिळून जाण्यात आपले भवितव्य व हित आहे, याची आपल्या साहित्यिकांनी सतत खूणगाठ बांधून ठेवणे योग्य होईल, आणि त्या दृष्टीने कोणत्याही साहित्याला व साहित्यिकाला जातिधर्मवाचक संज्ञा चिकटविण्याच्या कल्पनेचा त्याग करणे उचित होईल तसे झाले तर ते आपल्या राष्ट्रीय एकात्मतेचे व तादात्म्याचे निदर्शक ठरेल.'' या प्रतिपादनाचा इत्यर्थ अगदी उघड आहे. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन आपल्या लहानमोठ्या साहित्यसंस्थांनी आपल्या कार्यात निरनिराळ्या धर्मांच्या लोकांना सहभागी करून घेण्याचा बुद्धिपुर:सर प्रयत्न केला पाहिजे. प्रत्येक धर्माच्या लोकांना आपल्या धर्मग्रंथांचे परिशीलन करण्याचा हक्क आहे; आणि त्या दृष्टीने त्यांचे काही धार्मिक वाङ्मय प्रसिद्ध झाले तर काही बिघडत नाही. परंतु एकंदर

मराठी साहित्याचा व सामाजिक घडामोडीचा विचार करताना सर्वांनी धर्मनिरपेक्ष इहवादी दृष्टीचाच अवलंब केला पाहिजे. या बाबतीत नव्याने बौद्ध धर्म स्वीकारलेल्या तरुण साहित्यिकांचा दृष्टिकोन निःसंशय स्वागतार्ह आहे. ते गौतमबुद्धाची थोरवी वर्णन करतात. पण आपल्या साहित्यामधून ते ज्या प्रश्नांना वाचा फोडतात ते बहुतांशी सामाजिक असतात. त्यामागची त्यांची दृष्टी ऐहिकनिष्ठ असते सर्व धर्मांच्या लेखकांनी ही भूमिका स्वीकारली तर त्यामुळे साहित्यप्रसाराचे कार्य पुष्कळच सुकर होईल.

मराठी साहित्यात आज वेगवेगळे प्रवाह आहेत, त्यांच्यात सुसंवाद साधण्याची आपण पराकाष्ठा केली पाहिजे. त्यांचा एकमेकांना छेद न जाता ते परस्परपूरक व्हावेत म्हणून आपण पद्धतशीर खटपट केली पाहिजे. जोपर्यंत सामाजिक जीवनात तणाव आहेत, तोपर्यंत साहित्यात सुसंवाद निर्माण होईल अशी अपेक्षा करणे व्यर्थ आहे. या दृष्टीने सामाजिक घटकातील एकात्मतेच्या आड येणाऱ्या शक्तीशी झगडण्याचीही साहित्यिकांची तयारी पाहिजे. साहित्यिकाच्या सामाजिक बांधिलकीचा हाच वास्तविक अर्थ आहे. काळाचा प्रवाह कोणत्या दिशेने पुढे जात आहे, कोणत्या नव्या शक्ती बंधमुक्त होण्यासाठी धडपडत आहेत याचा विचार मराठी साहित्यिकांनी वेळीच केला पाहिजे. माझे भाषण संपवताना सर्व साहित्यप्रेमी लोकांना मी केशवसुतांच्या शब्दांत एकच कळकळीची विनंती करीन .

'सावध ! ऐका पुढल्या हांका ।'

# अकोला : १९८९

# गो. नी. दाण्डेकर

जाणते हो !

जानते हो । मी पूर्नामायचा लाहेना बाबू आहो. या भाशेनांत माझ्याकडून काई चुकून् माकन्, तर त्याची मले मापी देजा ।

हे बावनगांव वऱ्हाड माता रुक्मिणीची जन्मभूमि आहे. संपन्न, आतिथ्यशील, मृदु स्वभावाचे नागरिक इथं राहातात, अशी या भूमीची फार काळापासून प्रसिद्धि आहे दारी आल्या अतिथीचं या भूमीत नेहमीच मोठ्या आनंदानं स्वागत झालं आहे हा विदर्भ अगदी वेदकाळापासून जाणकारांना ठावकी असलेला देश आहे. वाकाटकांसारखे स्वनामधन्य नृपाळ याच भूमीत नांदून गेले. ही भूमि कालिदासाच्या यक्षाचं निवासस्थान आहे. या सांस्कृतिक दृष्ट्या श्रीमंत असलेल्या भूमीनंच अनेक तोलामोलाचे वीरपुरुष आणि साधुसन्त जन्माला घातले आहेत. नागपूरचं सुप्रसिद्ध भोसले कुळ हे राजघराणं इथलंच. महानुभाव पंथाची काशी जे रिधपूर, ते याच वऱ्हाडांत. श्री. गजानन महाराज, श्री. गाडगेबाबा, ताजुद्दीनबाबा, श्री. तुकडोजी महाराजांसारखे महासाधू याच भूमीत विख्यात झाले. स्वनामधन्य डॉक्टर हेडगेवार, श्री. दादासाहेब खापर्डे, लोकनायक अणे, डॉ. खरे, पूज्य श्री. गुरुजी गोळवलकर यांसारखे कित्येक धुरेचे महापुरुष याच विदर्भांत जन्मले. महात्मा गांधीनी याच वऱ्हाडांतलं सेवाग्राम कित्येक वर्षे आपलं निवासस्थान केलं होतं. याच विदर्भाची राजधानी असलेल्या नागपुरी डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी धर्मचक्रप्रवर्तन करून बौद्ध धर्माचा स्वीकार केला. गीताई या गीतेच्या छायानुवादाचे शिल्पकार विनोबा याच विदर्भात पवनारला राहात आहेत. कुष्ठरोग्यांच्या व्यथेला वाचा फोडणारे महर्षि बाबा आमटे यांचं कार्यक्षेत्र याच विदर्भात वरोड्यास आहे

असं हे जे वऱ्हाड, त्यांतील मोर्णानदीच्या तीरावर अकोलसिंहानं वसवलेल्या, कधी काळीच्या असदगढानं विभूषित असलेल्या आकोल्यास भरणाऱ्या, पंचावन्नाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष म्हणून आपण माझी निवड केलीत यांबद्दल मी आपला आभारी आहे. इथे साहित्य संमेलन भरण्याची कांही ही पहिली वेळ नव्हे. आपणास माहितीच आहे, १९१२ साली याच नगरांत मराठी कादंबरीकारांचे कुलगुरु कै. हरि नारायण आपटे, यांच्या अध्यक्षतेखाली अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन भरलं होतं.

कै. हरिभाऊंचं नावं घेतांक्षणी मला त्यांच्या कित्येक ऐतिहासिक कादंबऱ्यांचं स्मरण तीव्रतेनं होतं. किंबहुना असं म्हणावं लागेल, की 'उष:काल', 'सूर्योदय', 'गड आला पण सिंह गेला', 'सूर्यग्रहण', आणि 'केवळ स्वराज्यासाठीं', या हरिभाऊंच्या शिवकालीन कादंबऱ्या हें आमच्या पिढीसाठीं गीताभागवत होतं. हें दूध पिऊन आम्ही वाढलों. हा देश आमचा आहे, यासाठीं आम्हांला मूठपसा, हातून घडेल तें केलं पाहिजे, ही जाणीव आमच्या पिढीच्या मनीं हरिभाऊंच्या या कादंबऱ्या वाचून निर्माण झाली.

हरिभाऊंचं बहुधा सर्व वाङ्मय योजनाबद्ध, जाणीवपूर्वक निर्माण झालं होतं. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या तेराव्या वार्षिक सभेच्या दिवशीं, दि. २६ नोव्हेंबर १९११ रोजीं हरिभाऊंनी विदग्ध वाङ्मय या विषयावर भाषण करीत असतां म्हटलं होतं—

—मनुष्याची सदसद्विवेकबुद्धी जागृत करून, त्यास नेहमी सन्मार्गात ठेवण्यास कारण होणारे, त्याच्या विविध मनोवृत्तींचा विकास करून, शुद्ध अशा आनंदाचा आस्वाद त्यास देणारे, जें काय अशुद्ध, अपवित्र, दु:खद, नैराश्योत्पादी व क्षणिक, त्यापासून दूर राहाण्याचा प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष बोध करणारे, नेहमीं उदार, रमणीय अशा विचारांचा व कल्पनांचा त्याच्या मनांत उद्भव व संचार करवून, सत्याचे ठिकाणीं तो सदा लीन होईल असें करणारे, सारांश त्यास मनुष्यत्वाकडून काढून देवत्वाकडे जाण्याबद्दल उत्सुक करून, त्या मार्गाला सन्मुख करणारे असे जे कोणाचेही, अन्त:स्फूर्तीनें शब्दरूप घेऊन मुखावाटे बाहेर पडलेले किंवा लेखणीनें लिहून ठेवलेले विचारोद्गार त्या सर्वांना समुच्चयानें वाङ्मय ही संज्ञा आहे.

आपल्या कुळांतील कादंबरीकारांनीं कसं वाङ्मय निर्माण करावं, या संबंधींचा कै. हरिभाऊंनीं शब्दबद्ध करून ठेवलेला हा बहुमोल ताम्रपट आहे. सम्राट् अशोकाच्या स्तंभांप्रमाणं हरिभाऊंनीं कोरलेला हा शिलालेख आहे.

अशा या महान् कादंबरीकारानं ज्या नगरींत कोणे एके काळीं साहित्य संमेलनाचं व्यासपीठ भूषविलं होतं, त्याच नगरींत त्याच साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाचा सन्मान प्राप्त होणं, हा मी माझा, माझ्या लेखनाचा सर्वश्रेष्ठ गौरव समजतों.

माझा जन्मही याच वऱ्हाडांतल्या परतवाड्यास झाला. ज्या वयांत माणसावर जन्मभर न मिटणारे बलवत्तर संस्कार होतात, त्या बालवयांत मीं याच भूमींत बुचाचीं फुलं वेचलीं. त्यांचा सुगंध ऊर भरभरून घेतला. उन्हाळा, हिंवाळा, पावसाळा हे सृष्टीचे दैदीप्यमान कालखण्ड याच विदर्भांत माझ्या परिचयाचे झाले. यांच्याशीं माझं मैत्र याच भूमींत जुळलं. अगदीं बाळपणींच परतवाड्याजवळच्या पर्वतमालेंतील एका शिखरानं माझं लक्ष वेधून घेतलं होतं. अनेक विपत्तींच्या, निराशांच्या दिवसांत तें शिखर जन्मभर माझी साथ करीत आलं आहे.

*—सृष्टी तुला वाहुनी धन्य माते अशी रूपसंपन्न तूं निस्तुला ।*

असं ज्या मातृभूमीचं वर्णन रेवरंड टिळकांनी आपल्या काव्यांत केलं, ती मातृभूमि माझी आहे, असा गर्व माझ्या मनी सर्वप्रथम उपजला तो याच वऱ्हाडामध्ये.

माझ्या एकूण सर्वच लेखनाची चिकित्सा करीत असतां माझ्या लेखनामागचा आशय आणि माझी भाषा-तदंगभूत असलेली शैली, यांचा विचार समोर येतो. इथे लहानपणीच माझ्या हाती आलेल्या एका बहुमोल पुस्तकाचा उल्लेख करायला हवा. ते पुस्तक म्हणजे कहाण्या श्रावणी सोमवाराच्या, मंगळागौरीच्या, नागपंचमीच्या कहाण्या. पैकी एका कहाणीचा कांही अंश आपणासमोर प्रस्तुत करतो—

—ऐका महाविष्णु तुमची कहाणी ! काशीपूर नगर सुवर्णाचा वड. भद्रकाळी गंगा. नव नाडी. बावन आड. तिथं एक तपी राहातो काय करतो ? सकाळी उठतो स्नान करतो. विभूतीचं लेपन करतो. तिबोटी लंगोटी घालतो. खांदिया कुऱ्हाड घेतो. वनांतरी जातो. फळं आणतो. उत्तम पाक करतो पांच भाग करतो देवाचा देवाला. अतिथीचा अतिथीला. गाईचा गाईला. उरला सुरला आपण खातो. असं करता नखं रुपली. बोटं खुपली. अंगी रोम वाढले मस्तकी जटा. अठ्ठ्याऐंशी सहस्त्र वर्षं झाली. एवढं तप कोणा कारणे, महाविष्णु भेटावा या कारणे. एका वृक्षावर कपोत कपोती. बोलली, भल्या तापसा, जपी तापसा, तपी तापसा, चरणी तर चालतोस, मुखी तर बोलतोस, एवढं तप कोणाकारणे ? महाविष्णु भेटावा या कारणे शेषशयनी, सुवर्ण मंचकी महाविष्णु. तिथं कपोत कपोती आली. सांगूं लागली की काशीपूर नगर. सुवर्णाचा वड. भद्रकाळी गंगा—श्रीविष्णूंनी ऐकलं. बर म्हणाले. झट्कन् उठले. पायी खडावा मस्तकी पीतांबर गुंडाळला. तप्याजवळ उभे राहिले. भल्या तापसा, जपी तापसा, तपी तापसा, एवढं तप कोणाकारणे. महाविष्णु भेटावा याकारणे. मीच महाविष्णु. कशानं ओळखावा. ओळखेन असा भेट. माघारी वळला. तो महाविष्णूची मूर्त प्रगट झाली. भला रे भक्ता शरणांगता राज्य माग. भांडार माग. संसारीचं सुख माग. राज्य नको. भांडार नको. संसारीचं सुख नको, तुझं माझं एक आसन. तुझी माझी एक शेज, असं त्याला एकरूप केलं.

असं हे अद्‌भुत वाङ्मय माझ्या हाती आलं. मी केवळ खुळावून गेलो. त्याची असंख्य पारायणं मी केली.

या पारायणांचा माझ्या भाषेवर खोलवर परिणाम झाला शिवाय याच बाळपणी माझ्या वडिलांनी मजकडून गीतेचे अध्याय मुखोद्‌गत करवून घेतले. थोरल्या बहिणीशी भेंड्या लावण्याच्या ईर्षेनं मी अनेक कविता पाठ केल्या. त्यांत वामन पंडित होते, मोरोपन्त होते, समर्थ होते. अर्वाचीनांपैकीही बालकवि, केशवसुत, कवि गोविंद, स्वातंत्र्यवीर सावरकर इत्यादींच्या कविता बालपणीच पाठ झाल्या. या पाठांतरामुळं माझी भाषा संस्कारित व्हायला साहाय्य झाल.

त्यानंतरचा भाषेवरचा खोलवर संस्कार घडविणारा भाग होता, श्रीगाडगेबाबांबरोबर गेलेल्या चार सुगंधी वर्षांचा. बाबा हा महाराष्ट्रांतला एक चमत्कार होता. परीट जातीत

जन्मलेल्या त्या निरक्षर पुरुषानं आपल्या ओघवती वाणीनं अदमासें पन्नास वर्षं या महाराष्ट्रांतील कोट्यवधी बहुजनांचीं मनं जिंकून घेतलीं. सोपं बोलावं कसं, ग्रामीणांच्या चित्तांस स्पर्श करील अशी भाषा वापरावी कशी, या बाबतींत बाबा केवळ महामहोपाध्याय होते. त्यांच्या कीर्तनांतील फार मोठा अंश प्रश्नोत्तररूप असे. ते प्रश्न विचारीत. कीर्तनास जमलेले हजारों श्रोते उत्तर देत. ते प्रश्न या बहुजनांच्या नित्यपरिचयाच्या जीवनपद्धतींतले असत. त्यांच्या मर्मांस स्पर्श करणारे असत.

बाबा म्हणत — आपल्या हिंदुस्थानले एक मोठा डाग आहे डाग ! तो डाग धुऊन काढायचा प्रयत्न करा. तो डाग कोनता ? शिवाशिवीचा. शिवशीऽल ! काय करशील ? शिवशीऽल ! शिवशील म्हननाराले चार हात अन् या बापड्याले दीड हात आहे का ? नाऽहीं ! याले चार पाय अन् त्याले एकच तंगडं—असं आहे काय ? नाऽहीं ! कोनीं जात विचारली, तर सांगावं, कीं मानूस ! काय ? मानूस !

तुमची आमची जमीन एक की दोन ? एऽक ! आकाश एक की दोन ? एऽक ! सूर्यनारायेन एक की दोन ? एऽक ! आगगाडी एक की दोन ? एऽक ! काल्हेरा पिलेग एक की दोन ? एऽक ! मंग शिवशील का बा म्हन्ता ? देवावरीं जाती दोनच ! बाई आनी पुरूस ! तिसरी जातच नाहीं !

असं मोठं हृद्य बोलणं बाबांनीं मला शिकविलं.

यानंतर मी चार महिने भंडारा डोंगरावर राहिलों. तुकारामबाबांचे अभंग पाठ करण्यासाठीं. तुकाराम हा केवळ रसांचा समुद्र आहे.

*काय तुकारामबावांचं देवाशीं प्रेमाचं मागणं ! पावलें-पावलें तुझें आम्हां सर्व ॥ काय निसर्गाशीं तादात्म्य ! वृक्षवल्ली आम्हा वनचर सोइरे ॥ काय भक्तिप्रेमोद्‌गार ! खेळ मांडियेला वाळवंटी घाई ॥ काय आत्मस्थिति ! आनंदाचे डोहीं आनंद तरंग ॥ काय तृप्तिभरले उद्‌गार ! नाम घेतां मन निवे ॥ काय कृतकार्यता ! याचसाठीं केला होता अट्टहास ॥ काय हरिदर्शनाची उत्कटता ! राजस सुकुमार मदनाचा पुतळा ॥ काय भावावस्था ! सकळ चिंतामणी शरीर ॥ काय नीतिबोध ! शुद्ध बीजापोटीं ॥*

ते दिवस मी केवळ तुकाराममय होऊन गेलों. असं वाटे, कीं हें शरीर त्यागून मला त्या काळांत जाऊन त्या महानुभावाच्या मागं टाळ धरून उभं राहातां आलं तर !

त्यानंतर मी पोहोंचलों आळंदीला. ज्ञानेश्वरीचं अध्ययन करण्यासाठीं. अडीच वर्षं मी ज्ञानोबांच्या पायांजवळ राहात होतों. मधुकरी मागत होतों, आणि रात्रंदिवस त्या आनंद कल्लोळांत नाहात होतों. ज्ञानोबा मला अडीच वर्षंपर्यंत पसायदानाची भिक्षा घालीत होते !

तो वेदशरण धर्मनिष्ठांनी वाळींत टाकलेला ज्ञानोबा ! त्या बालवयांत आळंदी ते पैठण ही यात्रा भाजल्या धुळींत करूनही जे त्या मुलांचं उपनयन करायला तयार झाले नाहींत, ते धन्य असोत !

*चाण्डाला: प्रत्यवसिता: परिव्राजकतापसा:*
*तेषां जातान्यपत्यानि चाण्डालै:सह वासयेत् ॥*

संन्यासमार्ग त्यागून पुन: गृहस्थाश्रमांत प्रवेशलेले यती आणि तापस चाण्डाल आहेत, त्यांना झालेल्या मुलांना चाण्डालांच्या वस्तींतच ठेवावं, गांवकऱ्यांत मिसळूं देऊं नये, या स्मृतिवाक्याला ते धर्मवेत्ते शरण गेले. एरवीं तुम्ही जन्मभर हरिभक्ति करा आणि येणेंप्रमाणे आयुष्य घालवा, हें सांगायला पैठणकर शास्त्री कशाला हवे होते ?

एवढा हा कभिन्न कडा अंगावर कोसळूनही ज्ञानोबाच्या माहात्मतेंत अणुमात्र बदल झाला नाही. तो संताचा, अमृताचा आणि ज्योतीचा वारकरीच राहिला. त्याला शरण जाऊन नामदेव, चोखोबा, जनाबाई, गोरा कुंभार, सांवतामाळी इत्यादि वारकऱ्यांचा थवा स्वत:ला धन्य समजूं लागला. त्या ज्ञानोबानं अशा एका सर्वसंग्राहक पंथाचा प्रारंभ केला कीं ज्याचे अनुयायी होण्यांत मराठमोळ्या जातीजमातीनीं कृतकार्यता अनुभवली. मीही त्याच दिंडीतला एक टाळकरी झालों.

*वर्ण अभिमान विसरलीं याती एकएका लोटांगणी जाती रे ।*
*निर्मळ चित्तें झालीं नवनीतें पाषाणा पाझर फुटती रे ॥*

ज्या पंथामध्यें कोणी कुणाला त्याचा वर्ण पुसत नाही, जात विचारीत नाहीं, जिथें श्रेष्ठकनिष्ठ नाहीं, असा हरिरंगीं रंगलेला तो भक्तांचा मेळा ज्ञानदेवाच्या नेतृत्वानं पंढरीचं आकाश जयजयकारानं दुमदुमवूं लागला.

या समूहाची भाषा कुठली ? तर मराठी. तिजविषयी ज्ञानोबाच्या मनी उत्कट अभिमान. अमृताशीं होड लावणारीं वचनं मी माझ्या मराठीत निर्माण करीन, अशी त्याची प्रतिज्ञा. ज्ञानोबाची बोलीं कशी ? तर साच आणि मवाळ. मितुली आणि रसाळ. जणूं ती भाषा नव्हे, तर अमृताचे कल्लोळ आहेत. या भाषेच्या भूमीत त्यानं नऊही रसांचे समुद्र निर्मिले. रत्नांच्या खाणी उघडिल्या. भावार्थाचे डोंगर रचले. त्या भाषेमध्यें बरवं कवित्व त्यानं आवाहिलं. त्या कवित्वामध्ये ओतप्रोत रसिकत्व होतं. त्या रसिकत्वालाही परतत्वाचा स्पर्श होता. असं हें अद्भुत भारतीचं उपवन ज्ञानोबानं भोळ्याभाळ्यांसाठी निर्मिलं, तोंपर्यंत बंद असलेलीं तत्त्वज्ञानाचीं सर्व द्वारं ज्ञानोबानं मोकळीं केली. जातगोत न पुसतां अवघे मराठभाषिक त्या उपवनांत आनंदकल्लोळूं लागले. भारतीचा जयकार गाऊं लागले.

भाषेंतला हा अद्वितीय चमत्कार ज्ञानोबानं कोणत्या हेतूनं केला ? त्याला एवढे कष्ट करून काय हवं होतं ? तर दुरितांचं तिमिर नाहींसं व्हायला हवं होतं. विश्वभर स्वधर्माचा प्रकाश पडायला हवा होता, जो जो जी जी कामना करील, त्याला त्याला तें तें लाभावं, अशी सदिच्छा ज्ञानोबाच्या मनीं दरवळत होती. एवढी ही उदात्त भावानं दाटलेली प्रार्थना आजपर्यंत कुठल्याही भाषेंत कुणींही रचली नाहीं ! माझ्या मनावर ज्ञानोबाच्या या सुकृताचा अमिट असा ठसा उमटला. त्यांच्या सूत्रबद्ध वाणीनं मला मुग्ध केलं.

*स्वल्पाक्षरं असंदिग्धं बव्हर्थं ऋजुभाषितम् ।*

या व्याख्येप्रमाणं जी अतिशय मितुली आहे, असंदिग्ध आहे, नानार्थप्रसविनी आहे, असंही असून जी अतिशय ऋजु आहे, अश्या ज्ञानोबाच्या भाषेनं मजवर फार मोठा परिणाम केला. एक ओवी सांगतों. पैज लावतों, एक अक्षरही कुणी त्या ओवींतून हलवून दाखवावं !

*समुद्रचि भरती । चंद्रकान्त पाझरती । कुमुदिनी विकसती । चंद्र तो उगा ॥*

असं हें शब्दलाघव पाहून मी अगदीं थक्कीत झालों. एवं च, कान्हा, गाडगेबाबा, तुकाराम आणि ज्ञानोबा हीं चार माझीं गुरुपीठं आहेत, त्यांचा मी ऋणी आहें !

*ज्ञानोबांच्या कांहीं वचनांनीं तर माझं जीवन अधिकच समृद्ध झालं.*
*जैसे तंवचि वहाळ वोहळ । जंव न पवती गंगाजळ ।*
*मग होऊनि ठाकती केवळ । गंगारूप ॥*
*अगा नांवें घेतां वोखटीं । जे आघवेया अधमांचिये शेवटीं ।*
*तिथे पापयोनिही किरीटी । जन्मले जे ॥*
*ते पापयोनि मूढ । मूर्ख ऐसे जे दगड ।*
*परि माझे ठायीं दृढ । सर्वभावें ॥*
*ते पापयोनिही होतु का । ते श्रुताधीतही न होतु का ।*
*परी मजसी तुकितां तुका । तुटी नाहीं ॥*
*यापरी पापयोनीही अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना ।*
*मातें भजतां सदना । माझिया येती ॥*

माझ्या मनांतली श्रेष्ठकनिष्ठतेची भावना या ज्ञानाग्नीनं जळून गेली. सर्व पंथोपपंथ मला समान झाले. जे सद्भक्त, मग ते कोणत्याही जमातींत जन्म पावोत, ते मला वंद्य आहेत, हा बोध माझ्या मनीं ठसला.

समाजांतील जे चिरडले गेले आहेत, त्यांच्या विषयीं सहानुभाव मज मनीं निर्माण झाला. ज्ञानेश्वर आणि गाडगेबाबा या दोघांनी मला श्रेष्ठकनिष्ठतेच्या चिखलांतून वर काढलं, आणि ज्यास कोणी अपंगिता नाहीं, त्यास हृदयीं धरावं, ही प्रेरणा माझ्या मनीं निर्माण केली.

या समाजामध्यें असे तर कितीक वर्ग आहेत, कीं ज्यांच्या कंठावाटे उमटूं पाहाणारी किंकाळी बाहेर येऊंच पावली नाहीं. आपण ज्या असलेल्या दलितांपलीकडे कितीक जातीजमाती अशा आहेत, कीं ज्यांचं आर्त सशब्द होऊं शकलं नाहीं. पोतराज आहेत, घिसाडी आहेत, वडार आहेत, बुरुड आहेत, मांगगारोडी आहेत, बेलदार आहेत, कैकाडी आहेत, वंजारी आहेत, गाडीलोहार आहेत. त्यांचीं पालं हींच त्यांचीं घरं. झोंपड्या हेच राजमहाल, याशिवाय ठाकर आहेत, धनगर आहेत, काथोडी आहेत, वन्य आहेत, यांचं दुःख जाणून घेतलं पाहिजे, ही जाणीव माझ्या मनीं

संतवाङ्मयाच्या अध्ययनानं जागी झाली.

अशिव ते गिळून जावं आणि शिव असेल ते जनांसाठी मांडावं, हा धडा ज्ञानोबानं मला शिकवला. एरवी जगांत अमंगळाची उणीव आहे असं थोडंच आहे ? कामक्रोधादि विकार सर्वत्र सारखे आहेत. कुणाचाही त्याला अपवाद नाही. पण जे भलं असेल त्याचा जयकार गाण्याची प्रेरणा मला ज्ञानोबामुळं लाभली.

'उत्कट भव्य तेचि घ्यावे,' आणि 'हे तो प्रचीतीचे बोलणे,' ही दोन माझ्या लेखनामागची सूत्रं आहेत. एकदां एका टीकाकारांनी माझं वर्णन 'गतकालीन भव्यतेचा शाहीर' असं केलं होतं. पैकी गतकालीन हा शब्द मला अमान्य आहे. 'जे भव्य ते बघुनिया मज वेड लागे' असं असणं हा काय अपराध आहे ?

गीता-ज्ञानेश्वरी हे दोन्ही ग्रंथ उपासकाला 'महामानव' या संकल्पनेकडे नेणारे आहेत. कांही टीकाकार ज्ञानदेवांना उणं लावतांना म्हणतात, की त्यांनी द्विजशूद्र या कल्पना वापरल्या. पण दृष्टांत देतांना त्यांनी त्या वापरल्या आहेत, हे ध्यानी घेतल पाहिजे. तो कांही त्यांनी मांडलेला सिद्धांत नव्हे. दृष्टांत देत असतां वक्ता ज्ञातांतून अज्ञाताकडे, असं दिशादर्शन करीत असतो. जे सर्वांस माहीत आहे, ते उपमान वापरून श्रोत्याची गांठ सिद्धांताशी घालायची असते. त्या काळी जे समज रूढ होते, त्यांतला एखादा वापरला म्हणून ज्ञानदेव त्याच मताचे होते, असं गृहीत धरतां येत नाही. त्यांनी मांडलेला सिद्धांत कोणता याचा शोध घेतला पाहिजे. आणि सिद्धांताचा विचार करतां पुन: पसायदानाकडे वळावं लागतं. हे पसायदान कोणा एका वर्णासाठी मागितलेलं नाही. त्यात 'दुरितांचे तिमिर जाओ' अशी मागणी केली आहे. संपूर्ण विश्वाच्या भल्याची कामना तिथं केली आहे.

मी ज्यांच्याजवळ अध्ययन करीत आलो, ते पूज्यपाद याच सर्वात्मभावाचे प्रवर्तक होते. माझे आचार्य पूर्वाश्रमीचे महामहोपाध्याय श्रीधरशास्त्री पाठक यांनी महात्माजीच्या येरवड्याच्या उपोषणकाळामध्ये अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ नांवाचं बहुमोल पुस्तकच लिहिलं. त्यांत त्यांनी स्मृतिवचनांचा दाखला देऊन अस्पृश्यतेचा धि:कार केला आहे. तेव्हां ज्ञानेश्वरीमध्ये जो प्रेरिला, तो सर्वात्मभाव माझा आदर्श राहिला, यांत नवल करायचं कारण नाही.

मी चार वर्षे संघाचा प्रचारक म्हणून काम केलं. संघाची कवाईत, लाठीबोथाटी पाहून मी संघाकडे आकृष्ट झालो नाही. तर हा देश माझी मातृभूमि, हा समाज माझा आहे, याचा मी पाईक आहे, माझं हे तुच्छ जीवन याच्या भल्यासाठी मला खर्चलं पाहिजे, बाकी कोणतेही मोह त्या कार्याच्या आड येऊं देतां कामा नयेत, या संघाच्या शिकवणुकीनंच मी संघाकडे ओढला गेलो. माझ्या या समाजाचं अहित होईल, अशी एकही ओळ माझ्या हातून लिहिली जाणार नाही, हे व्रत मी घेतलं आहे.

हा दृष्टिकोन स्वीकारूनच मी जन्मभर घेतलेले अनुभव वापरीत आलो आहे. गाडगेबाबांबरोबर वावरत असतां, नर्मदाप्रदक्षिणा करीत असतां आणि संघाचा प्रचारक

असतां ही समाजहितदृष्टि मीं सदैव जागी ठेवली. तिजवर कधींही झांपड येऊं दिली नाहीं.

हें सगळें जगत असतां मी सोसणारांपैकीं एक होतों. उद्यां मला हें लिहावं लागणार आहे, याची अंशमात्र जाणीव सोसतांवेळीं नव्हती. भुकेचे दाहक अनुभव मीं स्वत: भोगले आहेत. पत्रावळींच्या ढिगांवर कुत्रे तुटून पडले असतां मीं अन्नासाठीं त्यांशीं झगडा केला आहे. दलितांचा होऊन मी त्यांच्यासवें वावरलों आहे. त्यांचे हर्ष, त्यांचे अमर्ष, त्यांचे राग, त्यांचे लोभ या सर्वांचा मला अगदीं जवळून परिचय आहे. हीं सुखदु:खं मीं त्यांच्यासवें झेललीं आहेत. कैद्यांना पायांतली बेडी कशी छळते, हें पाहाण्यासाठीं मीं माझ्या पायांत लोखंडाची बेडी ठोकून ती तीन महिने वागवली होती, एवढं एकच उदाहरण पुरेसं आहे.

गाडगेबाबांकडे असतां कुष्ठरोग्यांची बहु सेवा करावी लागली. बाबांच्या सदावर्तांमधून केवळ आंधळे, पांगळे, महारोगी अशांस अन्न मिळे. महारोग्यांसाठीं बाबांनीं झोपड्या बाधून दिल्या होत्या. त्यांची क्षतं धुतलीं होती. एका दुर्लभ क्षणी बाबांनीं माझ्या मनांतला कुष्ठरोग्याविषयींचा तिरस्कार नि:शेष नाहीसा केला. तेव्हांपासून त्या रुग्णांविषयीं माझे मनीं मैत्र आहे. महर्षि बाबा आमट्यांच्या मनींचं आर्त मला अधिक चांगल्या रीतीनं कळूं शकतं. लिहूं लागलों तेव्हा तीव्रतेनं वाटून गेलं, कीं सगळ्या शाहाण्या समंजस जगानं झिडकारलेले, लाथाडलेले जे कुष्ठरोगी, त्यांचेविषयी लिहिलं पाहिजे. म्हणून मीं 'आनंदवनभुवन' लिहिलं.

अस्पृश्यांची दारुण समस्या मला कित्येक वर्षांपासून छळीत होती. गेली अनेक शतकं—सहस्त्रकं समाजानं त्यांना लाथाडलं आहे, दूर ठेवलं आहे. याचं दु:ख माझं मन जाळीत होतं, म्हणून मीं एकोणीसशें पंचावन्न सालीच 'देवाघरचीं माणसं' हें नाटक लिहिलं. नाट्यनिकेतननं रंगमंचावर त्याचा देखणा प्रयोग केला होता. त्यांत मी ही अस्पृश्यतेची समस्या मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

उध्वस्त होत चाललेल्या कोंकणाची व्यथा माझ्या मनी पेटल्या बाणासारखी शिरली. त्या व्यथेनं व्यथित होऊन मीं 'पडघवली' लिहिली.

रानावनांतून राहाणारे जे वनवासी ठाकर, कोळी, भिल्ल, धनगर, यांच्यासवें मी मनसोक्त राहिलों. त्यांचा मित्र होऊन. त्यांच्या चुलींवर रांधून मीं त्यांना जेऊं घातलं. त्यांच्यासवें वनांत मुळ्यामुळकुंडं शोधीत मी हिंडलों. एकुटवाणा त्यांच्या आधारानं डोंगरांवर राहिलों. ते निसर्गाशी जी दारुण झुंज देतात, ती डोळेभरी पाहिली. 'जैत रे जैत', 'रानभुली', 'माचीवरला बुधा', 'भिल्लवीर कालिंग' या माझ्या पुस्तकांतून मी त्यांच्या व्यथा गाइलों आहें. या वन्यांचा, या उपेक्षितांचा, या पीडितांचा मी लेखक आहें, आणि याचा मला गर्व आहे एका अर्थे यांतील प्रत्येक कहाणी मी जगलों आहें. तीं माझीं आत्मचरित्रंच आहेत.

माझ्या लेखनाची जात सौभद्र नाटकाशीं मिळतीजुळती आहे. ती माझी प्रकृति आहे, माझा सहजस्वभाव आहे तो. पात्रांच्या स्वभावामध्यें व्यामिश्रता चितारणं माझ्या

धर्माशी प्राय: असगत आहे  माझ्या मर्यादांची मला जाणीव आहे. जे मला जुळणार नाही, जमणार नाही, ते करायला मी धडपडणार नाही.

जे मला चांगलं वाटतं ते मी लिहितो. त्याचा जयकार गाणं मी अपराध मानीत नाही. मला समीक्षा त्याज्य नाही. निर्मळ, नि:स्पृह, तटस्थ टीकेचं मी स्वागत करतो. पण केवळ झोडपायचं म्हणून ते झोडपे घालतात, त्यांना नमस्कार करून मी बाजूला सारीन. माझ्या मार्गानं मी चालत राहीन. कारण माझ्या मते हाच मार्ग कल्याणाचा आहे. नान्यत् पंथा विद्यते अयनाय।

मला माहीत आहे, की कांही टीकाकार मला आपला लेखक मानीत नाहीत. ते त्यांच्या हस्तिदंती मनोऱ्यांत सुखी असोत  मी बहुजनाचा आहे. बहुजनासाठी मी लिहितो  या लेखनामागं मी वर्षानुवर्षे केलेली तपश्चर्या आहे. कुण्या भल्या माणसानं मला चांगलं म्हणावं, एवढ्यासाठी मी माझ्या मार्गाचा त्याग करणार नाही.

मी आत्मसंतुष्ट आहे, नार्सिसस आहे, असा मजवर आरोप केला जातो. जे जीवन मला जगावं लागलं, ते ज्यांना माहीत आहे, ते असा आरोप करीत नाहीत. कित्येक असंही म्हणतात की, साहित्यांतील नवे प्रवाह, नव्या जाणिवा, यांची या बापड्यास कल्पना नाही. पण ज्यांचा मी उद्गाता आहें, ते माणुसकीचे आदर्श गेली अनेक सहस्रकं बदलले नाहीत. पुढंही अनेक शतकं हे असेच पूजिले जाणार आहेत  यांच्या पाठीशी शतकानुशतकांचा, मृत्यूंतून अमृतत्वाकडे केलेला प्रवास आहे. हे अवीट सिद्धांत आहेत. कधीही यांचा क्षय होणार नाही. यांच्यावर गज चढणार नाही. हे शिळे होणार नाहीत.

*हां गा सूर्य काय शिळा। अग्नि म्हणो येत आहे ओवळा।*
*कां नित्य वाहातेया गंगाजळा। पारुसेपण असे॥*

मी लिहिलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांवर एक आरोप केला जातो. तो पुनरुज्जीवनवाद आहे, आणि वर्तमानकाळाची चिकित्सा करून त्यावर कादंबरी लेखन करण्याऐवजी पुराणकाल आणि ऐतिहासिक काळाचा आश्रय करणं हा पलायन वाद आहे, असं त्या आरोपाचं स्वरूप आहे.

पण पुनरुज्जीवन म्हणजे कशाचं पुनरुज्जीवन ? पलायन म्हणजे कशापासून पलायन ? आजचं जीवन मोठं भव्य किंवा उत्कट असेल, आणि त्याच्या तेजानं दिपून जर साहित्यकार दिवाभीताप्रमाणं अतीताच्या आवरणाखाली दडत असेल, तर हा आरोप खरा म्हणावा लागेल. पण आजचं जीवन स्तवन करण्याजोगं आहे काय ? खरोखरी त्याच्यासमोर पूर्वजांचे पवाडे गाण हे निंद्य आहे काय ? पूर्वज केवळ असं जिणंच जगले काय ? कादंबरीकाराला मोह पडावा, असं त्यांच्या जीवनामध्ये कांहीही उदात्त नव्हतं काय ?

पण याहीपेक्षां महत्त्वाचा प्रश्न आहे, की ते आमचे पूर्वज नव्हतं काय ? त्यांचा

आमचा संबंध-विच्छेद झाला आहे काय ? त्यांनी केलेल्या एखाद्या भव्य कृतीचा मोह पडणं हे खरोखरीच पातक आहे काय ?

मला ते तसं वाटत नाही. त्यांच्या त्या उत्कट जीवनांचा आदर्श आपल्या ललित कृतीतून समाजापुढे ठेवणं हा अपराध आहे, असं मी मुळीच मानीत नाही. हा युक्तिवाद जर ताणीत नेला, तर मग माझं नावं सांगतांना माझ्या वडिलांच्या नांवाचा उच्चार करणं हाही दोष ठरूं लागेल. आणि ऐतिहासिक पुरुष म्हणजे तरी काय ? ते आमचे बापजादे नव्हते काय ? आमच्या पूर्वजांनी जे कर्तृत्व केलं, त्याचं स्मरण करणं हा जर कोणी अपराध म्हणत असेल, तर त्याच्या त्या मेधावी चातुर्याची दृष्टच काढली पाहिजे.

दुसरं असं की अगदी लेखकीय कारागिरीच्या दृष्टिकोनांतून पाहातांही इतिहासकाळास लेखनासाठी स्पर्श करणं, हे वाटतं तितकं सोपं मुळीच नव्हे. वर्तमानकाळ डोळ्यासमोर ठेवून मी पुष्कळच लिहिलं आहे आम्ही भगीरथाचे पुत्र, वनराज मावध होतात, जैत रे जैत, रानभुली, पडघवली, अशी कांही नांवं सांगता येतील.

शिवकालावर कांही लिहिण्यापूर्वी मात्र मला जवळ जवळ तीनशे ग्रंथ वाचून टांचणं काढावी लागली. जाणकारांनी अस म्हटलं की तत्कालीन कागदपत्रांचे ढीग लेखकानं तर धांडोळलेच, पण महाराष्ट्रातील किल्ले, खेडी, वाडेहुडे, युद्धस्थळं, नदीकांठ, पाणवटे, असं अपार त्यानं पायतळी घातलं पूर्वज कसे, त्याची राहाणी कशी, एकमेकांशी वर्तावा कसा, हेवेदावे कसे, नातीगोती कशी, त्यांची वस्त्रंप्रावर्णं कशी, खाणंपिणं कसं, वाहनं कशी, आपापल्या वतनांविषयी त्यांच्या मनी आपुलकी कशी, हे सर्व लेखकानं अतिशय कष्ट करून अभ्यासल, तेव्हां त्याला त्या काळाचा मागोवा घेतां आला.

पलायनवाद किंवा पुनरुज्जीवनवाद अशा शब्दाची वीट लेखकाच्या डोक्यांत घालण्यासाठी भिरकावणं सोपं आहे, पण ध्यानी घेतलं पाहिजे की ऐतिहासिक कादंबऱ्या लिहिणं हे शिवधनुष्य उचलणं आहे. त्यासाठी अपार कष्ट उपसायची धमक हवी. सर्वश्री ना. सं. इनामदार, रणजित देसाई, शिवाजी सावंत यांनी हे कष्ट उपसले आहेत.

आणि मजसारख्या शाहिरान पवाडे कशाचे गावेत ? भागलपूरच्या डोळे फोडण्याच्या लज्जास्पद प्रकाराचे ? की औषधांमध्ये भेसळ करून हजारो निष्पाप जिवांच्या प्राणांशी खेळ करणारांचे ? की कॅबेरेचे ? की नव्या वर्षादिनी गेट वे ऑफ इंडियावर वर्षारंभ साजरा करण्यासाठी गोळा झालेल्या स्त्रियाच्या शरिरांशी झटणाऱ्यांच ?

कोणी म्हणेल की आज नव गाण्याजोगं कांहीच घडत नाही काय ? घडतं आहे, त्याची दखल घेतली जाते आहे कुष्ठरोग्यांच्या समस्येशी एक लोकोत्तर पुरुष झगडला, त्यावर लिहिलं. सतलजच्या तीरावर एक महाकाव्य रचलं गेलं, त्यावर लिहिलं. हे विषय वर्ज्य थोडेच आहेत ? पण कलाकाराच्या प्रतिभेला अमुक एका विषयानंच लुब्ध करावं, असा आग्रह धरणं म्हणजे तानाशाही झाली. मी तिचा या व्यासपीठावरून धि:कार करतो. तुम्ही तुमचे विषय निवडा. कामवासनेवर लिहा.

विपरीत स्त्रीपुरुषसंबंध चितारा. मानवी मनांमध्ये दडून असलेलं गदळ उपसून बाहेर काढा. तुमचा हात धरायला मी धांवणार नाही. पण आमचंही विषयनिवडीचं स्वातंत्र्य अबाधित राहिलं पाहिजे.

कित्येक भले लोक आजचा हा 'हॉट' नाटकांचा, झणझणीत मुर्गी शिजवून प्रेक्षकांना ती वाढू धांवणाऱ्यांचा गदारोळ पाहून भयभीत होतात. ते धास्तावून म्हणतात, की हे लेखक समाजाला कुठं नेणार आहेत ? एकीकडे ते असं म्हणतात आणि दुसरीकडे त्याच नाटकांची तिकिटं काढायला रांगा लावतात.

या प्रकारांशी झुंजण्याचा एकमेव मार्ग त्यांच्या नांवानं बोटं मोडणं हा नव्हे. निंद्य, गर्ह्य असेल त्याला ललाकारणं हा जसा एक उपाय, तसाच उत्तमोत्तम, उत्कट, भव्य लिहून समाजापुढं आकर्षक रूपात मांडणं हा त्याहून प्रभावी मार्ग आहे. मी आव्हान करतो, की चांगलं, भव्य, सद्भावनांना आवाहन करणारं खूप लिहा. तसं कांही लिहिलंही जात आहे. सर्वश्री महादेवशास्त्री जोशी, ग. दि. माडगूळकर, वसंत कानेटकर, शिरवाडकर, बाबासाहेब पुरंदरे आदींचा उल्लेख इथं केला पाहिजे. अशा साहित्याचा जयकार गाइल्यानं तुम्ही ज्याला अशिव म्हणतां ते आपोआपच झांकोळलं जाईल. साधं, प्रांजळ, उत्कट असेल तर जनलोक त्याकडे आकृष्ट होतातच.

जी. ए. कुलकर्णी, श्रीनिवास कुलकर्णी, खानोलकर, त्र्यं. वि. सरदेशमुख, भालचन्द्र नेमाडे, जयवंत दळवी, खानोलकर, व्यंकटेश माडगूळकर, विद्याधर पुंडलिक, महानोर, सुरेश भट, विनोदकार पु ल देशपांडे, मिरासदार, बाळ गाडगीळ, दुर्गा भागवत, पद्मजा फाटक, दीपा गोवारीकर, यांसारख्या माझ्या प्रकृतीपेक्षां वेगळं, सकस लेखन करणारांचा उल्लेख मला इथंच केला पाहिजे.

असो, ज्या विषयाच्या गौरवासाठी आपण सगळे इथं एकत्र झाला आहात, त्या भाषेचा थोडका विचार आतां केला पाहिजे. आपणा सर्वांचेच मनी हा विषय घोळत असेल.

भाषा हे सृष्टिकर्त्यानं मानवाच्या हाती सोपविलेलं सर्वोत्कृष्ट शस्त्र आहे. भाषेच्या, शब्दाच्या साहाय्यानं साम्राज्यं जिंकतां येतात. हे शस्त्र दुधारी आहे, तारतंही आणि मारतंही. ते आपणा सर्वांच्या एकमेकामधील व्यवहाराचं सर्वोत्तम माध्यम आहे. त्याचं माहात्म्य गाऊन भले भले कृतार्थ झाले आहेत.

शब्दाच्या माहात्म्याचं वर्णन करतांना ज्ञानेश्वर म्हणतात,

*बाप उपेगी वस्तु शब्दु । स्मरणदानी प्रसिद्धु ।।*

धन्यतेचे उद्गार काढीत ते म्हणतात, की काय प्रकाशमय हा शब्द ! कसा अमित त्याचा उपयोग ! आपलं मूळस्वरूप दिसेनासं झालं, ते अमोल रान हरवलं ! शब्द त्याचं स्मरण घडवून देतो. ही अशी त्याची प्रसिद्धी बहुता काळापासून आहे, प्रतिबिंब दाखविण्याचं सामर्थ्य असलेला जो आरसा, त्याहीपेक्षां शब्द अधिक बलवान्. कसा ?

*पाहातें आरिसा पाहे । तेथें कांहींचि नवल नव्हे ।*
*परि दर्पणें येणें होये । न पाहातें पाहातें ॥*

या शब्दरूप दर्पणाचा उपयोग केला असतां. आंधळ्यालाही नानाविध घटनांचं ज्ञान होऊं शकतं ! असं याचं अजोड सामर्थ्य वर्णन करतांना ज्ञानोबा पुढं म्हणतात,

*शब्द मवितें उमप । कोण आहे ॥*

अशी कुठली वस्तु आहे, कीं जी या शब्दाच्या मूल्याचं मोजमाप करूं शकेल ? शब्दस्तुति संपवितांना ज्ञानोबांनीं नवलाचे उदगार काढले, की या शब्दाचं चांगुलपण मी सांगू तरी कसं ?

*गोमटें शब्दाचें एकैक । काय वानूं ॥*

अनुभवामृतामध्ये ज्या शब्दाचं वर्णन ज्ञानोबांनीं येणेंप्रमाणे केलं, ती शब्दशक्ति केवळ अमोघ आहे. ती त्या साहित्यकाराला वश झाली, तो सामान्य नव्हे. कोणत्याही भाषेवाटे तो आपले विचार व्यक्त करीत असला, तरी त्याला विश्वमानवच म्हणावं लागेल. तो एकदेशी असूनही विश्वव्यापी सामर्थ्य अंगीं धारण करणारा ठरला आहे.

पण ज्या शब्दानं-भाषेनं मानवाला विश्वमानव या महत्तम स्थानीं नेऊन पोचविलं, त्या भाषेची आजची स्थिति काय आहे ?

श्रीरामचन्द्रानं म्हटलं होतं,

*जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ॥*

तशी जी आमची मातृभाषा, ती आम्हांस स्वर्गापेक्षांही श्रेष्ठ असायला हवी. आईच्या स्तनावाटे झरणाऱ्या दुधाच्या धारेसवे जी भाषा आमच्या कानीं जन्मतांक्षणीं पडली, ती आम्हाला मातेसमान पूज्य असली पाहिजे. पण आम्ही तिचा उचित तो आदर करतों का ? की अजून आम्ही तिला इंग्रजीची दासीबटकी म्हणूनच वागवितों ?

सभ्य हो ! दुर्दैवानं अशा निष्कर्षावर यावं लागतं की तेवढंही मोल आम्ही स्वभाषेला देत नाही. एका गरीब दाम्पत्याचा मुलगा त्यानं अथक परिश्रम करून शिकवला. मोठा केला. उच्चपदी तो चढला. भलेभले त्याचा परिचय करून घेण्यांत धन्यता मानूं लागले. एके दिवशी त्या उच्चभ्रूपदस्थ मित्रांबरोबर थट्टाविनोद करीत असतां अचानक हें त्याला जन्म दिलेलं, स्वत:चं पोट बांधून त्याला शिक्षण दिलेलं जोडपं तिथं येऊन पोचलं. मित्रांनीं विचारलं, हीं कोण आहेत ? त्या समारंभांत हीं जीर्ण वस्त्रांनी झांकलेलीं दोघं आलेलीं पाहून त्याच्या भाळीं आठी उठली. तो म्हणाला, आमच्या खेड्यांतल्या घराशेजारी राहाणारं हें एक अनाथ दांपत्य आहे. कधींकधीं आमच्या घरीं घरकाम करायला तें येत असतं !

गोष्ट प्रसिद्ध आहे. मीं पुन: अशासाठी सांगितली, की मातृभाषेचं आम्हापैकी

कांहीनी काय करून टाकलं आहे, ते ध्यानी यावं ! कित्येक सुजन मला असे माहीत आहेत, की जे मातृभाषेत बोलायला लाजतात. आपली मातृभाषा मराठी आहे याची त्यांना खंत वाटते ! मराठी साहित्य वाचतां का, असा प्रश्न केला असतां ते तुसडेपणानं सांगतात, की नाही बुवा, आम्हाला मराठी भाषेतलं नाही कांही आवडत ! आम्ही आपले इंग्रजी वाचतो ! ध्यानी घ्या, की हे केवळ करंटेपण आहे. आणि इंग्रजीतही यांनी शेक्सपियरला स्पर्श केलेला नसतो. वर्डस्वर्थ त्यांना माहीत नसतो. हेमिंग्वेची एकही ओळ त्यांनी वाचलेली नसते. यांची उडी पोचते ती पेरी मॅसनपर्यंत ! यांनी इंग्रजी तत्त्वज्ञान वाचलेलं नसतं, इतिहास नव्हे, विज्ञान नव्हे, गिर्यारोहण नव्हे ! यांचा अबलख वारू त्याच त्या 'हॉट' वाङ्मयाच्या आणि रहस्यकथांच्या रिंगणांत फेऱ्या मारीत असतो ! त्यांना काय म्हणून संबोधावं ते अजून माझ्या ध्यानी आलेलं नाही.

मराठीची ही अशी गळचेपी करण्याचे कामी कोण कोण जाणतां अजाणतां व्यग्र आहेत, त्यांचा एकदां धांडोळा घ्यायला हवा. सगळे मराठी भाषिक एकत्र नांदावेत, म्हणून महाराष्ट्र-राज्याची निर्मितीझाली. राज्याची राजभाषा मराठी ठरली. नव्हे, सगळं वर्षच राजभाषावर्ष म्हणून साजरं करायचं ठरलं. पण अजूनही आम्ही इंग्रजीच्या दास्यांतून मुक्त झालो आहोत काय ? दुर्दैवानं याचं उत्तर नाही असं आहे. मंत्रालयांत अजून इंग्रजीची प्रतिष्ठा आहे. न्यायालयांमधून अजूनही इंग्रजीत काम चालतं. न्यायाधीश मिलॉर्ड म्हणून ओळखलं जाण्यांत धन्यता मानतात. आकाशवाणीवरून अजून इंग्रजीचे पाश दूर झाले नाहीत. विद्यापीठं अजून इंग्रजी भाषा वापरण्यांत औचित्य मानतात. अलीकडे कित्येक नाटकांची नांव तर इंग्रजी भाषेमध्ये बुचकळलेली असतात. मराठी साहित्याची व्याख्या केवळ कथा कादंबऱ्या-काव्य, इथपर्यंतच सीमित झाली आहे काय ? सर्वश्री रा. चि. ढेरे, नरहर कुरुंदकर, गं. बा. सरदार अशा महाभागांचं लेखन वगळतां, पाहिजे त्या प्रमाणांत अशा पद्धतीचं साहित्य मराठी भाषेत शोधावंच लागेल. मानव्यशाखा तर या बाबतीत फार मागं रेगाळल्या आहेत. मराठी भाषा ही अशी खुरटूं पाहाते आहे. तिचा चहूं अंगांनी परिपोष करून तिचं वैभव वाढीस लावण्याचं काम आम्हां मराठींवर प्रेम करणाऱ्यांचं नाही काय ?

पुणे विद्यापीठानं आपल्या वाणिज्य शाखेतून मराठीला बाहेर घालवून काय साधलं ? मातृभाषेचा संस्पर्श नसलेली केवळ आंकडेमोडी करणारी मानवी यंत्रं विद्यापीठाला तयार करायची आहेत काय ? महाविद्यालयांमधून संस्कृतबरोबर मराठीचंही उच्चाटन होण्याची दुर्दैवी घटिका सामोरी ठाकली आहे. आपण सर्वांनी एकत्र येऊन त्याचा विचार करायला हवा आहे. उद्या आमची ही गुणवेल्हाळा मराठी घरांघरांतून निर्वासित होणार नाही काय ?

एक कारण असं सांगितलं जातं, की मराठीत पुरेसे पारिभाषिक शब्द नाहीत, परिभाषा कोश नाहीत. मी विचारतो, की ते हिब्रू भाषेत होते काय ? पाहातां पाहातां इस्त्राएलनं मृतप्राय झालेल्या त्या भाषेला कुठल्या कुठं नेऊन पोचविलं की नाही ? मग

ज्ञानेश्वर-तुकारामांच्या, समर्थ, वामनांच्या, केशवसुत-बोरकरांच्या मराठीला तें कां जमूं नये ?

मुंबईच्या फोर्ट विभागांत तर मराठी ही घाटी हमालांची आणि रामा गड्यांची भाषा म्हणून ओळखली जाते ! हें न्याय आहे काय ? योग्य आहे काय ? महाराष्ट्राच्या राजधानींत हें व्हावं ?

याचा एक परिणाम असा होत चालला आहे, कीं आमचीं मुलं भारतीय संस्कृतीपासून दूर चाललीं आहेत. त्यांना रामायण माहीत नाहीं. कालिदास ठाऊक नाहीं. ज्ञानेश्वर तर विचारायलाच नको ! एक उदाहरण सांगतों. दूरदर्शनवर प्रश्नमंजूषेसारखा एक इंग्रजी कार्यक्रम असतो. त्या कार्यक्रमांत दोन प्रश्न विचारले गेले. नुकत्या आपल्या पंतप्रधान हळदीघाटला जाऊन आल्या होत्या. त्या निमित्तानं एका अश्वारोही योद्ध्याचं चित्र दाखवून पृच्छकानं पुसलं, याचं नावं काय ? दुर्दैव कीं राणा प्रतापाचं तें चित्र आहे हें कुणालाच ओळखतां आलं नाहीं ! राणाप्रताप ही ऐतिहासिक व्यक्ति. गृहीत धरून चालूं कीं तो इतिहास त्या विद्यार्थ्यांच्या वाचनांत आला नसेल. पण पुढच्या प्रश्नाचं उत्तर माहीत नसणं हा तर केवळ अक्षम्य अपराध होता. त्या प्रश्नकर्त्यानं पुसलं, करेंगे या मरेंगे, 'डू ऑर डाय' या घोषणेचा जनक कोण ? महात्मा गांधी हें नांवही कुणी विद्यार्थी सांगूं शकला नाही ! याची खंत करावी तरी किती ? भारतीय परंपरांपासून हीं मुलं तुटत चाललीं नाहींत काय ?

आपल्या लेकरांना इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये मोठ्या हौसेनं घालणाऱ्या पालकांना मी विचारतो, कीं मराठीची नाळ कापून टाकून आपण आपल्या पाल्यांची स्थिति न घरका न घाटका अशी करणार नाही काय ?

या बाबतींत बावीस वर्षे इंग्रजीचं अध्यापन करणाऱ्या एका भाषाशास्त्रज्ञाच्या मला आलेल्या अभिनंदनपत्रांतील एक-दोन वाक्यांचा इथें उल्लेख करतों. ते म्हणतात—

'माझी अशी खात्री झाली आहे कीं, सध्यांच्या शिक्षणपद्धतींत शाळांमध्यें मातृभाषेच्या शिक्षणास योग्य स्थान न मिळाल्यामुळें इंग्रजीला नको इतकें महत्त्व मिळालें आहे. माझें असे ठाम मत आहे की, मातृभाषेचे शिक्षण विद्यार्थ्याला शाळेमध्यें उत्तम मिळालें पाहिजे. त्यामुळें विद्यार्थ्यांची जाणून घेण्याची, वर्णन करण्याची, समजण्याची कुवत वाढते. यामुळें विद्यार्थी समाजशास्त्र आणि इतर शास्त्रांसारखे प्रगाढ विषय उत्तम तऱ्हेनें शिकूं शकतील.'

तासभराच्या या भाषणांत मी अनेक विषयाना केवळ स्पर्शच करूं शकेन, याची आपण मला क्षमा करा. मात्र विज्ञानविषयक वाङ्मय मराठी भाषेत निर्माण झालंच पाहिजे, त्याविना दुसरी गति नाहीं. साहित्य म्हणजे केवळ ललित, हा समज दूर करायला हवा. सर्व अंगांनीं मराठी भाषा विकसित व्हायला हवी.

गेल्या कित्येक वर्षांत मराठीमध्यें गीतारहस्य, सह्याद्रि, गाथासप्तशती, आधुनिक भारत, पेशवेकालीन महाराष्ट्र, महाराष्ट्रसंस्कृति यांसारखीं नांवं घेण्याजोगी पुस्तकें फारशीं लिहिलीं गेलीं नाहींत, इकडे मी जाणकारांचं लक्ष वेधूं इच्छितों. तसंच लक्ष मला मान्यवर,

सुप्रतिष्ठित प्रकाशन संस्थांचं एका गोष्टीकडे वेधायचं आहे. डॉक्टरेटसाठी कित्येक जण नाना महत्त्वाच्या विषयांवर अथक परिश्रम करतात, ते ग्रंथ केवळ विद्यापीठांच्या वाचनालयांमध्येच राहातात. त्यांचे ते बहुत श्रमांनंतर, योग्य दिग्दर्शनाखाली निर्माण झालेले ग्रंथ प्रकाशित होऊन वाचकांच्या हाती जायला हवेत. एरवी, हे सर्व परिश्रम वांया जातील.

चौदा भारतीय भाषांमध्ये नाना प्रकारचं बहुमोल साहित्य निर्माण होतं. इंग्रजीतील उत्तमोत्तम पुस्तकांची नांवं क्वचित् आमच्या जिव्हाग्री असतात. मात्र 'जनअरण्य'सारख्या भारतीय भाषांमध्ये लिहिल्या गेलेल्या ग्रंथांकडे आम्ही वळत देखील नाही, हे बरं की काय ? मराठीतर भाषांमध्ये लिहिल्या गेलेल्या अनेकानेक उत्तम ग्रंथांचे अनुवाद मराठीत झाले पाहिजेत. आन्तरभारतीचं कार्य वाढीस लागलं पाहिजे. 'साधना' साप्ताहिकाच्या दिवाळी अंकाचा उल्लेख मी या मार्गातील उत्तम प्रयत्न म्हणून करीन. 'माणूस'चाही निर्देश इथंच केला पाहिजे.

आतां मी वळतो वाचनालयांकडे. नागरिक आणि शासन, दोघांच्याही प्रयत्नांमुळे वाचनालयांची वाढ होते आहे. ही एक चागली गोष्ट आहे. जिल्हा वाचनालयं, तालुका वाचनालयं, नगर वाचनालयं, ग्रामवाचनालयं, अशी सांखळी बांधली जात आहे. ग्रंथपालांची आणि व्यवस्थापकांची अधिवेशनं भरत आहेत, हे त्यांच्यापुढील समस्या चर्चिल्या जाण्याचं एक साधन आहे. मला दोन गोष्टीकडे आपलं लक्ष वेधायचं आहे. पहिली ग्रंथपालांचं वेतन. अतिशय कमी वेतनांवर ही अत्यंत महत्त्वाच्या जागी असलेली माणसं कशीबशी जगताहेत. शासनाकडून याची योग्य ती दखल घेतली गेली पाहिजे पण याहून महत्त्वाची गोष्ट आहे ग्रंथखरेदी. कोण्या ग्रंथावर किती कमिशन मिळतं, हा प्रश्न वाचनालयांसाठी ग्रंथ खरेदी करणाऱ्यांनी विचारांत घेताच कामा नये. आमचे येथे निकृष्ट दर्जाचं वाङ्मय वाचकांस दिलंच जात नाही, अस गौरवानं सांगणाऱ्या ग्रंथपालांच्या भेटीची मी वाट पाहात आहे. वाचकांच्या अभिरुचीला उत्तम वळण लावायची जबाबदारी आपल्यावर आहे, हे त्यांनी विसरतां कामा नये

महाराष्ट्रराज्याबाहेर आंध्र, कर्नाटक, मध्यप्रदेश इत्यादि राज्यांमधून खूप मोठ्या संख्येनं महाराष्ट्रीयन राहाताहेत. ते तिथं मोठ्या प्रतिष्ठेनं जगताहेत. होतां होईतो महाराष्ट्राच्या नांवाला उणं येऊं नये, याची ते दक्षता घेत असतात. त्या त्या राज्याच्या राजधान्या आणि इतर शहरं, यांमधून त्यांनी महाराष्ट्रमंडळं स्थापन केली आहेत, आणि मायबोली मराठीच्या उन्नतीसाठी ते यथाशक्य सर्व प्रयत्न करताहेत. परराज्यांत राहात असून देखील मराठी संस्कृति, आचारविचार इत्यादीचा विसर त्यांनी पडूं दिला नाही, याबद्दल आम्हा महाराष्ट्रीयांनी त्यांचं ऋणी असायला हवं.

पण मला धास्ती अशी वाटते, की त्यांच्या मनी आपल्या मूळपीठाविषयी ज्या भावना आहेत, त्यांची उचित ती कदर बहुधा होत नसावी. त्यांनी त्या देशी मराठी संस्कृतीसाठी जे काय प्रयत्न चालविले आहेत, त्यांची कांहीशी उपेक्षा आम्हांकडून घडतेय की काय अशी शंका माझ्या मनी डोकावत्ये आहे. उदाहरणादाखल कांही

नियतकालिकांचा विचार करूं या. हैद्राबादेतून 'पंचधारा' हे मराठी नियतकालिक तेथील महाराष्ट्र मंडळ मोठ्या निष्ठेनं प्रकाशित करीत असतं. या पंचधारेची कल्पना किंवा माहिती आपल्यापैकी फार थोड्यांना असावी. नि:संकोचपणं कबूल करतों, की स्वत: मलाही ती नव्हती. 'पंचधारा' नियतकालिकामधून तेलगू आणि उर्दू भाषांचा आणि त्यांमधील उत्तमोत्तम साहित्याचा परिचय महाराष्ट्रीयांना करवून दिला जातो. हें काम फार मोठं आहे, त्याबद्दल मी त्या नियतकालिकाच्या संपादकांचं ऋण जाहीरपणं मानतो. 'पंचधारे'च्याच मार्गानं त्या त्या राज्यांमधून प्रकाशित होत असलेली मराठी नियतकालिकं जगली पाहिजेत, त्यांचा उत्कर्ष झाला पाहिजे. याचं उत्तरदायित्व आम्हां महाराष्ट्रीयांवर आहे, हे आपण विसरतां कामा नये.

परराज्यांतले हे महाराष्ट्रीय आपल्या मृळपीठाकडे मोठ्या अपेक्षेनं पाहात असतात. तेथील उत्तमोत्तम वक्ते साहित्यकार, नट, सगीतकार आपल्या इथं यावे, आणि आमचं मराठीपण टिकविण्याच्या कामी त्यांनी आम्हास सहाय्य करावं अशी इच्छा त्यांचे मनी सतत वावरत असते. मराठी संस्कृतीचं संवर्धन करण्याच्या दृष्टीनं आम्ही या त्यांच्या इच्छेला प्रतिसाद दिला पाहिजे.

बेळगांव, कारवार, धारवाड इत्यादि नगरांमधून उत्तमोत्तम मराठी ग्रंथ-संग्रहालयं तेथील मराठ्यांनी जोपासली, वाढविली आहेत. आम्ही मराठीभाषिकांनी त्या संग्रहालयांकडे मोठ्या आपुलकीनं पाहिलं पाहिजे. मराठी सस्कृतीच्या जपणुकीचं एक अमोघ साधन म्हणून आम्ही त्यांकडे लक्ष पुरविलं पाहिजे.

एका अनुकरणीय प्रयोगाचा मी इथे उल्लेख करतो. गदगच्या मराठी मंडळानं मुख्यत: कन्नडिगांना व्याख्यानांसाठी आणि आपल्या वार्षिकोत्सवासाठी अगत्यानं पाचारण करायला प्रारंभ केला आहे. यामुळं सां ''तिक सामंजस्याचं, आणि आदानप्रदानाचं वातावरण निर्माण होतं, हे मुद्दाम ध्यानी घेतलं पाहिजे. इतरत्र कुठंही होणारे या जातीचे प्रयोग धन्यवादास पात्र आहेत.

मात्र बेळगांव-कारवारचा समावेश मराठी राज्यांत व्हायला हवा या न्याय्य मागणीपोटी आम्ही जी चळवळ चालविली आहे, तिचा उपसर्ग या वाचनालयांस होतो, असं ऐकिवांत आलं आहे.

दोन तीन वर्षांपूर्वी धारवाड येथील समृद्ध मराठी वाचनालयाची होळी करण्यांत आली, तेथील महाराष्ट्र मंडळावर दगडफेक झाली, -सं ऐकतो. या अपप्रवृत्तीस प्रोत्साहन मिळेल, असं कांहीही आम्हा हातून घडणार नाही, याची आम्ही दक्षता घ्यायला हवी. तो प्रश्न मोठा नाजूक झाला आहे कर्नाटकाचे मुख्यमंत्री नि:शंकपणे असं म्हणतात की आता सीमावाद उरलेला नाही. मराठी भाषिक खासदार, नेते, यांनी केंद्राकडून या प्रश्नाची उकल होईल, यासाठी आवश्यक ते तांतडीनं करायला हवं, अशी कळकळीची सूचना मी त्यांस करीत आहे.

अलीकडे उद्‌भवलेल्या एका नव्या वादाचा उल्लेख इथं करणं माझं कर्तव्य आहे. वस्तुतः साहित्यकारांमध्ये प्रस्थापित आणि नवागत, अशी सीमारेषा निर्माण व्हायला नको. आजचे प्रस्थापित हे कालचे नवागत होते. हे प्रस्थापितपद आपल्याला मिळावं, यासाठी त्यांनी कधी कांही जाणीवपूर्वक केल्याचं मला तरी माहीत नाही. ते निष्ठेनं सरस्वतीची उपासना करीत गेले. त्यांच्या अंगीच्या प्रतिभेमुळं मराठी जग त्यांना साहित्यकार म्हणून ओळखूं लागलं. ते तथाकथित नवागत आहेत, त्यांनी आपली प्रतिभा विकसित होईल कशी, याकडे लक्ष पुरवावं. तुकारामाचा एक अभंग मला आठवतो

*चंदनासी न लगे पुसावा परिमळ । वनस्पती मेळ हाकारुनी ।। मजअंगी सुगंध दाटतो आहे।,*

अशा घोषणा चंदनानं करायची गरजच नाही मराठी जग तस सावध आहे नवनव्या जाणिवा आणि कलागुण उदयाला येतांच त्यांचं स्वागत करायला ते तत्पर आहे. या तथाकथित नवागतांना माझं आवाहन आहे की चहूं अंगांनी आपलं साहित्यविषयक व्यक्तित्व संपन्न होऊं द्या, मग तुम्हालाही तुमचं स्थान निश्चितच मिळेल. त्यासाठी नाद घालत बसायचं कांही कारणच उरणार नाही.

आतां एका बहुचर्चित विषयाकडे मला वळलं पाहिजे. ग्रंथांना पुरस्कार देण्यासाठी नांव सुचविण्याकरितां शासनानं एक समिति नेमली होती. तिनं पुरस्कारयोग्य अशा पुस्तकांची नांवं शासनाकडे प्रस्तुत केली त्यांतील तीन ग्रंथांची नांवं शासनानं पुरस्काराच्या यादीतून वगळली. यावर वृत्तपत्रांमधून आणि सभांमधून पुष्कळच चर्चा झाली. ही अतिशय चिंताजनक बाब आहे. शांत मनानं, प्रक्षुब्ध न होता या सर्वच विषयाचा विचार करण्याची वेळ आली आहे, असं मला वाटतं. गताध्यक्षा श्रीमती दुर्गा भागवत यांच्या एका लेखामध्ये माझ्याही नांवाचा उल्लेख केला गेला आहे, तेव्हां त्यासंबंधीची माझी भूमिका मला मांडली पाहिजे.

शासनाकडून ग्रंथांना पारितोषिकं दिली जातात, ही शब्दयोजनाच मला अमान्य आहे. शासन म्हणजे आमच्यामधूनच निवडून दिलेले प्रतिनिधी. आम्ही कररूपानं जो पैसा देतो, त्याचे ते विश्वस्त आहेत हे जे द्रव्य दिलं जात, ते जनतेच्या पैशांमधून, जनतेतील कांही गुणी साहित्यकारांना त्यानी लिहिलेल्या उत्तम ग्रथांबद्दल आदरपूर्वक दिलेलं मानधन मानलं पाहिजे. मानधन म्हणताक्षणी अनुग्रहकर्ता आणि अनुगृहीत ही भूमिकाच बदलते. तो त्या गुणी साहित्यकाराचा अधिकार आहे, पूजाद्रव्य आहे, पारितोषिक नव्हे, हे शासनानं ध्यानी घ्याव.

याच भूमिकेतून मी साहित्यअकादमीच्या पुरस्काराचा स्वीकार केला. मात्र ते द्रव्य माझ्या प्रपंचासाठी न वापरतां मी त्याचा विनियोग तात्काळ माझ्या भ्रमणकाळांत ज्या मायमाऊल्यांनी मला अन्न वाढून जगवलं, त्यांचं ऋण फेडण्यासाठी समाजोपयोगी

संस्थांना देऊन केला.

माझा शासनास आग्रह आहे की हे मानधन देण्याची जबाबदारी त्यानं स्वीकारूं नये. हा साहित्याचा प्रान्त आहे. यांतील प्रश्न साहित्यिकांनाच सोडवूं द्यावेत. तो भार शासनानं वृथा आपल्या शिरावर घ्यायला धावूं नये. या मानधनासाठी नांवं सुचविण्याकरितां जी समिती नेमायची, तिचं पुनर्गठन करावं. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष, त्या वर्षी साहित्यअकादमीचा पुरस्कार लाभलेला साहित्यकार, साहित्य-संस्कृतिमंडळाचा अध्यक्ष, आणि साहित्य महामंडळाचा अध्यक्ष, हे चौघे त्या समितीचे पदसिद्ध सभासद असावेत. महामंडळाच्या घटक संस्थांचा एकेक प्रतिनिधि त्या समितीवर असावा. ललितेतर साहित्य, नाटकं, बालवाङ्मय इत्यादि विषयांतील एकेका जाणकाराचा अन्तर्भाव समितीत व्हावा, आणि या समितीचा पुरस्कारविषयक निर्णय सर्वोपरि असावा. शासनानं त्यांत ढवळाढवळ करूं नये. समिति ज्या लेखकांची नांवं पुरस्कारासाठी सुचवील, त्यांस शासनानं आदरपूर्वक पाचारून पुरस्कार द्यावा. माझी साहित्यिकांना अशी विनंती आहे, की ही योजना शासनानं स्वीकारल्यानंतर ज्यांची नांवं मानधनासाठीं जाहीर होतील, त्यांनीं तो आपला, आपल्या साहित्याचा न्यायोचित सन्मान आहे असं मानून ती रक्कम स्वीकारावी.

ज्यांच्या प्रयत्नांनी मराठी नाटकं परप्रांतांत आणि परदेशांत जाऊन तिथं त्यांना लोकप्रियता लाभली, त्यांचा मला उल्लेख करावयाचा आहे. महानिर्वाण, अजब न्याय वर्तुळाचा, घाशीराम, शाकुंतल, मृच्छकटिक अशा कितीएक मराठी नाटकांचे प्रयोग मराठी भाषेत वा रूपांतर होऊन अन्यत्र झाले आहेत. मराठी रंगभूमीचं सामर्थ्य, प्रयोगशीलता, नवं स्वीकारण्याचा तिचा लवचिकपणा, या सर्वच गुणांचा गौरव अन्य देशी यामुळं झाला आहे.

आणीक एका वस्तुस्थितीकडे अ५ या मराठी भाषिकांचं लक्ष मला वेधायचं आहे.या संमेलनाचं नांव अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन असं आहे. या संमेलनाचा ध्वज हा यच्चयावत् मराठी भाषिकांचा आहे, मग त्यांचा धर्म, जात, पंथ कोणताही असो. अलिकडे ख्रिश्चन लेखकांचं साहित्य संमेलन, दलित साहित्य संमेलन, स्त्रीलेखिकांचं साहित्य संमेलन, अशी वेगवेगळी संमेलनं भरताहेत. यांच्या कांही अंगगत समस्या आहेत. हे मी मान्य करतो. त्या समस्यांची चर्चा एकत्र जमून त्यांनीं अवश्य करावी, त्याला माझा विरोध नाही. पण हे वाळवंट साहित्य पंढरीचं आहे. या वाळवंटी अवघ्यांनी एकत्र येऊन माता सरस्वतीचा जयजयकार गायला पाहिजे, मग ते साहित्यकार कोणीही असोत. हिंदू, मुसलमान, ख्रिश्चन किंवा कोण्याही धर्माचे ते असोत. त्या सर्वांचं या वाळवंटी स्वागतच केलं जाईल. तसं ते केलं गेल पाहिजे.

आणि शेवटीं मी एका बहुचर्चित मुद्याकडे वळणार आहे. तो आहे दलित साहित्याविषयीचा.

यासंबधी पुष्कळ चर्चा आतांपावेतो झाली आहे, मात्र अजून या विषयावर

बोलण्याजोगं पुष्कळ आहे. सध्यां दलित साहित्य या नांवानं ओळखलं जाणारं वाङ्मय नाना रुपांनी प्रकाशित होतं आहे. बहुश: तें काव्यरूपानं आकारास येतं आहे. हे स्वाभाविकच आहे. मनांतला आक्रोश प्रगट करण्याचं काव्य हें एक उत्तम साधन आहे. तेव्हां त्या आक्रोशानं, प्रक्षोभानं काव्याचं रूप धरून प्रगट व्हावं, यांत अस्वभाविक असं कांहींच नाहीं. कित्येक दलित कवींचे काव्यसंग्रह प्रसिद्ध झालेले आहेत. गद्यरूप धरून आकारास आलेलं, प्रसिद्धीचा प्रकाश दिसलेलं वाङ्मयही थोडं नाहीं. 'मुक्काम पोस्ट देवाचं गोठणं,' 'आठवणींचे सोनपक्षी,' 'बलुतं', अशीं कांहीं पुस्तकं नांवाजण्याजोगीं आहेत. अण्णाभाऊ साठे, बागुल, दया पवार, माधव कोंडविलकर, यशवंत मनोहर, वाघमारे, डांगळे, शंकरराव खरात, सोनकांबळे, खांडेकर, केशव मेश्राम अशी कित्येक नावं सहज सुचण्याजोगीं आहेत. दलितांच्या व्यथांविषयीं या सर्वांनींच फार तळमळून लिहिलं आहे. या बहुधा सर्वांच्या लेखनावाटे एक नवा रस आकार घेतो आहे, त्या विषयींही चर्चा झाली आहे. पण मी त्या नव्या रसाचा, प्रक्षोभाचा अंतर्भाव रसांच्या संख्येंत करीन. आजपावेतों साहित्यांत नऊच रस मानले जात, पण आतां प्रक्षोभ या दहाव्या रसाची दखल घेण्याची वेळ आली आहे. साहित्याचे जे शास्त्री आहेत, त्यांनीं या दहाव्या रसाची व्याख्या, त्याचे भाव, अनुभाव इत्यादीची चर्चा करायला हवी आहे. हा प्रक्षोभ रस आतां चर्चा करून साहित्यामध्यें रसांत अंतर्भाव करण्याजोगा झाला आहे. या दहाव्या रसाच्या निर्मितीबद्दल मराठीनं दलित साहित्याचं ऋणी असलं पाहिजे.

प्रक्षोभ रस मूळ प्रगट झाला चोखोबांच्या आर्त उद्‌गारांत.

*धांव घाली विठू आतां चालूं नको मंद।*
*बडवे मज मारिती काय तरी केला अपराध॥*
*विठोबाच्या हार तुझे कंठीं कसा आला।*
*शिव्या देवोनी म्हणती माहारा देव बाटवीला॥*

या शब्दमाळेच्या रूपानं हा आक्रोश, हा प्रक्षोभ प्रथम शब्दरूप पावला. अशी ही प्रक्षोभाची प्रकाशयात्रा चोखामेळ्यापासून सुरूं झाली आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या उदयानं तिचं विराट रूप प्रगट झालं. आतां तर चहूं दिशांनीं, कथा, कादंबरी, निबंध, आठवणी, आत्मकथा, अशा नाना रूपांनीं निरनिराळे प्रवाह या गंगेस मिळूं लागले आहेत.

कित्येकांच्या मतें हा प्रक्षोभ अधिक तीव्र, कांहींसा आक्रस्ताळा वाटावा अशा रूपांत प्रगट होतो आहे. मी याबद्दल लेखकांस दोष देणार नाहीं. त्यांनीं जें भोगलं, तें इतकं दाहक, भयानक होतं, कीं त्याचा परिणाम या प्रक्षुब्ध रूपांत होणं स्वाभाविक आहे. मी स्वत: या भोगलेल्याचा साक्षी होतों. मलाही या दाहकतेचे चटके बसले आहेत. माझी खात्री आहे, कीं हा पहिला भर हळूहळू उणावेल. जसजसं हें साहित्य अधिकाधिक मात्रेंत प्रकाशित होत जाईल, तसतसा पहिला खळाळ जिरेल. अनुभवांचा

फार प्रचंड सांठा या लेखकांपाशीं उपलब्ध आहे. ते अनुभव अधिक शैलीदारपणं, अधिक नीटसं रूप घेऊन जेव्हां प्रसिद्ध होतील, तेव्हां त्यांतील कुण्या लेखकाचं सर्वोत्कृष्ट पुस्तक ज्ञानपीठ अ‍ॅवॉर्ड.मिळवून जाईल, असं स्वप्न माझ्या दृष्टीला दिसतं आहे.

माझी विद्यापीठांस एक नम्र सूचना आहे. या साहित्याचं जें आदिम रूप, तें पाली वाङ्मय, बौद्ध वाङ्मय, शोषितांच्या कथा, कादंबऱ्या, काव्य या सर्वांचा अभ्यास करून त्याचा विचार करण्यासाठीं त्यांनीं आपापल्या स्थळी अध्यासनं निर्माण करावीत. असा स्वतंत्र वाव मिळाला, म्हणजे हें वाङ्मय अधिक वेगानं प्रकाशांत येईल, अधिक नीटसं रूप धरीलसा मला भरंवसा आहे.

अगदीं शेवटी व्याख्यान संपवीत असतां मला नामांतर या ज्वलन्त प्रश्नाचा उल्लेख केला पाहिजे, त्याविना हें व्याख्यान संपूर्ण होणार नाहीं. नामांतरवादी आणि नामांतरविरोधक ज्या प्रदेशांत राहातात, त्या प्रदेशांत मी भरपूर भटकलों आहें. लंगोटी लावून, भीक मागत, कीर्तन करीत मीं तो प्रदेश डोळेभरी पाहिला आहे. तिथलीं दु:खं, व्यथा स्वत: अनुभवल्या आहेत. या नामांतरवाद्यांच्या आणि विरोधकांच्याही आयांनीं आणि आज्यांनीं मला अन्न वाढून जगवलं आहे. मला त्या मुलुखांत उणेपुरे चार महिने सश्रम कारावासही सोसावा लागला आहे. उद्दाम अधिकाऱ्यांचे काठ्यांचे तडाखेही मीं खाल्ले आहेत. तेव्हां मलाही याविषयीं कांहीं बोलायचा अधिकार आहे, असं मी मानतों. हे दोन्ही पक्ष एकाच मुलुखांत, एकाच गांवांत, एकाच स्थळीं गेलीं कित्येक शतकं राहात आले आहेत. पुढंही त्यांना त्याच स्थळीं नांदायचं आहे. हा प्रदेश नामांतरवाद्यांचा, आणि हा विरोधकांचा, अशी त्या मराठवाड्याची वाटणी झालेली मला तरी अजून माहीत नाहीं. तेव्हां मीं या दोन्ही पक्षांना असं विनविणार आहें, कीं हें दु:खं तुम्ही असं किती दिवस चरत ठेवणार आहांत ? त्यानं सगळा समाज ग्रासला जाणार नाहीं काय ? हें शल्य थेट आपली शरीरं पोखरून टाकणार नाहीं काय ? ही व्यथा अशी वर्षानुवर्षे खदखदत ठेवून कोणाचाच लाभ होणार नाहीं.

शासनाला या प्रश्नाचा गंभीरपणं विचार करण्याइतकं स्वास्थ्य कधींच लाभणार नाहीं. नित्य नवे प्रश्न सामोरे येऊन उभे ठाकत जातील. तेव्हां या दोन्ही पक्षांचे नेते एकत्र येऊं द्या. आपापसांत चर्चा करून हा वाद संपवा. पहिल्या क्षणीं तो संपणार नाहीं, याची मला जाणीव आहे. वाद पेटतील. ते विकोपाला जातील. पण शेवटीं कुठं तरी त्यांचा शेवट करावाच लागेल. नाही तर आमच्या भावी पिढ्या आम्हास क्षमा करणार नाहींत. नामांतर वा नामांतरविरोध हा प्रश्न असा वाटाघाटींच्या भूमिकेंतून, एकमेकांस समजावून घेऊनच सुटला पाहिजे, असं माझं ठाम मत आहे.

मला जें आपणासमोर मांडायचं होतं, तें मीं मांडलं आहे. आपण तें ऐकून घ्यायची क्षमता प्रगट केलीत, मी आपला ऋणी आहें.

❑❑❑

# रायपूर : १९८१

# गंगाधर गाडगीळ

रसिकहो,

व्यासपीठावरील प्रतिष्ठित व्यक्तींचा वेगळा नामोल्लेख न करता मी सर्वांनाच रसिकहो म्हणून संबोधिले यामुळे मी औचित्याला सोडून काही केले असे कोणाला वाटणार नाही अशी मला आशा आहे. मला तर खात्रीनेच तसे वाटत नाही. कारण मी पडलो साहित्यिक. त्यामुळे एखाद्याला रसिक म्हणणे ह्याहून त्याचा अधिक मोठा सन्मान कसा करायचा ते मला बापड्याला कळत नाही आणि रसिकांत उच्चनीच असा भेदभाव करणे रसिकतेला अगदीच विशोभित ठरेल, नाही का ? साहित्य तसा भेदभाव करीत नाही. ते सर्वांनाच आपल्या सर्व संपन्नतेसहित तितक्याच अगत्याने सामोरे जाते.

(या व्यासपीठावर काही माननीय मंत्री आहेत याची मला जाणीव आहे. त्यांच्या हाती केवढी सत्ता आहे, त्यांचा प्रभाव केवढा मोठा आहे, हे माझ्यासारख्या सामान्य नागरिकाला कसे माहीत नसेल ? पण मला असे वाटते की त्यांच्या या उच्च पदावरून आम्हा रसिकांना काही आदेश देण्यासाठी, मार्गदर्शन करण्यासाठी ते इथे आलेले नाहीत. तो अधिकार त्यांना नाही. ते आले असावेत, आपण थोडा वेळ तरी रसिक व्हावे आणि अन्य रसिकांशी संवाद करावा या हेतूने. ते रसिकतेच्या उच्च पातळीवर आले तरच हा संवाद होऊ शकेल, नाही तर वितंडवाद आणि विसंवाद मात्र होईल. मला वाटते की वितंडवाद आणि विसंवाद न होता संवाद व्हावा हेच अधिक हितकारक आहे.)

असो मित्रांनो, आपण या साहित्य संमेलनाचा अध्यक्ष म्हणून माझी निवड करून माझा जो बहुमान केलात त्याबद्दल मी आपणा सर्वांचे अगदी मन:पूर्वक आभार मानतो. लहानपणी मी आधाशीपणाने जेव्हा साहित्य वाचत होतो तेव्हा मला वाटायचे की हरी नारायण आपट्यांसारख्या श्रेष्ठ साहित्यिकांनी जसे लिहिले तसे आपल्याला लिहिता यावे. आज इतकी वर्षे प्रयत्न केला पण ते काही बेटे जमले नाही. तेव्हा आता त्यांच्यासारखे लिहिता आले नाही, तर निदान ते बसले त्या स्थानावर तर बसलो, असे फसवे समाधान मानून घेणेच माझ्या हाती आहे. अशी फसवणूक करून घेणे इतके सुखकारक असते, की माणसे तसे करतात.

हे संमेलन महाराष्ट्राच्या सीमेपलीकडे वास्तव्य करणाऱ्या मराठी भाषिक रायपूरकरांनी

भरवावे, ही मोठी अभिमानाची आणि आनंदाची गोष्ट आहे. माणूस जेव्हा आपली मायभूमी मोडून दूर जातो, तेव्हा नित्य व्यवहार याला पुष्कळसे अन्य भाषेतच करावे लागतात. 'मातृभाषेची त्याला व्यावहारिक गरज नसते. तरीदेखील माणसे आपल्या मायभाषेवर प्रेम करीत राहतात. त्याच्या हृदयातले हितगुज त्याच भाषेत चालते आणि म्हणून हृदयाशी हितगुज करणारे आपल्या मातृभाषेतले साहित्य त्यांना विशेष प्रिय वाटते. हे साहित्य लिहिणारे साहित्यिक आणि साहित्यप्रेमी यांची भेट व्हावी, त्यांची हालहवाल कळावी, आपल्या मनात काय आहे ते त्यांना सांगावे अशी त्यांची उत्कट इच्छा असते. या इच्छेपोटीच असे संमेलन भरविण्याची कष्टदायक कामगिरी ते अंगावर घेतात. यात त्यांचा व्यावहारिक स्वार्थ काहीच नसतो. उलट व्यावहारिक दृष्ट्या तो आतबट्ट्याचाच व्यापार असतो. स्वार्थनिरपेक्ष बुद्धीने त्यांनी हे जे कार्य अंगावर घेतले आहे, आणि आम्हा मराठी साहित्यिकांचा आणि साहित्याचा ते जो गौरव करीत आहेत, त्याबद्दल मराठीतले सर्व साहित्यप्रेमी त्यांचे ऋणी आहेत.

अन्य भाषिक प्रदेशांत त्यांनी हे संमेलन भरविल्यामुळे आम्हा महाराष्ट्रातील साहित्यप्रेमीचा मोठाच फायदा होतो आहे. कारण यामुळे हिंदीसारख्या भाषाभगिनीशी आमचा निकटचा संपर्क साधतो आहे. निराळे दृष्टिकोण, निराळ्या विचारधारा, वेगळ्या समस्या आणि परंपरा यांचा परिचय होणार आहे. यामुळे आमचे मनोविश्व अधिक संपन्न आणि उदार होईल. अशी देवाणघेवाण व्हावी या दृष्टीनेच रायपूरकरांनी या संमेलनाचे आयोजन केले आहे आणि आमच्या हिंदीभाषिक साहित्यिकांनी मोठ्या उदारपणे आणि हौसेने त्यांना या प्रयत्नात सहकार्य दिले आहे. सध्या आपल्या देशात संकुचित वृत्तीचा फैलाव होत आहे. माणसे आपल्या मनांची कवाडे बंद करून घेत आहेत. सगळे वातावरण संघर्षमय होत आहे. अशा परिस्थितीत हे सौहार्द विशेष मोलाचे वाटते.

मराठी आणि हिंदी यांचा पूर्वापार संबंध आहे. या प्रदेशात अनेक मराठी भाषिकांनी हिंदीत लेखन केले आहे. इथल्या अनेक हिंदी साहित्यिकांनी मराठी साहित्यात मोठ्या माक्षेपाने रस घेतला आहे. निरनिराळ्या भारतीय भाषांत अधिक देवाणघेवाण व्हावी यासाठी गेली कित्येक वर्षे अनेक संघटनांच्या व चळवळीच्याद्वारे प्रयत्न होत आहेत. पण ते जेवढे फलदायी व्हावेत तेवढे होत नाहीत. सभासंमेलनात परस्परांबद्दल सदिच्छा व्यक्त होतात. पण पुढे फारसे काही घडत नाही. एखाद्या भाषेतील साहित्यिकाचे साहित्य अन्य भाषिक रसिकांच्या मनाला जाऊन जोपर्यंत भिडत नाही, तोपर्यंत मारूनमुटकून काहीही देवाणघेवाण वाढवता येणार नाही, हे खरे. प्रश्न असा आहे की इंग्रजी अगर अन्य पाश्चात्त्य भाषांतील साहित्याचा जेवढा आमच्या मनावर परिणाम होतो, तेवढा शेजारच्या भारतीय भाषेतील साहित्याचा का होत नाही ? याबाबत प्रगती न होता परागतीच होत आहे. एकेकाळी प्रेमचंद, शरदबाबू व टागोर सर्व भारतीयांच्या मनांना जाऊन भिडले. आज तसे साहित्यिक कोणीच का आढळत नाहीत ? आपण

परधार्जिणे आहोत, अगर आपल्या विविध भाषात इतरांनी आदराने आपले म्हणावे असे साहित्यच निर्माण होत नाही, ही या प्रश्नांची उत्तरे मला अपुरी वाटतात. या प्रश्नांवर अधिक विचार व्हायला हवा. सध्या मात्र अशी परिस्थिती आहे की, पूर्वी ज्या रामायण-महाभारतांनी आपण जोडले जात होतो, त्यांची जागा आज बाजारी हिंदी चित्रपटांनी घेतली आहे. ही परिस्थिती आपल्या सांस्कृतिक आरोग्याची खात्रीने निदर्शक नाही.

रायपूरकरांनी हे संमेलन कडाक्याच्या थंडीच्या दिवसात भरवून औचित्य दाखवले आहे असे म्हटले पाहिजे. कारण साहित्य संमेलन जवळ आले म्हणजे आम्हा मराठी साहित्यिकांची मस्तके गरम व्हायला लागतात. पत्रकार जात्याच गरम माथ्याचे. त्यांची मस्तके तर आता तडकणार की काय अशी भीती वाटायला लागते. या गरमागरमीवर ही रायपूरची थंडी उतारा म्हणून उपयोगी पडायची शक्यता आहे.

या माझ्या वर्णनावरून माझ्या हिंदी भाषिक मित्रांचा असा समज होईल की, आम्ही मराठी माणसे नुसती भांडतच असतो. आम्ही भांडखोर तर आहोतच. पण आमच्या आविर्भावावरून आणि पवित्र्यांवरून कल्पना होते तेवढे आम्ही तंटेखोर नाही. एक तर आम्हाला विनोदबुद्धी आहे आणि भांडत असताना देखील ती आम्हाला सोडून जात नाही. गरम झालेल्या माथ्यांवर तो मोठाच उतारा असतो. दुसरी गोष्ट अशी की भांडताना आमचे तारतम्य सुटले असे वाटले तरी प्रत्यक्षात तसे घडलेले नसते. नाही तर महाराष्ट्रात इतक्या संस्था इतकी वर्षे इतक्या व्यवस्थित चालल्या नसत्या.

गरमागरमी झाली म्हणजे अनेक घोटाळे होऊ शकतात. माणसे दुराग्रहाने विरुद्ध टोकांना जाऊन उभी राहतात. विचारांची जागा भडक घोषणा घेऊ लागतात. भूमिकांची विचारपूर्वक तपासणी होण्याऐवजी एकमेकांच्या हेतूची आणि चारित्र्याची उलटतपासणी होऊ लागते. असे नाना प्रकार होतात.

परंतु असे जरी झाले तरी या गरमागरमीमागे जो असंतोष असतो त्याची योग्य प्रकारे तपासणी करायला हवी. साहित्यातल्या निरनिराळ्या प्रवाहांची आणि प्रश्नांची नोंद घेणे हे साहित्य संमेलनाचे कार्य असते. या साहित्य संमेलनाची परंपरा समावेशक आहे. हे संमेलन सर्वांचे आहे पुण्याच्या साहित्य परिषदेचे नियंत्रण अमान्य करून प्रादेशिक साहित्यसंस्था जेव्हा स्वतंत्र झाल्या तेव्हा देखील साहित्य संमेलन एकच राहिले. असे सर्वांचे एक साहित्य संमेलन वर्षातून एकदा भरावे हे सर्वांच्या आणि मुख्यत्वेकरून मराठी साहित्याच्या दृष्टीने हिताचे आहे.

या गरमागरमीमागे प्रश्न आहेत. त्यातला महत्त्वाचा आहे तो, एक या साहित्य संमेलनाच्या स्वरूपाविषयीचा आणि तो म्हणजे शासन आणि साहित्य यांच्या परस्परसंबंधाचा.

साहित्य संमेलनाच्या स्वरूपाविषयी अनेक प्रश्न उद्भवतात. हे साहित्य संमेलन आणि ते भरविणाऱ्या संस्था पुरेशा प्रातिनिधिक आहेत की नाहीत ? साहित्य महामंडळाचे स्वरूप आणि कार्यपद्धती यात फेरबदल करायला हवा का ? अध्यक्षाची निवडणूक

करण्याची पद्धती अधिक समाधानकारक करता येईल का ? अध्यक्षाला मान मोठा असतो पण अधिकार जवळजवळ काहीच नसतो. हे इष्ट आहे का ? साहित्य संमेलनाला आज जे स्वरूप प्राप्त झाले आहे ते केवळ उत्सवी आहे काय ? त्यात कोणत्या सुधारणा करायला हव्या ? दलित साहित्य संमेलन, ख्रिस्ती साहित्य संमेलन, नाट्य संमेलन इत्यादी जी वेगवेगळी साहित्य संमेलने अलीकडे भरत आहेत, ती या साहित्य संमेलनाच्या अपुऱ्या प्रातिनिधिकत्वाची अगर घटत्या महत्त्वाची निदर्शक आहेत काय ?

या प्रश्नांचे तपशीलवार विवेचन मी करीत बसलो तर या संमेलनाला घटना परिषदेचे स्वरूप येईल, आणि तसे ते व्हावे हे या संमेलनाच्या परंपरेला धरून नाही. मला आपण अध्यक्ष म्हणून निवडला आहे तो माझ्या लेखनाचा गौरव करण्यासाठी आणि माझे साहित्यविषयक विचार ऐकण्यासाठी. म्हणून या प्रश्नांची केवळ नोद करून मी पुढे जाणार आहे. मात्र मी इथे असे आश्वासन देतो की, येत्या वर्षात या प्रश्नांवर साहित्यिकात विचारमंथन व्हावे असा प्रयत्न मी अवश्य करीन.

दुसरा प्रश्न आहे शासन आणि साहित्य यांच्या परस्पर संबंधाचा. आजचे आपले या भारतातले सारे समाजजीवन शासनव्याप्त झाले आहे. कल्याणकारी समाजवादी राज्यव्यवस्था निर्माण करायचे ठरल्यावर हे असे होणारच. शासनाने जीवनाची अधिक क्षेत्रे व्यापावी असा केवळ सत्ताधारी पक्षाचा प्रयत्न नसतो. विरोधी पक्ष त्या बाबतीत अधिकच उत्सुक नव्हे तर उतावळे असतात, आणि लोकांचाही तसाच आग्रह असतो. हा जो सगळा प्रकार चालला आहे तो व्यक्तिश: मला मुळीच पसंत नाही. लोकहिताची कामे पूर्वीपासून शासन करीत आलेले आहे आणि यापुढेही त्याने ती करायलाच हवी, पण आज जो त्याचा अतिरेक होतो आहे, त्यामुळे आपले फायद्यापेक्षा नुकसानच अधिक होत आहे असे माझे स्पष्ट मत आहे. 'आता आम्ही तुमचे अधिक कल्याण करणार आहोत' असे मंत्र्यांनी घोषित केले की माझ्या पोटात गोळा उभा राहतो आणि 'नका ना हो आमचं इतकं कल्याण करू' असे त्यांना गयावया करून सांगावेसे वाटते. माझी भूमिका हळूहळू इतरांना पटायला लागली आहे. पण अजून मी अल्पमतात आहे. तेव्हा आणखी काही वर्षे आपले जीवन शासनव्याप्तच राहणार हे अपरिहार्य आहे.

साहित्याचे क्षेत्र या गोष्टीला अपवाद कसे असेल ? शासनाने साहित्याच्या क्षेत्रात ढवळाढवळ करू नये असे जेव्हा काही साहित्यिक मोठ्या आग्रहाने प्रतिपादन करू लागतात तेव्हा ही मंडळी या देशातच राहतात की परदेशात वास्तव्य करून आहेत असा मला प्रश्न पडतो. कारण साहित्याचे क्षेत्र शासनाने केव्हाच पुष्कळसे व्यापून टाकले आहे. आकाशवाणी आणि दूरदर्शन ही साहित्याच्या अभिव्यक्तीची दोन प्रभावी साधने संपूर्णपणे शासनाच्या ताब्यात आहेत. आणि शासन त्यांचे नियंत्रण एखाद्या स्वायत्त मंडळाच्या द्वारे करीत नाही, तर एका खात्याच्या करवी करते. मराठी साहित्याचा माध्यमिक व उच्चमाध्यमिक स्तरावरचा शिक्षणक्रम शासननियुक्त शिक्षणमंडळे

ठरवतात. त्यासाठी लागणाऱ्या पुस्तकांच्या निर्मितीचे कामच नव्हे तर मक्तेदारी एका शासननियुक्त मंडळाकडे असते. विश्वविद्यालयीन शिक्षणावरदेखील शासनाचे कमीअधिक प्रमाणात आणि वेगवेगळ्या स्वरूपात नियंत्रण आहे. जवळजवळ सर्व थरांतील सर्व शिक्षण संस्था शासकीय अनुदानावर अवलंबून असतात. म्हणजेच तेथे मिळणारे मराठीचे शिक्षणही त्या अनुदानावर अवलंबून असते. विश्वकोश मंडळ व साहित्य संस्कृती मंडळ या संस्था शासनाने निर्माण केलेल्या आहेत. त्यांचे सभासद शासननियुक्तच असतात. पुस्तकांना पारितोषिके देणे, नाट्यस्पर्धांचे आयोजन करणे, नव्या लेखकांना ग्रंथप्रकाशनासाठी साहाय्य देणे, तरुण लेखकांसाठी शिबिरे भरविणे वगैरे अनेक उपक्रम शासकीयच आहेत. पुस्तकप्रकाशन पुष्कळसे खाजगी संस्थांच्या हाती आहे हे खरे. पण त्या पुस्तकांची विक्री बऱ्याचशा प्रमाणात ज्या ग्रंथालयांमुळे होते, ती देखील शासकीय अनुदानावरच अवलंबून असतात. पुस्तकांच्या प्रकाशनाचे कामही आता शासन मोठ्या प्रमाणावर हाती घेणार आहे असे निवेदन मी परवाच वाचले. मराठी साहित्याचे क्षेत्र शासनाने किती प्रचंड प्रमाणात व्यापले आहे त्याची इतकी तपशीलवार माहिती मी मुद्दामच इथे दिली. यापैकी पुष्कळशा गोष्टी साहित्यिक आणि शिक्षण यांनी केलेल्या मागण्यांमुळे शासनाने हाती घेतल्या आहेत, आणि सरकारच्या उपक्रमांचे एकंदरीत स्वागतच झाले आहे.

हे अनेकविध उपक्रम शासनाने स्वायत्त मंडळांच्या द्वारे केले तर मग तक्रारीला काही जागा रहणार नाही असे यावर अनेकांचे म्हणणे पडेल आणि ते शासनाने तत्त्वत: तरी मान्य केले आहे. अनेक कमीअधिक प्रमाणात स्वायत्त असलेली मंडळे ह्या उपक्रमांची अंमलबजावणी करतात. पण ते तत्त्वत: मान्य केलेले असते ते प्रत्यक्षात उतरतेच असे नाही. आर्थिक क्षेत्रात अनेक संस्था कागदावर स्वायत्त आहेत. पण प्रत्यक्षात त्या जवळजवळ एखाद्या शासकीय विभागाप्रमाणेच चालवल्या जातात. तसेच साहित्यक्षेत्रातील या स्वायत्त मंडळांच्या बाबतीत घडत असणे शक्य आहे. गेल्या वर्षी तर मी ज्याचा अध्यक्ष होतो त्या पुस्तकपरीक्षण मंडळाचे काही निर्णय शासनाने धुडकावून लावले.

पुन्हा अशी मंडळे नुसती स्वायत्त असून भागत नाही. त्या त्या क्षेत्रात त्यांच्याकडे एकाधिकार असले तर पुन्हा अनेक प्रश्न उपस्थित होतात. त्या क्षेत्रातील स्वातंत्र्याचा मग संकोच होऊ शकतो, कार्यक्षमता खालावते, भ्रष्टाचार बोकाळतात, गुणवत्तेला जे महत्त्व द्यायला हवे ते दिले जात नाही, अरेरावी सुरू होते. असे होते आहे की काय यावर नजर ठेवणे आवश्यक असते.

ह्या मंडळांचे कामकाज, तेथील सेवकवर्गाची नियुक्ती, तेथील पैशांचे व्यवहार हे बहुधा शासकीय नियमांनुसार चालतात. तेथील माणसांच्या मनोवृत्तीला एक शासकीय वळण लागते. यामुळे स्वातंत्र्याचा संकोच होत नसला, तरी कार्याची हानी होते.

साहित्याच्या क्षेत्रात हे जे अनेकविध व्यवहार शासन करीत असते, त्यांची सर्वांगीण तपासणी साहित्यिकांनी करणे आवश्यक आहे. यासाठी मंत्री आणि शासननियुक्त मंडळांचे प्रमुख यांच्याशी विचारविनिमय करायला हवा. हे काम जर साहित्य संमेलनात व्हायचे असेल, तर मंत्र्यांनी आणि मंडळ-प्रमुखांनी संमेलनाला उपस्थित राहिले पाहिजे असा आग्रह आपल्याला धरावा लागेल. मंत्र्यांनी साहित्य संमेलनाला उपस्थित राहणे हा गुन्हा न ठरता, त्यांनी तेथे येण्याचे टाळणे हा गुन्हा मानावा लागेल.

साहित्यिकांनी अनुदान न घेता साहित्य संमेलन भरविणे अगर मंत्र्यांनी संमेलनाला येऊ नये असा आग्रह धरणे हे स्वाभिमानाचे निदर्शक खात्रीने आहे. पण त्यातून सध्याच्या परिस्थितीत निष्पन्न असे काहीच व्हायचे नाही. उलट जो संवाद व्हायला हवा तो होणार नाही आणि त्यामुळे साहित्याची हानीच होईल.

साहित्य संमेलनाला मंत्री आणि मंडळप्रमुख आले म्हणजे सगळे काही झाले असे नाही. ते येऊन अरेरावी करू लागले, मोकळेपणाने विचार करण्यात अडथळा आणू लागले, किंवा नुसते हारतुरे घेऊन आणि उपदेशाचे डोस पाजून निघून गेले तर ते अत्यंत बेजबाबदारपणाचे होईल. लोकशाही पद्धतीचे शासन चालविण्यास ते अपात्र आहेत असे ठरेल. म्हणून त्यांनीही अनेक पथ्ये पाळणे आवश्यक आहे. मंत्रिमहोदयांना याची जाणीव करून देणे हे या संमेलनाचा अध्यक्ष या नात्याने माझे कर्तव्य आहे.

शासनाशी संवाद करताना वाद उद्भवणे स्वाभाविक आहे. ते वाद कोणत्या पातळीवर केले जावे याचा थोडा विचार होणे आवश्यक आहे. गेली काही दशके संघटना आणि आघाड्या उभारणे, घोषणा देणे आणि आंदोलने उभारणे, मोर्चे काढून निषेध करणे ह्या गोष्टी साहित्यिकांनी केल्या पाहिजेत—नव्हे, तर ते त्यांचे कर्तव्यच आहे—अशी हवा जगभर आणि या भारतातही निर्माण केली गेली आहे. त्याच्या सामाजिक बांधिलकीचा हा भाग आहे असे प्रतिपादन केले जाते. समाजात जगायचे म्हणजे परिस्थित्यनुरूप या गोष्टी कमीअधिक प्रमाणात कराव्या लागतात हे खरेच. पण या करणे हा साहित्यिकाचा प्रकृतिधर्म नव्हे. उलट ते त्याच्या निर्मितिक्षम प्रकृतीशी विसंगतच असते आणि हे साहित्यिकांचे बलस्थान तर खात्रीने नव्हे. या गोष्टी करणे हीच ज्यांची प्रधान प्रवृत्ती आहे अगर या गोष्टी करण्यात जी अधिक वाकबगार आहेत अशी मंडळी राजकारणासारख्या अन्य क्षेत्रात असतात. ती साहित्यिकाला सहज पराभूत करू शकतात. तो असा पराभूत व्हायला लागला की इतर संघटनाचतुर माणसे त्याच्या मदतीला धावून येतात किंवा अगतिकपणे तो त्यांना बोलावून आणतो; मग साहित्यिकाची बाजू बळकट झाल्यासारखी वाटते. कधी कधी ती यशस्वीही होते. पण त्याच वेळी साहित्यिक अपयशीही झालेला असतो. या माझ्या विवेचनाचा अर्थ असा नव्हे की, साहित्यकांनी कृतिशील असूच नये किंवा संघटितपणे काही करूच नये. पण ते करताना त्यांनी तारतम्य मात्र अवश्य राखले पाहिजे. आपले स्वत्व कशात आहे

त्याचे भान राखले पाहिजे.

संघटनात्मक कार्यात साहित्यिक निसर्गत:च कसा उणा पडतो याची उदाहरणे मराठी साहित्याच्या क्षेत्रात आपल्याला सापडतील. पुन्हा पुन्हा साहित्यिक अशी तक्रार करतात की, साहित्यक्षेत्रातल्या संघटना आमच्या ताब्यात नाहीत, भलतीच माणसे तेथे स्थानापन्न झाली आहेत, आम्हाला जे हवे ते त्या करीत नाहीत. आपल्याकडे ही तक्रार सर्वच माणसे आपआपल्या संस्थांबद्दल करीत असतात ती तक्रार कमीअधिक प्रमाणात खरीही असते, आणि त्या परिस्थितीला ती तक्रार करणारी माणसेच पुष्कळशी जबाबदार असतात हे देखील तितकेच खरे. परंतु साहित्यिकांच्या बाबतीत असे होणे स्वाभाविक असते.

या परिस्थितीवर उपाय काय ? सामाजिक जीवन बहुकेंद्रिक असणे हा त्यावरचा एक उपाय आहे असे मला वाटते आपण समाजवादाच्या नावाखाली ही बहुकेंद्रिकता नष्ट करीत आहोत. उदाहरणार्थ, कोणत्याही शहरात दूरदर्शनचे अगर आकाशवाणीचे एकच शासननियंत्रित केंद्र असते. या केंद्राशी साहित्यिकांचे अगर एखाद्या साहित्यिकाचे जुळले नाही म्हणजे त्या आत्मप्रकटीकरणाच्या साधनांनाच तो पारखा होतो. साहित्यासाठी क्रमिक पुस्तके तयार करणारी शासननियंत्रित संघटना एकच. त्यामुळे एखाद्या साहित्यिकाला मराठीच्या क्रमिक पुस्तकांच्या स्वरूपाबाबत काही नवे धाडसी प्रयोग करावेसे वाटले तर बहुधा तशी संधी मिळत नाही. अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. जीवन बहुकेंद्रिक असले की अनेकविध प्रवृत्तीना वाव मिळतो, संघटनांत स्पर्धा चालू होते आणि निर्मितिक्षम साहित्यिकाला आणि वाचकाला आपल्याकडे ओढण्यासाठी त्या प्रयत्न करू लागतात. मग साहित्यिकाकडे आणि वाचकाकडे याचकाची भूमिका येत नाही.

राजकीय अगर सामाजिक चळवळी करून अशी बहुकेंद्रिकता निर्माण करणे साहित्यिकांना बहुधा शक्य होणार नाही. परंतु या गोष्टीला अनुकूल असे वैचारिक आणि मानसिक वातावरण ते खात्रीने निर्माण करू शकतील. मराठी साहित्यिक या दिशेने प्रयत्न करीत आहेत असे दिसत नाही. उलट समाजजीवनाबद्दलच्या काही विपर्यस्त कल्पनांमुळे ते जीवन अधिक एककेंद्रिक आणि शासननियंत्रित व्हावे असे वातावरण जाणतेपणाने अगर अजाणता निर्माण करीत असताना. हा प्रकार आत्मघातक आहे हे साहित्यिकांनी ओळखायला हवे.

सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनेचे परिणाम साहित्यक्षेत्रातील व्यवहारांवरच केवळ होत नाहीत, ते साहित्यावरही होत असतात. आज मराठी साहित्यातही ते होत आहेत. त्यांचे स्वरूप यथार्थपणे कळण्यासाठी सामाजिक बांधिलकीच्या स्वरूपाविषयी थोडे विवेचन करणे आवश्यक आहे.

मनुष्य समाजातच जगतो. त्याच्या जीवनाची घडण, याचे मनोविश्व, त्याच्या इतर माणसांशी होणाऱ्या व्यवहारांचे स्वरूप आणि त्याविषयीचे संकेत या गोष्टी काही प्रमाणात समाजजीवनाच्या स्वरूपावरूनच ठरतात. त्यामुळे मनुष्याचे आणि त्याच्या

अनुभवांचे चित्रण करताना ज्या सामाजिक संदर्भात तो जगतो त्याचे दर्शनही कमीअधिक प्रमाणात घडत असते. साहित्यात ते घडावे हे स्वाभाविक आहे. लेखक ते सहजगत्या करीत असतो. त्यासाठी सामाजिक बांधिलकीची प्रयत्नपूर्वक जाणीव ठेवण्याची आवश्यकता नसते. ज्या प्रमाणात लेखकाचे कुतूहल जागृत असते, ज्या प्रमाणात त्याच्याजवळ प्रतिभेचे भांडवल असते आणि ज्या प्रमाणात त्याने जीवनाविषयी चिंतन केलेले असते त्या प्रमाणात माणसाच्या व्यक्तित्वाचे, त्याच्या मनोविश्वाचे त्याच्या सामाजिक संदर्भासहित दर्शन घडते.

एखाद्या वेळी लेखकाच्या वाङ्मयीन कुतूहलाचे केंद्र मनुष्याचे सर्व सामाजिक परिस्थितीत येणारे अनुभव असतात वार्धक्यातील विकलता, किशोरावस्थेत होणारे मनोरचनेतील फेरबदल हे अनुभव सर्व समाजस्थितीत येणारे असतात. त्यांच्याबद्दल लिहिताना त्यांच्या सामाजिक संदर्भाला बहुधा प्रधान महत्त्व नसते. त्या अनुभवातील तो गतिमान अगर प्रधान घटक नसतो. साहजिकच त्याला त्या साहित्यकृतीत काहीसे पार्श्वभूमीचे स्थान असते. तोच लेखक एखाद्या अस्पृश्याच्या जीवनातील कोंडमाऱ्याचे चित्रण करीत असताना हा सामाजिक संदर्भ त्यातील गतिमान आणि प्रधान घटक होण्याची शक्यता आहे काही लेखकांना पहिल्या प्रकारच्या अनुभवात अधिक रस वाटतो तर काहीना दुसऱ्या प्रकारच्या अनुभवात अधिक रस वाटतो. दोन्ही प्रकारच्या अनुभवांत सारखाच रस घेणारे लेखकही असतात. ह्यांपैकी पहिल्या प्रकारच्या अनुभवात चित्रणापेक्षा दुसऱ्या प्रकारचे अनुभवांचे चित्रण अधिक मोलाचे, हे वाङ्मयीन निकषांच्या आधारे सिद्ध होते असे मला वाटत नाही.

सामजिक बांधिलकीच्या पुरस्कर्त्यांची भूमिका अशी नाही. त्यांच्या भूमिकेचे मी अनेकदा विस्ताराने खंडन केले आहे. ते पुन्हा इथे करण्यात वेळ न घालवता, त्या भूमिकेतून जे साहित्याच्या दृष्टीने विघातक असे निष्कर्ष काढले जातात त्यांचाच मी येथे परामर्श घेणार आहे

त्यातला एक असा की व्यक्तीच्या सुखदु:खांवर केंद्रित झालेले साहित्य कमी प्रतीचे असते, समाजाच्या अगर सामाजिक परिस्थितीतून निर्माण होणाऱ्या दु:खाचे चित्रण करणारे साहित्य श्रेष्ठ दर्जाचे असते म्हातारपणामुळे भोगाव्या लागणाऱ्या अगर प्रिय पत्नीच्या मृत्यूमुळे होणाऱ्या दु खाचे दर्शन कमी प्रतीचे आणि दारिद्र्यामुळे अगर अस्पृश्यतेमुळे भोगाव्या लागणाऱ्या दु खाचे चित्रण उच्च प्रतीचे.

ही भूमिका किती तर्कदुष्ट आहे ते अगदी उघड आहे. माणसाच्या दु:खांची प्रतवारी लावायचे ठरवले तर जे दु:ख सारे जीवन तीव्रतेने व्यापून टाकते आणि जे अपरिहार्य असते ते उच्च कोटीचे आणि जे सारे जीवन व्यापून टाकत नाही अगर जे परिहार्य असते ते त्या मानाने नीच कोटीचे असे म्हणावे लागेल. वार्धक्य आणि मृत्यू ही मुळी माणसाच्या अस्तित्वाशीच निगडित आहेत. अजूनपर्यंत तरी या गोष्टी अपरिहार्य आहेत आणि यापुढेही त्या बहुधा अपरिहार्य राहणार आहेत. आणि समजा माणसाला

चिरंजीवित्व लाभले तरी त्यातून काही अपरिहार्य व जीवनव्यापी दु:खे निर्माण होणारच आहेत. याउलट दारिद्र्य हे परिहार्य आहे. अनेक देशातून ते नष्ट झाले आहे आणि आपण शहाणपणाने वागलो तर ते आपल्या देशातूनही नष्ट होईल. या परिस्थितीत वार्धक्यातील दु:खांचे चित्रण करणारे साहित्यच मानवी जीवनातील अधिक मूलगामी समस्यांचे चित्रण करणारे आणि म्हणून अधिक उच्च कोटीचे आहे, असे म्हणावे लागेल.

सामाजिक बांधिलकीच्या पुरस्कर्त्यांनी नेमकी याच्या उलट भूमिका आग्रहाने मांडल्यामुळे मराठी साहित्यावर विपरीत परिणाम होत आहे. अनेक साहित्यिक केवळ सामाजिक परिस्थितीतून निर्माण होणाऱ्या दु:खाचेच चित्रण करीत आहेत. मानवी अस्तित्वाशी निगडित असलेल्या अनुभवांकडे त्यांचे दुर्लक्ष होत आहे. पण एवढ्यावरच भागत नाही. सामाजिक परिस्थितीतून निर्माण होणारी जी दु:खे आहेत ती अखेर माणसाच्या मूळ प्रकृतीतूनच निर्माण झालेली आहेत. खाजगी मालमत्तेमुळेच विषमता निर्माण होते असा दावा अनेक वर्षे करण्यात आला. पण आता असे आढळून आले आहे की, ज्या समाजातून खाजगी मालमत्ता नष्ट करण्यात आली आहे, तेथेही विषमता तर आहेच, पण भ्रष्टाचार, वशिलेबाजी, ऐतखाऊपणा या प्रवृत्तीही आहेत. त्यामुळे विषमतेबद्दल लिहिणारा लेखक जर फक्त खाजगी मालमत्तेतून ती निर्माण झाली असे दाखवून थांबला तर त्याचे जीवनाचे चित्रण पुरेसे मूलगामी होणार नाही. अस्पृश्यतेच्या बाबतीत हीच गोष्ट खरी आहे. अस्पृश्यता एका प्रकारच्या समाजरचनेतून निर्माण झाली आहे हे तर खरेच. या गोष्टीचे भेदक चित्रण आज मराठी साहित्यात होत आहे ही अत्यंत स्वागतार्ह गोष्ट आहे. पण अस्पृश्यतेच्या मुळाशी अखेर माणसाची दुसऱ्यावर स्वामित्व गाजविण्याची एक मूळ प्रवृत्ती आहे याचे भान ठेवले नाही तर तिचे चित्रण पुरेसे मूलगामी होणार नाही. सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनांमुळे आज असा प्रकार घडत आहे हे नाकबूल करता येणार नाही. त्यामुळे अनेक प्रतिभावंतांच्या साहित्यकृती जेवढी उंची गाठणे त्यांना शक्य आहे तेवढी गाठत नाहीत.

मध्यमवर्गीय साहित्यिक लहानशा मध्यमवर्गाच्या जीवनाविषयीच लिहितात. समग्र समाजाच्या सुखदु:खांचा विचार ते करीत नाहीत. व्यापक सामाजिक बांधिलकीची जाणीव नसल्यामुळे त्यांची जीवनदृष्टी व्यक्तिकेंद्रित म्हणजेच संकुचित असते. म्हणून त्यांचे साहित्य सामान्यत: निकृष्ट दर्जाचे असते. याउलट कामगारवर्ग, ग्रामीण समाज यांच्या जीवनाचे चित्रण करणारे साहित्य अधिक व्यापक भूमिका घेणारे आणि समाजाच्या खऱ्या सुखदु:खांना वाचा फोडणारे असते. म्हणूनच ते श्रेष्ठ दर्जाचे असते. सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनातून निर्माण झालेली ही जी दुसरी भूमिका मी मांडली तीदेखील तर्कदुष्ट आणि साहित्यावर अनिष्ट परिणाम करणारी आहे.

प्रत्येक लेखक स्वत:च्या अनुभवातून साहित्य निर्माण करीत असतो. तेव्हा ग्रामीण लेखकाने ग्रामीण जीवनाविषयी लिहावे हे जितके स्वाभाविक तितकेच मध्यमवर्गीय

लेखकाने त्याच्या जीवनाविषयी लिहावे हे स्वाभाविक. आणि दोघेही जर केवळ आपल्याच जीवनाविषयी लिहीत असले, समग्र समाजजीवनाचा संदर्भ त्यांच्या साहित्याला नसला तर दोघांचेही साहित्य तितकेच संकुचित आहे असे म्हणावे लागेल. कामगारवर्गातल्या अगर ग्रामीण भागातल्या लेखकाची जीवनदृष्टी मूलत:च अधिक व्यापक असते ही भूमिका भाबडी तरी आहे किंवा अप्रामाणिकपणाची तरी आहे. कामगारवर्गाचे जर समाजजीवनातील पवित्रे पाहिले तर व्यापक समाजहिताचा तो वर्ग स्वभावत:च विचार करतो असे म्हणता येणार नाही. त्या विशिष्ट वर्गाला मला दोष द्यायचा नाही. आज समाजातले सर्वच वर्ग स्वत:च्या पलीकडे बघेनासे झाले आहेत. आपण आपल्या सामाजिक आणि आर्थिक जीवनाला जी विशिष्ट दिशा लावली आहे त्यामुळे हे असे घडत आहे, आणि हा जो चुकीचा मार्ग आपण स्वीकारला आहे त्याला देखील सामाजिक बांधिलकीच्या कल्पनेमागचे समाजविश्लेषण व तत्त्वज्ञान जबाबदार आहे.

मध्यमवर्गीय साहित्य समाजातल्या बहुसंख्य माणसांना आपले वाटत नाही म्हणून त्याला दोषी अगर संकुचित ठरवणे ही सामाजिक बांधिलकीच्या विपर्यम्त कल्पनेतून निर्माण झालेली आणखी एक भूमिका आहे. मध्यमवर्गीय जीवनाचे चित्रण हे आपल्या जीवनाचे चित्रण नव्हे असे एखाद्या ग्रामीण वाचकाला वाटणे स्वाभाविक आहे. पण साहित्य आपले आहे असे वाटण्यापेक्षा त्याच्याविषयी आपुलकी वाटणे, त्यातल्या अनुभवांची आपल्याला उत्कट प्रतीती येणे आस्वादाच्या दृष्टीने अधिक महत्त्वाचे आहे. माडगूळकरांच्या, शंकर पाटलांच्या अगर केशव मेश्रामांच्या कथेत माझ्या जीवनाचे चित्रण नसते, पण पुष्कळशा मध्यमवर्गीय लेखकांनी लिहिलेल्या कथांपेक्षा त्यांच्या कथांविषयी मला जास्त आपुलकी वाटते. नारायण सुर्व्यांच्या कवितेतील अनुभव माझ्या जीवनातले नाहीत. पण माझ्या दृष्टीने ते कधीच श्रेष्ठ मराठी कवीच्या मालिकेत जाऊन बसले आहेत. हे मला जसे वाटते, त्याचप्रमाणे माझ्यासारख्याच्या कथेविषयी आपुलकी बाळगणारे वाचक ग्रामीण भागातच नव्हे तर दलित वर्गातही आहेत. सुदैवाने साहित्याच्या आस्वादकांच्या विश्वात जातिभेद नाही आणि वर्गभेदही नाही. मला वाटते की सामाजिक बांधिलकीची घोषणा करणाऱ्या या मंडळींना साहित्य मुळी वाचताच येत नाही.

ग्रामीण जीवनाचे चित्रण ग्रामीण माणूसच करू शकतो आणि ते ग्रामीण बोलीभाषेतच करता येते अशीही एक विपरीत कल्पना आहे. हा विचार मान्य केला तर स्त्रियांचे चित्रण फक्त स्त्रियांनाच करता येईल असे म्हणावे लागेल आणि पुरुष लेखकाला आपल्या कादंबऱ्यात स्त्रीपात्रे घालण्यास बंदी करावी लागेल. ग्रामीण माणसाला येणारे अनुभव त्याने आपल्या बोलीभाषेत व्यक्त केले तर ते स्वाभाविक आहे. त्यामुळे त्या अनुभवांचे एक विशिष्ट आणि अत्यंत प्रत्ययकारी दर्शन घडते. पण ग्रामीण जीवनाचे चित्रण ग्रामीण मनुष्यच करू शकतो ही भूमिका अतिरेकी आहे. भारतातल्या ग्रामीण

जीवनाचे अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आणि प्रत्ययकारी चित्रण इंग्रजांनीदेखील केलेले आहे. ग्रामीण लेखकांनी केलेल्या चित्रणाइतकेच ते अर्थपूर्ण आणि खरे वाटणारे आहे. आणि ग्रामीण लेखकाला ग्रामीण जीवन पूर्णपणे कळलेले असते हा देखील चुकीचा समज आहे. एखाद्या प्रतिभावंत ग्रामीण लेखकाने या बाबतीत खूप वाचन आणि चिंतन केले असेल तर ते त्याला खात्रीने समजेल. पण एखादा माणूस केवळ खेड्यात राहतो म्हणून त्याला ग्रामीण जीवनाचे संपूर्ण आकलन होईल असे मानणे हे मी अन्न पचवतो म्हणून मला पचनक्रियेचे आकलन झाले असे म्हणण्यासारखेच आहे. मुंबईचे जीवन ज्यांना कळले नाही असे अनेक मध्यमवर्गीय लेखक जसे मुंबईत आहेत तसेच ग्रामीण जीवनाची सर्वांगीण अर्थपूर्ण प्रतीती ज्यांना आलेली नाही असे ग्रामीण लेखक खेड्यात वास्तव्य करून आहेत.

बोलीभाषेबद्दलचा आग्रह असाच अतिरेकी आहे. बोलीभाषांचे सामर्थ्य किती मोठे आहे, अत्यंत व्यामिश्र आणि नाजूक अनुभव त्या किती प्रभावीपणे व्यक्त करू शकतात ते मी साहित्याचा आस्वाद घेताना अनुभवले आहे. पण ग्रामीण लेखक जर सुशिक्षित असेल तर बोलीभाषा हीच केवळ त्याची भाषा राहात नाही. बालकवींची, लो. टिळकांची, आंबेडकरांची आणि इतर अनेकांची भाषादेखील त्याची होते. साहित्याच्या वाचनाने माणसाचे भाषिक विश्व विशाल होते. मी पहिल्याने कविता वाचू लागलो तेव्हा तुकारामाची आणि बालकवींची भाषा कुठे माझी होती ? पण मी त्यांचे साहित्य वाचले आणि त्यांची भाषा माझी झाली. माझ्या बाबतीत जे झाले तेच ग्रामीण लेखकांच्या बाबतीतदेखील होते. अशा वेळी मी केवळ ग्रामीण बोलीभाषेतच लिहीन असा आग्रह ग्रामीण लेखकाने धरणे वेडेपणाचे आहे. त्याचप्रमाणे बोलीभाषेत लिहिताना तिच्यात शहरी भाषेतला एखादा शब्दही येऊ नये असे म्हणण्यातही अर्थ नाही. भाषेला अशी जातीयता मंजूर नाही. प्रत्यक्षात ग्रामीण बोली कित्येक शहरी शब्द आत्मसात करीत असतात. दलित कवींना हे चांगले समजले आहे. त्यांच्या कविता वाचल्या की तुकारामापासून मर्ढेकरांपर्यंत सगळ्यांच्या भाषा त्यांनी आत्मसात केल्या आहेत याचे प्रत्यंतर येते.

ग्रामीण बोलीभाषा नैसर्गिक असते आणि शहरी बोलीभाषा अगर ग्रांथिक भाषा कृत्रिम असते हादेखील असाच एक अपसमज आहे. तसे पाहिले तर भाषा हीच मुळी कृत्रिम असते, आणि कृत्रिम वाटणारी शहरी भाषा अगर ग्रांथिक भाषा मुळात निरक्षर असणाऱ्या ग्रामीण माणसांनीच समाजजीवनाचा विकास होत असतानाच निर्माण केलेली असते. विशिष्ट व्यवहार करताना अगर व्यक्त करताना बोलीभाषा वापरणे त्यांना गैरसोयीचे म्हणजेच कृत्रिम वाटते म्हणून ते भाषेची ही नवी रूपे निर्माण करतात. त्या व्यवहारापुरती ती कृत्रिम भाषाच नैसर्गिक असते. भाषा कृत्रिम की नैसर्गिक हे असे एकदाच कायमचे ठरवून टाकता येत नाही. ज्या संदर्भात, ज्या कार्यासाठी ती वापरली जाते, त्यावरून ती त्या त्या वेळी कृत्रिम अगर नैसर्गिक ठरत असते. ही अगदी

प्राथमिक गोष्ट आज पटवून देणे भाग पडावे हे कृत्रिम विचाराच्या आधीन मनुष्य झाला म्हणजे काय होते त्याचे निदर्शक आहे.

या संदर्भात असा एक विचार मांडला जातो की बोलीभाषा जशी प्रत्यकारी असते तशी ग्रांथिक अगर शहरी मराठी नसते. आणि भाषा जर संस्कृतप्रचुर असली अगर इंग्रजी धाटणीची असली तर मग अस्सल मराठी अनुभव व्यक्त करण्याची तिची क्षमता जवळजवळ नष्टच होते. ग्रामीण भाषा मला परकी, पण ती जर माझ्या बाबतीत प्रत्ययकारी ठरते तर संस्कृतप्रचुर भाषा ग्रामीण माणसापर्यंत का जाऊन पोहोचणार नाही ? ज्ञानेश्वरी काय ग्रामीण भाषेत लिहिलेली आहे ? ती मग कशी खेड्यातल्या माणसांच्या हृदयात प्रवेश करते ? आणि अस्सल मराठी अनुभव कोणते ? ट्रॅक्टर चालवणे अगर निवडणुकीत मत देणे हे अस्सल मराठी अनुभव आहेत की नाही ? विहिरीवरची इलेक्ट्रिक मोटार चालवणे हा अनुभव मराठी माणसेच घेतात ना ? मग भाषेची इंग्रजी घाटणी आली तर अस्सल मराठीपणाला कसा बाध येतो ? साहित्याच्या क्षेत्रात हे स्वदेशीचे तत्त्व अशा विपरीत स्वरूपात लागू करण्याचा प्रयत्न गंभीरपणे केला जावा आणि त्याला अनेकांनी मान डोलवावी हा प्रकार आश्चर्यकारक आहे. अस्पृश्यता आता समाजजीवनातून चालली तेव्हा साहित्याच्या क्षेत्रात ती आणावी अशी ओढ काही पुरोगामी मंडळींना लाभलेली दिसते.

अस्सल मराठी वास्तव समजून घेण्यासाठी अगर व्यक्त करण्यासाठी अस्सल मराठीचाच वापर केला पाहिजे अशी भूमिका घेतली तरी देखील अनेक घोटाळे निर्माण होतात. सामाजिक वास्तव समजून घेण्यासाठी ज्या आधुनिक संकल्पनांची आणि मूल्यव्यवस्थांची गरज आहे; त्याच मुळी अस्सल मराठीत नाहीत. त्यांच्याशी मिळत्याजुळत्या अशा ज्या काही गोष्टी मराठीत आहेत त्यांचा वापर करून जर काम भागवायचे म्हटले तर फार गोंधळ उडेल. उदाहरणार्थ, क्रांती ही संकल्पना आपण आज ज्या अर्थाने वापरतो तो अर्थ कोणता अस्सल मराठी शब्द व्यक्त करील ? अशा परिस्थितीत अस्सल मराठी शब्द वापरण्याचा आग्रह धरला तर वास्तवाची कमअस्सल अभिव्यक्ती करावी लागेल.

सामाजिक वास्तवाचे बांधिलकीच्या नैतिक भूमिकेवरून दर्शन घडविणे हे साहित्याचे कार्य आहे असे मानणाऱ्यांची सामाजिक वास्तवाची जाण किती यथायोग्य आहे आणि त्यांची भूमिका समाजाच्या दृष्टीने कितपत हितकारक आहे हे देखील तपासून पाहिले पाहिजे. त्या दृष्टीने पाहिले तर सामाजिक वास्तवाचे त्यांना यथार्थ आकलन झाले आहे असे म्हणता येणार नाही. आज समाजात फार दारिद्र्य आहे, सामाजिक व आर्थिक पिळवणूक आणि विषमता आहे यावरच त्यांचा भर दिसतो. आज समाजात एवढेच घडत नाही. आज आपल्या देशात मोठ्या प्रमाणावर औद्योगिकीकरण होत आहे. शेतीची लक्षणीय प्रगती आहे. अनेक नव्यानव्या क्षेत्रांत माणसांच्या उपक्रमशीलतेला वाव मिळत आहे. पूर्वी शिक्षणाला जे पारखे होते अशा अनेक वर्गांना

शिक्षण मिळत आहे. त्यातल्या अनेक व्यक्तींना नोकऱ्या मिळत आहेत, अनेक क्षेत्रात संधी मिळत आहेत, मानाची व अधिकाराची स्थाने मिळत आहेत. हिंदू समाजातदेखील मोठे परिवर्तन होत आहे. मनूची जागा हिंदू कोड बिल तयार करणाऱ्या डॉ. आंबेडकरांनी घेतली आहे. स्त्रिया पुरुषांच्या बरोबरीने अनेक क्षेत्रात कार्य करीत आहेत. या गोष्टीकडे बांधिलकीचे पुरस्कर्ते बहुधा दुर्लक्षच करतात. या मंडळींच्या दृष्टीने विषमता नष्ट करण्याचे राजमार्ग म्हणजे कामगार चळवळ आणि राष्ट्रीयीकरण. ह्या दोन गोष्टी समाजहितकारक असतातच असे नाही असे आपल्याला आढळून येते आहे. आर्थिक प्रगतीची सर्व जबाबदारी शासनावर टाकली म्हणजे त्यातूनही अनेक गंभीर समस्या निर्माण होतात असे दिसून येते आहे. विषमता नष्ट करण्यासाठी सतत संघर्षच करीत राहिले तर कायदा व सुव्यवस्था खिळखिळीत होते, आर्थिक प्रगतीला खीळ बसते आणि त्यामुळे विषमता अधिकच वाढते असे आढळून येत आहे. आजचे सामाजिक वास्तव अत्यंत व्यामिश्र आहे. पण या मंडळींना दिसते फक्त विषमता आणि दारिद्र्य. त्यावर उपाययोजना कोणती याविषयीच्या यांच्या कल्पनादेखील चुकीच्या आहेत.

सामाजिक वास्तवाकडे हे विचारवंत ज्या नैतिक भूमिकेवरून पाहतात ती अशीच सदोष आहे. विषमतेला विरोध करणे, ज्यांच्यावर अन्याय होतो त्यांच्याविषयी सहानुभूती वाटणे हे स्वागतार्हच आहे. परंतु अन्यायाविरुद्ध लढा देण्याचे कंकण बांधणाऱ्या माणसांना अनेकदा सर्वत्र अन्यायच दिसू लागतो. ज्या गोष्टीचा सरळ अर्थ लावणे शक्य आहे त्यांचाही विपरीत अर्थ ते लावतात. लेखकाची शैली अनुभवानुरूप काहीशी संस्कृतप्रचुर झाली तरी तोदेखील सामाजिक अन्यायाचाच एक भाग आहे असे आवेशाने प्रतिपादन केले जाते. ज्या कोणा लोकांच्या हाती सत्ता अगर संपत्ती असेल ते सर्व केवळ स्वार्थी आहेत, सद्भावनेला संपूर्ण पारखे झालेले आहेत असा निष्कर्ष काढला जातो. त्यांची व्यंगचित्रे काढली जातात, सगळ्या उच्च मध्यमवर्गीय स्त्रिया अतिविशाल महिला ठरतात. सगळ्या गरिबांना ते गरीब आहेत तो सर्वस्वी दुसऱ्यांचाच गुन्हा आहे असे पटवून दिले जाते. आपली गरिबी दूर करण्यासाठी आपणही काही करायचे असते याची जाणीवच करून दिली जात नाही. समाजात विलक्षण विद्वेषाचे वातावरण निर्माण केले जाते. संघर्षांना प्रोत्साहन दिले जाते. सर्व प्रश्नांना संघर्ष हेच उत्तर ठरते. जे आहे ते नष्ट केले पाहिजे असा ध्यास माणसे घेतात. वाईट गोष्ट नष्ट केली की तिच्या जागी अधिकच वाईट गोष्ट येण्याची शक्यता आहे हे ध्यानातच घेतले जात नाही.

सगळ्यांनी विषमतेविरुद्ध आणि अन्यायाविरुद्ध लढाच देत राहिले पाहिजे असा आग्रह धरला जातो. माणूस म्हणजे मुंगी नव्हे, केवळ समाजाकरिता जगणे हा त्याचा प्रकृतिधर्म नव्हे, इतकेच नव्हे तर नैतिक दृष्ट्याही ते आवश्यक नाही याचेही भान राहात नाही. एका बाजूने विज्ञान, साहित्य इत्यादींची स्वायत्तता मान्य केली जाते आणि दुसऱ्या बाजूने साहित्य स्वायत्त असूच कसे शकत नाही, त्याने सामाजिक

बांधिलकी मानणे कसे आवश्यक आहे त्याचे प्रतिपादन केले जाते. केवळ कुतूहलापोटी शास्त्रीय संशोधन अगर साहित्यनिर्मिती करणाऱ्याला आपण काहीतरी मोठा गुन्हा करीत आहोत असे वाटावे, अशा प्रकारचे वातावरण निर्माण केले जाते.

अशी दुराग्रही भूमिका सर्वच माणसे घेऊ लागली की सामाजिक बांधिलकीच्या नावाखाली सारे जीवन राजकारणग्रस्त होते, मग साहित्यात राजकारण येणे अपरिहार्य आहे, आवश्यक आहे अशी भूमिका घेतली जाते. सत्ताधारी पक्ष आणि विरोधी पक्ष असे दोघेही ही भूमिका घेतात, मात्र प्रत्येकाला असे वाटत असते की, आपण साहित्यात आणतो ती सामाजिक बांधिलकी आणि प्रतिपक्ष आणतो ते घाणेरडे राजकारण ! या भाषणाच्या सुरुवातीला मी ज्या प्रश्नांचे विवेचन केले ह्यांचे मूळ साहित्याकडे आणि समाजजीवनाकडे पाहण्याच्या या दृष्टीत आहे.

मराठी साहित्यावर या भूमिकेचा अपरिहार्यपणे अनिष्ट परिणाम झाला आहे. विद्वेषाने भारलेल्या कवितांचे पेवच साहित्यात फुटले आहे. काही विशिष्ट प्रकारचे अनुभव साहित्याचे विषय होत आहेत. काही ठरावीक आगंतुक साच्यात सारे अनुभव कोंबले जात आहेत. सामाजिकतेच्या नावाखाली अनुभवांना, व्यक्तिचित्रांना ढोबळ आणि बटबटीत स्वरूप दिले जात आहे. विद्वेषाचे फूत्कार सोडीतच लेखकाने साहित्यनिर्मिती केली पाहिजे असा अपसमज फैलावतो आहे. अनुभव तळमळीत बुचकळला म्हणजे तो पावन झाला असे मानले जात आहे.

रसिकहो, या माझ्या विवेचनावरून आपला कदाचित असा ग्रह होईल की सारे मराठी साहित्यच या सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनेच्या आहारी गेले आहे. सुदैवाने तसा प्रकार झालेला नाही. साहित्य हे एक खऱ्या अर्थाने स्वायत्त क्षेत्र आहे, कलात्मक निर्मिती ही एक स्वतंत्र स्वयंभू प्रेरणा आहे, साहित्याची मूल्ये स्वतंत्र आहेत ही भूमिका मराठी साहित्यात आज अनेक वर्षे दृढमूल झालेली आहे. शिवाय जे मराठी साहित्यिक समाजहितबुद्धीने लिहितात, ते देखील आपल्या कलेशी कळत न कळत इमान राखतात. आणि जे खरे प्रतिभावंत असतात त्यांनी बाह्यत: जरी असल्या कल्पनांचा स्वीकार केला, तरी साहित्यानिर्मिती करताना ते प्रतिभा दाखवील त्याच मार्गाने जातात. मुख्य म्हणजे एखाद्या लाटेबरोबर वाहून जायचे नाही, पण पाय रोवून जागच्या जागी खंबीरपणे उभे राहायचे ही वृत्ती महाराष्ट्रात पहिल्यापासून आहे. आजही ती नष्ट झालेली नाही.

मराठी साहित्यातली एक अत्यंत स्वागतार्ह घटना ही की पूर्वी जे मूक होते ते आता शिक्षण मिळाल्यामुळे लिहू लागले आहेत, आपले अनुभव साहित्यात व्यक्त करू लागले आहेत. त्यातले अनेक आपल्या बोलीभाषात लिहितात. साहित्याच्या क्षेत्रात बोलीभाषा अस्पृश्य आहेत अशी भूमिका पूर्वीदेखील क्वचितच कोणी घेतली असेल: त्यांचे स्वागत करायला पूर्वीही अनेक साहित्यिक तयार होते. परंतु त्या भाषात तेव्हा

लिहिले जात नव्हते. आता लिहिले जात आहे. त्यामुळे मराठी साहित्य व त्याची भाषा समृद्ध होत आहे.

पूर्वी परिस्थितीमुळे जे मूक होते त्यांना सुरुवातीला या सामाजिक बांधिलकीच्या तत्त्वज्ञानाचे आकर्षण वाटावे हे स्वाभाविक होते, नव्हे ते आवश्यकच होते. पण त्या काळातही त्यांच्यातले जे प्रतिभावंत होते, त्यांना त्यांच्या प्रतिभेने या तत्त्वज्ञानाच्या सापळ्यात पूर्णपणे अडकू दिले नाही. आणि आता तर सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त तत्त्वज्ञानाच्या आहारी गेले म्हणजे साहित्यात फारच तोचतोचपणा आणि बटबटीतपणा येतो हे त्यांना जाणवले आहे. त्यामुळे तोंडाने जरी ते सामाजिक बांधिलकीचा उद्घोष करीत असले, तरी प्रत्यक्षात अधिकाधिक जाणत्या कुतूहलाने जीवनाकडे पाहू लागले आहेत. केवळ विद्रोही कविता लिहून त्यांचे आता समाधान होत नाही. आता निरनिराळ्या गद्य साहित्यप्रकारांकडे ते वळत आहेत. प्रांजळ आत्मकथा लिहीत आहेत. केवळ घोषणातून, जीवनाविषयीच्या सर्वसामान्य भेदक विधानातून गद्य निर्माण होऊ शकत नाही. केवळ संतापाच्या ऊर्मीवर स्वार होऊन गद्य लिहिता येत नाही. त्यात मानवी व्यवहारांचा, स्वभावविशेषांचा, व्यक्तिमत्त्वाचा तपशील यावा लागतो. ह्या तपशिलाचे तपमान एकच नसते, तो ठरावीक आकारातच चपखल बसत नाही, त्याचा तोचतोचपणा अगर बटबटीतपणा नादाच्या ठसक्यात अगर संतापाच्या लोटात छपविता येत नाही. या गोष्टीचा प्रत्यय या नव्याने साहित्याच्या क्षेत्रात प्रवेश करणाऱ्या साहित्यिकांना येत आहे. त्यामुळे त्यांच्या साहित्याला अधिक सच्चेपणा येत आहे. त्याला अधिक विविधता आणि संपन्नता प्राप्त होत आहे.

मात्र अजूनही वाटते की या वर्गातील व्यक्तींच्या कौटुंबिक जीवनात, समाजजीवनात आणि मनोरचनेत असे अनेक अनुभव आहेत की, ज्यातून उत्कृष्ट साहित्य निर्माण होऊ शकेल. प्रतिभावंताच्या नैसर्गिक कुतूहलाने फक्त त्या अनुभवांचा शोध घेतला पाहिजे. दुसरे असे जाणवते की दलित स्त्री अजून मनमोकळेपणाने लिहू लागली नाही. ज्या सहजतेने लक्ष्मीबाई टिळकांनी अगर बहिणाबाईंनं लिहिले, त्या सहजतेने एखाद्या दलित स्त्रीने लिहायला हवे. मी अशा लेखनाची उत्सुकतेने वाट पाहात आहे. विविध उपेक्षित वर्गाच्या जीवनात विनोदाचे केवढे तरी भांडार आहे. या मंडळीशी बोलताना मला हे पुन: पुन्हा जाणवते. हे विनोदाचे भांडार मराठी रसिकांना कोणीतरी खुले करायला हवे. हा विनोद साहित्य म्हणून मोलाचा असेलच, पण तो या वर्गातल्या लेखकांच्या इतर लेखनावरही चांगला परिणाम करील.

बापूसाहेब माटे, र. वा. दिघे, व्यंकटेश माडगूळकर यांच्यासारख्या तोलामोलाच्या साहित्यिकांनी निर्माण केलेले ग्रामीण साहित्य सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनेच्या आहारी जाऊन आपले कलेचे भान विसरेल अगर त्यातले कुतूहल मरून जाईल हे शक्यच नव्हते. पण ते देखील सामाजिक बांधिलकीच्या लाटेत काही प्रमाणात सापडले

आहे. त्यामुळे ग्रामीण अनुभवांची नवी नवी क्षेत्रे ते पादाक्रांत करीत असले तरी आधीच्या ग्रामीण साहित्याने गाठली ती कलात्मक उंची ते गाठीत नाही असे वाटते. ही परिस्थिती बदलावी इतके प्रतिभेचे देणे या आजच्या ग्रामीण साहित्यिकांजवळ खात्रीने आहे. महानोर या लाटेत कधी तसे सापडले नाहीत. त्यामुळे त्यांची कविता किती उंची गाठते पाहा.

शहरातील लेखकांच्या साहित्यात एक प्रकारची मरगळ आली आहे हे खरे. जी. ए. कुळकर्णी, आरती प्रभु इत्यादी लेखकांनी ज्या तोलामोलाची कामगिरी केली तशी कामगिरी करणारे आज कोणी  दिसत नाहीत. हे लेखक सामाजिक बांधिलकीच्या लाटेत सापडलेले नव्हते याची मुद्दाम नोंद करायला हवी. आपल्या शहरी मध्यमवर्गातून सतत चांगले लेखक निर्माण होत आहेत. ती निर्मिती यापुढे खुंटेल असे मानण्याचे काहीच कारण नाही. आता तर कामगारवर्गातून आणि झोपडपट्टीतूनही तोलामोलाचे लेखक निर्माण व्हायला लागले आहेत. त्यांच्याकडून साहित्याचे सकस आणि भरघोस पीक येईल याबद्दल शंका नाही.

मराठी नाटकांच्या क्षेत्रात १९५५ ते १९७० या काळात लक्षणीय निर्मिती झाली. त्यानंतर आता हे क्षेत्र थंडावल्यासारखे झाले आहे. प्रायोगिक रंगभूमीच्या चळवळीने बऱ्याच अपेक्षा निर्माण केल्या होत्या. पण प्रायोगिकतेच्या साचेबंद आणि सामाजिक बांधिलकीच्या विपर्यस्त कल्पनांनी तिला गुदमरून टाकले आहे असे वाटते. साहित्यातील ऊर्मींची चळवळ झाली की बहुधा असेच होते.

नाटकाच्या क्षेत्रात जी मरगळ जाणवते तीच विनोदाच्या क्षेत्रात जाणवते. विनोद हा अनुभवातून निर्माण होतो, ठराविक साच्यात तपशील ओतून तो निर्माण करायचा नसतो हे विसरले म्हणजे असेच होते. रामनगरी हे पुस्तक मात्र या क्षेत्रातील लक्षणीय भर आहे.

आजच्या मराठी साहित्याचे हे धावते दर्शन म्हणजे आढावा नव्हे. ते सर्वांगीण आणि सर्वांना न्याय देणारे असेल हे शक्यच नाही. तो माझा दावा नाही. माझ्या मर्यादित वाचनातून ज्या प्रतिक्रिया झाल्या त्यांची माझ्या मुख्य विवेचनाच्या संदर्भात फक्त नोंद केली आहे.

मराठी साहित्याच्या क्षेत्रातील इतर काही घडामोडींचा निर्देश हे भाषण संपवण्यापूर्वी करणे मला आवश्यक वाटते. एक म्हणजे ग्रंथालय चळवळीचा होत असलेला विस्तार. ग्रंथालयांची संख्या तर वाढत आहेच. शिवाय ही ग्रंथालये वाचनाची आवड समाजात निर्माण व्हावी म्हणून अधिकाधिक उपक्रम हाती घेऊ लागली आहेत. या ग्रंथालयांचे प्रश्न व त्यांचे आरोग्य यांच्याकडे आपण लक्ष देणे आवश्यक आहे. या सार्वजनिक ग्रंथालयांच्या जोडीलाच खाजगी वाचनालयेही मोठ्या प्रमाणात अस्तित्वात आली आहेत. त्यांचे महत्त्व आपण ओळखले पाहिजे. पुस्तकांच्या किंमती एका बाजूला वाढत असताना, वाचकांना स्वस्त किंमतीत पुस्तके मिळावी म्हणूनही अनेक योजना आणि संस्था आता अस्तित्वात येत आहेत. त्यांचीही नोंद आपण घ्यायला हवी. प्रत्येक मराठी

कुटुंबाच्या घरी एक छोटासा ग्रंथसंग्रह असावा यासाठी अधिकाधिक प्रयत्न होणे आवश्यक आहे. मराठी चित्रपटांना नवे जीवन लाभावे यासाठी अनुकूल वातावरण आता निर्माण झाले आहे. त्यामुळे उच्च दर्जाच्या चित्रपटांच्या निर्मितीची खंडित झालेली परंपरा आता पुनरुज्जीवित होईल अशी आशा वाटू लागली आहे.

रसिकहो, या संमेलनाचे अध्यक्षस्थान देऊन आपण माझा जो गौरव केला आहे त्यामुळे मी भारावून गेलो आहे. एवढा मोठा गौरव केल्यावर, माझ्याकडून आपल्या तितक्याच मोठ्या अपेक्षा असणे साहजिकच आहे. या भाषणाने आणि अन्य प्रकारे मी त्या कितपत पूर्ण करू शकेन याबद्दल मी पहिल्यापासूनच साशंक आहे. आपणही आता साशंक झाला असाल. माझी विनंती एवढीच आहे की माझ्यात ज्या काही उणिवा आहेत त्यांची भरपाई हे संमेलन यशस्वीपणाने पार पाडून, आणि साहित्याच्या क्षेत्रात उत्साह, सौहार्द आणि डोळस रसिकता अधिक प्रमाणात निर्माण करून आपण करावी. हे साहित्य संमेलन सगळ्या रसिकांचे आहे. ते तसेच यापुढेही राहील असा मला विश्वास वाटतो तो आपल्यामुळे.

★ ह्या भाषणातील दुसरा कंसात घातलेला परिच्छेद मी प्रत्यक्ष भाषण करताना वाचला नाही. कारण संमेलनाला मंत्री उपस्थित राहिले नाहीत.

# अंबाजोगाई : १९८३

# व्यंकटेश माडगूळकर

साहित्यप्रेमी रसिक हो,

मराठवाडा ही मराठी साहित्याची जन्मभूमी आहे. महात्म्यांची खाणच अशा ह्या भूमीत, आजपासून सुरू होणाऱ्या शब्दांच्या उत्सवात आपण माझी अध्यक्ष म्हणून निवड केलीत हे माझं भाग्य आहे. आपण केलेल्या ह्या गौरवाबद्दल मी आपणा सर्वांचा अतिशय आभारी आहे.

माझ्यासमोरच्या सभाजनात साहित्यिक आहेत, साहित्याचे शिक्षक आणि अभ्यासक आहेत, त्याप्रमाणं बहुसंख्येनं साहित्यप्रेमी, रसिक वाचकही आहेत. साहित्याबद्दल, साहित्यनिर्मितीबद्दल, साहित्याच्या प्रयोजनाबद्दल ऐकण्यासाठी आपण उत्सुक आहात, आणि ह्या जबाबदारीचा मोठाच बोजा माझ्या मनावर येऊन पडलेला आहे. मी साहित्यशिक्षक नाही, समीक्षक नाही, तर निव्वळ सर्जनशील गद्य साहित्यिक आहे. जेवढं प्रचितीचं आहे तेवढंच सांगण्याकडं माझा आजवर कल राहिलेला आहे. सोलापूर जिल्हा साहित्य संमेलनाच्या वेळी, गोमंतक साहित्य संमेलनाच्या वेळी आपण ते ऐकूनही घेतलं आहे, ही आठवण माझ्या मनाला धीर देते आहे.

मी कुठून कुठं आलो, कसा जगलो, कसा चाललो, यासंबंधी काही वेचक भाग मी सांगितला, तर मी आजवर जे लिहिलं त्यावर काही प्रकाश पडेल असं मला वाटतं. आणि हा प्रकाश एकूणच साहित्य नावाच्या वस्तूकडं पहायलाही उपयोगी पडण्याचा संभव नाकारता येणार नाही.

पहिली गोष्ट अशी की, साहित्यिक असतो, होत नाही. जितक्या स्वाभाविकपणे केळीला घड येतो तितक्याच स्वाभाविकपणे त्याच्याकडून लेखन होतं. जमिनीचं कवच फोडून वर उसळून येणाऱ्या केळीच्या रसरशीत कोंलातच घडाचं आश्वासन असतं. असा तो मुळातच असला म्हणजे आजूबाजूच्या वातावरणाचा लाभ त्याला मिळतो.

आज वयाच्या पन्नाशीनंतर मी जेव्हा मागं वळू पहातो तेव्हा मी जिथं वाढलो तिथलं वातावरण, माझ्या लेखनाच्या संदर्भात मला नव्यानं जाणवतं. माणदेशातल्या वैराण मुलखात, बाराशे वस्तीच्या एका लहान गावात धाब्याच्या घरात माझा जन्म झाला आणि वयाची जवळजवळ अठरा वर्षं मी तिथंच काढली. अठराशे वीस साली,

सर्जन कोट्स नावाच्या कोणा अभ्यासकानं, पुण्याजवळच्या लोणी गावाचं केलेलं वर्णन आज आपण वाचतो. एकोणीसशे तीस पस्तीस साली माझं गावही तसंच होतं. कोट्सचं निरीक्षण आश्चर्यकारक आहे. गावगाडा, जातीजमाती, पीकपाणी, याबद्दलची त्याची निरीक्षणं आपल्याला स्तिमित करतात. लोणी गावात बहिरोबासारखी किती देवस्थानं होती, त्यांची ख्याती कशाबद्दल होती, हे सांगणारा कोट्स, गावात भुतं किती आणि कुठं कुठं होती, हेही सांगतो, जातीजमातीबद्दल सांगताना गावात गुलामांची घरं होती आणि गावचा वाणी आपल्या दुकानात कस्तुरीही ठेवत होता, हा बारकावा तो विसरत नाही. माझ्या गावातही सापाचं विष उतरवणारा देव होता, जातीजमाती होत्या, भुतंखेतं होती, पण गुलामांची घरं मात्र नव्हती. आणि वाण्याचं तर गावात दुकानच नव्हतं. काड्याची पेटी खरेदी करायची असली तरी पाच मैल अंतरावर असलेल्या तालुक्याच्या गावी जाऊन आणावी लागे. काड्याच्या पेटीची चैनही अनेकांना परवडत नसे. गावचे पाटील चिलीम पेटवण्यामाठी चकमकीचा उपयोग करत, चूल पेटवण्यासाठी लागणारा विस्तू शेजाऱ्याकडून आणला जाई आणि संध्याकाळी दिव्यावर दिवा पेटवूनच घरोघरी काळोख उजळला जाई.

गावात ब्राह्मण जातीची आठ घरं होती, पण त्याची वेगळी आळी नव्हती. तीन घरं महारवाड्यालागून होती. आमच्या तीन घरांना रामोसवाड्याचा शेजार होता आणि दोन घरं पार ओढ्याकाठी, मुलाणी, मोमीन, कुंभार आणि कुणबी यांच्या शेजाराला होती. आमच्या घरामागं घर असलेले सोनारबाबा, त्यांची बागेसरी पेटवण्यासाठी विस्तू आमच्या घरून घेऊन जात. जातीनं कुणबी असलेली सुंदराबाई आमच्या समईवर आपला लामणदिवा पेटवून तो पदराआड सांभाळत आपल्या घरापर्यंत जाई. गालफुगीनं कोणी मूल आमच्या घरी आजारी असलं की सखा रामोशाला बोलावणं जाई. तो अंथरुणावर पाय न ठेवता, पोराच्या मानेला मसाज करी आणि हळुवारपणं त्याच्या मानेची हाडं मोडी. झाडावरून पडून हाताचं हाड मोडलं तरी ते बसवण्याचं कसब ह्या माणसापाशी होतं. हाडाजवळ माणूस कसा असतो, ह्याची माहिती त्यानं करून घेतली होती.

माझे खेळगडी होते त्यात कुणबी, रामोशी, मुलाणी, मोमीन, महार, न्हावी, सुतार यांची मुलं होती. मुसलमानाच्या अकबऱ्या आणि अबदुल्याकडून मी, ओढ्यातल्या धारेतले लहान मासे शेवाळाखाली दडले असताना, गप्पकन दोन्ही हाताचे पंजे टाकून कसे धरावेत, हे शिकून त्यात प्राविण्य मिळवलं होतं. शिवाय, झाडाच्या ढोलीतली राघूची पिलं कशी काढावीत, रानातल्या जनावराचा माग कसा काढावा, घोरपडीची बिळं कशी उकरावीत आणि गलोलीनं पारवे कसे टिपावेत, गर्द झुडपात लागलेलं मधाचं पोळं, माशा चावून न घेता कसं काढावं, ही वनविद्या त्यांच्याकडूनच मी शिकलो. कुणब्याच्या मुलांनी गुरं कशी वळावीत, गाजरं, रताळी कशी खांदावीत, आणि पिकातलं तण कसं खुरपावं, हे शिकवलं. महारांच्या मुलांबरोबर शेरडं राखण्यासाठी

रानात गेल्यावर बोरं, जांभळं, कवठं, कांगुण्या आणि गोंदणी हा रानमेवा कुठं आणि कोणत्या दिवसात मिळवता येतो, शेंदण्या, निवडुंगाची बोंडं कशी खावीत, आणि रानात आपोआप येणाऱ्या चिघळ, तांदुळजा, सराटे, कडवंच्या ह्या भाज्या वेचून घरी कशा आणता येतात, पीक निघून गेल्यावर मोकळ्या रानात हरबरा, शेंगा, खपली ह्याचा सरवा कसा वेचता येतो, हे शिकलो. न्हाव्याच्या संकऱ्यान मला वाळूत कुस्ती खेळायला शिकवलं, पोहायला, झाडावर चढायला शिकवलं. ह्या खेळगड्यांच्या नादानंच उरूस, जत्रा, कुस्त्यांचे फड, कोल्हाटी, गारुडी, दरवेशी यांचे खेळ मी आवडीनं पाहिले.

शेतकामाशी निगडित असे अनेक सण, उत्सव, समारंभ आपल्याकडं आहेत. बेंदुगसारखा बैल, गाई, म्हशी, शेळ्या, मेंढ्या यांच्याविषयीची कृतज्ञता व्यक्त करगारा उत्सव आहे; नवं अन्नधान्य घरी आल्यावर, प्रवेशद्वारी लोंब्या आणि कणसाचं तोरण लावून साजरा करण्याचा 'नव्याची पुनव' हा उत्सव आहे; फेट्यात नव्या धान्याच्या पात्यांचे तुरे खोवण्याचा सण दसरा आहे; शिवाय पेरणी, काढणी, मळणी, इर्जाक आहे. ह्या सर्वात खेळगड्यांच्या बरोबर मी रमलो. ज्वारीचा हुरडा, गव्हाचा हुरडा, ओल्या शेंगा, मक्याची कणसं, हरबऱ्याचा हावळा, असे इष्टमित्रांनी एकत्र येऊन साजरे करण्याचे 'चवीचे उत्सव' मी साजरे केले.

माझ्या ह्या खेळगड्यातले काही गोष्टीवेल्हाळ होते. गावातल्या घडामोडींचा वृत्तांत ते फार रसाळपणानं सांगत. गोंधळ्याच्या किंवा भोरप्याच्या गोष्टीत जसा सुरस आणि चमत्कारिकपणा असतो तसा त्यांच्या ह्या वृत्तान्तात असे. सहजासहजी हाती न लागणारा असा निरागस विनोदही त्यात असे.

बलवडीच्या नदीकडून संध्याकाळी गावाकडं परत येणारा गोंदा एकवार मला दिसला. त्यानं धोतर खोचलेलं होतं. त्याच्या हातात मळकी पिशवी होती आणि पाठीवर गळदांडी होती. हा नदीला माशासाठी गेला असावा आणि एखादा मरळ मासा किंवा वांब ह्याच्या गळाला लागलेली असावी, असं वाटून मी विचारलं,

'काय गोंदा, माशाला गेला होता ?'

'होय जी.'

'काय मिळालं ?'

तेव्हा हा हसून म्हणाला,

'काहीच नाही. आज नदीला एकादस होती !'

आज मला वाटतं कीं, मी ह्या सर्वांचं देणं लागतो आणि ते अनेक गोष्टींबरोबर शैलीचंही आहे. साधेपणा, निरागसता, जोम ही शैलीची भूषणं, गुऱ्हाळावर बोलवून रस द्यावा तशी त्यांनीच मला दिली आहेत. आज लोक मला विचारतात, 'लोककलांकडंही तुमचा ओढा दिसतो तो कसा ? केव्हापासूनचा ?' आपण लोक पिंडानं वाचक नाही,

श्रोतेच आहोत. 'वेलरेड्' ह्या इंग्रजी शब्दाला समानार्थी म्हणून आपण 'बहुश्रुत' हा शब्द वापरतो. आपण घरात आदित्य राणुबाईच्या कहाण्या ऐकल्या. देवळात हरिकथा ऐकल्या. पटांगणांत गोधळ, जागर, सोंगी, भारूड, भेदिक, तमाशा, लळित ऐकलं. ऐकण्याची आपली ही आवड आणि गरज ध्यानात घेऊन अनेक फिरस्ते, वासुदेव, बाळसंतोष, भराडी, वाघ्ये, काशीकापडे, रामदासी, भोरपी आपल्या दारात येऊन साधुसंतांचे, संतमहात्म्यांचे बोल आपल्याला गाण्याबजावण्यातून, ठोकेबाण्यातून ऐकवत आणि ते भक्तिभावानं ऐकून घेऊन आपण त्यांना पसाकुडता धान्य, पिठाची मूठ संतोषानं देत असू. दुसरं महायुद्ध आलं आणि सामाजिक जीवनात बऱ्याच उलथापालथी झाल्या. मका आणि मिलो हे धान्य रेशनवर मिळू लागलं. लोकसंस्कृतीची प्रसारमाध्यमंच असे हे फिरस्ते मग मात्र खेड्याकडं दिसेनासे झाले..

गावातल्या शाळेत चवथी इयत्ता पास करून मी तालुक्याच्या इंग्रजी हायस्कूलमधे गेलो. औध संस्थानातले हे विद्यामंदिर होतं, त्यामुळं तिथं विद्यार्थ्यांना रोज सकाळी पंचवीस सूर्यनमस्कार, ओम् ऱ्हाम् ऱ्हीम् असा मंत्रघोष करून घालावे लागत. तिथून सात मैल अंतरावर दिघंची गावी कार्तिकी जत्रा भरे. ह्या जत्रेत तमाशाचे नामांकित फड येत. चार-पाच दिवस चालणाऱ्या ह्या यात्रेचं मोठंच आकर्षण आम्हाला असे. पण हेडमास्तरांच्या धाकामुळं शाळा न बुडवता जत्रा बघावी लागे. मग संध्याकाळी पाच वाजता शाळा सुटली की वह्यापुस्तकं शाळेतच ठेवून, आम्ही, म्हणजे मी आणि माझा एक वर्गमित्र, पायीच एरा पाव, दोरा चिटी करत दिघंचीला जात असू. माझे चुलते बिटाकाका तेव्हा दिघंचीला पोलीस हवालदार होते. यात्रेच्या बंदोबस्ताची जबाबदारी त्यांच्याकडं असे, काकांच्या वशिल्यामुळं कोणताही तमाशा कनातीत अगदी बोर्डाजवळ बाकडं टाकून आम्हाला बघायला मिळे. रात्रभर आम्ही कनातीतल्या गारठ्यात बसून तमाशा बघत असू. पहाटे कोंबडा आरवल्यावर तमाशाच्या बोर्डावर भैरवी सुरू होई. मग काकांच्याच वशिल्यानं हॉटेलातला चहा, गरम भजी खाऊन आम्ही थेट तिथून जे निघत असू, ते पुन्हा परस्पर शाळेच्या विहिरीवर आंघोळी आटपून सात वाजता सूर्यनमस्कारासाठी मुलांच्या घोळक्यात साळसुदासारखे उभे रहात असू.

कडक शिस्तीचे हेडमास्तर रोज शाळेच्या फाटकात छडी घेऊन उभे रहात. पाचदहा मिनिटं उशीर झाला तरी फोकळून काढत. आम्ही ओळीनं पाच दिवस सातसात मैल जात येत होतो, जागत होतो, पण त्यांची छडी अशी आम्ही एकदाही खाल्ली नाही !

सहाव्या दिवशी शाळेच्या रोजच्या सभेत हेडमास्तर सर्व मुलांना आणि शिक्षकांना उद्देशून बोलताना म्हणाले. 'आज मी तुम्हाला दोन महापुरुषांची ओळख करून देणार आहे.' मुलं मागं, बाजूला बघू लागली. मग हेडमास्तरांनी आम्हा दोघांची नावं पुकारून आम्हाला तीनशे मुलांसमोर उभं केलं, आमचा भीमपराक्रम विस्तारानं मुलांना सांगितला

आणि म्हणाले,

'एवढे श्रम, एवढी निष्ठा त्यांनी जर अभ्यासाच्या बाबतीत दाखवली असती, तर आज मी त्यांना फुलांचे हार घातले असते.'

हे माझे शिक्षक आज हयात नाहीत. असते तर त्यांनी निदान शब्दांचा गुच्छ तरी माझ्याकडे नक्कीच पाठवला असता. जे हयात आहेत त्या मराठीच्या शिक्षकांनी पाठवला आहे.

माझ्याबरोबरचा दुसरा महापुरुष पी.डब्ल्यू.डी.त कारकुनाची नोकरी करून नुकताच निवृत्त झाला आहे. एकाच परिसरात अनेक व्यक्ती जन्मतात, वाढतात. तरी तो परिसर सर्वांना सारखाच उपयोगी पडत नाही. त्याच परिसरात वाढलेल्या दोन लेखकांनासुद्धा तो सारख्याच पद्धतीनं उपयोगी पडत नाही. प्रतिभा, संवेदनक्षमता आणि अनुभव ह्या तिन्हीच्या रसायनातून साहित्य निर्माण होतं. योग्य क्षेत्र नसेल तर अनुभवाचं बियाणं अगदी फुकट जातं. निर्मितीचा कोंब त्याला कधी फुटतच नाही.

मला चित्रकलेतही बरी गती होती. ह्याच शाळेत मला चांगले चित्रकला शिक्षकही लाभले होते. पण आजूबाजूचं वातावरण चित्रकलेला पोषक नव्हतं. मी ह्या काळात जर उत्तम चित्रकारांची प्रदर्शनं पाहिली असती, शिल्पप्रदर्शनं पाहिली असती, तर माझी वाट शब्दांकडे न जाता रंगरेषाकडंही वळली असती. संस्कृतीच्या देवता (म्युझेस्) ह्या बहिणी बहिणीच आहेत, असं ग्रीक पुराण सांगतं.

ह्या काळात मी वाचन करीत होतो. गडकरी आणि केशवसुत यांचं काव्य अगदी वेडा होऊन वाचत होतो कवितांच्या वाचनामुळे मी काव्यलेखनाचा खटाटोपही सुरवातीला करून पाहिला, त्या मासिकांतून प्रसिद्धीही झाल्या, पण त्यामुळे माझं समाधान झालं नाही. हे आपल्याला जमतं असं वाटलं नाही. ह्याच काळात मी जलरंगातली आणि तैलरंगातली चित्रंही रंगवत होतो आणि तेही मला जमत नव्हतं. ढग भरून येत होते, पण बरसत मात्र नव्हते. माझी स्थिति फार चमत्कारिक झाली होती. आणि मग, एके दिवशी मी एक कथा लिहिली. तिचं नाव 'काळ्या तोंडाची' असं होतं. एका अभागी कुत्र्यावर ही लिहिलेली होती.

मला पशुपक्षी पाळण्याचा फार नाद होता. मी पोपट पाळून पाहिला, तो मला लाभला नाही. मी गाय पाळू पाहिली, तीही माझ्यापाशी सतत राहिली नाही. फार काय सांगावं, मी काटवनातून पांढऱ्या होल्याचं पंख न फुटलेलं पोरही घरी आणून त्याला जीव लावून वाढवण्याच प्रयत्न केला; पण कधीतरी रात्रीच्या अंधारात माझ्या उशाशी अंथरुणात झोपलेलं हे पाखरू, चोरट्या बोक्यानं उचलून नेलं. सांदीला जाऊन खाऊन टाकलं. सकाळी घरभर तपास करताना मला त्याची कोवळी पिसं वाऱ्यावर उडताना दिसली !

मी ज्याची गोष्ट लिहिली ते कुत्र्याचं पोर मी रस्त्यावरून आणून पाळलं होतं

सुरवातीला माझ्याप्रमाण घरातल्या लोकांनीही त्याचे लाड केले. पण पुढं कुणीतरी सांगितलं, की हे पोर अशुभ आहे. त्याचं तोड काळ्या रंगाचं आहे. सगळं अंग तांबूस, पण मुस्कट तेवढं काळं. ते अपशकुनी आहे. पाळू नका. घरात वाईट गोष्टी घडतील. आणि विशेष म्हणजे तशा गोष्टी घरात लागोपाठ घडल्या. आजारपण, मरण, अपयश अशा गोष्टी घडल्या. ते पोर मी टाकून द्यावं, त्याला दूर कुठंतरी सोडून यावं, असं सगळे घरातले लोक मला वारंवार सांगू लागले. त्या कुत्र्याच्या पोराचे घरात फार हाल होऊ लागले. त्याला माया मिळेना. सगळे हाड हाड करायला लागले. खाण्यापिण्याची आबाळ होऊ लागली. मार मिळायला लागला. आणि एके दिवशी आपणहून ते पोर आमचं घर सोडून निघून गेलं.

ह्या कुत्र्याची गोष्ट म्हणजे 'काळ्या तोडाची' ही गोष्ट. 'अभिरुचि' ह्या त्या काळी फार दर्जेदार म्हणून नावाजलेल्या मासिकात ती प्रसिद्ध झाली. तिची फार वाहवा झाली. मला शाबासकी मिळाली. आज मला वाटतं की, मला जे सापडत नव्हतं ते त्या वेळी थोडंफार माझ्या हाती आलं. माझ्या प्रवासाची दिशा अंधुकपणे मला दिसली.

ह्या आधीच काही वर्ष, वाचन नावाच्या उद्योगात फार आनंद मिळतो, असा शोध मला लागलेला होता. नऊ वर्षाचा होतो तेव्हा किन्हई नावाच्या गावी वडलाची बदली झाली. तिथं, उद्योगधंद्यासाठी काही वर्ष परमुलखी गेलेल्या, कोणा एका सुसंस्कृत माणसाचं घर आम्ही भाड्यानं घेतलं होतं. ह्या घराला माळा होता. घराला माळा असण ही गोष्ट लहान मुलाच्या दृष्टीनं बरी असते. कारण त्याला उंच जाता येतं आणि कोळ्याप्रमाणं स्वत:चं जाळं विणता येतं. ह्या माळ्यावर बंद अशा एका प्रचंड पेटीत काहीतरी मौल्यवान वस्तू मालकांनी ठेवल्या होत्या. कारण मोठ्ठं कुलूप तर पेटीला होतंच, पण लोखंडी पट्ट्या मारून ती फारच जाम केलेली होती. मला ह्या पेटीत काय आहे याचं फार कुतूहल वाटलं. आई-वडलांचा डोळा चुकवून, एके दिवशी बरीच खटपट करून, मी त्या पेटीची एक फळी उचकटली, तर तिच्यात वाचनीय अशी पुस्तकं गच्च भरलेली होती. मासिकांचे जुने अंक होते, पंचतंत्राचं मराठी भाषांतर होतं, हरि नारायण आपटे यांच्या कादंबऱ्या होत्या, 'इनामदारांचा बाळू' होता, नाथमाधवाची 'वीरधवल' होती, 'अरबी भाषेतील सुरस आणि चमत्कारिक गोष्टी' होत्या. मला आता नीट आठवत नाही, पण 'हतीमताई' 'ठकसेन राजपुत्राच्या गोष्टी', 'गोविंदाची गोष्ट', हीही पुस्तकं मी त्याच वेळी वाचली असावीत. माळ्याला असलेल्या लहान झरोक्याच्या उजेटात मी अनेक दिवस हे भांडार वाचत होतो.

वाचन नावाची गोष्ट केवढा आनंद देऊ शकते याची जाणीव तेव्हा मला झाली.

कोणती वनस्पती खावी आणि कोणती खाऊ नये. ही निवड सशाची किंवा हरणाची पोरं आयांच्याकडून शिकतात. माणसाच्या पोरांच्या आया वाचनाच्या बाबतीत एवढ्या तत्पर असलेल्या मी पाहिल्या नाहीत. निवड करून केलेलं वाचनच श्रेयस्कर

असतं. उद्योगपतीच्यापेक्षा पुस्तकं जास्ती उदार असतात. देण्याच्या कामी ती हात आखडता असा घेतच नाहीत. पण जी छापली जातात आणि दोन पुठ्ठ्यामधे बांधली जातात, ती सर्वच काही पुस्तकं म्हणायला लायक नसतात. त्यांचा 'अक्षरा'शी सबंधच नसतो. आपल्या अतिशय सूज्ञ काळातही ज्यांची आठवण आपण विसरत नाही अशी फारच थोडी असतात. बरेच लेखक असे असतात, की जे काजूच्या झाडांची बाग करत आहोत असा बहाणा करून फेणी गाळण्याचा चोरटा धंदा करतात. दोन घटका रंजन व्हावं, किंवा वेळ ढकलला जावा, ह्या हेतूनं पुस्तकं वाचण्याऐवजी आळशाचं वरदान अशी दिवसाची झोप काढलेलीच बरी नाही का ? हलकी पुस्तकं तात्काळ ओळखता येतात, कारण ग्राहकांकडून उठाव व्हावा म्हणून नाना रंगीत अमिषांनी ती नटवलेली असतात आणि त्याच्या गुणकारीपणाबद्दलही जोरजोरानं, झाडपाल्याच्या औषधाबद्दल वैदू ठोकतात तशा, आरोळ्या ठोकल्या जातात.

माझं शिक्षण चालू असनानाच बेचाळीस ऑगस्टचा संग्राम सुरू झाला. 'करेंगे या मरेंगे या निश्चयी घोषणेचे प्रतिध्वनी आठी दिशांना उठले. तरुण मनाला हौतात्म्याचं विलक्षण आकर्षण असतं. मी क्रांतिकारकांची चरित्रं वाचलेली होती. पांडित्यानं भरलेल्या पुस्तकांपेक्षा प्रामाणिकपणे लिहिलेली चरित्रं, आत्मचरित्रं आपल्याला बरंचसं शिकवतात. वयाच्या सुरुवातीच्या प्रहरांत वाचलेल्या पुस्तकांमुळं काही वेळा जीवनाचा प्रवाह उंच प्रदेशाकडंसुद्धा वळवला जातो. मी सोळाव्या वर्षी चळवळीत गेलो. गुन्हेगार ठरलो. लपूनछपून हिंडलो. खेड्यापाड्यांतून, वाड्यावस्त्यांवरून बराच भटकलो. आजवर जे पाहिलं होतं, अनुभवलं होतं, त्यापेक्षा फार वेगळं, फार दाहक मी पाहिलं. शरीराची आणि मनाची पुष्कळ होलपट सोसली.

चळवळ संपली. शालेय शिक्षण संपलं. हे जीवनाचं ग्रंथालय मात्र माझ्यापुढं सदैव उघडलेलंच राहिलं, वर्ड्सवर्थच्या मोलकरणीनं एकवार पाहुण्यांना सांगितलं होतं, त्याचं ग्रंथालय घरात आहे, पण अभ्यासिका मात्र बाहेरच आहे.

वयाच्या विशी बाविशीत मी मुंबईसारख्या महानगरात गेलो आणि ज्यांची आजवर केवळ पत्रभेटच झालेली होती अशा संपादकमित्रांच्या पुढ्यात जाऊन उभा राहिलो. त्यांनी मला निवारा दिला. धीर दिला. माणदेशाचं बरड माळरानच पहाण्याची ज्या डोळ्यांना सवय होती त्यांना, आयुष्यात प्रथमच, निळा निळा अफाट सागर दिसला

अठ्ठेचाळीस एकोणपन्नासच्या सुमाराला मौज साप्ताहिकातून मी 'माणदेशी माणसं' ही शब्दचित्रं लिहिली मी वाऱ्यावर भरकटलो असतानाच ह्या माणदेशी माणसांचे जन्म झाले आहेत धर्मा रामोशी आणि नामा मास्तर ही दोन माणसं मी पहिल्यांदा लिहिली. मी हे चांगलं लिहिलं आहे याची काही जाणीव मला नव्हती. हे लेखन प्रसिद्ध व्हावं आणि मला दहापाच रुपये मिळावेत एवढीच अपेक्षा होती. संपादकांनी ही दोन माणसं वाचली आणि सूचना केली की, अशी आणखी कार्

लिहा. सुटीसुटी प्रसिद्ध करण्याऐवजी एकापाठोपाठ एक अशी साप्ताहिकातून आली, तर त्याचा परिणाम होईल. मला अधिक काही सुचत नव्हतं, तेव्हा संपादकांनी आगावू जाहिरात करून टाकली आणि एकापाठोपाठ एक अशी दोन माणसं प्रसिद्ध केली. मग मात्र आठवून आठवून मी दर आठवड्याला एक असं लिहीत राहिलो. ह्या व्यक्तिचित्रांचा फार गवगवा झाला. मी एकदम प्रकाशात आलो.

मी काही समाजकार्य करणारा कार्यकर्ता नव्हतो. माणदेशातल्या तळागाळातल्या लोकांची स्थिती वेशीवर टांगण्यासाठी आपण अशा तऱ्हेची भाषिक कृती केली पाहिजे, असा विचारही माझ्या मनात नव्हता. माझ्या हातून हे अगदी स्वाभाविकपणे घडलं.

गुणवान अशी मोठी पुस्तकं लेखकाला बिलकुल सुगावा न लागू देताच जन्माला येतात आणि मोठी ठरतात. ती एक अतिशय स्वाभाविक आणि नैसर्गिक घटना असते. हेन्री डेव्हिड थोरोनं म्हटलं आहे की, 'वेलीला भोपळा लागतो तसंच माणसाला कवितेचं फळ लागतं.'

'गावाकडच्या गोष्टी' ही मी अशाच लिहिल्या आहेत.

अगदी थोडा काळ मी एका लहानशा गावात प्राथमिक शिक्षक होतो. 'झेल्या' मला तिथंच भेटला. ह्या खेड्यात धनगर समाज होता. माझ्या खेड्याशेजारीही एक केवळ धनगराचीच वाडी होती. तिथं माझा थोरला भाऊ शिक्षक होता. मी हायस्कूलमधे शिकत असताना, अनेक वेळा ह्या भावाकडं दशम्या पोचवायला पायी सात मैल गेलो आलो आहे. पुष्कळदा त्याच्या लहानशा खोलीत मी मुक्कामही करत असे.

पुढं दहा वर्षांनी पुण्यात स्थायिक झाल्यावर मी 'बनगरवाडी' लिहिली. अर्धी लिहून थांबलो. आपण नेमक्या वाटेनं चाललो आहो ना, ही शंका वारंवार मनात येई.

संपादकमित्राला ही अर्धी पानं जेव्हा दाखवली तेव्हा तो म्हणाला,

'अरे, कादंबरी कादंबरी म्हणतात ती अशीच असते. तू असा पुढं जा कसा !'

'मला पुढचं सुचत नाही.'

'आपोआप सुचेल. तुझ्या मनात ते आहेच. लिहू लागलास की येईल.'

माझी ही पहिली कादंबरी अशा पद्धतीनं पूर्ण झाली. तिला तात्काळ यशही मिळालं. इंग्रजीत भाषांतरित झालेली ही कादंबरी आता समाजशास्त्राच्या विद्यार्थ्यांसाठी विशेष वाचन म्हणून जी ग्रंथाची यादी आहे, तिच्यात जाऊन बसली आहे.

प्रत्यक्ष जीवन जगत असताना त्या त्या समाजाच्या संदर्भात सामाजिक प्रश्न, संघर्ष अटळच असतात कलावंत त्याला साक्षी असतोच. त्यापासून तो बाजूला राहू शकतच नाही. पण तो कोणतेही झेंडे खांद्यावर घेत नाही. तशी जरुरी नसते.

'बनगरवाडी'नंतर जी वाट मी शोधत होतो, ती मला अगदी स्वच्छ दिसली.

ह्या वाटेवरून चालतानाही काही चकवे पडले. चुकून भलत्याच गावी पोचतो की काय अशी शंका आली पण डोळ्यावर भरवसा न ठेवता माझ्या पायांनीच वाटेची

ओळख सुटू दिली नाही.

मुंबईला येताच मला काही उत्तम लेखकमित्र मिळाले. जसे जाणते संपादक मिळाले, तसेच जाणते लेखकमित्रही मिळाले. लेखकमित्रानं मला सांगितलं, 'तू इंग्रजी साहित्य वाच. तुला जवळचे वाटतील असे पुष्कळ लेखक आहेत. लियाम ओ फ्लॅहर्टी, जॉन स्टाइनबेक, गॉर्की, मोपासां, काल्डवेल...'

हे मी प्रयत्नपूर्वक वाचत गेलो. साहित्य हा एक मोठा धोधाट प्रवाह आहे याची जाणीव मला झाली होतीच. मुंबईला मी जेव्हा इंग्रजी वाचू लागलो. तेव्हा साहित्य हा विशाल सागर आहे, याची जाणीव मला झाली.

लेखकाला वाचन हे पोषणद्रव्यच आहे. पण मुळात प्रतिभा नसली तर मात्र पुतळ्याला पोषणद्रव्यं चारून तो जसा सजीव होत नाही, तसा वाचकही साहित्यिक होणार नाही. अशा ह्या लिखित अक्षरांच्या पलीकडही एक वाचन साहित्यिकाला करायचं असतं, ते मानवी समूहाचं. मी मानव आहे आणि जे जे मानवी आहे ते ते मला परकं नाही, एवढंच नव्हे, तर जे जे चैतन्ययुक्त आहे, तेही मला परकं नाही, या भावनेनं हे विशाल वाचन जर त्याला करता आलं, त्याबद्दल आपल्या साहित्यातून रसिकांना सांगता आलं, तर तो लहानसान भेदांपलीकडं जातो. आद्य क्रांतिकारक कवी केशवसुतांना अभिप्रेत असलेला 'प्रदेश साकल्याचा' त्याच्या कवेत येतो.

अलीकडं मी निसर्गाकडं, वन्य प्राणिजीवनाकडं का ओढला गेलो आहे ? खरं तर माझी ही ओढ जुनीच आहे. माणसाला निसर्गापासून वेगळं असं मला कधी पहाताच आलेलं नाही. अवखळ वयात, खेळगड्याच्या नादानं मी शिकार करत होतो. आज जो कालबाह्य खेळ झाला आहे. पण संस्कृतीच्या सुरुवातीच्या काळातले मानव बलाढ्य शिकारीच होते. ज्या तरुण मुलाच्या हातात कधी गळदांडी किंवा बंदूक पडली नाही, ज्यानं नदीतळी, डोगरजंगलं धुंडाळली नाहीत, त्याच्या शिक्षणात काही अपुरेपणा रहातोच. शिकारी पोरगा वयानं तसा बुद्धीनं वाढला की गळदांडी आणि बंदूक टाकून देऊन, वेगळ्याच कारणानं जलाशयाकडं किंवा जंगलाकडं जातो. नित्याच्या नातेवाईकांपेक्षा वेगळे नातेवाईक त्याला तिथं मिळवायचे असतात.

केवढातरी संपन्न निसर्ग, रानंवनं, वन्य प्राणी, पक्षी सुदैवानं अजून आपल्या देशात दिसतात. साहित्यिकांनी आपला मोहरा अद्याप तिकडं वळवलेलाच नाही. राजहंसाचा कलध्वनी आणि सारस पक्ष्याच्या आर्त हाका त्याच्या कानांवर अजून पडल्याच नाहीत. कृष्णसार मृगाच्या कळपाची उड्डाण पाहून त्यांच्या काळजाचा ठोका अजून कधी चुकलाच नाही।

सामाजिक बांधिलकीची अपेक्षा साहित्यिकाकडून केली जाते. हा समाज कोणता ? स्वातंत्र्य, भूक, शिक्षण, निवारा, सरक्षण, प्रेम ह्या सर्व मानवी गरजांच्या पातळीवर एकत्र मोजता येतो तो. भाषा, प्रदेश, धर्म, जात, पोटजात ह्या गोष्टीमुळे कृत्रिम भे

निर्माण होतात. हा भेद मानला नाही, तर सगळीकडं पसरलेला, आदी अंत नसलेला निसर्ग जसा आपल्याला एकच वाटतो, तसा समाजही वाटतो. ART IS ONE MAN'S GIFT TO HUMANITY असं आनातोल फ्रांस म्हणतो. तेव्हा त्याला कोणता समाज अभिप्रेत असतो ?

साहित्यानं कोणतं कार्य करावं ह्याविषयी अनेक अपेक्षा व्यक्त केल्या जातात. बाजाच्या पेटीतून आपल्याला सूरही हवे असतात आणि ह्याच पेटीचा मूल्यवान वस्तू ठेवण्यासाठी उपयोगही करावासा वाटतो. अशी अपेक्षा का केली जाते ? तिचं कारण कोणतं ?

भाषा हे साहित्याचं माध्यम आहे आणि ती सामाजिक विनिमयाचं साधनही आहे. म्हणून सामाजिक बांधिलकीचं टुमणं साहित्याच्या मागं लागतं. मी जेव्हा वानराचं चित्र काढतो तेव्हा ते मराठी वानराचं चित्र नसतं, पण ज्या क्षणी मी 'वानर' हा शब्द उच्चारतो किंवा लिहितो त्या क्षणी ते वानर मराठी बनतं. भाषा हे ज्या कलेचं माध्यम नसतं त्या कलेकडून सामाजिक बांधिलकीची अशी अपेक्षा केली जात नाही. चित्रकाराकडून, शिल्पकाराकडून, गायकाकडून ही अपेक्षा कोणी करत नाही. साहित्यिकाकडून मात्र करतात, कारण तो भाषा वापरतो. साहित्य ही अखिल मानवमात्रासाठी निर्माण होणारी कलाकृती आहे असं आपण लक्षात घेतलं, म्हणजे त्याच्याकडून बांधिलकीची अपेक्षा आपण करणार नाही. हे बंधन आपण साहित्यिकावर घालणार नाही. त्याचं स्वातंत्र्य मान्य करू, कारण स्वातंत्र्य हा साहित्यिकाचा जन्मसिद्ध हक्क आहे.

हेतुपूर्वक काही सामाजिक कार्य करणं, विशिष्ट मानवसमूहाचे प्रश्न वेशीवर टांगणं, चळवळ करणं, मोर्चे काढणं, हे कार्य कार्यकर्ते करतात. साहित्यिक हा कार्यकर्ता नसतो. बांधिलकी कार्यकर्त्याला असते. साहित्यिकाला नसते. ही गोष्ट अधिक स्पष्ट करण्यासाठी आपण दोन त्रिकोण मांडू.

**पहिला त्रिकोण म्हणजे** **दुसरा त्रिकोण**

साहित्य

साहित्यिक रसिक

प्रचार

लेखक वाचक

हे दोन्ही त्रिकोण सर्वकाळ असतात. त्यावरून आपल्याला असं म्हणता येतं की,
सर्व लेखन म्हणजे साहित्य नव्हे.
सर्व वाचक म्हणजे रसिक नव्हेत.
सर्व लेखक म्हणजे साहित्यिक नव्हेत.
मग साहित्य म्हणजे काय ?

तर त्याची व्याख्या करता येत नाही, स्वरूप स्पष्ट करता येतं.

इमर्सननं सांगितलं आहे की, 'आजपर्यंतचं इंग्लिशमधलं श्रेष्ठ साहित्य एकजण लिहू शकेल एवढंच आहे.' याचं तात्पर्य एवढंच की श्रेष्ठ साहित्याची निर्मिती दुर्मिळपणे होते.

सामाजिक बांधिलकी नाही, मग साहित्याचं प्रयोजन काय ?

निसर्गात उमलणाऱ्या फुलाचं असतं तेच. आपण गुलकंद करावा म्हणून काही गुलाब फुलत नाही. प्रयोजन ही सामाजिक गरज आहे. तुम्ही ते उपयुक्ततेच्या दृष्टीनं साहित्याला चिकटवू शकता. परवा, राजस्थानच्या थर वाळवंटातून भटकत असताना, नेपतीच्या एकाकी झुडपाच्या बुडाशी, वाळू फोडून वर उसळलेला एक पिवळारंजन फुलांचा गेद मी पाहिला. आजूबाजूच्या वैराण भूमीला तो भूषणच झाला होता. जानेवारी महिन्यातला हा वसंतोत्सव पाहून मी हर्षभरित झालो !

याचं प्रयोजन काय हा प्रश्न माझ्या मनात आला नाही. प्रत्येक कहाणीला काहीना काही तात्पर्य असतंच. पण निरागस माणूस कहाणी ऐकूनच आनंदतो, तात्काळ तात्पर्याच्या शोधाला लागत नाही.

आता एखादा वनस्पतीशास्त्रज्ञ 'हा फुलांचा गेद म्हणजे रूट पॅरासाईट आहे, त्याचं लॅटीन नाव अमुकतमुक आहे, वनस्पतीशास्त्रानुसार त्याचं प्रयोजन अमुकतमुक आहे,' असं मला सांगेलही. पण त्यामुळं माझा आनंद द्विगुणित होईलच असं मात्र नाही !

एवढी दुर्मिळ, एवढी स्वाभाविक निर्मिती असणार साहित्य नाही लिहिलं गेलं, तर काही नुकसान आहे का ?

अखेर साहित्य हीही एक सवय आहे. आणि चांगल्या सवयी ह्या माणसाला झाकणारी वस्त्रं असतात. त्या नसल्या तर माणूस उघडा पडेल.

आणि, कोणे एके काळी माणूस उघडावाघडा हिंडत होताच की !

खेड्यातली एखादी कष्टाळू बाई जेव्हा पहाटे जात्यावर बसून ओव्या गाते, तेव्हा बहिणाबाई चौधरी यांच्या कवितेसारखी श्रेष्ठ कविता पिठाबरोबरच बाहेर पडते. ती धवल असते आणि कसदारही असते.

तेव्हा आपण प्रयोजनाचा, उपयुक्ततेचा आग्रह धरू नये. राजकारण आणि समाजकारण यांचं प्रचंड वर्चस्व आलं की साहित्यात वेठबिगार पद्धती सुरू होते. सर्व कलांनी एका जुवाखाली माना द्याव्यात, अशा कविता लिहाव्यात, कादंबरीचा नायक तसा असावा, फार काय शिल्पं आणि चित्रंसुद्धा ह्या ह्या पद्धतीचीच काढली जावीत, अशी सक्ती होते.

मग साधन म्हणून साहित्याचा अगदी निर्वाणीच्या वेळीही उपयोग करू नये काय ?

करावा.

अशाही साहित्याला साहित्यसृष्टीत स्थान असतंच. पण, कुसुमाग्रजांची 'गर्जा जयजयकार' ही कविता आणि मेळ्यातलं प्रचारगीत एक नव्हे.

आजचे संघर्ष आणि प्रश्न, काही काळांनी संपून जातात. त्यांना धार यावी म्हणून वापरलेली साधनंही बाजूला पडतात, आणि विसरली जातात.

साहित्याचं वर्गीकरण करण्याची आपली जी पद्धत आहे तीही सामाजिक वर्णनपर अशीच आहे. ग्रामीण, दलित, मध्यमवर्गीय वगैरे. पण साहित्याचं वर्गीकरण हे आविष्काराच्याही दृष्टीनं होऊ शकतं. साहित्याची जसजशी उत्क्रांती होते त्यानुसार हे वर्गीकरण असतं

१. नियमानुसारी २. अद्भुतरम्य ३. वास्तववादी
४. अस्तित्ववादी ५. मानसवादी ४. अतिवास्तववादी.

अशा तऱ्हेचं वर्गीकरण इतर ठिकाणी होताना आपण पहातो. असं वर्गीकरण हे इतिहासाला साक्षी ठेवून केलेलं असतं. सर्व साहित्य एकच आहे असं मानून केलेलं असतं. त्याला देशाच्या, प्रदेशाच्या, भाषेच्या मर्यादा पडत नाहीत. स्पेनमधल्या लोपेझच्या किंवा आयर्लंडमधल्या फ्लॅहर्टीच्या कथेचा आस्वाद घेता येतो. ह्यात मी, माझे बांधव, माझा प्रदेश, कुठंच नाही म्हणून मला काही घेणं नाही, असं वाटत नाही.

एकीकडे आपण जातपात नसलेला, सर्व धर्मांना सामावून घेणारा आदर्श समाज निर्माण व्हावा अशी स्वप्नं पहातो आणि त्याच वेळी साहित्यात मात्र जातिभेद तीव्र करू पहातो, हे बरोबर आहे का ? आपल्याकडे बोधवाद, अद्भुतरम्यवाद, वास्तववाद अशी उत्क्रांती दिसते. अलीकडे वास्तववादाचा बराच विस्तार झालेला आहे.

ज्याला आपण ग्रामीणसाहित्य, दलितसाहित्य अशी नावं देतो तो वास्तववादाचाच मोकळाढाकळा, प्रामाणिक असा आविष्कार आहे. ज्या कृतीच्या अंगी स्वाभाविक गुणधर्म असतात, तिला ती ठसठशीतपणे नजरेत भरावी अशी एक योग्य पार्श्वभूमी नेहमीच लाभते. अफाट क्षितिजाच्या पार्श्वभूमीवर एखादी टेकडी, किंवा माळरानात एखादा महावृक्ष जसा स्पष्ट दिसतो, तसं उत्तम साहित्यही दिसतंच. ते दाखवावं लागत नाही.

असो. !

जीवनाप्रमाणंच साहित्यावरही माझं प्रेम आहे. मला जगायला आवडतं तितकं लिहायलाही आवडतं. दाखवण्याजोगे एवढेच उदात्त गुण माझ्यापाशी आहेत. साहित्यनिर्मितीपेक्षा साहित्यावर चर्चा करणं हे काम मला अधिक शीण आणतं. काही गुणी साहित्यिक असे असतात, की जे दोन्ही हातात सुया घेऊन विणू शकतात. त्यांना ते सहज जमतं. मला त्यांच्याविषयी फारच आदर वाटतो.

आतापर्यंत मी थोडं आत्मनिवेदन केलं, थोडं प्रकट चिंतन केलं. त्यातून साहित्यिक म्हणून माझा प्रवास कसा झाला, आणि साहित्याकडं मी कोणत्या दृष्टिकोनातून पहातो हे तुम्हाला समजलं असेल आता मी तुमच्याशी— म्हणजे श्रवणभक्तीनं

जमलेल्या इथल्या बहुसंख्य साहित्यप्रेमिकांशी— थोडं हितगूज करतो, कारण तुम्हीच माझे खरे श्रोते आहात. ह्या शब्दांच्या उत्सवाला आनंद लुटावा म्हणून मोठ्या प्रयास सायासानं तुम्ही इथं जमलेले आहात. तुम्ही तृप्त झाला नाही, तर माझं कर्तव्य मी तितकंसं बरोबर पार पाडलं नाही, अशी रुखरुख माझ्या मनात राहून जाईल.

साहित्यावर प्रेम करणाऱ्या अशा एक मित्रानं मला कळवलं आहे की, अलीकडं सुमार पुस्तकांची निर्मिती फार प्रचंड प्रमाणात होते आहे. ही चिंतेची गोष्ट आहे, तिला आळा बसला पाहिजे. हे खरं आहे पण हा आळा घालणं वाचकांवर अवलंबून असतं. शहामृगाला त्याचा रोजचा आहार जरी पोटभर दिला तरी नंतरसुद्धा तो जे जे पुढ्यात येईल ते ते खाऊन फस्त करतो. पचवूनही टाकतो. तसं आपलं वाचन असू नये. सकाळच्या प्रहरी बचकेएवढ्या तांबड्याभडक फुलांनी लहडून गेलेल्या शाल्मलीवृक्षावर गर्दी करणारी पाखरं, फुलांच्या पेल्यातला अमृतमधुर रसच ज्याप्रमाणं गात गात पितात, तसं ते असावं. आपलं रोजचं वाचन वर्तमानपत्राच्या कॉलमच्या उंचीपलीकडचं असावं. नक्षत्रं जशी ढगांच्यापलीकडे असतात, तसा आशय हा शब्दांच्यापलीकडं असतो. अशी निवड करून उत्तम तेवढंच वाचण्याचं धोरण तुम्ही ठेवाल, तर सुमार पुस्तकं वाण्याच्या दुकानात पुड्या बांधण्याच्या उपयोगाची ठरतील, आणि एवढ्याच कामासाठी उपयोग होतो आहे हे ध्यानी येताच त्यांच्या निपजेला आपोआप आळा बसेल.

मला माहीत आहे की, चारदोन मोठी शहरं सोडली तर चांगल्या पुस्तकांचे जथे फार दूरवरचा प्रवास करत नाहीत. तालुक्याच्या गावापर्यंत तर ती क्वचितच पोचतात. पोचलीच तर त्यांना उतरायला जागा मिळते ती एवढ्याशा वाचनालयात. पुस्तकांचं दुकान तिथं असतच नाही. शासनाच्या योजनेमुळे ग्रंथालयाचा विस्तार होतो आहे ही आनंदाची गोष्ट आहे, पण तो आता जास्ती त्वरेनं झाला पाहिजे. खेडोपाडी पिण्याच्या पाण्याची व्यवस्था झाली पाहिजे, तशीच तहानेल्या वाचकांना पुस्तकंही मिळायला नकोत का ? बडोदा संस्थानात सयाजीराव महाराजांनी पाऊणशे वर्षांपूर्वी फिरतं वाचनालय सुरू केलं होतं. रुग्णालयातल्या कोणा रुग्णानं जरी पत्र पाठवून वाचण्यासाठी पुस्तकं मागितली तरी लहानशा बंद पेटीतून आठ दहा पुस्तकं पोस्टानं त्याच्याकडे जात. ती त्यानं वाचावी आणि पुन्हा पेटीत बंद करून सरकारी खर्चानं वाचनालयाकडं परत पाठवावी, अशी व्यवस्था होती. एका संस्थानानं राबवलेली ही योजना, शासनाला राबवणं जड जाऊ नये.

कोणती पुस्तकं वाचनीय आहेत, महाराष्ट्रात कुठं काय प्रसिद्ध झालं आहे, हे समजण्यासाठी काही साधनंही सहज उपलब्ध नाहीत. टाइम्स लिटररी सप्लिमेंटप्रमाणं एखादं मासिकपुस्तक साहित्यसंस्कृति मंडळाला चालवता येईल काय ? मराठी किंवा दुर्मिळ इंग्रजी पुस्तकंही कुठं कुणाकडं मिळतात, यासंबंधीच्या जाहिरातीही ह्या नियतकालिकात देता येतील. नॅशनल बुक ट्रस्ट्च्या वतीनं पुण्यात भरलेल्या पुस्तकप्रदर्शनांत जास्ती

गर्दी, जुन्या दुर्मिळ पुस्तकांच्या दुकानावर होत होती. राल्फ थॉमसन, लाफॉतेन लारोशफूको, बर्टन ह्या लेखकांसंबंधी मी जेव्हाजेव्हा लिहिलं तेव्हा वाचकांकडून मला विचारणा झाली, ही पुस्तकं आम्हाला कुठं मिळतील ? प्राणिजीवनावरील पुस्तकांसंबंधी अनेक वाचकांकडून ही अधीर विचारणा नेहमी होत असते. तेव्हा सर्वत्र पसरलेल्या वाचकांचा मित्र अशा ह्या नियतकालिकाची फार आवश्यकता आहे, असं मला वाटतं.

भारतीय भाषातल्या, आणि बाहेरच्याही उत्तमोत्तम ग्रंथांची वाचनी भाषांतरं आपल्याला सहज मिळत नाहीत. कन्नड, तेलगू, आसामी, बंगाली अशा इतर भाषातलं ताजं उत्तम साहित्य वाचायला आपण उत्सुक असतो, पण त्याची चांगली भाषांतरं, चांगल्या पुस्तकांच्या दुकानातूनसुद्धा सहज नजरेला पडल्याचं मला आठवत नाही. आपल्या भाषेतलं किती साहित्य परभाषेत जातं ह्यापेक्षाही इतर भाषातून किती मौलिक साहित्य आम्ही आपल्या भाषेत आणतो, यावरच आपण आपली वाङ्मयीन श्रीमंती मोजावी.

उत्तम साहित्य आपल्या घरापर्यंत आणून सोडणारे संस्कृतीचे वाहाते पाटच अशी प्रसारमाध्यमं म्हणजे आकाशवाणी आणि दूरदर्शन. यांच्यामुळं साहित्यिक, वक्ता, नट, गायक तुमच्या घरीच तुम्हाला भेटू शकतो. अभिजात अशा साहित्याचं वाचन फार प्रभावीपणे आकाशवाणीवरून करता येईल. 'चिंतन'- सारख्या पाच मिनिटाच्या कार्यक्रमाला केवढा प्रतिसाद श्रोत्यांकडून मिळतो हे मी अनुभवलं आहे.

'हा उत्तम कार्यक्रम केवळ पाचच मिनिटं का करता, तो वाढवा आणि पंधरा मिनिटांचा करा. तसं का करत नाही ?'

असं एका श्रोत्यानं मला फोनवरून विचारलं.

मी म्हणालो,

'अहो, होमिओपथीची गोळी बेसनाच्या लाडवाएवढी करा अशीच ही मागणी नाही का ?' ह्यावर उत्तर म्हणून पसंतीचं मोठं हसूच मला ऐकू आलं !

डिकन्सच्या कादंबरीचं— निकलस निकलबीचं— अतिशय प्रभावी असं दृश्य रूपांतर बी॰ बी॰ सी॰- वरून आलेलं आपण पाहिलं. आपल्या उत्तमोत्तम कादंबऱ्या लाखो प्रेक्षकांपर्यंत अशा पोचवता येणार नाहीत काय ?

ऑस्ट्रेलियात जाऊन मी लहानलहान गावी असलेल्या आकाशवाणी केंद्रांचं कामकाज पाहिलं. त्याला आज पंचवीस वर्षं होऊन गेली, पण तशी काही सुरवात आपल्याकडं अद्याप झालेली नाही. जिल्हावर्तमानपत्र असतं तशी ही लहानलहान केंद्रं असतात, आणि त्या त्या प्रदेशाचं रंगरूप त्यांना लाभलेलं असतं. ह्या आपल्या केंद्रावर लोकांचं कितीतरी प्रेम असतं. एखादे दिवशी वर्तमानपत्र वाचलं नाही, तर आपल्याला आपण निरक्षर आहोत असं जसं वाटतं, तसं त्यांना केंद्राचा सकाळचा कार्यक्रम ऐकला नाही तर वाटतं. एखाद्या कोळ्यानं मोठा मासा पकडला तरी तात्काळ त्याची मुलाखत आजूबाजूच्या लोकांना ऐकायला मिळते. कोणी बाहेरचा विशेष पाहुणा आला की त्याचं

बोलणं ऐकायला मिळतं. रोजची हवा, बाजारभाव, नदीच्या पाण्याचे चढउतार, महत्त्वाच्या घडामोडी, या बरोबरच शेती करणारांना हे केंद्र केवढी तरी मदत करत असतं. त्यांची प्रतिज्ञाच आहे की, 'शेतात काम करणाऱ्या प्रत्येकाच्या आम्ही उपयोगी पडू.'

दूरदर्शनकेंद्रसुद्धा लोकांना उपयोगी पडण्यासाठी कितीपरीनं झटत असतं. तीन मिनिटांचा एक कार्यक्रम असतो 'मार्केट टु मार्केट'. रंगीत कार्यक्रम. फळांनी भाज्यांनी भरलेलं शेल्फ, आणि एक माणूस माहिती सांगत असतो. ह्या आठवड्याला कोणत्या उत्तम भाज्या आणि कोणती उत्तम फळं मंडईला आलेली आहेत. त्यांच्या किंमती काय आहेत. त्याची किंमत लिहिलेली निशाणं तो फळावर टोचतो, एखादा लाल टमाटो चिरून दाखवतो. हा कार्यक्रम पहाण्यासाठी बायका वहीपेन्सिल घेऊन बसतात. बॉब लोगननं सांगितलेली निवड उत्तमच असणार हा विश्वास त्यांना असतो.

अशी तत्परता, वाङ्मयीन संस्कृतीबाबतही, आपल्या आकाशवाणीला आणि आपल्या दूरदर्शन केंद्राला नाही का दाखवता येणार ? आता नवं कॅसेटचं युग आलं आहे, व्हिडिओ टेपचंही येऊ घातलं आहे. उत्तम साहित्याचा प्रसार करण्याचं केवढंतरी काम या माध्यमामुळं होईल.

मला माहीत आहे की, पुस्तकांच्या किंमती आपल्या आवाक्यापलीकडे गेलेल्या आहेत. त्यावर उपाय केरळप्रमाणे सहकारी संस्था हा आहे. साहित्यसंस्कृतिमंडळाला ह्या बाबतीतही काही योजना आखून पार पाडता येतील. आज मंडळ अनुदान देऊन नव्या लेखकांची पुस्तकं प्रसिद्ध करायला मदत करतं. प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांची संख्या त्यामुळे वाढलेली दिसते आहेच. दर्जेदार लेखन मात्र वाढल्याचं दिसत नाही.

माझे एक मित्र आहेत. पतिपत्नी दोघंही नोकरी करतात. दोघंही सांस्कृतिक म्हणावं अशा खात्यातच काम करतात. ह्यांनी बहुतक सगळे सिनेमे आणि नाटकं बघितलेली असतात. 'हे तुम्हाला कसं काय जमतं ?' असं विचारल्यावर म्हणाले, 'आमच्या मासिक बजेटात आम्ही ही तरतूदच केली आहे. गाजलेला सिनेमा बघायचाच.' गाजलेलं नाटक बघायचंच.' 'गाजलेली पुस्तकंही विकत घेऊन वाचता का ? त्यासाठी काही बजेट ?' असं विचारल्यावर मात्र हे गप्प झाले. म्हणाले, 'पुस्तकं लायब्ररीतनं आणून वाचतो, नाहीतर तुमच्यासारख्याकडनं उसनी घेतो. विकत घेऊन वाचणं काही परवडत नाही.' फ्रान्समधल्या ग्रनोब्ल ह्या लहान गावात मी काही आठवडे राहिलो होतो. दहाबारा घरी निमंत्रणावरून गेलो. ज्या ज्या घरी गेलो त्या त्या घरी लहानसं ग्रंथालय होतं. कोणातरी मोठ्या लेखकाच्या पुस्तकांचा सगळा सेट होता. कुठं आनातोल फ्रांस, कुठं बाल्झाक, कुठं झोला. लारूस ह्या महाकोशाचे खंड होते आणि कोणातरी आवडत्या अभिजात चित्रकाराचं मोठ्ठं चित्र होतं. रेनॉ, लोत्रेक, रेब्रां.

घरातली मुलं गोळा व्हायची, विचारायची,

'तुमचा देश कोणता ?'

'भारत.'

'गाव ?'

'मुंबईजवळचं, पुणं.'

लगेच घरात असलेला जगाचा ॲटलास आणून ती भारत शोधून काढत. मुंबईजवळचं पुणं शोधून काढत. आपण मला सांगा, आपल्या किती चांगल्या सुस्थितीतल्या घरात एखाद्या भारतीय किंवा मराठी लेखकाच्या पुस्तकांचा समग्र संग्रही आढळतो ? किती घरात 'संस्कृतिकोश'सारख्या कोश किंवा 'शब्दरत्नाकर' असतो ? कोणत्या चित्रकाराचं चित्र लावलेलं असतं ? आणि परदेशी पाहुणा घरी आलाच, तर आपली मुलं कधी जगाचा ॲटलास पहातात का ?

मग महाराष्ट्रात कसे मोठे साहित्यिक, मोठे चित्रकार, मोठे शिल्पकार निर्माण होणार ?

हेही आपलं दारिद्र्य लाज बाळगावी असंच नाही का ?

माणसाला केवळ अन्न-वस्त्र-निवारा पुरा होत नाही. गुहेत राहात, होता तेव्हाही त्यानं गुहांच्या भिंती चित्रांनी भरून टाकल्या नव्हत्या का ? तुमच्याआमच्या तुलनेनं, अधिक गरिबीत रहाणारे आदिवासी बघा. झोपडीच्या सारवलेल्या भिंतीवर कशा वेलबुट्ट्या उठवतात, कशी पशुपक्ष्यांची चित्रं रेखाटतात आणि ढोलाच्या तालावर कसे धुंद होऊन नाचतात !

आत्म्याची गरज भागवण्यासाठी धनाचा उपयोग झाल्याचं कोणी ऐकलं आहे का ?

आम्ही धनानं गरीब असू, पण संस्कारानं तरी श्रीमंत राहू !

मेंझाँ द क्युल्यूर नावाची संस्था ह्याच ग्रनोब्ल गावी मी पाहिली. स्तांदाल या श्रेष्ठ कादंबरीकाराचं स्मारक म्हणून ह्या संस्कृतिकेंद्राच्या रचनेत काळा आणि तांबडा असे दोनच रंग प्रामुख्यानं वापरले होते. का, तर स्तांदालाच्या सर्वश्रेष्ठ कादंबरीचं नाव आहे 'द रेड ॲण्ड द ब्लॅक.' केवळ दहा-बारा फ्रॅक्स एवढी मासिक वर्गणी भरून कोणालाही ह्या संस्थेचं सभासद होता येई. ह्या प्रचंड संस्कृतिकेंद्राच्या इमारतीत, प्रायोगिक रंगभूमीसाठी एक सुसज्ज थिएटर होतं; आर्टपिक्चर्स दाखवण्यासाठी एक सिनेमा थिएटर होतं; नव्या चित्रकारांना आपली चित्रप्रदर्शनं मांडता यावीत म्हणून आर्ट गॅलरी होती; उत्तम असं ध्वनिमुद्रित संगीत ऐकण्यासाठी एकट्याला बसून ऐकता यावं असे बूथ्स होते. लहान मुलांसाठी सुंदर असं ग्रंथालय होतं, नाना रंगातले आणि आकारातले फोमचे तुकडे जमिनीवर टाकलेले होते आणि गोल गोल दिव्यांच्या शेड्स् अगदी खाली आणून सोडल्या होत्या. का, तर मुलांनी लोळत, तंगड्या उडवत, कसंही पडून वाचावं. एक जागा प्रदर्शनासाठी होती. तिथं कोणीही आपल्या कल्पनेप्रमाणे प्रदर्शन भरवावं, इथल्या चित्रप्रदर्शनातलं आवडलेलं चित्र माफक भाड्यानं घरी नेऊन महिना दोन महिने लावता येई आणि पुन्हा परत करून दुसरं नेता येई.

हवेतच इमले बांधायचे तर आपण ह्या संस्कृतिकेंद्रासारखे का बरं बांधू नयेत ?

आणि त्याखाली कृतीचं जोतं घालूया म्हणून तात्काळ दगड घडायला का लागू नये ?

माझ्यासमोरच्या श्रोत्यात काही असे वाचक असतील की जे संभाव्य लेखक असतील किंवा काही कोवळे कोंब असे असतील की त्यांच्यात महावृक्षाचं आश्वासन असेल. त्यांना मी हेच सांगीन की, अनुभवाशी प्रामाणिक राहा. आणि स्वत:चीच अभिरुची साक्षी ठेवून लिहा. कुठलीही मळलेली वाट करू नका. तुमची वाट तुमच्याच पायांना पाडू द्या. ही भूमी एवढी विशाल आहे की नव्या वाटेसाठी तिच्यावर नित्य जागा असतेच. कोणासारखे होण्यासाठी खूप नका, स्वत:ला ओळखण्यासाठीच खपा. प्रतिभावंताची एकच प्रत निसर्ग काढतो आणि तो साचा मोडून टाकतो. एक झाड दुसऱ्या झाडासारखं नसतं. एक कलावंत दुसऱ्यासारखा नसतो. यशस्वी होण्याची घाई करू नका. अटीतटीच्या खटपटी करू नका. अनुकूल असा मोसम येताच वेलीला फळ धरतं. मोसम प्रत्येकाच्या बाबतीत जवळचा किंवा दूरचा असू शकतो. खाजगी वा सरकारी पारितोषिकांना फार महत्त्व देऊ नका. रसिकांनी दिलेली दाद हे फारच श्रेष्ठ पारितोषिक असतं. समीक्षकाच्या मतामुळे खट्टू होऊ नका. ते त्याचं एकट्याचं मत असतं आणि अखेर तोही एक वाचकच असतो.

तुम्हाला 'शिल्पकार आणि त्याचा पुतळा' ही बोधकथा माहीत आहे का ? एका नव्या शिल्पकारानं पुष्कळ वर्ष खपून संगमरवरी पुतळा तयार केला— सुंदर पुतळा—आणि शिल्पकलेचे जे मर्मज्ञ होते त्यांना पहायला एका दालनात ठेवला. फलकावर सूचना लिहिली, 'जिथं काही उणं वाटेल तिथं पेन्सिलीनं खूण करा.' जवळ पेन्सिलीही ठेवल्या होत्या. दिवसभर रीघ लागली. बरेच प्रेक्षक बघून गेले.

दालन बंद करायच्या वेळी शिल्पकारानं उत्सुकतेनं पुतळा पाहिला तर काय ! पेन्सिलीच्या खुणांनी सर्व पुतळा केसापासून पायाच्या बोटांच्या नखापर्यत भरून गेला होता.

हा फार खट्टू झाला. उदासवाणा होऊन मित्राला म्हणाला,

'मी कधीच उत्तम शिल्पकार होणार नाही. मला काही येतच नाही !'

मित्र म्हणाला,

'अरे, उद्या पुन्हा प्रदर्शन करू., सूचना लिहू, 'जे आवडेल तिथ पेन्सिलीनं खूण करा.'

शिल्पकारानं पुतळा स्वच्छ केला. आणि पुन्हा दुसऱ्या दिवशी दालन उघडं ठेवलं. पुन्हा आणखी मर्मज्ञ बघायला आले. जे जे आवडलं तिथं त्यांनी खुणा केल्या.

संध्याकाळी सगळा पुतळा पुन्हा खुणांनी भरून गेलेला दिसला ! शिल्पकाराची खात्री झाली की आपण चांगली कलाकृती निर्माण केली आहे.

अखेर समीक्षा ही पाण्यावरची अक्षरं असतात, पाषाणावरची नव्हेत.

जे सांगाल ते सोप्या मराठीत सांगा. सोपं लिहिणं ही फार कठीण गोष्ट असते. शब्दही नेमके येऊ द्यात.

तुकारामबुवांच्या गाथेत एक अभंगाची ओळ आहे,

*'काय दिनकरा केला कोंबड्याने खरा'*

हा 'खरा' म्हणजे खोटाखऱ्यातला नव्हे.

'खरा करणं' म्हणजे काय हे घराचं बांधकाम करणाऱ्या खेड्यातल्या सुताराला, मेस्त्रीला विचारा. नव्या घरावर माळवद घालताना, भिंतीवर आडवं खांड टाकलं की वर चढून ठोकाठोकी करणारे कामगार खालच्या मेस्त्रीला विचारतात, 'काय मेस्त्री, आता हे खांड खरं करायचं का ?'

मेस्त्री, ते रेघेत आहे का नाही हे डोळ्यांनी बघतो, 'दोन विती पलीकडं घ्या', वगैर सूचना देतो. आणि खांड रेघेत आलं की म्हणतो, 'हं, आता करा खरं !'

खरा करणं म्हणजे त्या जागा पक्का करणं. सूर्याला आभाळात पक्का केला आहे तो काही कोंबड्यानं बांग देऊन नव्हे. मला वाटतं तुकारामबुवांनी 'खरा' हा शब्द ह्या अर्थी वापरला आहे.

तुमचं कुतूहल सतत जागं ठेवा. कसलीही कुंपणं घालून घेऊ नका. रुसो सांगतो की, 'माणसानं पहिल्यांदा कुंपणाची मेढी रोवली तीच त्याच्या दु:खाची मुहूर्तमेढही होती !'

तुम्ही जर स्वत:च्या स्वप्नांना अनुसरत, आत्मविश्वास बाळगून पुढंपुढं जात राहिला आणि स्वत: कल्पलेलं जीवन जगून पहाण्याची धडाडी दाखवलीत, तर नेहमीच्या सामान्य वाचणाऱ्या घटनांतसुद्धा तुम्हाला लोकविलक्षण श्रेयाची प्राप्ती झाल्यावाचून रहाणार नाही.

'मळ्यास माझ्या कुंपण पडणे अगदीं न मला साहे' असं ज्या आद्य क्रांतिकारक कवी केशवसुतांनी उंच आवाजात म्हटलं आहे, आणि तुमच्या माझ्या वतीनं साहित्यिकांचा जाहिरनामाच फडकवला आहे, त्यांच्या ओळीच आपण पुन्हा जाहीर करू या.

*जिकडे जावें तिकडे माझीं भावंडें आहेत,*
*सर्वत्र खुणा माझ्या घरच्या मजला दिसताहेत;*
*कोठेंही जा - पायांखालीं तृणावृता भू दिसते,*
*कोठेंही जा - डोइवरतें दिसतें नीलांबर तें;*
*सांवलीत गोजिरीं मुले.*
*उन्हांत दिसती गोड फुलें;*
*बघतां मन हर्षून डुले;*
*तीं माझीं, मी त्यांचा—एकच ओघ आम्हांतुनि वाहे !*

□□□

# जळगांव : १९८४

# शंकरराव खरात

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी मुक्या दलित समाजाला वाचा दिली, बोलके केले आणि हा मूक ठेवलेला, तोड बांधलेला दलित समाज बोलू लागला. दलित साहित्यिकहि बोलू लागले. लिहू लागले. आणि मीही बोलू लागलो. लिहू लागलो. म्हणूनच मी आज आपल्यापुढे साहित्य संमेलनाचा अध्यक्ष म्हणून भाषण करण्यासाठी उभा आहे. डॉ. बाबासाहेब नसते तर मीहि आज तुमच्यासमोर उभा दिसलो नसतो. दलित साहित्यिकहि आज दिसले नसते. हे मी खरं सांगतोय.

अर्थात् आज जळगांव मुक्कामी ५८ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष करण्याचे आपणा सर्वांचे श्रेय आहे त्यात आपण सर्व जळगांवकरांनी— जळगांव जिल्हावासियांनी मला हा मान दिला, हा माझा सन्मान केला, याबद्दल मी आपला सर्वांचाच अत्यंत आभारी आहे.

याच भागातील, जळगांव परिसरातील— 'आसोदे' गावाच्या सुप्रसिद्ध कवयित्री बहिणाबाई यांनी उस्फूर्त काव्य लिहून मराठी वाङ्मय समृद्ध केले. विशेषत: त्यांच्या रसरशीत, टवटवीत, अशा चिरंतन काव्याने मराठी साहित्यात नवा प्रवाह आणला, क्रांति केली. त्या बहिणाबाईला मी वंदन करतो. त्यांना माझे शतश: प्रणाम आहेत. 'मानसा मानसा कधी होशील मानूस ?' हे त्यांचे शब्द मी माझ्या काळजावर कोरून ठेवलेले आहेत.

साहित्य संमेलनाच्या ५८ व्या वर्षात आज जळगांवच्या साहित्य संमेलनासाठी माझी निवड करून, आपण मराठी साहित्याच्या क्षेत्रात एक ऐतिहासिक स्वरूपाचे, सामाजिक परिवर्तनाच्या दिशेने एक पुढचे पाऊल टाकलेले आहे. एक निष्ठावंत साहित्यिक म्हणून मला निवडून दिल्याने आजच्या प्रसंगाने—समारंभाने माझा एक साहित्यिक म्हणून सन्मान केला हे खरेच ! त्यातच मी दलित साहित्यिक असल्याने, शतकानुशतके, वरिष्ठ समाजाकडून दडपला गेलेल्या, शोषण केले गेलेल्या उपेक्षित अशा दलितांच्या जखमी मनोवेदनेवर थोडीशी फुंकर मारल्यागत होईल, असे मला वाटते.

मी आपल्याला आत्ताच सांगितले की, डॉ. बाबासाहेब आंबेडकर भारतीय क्षितिजावर गर्जत आले, आणि मुका असलेला दलित समाज बोलू लागला. दलित

साहित्यिकहि उघडपणे बोलू लागले.

—पण १३ व्या शतकातील संत चोखोबा लोकांपुढे आले. त्यांनी आपल्या अभंगवाणीतून उच्चवर्णीयांना आपल्या कडक भाषेत म्हणाले,

"वेदाशी विटाळ, शास्त्राशी विटाळ। पुराणे अमंगळ विटाळाची" त्याच अभंगात संत चोखोबा शेवटी म्हणतात,—

'जन्मता विटाळ मरता विटाळ। चोखा म्हणे विटाळ आदि अंती ॥'

त्या कालखंडाचा विचार करता संत चोखोबाच्या या वाणीत मला मोठा अर्थ दिसतो. दैनंदिन जीवनात अस्पृश्यतेमुळे जी शिवा-शिव. विटाळ पाळला जातो त्यावर त्यांनी हा हल्ला केला आहे, 'विटाळ' या भावनेत कांहीच अर्थ नाही. हे त्यांनी तर्कशुद्ध पद्धतीने सर्वांना ओरडून सांगितले की, "विटाळ, शिवा-शिव, अस्पृश्यता मानू नका. 'आदि-अंती' विटाळच आहे."

संत चोखोबाच्या पत्नी साध्वी सोयराबाई यांनीहि अस्पृश्यता मानणाऱ्यांना आपल्या अभंगवाणीतून सवाल केला आहे—

*"देहासी विटाळ म्हणतो सकळ। आत्मा तो निर्मळ शुद्धबुद्ध ॥*
*देहीचा विटाळ देहीच जन्मला। सोवळा तो झाला कवण धर्म ॥*
*म्हणुनी पांडुरंगा वानितसे थोरी। विटाळ देहांतरी वसतसे ॥"*

याप्रमाणे सोयराबाईनी विटाळ, शिवा-शिव या मनोभावनेवर टीका करून त्यांनी शास्त्रीय पद्धतीने सर्वांनाच सवाल करून सडेतोड उत्तर दिले आहे.

*"देहीचा विटाळ देहची जन्मला। सोवळा तो झाला कवण वर्ण ॥"* असा सवाल करून त्या चोखोबाला साथ देतात.

संत चोखोबाचा मुलगा कर्ममेळा मात्र आपल्या अभंगातून उघड उघड बंडखोरीचीच भाषा करून, देवालाच सवाल करतोय,

*"आमची केली हीन यानी। तुला का न कळे श्रीपती ॥*
*जन्म गेला उष्टे खाता। लाज न येत तुमच्या चित्ता ॥"*

अशी ते बंडखोरीची भाषा करून, देवालाच जाब विचारतात.

त्याला कारण अस्पृश्यतेमुळे त्याचा जीवनात होणारा छळ, त्याच्यावर होणारे सामाजिक अन्याय, याला चिडून, संतप्त होऊन तो अशी कडक भाषा करतो. आपल्या बापापेक्षा तो चढाईची भूमिका घेतो.

— परंतु १३ व्या शतकातील या थोर दलित संतावर त्या कालखंडातील सामाजिक परिस्थितीच्या बंधनाच्या निश्चित मर्यादा लादल्या होत्या, हे उघडच आहे.

प्राप्त परिस्थितीचे त्यांच्या बोलण्या-वागण्यावर बंधन आल्याने त्यांना शेवटी प्राप्त परिस्थितीला शरण जावे लागले, ही दुर्दैवी घटना आहे.

या दलित संताचेच काय, पण त्यांचेच समकालीन थोर संतमहात्मेहि परिस्थितीला, परंपरागत, शास्त्रबद्ध विचारसरणीला शरण गेलेले दिसतात. त्यात संत चोखोबा, त्यांची कुटुंबीय मंडळी ही तर दलितच होती. त्यांचे सर्व जीवनच गावावर अवलंबून असले पाहिजे.

— पुन्हा मूळ मुद्द्यावर येऊन सांगावयाचे म्हणजे डॉ. बाबासाहेब आले, आणि त्यांनी आपल्या विद्रोही, वाणी-विचारातून, आपल्या बडखोरीच्या कृति-कार्यामुळे दलितांना बोलके केले, आम्ही बोलू लागलो.

खरे तर डॉ. बाबासाहेब महान् साहित्यिक. त्यांची मोलाची ग्रंथसंपत्ति, लेखणी-वाणीतील विचार-धन, याचा विचार करता, त्यांच्या जीवनकाळात, तेच साहित्य संमेलनाचे अध्यक्ष व्हावयास पाहिजे होते. मराठी साहित्यिकांनी त्यांना निमंत्रण देऊन त्यांना हा मान द्यावयास पाहिजे होता. परंतु त्यांच्या काळातील साहित्यिकांना, त्यांच्यासारखा हिमालयागत उत्तुंग साहित्यिक, महान् विचारवंत दिसलाच नाही, याची खंत माझ्या मनाला सतत असते. पण आज त्यांच्याच विचाराच्या, त्यांच्या कट्टर अनुयायाला हा मान मिळत आहे, हेहि एक मराठी साहित्याच्या जगतात सामाजिक परिवर्तनाचे एक पाऊल उचलले गेले आहे असे मला वाटते.

## दलित साहित्याच्या प्रेरणा

दलितांना दास्यात, गुलामगिरीत ठेवणाऱ्या रूढी, परंपरा, धर्मशास्त्रे यांना नकार देण्याचा क्रांतिकारक विचार डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी दिला. या विद्रोही नकाराच्या विचाराबरोबरच समता, बंधुता, स्वातंत्र्य व न्याय अशा श्रेष्ठ मूल्यांवर आधारलेला नव-समाज निर्माण करण्याचा मूलगामी विचारहि त्यांनी दलितांना दिला. स्वाभिमानाने, जगण्याचा आत्मोद्धार करण्याचा, स्वयंप्रकाशित होण्याचा विचार त्यांनीच दलितांना दिला. डॉ. बाबासाहेबांच्या या मूल्यांमुळे क्रांतिकारी विचारातून, त्यांच्या विद्रोही बंडखोरीच्या जीवन-कृतीतून दलित साहित्याचा जन्म झाला. म्हणून तेच खरे दलित साहित्याच्या प्रेरणा आहेत. दलित साहित्याला मूळहि डॉ. बाबासाहेबांच्या प्रेरणांचा आधार आहे, असे मी मानतो. माझ्या साहित्यलेखनातील प्रेरणा या त्यांच्याच विचार-सिद्धांताच्या व कृतिकार्याच्या आहेत.

## मी दलित साहित्यिक आहे

मला असाहि प्रश्न विचारण्यात येतो की, तुम्ही स्वत:ला दलित साहित्यिक म्हणवून घेता का ?

याला माझे उत्तर उघडच आहें—

माझा जन्म दलित समाजात झाला. हा दलित समाज शतकानुशतके सर्व दृष्टीनी दडपला गेलेला, पिळला गेलेला असून त्याच्यावर सतत अन्याय, अत्याचार होत आलेले आहेत. त्या समाजाचा एक प्रतिनिधि म्हणून मी 'दलित जाणिवेतून' माझे साहित्य लिहिले, लिहीन. माझ्या वाङ्मयीन कलाकृतीतून—कथा, कादंबरी, ललित लेख व आत्मकथा यांतून दलितांचे वास्तव, अस्सल जीवन-अनुभव मी प्रामाणिकपणे लिहिलेले आहेत. तसेच माझ्या वैचारिक लेखनाचाहि तोच पाया आहे.

दलित समाजातून वेगवेगळ्या स्तरातील समाजाच्या म्हणजेच अस्पृश्य, आदिवासी, भटक्या विमुक्त जमाती, झोपडपट्टीवाले, फुटपाथवाले यांच्या जीवनातील व्यथा-वेदना, आशा-आकांक्षा, त्यांचा माणुसकीसाठी चाललेला मुक्तिसंग्राम, यांना मी त्यांच्याच जगलेल्या, भोगलेल्या व पाहिलेल्या जीवनाच्या आधारे, माझ्या वाङ्मयीन कलाकृतीत स्थान दिले आहे, लिहिलेले आहे. ते खरे दलित साहित्य आहेच. म्हणून मी स्वत:ला दलित साहित्यिक समजतो.

## मी साहित्य का लिहू लागलो :

मी व्यवसायाने वकील-ॲडव्होकेट होतो. त्याचबरोबर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली राजकारणात व समाजकारणात माझ्या आयुष्याचे दीड-एक तप मी खर्ची घातले. त्या काळात मी दलित, आदिवासी, भटक्या-विमुक्त जमाती, बौद्ध व भूमिहीन मजूर यांच्या प्रश्नावर वारंवार वृत्तपत्रांतून, मासिकांतून लेख लिहिले होते. त्यातच माझ्या वकिली व्यवसायाच्या काळात माझ्यापुढे अनेक प्रकारचे, वेगवेगळ्या मनोपिंडाचे लोक आले, मला भेटले. ते आपापले प्रश्न घेऊन माझ्यापुढे येत होते. त्यातील काही आपापल्या विलक्षण जगात आपले जीवन जगत होते. त्यातच 'दलित फेडरेशन' या राजकीय पक्षाचा संघटक सचिव म्हणून काम करताना मला दलितांचे प्रश्न, विशेषत: महाराष्ट्रातील दलितांचे प्रश्न, त्यांच्या व्यथा, त्यांच्या आशा-आकांक्षा, जाणून घेता आल्या, समजल्या. मीहि त्यांच्या प्रश्नांशी एकरूप झालो होतो.

— अशा जगात वावरत असतानाच त्या काळात दलितांच्या जीवनावरील दलितेतर—मध्यमवर्गीय लेखकांच्या कांही कथा, कादंबऱ्या माझ्या वाचनात अधूनमधून येत होत्या. त्या मी जेव्हा बारकाईने वाचू लागलो तेव्हा मला समजू लागले, कळू लागले की, मध्यमवर्गीय लेखकांनी लिहिलेल्या साहित्यात कथा, कादंबरी, नाट्य यात मला दलितांच्या व्यथा, वेदना, आशा-आकांक्षा दिसत नव्हत्या. त्यांत दलितांच्या मुक्तीसाठी चाललेला संघर्ष, लढा दिसत नव्हता. त्यांच्या कथा, कादंबऱ्या, नाट्यातील अनुभव कोरडे-कोरडे, काल्पनिक, उथळ वाटत होते. त्यांच्या साहित्यात मला दलितांच्या जीवन-अनुभवाचा अस्सलपणा, जिवंतपणा दिसत नव्हता. त्यांच्या साहित्यात मला

दलितांचा जीव, दलितांच्या जीवनाचा तळ, खोली, दिसत नव्हती. त्यांच्या मध्यमवर्गीय साहित्यिकांच्या वाङ्मयातील शब्दाशब्दांतून चित्रित केलेले कथा-कादंबरींतील अनुभव माझ्या काळजाला भिडत नव्हते. मला ते काल्पनिक वाटत होते. मी दलित म्हणून भोगलेल्या, जगलेल्या माझ्या अनुभवांना ते पटत नव्हते.

त्यांच्या कथा-कादंबऱ्यात दलितांच्या जीवनातील अस्सल, सच्चे अनुभव नसल्याने त्या जीवनस्पर्शी न होता, त्या उथळ वाटत. त्यांत वास्तव-अनुभवापेक्षा कल्पनेचा पायाच अधिक दिसतो. त्यात दलितांची जिवंत अस्मिता, दलित-जाणीव, दलितांची नकार व विद्रोही भूमिका आलेली दिसत नाही, असे मला दिसले.

म्हणून मी ठरविले की, आपणच आता दलितांच्या जीवनातील जिवंत अनुभव ललित वाङ्मयाच्या रूपात लिहावेत. आपणच अस्पृश्य, दलित म्हणून भोगलेले, जगलेले, अनुभवलेले व पाहिलेले सत्य जीवन लिहावे व वाचकांपुढे मांडण्याचा प्रयत्न करावा. त्यातून वाचकाला दलितांचे खरे जीवन, खरे अंतरंग, त्यांच्या जीवनाची खोली, त्यांच्या आशा-आकांक्षा, त्यांचा माणुसकीसाठी चाललेला संघर्ष कळण्याला मदत होईल. याच अंतरीच्या ऊर्मीने मनातील उसळत्या भावनेने मी ललित वाङ्मयाकडे वळलो. माझी पहिली कथा 'संतूची पडीक जमीन' आचार्य अत्रे यांच्या 'नवयुग'च्या दिवाळी अंकात प्रसिद्ध झाली. ही एका दलिताची 'विद्रोही' कथा होय. ही माझ्या 'सांगावा' या कथासंग्रहात 'डाव' नावाने प्रसिद्ध झालेली आहे. माझी ही कथा अनेक साहित्यिक मित्रांना आवडली. त्यानंतर मी ललित वाङ्मयकथा-कादंबरी लेखनाची वाटचाल करू लागलो.

## माझे जीवन

मला माझ्या जीवनात वेगवेगळ्या स्तरांवर वेगवेगळ्या जगात विलक्षण, अद्भुत अनुभव आले. त्याचबरोबर एक गोष्ट खरी की, मी खेडेगावच्या गावगटाच्या गाववेशीच्या बाहेरील 'महारवाड्यात'ले दैनंदिन जीवन भोगले आहे. मी ते प्रत्यक्षात जगलोहि आहे. ते जगत भोगत मी वाढलो. तसेच गावकुसवाच्या आतल्या जीवनाचाहि मला पुरेपूर अनुभव आला. त्यातहि मी जगलो व वाढलो आहे. त्याच अनुभवाच्या-अनुभूतीच्या आधारावर मी माझ्या गावातील बारा बलुतेदारांच्या जीवनावर कथा लिहिल्या. त्यातले बलुतेदार माझ्या गावातील. माझ्या जवळचे, सलगीचे, त्यांची मुलं माझ्या खेळामेळातली. त्यांच्याच जीवनाचे गाठोडे या कथेच्या रूपात वाचकांपुढे सोडले. या बलुतेदारांच्या मुलांबरोबर मी गावच्या कुरणात, रानवनात शिकारी खेळलो. गावच्या, गाव-शिवेवरच्या जत्रा — उरसात रात्र रात्र उजडत घालविली. या रोजच्या गावकीतलाच मी बलुतेदार जातीतल्या सोबत्यात पूर्ण रमलो होतो. त्यांच्याचपैकी एक झालो होतो. विशेष म्हणजे माझ्या गावात महार म्हणून गावकीची कामं करतांना, बैल्यांची कामं करताना या

बलुतेदारांच्या जीवनाचे मला अंतरंग कळले. त्याच्यावर मी कथा लिहिल्या. खरं तर या बलुतेदारांच्या व्यथेमागे एक एक मोठी कथा आहे.

नंतर, पुढच्या सालच्या 'नवयुग'च्या दिवाळी अंकात 'माणुसकीची हाक' या नावाची एक कादंबरी महार-बलुतेदाराच्या गावकीच्या महार-जीवनावर लिहिली. (ती पुस्तकरूपाने अजून प्रकाशित झाली नाही) रयतेच्या व सरकारी गावकीच्या कामात महार कसा भरडला जातो, याची वास्तव कथा सांगितली आहे. त्यात मला माझ्या वडिलांच्या बरोबर केलेल्या गावकीच्या कामाचा पुरेपूर अनुभव होताच, तोच कादंबरीचा आधार.

## पूर्वीच्या महारांची कामे

पूर्वीच्या काळी गावचा महार दोन घरचा चाकर असे. एक रयतेचा दुसरा सरकारी गावकीचा.

म्हणजे माझे वडील रयतेच्या मध्यात मयत झाले तर मढ्याची लाकडे, गोवऱ्या मसणवट्यात टाकून, मयताचा सांगावा घेऊन जावे लागत होते - आणि त्याच वेळात जर का वरचा अंमलदार गावाला आला, तर त्याच्या तैनातीला— सेवेला महार गावकामगाराला हजर राहावे लागत होते.

मी शाळेत असतांना माझा लहान भाऊ आजाराने मयत झाला. त्याला मातीआड करून आल्यावर थोड्याच वेळात माझे वडील मुलाच्या मृत्यूचं सगळं दुःख गिळून गावतली मुलं वाचविण्यासाठी, गावात 'डागदार' येणार म्हणून गावात दौंडी द्यावयाला गेला. जावं लागलं.

त्यातच गावच्या महारांच्या कामाची यादी निश्चित नव्हती. वास्तविक सरकारी-बिनसरकारी कचेऱ्यांच्या कामाची यादी वेळ, काळ निश्चित असतो. पण माझे वडील इतर गावकीच्या महाराप्रमाणे गावकीच्या गाववाड्याला जनावरागत — बैलागत कायमच जुपलेले दिसायचे आणि तेहि उपाशीपोटी हे मी डोळ्याने बघत असे.

बरं, या रयतेच्या, गावकीच्या — गाववाड्याच्या कामाला काय वेळकाळ तरी ! बारान्-बारा चोवीस घंटे, त्याच्या दारात कामाची हाक आली की, "हाय जी मालक ! सरकार !" असं म्हणून गावकीच्या महारानं पायरीजवळ खडा उभं राहिलं पाहिजे. माझ्या वडिलानं तर गावकीचं काम सतत केलं. ऊन, पाऊस पाहिला नाही की, थंडीवारा पाहिला नाही. कधी थंडीवारा म्हटला नाही की ऊनपावसाची तक्रार केली नाही. गाड्यावर जुंपलेल्या बैलागत थंडीवाऱ्यात, ऊनपावसात गावकीची कामं केली. मग ते गावकीचं टपाल पोचवायचं काम असो, की ठाण्याच्या खजिन्यात भरणा पोहोचवायचा असो !

—तुम्हाला सांगतो की, अशा रातच्या अंधाराच्या अडचणीच्या वेळी घाईटीच्या कामात मीहि माझ्या वडिलांच्या बरोबर सोबतीला राहिलोय. गावच्या चावडीवर दिवसा-

रात्री बसून बशा-जागल्याची कामंहि केलीत.

अशी गावगाड्यातली कामं माझ्या आईनं केलीत. कारण, अशी गावकीची कामं कुणी करावीत, याची माणसंहि निश्चित ठरलेली नव्हती. अशा ऐन घायटीच्या वेळी वडील दुसऱ्या कामात अडकल्याने, मी स्वत:ही गावकीच्या महारगड्याबरोबर आत्महत्या केलेल्या — बेवारशी माणसाचं प्रेत झाडाचं सोडून शेवटी त्याला डबर खांदून पुरण्यापर्यंत कामं केलीत.

पण गावगाड्यात अशा दलितांचे जीवन त्याच्या जन्मानं, जातीनं व धंद्यानं उद्ध्वस्त करून त्याला गुलाम करून टाकलं होतं. त्याला अदृश्य माणूस (Invisible Man) म्हणून ठेवले होते.

असं हे गावगाड्यातल्या गावकीच्या महाराचं 'बॉडेड-लेबर' बंदिस्त मजुरासारखं गुलामगिरीतलं जीणं होतं. म्हणूनच या महार गावकीच्या वतनपद्धतीला, 'महार वतन' म्हणजे विसाव्या शतकातील गुलामगिरी आहे, असे डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणत.

वास्तविक हाच गुलामगिरीत जगणारा महार व इतर दलितवर्ग प्राचीन काळी याच भूमीचा मालक होता. याच भूमीचा भूमिपुत्र होता. याच भूमीचा 'राजा' होता. महाराष्ट्र हा 'महाराचे राष्ट्र' होते. (यावर माझा एक स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध होणार आहेच) आणि असाच विचार महाराष्ट्रातील कांही मान्यवर विद्वान, संशोधक व पाश्चिमात्य संशोधकांनीहि मांडलेला आहे.

याच महार समाजाची, दलित समाजाची संस्कृति मोठी होती, लोककला मोठी होती. आणि संगीतकलाहि मोठी होती. तो आजहि टिकून राहिलेली आहे.

अशा या जीवनातील अनुभवाच्या आधारावर मी माझं ललित लेखन केलेलं आहे. माझं ललित वाङ्मय हे माझ्या जीवनाच्या आत्मकथेचाच एक भाग आहे. माझ्या कथा-कादंबरीतील माणसे माझ्या जीवनात आलेली आहेत. मीहि त्यांच्या जीवनाशी समरस झालेलो आहे. मग ती बलुतेदार असोत वा तडीपारमधले विमुक्त असोत किंवा गावशिवमधले भटके असोत. किंवा झोपडपट्टी, फुटपाथवरची पात्रे असोत, माझ्या माहितीतली चांगली सगळी सगळीच माणसे ! ती माझ्या घरी आलेली आहेत. राहिलेली आहेत ! मीही त्यांच्या घरी, पालावर गेलो आहे. मुक्काम केलेले आहेत. तेव्हा तेव्हा त्यांच्या जीवनातली अस्पृश्यता, दारिद्र्य, अज्ञान मी पाहिले आहे. त्यांनी सांगितलेल्या त्यांच्या व्यथा, वेदना माझ्या काळजाला भिडलेल्या आहेत. एकदाच नाही तर पुन: पुन्हा खरं तर ते आणि मी जिवाभावानं एकच झालो होतो. त्यांच्या त्या जीवनातील वेदनांना, आशाआकांक्षांना मी माझ्या कथा-कादंबरीतून वाट काढून दिलेली आहे.

## दलित साहित्याची जरुरी आहे का ?

मी आपल्याला सांगितलेच की मी मुख्यत: दलितातील सर्व थरातील समाजाच्या,

वर्गाच्या जीवनावर माझे साहित्य लिहिलेले आहे, हे खरेच. त्यामुळे आजचे दलित साहित्यिकाचे साहित्य पाहून असा प्रश्न उभा केला जातो की, — आज दलित साहित्याची जरुरी आहे का ? कशासाठी हे दलित साहित्य ?....

अर्थात हे प्रश्न नवे नाहीत. दलित सहित्याच्या जन्मापासूनच हे दलित साहित्यिकांना पुनः पुन्हा विचारले जात आहेत. या प्रश्नांना आघाडीच्या सर्वच दलित साहित्यिकांनी, दलितेतर विचारवंत समीक्षकांनी पुनः पुन्हा उत्तरे दिलेली आहे. त्यांच्या नावाची यादी सांगून व त्यांनी याविषयीसंबंधी लिहिलेली पुस्तके व लेखातील उतारे (उद्धृत करून) सांगून आपला वेळ घेऊ इच्छित नाही. नागपूर येथे विदर्भ साहित्य संघात साहित्यासंबंधी बोलतांना डॉ. बाबासाहेब आंबेडकर म्हणाले होते —

"उदात्त जीवनमूल्ये व सांस्कृतिक मूल्ये आपल्या साहित्य प्रकारातून आविष्कृत करा. आपलं लक्ष आकुंचित, मर्यादित ठेवू नका. ते विशाल बनवा. आपली वाणी चार भिंतीपुरती राखू नका. तिचा विस्तार होऊ द्या. आपली लेखणी आपल्या प्रश्नापुरतीच बंदिस्त करू नका. तिचं तेज खेड्यापाड्यातील अंधार दूर करील, असे प्रवर्तित करा. आपल्या या देशात उपेक्षितांचं, दलितांचं फार मोठं जग आहे हे विसरू नका. त्यांचं दुःख, त्यांची व्यथा नीट समजावून घ्या, आणि आपल्या साहित्याद्वारे त्यांचे जीवन उन्नत करण्यास झटा. त्यातच खरी मानवता आहे."

दलित साहित्य का पाहिजे, याचं उत्तर डॉ. बाबासाहेबांच्या या विचारात आहे.

## जातीयपद्धतीची समाजव्यवस्था

दलित साहित्य का पाहिजे ? या प्रश्नाचे उत्तर आणखी थोडं विस्तारानं सांगावयाचं म्हणजे आपण भारतीय समाजव्यवस्थेतील वास्तव डोळसपणे पाहिले म्हणजे त्याचे उत्तर आपोआपच मिळेल.

भारतीय समाजव्यवस्थाच उच्च-नीच, श्रेष्ठ-कनिष्ठ अशा जातीय पद्धतीवर आधारलेली आहे. म्हणून भारतीय समाजव्यवस्था व पाश्चिमात्य समाजव्यवस्था यात मूलतः फरक आहे. भारतीय समाजव्यवस्था जातीय पद्धतीवर (कास्ट सिस्टिम) आधारलेली आहे. पाश्चिमात्य समाजपद्धती वर्गपद्धतीवर (क्लास सिस्टिम) आधारलेली आहे. भारतातील जातीय पद्धतीच्या समाजव्यवस्थेत जन्माला आलेला व वाढलेला साहित्यिक जेव्हा आपल्या वास्तव अनुभवाला प्रामाणिकपणे आकार-रूप देतो, त्याप्रमाणे त्यांच्या वाङ्मयीन कलाकृतीत, त्याच्या अनुभवाचा आशय येतो. त्या आशयाला आकार-रूपही येते. जातीय समाजव्यवस्थेमुळे कलाकृतीच्या अनुभवाचा आशय महाराष्ट्रात व भारतातहि जातीविशिष्ट आहे.

अशाच जातीय पद्धतीच्या समाजव्यवस्थेतील दलित साहित्यिक आपल्या अनुभवाला आकार-रूप देणार त्यामुळे वेगवेगळ्या जाति-लेखकांची आपापल्या अनुभवाचा वेगवेगळा

आशय घेऊन, वेगळ्याच रूपात (फॉर्ममध्ये) वेगळ्याच आदर्शाने (नॉर्ममध्ये) येणे स्वाभाविक आहे. अपरिहार्य आहे. साहित्याला जेव्हा वास्तवाचा आधार असतो, तेव्हा ते वेगवेगळ्या स्वरूपात येणारच !

प्रत्येक जातीच्या—समाजाच्या जीवनातील अनुभव, भावविश्व, संघर्ष भिन्न व वेगवेगळे आहेत. हे वास्तव आहे, याचा विसर पडता कामा नये.

आपल्या देशात दलित, आदिवासी, विमुक्त-भटक्या जमाती व इतर मागासलेला वर्ग, भूमिहीन मजूर, झोपडपट्टीत राहणारे, फुटपाथवर राहणारे असे लोक मोठ्या प्रमाणात आहेत. त्यांचे हे अस्तित्व मान्य केल्यावर, त्यांच्या जीवनावरील साहित्य-दलित साहित्य हे आपोआपच त्यांच्या वेगळेपणात, वेगळ्या संवेदनात जन्माला येणारच. आणि त्याचे वेगळेपणाहि साहित्याच्या आशयात वेगळेपणात राहणार हे आपल्याला नाकारता येणार नाही. म्हणून या देशाच्या समाजव्यवस्थेत असा हा मोठा दलित वर्ग आहे. म्हणून दलित साहित्य जन्माला येणार व त्याचे अस्तित्वहि स्वतंत्र (जातिविशिष्ट) असे राहणार हे स्वाभाविक आहे.

त्यातच आतापर्यंतच्या काही पांढरपेशा-मध्यमवर्गीय लेखकांच्या साहित्यात दलितांचे खरे जीवन, त्यांच्या वेदना, आकांक्षा, संघर्ष आलेच नाहीत. दलित समाजाचे जीवन चित्रित करण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण त्यांच्या साहित्याला वास्तवाचा खरा आधार नाही. दलितांच्या जीवनातील अनुभवाची जाणीव, दलित जाणीव या मध्यमवर्गीय लेखकांना नसल्यामुळे दलितांच्या जीवनाचे वास्तव दर्शन त्यांच्या साहित्यात होत नाही. त्यात दलितांच्या जीवनातील श्रद्धा, निष्ठा, आशा, आकांक्षा दिसत. (त्यांच्या दलितासंबंधीच्या साहित्यात जातिविशिष्टाच्या अनुभवाचा आधार नव्हता व नाही व ते निरीक्षण व सहानुभूति यावर आधारलेले होते म्हणून ते दलित साहित्य होऊ शकत नाही.)

गावकुसाबाहेर राहाणाऱ्या दलितांच्या जीवनाकडे खऱ्या अर्थाने मध्यमवर्गीय लेखकांचे लक्षच गेले नाही. अदृश्य (Invisible) माणसांच्या दुःखाचा हुंदका जगाला सांगितला नाही. अदृश्य माणसाला जगापुढे आणले नाही. दलितांना दलित म्हणून ठेवणाऱ्या प्रस्थापित रूढी, परंपरा, शास्त्रे याविरुद्ध आपला आवाज मध्यमवर्गीय साहित्याने उठवला नाही.

दलित साहित्य हे दलितांच्या जीवनाचा एक अविभाज्य, अभंग असा भाग आहे. दलित साहित्यातील कथा, कादंबरी, काव्य, नाटक व आत्मकथा ही तळागाळातील जीवनातून निर्माण झालेली आहे. दलितांचे विशिष्ट दुःख आहे. ते विशिष्ट दुःख मध्यमवर्गीय लेखकांना कळणार नाही. त्यांचे जीवनच दुःख आहे. आणि त्या दुःखातून मुक्तीचा मार्ग दलित साहित्य शोधत आहे. दलित साहित्य अदृश्य (Invisible) असलेल्या दलित समाजाला उघड करण्याचे कार्य करत आहे.

म्हणूनच दलित साहित्याने 'माणूस' हा केंद्रबिंदु मानून माणसाच्या महतीला,

प्रतिष्ठेला, माणसाच्या स्वातंत्र्याला महत्त्वाचे स्थान दिले आहे. माणसाची दास्यमुक्ति हाच त्यांचा प्रकट जाहीरनामा आहे. दलित साहित्य हे 'मी'चा शोध आहे. मी कोण आहे ? या समाजात माझे काय स्थान आहे ? याचा शोध घेत आहे. म्हणूनच दलित साहित्याचे अस्तित्व आहे व अस्तित्व पाहिजे आहे. दलितांची दु:खे, आशा-आकांक्षा, मुक्तिसंग्राम, मराठी साहित्यात खऱ्या अर्थाने आलाच नाही, म्हणून दलित साहित्याचे अस्तित्व आहे. भारतीय समाजव्यवस्थेत जोपर्यंत जातिभेद आहेत. तोवर जातिविशिष्ट साहित्य निर्माण होणार आहे. (त्यामुळे दलित साहित्य जातीविशिष्ट राहाणार आहे.) दलित साहित्याचे अस्तित्व राहाणार आहे.

—असे हे दलित साहित्य मराठी साहित्यात एक प्रचंड प्रवाह, किंबहुना भारतीय साहित्यात एक वेगळाच प्रवाह, आपल्या स्वतंत्र अशा जाणिवेच्या अस्तित्वाने घेऊन येत आहे. त्यामुळेच दलित साहित्य हे नागर साहित्य व ग्रामीण साहित्यापेक्षा वेगळे आहे.

दलित साहित्य दलितांच्या दास्यमय जीवनातील दु:खाच्या वेदना सांगत आहे. जीवनातील दु:ख, अन्याय, अत्याचारांनी चिडून, समाजजीवन प्रस्थापित परंपरेविरुद्ध, गुलामगिरी - दास्याविरुद्ध, अस्पृश्यतेविरुद्ध, उच्चनीच अशा जातिव्यवस्थेविरुद्ध, वर्णाश्रमधर्माची महति सांगणाऱ्यांविरुद्ध दलित साहित्य आपला आवाज उठवत आहे. समतेचा नव-समाज निर्माण करण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा आहे. आपले भवितव्य घडवणाऱ्या भविष्य काळाकडे त्यांची दृष्टि आहे.

आजहि अस्पृश्यता ठाण मांडून बसलेली आहे. आजहि दलितांच्यावर अन्याय, अत्याचार होतात. दलित आजहि शोषित आहे. पीडित आहे. म्हणूनच दलित साहित्याचे अस्तित्व आहे. यासाठीच दलित साहित्य पाहिजे आहे, असे माझे मत आहे. असेच विचार दलित साहित्यिकांनी पुन: पुन्हा आपल्या भाषणात, लेखात, व पुस्तकात मांडलेले आहेत. तेहि महत्त्वाचे आहेत. साहित्यिकांनी, रसिकांनी हे विचार वाचले पाहिजेत. त्यावरून त्यांना दलित साहित्य का पाहिजे, हे कळेल.

दलित साहित्य सामाजिक बांधिलकी मानते. दलित साहित्याच्या जीवनाशी निकटचा संबंध आहे. दलि साहित्याचा जन्मच जीवनातून झालेला आहे. दलित साहित्यिक जे जीवन भोगतो, जगतो व अनुभवतो त्याच जीवनानुभवाला त्याच्या कलाकृतीत आकार देतो. म्हणून दलित साहित्य हे जीवनवादी आहे.

वास्तविक दलित साहित्यिकच काय, पण सर्वच कला या जीवनातून जन्माला येतात. वाङमयकला ही जीवनावर आधारलेली आहे. जीवनाचा स्पर्श झाल्याशिवाय साहित्यनिर्मिती होऊच शकत नाही. मग तो दलित साहित्यिक असो, वा दलितेतर साहित्यिक असो. लेखकाच्या अनुभवातून, भावानुभवातून कलाकृतीची अभिव्यक्ति होते. आविष्कार होतो. या आविष्काराला, वाङ्मयीन कलेला आपण नाव देतो, कथा,

कादंबरी, काव्य वा नाटक. कोणत्याहि साहित्यिकाच्या कलाकृतीत जीवनाचे अस्तित्व हे मूळ असते. त्यातून वाङ्मय कलाकृतीचा जन्म होतो.

जीवनातून निर्माण होणारी साहित्यकलाकृति म्हटली की, त्यात जाणिवा आल्या, आशय आला, त्याला घाट-आकार आला. साहित्यिक कलावंत हा त्याच्या अनुभवाला जसा आकार देईल, रूप देईल, तसा त्याला आकार येईल. असेहि म्हटले जाते की, कुठले साहित्य हे व्यक्तीचे जीवन, त्याचे समाजजीवन व मानवी जीवन या तीन प्रवाहांच्या संगमातून ललित साहित्य निर्माण होते.

साहित्यिक हा दैनंदिन जीवनातील सुख-दु:ख, राग-द्वेष, चीड-संताप, विद्रोह-संघर्ष अशा जीवनात जगतो. असे जीवन अनुभवतो. तेच जीवन त्याच्या साहित्य कलाकृतीत आविष्कृत होते. साहित्य कला ही अशी समाजजीवनाच्या अंतरंगाशी, आतील ताण-तणावाशी, एकरूप झालेली असते. त्यातून निर्माण होणारी कलाकृति ही जीवनवादी, जीवनाशी बांधिलकी मानणारी असते. म्हणून दलित साहित्य हे सामाजिक बांधिलकी, जीवनाशी बांधिलकी मानते.

मध्यमवर्गातील साहित्यिकांचे वास्तव हे संकुचित असते. बंदिस्त खोलीसारखे असते. ते आपल्याच बंदिस्त खोलीत-विचारात बसून जीवनाकडे, प्रश्नाकडे पाठ फिरवू बसतात. म्हणूनच ते खऱ्या मोठ्या समाजापासून दूर राहातात. त्यामुळे ते माणसाच्या आशा-आकांक्षाला,त्यांच्या संघर्षाला महत्त्व न देता शैलीला, आकृतिबंधाला अधिक महत्त्व देतात. म्हणूनच गेल्या पन्नास-पाऊणशे वर्षांच्या मध्यमवर्गीय साहित्यिकांच्या अनुभवविश्वात कांहीहि बदल झालेला नाही. त्यांच्या अनुभवाचीच एक जात बनली. त्यामुळे त्यांच्या वाङ्मयात तोच तोचपणा भरून राहिलेला आहे. म्हणून ते निर्जीव वाटते. अशाच या मध्यमवर्गीय साहित्यिकांना त्याच्या वाङ्मयात आलेला तोच तोचपणा पाहून त्यांनी लैंगिक विकृति, पलायनवाद, शून्यवाद अशा नव्या मार्गाचा आश्रय घेताना दिसतात. पण त्याचे हे प्रयोगहि केविलवाणे वाटतात. अशा प्रयोगांमुळे त्यांचे साहित्य व समाजजीवन यात अंतर पडले आहे. दुरावा निर्माण झालेला आहे. असे लेखक आपल्याच वर्तुळात फिरत असल्याने त्यांनी साहित्याची वाढहि रोखली आहे, असे मला दिसते.

हे विचारात घेता दलित साहित्य हे जीवनाभिमुख आहे. ते सामाजिक बांधिलकी मानणारे आहे. म्हणूनच आशावादी आहे. परिवर्तनवादी आहे. ते समाजाशी अंतर्बाह्य नाते ठेवून आहे. असे हे दलित साहित्य जीवनाचा अभंग भाग बनलेला आहे.

## दलित साहित्यात व्यक्ति व समाज

दलित लेखकाची कलाकृति ही व्यक्तीची असली तरी ती शेवटी व्यक्तीच्या जाती-समूहाची बनते. दलित कलाकृतीत आविष्कृत झालेले जीवनदर्शन हे त्या व्यक्तीचे

राहात नसून ते जीवनदर्शन त्याच्या जाति-समूहाचे बनते. ते व्यक्तिनिष्ठ राहात नाही, ते समूहाचे बनते. दलित व्यक्ति जे दु:ख भोगते, ते दु:ख त्याच्या जाति-समाजाचेच असते. त्यात व्यक्तीही समाजात विलीन होऊन, समाजरूप जातीरूप बनते. व्यक्ति ही व्यक्ति राहात नाही. ती समाज बनते. त्या व्यक्तीचे सुख-दु:ख त्या समाजाचे सुख-दु:ख बनते. त्या व्यक्तीच्या आशा-आकांक्षा त्याच्या त्या समाजाच्याच आशा-आकांक्षा बनतात. त्यामुळे दलित लेखकाची कलाकृति ही वास्तववादी, जीवनाभिमुख असते खरे तर दलित साहित्य हे जीवनाचे भाष्य करते.

## दलित साहित्याने निर्माण केलेले प्रश्न

दलित साहित्याने मराठी साहित्याच्या पुढे काही प्रश्न निर्माण केलेले आहेत. त्यातील महत्त्वाचा प्रश्न म्हणजे दलित साहित्याने मध्यमवर्गीय साहित्य समीक्षेलाच आव्हान दिलेले आहे. दलित साहित्य हे आशावादी परिवर्तनवादी आहे. दलित साहित्य हे सामाजिक बांधिलकी मानते. अशा वेगवेगळ्या भूमिकेवर दलित साहित्याने मराठी साहित्यापुढे प्रश्न निर्माण केलेले आहेत. त्यामुळे मराठी साहित्यात वादळ निर्माण केलेले आहे.

विशेषत: दलित साहित्याने मध्यमवर्गीय समीक्षेला समीक्षेच्या कसोट्यांनाच आव्हान दिलेले आहे. **'दलित साहित्याचे मूल्यमापन'** वाङ्मयीन कसोट्यावरच केले जाईल, असे जेव्हा मध्यमवर्गीय समीक्षक म्हणतो, तेव्हा पुढं असे अनेक प्रश्न निर्माण होतोत की :—

(१) त्या वाङ्मयीन कसोट्या कोणत्या ? (२) त्या वाङ्मयीन कसोट्या कशा निर्माण झाल्या ? (३) त्या वाङ्मयीन कसोट्या भारतीय वाङ्मयातून जन्माला आल्या का पाश्चात्त्य वाङ्मयातून त्या आयात केल्या ? (४) वाङ्मयीन कसोट्या कालमानाप्रमाणे बदलतात का ? का त्या चिरकाल-चिरंतन स्वरूपाच्या आहेत ? (५) वाङ्मयीन कसोट्या जर बदलल्या तर त्या कुठल्या काळात, कुठल्या परिस्थितीत बदलतात ? (६) समीक्षकांच्या साहित्यमूल्यमापनाच्या कसोट्यांचा 'साचा', 'माप', तयार करून तर ठेवलेल्या नाही ना ? जर तो 'साचा', 'माप' तयार असेल तर त्या कसोट्यांचा 'साचा' कोणता ? आणि त्या कसोट्यांचा साचा असेल, तर कोणत्या कसोट्या साहित्यांच्या मूल्यमापन करतात ?

असे एक का अनेक प्रश्न समोर निमाण होतात. त्यांची उत्तरे मध्यमवर्गीय साहित्य समीक्षकाला द्यावी लागणार आहेत. नाहीतर दलित साहित्याच्या विरुद्ध पांढरपेशीनिर्मित कसोट्यांची ढाल उपयोगी पडणार नाही. याचा विचार त्या समीक्षकांना करावा लागेल.

वास्तविक मध्यमवर्गीय समीक्षक ज्यांना शुद्ध वाङ्मयीन कसोट्या म्हणतात,

त्या शुद्ध कसोट्या नसून, त्या मध्यमवर्गी कसोट्या असतात, असे अनेकदा उघड होते. साहित्य हे जीवनाचा एक भाग आहे. साहित्य हे माणसाच्या अनुभवातून निर्माण होते. खरं तर साहित्य कलाकृतीत जन्म प्रथम होतो. त्यानंतरच समीक्षेचा — टीका-मूल्यांचा जन्म होतो. हे मूलतः विचारात घेऊनच दलित साहित्याची समीक्षा करावी लागेल. मध्यमवर्गीय समीक्षकाला दलित साहित्याच्या मूळ गाभ्याशी-मूळ आत्म्याशी एकरूप व्हावे लागेल  दलित साहित्याच्या कलाकृतीच्या तळा-मुळाशी, त्यांच्या दलित जाणिवेशी समरस व्हावे लागेल. दलित साहित्याची मूळ प्रेरण, प्रवृत्ति व प्रकृति समीक्षकाला जाणून, समजून घ्यावी लागेल. दलित लेखकांचे जीवन, त्याच्या सभोवतालचे जीवन, वातावरण, दलित लेखकाच्या अंतरमनातील ताण-तणाव, व त्याच्या दलित समाजाच्या अंतरमनातील ताण-तणाव हे सर्व समीक्षकाला समरसतेने समजून, उमजून घ्यावे लागेल. तेव्हाच दलित साहित्याची समीक्षा अर्थपूर्ण होऊ शकेल. अगोदरच ठरविलेल्या, बनवलेल्या वाङ्मयीन कसोट्यांच्या 'साचात' मापात बसवून दलित साहित्याचे मूल्यमापन करता येणार नाही.

मध्यमवर्गीय समीक्षकाला दलित लेखकाची संवेदनशीलताच समजली नाही; समजत नाही. आपल्या संवेदनातून दलित साहित्यिक आपली जिवंत, रसरशीत, उत्कट अशी कलाकृति निर्माण करतो. ती कलाकृति त्याच्या अनुभवाचा उत्कट आविष्कार ठरते. हीच दलित साहित्याची खरी कसोटी आहे.

## दलित नाटक

आजकाल दलित रंगभूमि, दलित नाट्य ॲकेडेमी, दलित थेटर, दलित रंगमंच, अशा संघटनातील दलितांतील नाट्य कलावंतांनी प्रामुख्याने दलित लेखकांची नाटके रंगभूमीवर आणलेली आहेत. इतर दलित साहित्याच्या तुलनेने पहाता एकूण दलित नाटककार व त्यांची नाटके कमी दिसतात. वास्तविक दलित नाट्याची परंपरा, दलित नाट्य-कलावंतांची परंपरा पहाता दलित नाटक झपाट्याने, वेगात पुढे यावयास आजचा काळ अनुकूल आहे.

मराठेशाही दलित शाहिरांची शाहिरी गाजली. दलित शाहिरांची शाहिरी ही संगीतासह संवाद करते. अभिनय करते, तो एकपात्री नाट्य प्रयोगच. म्हणा ना ! अशा दलित शाहिरांची दलित नाट्याला परंपरा मिळू शकते- त्याच्याप्रमाणे मराठेशाहीतील व तत्पूर्वीच्या काळातहि तमाशा व लावणीकारांची परंपरा आजपर्यंत चालत आलेली आहे. दलित लावणीकारांच्या, लावणीतील संवादात्मक 'खटके' 'सवाल-जबाब' हे लावणी वाङ्मयात प्रसिद्ध आहेत. दलित तमासगीर, अभिनयासह तमाशा फडान याच सवालजबाबातून रंगवून हजारो प्रेक्षकांना जागीच खिळवून ठेवण्याची किमया करतो, व आजहि करीत आहे. मात्र दलित तमासगीर, लावणीकार, वगकार, फार्सकार कलावंतांनी

सामाजिक स्वरूपाचे, आर्थिक प्रश्नावरील वग-नाट्य तमाशा-फडात, कनातीत बहारदारपणे वठवून दाखवलेले आहे. हजारो प्रेक्षक चित्त एकवटून असे वग-नाट्य, फार्स पहात, ऐकत बसलेले असतात.

दलित सोंगाड्याचा उत्स्फूर्तविनोद प्रसिद्धच आहे. दलित वगकाराचे वग व वग-नाट्यहि प्रसिद्धच आहे. वगनाट्य हे मुक्तनाट्य आहे हे दलित तमासगिरांचे मूळ वैशिष्ट्य आहे.

डॉ. बाबासाहेब आंबेडकरांच्या प्रारंभीच्या कालखंडातील सामाजिक व राजकीय चळवळीचा प्रचार व प्रसार प्रभावीपणे दलित समाजातील सामाजिक जलसेकारांनीच केला. या सामाजिक जलसेकारांनी आपल्या सामाजिक जलशात-फार्स, मुक्तनाट्य (सामाजिक प्रश्नावर) प्रभावीपणे केलेले आहे. किसन फागूजी बनसोडे हे नाट्य-कलेच्या अर्थाने पहिले दलित नाटककार होत.

मध्यमवर्गीय नाटककारांनी निर्माण केलेल्या कोंडीतून बाहेर पडून दलित नाट्याला आपला स्वतंत्र मार्ग काढावा लागला. त्यासाठी दलित नाट्याला परंपरा मोठी आहे. त्यातून दलित नाट्याने आपले नाट्य वेगळ्या रूपात, (फॉर्ममध्ये) वेगळ्या आशयाने मुक्तनाट्य उभे करावे लागेल. मग ते दलित मुक्तनाट्य गावच्या चावडीत उभे करावे लागेल, किंवा शहरातील चौकातहि उभा करता येईल. तीच खऱ्या अर्थाने 'उघडी रंगभूमि' (ओपन थेटर) होऊ शकेल. जत्रा-उरसात उघड्यावर पलित्याच्या टेंभ्याच्या उजेडात उभा राहणारा दलितांचा गावरानी तमाशा हा एक उघड्या रंगभूमीचा प्रकार होय. अशी नवीन फॉर्मचा-रूपाचा दलित नाट्याने आपलंसं केल्याशिवाय मराठी नाट्याची कोंडी त्याला फोडता येणार नाही, अशी ही कोंडी फोडण्यास दलित-नाट्यास मोठ्या परंपरेचा आधार आहे, असे मला वाटते.

## दलित साहित्यापुढील प्रश्न

प्रत्येक कलेच्या क्षेत्रात विशिष्ट काळानतर आपोआप मर्यादा (Limitation) येतात, प्रश्न पुढे उभा राहातात. दलित साहित्याच्याहि पुढे असे काही प्रश्न उभे राहण्याची शक्यता आहे. अर्थात दलित साहित्याचे वयोमान सुमारे तीस एक वर्षांचे आहे. साहित्य प्रवाहाच्या जीवनात तसा हा काळ कमीच आहे. दलित साहित्याचा प्रवाह आताच कुठे जोरदारपणे आपल्या वाटेने, वळणाने चालला आहे. त्याच्या चालीला, गतीला विशिष्ट स्थळी, विशिष्ट स्थानकावर यायला, अद्याप-आणखी कालावधि लागणार आहे. तेव्हा त्याचे स्वयंप्रकाशित स्वरूप अधिक तेजाने उजळून निघेल, या दृष्टीने विचार करण्यातच दलित साहित्यापुढे पडणाऱ्या मर्यादा, त्याच्यापुढे येणारे प्रश्न, याचा आत्मशोध घेणे आवश्यक आहे.

कलावंत आपली कलाकृति निर्माण करता करता काही काळानंतर आपोआपच

न कळत आपणच आपल्या कोडीत अडकून पडतात. त्यातच तो गुंततो. अशा परिस्थितीत कलावंताने स्वत:भोवती कोड्या चिंतनशील मनाने फोडण्याने त्याचा पुढचा मार्ग खुला होतो. मग त्याच्या हातून वेगळ्या घाटाची, रंगाची, गंधाची कलाकृति निर्माण होऊ शकते. या दृष्टिकोनातून दलित साहित्याने विचार केला पाहिजे.

दलित साहित्याचे अनुभव व त्यातून निर्माण होणारी अभिव्यक्ति यात काही काळानंतर 'तोच-तोचपणा' येण्याची शक्यता असून, त्यातून ते साहित्य एकमुखी होण्याची दाट शक्यता असते. भीति असते. याची जाणीव आता दलित साहित्यिकांनी ठेवली पाहिजे.

कुठल्याहि वाङ्मय प्रवाहात सुरुवातीचा 'ताजा' 'नवा' आविष्कार उठून दिसतो. पुढे पुढे काळ जातो. तेव्हा त्या वाङ्मय प्रवाहात 'तोच-तोचपणा' येण्याची शक्यता असतेच. तसा पाश्चात्त्य वाङ्मयात, काळ्या-निग्रो वाङ्मयात आणि भारतीय भाषातील नागर वाङ्मयातहि तोच-तोचपणा आलेला दिसतो. तसाच तो दलित साहित्यातहि येण्याची शक्यता आहे.

—अर्थात् दलित साहित्यिक तोच-तोचपणा निर्माण होणारी कोडी फोडण्याचा आपल्या नवीन वाङ्मयीन कलाकृतीद्वारे प्रयत्न करीत आहेत. व्यक्ति तितक्या प्रकृतीप्रमाणे, ज्याच्या त्याच्या व्यक्तित्वातून, त्याच्या त्याच्या मनोपिंडाप्रमाणेहि दलित साहित्य निर्माण झाले आहे व होत आहे. आता दलित साहित्यिकांतहि अतंर्मुखता आलेली आहे. त्यामुळे ते आणि त्यांच्यातील नवी पिढी सखोल, उत्कृष्ट रसरसीत आणि कलात्मक असे वाङ्मय लिहू लागले आहेत. तरी देखील त्यांच्यापुढे येणाऱ्या मर्यादांना (लिमिटेशन्सना) त्यांना तोड द्यावे लागणार आहे. आपली कलाकृति ताजी, टवटवीत, कशी राहील आणि ती चिरंतन, चिरकालीन कशी टिकेल त्या दृष्टीने पावले टाकावी लागतील असे मला वाटते.

त्यातच दलित लेखक हे वेगवेगळ्या पोटजातीच्या-समाजाच्या थरातून आलेले आहेत. ते आपापले अनुभव लिहीत आहेत. ते त्यांना लिहू द्या. त्याचे सर्व जीवनानुभव वाङ्मयात येऊ द्या. तोच तोचपणा येण्याच्या भीतीने त्यांचे वेगवेगळे जीवन-अनुभव लिहिण्याची ऊर्मि, स्फूर्ति याला पायबंद बसू नये. त्यांना त्यांच्या वाटेने, वळणाने, जाऊ द्या. त्यामुळेच मराठी साहित्य त्यांच्या आशयाने, त्यांच्या मायबोलीने समृद्ध होऊ द्या.

## वेगवेगळी दालने

—आज मराठी साहित्यात नागर साहित्य, ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, अशी वेगवेगळी दालने दिसतात. आजच्या समाजव्यवस्थेत ही दालने अपरिहार्य आहेत. नागरी साहित्य हे मूळ मध्यमवर्गीय अनुभवांवर आधारलेले आहे. त्यांच्यात निर्माण झालेल्या प्रश्नांना त्यांच्या अनुभवातून स्थान मिळते. नागर साहित्यिकांची

लेखणी ग्रामीण जीवनातील प्रश्नाकडे वळली नाही. आणि ज्यांची वळली त्यात वास्तवतेपेक्षा कल्पनेचाच अधिक पाया दिसतो. म्हणून आज ग्रामीण भागातील जीवनात वाढलेले, जगलेले, ग्रामीण जीवनात अनुभव घेतलेल्या ग्रामीण लेखकांची पिढी आपल्या वास्तव अनुभवाला साहित्य कलाकृतीचे रूप देऊ लागली आहे. दलित साहित्य हे नागरी व ग्रामीण प्रवाहापेक्षा वेगळे आहे. दलित साहित्याची वैशिष्ट्ये या अगोदर आपल्याला सांगितली आहेतच. जातीय पद्धतीच्या समाजव्यवस्थेत जन्माला आलेला, वाढलेला, साहित्यिक जेव्हा आपल्या वास्तव अनुभवाला प्रामाणिकपणे वाङ्मयीन रूप-आकार देतो, तेव्हा नागर, ग्रामीण व दलित अशांचे वेगवेगळ्या रूपात (फॉर्ममध्ये) व आदर्शात (नॉर्ममध्ये) येणे, रूपांतर होणे अपरिहार्य असते.

जातीय पद्धतीच्या समाजरचनेत जसा जसा बदल होत जाईल, तसा तसा समाज समपातळीत येऊ शकेल, आणि त्याबरोबर त्यांच्या वाङ्मयीन आविष्कारातही बदल होत जाईल. आणि वाङ्मयातील वेगवेगळ्या प्रवाहांतील अंतरही कमी कमी होन जाईल असे मला वाटते.

आज झपाट्याने काळ बदलत आहे. बदलत्या काळाबरोबर समाज व्यवस्थेतहि बदल होत आहेत. विशेषत: औद्योगिक क्रांतीने यांत्रिक युगाच्या वेगवान रेट्याने जातीय व्यवस्थेच्या समाजरचनेवर सारखे आघात होत आहेत. या होणाऱ्या आघातामुळे जातीय पद्धतीतून, वर्गपद्धतीचा जन्म होऊ, लागला आहे. यांत्रिकीकरणाच्या आघाताने जात लयाला जाऊन, त्यातून नवा वर्ग निर्माण होत आहे. याचे प्रत्यंत शहरीकरण झालेल्या समाजात अधिक दिसते. शहरात जातीच्या ऐवजी वर्ग निर्माण होत आहेत. कामगार वर्ग, मजूर वर्ग, असे वर्ग प्रामुख्याने पुढे येत आहेत. या वर्गात त्यांच्या दैनंदिन जीवनातल्या प्रश्नामुळे वर्गीय प्रश्न निर्माण होत आहेत. ते सोडविण्यासाठी वर्गीय भूमिकेतून वर्गीय लढ्याची पुढची पावले टाकली जात आहेत. अशा वर्गातून निर्माण होणारा साहित्यिक लेखक, आपल्या अनुभवांना वाङ्मयात आकार देताना, तो नागर, ग्रामीण, दलित याचे अस्तित्व विसरून वर्गीय भावनेतूनच आपले साहित्य निर्माण करील. आणि आपलं मूळचं अस्तित्व तो विसरून जाईल. यांत्रिक युगामुळे ही शहरात प्रक्रिया येऊ घातलेली आहे ते आपल्याला विसरून चालणार नाही. त्यामुळे नागर, जातीय, दलित हे प्रवाह आपोआप वर्गीय दृष्टीमुळे, वर्गीय भावनेमुळे एकमेकांजवळ येतील असे दिसते. जमिनीच्या संबंधात झालेल्या वेगवेगळ्या कायद्याने ग्रामीण भागातही नवीन वर्ग निर्माण होऊ लागला आहे. जमिनीच्या संबंधातील कायद्याच्या अंमलबजावणीमुळे ग्रामीण भागात जमिनीचे कूळ, जमिनीतला भूमिहीन मजूर, व जमिनीचा मालक असे आर्थिक पायावर आधारलेले वर्ग आज पुन्हा येत आहेत. हे वर्ग आपापले आर्थिक प्रश्न, वा जमिनीच्या संबंधातील प्रश्न सोडविण्यासाठी वर्गीय भावनेतून एकत्र येतात. त्यासाठी वर्गीयदृष्टीतून संघर्ष करतात. लढे देतात. या अशा जमिनीच्या कायद्याचा

वर्गीय दृष्टींच्या संघर्षाचा ग्रामीण भागातील खेड्यांतील जातिव्यवस्थेवर आघात होत आहे. विशेषत: गावाला एकच विहिरीचा-पाणवठा, गावाचा पाझर तलाव, गावाला आलेला तळ्याचा पाण्याचा पाट, कालवे, मोठ्या गावात म्युनिसिपालिटीने व नळाने केलेला पाणीपुरवठा, गावची एकच स्मशानभूमि, या अशा नवीन योजनाबद्ध सुधारणांमुळे स्थानात घट्ट बसलेली जात शिथिल होत आहे. स्थानातील 'जात' कमी कमी होत आहे. आणि त्याच बरोबर ग्रामीण भागात वेगवेगळ्या मार्गाने आलेल्या यांत्रिक सुधारणांमुळे, यांत्रिकीकरणामुळे मनातील जातही कमी कमी होत चालली आहे. आजचे यांत्रिक युग व ग्रामीण भागातील नवे कायदे, जातीय पद्धतीच्या समाजाला कार्यपद्धतीकडे रेटत नेत आहेत. अर्थात ग्रामीण भागातील या प्रक्रियेला अधिक वेग, अधिक गति येणे आवश्यक आहे.

—ग्रामीण भागात निर्माण होत असलेल्या नवीन वर्गातून लेखक निर्माण झाले तर ते आपल्या साहित्यकलाकृतीतून आपल्याला जीवनातील अनुभवाचा आकार देणार, देत राहणार. अशा साहित्यिकामुळे व साहित्यामुळेही नागर, ग्रामीण व दलित साहित्यप्रवाह एकमेकाच्या जवळ येतील. कालांतराने एकमेकांत मिसळतील असे मला वाटते. मी मराठी साहित्याच्या वेगवेगळ्या क्षेत्रात दीर्घकालीन साहित्य सेवा केलेली आहे. कथा, कादंबरी, ललित लेख व वेगवेगळ्या विषयांवर मी वैचारिक स्वरूपाचे लेखनही केलेले आहे. माझ्या दीर्घकालीन साहित्य-सेवेत खऱ्या साहित्यिकाची श्रद्धा-निष्ठा आहे. माझ्या जीवनात साहित्य-सेवेला मोठे स्थान असून, साहित्य लेखन हा माझ्या जीवनाचा एक भाग आहे. एक साहित्यिक म्हणून 'आयडेंटिटी'—ओळख जपण्याचा, सांभाळण्याचा मी माझ्या जीवनात आटोकाट प्रयत्न केलेला आहे. अशी मी मराठी साहित्याची दीर्घकालीन सेवा केली आहे म्हणूनच एक साहित्यिक म्हणून येथे होणाऱ्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीसाठी उभा राहण्याचा निर्णय घेतला आणि मी निवडूनहि आलो, याचे श्रेय मी आपल्याला दिले आहेच.

—आता माझ्या निवडीने 'दलित साहित्य व इतर नागर व ग्रामीण साहित्य यांच्यात समन्वय साधला जाईल का ?' 'यांच्यातील अंतर कमी होईल का ?' असेही प्रश्न आहेत.

—मला साहित्यिक मतदारांनी मते देऊन या साहित्य प्रवाहातील अंतर कमी झाले पाहिजे, हे नागर, ग्रामीण व दलित साहित्य-प्रवाह एकमेकांच्या जवळ आले पाहिजेत, त्यांच्यात समन्वय साधला पाहिजे, अशीच त्यांची इच्छा मला दिसते. ती बरोबर आहे. अर्थात आजच्या काळाच्या दृष्टीने, काळाच्या ओघात दलित साहित्य, नागर साहित्य व ग्रामीण साहित्य यांतील अंतर कमी व्हावे, व त्यांच्या समन्वयाची आज गरज आहे, असेच मला वाटते. माझ्या निवडीने होणार असेल तर मी त्याचे स्वागतच करीन. मी आताच आपल्याला सांगितले की, औद्योगीकरणामुळे शहरीकरणात जातिपद्धतीवर आघात होऊन, वर्गपद्धती येत चालली आहे. त्याचबरोबर ग्रामीण

भागातहि यांत्रिकीकरणाच्या प्रवेशाने, व जमिनीच्या संबंधात आलेल्या कायद्यामुळे परंपरागत जातींच्या चौकटीवर आघात होऊन, नवीनच वर्ग निर्माण होत आहेत. ही औद्योगिकरणाची प्रक्रिया, यांत्रिकीकरणाचा प्रभाव पडून नवीन वर्ग निर्माण होत आहेत. त्यामुळे वेगवेगळ्या साहित्यिक प्रवाहात आपोआप समन्वय साधू शकेल. अर्थात या प्रक्रियेत वेग व गति पाहिजे मी आगोदर सांगितले आहेच.

नागर, ग्रामीण व दलित साहित्यात साधण्यासाठी दलित साहित्याकडे पाहाण्याची दृष्टी बदलणे जरूर आहे. दलित साहित्याकडे आज वाङ्मयाबाह्य दृष्टिकोनातून पाहिले जाते. तसेच दलित वाङ्मयाकडे पूर्वग्रह दृष्टीने पाहण्याची दृष्टीही बदलणे जरूर आहे. दलित साहित्यिकांची संवेदना समजून घेतली पाहिजे दलित साहित्याकडे 'दलित जाणिवेतून' पाहिले पाहिजे. दलित साहित्य, व दलित साहित्यिकांना त्यांच्या मूळ भूमिकांसह समजून घेतले पाहिजे. ही अशाच स्वरूपाची पावले टाकल्यास या साहित्य प्रवाहात एकमेकांबद्दल जवळीक निर्माण होऊ शकेल असे मला वाटते.

## लोकपरंपरा व राजपरंपरा

आपल्या मराठी मुलखात मला दोन संस्कृति दिसतात. एक लोकपरंपरा असलेली लोकसंस्कृति आणि दुसरी राजसंस्कृति. लोकसंस्कृति म्हणजे या भूमीतल्या मूळ भूमि-पुत्राची, इथल्या मूळ रहिवाशांची म्हणजेच दलितांची संस्कृति ही लोकसंस्कृति होय. लोकसंस्कृतीने लोककला दिल्या. त्यात लोकसंगीत, लोकनाट्य व लोककला हे दिले. या लोककला दलितांच्या जीवनातून आलेल्या आहेत. या लोककला वेगवेगळ्या कालखंडात आलेल्या राजपरंपरांमुळे कधी दडपल्या जात होत्या, तर कधी त्या पुन्हा बहरून वर येत होत्या. असे हे दलित लोककथेतील कोंब-धुमारे फुलत वर आले तेव्हा तेव्हा मराठी साहित्याला नवी झळाळी, नवं तेज आलं होतं. तेव्हा— १३ व्या शतकात दलित कवि व पुढच्या काळात दलित शाहीर पुढे आले. त्यांनी मराठी साहित्यात भर घातली. १९ व्या शतकात महात्मा जोतिबा फुले आले, त्यांनी आपल्या विचारवाणीने व कृतिशील पावलांनी मराठी जीवनाला, साहित्याला वेगळाच प्रकाश दिला. २० व्या शतकात डॉ. बाबासाहेब आंबेडकर आले व त्यांनी आपल्या विचार-सिद्धांतांनी व ग्रंथ-संपत्तीने साहित्यात मोलाची भर घातली. स्वातंत्र्योत्तर काळात दलित साहित्य जन्माला आले आणि त्यांनी मराठी साहित्यात एक वेगळाच प्रवाह सुरू केला.

—अशा या दलित लोककलेतील फुटलेल्या धुमाऱ्यानी, उमललेल्या नव्या पालवीने त्या त्या काळात मराठी साहित्याला वेगळीच झळाळी दिली आहे.

दलितांच्या लोकसंस्कृतीतून, लोककलेतून अशी झळाळी झाली की ती झळाळी मध्यमवर्गीय परंपरा आत्मसात करण्याचा प्रयत्न करते. हे आजच्या मध्यमवर्गीय साहित्य कलेत प्रकर्षाने दिसून येते. ती साहित्यकलेत, नाटकात, संगीतात, मुक्तनाट्यात

ही चांगली गोष्ट आहे. विशेषत: लोकनाट्य, लोकसंगीत, मुक्तनाट्य, नवकाव्य या दलितांच्या लोककला आहेत. आज त्या लोककला मध्यमवर्गीय साहित्याने आत्मसात केल्या आहेत. त्यामुळेच मध्यमवर्ग व दलितवर्ग या लोककलामुळे एकमेकांच्या जवळ आले आहेत. त्याच्यात या कलामुळं जवळीक निर्माण झालेली आहे. भावी काळात या लोककलातून या वर्गा-वर्गात जवळ येण्याचे सामंजस्य अर्थपूर्ण होईल, अशी मी आशा करतो. अशा काळात विशिष्ट जातीचे (समाजाचे) बंधन दूर ठेवून व्यापक जीवनाशी बांधिलकी शोधली पाहिजे. भावी कला आविष्काराची ही दिशा राहील असे मी भाकीत करतो. भावी काळात हे दोन प्रवाह जीवनाच्या शोधात एकत्र येतील असा माझा विश्वास आहे. मला हे वाटते म्हणून मी आशावादी आहे.

## नवीन लेखकवर्ग

आता दलितातील वेगवेगळे थर आपापले अनुभव, कथा, काव्य, कादंबरी व आत्मकथेतून लिहू लागतील.

ग्रामीण भागात शिक्षणाचा प्रसार होत आहे. शिक्षण घेऊन नवी पिढी निर्माण होत आहे. ही नवी पिढी आपापल्या जीवनानुभवाला साहित्यात आकार देत आहे. त्यातून नवे अनुभव, नवे जीवन आपल्यापुढे येत आहे. त्यात त्याच्या आशा-आकांक्षा प्रतिबिंबित होऊ लागल्या आहेत.

झोपडपट्टीत राहणारा लेखक, आपले अस्सल जीवन-अनुभव लिहून आपल्यापुढे ठेवत आहे.

—असा हा नव्या जाणिवेने, नव्या दृष्टीने लिहिणारा नवीन लेखक वर्ग पुढे झपाट्याने येत आहे.

—यातील लेखकांचे साहित्य, कोणते टिकाऊ ? कोणते टाकाऊ ? कोण ठरविणार ?

असा मोठा प्रश्न निर्माण होतो. म्हणून अशा नवीन लेखक वर्गानं टीकाकाराची तमा न बाळगता लिहावे, भरपूर लिहावे, त्यानेच मराठी वाङ्मय समृद्ध होणार आहे असे माझे मत आहे. एवढेच मी वेगवेगळ्या प्रवाहातून येणाऱ्या नवीन लेखकांना माझ्या स्वानुभवातून सांगतो की, त्यांनी लिहावे. भरपूर लिहावे.

: १९८५

# शंकर पाटील

साहित्यप्रेमी बंधुभगिनीनो,

नांदेड इथं भरणाऱ्या या ५९ व्या मराठी साहित्य संमेलनाचं अध्यक्षपद मला देऊन आपण जो माझ्यावरचा लोभ व विश्वास व्यक्त केलात, त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहे. मराठी सारस्वताच्या सेवकाला त्याच्या चाहत्यांकडून मिळणारा हा एक मोठाच मान असतो तो मान आपण मला दिलात आणि गेल्या तीस-पस्तीस वर्षांची माझी साहित्यसेवा रुजू करून घेतलीत, यात जसा आनंद वाटतो, तशी धन्यताही. आणखी असंही वाटतं—वतन नष्ट होऊन पाटिलकी गेलेल्या या पाटलाला आपण नवं वतन दिलंत ! केवळ शाब्दिक आभार मानून मी आपला उतराई कसा होऊ ? मी एवढंच सांगतो-या वतनाला मी जागीन आणि आपण बहाल केलेली ही 'पाटिलकी' आयुष्यभर सांभाळीन. त्यात कुचराई करणार नाही आणि कसला कमीपणाही येऊ येणार नाही. त्यासाठी आपल्या सर्वांच्या साक्षीनं कविश्रेष्ठ मर्ढेकरांच्या शब्दातच आण घेतो—

*आण तुझ्या लालसेची*
*आण लोकांची अभागी*
*आण माझ्या डोळियाची*
*पापणी ठेवीन जागी.*

मित्रहो, मराठवाड्याच्या ज्या नगरीत शब्दांचा आणि ग्रंथांचा हा उत्सव सुरू आहे, ती आपली ही नांदेड नगरी अनेक थोर संतांच्या, साक्षेपी संशोधकांच्या, त्यागी व निष्ठावंत देशभक्तांच्या प्रतिभाशाली कवीच्या आणि नरहर कुरुंदकरांसारख्या सर्वस्पर्शी विचारवंतांच्या वास्तव्यानं पुनीत झालेली ही एक भाग्यनगरी आहे ! या थोर विभूतीचं स्मरण करून त्यांना नम्रतापूर्वक अभिवादन करणं, हे मी माझं कर्तव्यच समजतो. पूज्य आणि आदरणीय अशा कितीतरी विभूती डोळ्यापुढं येतात. नांदेडची ही भूमी चक्रधर स्वामीच्या पदस्पर्शानं पवित्र झाली आहे आणि शिखांचे दहावे गुरू श्रीगुरू गोविंदसिंह यांची समाधीही याच भूमीवर आहे संस्कृत-मराठी शब्दांची प्रचंड सेनाच जे आपल्या

पदरी बाळगून होते, ते वामनपंडित इथलेच. विपुल काव्यरचना करून आपल्या कीर्तनांनी जनजागरण करणारे संत दासगणू महाराज इथलेच. विष्णू कवीही इथलेच. प्राच्यविद्या-संशोधनात कानोले रमले ते इथंच. दे. ल. महाजन इथलेच. कुरुंदकरांचं नाव मनात येताच भालचंद्र महाराज कहाळकरांची आठवण येतेच आणि महामहोपाध्याय यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे यांची आठवण झाल्याशिवाय कशी राहील ? पूज्य स्वामी रामानंदतीर्थ आणि मराठवाडा हे तर समीकरणच झालंय ! मराठवाड्याच्या शैक्षणिक, सामाजिक, आर्थिक आणि सांस्कृतिक जडणघडणीत त्यांचा वाटा सिंहाचा आहे ! मराठवाडा जो संयुक्त महाराष्ट्रात सामील झाला तो त्यांच्या पुण्याईनंच कुरूंदकरांच्या शब्दात बोलायचं तर 'या काळात मराठवाड्यात पूज्य स्वामी रामानंदतीर्थ हे अढळपणे संयुक्त महाराष्ट्राच्या बाजूने उभे राहिले. त्यांनी बिनशर्त महाराष्ट्रात सामील होण्याची भूमिका घेतली. या प्रश्नावर स्वामीजीनी आपली सर्व प्रतिष्ठा पणाला लावली होती. त्यांच्या प्रभावाखाली क्रमानं मराठवाडा संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबद्दल एकमुखी झाला.' (**माडखोलकरांचा पत्रव्यवहार १८ मार्च १९७४**) मित्रहो, कुरुंदकरांच्या या शब्दात स्वामीजीचं कर्तृत्व आणि महाराष्ट्रावरचा त्याचा लोभ या दोन्ही गोष्टी व्यक्त होतात. त्यांच्यामुळं महाराष्ट्राचा नकाशा विस्तारला, शब्दांचे खडक फोडून विचारांच्या खाणी खणणाऱ्या कुरुंदकरांबद्दल काय बोलू ? आजच्या या सोहोळ्यात ते नाहीत, हे मनाला भावतच नाही. काल परवापर्यत खळाळणारा हा चैतन्याचा ओघ अवचित लुप्त झाला आणि मराठवाड्यासह संयुक्त-महाराष्ट्राला चटका लावून गेला. मिणमिणत्या किती ज्योतीना त्यांनी तेल पुरवलं असेल ? या साहित्यक्षेत्रात नव्यानं फुटणाऱ्या किती धुमाऱ्यांना त्यांनी खतपाणी घातलं असेल ? त्यांच्या जाण्यानं हे नवे अंकुर तर कोमेजलेच; पण मराठवाड्याच्या एकूण सर्व सांस्कृतिक जीवनाचा पाया ढासळल्यासारखा झाला आहे. त्यांच्या जागत्या स्मृतीनीच तो सावरला जाईल, कारण कुरुंदकर आज देहानं आपल्यात नसले, तरी त्यांचे विचार ग्रथरूपानं मागे राहिले आहेत. ती संजीवनी तुम्हा आम्हाला आधार देत राहील, दिशाही दाखवील या प्रसंगी या सर्व थोर विभूतीचं आदरपूर्वक स्मरण करून त्यांच्या पवित्र स्मृतीस नम्रतापूर्वक वंदन करतो.

संमेलनाच्या या महत्पदावर आरूढ होण्यापूर्वी मनातली एक खंत बोलून दाखवल्याशिवाय राहवत नाही. मराठीतील काही थोर साहित्यमहर्षी हे पद न भूषवताच गेले. त्यांची आठवण मनात दाटून येते. या पदाचा मान आपण त्यांच्या हयातीत त्यांना द्यायला हवा होता, पण दुर्दैवानं तो योग जुळून आला नाही, तसं घडलं नाही. त्यामुळं त्यांच्या कीर्तीत भर पडली असती असं मुळीच नाही, उलट या पदाची प्रतिष्ठा वाढली असती आणि मुख्य म्हणजे आपल्याला कर्तव्यपूर्तीचं समाधान वाटलं असतं, आज वाटणारी खंत वाटली नसती. त्यांच्या ऋणातून थोडं फार तरी उतराई होता आलं असतं. या प्रसंगी त्यांची अगत्यपूर्वक आठवण करून त्यांच्या स्मृतीस वंदन करणं हेही

एक माझं परम कर्तव्यच मानतो. निदर्शक, द्योतक म्हणून यांपैकी काही मोजकीच नावं घेतो, पहिलं नाव मनात येतं ते नवकाव्याचे प्रवर्तक बा. सी. मर्ढेकर यांचं ! कालक्रमानं हे नाव घेत नाही. मराठी नवकाव्याला आणि समीक्षेला त्यांनी जी दिशा दाखवली ती प्रथम आठवली, एवढंच. ही नावं जशी ओठावर येतील तशी घेतो—प्रज्ञावंत, तपस्वी संशोधक वि. का. राजवाडे, संतसाहित्यावर विपुल लेखन करणारे ज. र. आजगावकर, महाराष्ट्रसारस्वतकार वि. ल. भावे, पुरोगामी विचारसरणीचे, काळापुढं धावणारे राजारामशास्त्री भागवत, विशेषणांची आवश्यकताच नसणारे विनोबा भावे, सानेगुरुजी, मराठी साहित्यातील विनोदाचं दालन संपन्न करणारे चिं. वि. जोशी, पत्रकार, साहित्यिक व चोखंदळ समीक्षक असा त्रिवेणी संगमच असे प्रभाकर पाध्ये आणि मराठी कवितेला श्रीमंत करणारे कविवर्य बा. भ. बोरकर. जी काही नावं चटकन ओठावर आली त्यांचा नामोच्चार मी केला; पण याशिवाय आणखी जी थोडी नावं तुमच्याही मनात असतील, त्यांचाही उल्लेख गृहीत धरावा. या सर्व साहित्यमहर्षींच्या पवित्र स्मृतीस मी मानाचा मुजरा करून आपण बहाल केलेल्या या पदाच नम्रतापूर्वक, सविनय स्वीकार करतो.

मित्रहो, संमेलनाचं हे अध्यक्षपद भूषवताना माझ्या जडणघडणीत ज्यांचा वाटा आहे, त्यांच्या स्मृती मनात उचंबळून आल्याशिवाय कशा राहतील ? ज्या गावी मी जन्माला आलो, त्या मातीत मी खेळलो-बागडलो, ती माझी पांढरी— म्हणजे कोल्हापूर जिल्ह्यातील पट्टणकोडोली हे माझं जन्मगाव आणि तिथंच जवळ असलेलं आणखी एक लहानसं खेडं— तारदाळ. या दोन खेड्यात माझं बालपण गेलं. या दोन गावांनी मला भरभरू दिलं. माझ्या साहित्याचा बराचसा पोषणरस इथलाच ! माझ्या कथा कादंबरीतली आणि चित्रपट—लोकनाट्यातली माणसं इथलीच. अनेक रूपं घेऊन माझ्या साहित्यात अवतरणारा निसर्ग याच दोन गावातल्या परिसरातला. आणि माझी पात्रं बोलतात ती बोलीही त्यांचीच. ही नुसती भाषाच त्यांची नव्हे, तर त्या बोलीतून व्यक्त होणाऱ्या भावभावनाही काही प्रमाणात त्यांच्याच. 'बाळाई' नावाच्या आईनं मला जन्म दिला असला, तरी माझ्यातल्या कलावंत शंकर पाटलाचा गर्भ वाढला, तो या दोन गावांच्या पोटात ! माझ्या साहित्याची नाळ या दोन गावांना जोडलेली आहे— पट्टणकोडोली आणि तारदाळ. पट्टणकोडोली ही जन्मदाती आई आणि तारदाळ ही माझी मावशी आहे. बालपणी साहित्यिक शंकर पाटलाचं लालनपोषण हे या मावशीनं केलं. एका अर्थानं माझ्या साहित्याच्या त्या माताच आहेत ! त्यांचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करून पुढं वळतो.

मूल वर्षभरातच चालू लागतं; पण एखादा बालकवी सोडल्यास, लेखक आपल्या पायांवर उभा राहतो विशी पंचविशीत. याच वयात मीही पावलं टाकू लागलो. साहित्याच्या ज्या वाटेनं मी निघालो होतो, त्या वाटेवर मला अनेक सहप्रवासी भेटले. ते भेटले नसते तर माझी ही वाटचाल अशी झालीही नसती. कदाचित, ती मध्येच मी

सोडूनही दिली असती; म्हणून तीस-पस्तिस वर्षांच्या वाटचालीनं आज जो पल्ला मी गाठला आहे, त्यात या सहप्रवाशांचंही स्थान मोठं आहे. माझ्या जडणघडणीत त्यांचाही वाटा आहे. लेखक म्हणून जेव्हा मी घडला जात होतो. त्या काळात म्हणजे १९५० च्या आगेमागे, एका चांगल्या वर्तुळात राहण्याचं भाग्य मला लाभलं. त्यात रणजित देसाई, प्रल्हाद वडेर, व. ह. पिटके, कवी शांताराम रामचंद्र, आणि विजया राजाध्यक्ष ही मंडळी होती. आम्ही सगळे उदयोन्मुख लेखक होतो आणि सत्यकथेचे भक्त होतो. १९५० चा तो काळ म्हणजे नवकाव्य आणि नवकथेच्या उदयाचा, भरभराटीचा काळ. त्या वाऱ्यानं आम्ही सगळेच झपाटलो होतो. गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले यांच्या कथा, बा. सी. मर्ढेकर, विंदा करंदीकर, मंगेश पाडगावकर आणि इंदिरा संत यांच्या कविता सत्यकथेत वाचायला मिळाल्या म्हणजे आमची मनं किती प्रफुल्ल व्हायची ! दर महिन्याची 'सत्यकथा' केव्हा येते, ती कधी हाती पडते, आणि केव्हा आम्ही वाचतो, असं, होऊन जायचं ! मग त्यावर किती चर्चा झडायच्या ! त्या काळात बडोद्याहून प्रसिद्ध होणाऱ्या चित्र्यांच्या 'अभिरुची'बद्दलही हेच घडायचं; आणि काही प्रमाणात मुंबईहून प्रसिद्ध होणाऱ्या 'साहित्य' या नियतकालिकाबद्दलही. ही वाङ्मयीन स्वरूपाची नियतकालिकं जशी आम्ही आतुरतेनं वाचत होतो, त्यावर चर्चा करत होतो, तीच गोष्ट इंग्रजीतल्या कथा कादंबऱ्यांची.

इथं एक उल्लेख आवर्जून केला पाहिजे आणि तो म्हणजे मोहन जायदे यांचा. जायदे यांचं इंग्रजी वाचन अफाट. ग्रीक नाटककारांपासून ते चालू घडीच्या नोबेल पारितोषिक-विजेत्या लेखकाचं ताजं साहित्यही त्यांनी वाचलेलं असे. वडेरांच्यामुळं त्यांचा मला परिचय झाला. हा योगच बलवत्तर ! या जायद्यांनी इंग्रजी साहित्याचं आणि पर्यायानं जागतिक वाङ्मयाचं एक प्रचंड मोठं भांडारच मला खुलं करून दिलं. एक नवोदित कथाकार म्हणून मी काय वाचावं याचा विचार करून एकेक ग्रंथ ते मला देत गेले. एकेक नवा कथाकार मी वाचू लागलो इंग्रजी एक भाषा अशी आहे, की ज्या भाषेत साऱ्या जगातल्या श्रेष्ठतम कलाकृती वाचायला मिळतात. देशोदेशीचे कथाकार मला परिचयाचे झाले. जागतिक साहित्याच्या भांडाराचा दरवाजा जायदे यांनी मला खुला करून दिला, आणि खेळण्यांच्या ढिगात रमून जाणाऱ्या मुलासारखा मी या पुस्तकांच्या जगात स्वतःला हरवून गेलो. वाचायला पुस्तकं मिळाली; चर्चेला लेखक-मित्र लाभले. माझ्या या उमेदवारीच्या काळात मी किती वाचलं, त्यावर किती बोललो विचारांची किती देवाणघेवाण केली, हे आज आठवतं आणि मी स्वतःला भाग्यवान समजतो. माझ्या साहित्यसाधनेला हे सारं उपकारक ठरलं. दृष्टी यायला मदत झाली. घुसळून घुसळून नवनीत शोधत राहिलो. हाती येईल ते गोळा केलं. माझ्या जडणघडणीत त्या काळातल्या या माझ्या मित्रांचाही वाटा आहे.

यातलं काही श्रेय जसं या साहित्यप्रेमी मित्रांचं, तसंच, आणि खरं तर थोडं

अधिकच, सत्यकथेच्या श्री. पु. भागवतांचंही. 'कारवान' ही माझी पहिली कथा 'सत्यकथे'त प्रसिद्ध झाली आणि त्यानंतर अन्य सर्व प्रलोभनं नाकारून, सवंग प्रसिद्धीचा मोह टाळून, निष्ठेनं व जाणीवपूर्वक किमान पाचदहा वर्ष तरी फक्त 'सत्यकथे'त आणि 'सत्यकथे'तच लिहीत राहिलो हेतू हा, की जिथं केवळ वाङ्मयीन गुणवत्तेवरच आपलं साहित्य स्वीकारलं अगर नाकारलं जातं, तिथं ते प्रसिद्ध व्हावं. मी निष्ठेने लिहीत राहिलो. माझ्या प्रत्येक कथेवरचा भागवतांचा अभिप्राय मला काही ना काही देत गेला. दर महिन्याची सत्यकथा वाचून त्यातल्या साहित्यावर मी माझ्या प्रतिक्रिया भागवतांना कळवत असे आणि तेही न कंटाळता मल लिहीत असत. वर्षानुवर्षे चाललेल्या आमच्या या पत्रव्यवहारातून आणि त्यात व्यक्त होणाऱ्या त्यांच्या प्रतिक्रियांतून मला खूप काही मिळालं, इतकं की जन्मभर न सरणारं ! श्री. पु. भागवत व सत्यकथा याच्या कर्जाचं इतकं मोठं डबोलं माझ्या डोक्यावर आहे, की या जन्मात तरी मला ते फेडता येईल असं वाटत नाही !

ज्या कालखंडात मी लिहू लागलो, त्याचाही माझ्या लेखनावर ठसा आहे. नवकाव्य व नवकथा यांच्या विकासाचा तो कालखंड. त्यातल्या गाडगीळांच्या कथेशी माझं जवळचं नातं जडलं. व्यक्तिमनांच्या कप्प्यात डोकावून पाहण्याची प्रेरणा काही प्रमाणात त्यांच्या कथेनंच मला दिलीय असं वाटतं. ग्रामीण कथेलाही अनेक परिमाणं लाभू शकतात, विविध पातळींवरून अनुभव घेता येतो, नवे नवे कथात्मक घाट शोधता येतात या आणि यासारख्या ज्या अनेक गोष्टी मला दिसत गेल्या, त्यांचे श्रेय काही प्रमाणात नवकथेच्या त्या कालखंडाला आणि गाडगीळांच्या कथेला आहे; कारण मला प्रेरणा मिळाल्या त्या तिथून. याचा अर्थ ज्या वाटेनं ते गेले, तीच वाट मी चोखाळली असं नाही. त्यांच्याकडून प्रेरणा फक्त घेतल्या आणि माझ्या वाटा मी शोधत राहिलो. माझ्या प्रकृतिधर्मानुसार ज्या ज्या वाटेनं जाणं मला सुकर वाटलं, त्या त्या वाटेनं पुढं गेलो. वाट सापडल्याचा एक आनंद असतो. त्या आनंदात चालत राहिलो; आणि त्या चालण्यातलाही आनंद घेत गेलो...लेखनाचा प्रवास ही एक आनंदयात्रा असते !

प्रत्येक लेखक हा आपल्या मागच्या पिढीच्या खांद्यावर उभा असतो असं म्हणतात. त्या दृष्टीनं विचार करता मी कुणाच्या खांद्यावर उभा आहे ? आमच्या आधीची पिढी म्हणजे फडके—खांडेकरांची. त्या कुळीनं मला आपल्या खांद्यावर घेतलंय असं वाटत नाही. त्यांच्या लेखनाची जात वेगळी; माझी वेगळी. त्यांच्या प्रेरणा निराळ्या, माझ्या निराळ्या. वाङ्मयाबद्दलच्या आमच्या कल्पनाही भिन्न. नवकथाकारांचा विचार करावा; तर एका अर्थानं मी त्यांचा समकालीनच. दोन चार वर्षांचा फरक सोडल्यास नवकथेच्या मुख्य प्रवाहात मी सामीलच झालोय. मग मी कुणाच्या खांद्यावरून आलो ? वर जो मी माझ्या इंग्रजी वाचनाचा उल्लेख केला, त्याचा विचार या संदर्भात करावा लागेल. स्थलकालाची बंधनं कलेला नसतात; म्हणून मुद्दाम सांगतो—ज्यांच्या

खांद्यावरून मी आलो, ती पिढी इथली नाही; ती आहे परदेशातली—एक नाही, अनेक देशांतली. त्यात मला देशोदेशीचे लेखक दिसतात. खांदाही एक नाही, अनेक खांदे ! पिढीही एक नाही; अनेक पिढ्या. त्यात चेकाव्ह आहे; पण अमेरिकेचा ओ' हेन्री नाही. डोस्टाव्हस्की आहे; पण पुढं प्रचाराकडं वळलेला टॉलस्टॉय नाही. नाहीत हे सोडल्यास, आहेत ते थोडे नाहीत. त्यांत अरस्किन कॉल्डवेल आहे. काफ्का आहे, कामू आहे, अलबर्तो मोराबिया आहे, स्टाइन बेक आहे, हेमिंग्वे आहे, अनातोल फ्रान्स आहे, सार्त्र आहे. किती नावं घेऊ ? या सगळ्यांनी आपल्या समर्थ खांद्यांवर मला उभं केलं. त्याचा एक मोठा लाभ मला असा झाला—साहित्याचं क्षितिज विस्तारलेलं दिसलं आणि जगातल्या उत्तमोत्तम कलाकृतीची उंचच उंच शिखरं पाहायला मिळाली. ती पाहिल्यामुळं जे सुचेल ते लिहिण्यात अर्थ नाही हे कळलं. आपल्या हातून काही खुजं लिहून होऊ नये असं वाटू लागलं शिखरांची ती उंची कायम धाक दाखवत राहिली आणि क्षितिजाच्या त्या विस्तारात जीवनाची व्यापकता दिसू लागली. माझ्या जडण घडणीत मी वाचलेल्या या जागतिक साहित्याचाही वाटा आहे. या वाङ्मयानं माझ्या जाणिवा समृद्ध झाल्या आणि नवे आदर्श समोर आले. फुलपाखराच्या पहिल्या उड्डाणावर कथा लिहिणाऱ्या 'लियाम ओ फ्लॅहर्टी'नं कथेची सूक्ष्म जाण दिली; तर झिंया पॉल सार्त्रच्या 'इंटिमसी' या कथा संग्रहातील 'दी वॉल', 'दी रूम' या आणि यासारख्या कथांनी जीवनाचा सगळा तळ ढवळणाऱ्या मोठ्या जिवाच्या कथा म्हणजे काय, हेच प्रत्ययास आणून दिलं. कथेचा घाट म्हणजे एक ठरीव साचा नव्हे, हेही कळलं. फाउलीन आणि एच्. ई. बेट्स यांची कथेची समीक्षा वाचून कथा म्हणजे काय, काव्यात्मता ही केवळ शब्दांत कशी नसते आणि सूचकतेत केवढी ताकद असते याचीही जाण आली. ती आल्याने एक नवी दृष्टी मिळाली. या दृष्टीला काही नवा आशय, नवा घाट दिसू लागला. लेखक म्हणून मी घडलो हा असा. श्रीदत्तात्रयांनी चोवीस गुरू केले होते असं म्हणतात. मी माझे गुरू मोजले नाहीत. त्या संख्येला महत्त्व नाही. मधमाशीसारखं मिळेल तेथून मध मी गोळा करत आलो आणि राणीमाशीवर जशी तिची निष्ठा असते, तशी निष्ठा माझ्या कथेवर ठेवून लिहीत राहिलो.

माझी जडणघडण थोडी विस्तारानं सांगितली ती याचसाठी, की नव्या पिढीचे जे होतकरू, तरुण लेखक इथं असतील, त्यांना याचा काही उपयोग झाल्यास तो व्हावा. निदान एवढं तरी कळावं—यशाची वाट दिसते इतकी सोपी नसते; ती पुष्कळ खडतर असते. या वाटेनं जाऊन शिखर गाठायचं तर तयारी पुष्कळ करावी लागते. वाचन, लेखन, चिंतन आणि विचारांची देवाणघेवाण सातत्यानं करावी लागते. ध्यास आणि अव्यभिचारी निष्ठा असाव्या लागतात. लेखन हा काही फुरसतीचा छंद नव्हे. साहित्य आणि साहित्य हाच ज्याचा श्वास बनतो, तोच खरा साहित्यिक होतो ! कोणतंही यश हे त्याचं देणं दिल्याशिवाय लाभत नसतं. हे देणं देण्याची आणि

त्यासाठी खडतर वाटचालीची ज्यांची तयारी आहे, त्यांनीच या मार्गाला वळलेलं बरं; मात्र एकदा पाऊल उचलल्यावर जिद्द सोडू नका. अपयशानं खचू नका. तुमची कथा, कविता 'साभार परत' आली तरी दुखावले जाऊ नका. आपलं साहित्य का परत यावं, याचा अंतर्मुख होऊन विचार करा. त्यात आव्हान घ्यायला शिका. पडलं तरी पुन्हा उठून जो स्वार होतो, त्यालाच घोड्यावर बसता येतं, हे विसरू नका. आणि दुसरं असं की हाडाचा संपादक हा नव्या आणि चांगल्या साहित्याच्या नेहमीच शोधात असतो. तुम्ही लिहावं ते नवं आणि चांगलं असेल, तर ते आपोआप उचललं जाईल. मी सांगतोय हे माझ्या अनुभवाचे बोल आहेत. हा अनुभव माझ्या उमेदवारीच्या काळात जसा मला आला, तसा तो तुम्हालाही यावा एकूण मराठी साहित्याचा आढावा वगैरे न घेता, मी आपल्याशी म्हणजे नव्या उगवत्या पिढीशी हा संवाद करत आहे, कारण मराठी साहित्याचं उद्याचं भवितव्य हे तुमच्या हाती आहे. तुम्हीच त्याचे धनी आहात. या साहित्याचं काही बरवाईट करणारे हात तुमचे आहेत, प्रस्थापितांचे नाहीत. मराठी साहित्याचा एक सेवक, हितचिंतक म्हणून मला तुमच्याशी हितगूज करण्यात काही फायदा आहे. काही अपेक्षाच करायची झाली, तर ती तुमच्याकडंच मी करू शकतो; म्हणून या माझ्या अध्यक्षीय भाषणात नव्या पिढीला प्राधान्य देऊन हा सूर मी इथं लावलाय.

तरुण मित्रांनो, हा सूर मी लावलाय खरा. तो लावून मी तुमच्याशी बोलतोय, कानगोष्टी करतोय, हेही खरं; पण तुम्ही काही चांगलं, नवीन, प्रयोगशील लिहिलं, तर ते पाठवणार कुठं ? ते अगत्यानं छापणार कोण ? त्याबद्दल आस्था आहे कुणाला ? आज मराठीत शेकडो मासिकं आहेत. प्रतिवर्षी त्यात नवी भरही पडत आहे. दिवाळी अंकाचं तर पीक उदंड येतं; पण वाङ्मयीन स्वरूपाची किती मासिकं त्यांत आढळतात ? चुकून जी एक दोन दिसतात त्यांना त्यांच्या स्वतःच्या मर्यादा आहेत. त्या दृष्टीनं विचार करता आजची नवी पिढी एका विचित्र कोडीत सापडली आहे.

आम्ही एका अर्थानं भाग्यवान ! आमच्या वेळी नियतकालिकं फार थोडी होती. आजच्या तुलनेनं अगदी नगण्य; पण त्यात 'सत्यकथा', 'अभिरुची' आणि मुंबईहून प्रसिद्ध होणारं 'साहित्य' अशा तीन मासिकं नव्या लेखकांना, त्यांच्या चवीनं नवीन प्रयोगांना आस्थेनं जवळ करणारी होती. शिवाय पु. शि. रेगे यांच्या 'छंद' सारखे काही प्रयत्न अधूनमधून सुरू असायचे. त्यामुळं नव्यांच्या साहित्याला एकाहून अधिक प्रसिद्धि-माध्यमं उपलब्ध होती. त्यांविना अडण्याचं काही कारण नव्हतं. आणखी एक मोठा फायदा असा होता- साहित्य जगात 'सत्यकथा' आणि त्यासम नियतकालिकांना एक मोठी प्रतिष्ठा लाभली होती. त्यामुळं कोणा नवीन लेखकाची कथा किंवा कविता अशा नियतकालिकेत प्रसिद्ध झाली रे झाली, की रसिक चोखंदळ वाचक, समीक्षक, जाणकार संपादक या सगळ्याचं लक्ष नव्या लेखकाच्या पहिल्या वहिल्या साहित्यकृतीकडं वेधलं जायचं. अगदी अल्पावधीत त्याचं नाव व्हायचं. छापून येण्यासाठी व्यापारी

मासिकांच्या कलानं नको ते त्याला लिहावं लागायचं नाही. लेखक म्हणून आपल्या विकासाच्या वाटा त्याला मोकळ्या असायच्या. आपल्या कलेशी प्रतारणा करण्याची, तडजोडीची, मनाविरुद्ध मुरड घालण्याची त्याच्यावर पाळी येत नसे. कलावंत मनाला क्लेश देणारा हा जाच आणि सक्तीही होत नसे. ज्याला आपल्या निष्ठा जोपासायच्या आहेत, त्याला त्या जोपासता येत होत्या आणि आपल्या लेखनाचा विकास साधता येत होता. तशी मुभा होती. नव्या, प्रयोगशील वृत्तीच्या लेखकांना हे केवढं मोकळं, निरोगी वातावरण होतं !

आज त्याचा पूर्ण अभाव दिसतो. लेखकांच्या नव्या पिढीला हे अनुकूल आणि निरोगी वातावरण नाही. ज्यात प्रसिद्ध झाल्यानं रसिकांचं एकदम लक्ष वेधेल असं एकही मासिक नाही. योग्य दाद व चांगला प्रतिसाद देऊन नव्यांना उत्तेजन देणारा श्री. पु. सारखा संपादक नाही. मित्रहो, उद्याच्या भवितव्याचा विचार करणाऱ्या माझ्यासारख्या साहित्यप्रेमी माणसाला ही खरी चिंता वाटते. आजच्या नियतकालिकांच्या जगातला हा सगळा व्यापारी झगझगाट बघितला, उत्तान श्रृंगारावर आणि पांचट, पसरट, ढोबळ विनोदावर बेतलेलं लेखन पाहिलं म्हणजे वाटतं नव्या, नव्या लेखन प्रयोगाला इथं कोण जवळ करणार ? समजा कोणी जवळ केलंच तर त्याकडं कोणाचं लक्ष जाणार ? खपाऊ मालाच्या ढिगात त्याला कोणाची दाद मिळणार ? अशा या जगात उमेदीचा नवा, प्रयोगशील लेखक आपलं 'सत्त्व' कसं आणि किती काळ टिकवणार ? कदाचित काळाच्या ओघात आपलं 'सत्त्व' सोडून त्या बाजारातच तोही मिसळून जाईल, ही शक्यताच अधिक दिसते. मग मराठी कथेचे किंवा मराठी कवितेचे भवितव्य काय या प्रश्नांचा विचार करतो कोण ? ती आच आहे कोणाला ? म्हणून आपल्या सर्वांच्या साक्षीनं हा प्रश्न मी उभा केलाय. ही गळचेपी आणि हा कोडमारा आपण फक्त उघड्या डोळ्यांनी बघत राहणार आहात का ?

याचं उत्तर आपण एक मुखानं 'नाही' असं देऊन यातून काही मार्ग काढायला हवा. एखादा कायम स्वरूपाचा आर्थिक निधी आपण उभारू शकलो तर तो कोणा जाणत्या संपादकांकडं सुपूर्त करून एखादं वाङ्मयीन मासिक सुरू करता येईल असं वाटतं. हा एक मार्ग मला दिसतो. हा प्रश्न आपल्या मनात घोळत राहू द्या, आमच्या घटक संस्थांमध्येही त्यावर चर्चा होत राहतील. आपण सर्वजणच प्रयत्नशील राहू. इच्छा असेल तिथं मार्ग सापडेल, असं म्हणतात. आपण अशी इच्छा तर करू या.

चालू वर्ष हे महाराष्ट्राचं रौप्यमहोत्सवी वर्ष आहे आणि शासकीय पातळीवरून ते आपल्या परीनं साजरंही केलं जात आहे. उचित असे काही संकल्पही शासनानं सोडले आहेत. एक साहित्यप्रेमी आणि मराठीचा अभिमानी म्हणून साहित्यसंमेलनाच्या या व्यासपीठावरून मला काही गोष्टी सुचवाव्या वाटतात. विस्तार-भयास्तव त्या मी सूत्ररूपाने मांडणार आहे.

१. मराठी ही महाराष्ट्राची राजभाषा आहे ना ? मग मंत्रालयासह शासकीय कचेऱ्यांत मराठीचा अवलंब आपल्या दैनंदिन कामकाजात आणि पत्रव्यवहारात कितीसा केला जातो ? त्याचं प्रमाण किती टक्के आहे ? लिहिली जाणारी पत्रं, टिपण्या आणि शासकीय कचेरीतून प्रसृत केली जाणारी परिपत्रकं ही मराठीतच असायला हवीत ना ? पण वस्तुस्थिती अशी दिसत नाही. आपल्या राज्यकर्त्यांनी आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांनी सर्व कामकाज मराठीतच चालायला हवं असा दंडकच घालायला हवा. हट्टानं केव्हातरी हा निग्रहच करायला हवा. या रौप्यमहोत्सव वर्षात शासनानं हे निश्चयपूर्वक करावं अशी माझी कळकळीची विनंती आहे. त्यासाठी वाटल्यास प्रत्येक कार्यालयात एक खास अधिकारी नेमावा किंवा ही जबाबदारी कोणा एका अधिकाऱ्यावर सोपवावी. त्याशिवाय हे कार्यवाहीत येणार नाही; होणारी उपेक्षा थांबणार नाही.

२. मराठी साहित्याची सर्वांगीण ओळख व्हावी. निदान कथा, कादंबरी, काव्य, नाटक, ललितलेख, चरित्र, आत्मचरित्र, प्रवास वर्णन आणि विचारप्रधान साहित्य या सर्व वाङ्मयप्रकारांतील निवडक ग्रंथ तज्ज्ञांच्या सहाय्यानं एकत्र करावेत आणि अशा सुमारे निवडक शंभर ग्रंथांच्या स्वस्त आवृत्ती अगदी अल्प किंमतीत उपलब्ध करून देण्याची योजना तयार करावी. ही योजना साहित्य संस्कृती मंडळाकडून कार्यान्वित आणावी.

३. ज्ञानाची गंगा खेड्यापर्यंत जावी, ग्रामीण भागातही साहित्याची आवड निर्माण व्हावी, तिथल्या सुप्त कलागुणांनाही वाव मिळावा, ग्रामीण विभागातून पुढं येणाऱ्या नवोदित लेखकांना पोषक वातावरण लाभावं, त्यांच्या विचारांना चालना मिळावी यासाठी 'गाव तिथं ग्रंथालय' ही योजना आखली जाऊन ती अमलात आणावी एकदम मोठ्या प्रमाणात हे शक्य नसेल, तर टप्प्याटप्प्यांनी असा कार्यक्रम आखून जिथं शक्य असेल तिथं ही सुरुवात करावी. निदान याला पर्याय म्हणून 'फिरतं वाचनालय' तरी सुरू करावं.

४. मराठी साहित्यातील ज्या ग्रंथांना मानदंड असं म्हणता येईल, उदा. आचार्य जावडेकरांचा 'आधुनिक भारत', लक्ष्मीबाईची 'स्मृतिचित्रे', गोडसे भटजीचा 'माझा प्रवास', 'एकच प्याला' सारखी गडकऱ्यांची शोकांतिका, जी. ए. कुलकर्ण्यांचा 'हिरवीराने' हा कथासंग्रह, अशा निवडक ग्रंथांचा परभाषेत अनुवाद करावा. विशेषत: आपलं हे साहित्य इंग्रजीत जावं, म्हणजे जागतिक साहित्याच्या पातळीवर मराठीलाही स्थान मिळेल. त्याशिवाय जगाचं लक्ष मराठीकडं वळणार नाही. त्याशिवाय 'अमृता ते पैजा' आपण जिंकणार कसे ? ज्ञानदेवांचे बोल खरे ठरायला आणि त्यांच्या आत्मविश्वासाचा प्रत्यय यायला संधी तर मिळायला हवी. माझी खात्री आहे—शरणकुमार लिंबाळे याचं 'अक्करमाशी' इंग्रजीत गेलं तर जागतिक कीर्तीचे थोर थोर साहित्यिक आणि समीक्षक थक्क होतील ! शासनानं यात जरूर लक्ष घालावं. साहित्य संस्कृती मंडळाला अशी

कितीतरी कामं करता येतील.

५ चांगल्या ग्रंथांना दरवर्षी पारितोषिकं देण्याची एक चांगली परंपरा शासनानं गेली अनेक वर्ष सुरू ठेवली आहे. त्याबद्दल आम्हाला आनंदही आहे, पण रुपयाचं मूल्य तेच राहिलं नाही, हे लक्षात घेऊन त्या प्रमाणात पारितोषिकांच्या रकमेत वाढ केलेली नाही, ती केली जावी आणि या पूर्वीच्या एका संमेलनाध्यक्षांनी—कै. पु. शि. रेगे यांनी—सुचवल्याप्रमाणं पारितोषिकपात्र ग्रंथांच्या प्रत्येकी किमान हजार पाचशे प्रती शासनानं खरेदी करून विद्यालयं, महाविद्यालयं, प्रशिक्षणसंस्था, ग्रामीण भागातील ग्रंथालयं, यांना विनामूल्य पुरवावीत, म्हणजे चांगल्या ग्रंथांचा प्रसार केल्याचं श्रेयही मिळेल आणि त्या ग्रंथांचे प्रकाशक व लेखक यांना थोडाफार आर्थिक लाभही होईल.

६. शासन चांगल्या ग्रंथांना पारितोषिक देतं, चांगलं मुद्रण करणाऱ्या मुद्रकांनाही गौरवचिन्ह देऊन त्यांचा सन्मान करतं, चांगल्या नाटकांना, चित्रपटांनाही पारितोषिकं देतं; आणखी काही इतर कलांना आणि व्यवसायांना उत्तेजनार्थ पारितोषिकं दिली जातात; पण प्रकाशन व्यवसायाकडं शासनानं लक्ष दिलेलं नाही. नव्यांचं काही प्रसिद्ध करायचं तर प्रकाशक पुष्कळ वेळा धोका पत्करून ते करतो. त्यांनाही उत्तेजन मिळायला पाहिजे. तो एखादं हौसेनं पुस्तक काढतो आणि मुद्रकाला हवी ती संधी देतो. अशा वेळी शासन मुद्रकाचा सन्मान करतं; पण प्रकाशक मात्र दुर्लक्षित राहतो. तसा तो दुर्लक्षिला जाऊ नये, शासनानं त्यांचाही सन्मान करावा. उत्तम प्रकाशनासाठी उत्तेजन द्यावं. साहित्यप्रेमी प्रकाशकांना चालना मिळावी.

७. डॉ. केतकर यांचे ज्ञानकोशाचे खंड, चित्रावशास्त्र्यांचे प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन चरित्रकोश, दात्यांचे शब्दकोश आणि वाक्संप्रदाय कोश हे व असे काही महत्त्वाचे ग्रंथ आज दुर्मिळ झाले आहेत. ज्ञान व भाषा संवर्धनासाठी आणि एक मौलिक ठेवा कायम जपला—सांभाळला पाहिजे म्हणूनही या अशा दुर्मिळ, मौलिक ग्रंथांच्या शासनानं नव्या आवृत्ती काढायला हव्यात.

८. नागपूर विद्यापीठाच्या ७२ व्या दीक्षांत समारंभात प्रमुख पाहुणे म्हणून बोलताना डॉ. वि. भि. कोलते यांनी महाराष्ट्रातील विद्यापीठांतून मराठीची होणारी अवहेलना तपशीलवार विशद करून महाराष्ट्रात एक स्वतंत्र विद्यापीठ स्थापन व्हावं अशी जी मागणी केली आहे. तिचाच पुनरुच्चार मी करत आहे—एकजिनसी समाजाचं स्वप्नं साकार करायचं असेल, तर मातृभाषेच्या एकाच माध्यमातून एकाच प्रकारचं शिक्षण सर्वांना उपलब्ध होणं अगत्याचं आहे. त्यासाठी जनसामान्यांची भाषा हीच सर्व क्षेत्रांत, सर्व स्तरांवर शिक्षणाची भाषा झाली पाहिजे. महाराष्ट्रातील आजची स्थितिप्रिय विद्यापीठं आजच्या परिस्थितीत हे कार्य करू शकणार नाहीत. त्यासाठी सर्व विद्याशाखांतील, सर्व विषयांत, सर्व स्तरांवर मराठी माध्यमांतून शिक्षण देणारं व संशोधन करणारं एक स्वतंत्र मराठी विद्यापीठ स्थापन झालं पाहिजे. ज्ञानाच्या आणि विज्ञानाच्या क्षेत्रातील

मूलभूत संशोधन हाती घेण्याचा प्रयत्न ज्या भाषेत होतो, तीच भाषा ही ज्ञानाची भाषा होऊ शकते. आपली मराठी मायबोली ही ज्ञानाची भाषा करायची असेल, खऱ्या अर्थानं तिला वैभव मिळवून द्यायचं असेल, आपली राजभाषा म्हणून तिला सिंहासनावर बसवायचं असेल आणि महात्मा गांधीजीच्या भाषिक राज्याचं स्वप्न खऱ्या अर्थानं साकार करायचं असेल, तर महाराष्ट्रात मराठी विद्यापीठ स्थापन तर करावंच, शिवाय देशातल्या प्रत्येक राज्यात तिथल्या भाषेच्या माध्यमाचं स्वतंत्र विद्यापीठ स्थापन होणं आवश्यक आहे त्यातलं पहिलं पाऊल चालू रौप्य महोत्सवी वर्षात आपण उचलावं असं मी शासनाला आवाहन करत आहे.

९. मराठीचं अध्ययन— अध्ययन प्रभावी होण्याच्या दृष्टीनं इंग्रजीच्या धरतीवर 'मराठी अध्यापन शास्त्र संशोधन संस्था' शासनानं आता विनाविलंब काढायला हवी. मराठीच्या अध्यापनाला त्याशिवाय शास्त्रशुद्ध पाया लाभणार नाही आणि संशोधनाच्या सातत्याविना भाषेचे हे अध्यापनशास्त्र प्रगत होणार नाही.

१०. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ गेली काही वर्ष नवोदित लेखकांची शिबिरं आयोजित करत आहे. शिबिर भरवून आणि बौद्धिक घेऊन लेखक घडवता येतो असं मला वाटत नाही. दर वर्षी त्यावर खर्ची पडणारे हजारो रुपये केवळ वाया जातात- असल्या वांझ योजना आणि बेगडी उपक्रम हाती घेऊन अनाठाई उधळपट्टी करण्यापेक्षा ज्यांच्या पहिल्या पहिल्या साहित्यकृतीत धमक दिसते आणि उद्याचं आश्वासन जाणवतं अशा उमेदीच्या नव्या लेखकांना मोठ्या रकमांच्या शिष्यवृत्त्या देणं हे अधिक उचित ठरेल. ज्यांना काही स्थळांना भेटी देऊन किंवा काही काळ तिथं राहून, तिथल्या जीवनाचा अभ्यास करून काही विशेष लिहावसं वाटत असेल आणि अशा काही योजना पैशाविना हाती घेता येत नसतील, तर अशा नव्या-जुन्या लेखकांना चांगल्या शिष्यवृत्त्या देण्याचा विचार शासनानं जरूर करावा

११. एखाद्या लेखकाची शताब्दी जवळ आल्यावरच आपण जागे होतो आणि मग समित्या स्थापन करून घाईघाईनं कार्याला लागतो अशा लेखकांच्या वास्तूंची देखभाल सुरू होते. त्या वास्तूंची आठवण आधीच का करू नये ? मराठी आधुनिक कवीचे कुलगुरू असं ज्यांना मानण्यात येतं, ते 'केशवसुत', मराठी कादंबरीचे जनक हरिभाऊ आपटे, आद्य नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर, नाट्याचार्य देवल, ज्ञानकोशकार केतकर, नवकाव्याचे युगप्रवर्तक बा. सी. मर्ढेकर, श्रेष्ठ कवी आणि गीतकार ग. दि. माडगूळकर, कोकणातल्या एका घरात बसून शेकडो कथा लिहिणारे गुर्जर, हे आणि यासारखे आम्हांला आभाळाएवढ्या उंचीचे वाटणारे आमचे लेखक, शाहीर, कवी, नाटककार, पट्टीचे प्रज्ञावंत हे खरे आमचे आणि आमच्या महाराष्ट्राचे स्फूर्तिदाते. त्यांच्या वास्तू व वस्तू नीट जतन केल्या, त्यांची देखभाल केली, तर ती अवघ्या महाराष्ट्राला प्रेरणास्थळं ठरतील. महाराष्ट्राच्या रौप्यमहोत्सवी वर्षात हे घडून आलं

आणि शासनानं आमच्या शब्दप्रभूंच्या स्मारकांची योजना आखली आणि या वर्षात निदान पहिलं स्मारक उभारलं तरी आम्हाला धन्यता वाटेल. आमची मराठी अस्मिता सुखावून जाईल.

१२. महाराष्ट्रात इतर भाषेची अकादमी होऊ शकते आणि मराठीची का नाही ? यावर बोलण्यासारखं पुष्कळ आहे, पण तपशिलात न शिरता मी एवढंच सुचवतो—विश्वकोश आणि महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ यांचं विभाजन केल्यापासून आपसातील तंटे-बखेडे आणि कलहाशिवाय या साहित्य संस्कृती मंडळाने काय कार्य केल, याचा शासनानं अंतर्मुख होऊन विचार करावा आणि आता अधिक वेळ न गमावता ते लवकरात लवकर बरखास्त करावं आणि मराठी अकादमीची स्थापना करून लवकर कार्याला लागावं, हे शहाणपणाचं ठरेल. हा बारा कलमी कार्यक्रम मी जो शासनाला सुचवला आहे, त्यातल्या अनेक गोष्टी अकादमीकडं सोपवता येतील.

महाराष्ट्रात रौप्य महोत्सवी वर्षाच्या निमित्तानं शासनाकडून ज्या अपेक्षा कराव्या अशा वाटल्या, त्या मी मोकळ्या मनानं बोलून दाखवल्या. शासन त्याचा विचार करील अशी मी अपेक्षा बाळगतो. महत्त्वाच्या काही गोष्टी शासनाच्या कानी घालायच्या होत्या, त्यात तुमच—आमचं—साहित्यप्रेमी मडळीचं जसं हित गुंतलेलं होतं, तसं अवघ्या महाराष्ट्राचंही हित होतं, म्हणून हे सर्व बोलून दाखवलं. यासाठी साहित्याचा जो धागा मध्येच सोडून द्यावा लागला होता तो पुन्हा हाती घेऊन आपल्या जिव्हाळ्याच्या विषयाकडं वळतो.

एक कथालेखक म्हणून आजच्या मराठी कथेसंबधी मी काही बोलावं अशी साहजिकच आपली अपेक्षा असेल; पण चटकन डोळ्यात भरेल, आपलं लक्ष वेधून घेईल, अशी कथाच मला दिसत नाही. मग राहून राहून आठवतो तो नवकथेच्या वैभवाचाच काळ. १९६५ पासून हा पूर ओसरू लागला आणि १९७५ पासून तर तिचे काठ उघडेच पडलेले दिसतात. चांगल्या ताकतीच कथाकार पुढं आले पाहिजेत, प्रयोगशील वृत्तीनं नव्या वाटा धुंडाळल्या पाहिजेत, जीवनाच्या भिन्न भिन्न स्तरांतून लेखक पुढं आले, तरच नवा आशय, नवे घाट शब्दरूप घेऊ लागतील आणि कथेला नवा पूर येऊ शकेल. त्याचीच आपण वाट पाहू.

कथेचा प्रांत कोरडा असला तरी आत्मचरित्राचं शिवार गजबजलेलं दिसतं. गेल्या वीस वर्षात आत्मचरित्राच्या लेखनाला बहर आलेला दिसतो. चिंतामणराव कोल्हटकर, पांडुरंग चिमणाजी पाटील ते विश्राम बेडेकरांच्या 'एक झाड दोन पक्षी' या आत्मचरित्रापर्यत अनेक चांगली आत्मचरित्रं वाचकांना मिळाली त्यात विविधताही आहे. त्यात स्त्रियांची कामगिरी लक्षात घेण्यासारखी आहे. पाठ्यपुस्तक मंडळानं प्रसिद्ध केलेलं 'जीवनगाथा' हे राधाबाई शेवडे यांचा आत्मचरित्राचा उल्लेख आवर्जून करावासा

वाटतो. प्रत्येकाचं आयुष्यही एक कादंबरी असते, असं म्हणतात. तशा या एका अर्थानं कादंबऱ्याच आहेत. त्यामुळं वाचनीय तर ती आहेतच, पण त्यांत मोलाचा आत्मशोधही आहे. नियतीचा कठोर खेळ आहे.मानवी मनाचं आगळं दर्शन आहे. प्रचितीचे बोल आहेत. गहिरं दु:ख आहे. 'असं का ?' असा मनाला पडणारा प्रश्न आहे.....आणि असं पुष्कळच आहे. मी या आत्मचरित्रांचं स्वागत करतो आणि एवढीच इच्छा व्यक्त करतो, की आणखी अशी आत्मचरित्रं येत राहोत आणि जीवनातल्या तळागाळातील उपेक्षितांच्याही आत्मकथांना भाषा लाभो !

आणखी एका गोष्टीचंही मी मन:पूर्वक स्वागत करतो, ते म्हणजे दलित साहित्याचं ! डॉ. भालचंद्र फडके म्हणतात त्याप्रमाणे 'दलित लेखकांची आत्मकथने म्हणजे दु:ख भोगांच्या अभंग गाथाच !' मला तर तो दु:खांचा डोंबच दिसतो ! युगानुयुग सोसावी लागणारी वेदना आताशी तोड उघडून बोलू लागली आहे. रोज दोन वेळा आपल्यालाही भूक लागते; पण आपली भूक आणि या दलित बांधवांची भूक यात फार फरक आहे. शरणकुमार लिंबाळे आपल्या 'अक्करमाशी'त म्हणतात— 'रद्दी तागडीत जोगताना वाटायचं, रद्दीच्या पारड्यात आमची भूक ठिवावी. मग बघूया किती किलो वजन व्हईल या भुकेचं !' भुकेच्या वजनाची कल्पना कधी आपल्या मनाला शिवलीय ? तिला वजनच नाही तर ती कशी शिवणार ? आपलीही उपेक्षा होत असते; पण आपली प्रस्थापितांची उपेक्षा वेगळी आणि त्यांची होणारी उपेक्षा वेगळी. 'वापरलेल्या तिकिटावानी आमी पडलेलो असाचंय,' या एका वाक्यात व्यक्त होणारी उपेक्षा किती बोलून जाते ! असं हे उपेक्षित, जनावरांच्या गोठ्यागत दुर्लक्षित जीवन, आजवर भाषेलाच मुकलं होतं. शब्दांना वंचित होतं. त्याला शब्दरूप देण्यासाठी दया पवार, कोडवीलकर, शरणकुमार लिंबाळे, ज्योती लांजेवार, केशव मेश्राम, चेदवणकर, सोनकांबळे, यशवंत मनोहर अशी नव्या दमाची, नव्या उमेदीची तरुण लेखक मंडळी हाती लेखण्या घेत आहेत आणि आजवर आपल्याला अज्ञात असलेलं जीवन शब्दरूप घेऊन समोर येत आहे, याचा मला मनस्वी आनंद होत आहे. यातच मला उद्याचा मराठी बोलणारा, मराठी लिहिणारा 'डोस्टोव्हस्की' दिसतो आणि मराठीचा झेंडा त्यांच्याच खांद्यावर जगात फडफडताना दिसतो ! हे माझं सुखस्वप्न आहे. ते जर याची देही याची डोळा पाहायला मिळालं, तर त्यासारखा आनंद नाही.

या दलितसाहित्यानं मराठी साहित्यात मोलाची भर तर पडत आहेच; पण मराठी भाषाही श्रीमंत होत आहे. अर्थवाही किती नवे शब्द, नवे वाक्संप्रदाय, किती नव्या प्रतिभा यांची भर आपल्या भाषेत पडत आहे ! 'थुका गिळून जगणे', 'दाताचं पाणी पिऊन दिस काढणे' हे वाक्संप्रदाय किती बोलके आहेत! 'चूल माझ्या मस्तकावानी जळत होती', यातली प्रतिभा पाहा कशी अर्थवत्ता वाढवते. असंच आणखी एक वाक्य— 'माझे डोळे गळक्या छपरावानी गळत होते.' यावर काही भाष्य करायला

हवं ? हे सगळं इतकं पुरेस बोलकं आहे, की कोणी त्याची फोड करून सांगायला हवं असं नाही. मला तर त्यात काव्यात्मताही दिसते. 'माझे डोळे गळक्या छपरावानी गळत होते' असं म्हटल्यावर त्यातला नुसता अर्थच कळतो असं नाही. डोळ्यांपुढं सजीव, होऊन एक चित्र येतं. त्या चित्रातले करुण भाव दिसू लागतात. त्याचा स्पर्शही आपल्या काळजाला होतो. काव्याची भाषा ही प्रतिमांची असते. त्या अर्थानं त्यात काव्यही आहे. इतकं सगळं असूनही काही तथाकथित पांढरपेशी माणसं नाक मोडून बोलताना मला दिसतात. एकानं तर पत्र लिहून कळवलंय— अशा पुस्तकांच्या शेवटी शब्दांचे अर्थ द्यावेत किवा तळटिपा देऊन नवीन शब्द व वाक्संप्रदाय यांचे अर्थ द्यावेत—

काय म्हणावं अशा लोकांना ! मला वाटतं. हे साहित्य ते वाचतच नसावेत. कारण शब्दांचे अर्थ त्यांच्या वापरावर अवलंबून असतात. त्यांचा योग्य वापर केल्यास संदर्भानं त्यांचे अर्थ स्पष्ट होतात. माझी 'टिपिशन' नावाची एक कथा आहे. 'टिपिशन' हा शब्द शब्दकोशात नाही; पण मला आजपर्यंत त्यांचा अर्थ काय, असं विचारणारा कोणीही भेटलेला नाही. 'बघतो बघतो न्हाईतर लावतो टिपिशनच इयाच्या मागं,' असं बोलल्यावर आणखी काय कळायचं राहतं ? काही शब्द तर अगदी उलट अर्थानं वापरले जातात. माझे एक कोल्हापुरातील स्नेही काही कामासाठी पुण्याला आले होते. जेवण झाल्यावर आम्ही गप्पा मारत होतो. मध्येच मी त्यांना विचारलं, "आमचे रावसाहेब पाटील आपल्या परिचयाचे आहेत का ?"

त्यावर ते बोलले, "रावसाहेब ? अहो, काय सांगायचं आमचे अगदी जिवलग दोस्तच की ते ! चार दिवसांनी ते तर आमच्याकडं येतात, नाहीत तर आम्ही त्यांच्याकडं जातो. आमच्या दोघांत लई पार्टीशन आहे !"

आता हा 'पार्टीशन' शब्द कोणत्या अर्थानं आणि कसा वापरला पहा. माझा एक भाचा आहे एका खेड्यात. एकदा त्यांच्याकडं गेलो असता त्यांची पाच सहा वर्षाची दोन पोरं सारखा दंगा करत होती. हे पाहून मी भाच्याला म्हटलं, "काय रे हे, पोरांना काही वळणबिळण लाव" तो म्हणाला, "कशाचं वळण ! त्यांस्नी किती सांगा, ही पोरच लई टायफाईड हैत !"

'टायफॉईड' हे एका रोगाचं नाव असलं तरी मला त्यातून कळायचा तो अर्थ कळला. शब्दार्थाची गरज वाटली नाही. कोणाला तशी ती वाटू नये. तेव्हा नाक मुरडून बोलणारे काही बोलोत. शहाण्यांनी त्यांच्याकडं लक्ष देऊ नये. ज्या भाषेत दलित साहित्य लिहिलं जातं, ती भाषा त्या अनुभवांची आहे. त्या भाषेतच ते अनुभव व्यक्त झाले पाहिजत, आणि तसे ते व्हावेत त्यातच त्या अनुभवांची आणि त्यांच्या लेखनाची सार्थकता आहे.

*मित्रहो, वडिलकीच्या नात्यानं आणि दलित साहित्याचा एक चहाता म्हणूनही* एक इशारा मला द्यावासा वाटतो—आपण जे पाहिलं, भोगलं *आणि तेच लिहिलं*

म्हणजे भागलं असं समजू नका. त्यात एक मोठा धोका संभवतो. आपल्या या अनुभवांची खाण संपली की पुढं काय, हा प्रश्न उभा राहतो. आपल्या आत्मकथनापुरतं हे ठीक आहे, पण कथा, कादंबऱ्या, नाटकं, काव्य यांना हे पुरणार नाही. त्यासाठी विविध पातळीवरून अनुभव घ्यायला आपण समर्थ झालं पाहिजे. जीवनातले हे प्रसंग किंवा अनुभव तुमच्या कलात्मक अनुभवांची निमित्तं होऊ लागली तरच तुमच्या अनुभवांची रसीद तुटणार नाही. तुमची खाण ओस पडणार नाही. कलावंतांचं संवेदनाशील मन अखंड जागं असलं म्हणजे चांगल्या बांधणीच्या ट्रँझिस्टरसारखं जीवनातल्या अनुभवांच्या लहरी तुम्ही 'कॅच' करू शकाल. त्यासाठी आपल्या संवेदनाचा 'बॅंड' मात्र चांगला असावा लागतो आणि तो जाणीवपूर्वक जोपासावाही लागतो. ही जोपासना अखंड वाचन—चिंतनानं जशी करता येते, तशीच ती तुमच्या 'स्वत्व'वरही अवलंबून अस्ते.

कोणतंही बलदंड व्यक्तिमत्त्व मग तो कलावंत असो वा प्रज्ञावंत, मला वाटतं, तो जो कुणी कलावंत किंवा प्रज्ञावंत असतो, तो त्याच्यातील 'मी' मुळंच असतो. हा 'मी' फार महत्त्वाचा. सगळी सळसळ तिथून सुरू होते. आपल्या सगळ्या धडपडीला, आविष्काराला शक्ती देणारा आपल्यातला 'मी'च असतो. आज जे कोणी तुम्ही कवी आहात, लेखक आहात, चित्रकार आहात किंवा आणि कोणी आहात, ते त्या 'मी'मुळं आहात. तुमच्यात तो असाधारण 'मी'आहे म्हणून तुम्ही आहात. त्या मी मुळं तुमच्या जाणिवा जागृत राहतात, संवेदना सक्षम होतात आणि त्यांच्या स्वभावधर्मामुळं कोणाला चित्रकला जमते, तर कोणाला शब्दकळा वश होते. आपण कलावंत लेखक आहात म्हणजे एका परीनं भाग्यवंत आहात. इतरांना कळ्या दिसतात किंवा त्यांची फुलं झालेली दिसतात. लेखक हाच एक असा भाग्यवान आहे, की तो त्या कळ्यांचं रुपांतर होताना त्यांचं ते हळूहळू उमलणं पाहू शकतो. ती स्थितिगती त्याला आकळते. परमेश्वरानं तुम्हा कलावंत साहित्यिकांना वेगळे डोळे दिले आहेत. त्या डोळ्यांनी पहा, टिपा, त्या दिव्य दृष्टीला जे दिसेल ते तुमच्या जाणिवेकडं सोपवा आणि मग त्या अनुभवांचं सोनं करा. अहो कविता, कथा म्हणजे चैतन्याची फुलं आहेत ! चैतन्याची फुलं करण्याची कला तुम्हाला लाभली आहे. 'भाषा' हे केवढं मोठं माध्यम तुमच्या हातात आहे ! पण एक काळजी घ्या, तुमच्यातल्या त्या 'मी'ला यशानं किंवा समाधानानं सुखाऊ देऊ नका. तो सुखावला की तुमची कला तुमच्याकडं पाठ फिरवील आणि मग तुम्हांला काही सुचेनास होईल. त्यासाठी 'लेखन' हाच लेखकाच श्वास बनला पाहिजे. त्याच धुंदीत आपण सदैव असलं पाहिजे. मग अनुभवांचा कधी तुटवडा भासत नाही. तंबोऱ्याच्या तारा जुळवून ठेवलेल्या असल्या म्हणजे लहानशा स्पर्शानं देखील त्यांतून झणत्कार निघतो. लेखक-कलावंतांच्या कलानुभवांचंही असंच आहे. त्याच्या जाणीवेच्या तारा जुळलेल्या असल्या की एखाद्या लहानशा प्रसंगानं किंवा एखाद्याच्या तोडच्या वाक्यानंही अनुभव कलारूप घेऊ लागतो. स्पंदनं जाणवू लागतात. त्यासाठी कलावंत

म्हणून आपलं व्यक्तिमत्त्व आपण किती संपन्न करतो त्यावरही ही क्षमता थोडी फार अवलंबून असते. उदाहरणच घ्यायचं तर मी असं म्हणेन— स्वीच एकच असतो, पण बल्ब चाळीसचा असेल तर प्रकाश तेवढाच पडेल, पण तो बल्ब काढा आणि त्या ठिकाणी चारशेचा बल्ब लावा. त्याच स्वीचवर प्रकाश चारशेचा पडेल. शिवाय तुम्हांला उजेड ंगीत हवा असेल तर तेही शक्य आहे. अनुभवांचंही असंच आहे. घडणारी घटना स्वीचप्रमाणे एकच असली तरी ती पाहणाऱ्यांच्या मनातील जाणीवा वेगळ्या असल्यामुळं प्रत्येकाला येणारा अनुभव वेगळा असतो. एकाच घटनेनं काहीच्या चेहऱ्यावरची सुरकुतीही हालणार नाही, पण एखाद्याच्या मनात स्पंदनाचा लोळ उठेल !

अनुभवांच्या या संदर्भात तात्यासाहेब शिरवाडकर म्हणतात- 'माणसांच्या अंगठ्यावरील रेषा कधो सारख्या नसतात, त्याप्रमाणे दोन माणसांचे समान परिस्थितीतील अनुभवही कधी तंतोतंत सारखे असू शकणार नाहीत, अनुभवांच्या या गुणामुळेच एखाद्या विषयासंबंधी हजारो लेखकांनी पूर्वी लिहिले असले आणि आजही हजारो लेखक लिहीत असले तरी त्यात संपूर्ण सारखेपणा येत नाही. कालिदासाने प्रेमावर लिहिले आणि नंतर आठ-दहा शतके कवी प्रेमावर लिहीत आहेत. विषय संपत नाहीत, याचे एक कारण, माणसे संपत नाहीत, माणसाचे अनुभव संपत नाहीत, आणि त्या अनुभवांतील वेगळेपणाही संपत नाही. साहित्य सारितेचा प्रवास सतत जिवंत, वाहता, आणि वाढता ठेवण्याचे कार्य मुख्यत: अनुभवाकडूनच होत असते.'

मित्रहो, कलानुभवाचं हेच वैशिष्ट्य आहे अनुभव हा माणसागणिक वेगळा असतो आणि एखाद्या कलावंताला प्रत्यक्षाविनाही तो घेता येतो. असं वरदान लाभलेला कलावंत शिडीविना आभाळ गाठू शकतो ! आपल्या मनाच्या फांदीवर अनुभवांच्या कळ्या फुलवू शकतो. पुन्हा एकदा म॒॒पूर्वक आभार मानतो. धन्यवाद !

# मुंबई : १९८६

# विश्राम बेडेकर

रसिकहो,

आपल्यासारख्या श्रेष्ठ रसिकांसमोर मी बसून बोलणे हा उद्धटपणा आहे, असे माझे मलाच वाटते आहे. पण माझे ऐंशी वर्षाचे ओझे माझ्या उभ्या पायांना फार वेळ पेलवत नाही. तेव्हा हा उद्धटपणा नसून माझी असहाय्यता आहे, हे समजून आपण मला क्षमा करावी.

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद हा अत्यंत मोठा मान आपण मला दिला म्हणून मी आपला आभारी आहे.

तरुणपणीच मी शब्दकळेवर भाळलो. योगायोग असा, की पोहोचलो शब्दांचे थोडे फार वावडे असलेल्या सिनेमाच्या आवारात ! तेथे बारमहा सगळ्याच कलांचा उत्सव ! कलांच्या बहीणगर्दीत मी पन्नास वर्षे स्वत:ला हरवून बसलो. अशा स्थितीत मी अधिकारवाणीने साहित्यावर काय बोलू शकणार ? साहित्य आणि सिनेमा यांच्या प्रवासात कधी कधी मला प्रश्न सुचले त्यांपैकी काही तुमच्यासमोर मांडतो.

इथे तुमच्याकडे मी बघतो, तेव्हा एक प्रश्न मनात उमटतो. आपण इतक्या हौसेने साहित्यसंमेलनासाठी जमतो ते कुठल्या गूढ आकर्षणामुळे ? इथे सत्तेच्या छत्रचामरांचा बडेजाव नाही. संपत्तीचे प्रदर्शन नाही. राजकीय सभातून देशाला वंद्य असलेल्या नेत्यांचे दर्शन होते—निदान पूर्वी होत असे ! —तेही इथे नाही. मग आपल्या या ओढीचे कारण काय ?

मला वाटते, आपण नुसतेच साहित्याचे वाचक आणि रसिक नसतो. आपण स्वत:च साहित्य निर्माण करणारेही असतो. लेखकांप्रमाणेच आपल्यापैकी प्रत्येक जण रोजच्या आयुष्यात काव्य, नाटक, कादंबरी, समीक्षा, आत्मचरित्र यांच्यापैकी कशाची ना कशाची छाया घेतलेले साहित्य थोड्या फार प्रमाणात प्रसंग पडेल त्याप्रमाणे, रचीत असतो. ही रचना लेखी नसेल, केवळ तोंडी असेल. पण लेखनाप्रमाणेच या तोंडी रचनेच्या मागची प्रेरणाही निर्मितीचीच असते. सगळ्यांच्या ठिकाणी असलेली ही 'अंतरीची खूण' आपल्याला जाणवते. आपण सगळे एकाच कळपातले पक्षी आहोत, अशी ओळख पटते; म्हणून आपल्याला अशा मोठाल्या थव्याने एकत्र येण्याची ओढ लागते.

आपण ही रोजची साहित्यरचना का करीत असतो ? ऐहिक जीवन सुसह्य व्हावे यासाठी. जात्यावर बसलेल्या स्त्रिया तसेच मोटा व नांगर हाकणारे गडी काही आठवणीतील आणि काही आयत्या वेळी सुचलेली गाणी म्हणत आपले श्रम हलके करीत असतात. पाळण्यातल्या मुलाशी लडिवाळपणे बोलणारी आई, जगात कुणालाही कळणार नाहीत अशी गोड गाणी आणि भाषा निर्माण करीत असते. आपले काम कसेही करून साधण्यासाठी हवे ते नाटक करण्याची कला पुष्कळांच्या अंगी दिसते. ऑफिसातून यायला उशीर झाला तो का, हे बायकोला सांगण्यासारखे नसेल, तर माणसे काही बाही थापा मारतात, त्यांच्यावर कादंबरीची छाया असते. आपण स्वत:विषयी बोलतो, तेव्हा आत्मचरित्र सांगत असतो. बैठकीतून उठून गेलेल्या माणसावर कधी उपरोधिक, कधी खुसखुशीत टीका करतो, ती समीक्षा असते. अशी तोंडी साहित्यरचना करणाऱ्यांच्या अंगी पुष्कळदा लेखकांप्रमाणेच भाषा-चातुर्यही दिसून येते. म्हणूनच भाषेत लक्षवेधक वाक्प्रचार, म्हणी व ध्यानात राहतील अशी चमकदार वाक्ये यांची भर पडत जाते. एकदा माझ्या बँकेतल्या कारकुनाला जमाखर्चाचा मेळ घालता येईना चूक होती फक्त वीस-पंचवीस नया पैशांची. त्याच्या सहकाऱ्याने म्हटले, "अरे काल आपल्या साहेबांचा हिशोब पंचाण्णव रुपयांनी चुकत होता, त्यांनी तो तसाच रेटला, तू कशाला पाच-पंचवीस पैशांसाठी तडफड करतो आहेस ?" कारकुनाने उत्तर दिले, "बाबा रे, थोरल्या बाजीरावांनी बाई ठेवली की ती मस्तानी असते. आम्ही ठेवली की तिला राखरखेली म्हणून शिव्या बसतात !"

असेच शब्दचातुर्य वापरून हरिदास, पुराणिक, तमाशातील सोंगाड्ये तोंडी साहित्यरचना करीत पोट भरीत असतात

निर्मितीच्या अशा लहानमोठ्या लाटा असंख्य मनात उचंबळत असतात. मग ऐहिक सुखापेक्षा अधिक काही मिळविण्यासाठी या प्रेरणेचा उपयोग करण्याची बुद्धी काहीना सुचू लागते. आपल्यापैकी प्रत्येकाला आयुष्यात केव्हा ना केव्हा एखादा कविता करणारा, एखादा चित्रे काढणारा, किंवा बाहुल्या, मूर्ती करणारा येऊन गेलेला आठवेल. नाट्यसंस्थांकडे नेहमी नव्या नाटकांच्या चोपड्या वाचनासाठी येत असतात. दर पंधरा वीस दिवसांनी सिनेमासाठी नवी कथा घेऊन येणारे भेटतात. संपादकांना लेख आणि कविता सारख्या परत कराव्या लागतात. माणसांना प्राक्तन असते, असे म्हणतात. तसे कलाकृतींनाही असावे. त्यामुळे अनेक कलावंत अनामिकतेच्या अंधारात नाहीसे होतात. कवी सोपानदेव चौधरी यांच्यामुळे आपल्याला बहिणाबाईची कविता लाभली. पण आगरकरांच्या मातोश्री गाणी रचीत असत. ती कशी होती हे त्या अंधारालाच आता माहीत ! भाषांतराच्या कलेला प्रतिभावान रसिकता लागते हे ध्यानात घेतले, तर 'हॅम्लेट' नाटकाचे पहिले मराठी भाषांतर १८५७ मधील एक सेनानी नानासाहेब पेशवे यांनी केले होते आणि ते आज उपलब्ध नाही, ही माहिती चुटपूट लावून जाते.

असे हे सगळे आविष्कार असतात जीवनप्रेरणेच. आपल्या निर्मितीशक्तीचे !

जीवनाच्या सातत्याचे रहस्य म्हणजे नित्य नवी निर्मिती. त्यामुळे निर्मितीच्या चमत्काराविषयी माणसाला नेहमीच कुतूहल वाटत आले आहे. विश्वाच्या निर्मितीचे कुतूहल तत्त्वज्ञ आणि शास्त्रज्ञ यांना गुंगवते, आणि रोज दिसणारा अपत्यसंभवाचा चमत्कार सामान्य माणसांची मने चाळवतो. या चमत्कारामागच्या स्त्री-पुरुषांच्या संबंधांची वर्णने माणूस काव्य, नाटक, कादंबरी यांतून वर्षानुवर्षे वाचीत आला आहे. तरी अजून त्याची तृप्ती झालेली दिसत नाही.

हे विश्व कसे निर्माण झाले हे शास्त्रज्ञांना अजून कळलेले नाही. पण माणूस स्वत:चे मनोविश्व निर्माण करतो आणि त्यात रमतो, हा आपला रोजचा अनुभव आहे. या मानवी मनोविश्वाचा शोध घेऊ पाहणारे शास्त्रज्ञ आणि तत्त्वज्ञ म्हणजे कलावंत. त्यांच्या शोधाचा आपल्याला साक्षात्कार घडवू शकते, ती शक्ती म्हणजे प्रतिभा !

प्रतिभेचे विविध आविष्कार जीवनाच्या सर्वच क्षेत्रात आढळतात. या वेगवेगळ्या आविष्कारांचे मूळ एकच आहे, हे सिनेमाच्या स्टुडिओत माझ्या ध्यानात आले. तेथे सगळ्या कला एकाच घरात नांदत होत्या. पण प्रत्येकीची चूल वेगळी दिसे. चित्रासाठी कुंचले आणि रंग, शिल्पासाठी शाडू माती, संगीतासाठी वाद्ये. एकाचे दुसऱ्याशी काही साम्य नव्हते. एक दिवस कोणी तरी म्हटले, 'काल नाटक आणि गाणी दोन्ही खूप रंगली.' रंग हा चित्रकलेतील शब्द. तो गाण्याच्या वर्णनात कुठून शिरला ? सूर हा संगीतातील शब्द. पण आपण सहज म्हणतो, 'काल अमक्या नटाला अभिनयाचा सूर सापडला होता.' चित्रे डोळ्यांना दिसतात. ती बोलत नाहीत. तरी आपण म्हणतो, 'हे चित्र फार बोलके आहे.' एखाद्याची भाषाशैली चित्रमय आहे. सख्ख्या बहिणी जशा आपल्या साड्या हौसेने आपसात बदलून नेसतात, तशा या कला आपली विशेषणे आणि वर्णने एकमेकींना खुशाल वापरायला देताना दिसू लागल्या म्हणजे या सगळ्या कला एकाच आईच्या लेकी ! प्रतिभेच्या !

एक दिवस चित्रपटासाठी एक गाणे रचण्याची पाळी आली. गाण्याचे तोड गुणगुणत मी स्टुडियोत फिरू लागलो. तेव्हा एकदम ध्यानात आले, हे सगळे कलावंत निर्मितीसाठी बाह्य जगातल्या साधनांवर अवलंबून आहेत ! रंग, माती वाद्ये मिळाली नाहीत तर यांची निर्मितीच थांबेल. माझे माध्यम माझ्या मनातले शब्द. याचा अर्थ मी परावलंबी नाही माझी निर्मितीची शक्ती मुक्त, स्वतंत्र, अनिर्बंध आहे. यांच्या कलांना भाषा नाही. वास्तवाचे सौदर्य, त्यातले भावसत्य या केवळ सुचवू शकतात. माझ्या साहित्यकलेला वरदान शब्दांचे आहे. हे शब्द सत्याचे, शिवाचे, सौदर्याचे स्वरूप अधिक स्पष्टपणे जाणवून देऊ शकतात. म्हणूनच जर्मन तत्त्ववेत्ता हेगेल याने म्हटले आहे, ''काव्य हा सर्व कलातला उच्चतम प्रकार आहे'' सावरकरांसारख्या महाकवीला अंदमानाच्या अंधारकोठडीत डांबले, तरी कोणत्याही बाह्य साधनाशिवाय 'कमला'

काव्यासारखी रचना करता आली ते उगीच नव्हे.

संध्याकाळपर्यंत माझे पद तयार झाले. त्यातले शब्द अर्थात मराठी होते. 'कमला' आणि सावरकरांच्या इतर काव्यातल्या मला आठवणाऱ्या ओळीही मराठीच. पण माझे शब्द भुईवर सरपटत, रखडत पुढच्या ओळीकडे सरकत होते. सावरकरांचे शब्द मात्र पंख लावून आकाशात झेप घेणारे, कधी त्याच्या गर्द निळाईत एकजीव होऊन जाणारे, तर कधी अरुणोदयाचे आणि सूर्यास्ताचे अप्रतिम रंग पांघरणारे ! अलौकिकाविषयी मधून मधून हुरहूर लावण्याचे सामर्थ्य असलेले ! महाकवींच्या शब्दात हे सामर्थ्य कुठून येते ?

उत्कृष्ट कलेच्या निर्मितीसाठी साहित्यकाराला किंवा कलावंताला पूर्वीची आणि समकालीन साहित्ये किंवा कला यांचा अभ्यास करण्याची आवश्यकता असते. यासाठी मोठेच सारस्वत तप लागते, अशा तपाने सिद्ध झालेली कला मानवी जीवनाला वरदान ठरते, ते का ?

मानवी जीवन अनित्य आहे. आपला प्रत्येक क्षण नदीतल्या पाण्याच्या थेंबासारखा वाहून जात असतो. पण जीवनात काही अलौकिक सुंदर अनुभव देणारे क्षण येतात. केशवसुतांनी त्यांना 'क्षणात नाहीसे होणारे दिव्य भास' असे म्हटले आहे. कलेचे सामर्थ्य हे की ती या भासांना, क्षणांना पकडते. स्थिर, अमर करून ठेवू शकते. लिओनार्दो द विन्सी या चित्रकाराचे 'मोनालिसा' हे चित्र प्रख्यात आहे. त्यातल्या स्त्रीच्या चेहऱ्यावरचे रसिकांना दंग करून टाकणारे गूढ, तरल स्मित आज काही शतके त्याने असेच अमर करून ठेवले आहे. खजुराहोची मूर्तिमंत मंदिरे, आग्र्याचा ताजमहाल, वेरूळचे कैलास लेणे, यांच्यासारख्या जड माध्यमातूनच कला हे साधते असे नव्हे. शब्दांच्याही अंगी अशा क्षणांना पुनर्जन्म देण्याचे सामर्थ्य असते. नाटकातल्या एखाद्या प्रसंगात एक क्षण अचानक जिवंत होतो आणि आपल्या काळजाला हात घालतो, त्या अनुभवाच्या मोहाने ते नाटक आपण पुन्हा पुन्हा पाहतो. काव्ये, कथा, कादंबऱ्या, उस्फूर्तपणे झालेली वैचारिक रचना यातील शब्दकलेने अमरत्व दिलेल्या अशा क्षणांचे आपल्याला पुन्हा पुन्हा दर्शन घडते. संस्कृती म्हणजे अशा अमर क्षणांचे भांडार !

कलेला हे सामर्थ्य कशामुळे येते ? अनेक लहानथोर कलावंतांच्या अंगी प्रतिभा असलेली दिसते. पण कालिदास आणि शेक्सपिअर निर्माण होतात ते प्रतिभेला मिळालेल्या प्रज्ञेच्या पाठबळामुळे ! तथागत बुद्धांनी प्रज्ञेचे तीन प्रकार सांगितले आहेत. श्रौतमयी, चिंतनमयी आणि सगळ्यांत श्रेष्ठ असलेली भावनामयी प्रज्ञा. बुद्धाच्या काळात भावना याचा अर्थ संवेदना असा होता. भोवतालच्या निसर्गात आणि जीवनात जे स्पंदन चालू असते, त्याला संवेदना सतत प्रतिसाद देत असते. अशी सचेतन, नेहमी जागरूक असलेली संवेदनेची शक्ती हा या भावनामयी प्रज्ञेचा आधार होय.

रोजच्या जगण्यात आपल्या सारखे विसंवाद आणि संघर्ष निर्माण होत असतात.

मनाच्या या सततच्या अस्वस्थेमुळे ही संवेदना बोथट होत जाते. मनातले संघर्ष संपतात आणि सारी मानसिक तडतड थांबते, स्थिर झालेले मन जेव्हा मिथ्याभास निर्माण करीत नाही, आपणच निर्माण केलेल्या जाळ्यात गुरफटत नाही, तेव्हाच सृजनशीलतेची पहाट होते. तेव्हाच मनात सत्याचा उदय होतो. तेव्हाच संवेदनामयी प्रज्ञा 'ज्ञानेश्वरी' निर्माण करू शकते. थोर लेखकांच्या प्रतिभेला प्रज्ञेचे नुसते पाठबळ असते. पण ज्ञानदेवांच्या ठायी प्रतिभा आणि प्रज्ञा एकरूप होऊन जातात. म्हणून शेक्सपिअरने रसिकांच्या मनावर चारशे वर्षे राज्य केले असले तरी ज्ञानेश्वर आज आठशे वर्षे आपल्या मनाच्या देव्हाऱ्यात वास करीत आहेत. कलानिर्मिती विषयीचा हा पौर्वात्य विचार आहे. कलाकृतीचा जन्म, मानसिक संघर्ष आणि त्यामुळे होणारी वेदना यातून होतो या पाश्चात्त्य विचारापासून हा भिन्न आहे.

प्रज्ञेचे सर्वात मोठे सामर्थ्य म्हणजे प्रत्यक्ष निर्मितीच्या वेळी ती कलावंताला स्वत:चा विसर पाडते. निर्मितीमध्ये व्यक्त होत असलेल्या अनुभवापासून त्याला ती अलिप्त करू शकते. जात, षड्‌विकार किंवा लिंगभेद यांची जाणीव त्याला राहू देत नाही. स्त्रिया, पुरुष, दलितेतर व दलित यांचे अनुभव वेगवेगळे असतात. किंवा एकाच अनुभवाकडे बघण्याची त्यांची दृष्टी लिंगभेदामुळे किंवा जातिभेदामुळे निराळी असू शकते. त्या अनुभवाच्या कलात्मक आकारात या भेदांमुळे त्यांच्या भिन्न प्रकृतिधर्माच्या छटाही नकळत उमटतात. पण मी पुरुष म्हणून किंवा अमक्या जातीचा म्हणून लिहीत आहे, तेव्हा मला असेच लिहावयास हवे. किंवा मी स्त्री लेखिका किंवा दलित लेखक आहे तेव्हा माझ्या लिहिण्यात ते यायला हवे, असा प्रकार निर्मितीच्या काळात असू शकत नाही. प्रचारकी किंवा बाधिलकीचे लिहिणे असेल तर गोष्ट निराळी. निसर्गही, निर्मितीच्या बेभान क्षणी, माणसांना स्त्री किंवा पुरुष अशी स्वतंत्र अस्तित्वाची जाणीव उरू देत नाही.

दलित वाड्मयाचा एक विशेष असा की हे वाङ्मय देशी वाणाचे आहे, या मातीतून उगवलेले आहे असे जाणवते. सामाजिक आणि आर्थिक परिस्थितीमुळे दलितांचे लिहिणे अजून परदेशी प्रदूषणापासून बचावलेले दिसते. या वाङ्मयाला युगचैतन्याचे प्रतीक म्हणून पदवी प्राप्त करून घ्यायची असेल तर त्याच्या मागचे मन पूर्ण विकसित व्हायला हवे. विविध साहित्ये आणि कला यांच्या अभ्यासाने ते ऐश्वर्यसंपन्न व्हायला हवे. अशा अभ्यासाने काही गोष्टीवर नवा प्रकाश पडू शकेल. अस्पृश्यता हे हिंदू समाजाचे मोठे लांछन आहे हे खरेच. पण बुद्धधर्मी जपानमधे अस्पृश्यता का आहे ? आश्चर्य म्हणजे औद्योगिक क्रांतीच्या आधी युरोपातही अस्पृश्यता दिसते ती का ? जपान, भारत आणि युरोप या तिन्ही ठिकाणची अस्पृश्यता घाणीच्या धंद्यात काम करणाऱ्या लोकांच्या वाट्याला येत असे. औद्योगिक क्रांती पूर्ण झाल्यावर युरोपियन समाजातील अस्पृश्यता पार नाहीशी झाल्याचे आढळते.

सुरवातीला दलितांचा क्षोभ ज्या भडक भाषेत प्रगट झाला, तिच्यामुळे मराठी समाज आणि साहित्य भांबाळून गेले. या संदर्भात एका इंग्रजी समीक्षकाचे एक मार्मिक निरीक्षण आठवते. 'Every literature constantly renews itself through rebarbarization.'—प्रत्येक साहित्य असंस्कृत वाटेल असा धसमुसळेपणा, ग्राम्यपणा करते आणि स्वत:ला नवचैतन्य मिळवते. साहित्यात अत्यंत प्रक्षोभक नव्या कल्पना, विचार, रचनेचे घाट किंवा भाषेचे आविष्कार निर्माण होतात, तेव्हा त्यातील बेडर धाष्ट्र्यामुळे, क्वचित् रानदांडगेपणामुळेही समाज भयचकित होऊन त्यांच्याकडे बघतो. तोपर्यंत साचलेल्या पाण्यासारखे झालेले साहित्य खळबळून जाते. वेगाने प्रवाहित होऊ लागते. सर्वत्र नवी चेतना संचारते. लोकहितवादी, म. फुले, आगरकर, केशवसुत, मर्ढेकर, आंबेडकर या प्रत्येकाच्या बाबतीत मराठी साहित्याने थोड्याफार प्रमाणात हा अनुभव घेतला आहे. तुमच्यापैकी काहीना तरी पु. य. देशपांडे यांची 'बंधनाच्या पलीकडे' ही कादंबरी, विभावरी शिरूरकरांचे 'कळयांचे नि:श्वास' आणि अलीकडे काही नाटकांनी मराठी रंगभूमीवर उधळलेली रानदांडगी भाषा, यामुळे उडालेल्या खळबळीची आठवण असेल. या सगळ्यापेक्षाही दलित साहित्याने सुरवातीला जे धक्के मराठी साहित्याला दिले, ते स्वत: धसमुसळेपणा (Rebarbarization) करून नवचैतन्य मिळवणाऱ्या साहित्याच्या प्रतिभेचेच लक्षण मानले पाहिजे.

हीच साहित्याची प्रतिभा, काव्य, कथा, कादंबरी, समीक्षा यांचे पदर धरून चित्रपटकलेचा गोफ विणीत नाचत असलेली मी अनेक वर्षे सिनेमाच्या स्टुडिओत पाहिली.

चित्रपटाचा प्राण म्हणजे त्याची गोष्ट. एखाद्या कथेवरून किंवा कादंबरीवरून घेतलेली. कथा आणि कादंबरी यांत काय फरक असतो ? एकदा कोल्हापुरात मी एका माणसाला विचारले, "गंगावेशीचा रस्ता कोणचा हो ?" त्याने उत्साहाने सांगितले, "हा डावीकडचा रस्ता दिसतु नव्ह ? त्यावर एका बाजूला मिठाईचं दुकान हाये. त्याच्या फुडं कापडाचं. दुसऱ्या बाजूला फुलमाळ्याचं. मंग किराण्याचं. अन् जरा फुडं गेलं की सराफाचं मोठ्ठं दुकान हाए." मी म्हटले, "होय, होय." पण त्याने लगेच सांगितले, "पर आपल्याला तिकडं जायचंच न्हाई. आपून ह्यो नाकासमोरचा रस्ता धरायचा. थेट गंगायेशीचा।" कथेने असाच नाकासमोरचा रस्ता धरायचा असतो. डावी उजवीकडे बघायचे वळायचे नसते. कादंबरीला सरळ रस्त्याने जातानाही भोवतालच्या परिसराचे भान राखावे लागते. सामाजिक, आर्थिक, भौगोलिक परिस्थितीच्या चौकटीत वावरावे लागते सिनेमासाठी. मात्र कादंबरीला शक्य तोवर कथेसारखेच सरळ जात राहावे लागते.

काव्ये, नाटके यांतूनही चित्रपटासाठी कथा मिळतात. नाटक आणि सिनेमा यात स्वभावत:च फरक आहे. नाटक नट आणि प्रेक्षक यांच्या साथीने रंगते. सिनेमाचा

प्रेक्षक थिएटरातल्या अंधारातील गर्दीतही एकटा असतो. एकट्यानेच चित्रपटाच्या आनंदात रमतो. पुस्तकाच्या वाचकासारखा. नाटकातल्या नटाला आपले काम स्वत: बघता येत नाही. त्यासाठी दुसऱ्याच्या मतावर अवलंबून राहावे लागते. सिनेमातला नट आपले पडद्यावरचे काम स्वत: बघू शकतो. स्वत:चा समीक्षक होऊ शकतो. नाटकातील कृती म्हणजे भाषणे-संवाद. त्यामुळे नाटक बघताना आपले बोलणाऱ्या नटाकडे लक्ष असते. सिनेमा बघताना बोलणाऱ्या नटापेक्षा ते बोलणे ऐकणाऱ्या नट-नटींची (Silent close-up) अबोल निकट-दृश्ये आपल्याला त्या पात्रांशी लवकर जवळीक देतात.

नाटकांची सुरवात झाली ती ललिते, दंडारी आणि त्यांच्यासारख्या इतर लोककलांतून. खाडिलकर, गडकरी यांच्यापर्यंत ती वाङ्मयीन मोठेपणा पावली. आपल्या सिनेमाने हरिश्चंद्र तारामती, श्रीकृष्णजन्म, मायामच्छिंद्र यांसारख्या, चमत्कारांनी भरलेल्या चित्रपटांपासून प्रवास सुरू केला. व अलीकडच्या 'पथेर पांचाली'सारख्या चित्रपटांपर्यंत तो हळूहळू वाङ्मयीन बनत गेला. सिनेमाच्या या साहित्यिक प्रवासात असे बोलपट हे महत्त्वाचे वाङ्मयीन टप्पे समजले जातात.

मूकपटांचे बोलपट झाले, तेव्हाच साहित्याचे सिनेमात उघड पाऊल पडलेले दिसले. फिल्मचे काही भाष्यकार म्हणतात, अखेर शब्द चित्रांना जिंकणार दुसऱ्या काहीना वाटते, साहित्य आणि सिनेमा यांच्या मिलाफातून एक नवे समर्थ कलामाध्यम निर्माण होण्याचा काळ फार दूर नाही. अर्थात् त्यावेळी चित्रपटांचे सध्याचे स्वरूपही खूप निराळे असेल. पण आज तरी सिनेमा आणि साहित्य जवळ येण्यात अनेक अडचणी दिसतात.

सिनेमाची भाषा पडद्यावर चित्रे उभी करते. साहित्याचे शब्द मनात चित्रे निर्माण करतात. ही मनातली चित्रे निर्माण करण्यात शब्दांबरोबरच वाचकाची कल्पनाशक्ती, त्याचे संस्कार व अनुभव यांचा मोठाच वाटा असतो, त्यामुळे ही चित्रे प्रत्येकाची निराळी, स्वतंत्र, स्वत: उभी केलेली असतात टॉलस्टॉयची 'ॲना कॅरिनीना' किंवा हरिभाऊंची 'पण लक्षात कोण घेतो' वाचून मनात उभी राहिलेली ॲना किंवा यमू माझी निराळी, तुमची निराळी, शेकडो वाचकांची स्वत:ची निरनिराळी. सिनेमाच्या पडद्यावरची ॲना म्हणजे आधीच सर्वांच्या परिचयाची असलेली ग्रीटा गार्बो ! तिचे रूप, आवाज, आविर्भाव ही सगळ्यांच्या दृष्टीत एकच. टॉलस्टॉयचा ॲना आपल्या मनात आपल्याला हवी तेव्हा वाचक रेखू शकतो. पण पडद्यावरच्या ॲनाला मात्र चार पाच वेळा पाहिल्यानंतर कंटाळा येतो. यासाठीच अशा कादंबऱ्यांच्या लेखकांना आणि वाचकांनाही कादंबरीतले काही तरी चित्रपट हरपल्यासारखे वाटत राहते.

खरे म्हणजे सिनेमाने सुरवात केली तीच साहित्यापासून स्फूर्ती घेऊन. डिकन्स, बाल्झाक, जेम्स जॉइस् यांसारख्या कथाकारांपासून गोष्ट कशी सांगायची ते तंत्र सिनेमा शिकला. सिनेमा नव्हता, तेव्हापासून साहित्यही चित्रांच्या भाषेत बोलण्याचा यत्न

करीत आले आहे. काव्यालंकारात एक उदाहरण आहे. नायकाने नायिकेला 'आज केव्हा भेटशील ?' असे केवळ सूचकतेने भिवया उचलून विचारले. तेव्हा उत्तर म्हणून नायिकेने हातातल्या कमळाच्या पाकळ्या मिटल्या आणि सुचवले, की कमळे मिटतात तेव्हा; म्हणजे संध्याकाळी.

फिल्मचे तंत्र आणि भाषा आपल्या भाषेत मिसळून साहित्यरचना अधिक आकर्षक आणि अर्थाने गडद करणारे लेखक आज मराठीत पुढे येत आहेत. प्रसिद्ध कवी अरुण कोलटकर यांची ही कविता पहा :

*मुंडी मुरगाळत न्हावी म्हणाला,*
*'हालू नका साहेब हालू नका'*
*छातीला टेप लावून शिंपी म्हणाला,*
*एकतीस इंच, फक्त एकतीस इंच*
*पाय बुटात कोंबत चांभार म्हणाला,*
*घालून घालून होईल सैल.*
*घालून घालून;*
*पोटावर पाय देऊन बॉस म्हणाला,*
*इलाज नाही. मिस्टर नेने इलाज नाही.*

कवि महानोरांनी तर दृश्ये आणि कल्पना यांच्या पाठशिवणीचा सुंदर खेळ आपल्या एका कवितेत रंगविला आहे.

*जाळीवरती वाळत लुगडे, उगा हसे जरतारी काठ*
*नभात झिम्मड निळी जांभळी, झाडातुन निथळत बरसात*
*झुळझुळ लाट, अवघड काठ*
*अवघडलेले आडोशाला विवस्त्र शिल्पित हळदी झाड,*
*निरखित अपुले रूप बनात*
*मनात भलते भरकटताना उभे पेटले झाड उन्हात,*
*झाडातुन निथळत बरसात.*

मी चित्रपटांचा दिग्दर्शक झालो, तेव्हा स्टुडिओतच समीक्षेची मला ओळख झाली. कागदावरची कथा फिल्मवर उतरताना अनेक अवस्थातून जाते. या काळात दिग्दर्शकाच्या मनात अनेक गोष्टींची छाननी चालू असते. संवादातल्या शब्दांचा संक्षेप होत जातो. वर्णनातल्या शब्दांची चित्रे बनवावी लागतात. कधी या चित्रांमुळे शब्दातला अर्थ अधिक उठून दिसतो. काही वेळा शब्दांच्या सामर्थ्यापुढे चित्रे तोकडी पडतात. मनं त्याची कारणे शोधू लागते. या ऊहापोहात या दोन्ही कलांच्या अंतरंगाची दाट ओळख

होत जाते. त्यांच्याकडे बघण्याच्या दृष्टीला एक नवे परिमाण मिळू लागते.

ही समीक्षा सृजनशीलही असते. शाब्दिक वर्णनांची चित्रे करताना अनेक पर्यायी दृश्ये डोळ्यापुढे येतात. आविष्काराचे रूप, अनुरूप कल्पना, नेमके शब्द शोधताना लेखकाला जसे कष्ट पडतात, तसेच कष्ट या पर्यायी चित्रांमधून निवड करताना दिग्दर्शकाला पडतात. 'पथेर पांचाली' या चित्रपटातले कुटुंब शेवटी गाव सोडून जाते, मागे राहिलेल्या घराची वाताहात होते, हे कसे दाखवायचे ? नेहमीची दृश्ये म्हणजे रिकाम्या खोल्या, पडलेल्या भिंती, धूळ, जळमटे, किंवा अंगणातले वाळलेले झाड यांपैकी काही दाखवायचे. पण दिग्दर्शकाने तेथे सहजासहजी न सुचणारा असा एक शॉट घातला आहे. चित्रपटात जे घर माणसांनी गजबजलेले दिसत होते, त्या घराच्या जमिनीतल्या बिळातून एक साप सावकाशपणे पुढे जात असलेला दिसतो. जणू जिथे माणसे राहात होती तिथे आता एक साप राहायला आला आहे !

चित्रीकरण संपल्यावर मी घेतलेले फिल्मचे असंख्य लहान मोठे तुकडे — शॉट्स् क्रमाने जोडायला सुरवात केली, तेव्हा या सृजनशील समीक्षेचे स्वरूप मला अधिक स्पष्टपणे जाणवू लागले. कॅमेऱ्याच्या साहाय्याने मीच फिल्म घेतली होती. आणि एडिटिंग टेबलावर मीच ती जोखत पारखत होतो. माझ्या शॉट्स्च्या कागदावरच्या टिपणातील काही आडाखे फिल्मवर सपशेल चुकलेले दिसत होते, तर काहीना निराळ्याच जुळणीमुळे नवा अर्थ देता येत होता. त्यामुळे माझ्यातील 'अहं' हा कधी खचत होता तर कधी फुलून उठत होता. त्याच वेळी माझ्यातील कुणी मला सांगत होते. 'हर्ष खेदात अडकून पडू नको. हातातले काम सुंदर कसे होईल एवढाच विचार कर.' हे सांगणारा माझ्यातलाच समीक्षक होता

माझा हा समीक्षक माझ्या चुका दाखवीत होता तरी मला कधी त्याचा राग आला नाही. त्याची कामाविषयीची सहानुभूती, हितबुद्धी, ते काम चांगले व्हावे यासाठी चाललेली माझ्याइतकीच धडपड आणि कधी कधी कौतुक हे सगळे मला सारखे जाणवत होते. विशेष म्हणजे माझ्या कलेतले जवळ जवळ माझ्या इतकेच त्यालाही ज्ञान आहे हे मला दिसत होते. अध्यात्माची भाषा वापरायची, तर त्याची टीका आत्मौपम्य बुद्धीने होत होती.

कलाकृती आणि समीक्षा यात अशा आत्मौपम्य बुद्धीचा प्रत्यय येतो, तेव्हाच समीक्षेला मोल येते. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांना तात्यासाहेब केळकरांविषयी, आणि वामन मल्हार जोशी यांच्याविषयी अशी बुद्धी बाळगण्याचे सामर्थ्य होते म्हणूनच केळकरांचे 'तोतयाचे बंड' हे नाटक आणि जोशांची 'रागिणी' कादंबरी यांवरची कोल्हटकरांची परीक्षणे आजही आपले लक्ष वेधून घेतात.

उत्कृष्ट समीक्षेलाही निर्मितीसारखीच प्रतिभा लागते. साहित्यशास्त्रकारही म्हणतात, मुख्यार्थ किंवा लक्षणार्थ यांच्याहून वेगळा असा अर्थ प्रतिभावान रसिकाला प्रतीत होत

असतो. पदरचना आणि पदव्यंजकता याबाबतीत पंडितराज जगन्नाथ याचा कान पट्टीच्या संगीतज्ञाप्रमाणे तयार होता. त्यामुळेच इतर कवींच्या रचनेचे परीक्षण करताना तो आपले म्हणणे नि:संदिग्धपणे पटवून देऊ शकत असे. जगन्नाथ नुसते दोष दाखवूनच थांबत नसे. ते दोष नवी रचना करून दुरुस्तही करून दाखवी !

कलासमीक्षकाला कलेचे ज्ञान असायला हवे हे कलावतांचे भांडण आजकालचे नाही. शंभर वर्षांपूर्वी जॉन रस्किन या सर्वमान्य कलासमीक्षकाने त्यावेळी नामांकित असलेल्या व्हिसलर या चित्रकाराच्या चित्रावर अत्यंत अवहेलना करणारी टीका लिहिली. रस्किन ऑक्सफर्डचा सन्मान्य प्राध्यापक. शिवाय भाषाप्रभू. पण व्हिसलरने रस्किनला कोर्टात सुनावले, 'चित्र आणि शिल्प या कला आज शेकडो वर्षे आपल्या कर्तृत्वाने रंगात आणि पाषाणात स्वत:ची नावे अमर करून ठेवीत आल्या आहेत. आणि त्यावर टीका करणार कोण तर ज्याने जन्मात हातात कधी ब्रश किंवा छिन्नी धरली नाही असा माणूस !'

पण व्हिसलर आणि रस्किन आपसात भांडले तरी दोघांच्याही निर्मितीची प्रेरणा एकच होती.— Truth, Goodness and Beauty— आपल्या सत्यम्, शिवम्, सुंदरम्, या मूल्यांचा शोध घेण्याची. या मूल्यांना मी आपले म्हटले खरे पण ती मूळची आपली नव्हेत, हे अलीकडे ज्ञानतपस्विनी दुर्गाबाई भागवत यांनी साधार सांगितले आहे. सुमारे अडीच हजार वर्षांपूर्वी साक्रेटिसाच्या तोंडी या मूल्यांचा प्रथम उच्चार झाला आणि या शतकाच्या प्रारंभी ती आपल्या देशात आली. त्यांना इथे इतकी सुंदर, संस्कृत नावे मिळाली की ती आपल्याच संस्कृतीतली असल्यासारखी इथे सगळ्यांना वंद्य होऊन गेली आहेत.

एक दिवस या मूल्यांचा मला सिनेमाच्या स्टुडिओत अचानाक साक्षात्कार झाला ! त्यावेळी मी 'पहिला पाळणा' बोलपटाचे काम करीत होतो. त्या बोलपटात प्रख्यात प्रतिभावान नट दिनकर कामण्णा हे होते. त्यांनी एकदा संवादातला एक शब्द अनुचित वाटतो असे मला सांगितले. कामाच्या गडबडीत मी म्हटले, 'असू द्या हो.' पण ते चटकन म्हणाले, 'साहेब, कॅमेऱ्यासमोर हा शब्द मी कितीही यत्न केला तरी माझ्या तोंडून उमटायचा नाही !' दिनकरच्या तोंडाला त्या शब्दाचा विटाळ सहन होत नव्हता. पण त्याचवेळी त्याच्या तोंडाला मद्याचा वास येत होता !

माझ्या मनात विचार आला-शिवाची, मांगल्याची पूजा बांधू पाहणाऱ्याने नेहेमी सद्वर्तनाच्या सोवळ्यातच राहायला हवे का ? मद्यासक्त मानल्या गेलेल्या गडकऱ्यांनी एकच प्याला नाटक लिहिले. व्यसनी समजल्या गेलेल्या विनायक कवींनी तेजस्वी राष्ट्रीय कविता लिहिली. आज 'एकच प्याला' हे नाटक मराठी साहित्यातले भीमाशंकराचे शिखर आहे. गडकरी व्यसनमुक्त असते, तर त्या नाटकाने गौरीशंकराची उंची गाठली असती की त्यांना ते नाटक लिहिताच आले नसते ?तरुणपणी अनेक थोर युरोपियन ग्रंथकारांना आम्ही डोक्यावर घेऊन नाचलो. आज त्यांच्या विकृतींच्या, स्वैराचारांच्या,

त्यांना झालेल्या गुप्तरोगांच्याही कथा उघडकीस येत आहेत. तरी सुद्धा त्यांच्या कलाकृती या सत्यं, शिव, सुंदराच्या उपासना आहेत, असेच आपल्याला जाणवत आले आहे. कलावंताचे जीवन आणि त्याची कला यात काही अन्योन्याश्रयी संबंध असतो की नाही ? असायला हवा की नको ? जी मूल्ये त्याला जीवनात आचरता आली नसतील त्यांचा गौरव त्यांच्या कलाकृतीत असेल तर ती कला म्हणजे एक थोतांड आहे हे म्हणणे कितपत खरे आहे ? फार तर असे म्हणता येईल. जे त्याला आयुष्यात साधले नाही त्याची त्याला खंत असते. आणि त्या मूल्यांची आंतरिक ओढ त्याच्या लिहिण्यातून आक्रंदत राहते. ही मूल्ये स्वत:ला जपता आली नाहीत तरी तीच मानवी संस्कृतीचा आधार आहेत. याविषयी त्याची नि:शंक श्रद्धा असते. कारण या मूल्यांची बूज संस्कृतीच्या संचितात तशीच थोडीबहुत भोवतालच्या समाजात ठेवली जात असलेली त्याला दिसते.

पण या फार पूर्वीच्या गोष्टी तर नव्हेत ?

सत्य, शिव आणि सुंदर यांचे मूर्तिमंत झगमगते प्रतीक म्हणजे सूर्य. जपानपासून दक्षिण अमेरिकेतील प्राचीन इंका संस्कृतीपर्यंत सगळ्यांचे उपास्य दैवत. सगळ्या कवींचे एक कायमचे स्फूर्तिस्थान. मराठी सहित्यात, आपल्या 'घन:श्याम सुंदरा' महाराष्ट्राला अरुणोदयाची भूपाळी गाऊन होनाजी बाळाने जागविले. गडकरी, बालकवी, केशवकुमार या नावाने कविता लिहिणारे आचार्य अत्रे, वऱ्हाडाचे वा. ना. देशपांडे- सगळ्यांनी उपमाउत्प्रेक्षांच्या काडवाती, निरांजने उजळीत या सूर्याची आरती केली. मग अनेक वर्षे लोटली. दोन महायुद्धांचा कहर झाला. तोवर सरळ चालले आहे असे वाटणारे जग पार उफराटे होऊन गेले. आधुनिक लेखक याच सूर्याची नवी स्तोत्रे रचू लागले. त्यांपैकी एक सॅम्युएल बेकेट. हा बेकेट म्हणतो. The sun rose, having nothing else to do, and went down in the evening, having seen nothing new ! सूर्य उगवला कारण त्याला दुसरा काही उद्योग उरला नव्हता ! बरोबरच आहे. तमोराक्षसांचा संहार करणे हे सूर्याचे काम, पण पुराणांतल्या राक्षसांप्रमाणे सध्याच्या तमोराक्षसांच्या प्रत्येक थेंबागणिक नवे राक्षस निर्माण होत असल्यावर त्यांच्या संहाराला सूर्यतेजाची शक्ती तरी कुठवर पुरी पडणार ! सूर्याची प्रेरणा जीवनदायी. पण जग आण्विक विनाशाकडे भरधाव निघाल्यावर त्याला सचेतन ठेवण्याची ईर्षा या जीवनदायी प्रेरणेला कशी उरणार ! सूर्य मावळतो having seen nothing new !—काहीही नवे न दिसता ! काय बघणार तो नवीन ? आपण वाचलेले मनुष्यजातीचे सगळे इतिहास सूर्याने प्रत्यक्ष बघितले आहेत. आपल्याला वाचता न आलेला इतिहासपूर्व कालही त्याने जवळून पाहिला आहे. दुष्काळ, युद्धे, धरणीकंप, रोगराई, संहार आणि पुन्हा उठण्याची माणसांची केविलवाणी धडपड यांनी भरलेला ! दिवसभराच्या प्रवासात भारतावरून जाताना तर सूर्य डोळे मिटून घेत असेल ! रोज तेच बघायचे ! हुंडाबळी

होऊन मरणाऱ्या असंख्य कोवळ्या मुली ! फरक असलाच तर मरणाच्या प्रकारात ! रॉकेल, विहीर, नाहीतर डोक्यात घालायचा दगड ! रोज सगळीकडे तोच भ्रष्टाचार ! फरक असलाच तर खायच्या पैशातल्या कमीजास्त रकमेचा ! खून, दरोडे, बलात्कार यांचे थैमान ! गुन्हेगारांचे यशस्वी पलायन नाहीतर कधी कधी त्यांना संरक्षणही ! मग 'आमचे रक्षण करा हो ! आम्हीही तुम्हाला पैसे चारायला तयार आहोत' अशा आयाबहिणींनी वर्तमानपत्रांतून केलेल्या प्रार्थना ! सूर्याला अनुभवाने हेही कळले आहे की आपले तेज क्षणार्धात सगळे जग उजळू शकते, पण शोषकांच्या, जुलुमी सत्ताधाऱ्यांच्या, आत्यंतिक स्वार्थांधांच्या काळजातले काळेबेरे ते कधीही उजेडात आणू शकत नाही. सूर्यच असा काळवंडल्यावर लेखक-कवींना कुठली स्फूर्ती मिळणार ?

अशाच हताशेने गेल्या दशकातल्या युरोपियन तरुण मुलामुलींना ग्रासले. मग हशीश, कोकेन, चरस, गांजा यांच्या कैफांचा आश्रय घेत ती हिप्पी झाली आणि आयुष्याचा नाश करून घेत सैरभैर होऊन गेली. आपल्याकडे गर्दचा प्रभाव वाढतो आहे त्यात पुढच्या परिणामाची आगाऊ सूचना आहे.

प्रश्न असा आहे की हे रोज बघणाऱ्या आपल्या तरुण लेखकाला सत्य, शिव, सुंदराची राहोच पण दुसऱ्या कुठल्याही मूल्यांची आठवण जागी ठेवणे शक्य होत असेल का ? समता, स्वातंत्र्य, माणुसकी ही केवळ पोपटपंची असे तर त्याला वाटत नसेल ? या मूल्यांमधली आपसातली विसंगती, कधी दिसणारा उघड विरोध यामुळे ती फसवी, निरुपयोगी, अस्थिर म्हणून उधळून लावायला हवीत, असे त्याने म्हटले, तर आपण त्याची कशी समजूत घालणार ?

कारण जी मूल्ये आपण सनातन मानीत आलो त्यापैकी काही आज डोळ्यासमोर कालबाह्य होत आहेत. पातिव्रत्य हे सगळ्या जगातल्या लोकांचे सनातन मूल्य होते. विधवाविवाह आणि घटस्फोट या दोन कायद्यांच्या धक्क्याने ते शबल होऊन गेले. समता आणि स्वातंत्र्य यांची आपल्याला भूक असते. पण जिथे समता असते तिथे व्यक्तिस्वातंत्र्य हरपते आणि जिथे स्वातंत्र्य असते तिथे समता जीव धरीत नाही, हे आपण पाहतो आणि इतिहासही तेच सांगतो. माणुसकी हा लोकशाहीचा, समानधारणेचा, संस्कृतीचा आधार आहे, असे आपण म्हणतो. माणसे एकमेकांशी माणुसकीने वागतानाही दिसतात. पण कुठवर ? जोवर त्यांचे स्वतःचे हितसंबंध दुखावत नाहीत तोवर ! सध्याची समाजरचना इतकी गुंतागुंतीची आहे की, हे हितसंबंध रेल्वेच्या तिकिट-खिडकीसमोरच्या रांगातल्या माणसांपासून तो सत्तेच्या खुर्चीसमोर आपसात भांडत असलेल्या माणसांच्या रांगांपर्यंत पसरलेले असतात. यात कोण सांभाळणार माणुसकी ? म्हणून तुरुंगात कधीकधी कैद्यांचे डोळे फोडले जातात, कुणाच्या तरी स्वार्थासाठी कमी दर्जाची औषधे वापरणाऱ्या इस्पितळात स्त्रिया, पुरुष, मुले मरतात. पळवलेल्या तरुण मुली वर्षानुवर्षे सापडत नाहीत, तेव्हा आपल्या अर्धमेल्या माणुसकीला 'चालायचंच'

असे म्हणण्यापेक्षा जास्त गहिवर येत नाही. आपली भावनामयी प्रज्ञेतली संवेदना नुसतीच बोथट होत नाही, तर पार मरून जाते.

आजच्या लेखकाला हेच संस्कार किंवा हीच संस्कारहीनता घेऊन लिहिण्यापेक्षा दुसरे भवितव्य राहणार नसेल तर 'जे उन्नत करते ते वाड्मय' ही व्याख्या बदलण्याखेरीज आपल्या हातात दुसरे काही राहणार नाही !

पण आपल्या साहित्याचे असे भवितव्य अटळ आहे असे मानण्याचे कारण नाही लेखकाला इतिहासाचे भान असेल तर मूल्यांच्या पडझडीचा गेल्या वीस पंचवीस वर्षाचा काळ हा आपल्या राष्ट्राच्या गेल्या शंभरसवाशे वर्षातल्या इतिहासाचा केवळ एक चतुर्थांश आहे, हे त्याच्या ध्यानात येईल. इतिहासाचे कालचक्र माणसांना आणि राष्ट्रांना कधी वर तर कधी खाली असे सतत झोके देत असते. अठराव्या शतकाच्या पहिल्या अर्धात इंग्लंडची स्थिती आपल्या आजच्या स्थितीइतकीच भयानक होती. सार्वत्रिक विषयासक्ती, मद्यपान, जुगार, सामाजिक आणि राष्ट्रीय भ्रष्टाचार यांनी शीग गाठली होती जिथे वस्तीच नव्हती अशा भागाचे प्रतिनिधी म्हणून माणसे पार्लमेंटात बसत होती पार्लमेंटचे सभासदत्व पंधराशे पौंडांना विकत मिळे. आज इतिहासकार अचंबा करतात की अशा अवनतीला पोचलेल्या इंग्लंडने पुढच्या केवळ पन्नास वर्षातच इंग्लिश राज्यपद्धती, इंग्रज व्यापारी, इंग्रजी माल, सामान्य इंग्रज माणूस यांच्या नेकीचा, कर्तृत्वाचा, शहाणपणाचा, लौकिक जगभर दुमदुमत ठेवला तो कशामुळे ?

मला एक लहानसे उत्तर सुचते. तुम्हाला कदाचित ती कविकल्पना वाटेल. याच पहिल्या पन्नास वर्षात आणि त्यांच्या आगेमागे डोळयात भरेल अशी इंग्रजी लेखकांची रांगच रांग सतत लिहीत असलेली दिसते आपल्या साध्या, खेळकर पण सुसंस्कृत लेखनाने सामान्य वाचकापर्यंत पोचलेला ॲडिसन, उपरोधाने भल्याभल्यांना कापरे भरविणारा स्विफ्ट आणि पोप कवि, आपल्या विद्वत्तेची जरब बसवणारा आणि शब्दकोश रचणारा जॉन्सन, अर्थशास्त्राचा पाया घालणारा ॲडॅम स्मिथ हे सगळे याच काळातले. प्रसिद्ध तत्त्ववेत्त डेव्हिड ह्यूमही याच वेळचा. याच काळात इंग्लडपासून वीस मैलावर असलेल्या फ्रान्समध्ये व्होल्तेरचे चरित्र घडत होते. त्याचे लिहिणे एका नवीन युगाचा पाया रचीत होते. या लेखकांचे साहित्य वर्षानुवर्षे झिरपत समाजाच्या सगळ्या थरात पोचले आणि त्याने इंग्लिश राष्ट्राच्या कायापालटाला मोलाचे सहाय्य दिल अशी शक्यता आहे

आपल्याकडेही १८५७ च्या समरापासून तो १९४७ मधल्या स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंतच्या महाराष्ट्राच्या इतिहासाचा आपण विचार केला तर सामाजिक आणि राजकीय प्रबोधन घडवून आणण्याच्या कामी साहित्याचे सामर्थ्य किती प्रभावी असते हे आपल्या ध्यानात येईल.

ही नव्वद वर्षे म्हणजे भारताच्या आधुनिक इतिहासाचा एक तेजस्वी अध्याय आहे ह्याच काळात भारतीयांची मूल्यनिष्ठा खंबीर राहिली. त्या निष्ठेच्या बळावरच

भारतीयांनी अभूतपूर्व असे राजकीय पराक्रम करून दाखवले. याच मूल्यनिष्ठेमुळे आपल्या खंडप्राय देशातले निरनिराळे विभाग स्वार्थ विसरले आणि त्यांनी आपल्या संघराज्याचा पाया रचला. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी म्हटले आहे : 'भारताच्या संघराज्याच्या जन्मास ज्या विविध प्रकारच्या चळवळी कारणीभूत झाल्या त्या चळवळीचा एक प्रेरक बिंदू म्हणून आधुनिक मराठी साहित्य जन्मले आहे. आधुनिक काळातील मराठी वाङमयाच्या मुळाशी असलेली एक महत्त्वाची प्रेरणा भारतीय स्वातंत्र्याच्या जन्मास कारण झालेली आहे.' या विधानाची सत्यता लोकहितवादीपासून ते आचार्य विनोबा भावे यांच्यापर्यंत होऊन गेलेल्या प्रज्ञावान साहित्यिकांचे आपण नुसते स्मरण केले तरी पटेल.

पण इतिहासाच्या आशीर्वादावर विसंबून राहणे हे पराक्रमाचे लक्षण नव्हे. मूल्यहीन समाजात आपण एकटेच मूल्यांच्या मागे लागलो तर एकाकी पडू, वेडे ठरू असे भय लेखकाला वाटणे साहजिक आहे. एका लेखकाने म्हटले आहे 'I hate man but I love mankind.' मला माणसाच्या त्याच्या मूल्यहीनतेमुळे तिटकारा वाटतो. पण मला मनुष्यजातीबद्दल प्रेम आहे ! मनुष्यजात म्हणजे सध्या तरी मूल्य नसलेल्या माणसांचीच प्रचंड बेरीज ! तरी सुद्धा असा माणूस आणि मनुष्यजात यांत मोठा फरक असतो. एकेकटा माणूस आपल्या जगण्यासाठी धडपडतो. पण मनुष्यात मानववंश, संस्कृती यांचे सातत्य कसे टिकेल याची काळजी वाहात असते. हे सातत्य मूल्यांच्या जपणुकीवरच उभारलेले आहे याचे शहाणपण तिला असते — म्हणून नाटक बघणाऱ्या प्रेक्षकांची गर्दी रंगभूमीवरच्या नायकाच्या निष्ठेला, पराक्रमाला, उच्च मूल्ये जपण्यासाठी तो करीत असलेल्या त्यागाला उत्स्फूर्तपणे दाद देते—व्यक्तिशः त्यातल्या प्रत्येक प्रेक्षकाने घरीदारी नीतिमत्तेची चाड बाळगली नसली तरीही !

मागच्या काळात मूल्यांची जी यथासांग पूजा समाजात आणि साहित्यात होत असताना दिसे तिची उपकरणे, साधने आज हरवली-नाहीशी झालेली दिसत असली तरी माणसांच्या मनात त्या पूजेचे मंत्र मधून मधून उमटतातच. जागरूक लेखकाला या मंत्रांचे पडसाद, हलक्या आवाजात का होईना सगळीकडे ऐकू येतील. अलीकडेच एका स्नेह्याच्या आग्रहाखातर मी गिरगावतल्या एका साधुपुरुषाच्या मठात गेलो होतो. मठ, मंदिरे यांचे मला विशेष अप्रूप नाही. पण त्या जागेत थोडा वेळ थांबल्यावर माझा शीण कमी होतो आहे, मनावरचे ताण सैल पडताहेत असा मला भास होऊ लागला. म्हणून मी मठाविषयी चौकशी केली. त्या साधुपुरुषाचा तो मठ भोवताली राहणाऱ्या नायकिणीनी आपल्या कमाईतून बांधला होता ! जीवनातली सगळी मूल्ये परिस्थितीमुळे गमावून बसलेल्या पतित स्त्रियांना त्या मूल्यांची आठवण ठेवणारी वास्तू बांधण्याची बुद्धी होते तर सध्याच्या परिस्थितीमुळे आपली प्रतिभा कोळपू न देता ज्यात अशा मूल्यांचे दर्शन-जतन होईल असे ग्रंथ लिहिण्याची स्फूर्ती आजच्या लेखकाला का मिळू नये ?

सुदैवाने या मूल्यांचे भजनकीर्तन मराठी भाषेत शतकानुशतके चालत आले आहे. हा वारसा देणाऱ्या आपल्या भाषेला आपण सध्या किती जागरूकपणे जपतो आहोत ?

शासनव्यवहारात मराठीचा वापर ऐंशी टक्क्यापर्यंत वाढला आहे असे म्हणतात. पण हे मराठी समजून घेण्यासाठी मुख्यमंत्र्यांना तिची इंग्रजीत टिपणे करून घ्यावी लागतात ! अशी ही कोणती नवीन मराठी भाषा असेल ? लोकांशी जवळीक वाढावी म्हणून मराठीचा वापर वाढतो आहे. पण जी भाषा शासकांनाच कळत नाही ती लोकांना कशी कळणार ? दुर्बोध भाषेचा हा प्रश्न हसण्यावारी नेण्यासारखा नाही. शासनाप्रमाणेच न्यायालयाशीही सामान्य माणसाचा जिव्हाळ्याचा संबंध येतो. तिथे तर तो जवळ जवळ अंधारातच चाचपडत राहतो. कारण तिथला व्यवहार त्याला मुळीच न कळणाऱ्या इंग्रजीत ! खरे म्हणजे, समजेल अशा भाषेत न्यायदान झाले तर नागरिकांना निर्धास्त वाटते. न्यायसंस्थेवर श्रद्धा राहते, लोकशाहीला बळ येते. पण सगळ्यांच्या मते कायद्याचे सामर्थ्य पेलण्याची शक्ती इंग्रजी भाषेला आहे तशी मराठीला नाही. इंग्रजीलाही हे सामर्थ्य एका रात्रीत लाभलेले नाही, इकडे आपले लक्ष जात नाही. इंग्रजी कायदेपंडितांच्या अनेक पिढ्यांत विदग्ध वाङमयाचे विद्यार्थी, समर्थ लेखक, भाषाप्रभू होऊन गेलेले दिसतात. त्यांच्या श्रमांनी कमावलेली भाषा साहजिकच आज इंग्रजी न्यायसंस्थेचा आधार होऊन बसली आहे.

नुसत्या न्यायालयातच नव्हे, आपल्या समाजातही अजून इंग्रजीला मोठी प्रतिष्ठा आहे त्यामुळे खेड्यापाड्यातूनही इंग्रजी माध्यमाच्या शाळा झपाट्याने वाढत आहेत आणि त्यात शिक्षण घेण्यासाठी, अनेक अडचणी मोसूनही, मुलांची गर्दी उसळते आहे. पण तिथे मिळणाऱ्या इंग्रजी शिक्षणाचा दर्जा काय आहे ? अशाच एका शाळेतल्या शिक्षकाने 'मी बैल बांधतो' या वाक्याचे इंग्रजी भाषांतर 'आय बिल्ड बुलॉक्स' असे करून मुलांना सांगितलेले मी पाहिले ! त्या बिचाऱ्याला तरी का हसायचे ? इंग्रजीचा अभ्यास महाराष्ट्रात दीडशे वर्षे तरी चालू आहे. पण सगळ्या भारतीयांना कौतुक वाटेल असे इंग्रजी वक्ते, लेखक, संपादक आपल्याकडे पूर्वी किती झाले ? आताही किती आहेत ?

इंग्रजीमुळे तांत्रिक शिक्षण सुलभ जाते हे तिचे एक आकर्षण. द्रव्यार्जनासाठी तांत्रिक शिक्षण जास्त उपयुक्त. त्यामुळे तशा शिक्षणासाठी पडेल ती किंमत देऊन मुले धाव घेत असतात. ही मुले साहजिकच वाङमय, इतिहास, अर्थशास्त्र, मानसशास्त्र अशा सांस्कृतिक विषयांच्या संस्कारांना पारखी होतात. समाजात केवळ तंत्रज्ञांचाच बेसुमार भरणा झाला, तर संस्कृतीची जपणूक कितपत चालू राहील, हा विचार जाणत्या पालकांनाही सुचत नाही

एकंदरीनेच आपले विचार आणि वर्तन यांतली विसंगती वाढत असलेली दिसते. सरकार म्हणते, सार्वजनिक आणि खाजगी या दोन्ही क्षेत्रांत उद्योगधंदे हवेत.

पाठ्यपुस्तके तयार करणे हा एक सरकारी उद्योग. पण त्या क्षेत्रात जाणत्या खाजगी माणसांना काम करायला वाव नाही. साक्षरता खूप वाढते आहे, असे आम्ही म्हणतो. पण निरक्षरता कमी झालेली नाही असे दिसले, की आम्ही वाढत्या लोकसंख्येची सबब सांगून मोकळे होतो ! सगळ्यात मोठी विसंगती म्हणजे आपले राज्य मराठी आहे; पण त्याच्या राजधानीचे नावच इंग्रजी आहे ! ते 'मुंबई' करायचे नाही, कारण त्यामुळे इतर भाषकांची मने दुखावतील, आपल्या भारतीय एकात्मतेला तडे जातील इतर भाषकांच्या संस्कृतीचा 'बॉम्बे' या इंग्रजी नावाशी काही संबंध नाही. त्यामुळे ते का दुखावतात हेही कळत नाही. सोईचे असेल त्याचे समर्थन करण्यात माणसे नेहमीच वाकबगार असतात एकदा कुटुंबनियोजन खात्यातल्या एका मोठ्या अधिकाऱ्याची आठ मुलं बघून मी चकित झालो. पण तो म्हणाला, 'काय करावे ? आईने बायकोला आशीर्वाद दिला, 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव !' बायको म्हणाली, 'सरकारचे आधी ऐकायचे की सासूबाईचे ?'

या बॉम्बे-मुंबई प्रकरणात आपल्या शासनाची वृत्ती मराठीच्या बाबतीत प्रत्येक वेळी द्विधा तर होत नसेल ? भाषा विकास पावते, पराक्रम गाजवते ते राजकीय सत्तेच्या नि:शंक पाठबळामुळे. आपल्या राज्यशासनाने गेल्या पंचवीस वर्षात मराठी भाषेचा यथाशक्ती परामर्श घेतला आहे, हे मान्य करायला हवे. त्यामुळे नव्या हुरूपाचे लेखक पुढे येत आहेत. आजवरच्या कुंपणांपलीकडे धाव घेण्याची त्यांची ईर्षा वाढते आहे. मराठी पुस्तकांची इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, स्पॅनिश अशा युरोपियन भाषांतून भाषांतरे होत आहेत. मराठी नाटके आता युरोप, अमेरिकेत जाऊन सहजपणे खेळ करून येतात. मराठी सिनेमाही लवकरच चौकोरीबाहेर पडेल, अशी लक्षणे दिसत आहेत.

आपल्या शेजारच्या कानडी आणि गुजराथी भाषासुद्धा अशा पराक्रमात मागे नाहीत. भारतीय भाषांत सर्वोत्कृष्ट कामगिरी केल्याबद्दल दरवर्षी दिले जाणारे ज्ञानपीठ पारितोषिक या भाषांनी दोनदोनदा मिळवून दाखवले आहे. या शेजारी भाषाच्या यशाबद्दल, आपला या बाबतीतला उणेपणा विसरूनही, आपण आनंद मानायला हवा. कारण अशा शेजारी भाषा विचार, कल्पना, शब्दसंपत्ती यांची देवाणघेवाण करीत एकमेकींना बळ देत असतात—संगीतापासून तो आपली मराठी अभंगवाणी स्फुरवणाऱ्या कानडी विठ्ठलापर्यंत कर्नाटकी संस्कृतीचे ऋण आपण आजवर आनंदाने घेत आलो आहोत. पण भाषांच्या पराक्रमामुळे या बोलणाऱ्यांचा अभिमान वाढतो आणि त्याचा अतिरेक करून राजकीय डावपेचासाठी त्याचा उपयोग करण्याचा सत्ताकांक्षी माणसांना मोह होतो. त्यातून भांडणे सुरू होतात, वातावरण गढूळ होते, आणखी पराक्रम गाजविण्याची भाषेची शक्ती द्विधा होऊन जाते. भाषाभाषांमधली ही भांडणे आवाक्यात राहतातव असे नाही. सध्या देशात जवळजवळ सगळीकडे अशा भांडणांचा गदारोळ उठतो आहे. काही कलहांचे आत्यंतिक द्वेषात आणि हिंसेतही पर्यवसान झाले आहे. दोन भाषांच्या भांडणामुळे राष्ट्रही दुभंगू शकते हे बांगला देश आणि पाकिस्तान यांचे उदाहरण या

भांडणांत आपण सहज विसरून जातो.

यातच भर म्हणून मराठीत बोलीभाषा, पोटभाषा, प्रमाणभाषा यांच्याबद्दल वाद सुरू झाले आहेत. प्रत्येकाला साहजिकच वाटते, आपली भाषा श्रेष्ठ, आपल्या समाजाचे मनोगत व्यक्त करण्यासाठी उपयुक्त आणि सत्तेवर बसण्याच्या योग्यतेची. हे वाद चर्चेच्या स्तरावर राहतात तोवर हितकर असतात. पण आपल्या समाजव्यवस्थेत अशा प्रश्नात पाहता पाहता राजकारण आणि जातिभेदाच्या जाणिवा सहज मिसळतात. मग अशा आपसातल्या कलहांचा लाभ घेण्याची परक्याला बुद्धी होईल, आपली सत्ताच आपल्या हातून निसटून जाऊ शकेल, याचे भान कुणालाही उरत नाही. हे भय वाटते तितके काल्पनिक नाही, हे आपल्या राष्ट्रपतीनी अलीकडेच मुंबईत जे उद्‌गार काढले त्यावरून दिसेल. एका जाहीर भाषणात ते म्हणाले, 'स्वातंत्र्य टिकेल तर धर्म टिकेल.' धर्म टिकेल याचा अर्थ आपली संस्कृती टिकेल. भाषा टिकेल. राष्ट्रपतीसारख्या श्रेष्ठ राजकीय नेत्याला एकंदर परिस्थितीचे यथार्थ ज्ञान असणार. 'स्वातंत्र्य टिकेल तर—' असे म्हणावेसे वाटण्याइतकी चिंता ज्या अनेक कारणांमुळे त्यांच्या मनात असेल त्यातले एक कारण आपली सध्याची कटोकटीची भाषिक भांडणे हे असावे का ?

याच विचारात असताना अलीकडे मला एक विचित्र स्वप्न पडले. त्या स्वप्नात मला मूर्तिमंत शारदेचे प्रत्यक्ष दर्शन झाले. ती हसतमुख, प्रसन्न दिसत होती. मी आपल्याच विचारात होतो. पण शिष्टाचार म्हणून मी नमस्कार केला आणि विचारले, 'बरी आहेस ना ? आणि आज तुझा मोर दिसत नाही !' तिने सहजपणे उत्तर दिले, 'माहा मोर लेकाचा लई एलून राह्यला व्हता. साजरा घोयल त्याले. मंग घबरावला. पायापोटी लागे म्हून सोळला अन् देल्ला हाकलून !' मी चकित होऊन विचारले, 'अग ही कुठली भाषा बोलते आहेस तू ?' तिने म्हटले, 'मस्न्या. तू वऱ्हाडी. अन् वऱ्हाडी नाई समजत तुले ?' मी खजील झालो. तेव्हा ती हसत सुटली. म्हणाली 'कारे, दुसऱ्यांना बोल लावतोस त्यांच्या बोलण्यावागण्यात मेळ नाही म्हणून —अन् तू काय करतो आहेस ! दुसऱ्यांची मुले इंजिनिअर झाली की मराठी संस्कृती धोक्यात येते नाही का ? अन् तुझा मुलगा तू इंजिनिअर बनवलास, अमेरिकेला धाडलास तो तिथली मराठी संस्कृती संभाळायला होय ! दुटप्पी कुठला !' मुलावरून बोलल्यावर कुणाला राग येणार नाही ? माझे भानच सुटले. मी तिला म्हटले, 'तू तरी काय निराळी आहेस ग ? आत एक, बाहेर दुसरीच !' तिने हसत विचारले, 'म्हणजे कशी ?' मी चेवात येऊन म्हटले, 'बाहेर मिरवतेस, मराठी भाषा अमृतालाही लाजवील अशी गोड आहे— पण तुझं खरं रूप कळलं आहे मला. एका अमेरिकन विदुषीने मराठीचा खूप अभ्यास केला आहे. ती म्हणते, महात्मा गांधीच्या या अहिंसक देशातली मराठी भाषा खूप हिंस्र आहे, भांडखोर, मारकुटी आहे !' मराठी भाषा म्हणते, नाक दाबल्याशिवाय तोंड उघडत नाही. मराठी लोक नुसता दोष देऊन थांबत नाहीत, ते त्या दोषाचे खापर

दुसऱ्याच्या बोडक्यावर फोडतात. राजकारणी लोक एकमेकांच्या पाठीत खंजीर खुपसतात. न्हावी नसलेले लोक दुसऱ्याची बिनपाण्याने हजामत करतात. रोजच्या जगण्यात हे लोक एकमेकांच्या पोटावर पाय देतात. मराठी लिपीतल्या शेंडीफोड्या 'श' या अक्षराचे हे लोक पोट फाडतात आणि त्यांचा पोटफोड्या 'ष' करून टाकतात !

ती खो खो हसत सुटली. तेव्हा तिला चिडवण्यासाठी, मी म्हटले, 'आणखी ऐक. मराठी भाषेने मराठी लोकांना फार खादाड बनविले आहे. मराठी लोक वाट्टेल ते खातात. मार खातात, बोलणी खातात, वेळ खातात, डोकं खातात, दातओठ खातात, पैसे खातात. आणि काही बायका म्हणतात, 'त्यांचे नवरे बाहेर जाऊन शेणसुद्धा खातात !'

मला वाटले, ती खूपच चिडेल. पण ती हसत हसत म्हणाली, 'अरे या मुलीचे माझ्यावर खूप प्रेम दिसते. किती गंमतीने खोड्या काढते आहे माझ्या ! दहा हजार मैलांवरून इथे आली. मराठीचा अभ्यास करायला. आणि तू ? वऱ्हाडातून पाचशे मैलांवरच्या मुंबईत आलास लगेच--वऱ्हाडी बोली विसरलास !' मी उत्तर दिले, 'अग विसरतो कसला ? पण ही मुंबईची माणसे वऱ्हाडकरांना मागासलेले समजतात. मी प्रमाणभाषा वापरली की त्यांना मी खूप प्रतिष्ठित वाटतो.' तिने समजाविले. 'अरे, प्रमाणभाषा सुद्धा एका काळी कुणाची तरी बोलीभाषाच असते. हळूहळू ती वाढते, मान्यता पावते. काही काळ प्रमाण होऊन बसते.'

मी आश्चर्याने विचारले, 'काही काळच ?'

तिने शांतपणे म्हटले, 'होय., सातआठशे वर्षे बघते आहे. महानुभावापासून, ज्ञानेश्वरापासून किती अवतार घेतले भाषेने ! सगळे त्या त्या वेळी प्रमाण, आणि मी नुसती बघत नाही आले. सोसत आले, भोगत आले. परचक्रे, आक्रमणे, अंदाधुंदी उलथापालथी सगळ्यांतून स्वत:ला बचावीत आले. स्वातंत्र्यानंतरची गेली चाळीस वर्षे जरा बरे दिवस आले आहेत. तेव्हढे तुम्ही टिकवा. म्हणजे माझे पांग फिटेल !

## संदर्भ :

१. अनुवाद, हिंदी त्रैमासिक, ऑगस्ट १९६६
२. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी : अध्यक्षीय भाषण, अ.भा.म.सा.सं, दिल्ली १९५४
३. जे. कृष्णमूर्ती : शिक्षण : जीवनरहस्य
४. *New York Review of Books,* April 15, Vol. XXXIV, Number 6
५. *Age of Voltaire,* Muriel & Will Durrant
६. मॅक्सिन बर्नसन : भाषा आणि विज्ञान, वर्ष २, अंक १, हिवाळा १९८४
७. दुर्गाबाई भागवत : सत्यम्, शिवम्, सुंदरम्.
*The Lowest Depths : review by E. J. Holyhawn. Our Peasants,*

*Rebels and Outcasts. The Underside of Japan by Mikiso Hane. Pantheon.*

*"Yet other similarities may perhaps reflect both such general human structural patterns and more specific parallels, between Japanese and some other societies. Both Japan and Pre-Industrial Europe contain mild versions of caste structures, generally neglected by historians, by which certain occupations are classified as outcasts on the grounds of their 'impurity' (the inferiority of women is also usually justified on such ground.) As Hane's chapter on 'burakumin' (Japanese word) shows, these polluted occupations are very much the same in Japan as in Europe, those dealing with materials derived from dead animals, (e.g. skin & leather) sweepers, certain entertainess and occupational vagrants, also low level policemen, prison guards and executioners."*

# ठाणे : १९८८

# प्रा. वसंत कानेटकर

---

रसिक मित्रहो,

एकसष्टाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी महामंडळाच्या मतदारांनी बहुमताने मला निवडून दिले, याबद्दल मी त्यांचा मन:पूर्वक आभारी आहे. या निवडणुकीसाठी ज्या मित्रांनी मला प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष मदत केली, त्यांचाही मी फार ऋणी आहे. या सर्वांपेक्षा महाराष्ट्र साहित्य परिषदेची ठाणे येथील शाखा, तिच्या पाठीशी उभी राहणारी ठाणे नगरपालिका आणि त्यांचे उत्साही नेतृत्व करणारे तडफदार कल्पक महापौर आणि या संमेलनाचे स्वागताध्यक्ष वसंतराव डावखरे, या सर्वांचा तर मी फारच ऋणी आणि आभारी आहे. त्याचं कारण काय ते सांगायला हवं.

गंमत अशी झाली, की या साहित्य संमेलनसुंदरीला पाहून कोणी एक श्रीमंत नगरसम्राट तिच्या प्रेमात पडले. त्यांनी अतिउत्साहाने, अगदी साखरपेरणी करून महामंडळाकडे तिला मागणी घातली. 'स्थळ' बरे आहे असे पाहून संमेलनसुंदरीच्या मातापिता महामंडळाने सोयरीक पक्की केली. पण मग विवाहमोहळा जवळ आला तशी सम्राटांची लहर फिरली आणि त्यांनी विश्वामित्राच्या आविर्भावात या संमेलनसुंदरीकडे पाठ फिरवली. त्यामुळे बिचाऱ्या संमेलनसुंदरीची 'ना गाव, ना घर, ना धनी' अशी अवस्था झाली. अशा अशातच निवडणुकीचे बाळंतपण सुखरूप पार पडून अध्यक्षमहाराजही जन्माला आले. त्याबरोबर कोणत्याही सोहोळ्याचे वांगे भाजण्यासाठी सदैव आतूर असलेल्या काही शेकोटीबहाद्दरांनी, ही निवडणक विधिपूर्वक संमत्रक झालेली नसल्याचा पुकारा करून, खुद्द अध्यक्षमहाराजच 'औरस की अनौरस' असा वाद पेटवून दिला. असा सर्व बाजूंनी बाका वक्त गुदरला असता, शिलेदार ठाणेश्वरमहाराज नाट्यमयरीतीने ताडकन् उडी मारून पुढे आले आणि 'कर हा करी धरिला शुभांगी' असे म्हणत त्यांनी या संमेलनसुंदरीला अध्यक्षासकट पदरात घेतले. नुसते 'पदरात घेतले' एवढेच नव्हे, तर या सुंदरीचा सगळा 'संसारप्रपंच' नवविवाहिताच्या उत्साहाने मांडायची त्यांनी तयारी दाखवली. रसिक मित्रहो, त्यामुळे आपण आज इथे ठाणेकरांचा पाहुणचार घेण्यासाठी जमलो आहोत. तर मग मी ठाणेकर जनताजनार्दन महाराजांना लाखलाख दुवा दिला तर त्यात नवल काय आहे ?

वास्तविक या सबंध प्रकरणात तसे फारसे नवीन असे काही घडले नाही. कारण साहित्य संमेलनाच्या नौबती झडल्या, की अध्यक्षीय उमेदवारांत लठ्ठालठ्ठी, त्यांच्या पाठीराख्यांची राजकारणे, प्रचाराचा धुमधडाका, वृत्तपत्रांना चमचमीत बातम्या आणि तमाम जनतेची भरपूर फुकट करमणूक— हे समीकरण आता ठरून गेले आहे. कारण निवडणूक म्हटली की राजकारण आले, प्रचार आला, रणधुमाळी आली, प्रसिद्धी आली आणि शत्रुत्वदेखील आले. गेल्या पाऊण शतकात समाजजीवनात ते गाजरगवत पेरले गेले त्यांचीच ही विषारी फुले आहेत. एखादा जेष्ठ ग्रंथकार कितीही विद्वान वा केवढ्याही थोर प्रतिभेचा असो, भले तो एक अगदी व्यास वाल्मिकी असो, त्याच्या सगळ्या प्रतिष्ठेचे पाच पाट काढून त्याची जाहीर धिंड काढायची असेल तर फक्त हरप्रयत्नाने त्याला अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय निवडणुकीला उभे राहण्यास भाग पाडावे. त्याने एकदा संमतीपत्र लिहून दिले की आपोआप त्याचे सगळे धिंडवडे निघून, रसिकांच्या हृदयसिंहासनावरून खेचून, फरफटत नेऊन तो आपसूक धुळीत भिरकावला जातो. जुन्या पिढीतल्या फडके, खांडेकर, अत्रे, माडखोलकर यांना हा अनुभव चुकला नाही की आजच्या काळातील प्रभाकर पाध्ये वा कविवर्य बोरकर यांनाही हा प्रत्यय टाळता आला नाही. शिवाय निवडणुकीला उभे राहणाऱ्या प्रतिस्पर्धी उमेदवारांशी शत्रुत्व ही देणगी त्यांना मिळते ती निराळीच. मला तर वाटते की ही अध्यक्षीय निवडणूक म्हणजे साहित्यिकांची अप्रतिष्ठा करून, मित्रांचे बघता बघता शत्रू करण्याचीच एक लोकमनरंजनकारी यंत्रणा आहे. या यंत्रणेचा एकच मंत्र असावा. भले साहित्य संस्थांची अब्रू वेशीवर टांगली जात असेल, भले मराठी माणसांच्या भांडखोरपणाचे झेंडे अटकेपार फडकले जात असतील, भले संबंधित साहित्यिकांना तीव्र मनस्ताप आणि अप्रतिष्ठा सोसावी लागत असेल, पण लोकांची करमणूक घडतेय ना ? बास झाले. पुढचे पुढे बघून घेतील.

हा सगळा प्रकार पाहिला म्हणजे मला रोमन साम्राज्यकालीन 'ग्लॅडीएटोरियल शो'ची आठवण होते. प्रेक्षकांच्या करमणुकीसाठी एका हौद्यात काही कैद्यांवर भुकेले सिंह सोडून, माणसांना ते कसे फाडून खातात हे बघणे, वा दोन गुलामांना शस्त्रे देऊन 'मरीन वा मारीन' असे द्वंद्वयुद्ध खेळायला लावणे, हा त्या काळी प्रजाजनांचा एक करमणुकीचा प्रकार होता. मराठी साहित्य संमेलनाची अध्यक्षीय निवडणूक, लक्षणार्थाने तरी याच जातीची झाली आहे, हे प्रतिवर्षी या निवडणूक प्रकाराला जी नवी नवी गळवे फुटताहेत, त्यावरून म्हणावेसे वाटते. दोन वर्षापूर्वी साहित्य संमेलनाची निवडणूक कोर्टदरबारात अडकून पडली होती. या वर्षी तो प्रकार झालाच नसता असे नाही. पण त्याची उणीव, यजमान शहराने संमेलन भरण्यास दिलेला नकार, महामंडळाच्या घटक संस्थांतील जाहीर भांडणे, आणि महामंडळाच्या अध्यक्षांचे त्यागपत्र यासारख्या काही अभूतपूर्व घटनांनी भरून काढली आहे. प्रश्न असा आहे की या परिस्थितीत आपण

काही बदल करणार आहोत की न्या. रानडे आणि लोकहितवादी यांनी एकशे दहा वर्षापूर्वी सुरू केलेली ही साहित्य संमेलनाची चळवळ आपल्या करंटेपणामुळे आपण मरू देणार आहोत ?

## 'निवडणूक' नको, 'निवड' व्हावी

अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद हा जर मराठी रसिकांनी मराठी साहित्यकाराला दिलेला एक सर्वोच्च बहुमान असेल-आणि तो आहेच म्हणूनही, या पदावर सर्वश्रेष्ठ साहित्यकाराची 'निवड'च झाली पाहिजे. मी **निवड झाली पाहिजे** असं म्हणतो आहे. कारण लोकशाहीचे गोडवे कितीही गायले तरी 'निवडणुकीच्या दाराने' गुणवान माणूसच निवडून येईल याची आज तरी शाश्वती नाही. लटपट्यांच्या खटपटीलाच यश येण्याच्या या काळात, खरी गुणवान माणसे निवडणुकीला उभी राहण्याच्या फंदात पडणारही नाहीत. म्हणून जिथे सत्तेचा वा संपत्तीचा प्रश्नच नाही अशा साहित्य संमेलनासारख्या वैचारिक चळवळीचे नेतृत्व करणारा अध्यक्ष, **निवडून नव्हे** तर **निवड होऊनच** अध्यक्षपदी विराजमान होणे जरूर आहे. त्यासाठी अर्ज नको, संमतीपत्र नको वा प्रचारही नको. ज्येष्ठ आणि श्रेष्ठ साहित्यकारांना महामंडळाकडून मिळावे ते साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद स्वीकारण्याबद्दलचे सन्मानपूर्वक निमंत्रणपत्रच. जे विभागीय साहित्य संमेलनात सहजतेने घडते ते अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाबद्दल का घडू नये ? सुदैवाने महामंडळाच्या कार्यकारिणीवर मुंबई, पुणे, नागपूर, हैदराबाद, गोवा, मध्यप्रदेश, मराठवाडा, कर्नाटक या सगळ्या विभागांना पुरेपूर प्रतिनिधित्व मिळाले आहे. त्यांच्यात पूर्वाध्यक्ष मिळवले तर एक समर्थ समिती निर्माण होईल. प्रतिवर्षी या समितीने एका बैठकीत खल करून त्या वर्षीच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षाची निवड करावी, हा अगदी साधा, सरळ, सुटसुटीत आणि कमी वादंग निर्माण करणारा पर्याय आहे. निवडणूकच रद्द झाल्यावर पुष्कळसे अपप्रकार आणि तंटेबखेडे यातली हवाच काढून घेतल्यासारखी होईल. म्हणून महामंडळाला माझी अशी कळकळीची विनंती आहे की, घटनेत बदल करून आणि निवडणुकीची प्रथा रद्द करून त्यांनी स्वतःची आणि साहित्यिकांची प्रतिष्ठा सांभाळावी. अर्थात भांडखोरपणाचा वांशिक वारसा मिळालेली आपण मराठी मंडळी 'जाऊ तिथे भांडू' हेही खरे असल्याने, अध्यक्षांची निवड, अगदी गुण्यागोविंदाने पार पडेल अशा भ्रमात मी नाही. पण भांडून भांडून थकल्यावर, आपला आब राखण्यासाठी तरी शहाणपणाला शरण जाण्याची गौडी रीती, आपल्याला अगदीच नवीन आहे असे नाही. माझ्या मनात अशी शंका येते की संमेलन संबंधितांना वेडेपणातून मुक्त करण्यासाठी तर ठाणेकर मंडळींनी इतक्या तातडीने हे साहित्य संमेलन स्वीकारले नसेल ?

## 'श्री स्थानक' ते ठाणे

तसे असेल तर सर्वसामान्य माणसाच्या मनातल्या 'ठाणे' शहराबद्दलच्या समज-अपसमजांना ते धरूनच होईल. पण नाशिक म्हणजे जसे केवळ उत्तरक्रिया करण्याचे भिक्षुकी तीर्थक्षेत्र नव्हे, तसेच ठाणे म्हणजे केवळ वेड्यांना शहाणे करून सोडणारे रुग्णसेवाग्राम नाही. ठाणे शहराला फार मोठी ऐतिहासिक परंपरा आणि साहित्य-कला-क्रीडांचा फार मोठा सांस्कृतिक वारसा मिळालेला आहे. दहाव्या शतकाच्या अखेरीला ठाणे ही कोकणची राजधानी होती. मूळचे नाव श्रीस्थानक. ते उत्क्रांत होत ठाणे झाले. चालुक्य, सातवाहन आणि शिलाहार घराण्यांच्या काळात या शहराला महत्त्व आले. फार प्राचीन काळापासून ठाणे हे दळणवळणाचे नाके होते. ठाण्याची खाडी किनारीचा किल्ला, ठाण्यातली तळी आणि मंदिरे यांनाही मोठा इतिहास आहे. या किल्ल्यातच काही काळ वासुदेव बळवंतांना आणि स्वातंत्र्यवीर सावरकरांना बंदिवान म्हणून ठेवण्यात आले होते. ठाण्याची नगरपालिका १८६२ साली तर ठाण्याचे प्रख्यात मराठी ग्रंथसंग्रहालय १८९४ मध्ये स्थापन झाले होते. वृत्तपत्रांच्या इतिहासात 'अरुणोदय' आणि मराठीतले पहिले व्यंगपत्र 'हिंदू पंच' यांची कामगिरी संस्मरणीय आहे. अरुणोदयाच्या जोडीला आजही इथे 'ठाणे वैभव', 'सन्मित्र' आणि 'कोकण सकाळ' ही वृत्तपत्रे आपला स्वतंत्र ठसा उमटवीत आहेत. या ठाणे शहरानेच मुंबईच्या 'लोकसत्ता' या वृत्तपत्राला माधवराव गडकरीच्या सारखा एक रसिक, झुंजार आणि विचारवंत पत्रकार संपादक मिळवून दिला. त्यांच्या जोडीला घराघरात ज्यांची गीते रसिकतेने ऐकली गायली जाताहेत ते कविश्रेष्ठ पी. सावळाराम, तसेच नटश्रेष्ठ मामा पेंडसे, गायक पंडित राम मराठे यांसारख्या मातब्बर कलाकारांचे इथे वास्तव्य आहे. माझे परमस्नेही आणि ठाणे येथील म. सा. परिषदेची शाखा स्थापन करणारे, साहित्यिक आणि शैक्षणिक चळवळीचे एक तडफदार कार्यकर्ते, कै. प्रा. म. वि. फाटक हे सुद्धा सेवानिवृत्तीनंतर इथेच राहात असत. त्यांच्याच प्रेरणेमुळे आणि प्रयत्नामुळे मी आज या अध्यक्षपदावर उभा आहे. ज्याचा उभ्या भारताला अभिमान वाटावा असे 'गडकरी रंगायतन' हे नाट्यगृह आणि आपण जिथे संमेलनासाठी जमलो आहोत ते हे 'दादोजी कोंडदेव मैदान' म्हणजे तर आधुनिक ठाणे शहराची वैभवशाली अस्मिता आहे. मुंबईसारखी एक प्रचंड महानगरी जवळ असूनही ठाणे शहराने आपला स्वतंत्र, चमकदार, तरतरीत चेहरा आणि चैतन्यशील आत्मा मोठ्या जिद्दीने जपला आहे, ही खरोखरच कौतुकाची गोष्ट आहे. या जिद्दीमुळेच, एक विभागीय संमेलन संपून सहा महिने उलटले नाहीत तोच ठाणेकर मंडळींनी, एका नगराने वाटेतच सोडून दिलेली अ. भा. मराठी साहित्य संमेलनाची पालखी उचलण्यासाठी सर्वस्व पणाला लावून पुढे धावून यावे, ही मराठी संमेलनाच्या इतिहासातील एक अभूतपूर्व गौरवास्पद घटना मानली पाहिजे. साहित्य संमेलने भरवण्याची गरज काय, असा प्रश्न विचारणाऱ्या

विद्वानांना ठाणेकरांनी प्रत्यक्ष कृतीनेच चोख उत्तर दिले आहे.

## साहित्य संमेलन कशासाठी ?

साहित्य संमेलन कशासाठी, हा प्रश्न ब्रिटिशांच्या काळात भारतातील त्या वेळच्या अॅंग्लो- इंडियन वृत्तपत्रांनी विचारावा हे समजण्यासारखे आहे. पण काही विचारवंतांनी आज तो उपस्थित करावा हे आश्चर्यजनक आहे. 'साहित्य संमेलन' ही एक ग्रंथकारांची साहित्यविषयक 'चळवळ आहे. 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' या नावाने १८७८ साली न्या. रानडे आणि लोकहितवादी यांच्या प्रेरणेने आणि प्रयत्नाने ग्रथकारांचे पहिले संमेलन पुण्याला ११ मे रोजी भरले होते. या संमेलनाबद्दल पुढे जे वृत्तान्त छापून आले होते त्यातील काही गोष्टी तर फारच मजेशीर आहेत. पहिली, म्हणजे पत्रे पाठवूनही फारच थोडे ग्रंथकार या संमेलनाला जातीने उपस्थित राहिले होते. जे आले होते त्यांनी 'आमची सरबराई योग्य रीतीने झाली नाही' अशा पुढे तक्रारी केल्या. तात्पर्य इतकेच की उद्या 'आमची व्यवस्था नीट लागली नाही' म्हणून तणतणत कोणी पाहुणे संमेलनचालकांच्याकडे आलेच, तर त्यांनी मनात एवढेच समजावे, की हा एकशेदहा वर्षांचा वारसा बोलतो आहे आणि त्यांनी पाहुण्यांना माफ करावे. पहिल्या संमेलनानंतर अनेकांनी शंका काढल्या की असल्या संमेलनामुळे काहीही फायदा होणार नाही. युरोप-अमेरिकेत अशी संमेलने कोणी भरवीत नाहीत. फार तर दोनचार वर्षे तिची टिमकी वाजेल आणि मग तिचे स्मरणदेखील कोणास होणार नाही. या सगळ्या शंकेखोरांना न्या. रानडे यांनी त्याच संमेलनात चपखल उत्तर देऊन टाकले आहे. ते म्हणाले, 'भारतासारख्या मागासलेल्या देशाची तुलना युरोप-अमेरिकेबरोबर करणे बरोबर नाही. एखादी संस्था निघून पुढे ती लयाला गेली तरी तिचा समाजाला उपयोग आहेच आहे.'

खरी गोष्ट अशी आहे की, न्या. रानडे आणि लोकहितवादी यांनी स्थापन केलेल्या साहित्य संमेलन आणि सामाजिक परिषद, तसेच लोकमान्यांनी सुरू केलेल्या गणेशोत्सव आणि शिवाजी उत्सव, या संस्था म्हणजे सर्वांगांनी मृतप्राय झालेल्या समाजाला जागृती आणण्यासाठी या मातीतून निर्माण झालेल्या चळवळी आहेत. कालमानाप्रमाणे समाजाची बरी वाईट स्थिती या उत्सवी चळवळीत प्रतिबिंबित होणे अगदी अपरिहार्यच आहे. या चळवळीत नव [illegible] कार्यक्रम वा नवे विचार आणून त्यांचे रंगरूप पालटण्याचीही गरज निर्माण होणे अटळच आहे. पण एखादे चित्रपटगृह वा उपाहारगृह बंद करून टाकावे तितके सहजपणे बंद करता येण्यासारखे हे काही धंदेवाईक उपक्रम नाहीत. समाजाची एकूण नैसर्गिक प्रवृत्ती आणि प्रकृती शिलावस्थेकडे *जाण्याचीच असते असे ऑगस्ट कौट म्हणतो. अजगरासारखा समाज जड आणि* चेतनाहीन होत असतो. त्याग, पराक्रम, ज्ञानसाधना, नीती या गुणांचा ऱ्हास होत सगळ्या क्षेत्रांत भ्रष्टाचार, दंभ, स्वार्थ, क्रौर्य, क्षुद्रपणा माजू लागतो. **खाणे, पिणे**

**आणि विणे एवढ्या तीनच प्रेरणा** या समाजरूपी अजगराच्या अंगी उरतात. अशा वेळी समाजाचे स्वातंत्र्य लोप पावून तो कोठल्यातरी प्रबल सत्तेचा दास होण्याशिवाय त्याला गत्यंतरच उरत नाही. इ. स. १८१८ साली पेशवाईच्या अखेरीस हीच सामाजिक अवकळा निर्माण झाली तेव्हा ईस्ट इंडियासारख्या एका व्यापारी कंपनीने भारतात आपले साम्राज्य स्थापले. आजही पुन्हा पेशवाईची अखेर आठवावी अशीच चौफेर अवनती कोसळली आहे. भ्रष्टाचाराचा कर्करोग जडला नाही असे शिक्षणापासून सैन्यापर्यंत जीवनाचे एकही क्षेत्र शाबूत उरले नाही. "भारत जिंकणे हा केवळ एक दिवसाचा सवाल आहे. कारण ज्याला विकत घेता येत नाही असा भारतात एकही माणूस नाही." ही माओ त्से तुंगची दर्पोक्ती आणि- "भारताला स्वातंत्र्य देऊ नका. कारण काही वर्षातच तेथले भ्रष्ट हरामखोर बदमाश नेते देशाला बाजारात आणून स्वातंत्र्याची वाट लावून टाकतील" ही पंतप्रधान चर्चिलने दिलेली इशारत, आज शब्दशः खरी ठरण्याचा समय आला आहे. रोज वर्तमानपत्र उघडले की हुंडाबळीच्या हृदयद्रावक हकीकती वाचून लोकहितवादी, फुले, आगरकर, कर्वे इ. सामाजिक सुधारकांचे कार्य अवघ्या शंभर वर्षात मातीमोल झाले काय, असा प्रश्न पडतो. आपला समाज रोगग्रस्त आहे यात दुमत होण्याचे कारणच नाही. पण हा रोग प्रामुख्याने सामाजिक आहे जातीयवादाचे थैमान, हुंडाबळी, सती, भ्रष्टाचार ही या रोगाची फक्त लक्षणे आहेत. ज्या समाजात स्वातंत्र्य, समता, न्याय आणि नीती यांची बूज राहात नाही, तो स्वातंत्र्य पेलण्यास अपात्र होतो या वस्तुस्थितीचे भानही कोणास उरले नाही. परिणामी समाजाचे 'समाजपणच' संपुष्टात येणे अटळ झाले. समाजातला 'आपुलकीचा ओलावा' सुकून गेल्यावर फक्त पोटार्थी माणसांची गर्दी तेवढी उरते. 'समाजपण' संपणे हा रक्ताक्षयासारखा विकार आहे. जयप्रकाश नारायणांनी सांगितलेली 'संपूर्ण क्रान्ती' हाच त्यावर एकमेव उपाय आहे.

गेल्या शतकातील अशाच परिस्थितीत उपाय म्हणून इतिहासाचार्य राजवाडे यांनी 'समाजाचे मंडळीकरण' झाले पाहिजे असे प्रतिपादले होते. 'साहित्य संमेलन' हा एक असाच मंडळीकरणाचा प्रयत्न आहे. विचारमंथन आणि प्रबोधन हे अशा संमेलनांचे शस्त्र आणि अस्त्र असते. प्रस्थापिताविरुद्ध बंड ही त्यांची प्रतिज्ञा असते. पोथीनिष्ठा, पोटभरूपणा आणि कर्मठपणा याविरुद्ध त्यांचा लढा असतो. म्हणून अशी संमेलने जितकी जास्त भरत राहतील तितके समाजाच्या हिताचे आहे. आज छोटी छोटी संमेलने जिल्हा वा तालुका पातळीवर भारतात ही एक भली गोष्ट घडते आहे. म्हणून अगदी अलीकडे दलित साहित्यकारांनी स्वतःचे वेगळे साहित्य संमेलन भरवले ही सुद्धा मी एक स्वागतार्ह घटनाच मानतो. मात्र ती 'विद्रोहाच्या' बैठकीवर उभी असली तरी त्यांना 'विद्वेषाची' पार्श्वभूमी असू नये.

[illegible] आताच मी आपल्यापुढे मांडले, त्याबद्दलची [illegible] एखादा झरा फुटून

कारंजे उसळाने तशी दलितांची आत्मवृत्ते, कथा, कविता, कादंबऱ्या उसळून अवघा साहित्याचा परिसर चिंब भिजून गेला आहे दलिताच्या वेदनेला वाचा फुटते आहे. त्या जोडीने स्त्रीमुक्तीची चळवळ उग्र रूप धारण करून साहित्यात प्रगट होते आहे, हेही सुचिन्हच मानले पाहिजे एके काळी 'पण लक्षात कोण घेतो' ही स्त्रियांचे दुःख मांगणारी कादंबरी लिहिणारे हरिभाऊ पुरुष होते तर 'माणुसकीचा गहिवर' रंगवणारे माटे मास्तर हे उच्चवर्णीय होते. पुढे स्त्री दुःखाला वाचा फोडणाऱ्या विभावरी शिरूरकर आल्या माटे मास्तरांच्या भाकिताप्रमाणे तळागाळातले शोषित आता स्वतः बंडखोरीची पताका घेऊन साहित्यनिर्मितीला वाहून घेऊ लागले आहेत मात्र स्त्रीमुक्तीची चळवळ अजून तरी पांढरपेशा स्त्रियांपुरतीच मर्यादित राहिलेली दिसते आहे. पण दलित पुरुष लेखकाच्या पाठोपाठ दलित स्त्रीसुद्धा संतप्त होऊन उठणार आहे आणि तिच्या चाबकाचे फटकारे दलित पुरुषानाही लागल्यावाचून राहणार नाहीत. त्या वेळी दलितांमधतले आजचे 'हरिभाऊ' उद्याच्या दलित 'विभावरी शिरूरकरांचे' स्वागत करतील, अशी आपण आशा करू या दलितांच्या बंडखोरीच्या झपाट्यात आजचे साहित्यशास्त्रही सापडणे अगदी अपरिहार्यच आहे या मथनातून अवघे साहित्यशास्त्र बदलणार आहे की आज वेगळ्या पात्रातून वाहणारा दलित साहित्याचा प्रवाह मूळ साहित्याच्या प्रवाहात मिसळून जाणार आहे, याबद्दल आज काहीही सागणे कठीण आहे. दलित साहित्यकारांना आजचे प्रस्थापित सौंदर्यशास्त्र सर्वथैव नामंजूर आहे. आपले स्वतःचे असे एक वेगळेच सौंदर्यशास्त्र तयार करण्याचा जाहीरनामाच त्यांनी पुकारला आहे. पण कोणतेही 'शास्त्र' हे केवळ विद्रोहातून वा विद्वेषातून जन्माला येऊ शकत नाही. ब्रिटिशांच्या साम्राज्यवादाबद्दल आपल्याला तीव्र संताप आणि तिरस्कार वाटत होता हे खरे असले तरी ब्रिटिश शास्त्रज्ञांचे विविध शास्त्रातले संशोधन आपण नाकारू शकलो आहोत काय ? ललित साहित्याच्या इतिहासातसुद्धा एकेका काळात एकेका सकल्पनेचा प्रभाव असतो अगदी नजीकच्या काळातले उदाहरण द्यायचेच तर बेचाळीसच्या काळातली 'क्रांतीची' संकल्पना वा स्वातंत्र्योत्तर काळातली 'वैफल्याची' संकल्पना. संबंध साहित्यसृष्टी या सकल्पनांनी झपाटली गेली होती. तेव्हाही कुसुमाग्रज आणि फुटकळ 'वादळ, वणवा, अंगार, आग, तुफान' या शब्दांची आतषबाजी करणारे सणसणाटी कवी, किंवा मर्ढेकर आणि वैफल्याचे जागजागी अश्रुविसर्जन करणारे कांगावखोर कवी, यातील तफावत सौंदर्यमीमांसकांना ध्यानात घ्यावीच लागत असे. याचाच अर्थ असा की 'क्रान्ती' वा 'वैफल्य' हे साहित्यकृतीचे **विषय** होते, ती त्याची **मूल्ये** नव्हती. दलित आणि ग्रामीण साहित्याबद्दलही तेच म्हणावे लागेल दलितांचे दुःख वा ग्रामिणांचे अनुभवविश्व हा एक विषय आहे आणि त्याचे **आकलन** आणि **आविष्कार**, यात मीमांसकांना प्रतवारी लावावीच लागेल. ही प्रतवारी लावताना प्रस्थापित सौंदर्यशास्त्राचा त्यांना आधार घ्यावा लागेल, यात मला जराही शंका वाटत नाही.

लेखकाची बांधिलकी त्याच्या व्यक्तिगत अनुभवाशी असते, असेच मला वाटते. पण त्या अनुभवाची मुळे समाजजीवनातच खोलवर रुजलेली असतात, हे विसरून कसे चालेल ? दु:खवेदनेला धरून 'सामाजिक बांधिलकी' महापुराच्या लोंढ्याप्रमाणे साहित्यात कशी घुसते याचे गेल्या दशकातील 'दलित साहित्य' हे मूर्तिमंत उदाहरण आहे. म्हणून मला वाटते की, ज्या न्या. रानड्यांनी पहिले साहित्य संमेलन १८७८ साली पुण्याला भरवले, त्यांनीच नऊ वर्षानंतर १८८७ साली मद्रास कॉंग्रेसच्या अधिवेशनात 'सामाजिक परिषद' स्थापन करावी, हा निव्वळ योगायोग नव्हता. 'साहित्य समेलन' आणि 'सामाजिक परिषद' या दोन सस्था, म्हणजे सख्खा बहिणी आहेत.

## साहित्य संमेलन आणि सामाजिक परिषद

साहित्य संमेलनाची सुरुवात १८७८ साली झाली असली तरी महाराष्ट्र साहित्य परिषदेची स्थापना होण्यास १९०६ साल उगवावे लागले. या काळात ग्रंथकार मंडळीची तीन संमेलने कशीबशी भरून पार पडली. १९०६ सालच्या संमेलनात परिषदेची रीतसर स्थापना झाली. तिला साठ सभासद मिळाले वा. गो. आपटे, वि. ल. भावे, कृ. प्र. खाडिलकर हे तिघे चिटणीस म्हणून नेमले गेले खुद्द लोकमान्य टिळक या प्रसंगी उपस्थित होते. आपल्या भाषणात लोकमान्य म्हणाले होते की....''केवळ उत्कट इच्छेने कामे होत नसतात, तर कर्ते पुरुष पुढे यावे लागतात.'' साहित्य परिषदेचे कार्य उत्तरोत्तर वाढतच गेले. आता तर ती मराठी साहित्य महामंडळात घटक संस्था म्हणून समाविष्ट झाली आहे. हा सगळा इतिहास मुद्दाम सागण्याचे कारण, हे भाग्य न्या. रानड्यांनीच स्थापन केलेल्या 'सामाजिक परिषदेला' मात्र कधीही लाभले नाही. १८८७ नंतर न्यायमूर्तींच्या हयातीत प्रतिवर्षी सामाजिक परिषदेची अधिवेशने कॉंग्रेसच्या मंडपात अलाहाबाद, मुंबई, कलकत्ता, नागपूर, लाहोर, मद्रास, पुणे इतक्या लांबलांबच्या प्रांतांत भरली. पण न्या. रानड्यांचे १९०१ मधे निधन झाल्यावर या सामाजिक परिषदेला कोणी वालीच उरला नाही. आगरकरांचे निधन त्यांच्या वयाच्या ३९ व्या वर्षीच झाल्याने सामाजिक सुधारणांच्याबद्दल कोणाला पोटतिडीकही उरली नाही. पोटतिडीक उरली नाही एवढेच नव्हे तर सामाजिक सुधारणांच्यामुळे समाजात अप्रियता पत्करावी लागेल या भयाने सामाजिक परिषद ही जहालांच्या काळात कॉंग्रेसच्या मंडपातून अक्षरश: पिटाळली गेली. भारताला स्वातंत्र्य मिळाले की सामाजिक सुधारणा आपोआप होतील असे प्रतिपादले जाऊ लागले. आर्थिक विकास झाला की सामाजिक विकासही आपोआप होईल असेही राजकारणी म्हणू लागले. पण तसे काहीही घडले नाही. भ्रष्टाचारामुळे राजकारण नासले आणि राजकारणामुळे समाजकारणही नासून टाकले अशी स्वातंत्र्योत्तर काळात परिस्थिती निर्माण झाली. नवी आव्हाने पेलण्यासाठी नवा माणूस घडणे जरूर होते. सामाजिक परिषदेचीच इतिश्री झाल्याने जुने संपल्यासारखे

वाटणारे प्रश्न पुन्हा नव्याने उभे राहू लागले. जातीयता, हुंडाबळी आणि सती ही त्याचीच उदाहरणे आहेत. प्रश्नांची राजकीय, सामाजिक आणि आर्थिक अशा प्रकारची विभागणी करून त्यातील एका अंगाकडे संपूर्ण दुर्लक्ष करणे हा काही समाज घडवण्याचा मार्ग नाही. न्यायमूर्तींनी एका अधिवेशनात या संबंधात एक सुंदर विचार सांगितला आहे. ते म्हणतात की 'राजकारण, समाजकारण आणि अर्थकारण ही परस्परावलंबी आहेत आणि तो निसर्गाचाच नियम आहे. माणसाच्या शरीरात दोष निर्माण झाला तर सबंध शरीरावरच उपाययोजना करावी लागते. केवळ हातालाच ताप आला आहे वा हृदयच कमजोर झाले आहे म्हणून त्या त्या अवयवावर इलाज करून कसे भागेल ? म्हणून केवळ राजकीय क्रांतीसाठी जो नेता सामाजिक क्रांतीकडे दुर्लक्ष करतो वा उपेक्षेने बघतो, तो खऱ्या अर्थाने कोणतीच क्रांती पार पाडू शकत नाही.' स्वातंत्र्योत्तर काळात सामाजिक परिषदेची अवघी तीन अधिवेशने भरली. तीही काही धडाडीच्या कार्यकर्त्यांच्या तळमळीमुळे. अलीकडेच निफाड येथे न्या. रानड्यांनी स्थापन केलेल्या 'सामाजिक परिषदे'चा शताब्दी महोत्सव काही विचारवंत आणि कार्यकर्ते यांच्या धडपडीमुळे आणि उत्साही सहकार्यामुळे सुरेख रीतीने पार पडला. पण तेवढ्याने काय होणार आहे ? सामाजिक परिषद ही प्रतिवर्षी जागोजागी भरली पाहिजे. त्यासाठी साहित्य संमेलनाला जसा मराठी साहित्य महामंडळाचा भक्कम आधार मिळाला आहे, तसाच तो सामाजिक परिषदेलाही मिळायला पाहिजे. एवढ्यासाठी मराठी साहित्य महामंडळाला माझी अशी विनंती आहे की, आणखी काही वर्षे तरी महामंडळाने ही सामाजिक परिषद दत्तक घ्यावी आणि प्रतिवर्षी साहित्य संमेलनाला जोडूनच त्याच मंडपाखाली स्वतंत्र अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली सामाजिक परिषदेचेही अधिवेशन भरवावे. राजकारण्यांच्या छत्राखालून घालवून दिलेल्या या वनवासी सामाजिक परिषदेला साहित्य संमेलनाने आपल्या पंखाखाली घेण्यात केवढे औचित्य आहे ते मी आपल्याला स्पष्ट करून सांगावे असे नाही. मतांच्या गठ्ठ्यांशी आणि सत्तेच्या खुर्चीशी बांधलेल्या राजकीय पक्षांना, लोकहिताच्या पण लोकात अप्रिय करण्याचा धोका असलेल्या, कोणत्याही सामाजिक सुधारणांचे, कधीही सोयर-सुतक असणे शक्य नाही. कुठे तरी देवराला येथे एखादी रूपकुवर बळेबळे सती दिली जाते तेव्हा उभा देश ढवळून निघतो. मग काही तळमळीचे तडफदार कार्यकर्ते उभे राहतात आणि पाच पंचवीस वर्षांनी ही सामाजिक परिषद भरवली जाते- हे धोरण काही योग्य नव्हे. परिषद भरवण्यात अधिक सातत्य राहिले पाहिजे आणि गावोगाव, प्रांतोप्रांती तिच्या शाखा निघाल्या पाहिजेत. समाजाची मनोधारणा कोणत्याही क्रांतीला अनुकूल नसतेच. सामाजिक क्रांतीला तर ती नसतेच नसते. त्यातच देवधर्म आणि परंपरा यांचा गुंता झाला असला तर भलीभली माणसं दुराग्रही, हटवादी आणि क्रूरसुद्धा होतात. अंधश्रद्धा, भाविकता आणि भाबडेपणा यांचे समाजाच्या मानेवरील जोखड तसे सहजासहजी निघत नाही

म्हणून सामाजिक परिषदेचा आसूड हा सतत उगारलाच गेला पाहिजे. हे काम साहित्यसेवकांच्याशिवाय तितक्या पोटतिडकीने दुसरे कोण करू शकेल ? 'पण लक्षात कोण घेतो ?' लिहिणारे हरिभाऊ आणि 'शारदा' लिहिणारे देवल हे साहित्यकार तर होतेच पण समाजकारणीही होते. तेव्हा 'समाजकारण' हे दुसरे 'साहित्यकारण' आहे हे ओळखून मराठी साहित्य महामंडळाच्या सदस्यांनी मी केलेल्या सूचनेचा जरूर विचार करावा.

## शिक्षणाचे माध्यम आणि मराठी भाषेचे भवितव्य

समाजाला 'समाजपण' देणारी, म्हणजेच समाजाला आपुलकीच्या प्रेमाने बांधून ठेवणारी जबरदस्त आणि एकमेव शक्ती म्हणजे 'मातृभाषा' होय. डॉ. कालेलकरांच्यासारखे भाषाशास्त्रज्ञ सांगतात की ही शक्ती धर्मात नाही, पंथात नाही, जातीत नाही की शासनसत्तेत नाही. महंमदअल्ली जिनांच्यासारखा कडवा भारतद्वेष्टा आणि पाकिस्तानसारखे जहाल इस्लामी राष्ट्रही, त्या वेळच्या पूर्व पाकिस्तानाला म्हणजेच आजच्या बांगला देशाला, बंगाली भाषेचा त्याग करायला लावून उर्दूचा स्वीकार करायला लावू शकले नाहीत. पाकिस्तान दुभंगले त्यात बांगला देशचे मातृभाषाप्रेम ही एक महत्त्वाची बाब होतीच. भारतातसुद्धा तामिळनाडूसारखी दक्षिणेतली राज्ये राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा स्वीकार करायला का तयार नाहीत, याचा, वेळ जाण्यापूर्वी, दिल्लीश्वरांनी विचार करायला हवा. त्या मानाने मराठी भाषिकांचे मातृभाषा मराठीबद्दलचे प्रेम मुळातच कोमट आहे की काय अशी मला शंका येते. प्रेम हे काही सक्तीने निर्माण करता येत नाही हे तर खरेच. पण मातृभाषेची शिक्षणातील हेळसांड ही अनेक सामाजिक अनर्थांना कारण होऊ शकते याचे भान पालक, शिक्षक आणि शासन, या सर्व स्तरावर सुटलेले आज मला दिसते आहे. भाषाशास्त्रवेत्ते सांगतात, की मातृभाषा ही एकच अशी भाषा असते, की जी मुद्दाम शिकावी वा शिकवावी लागत नाही. आई-वडिलांच्या घरात, भावंडांच्या आणि खेळगड्यांच्या संगीतात मातृभाषा आपोआप शिकली जाते. शालेय जीवनात या भाषाशक्तीचा चौफेर विस्तार होत असतो. केवळ मराठी भाषा आणि साहित्य शिकवणारे शिक्षकच नव्हेत, तर इतिहास, भूगोल, गणित, विविध शास्त्रे बालकांना मराठीतून शिकवणारे शिक्षकसुद्धा पर्यायाने मातृभाषेचेच शिक्षक असतात. शालेय जीवनात मातृभाषेवर उत्तम प्रकारचे स्वामित्व संपादन करणे, ही अन्य भाषा शिकण्याची पूर्वतयारी असते. **या अर्थाने मातृभाषा ही इतर सर्व भाषांना जोडणारा एक महत्त्वाचा पूल आहे.** मातृभाषेतली शैलीदार वळणे, त्यातली सौंदर्यस्थळे आणि सामर्थ्यस्थळे यांची ओळख पटलेला विद्यार्थी, परभाषा शिकताना याच जागा आपोआप हेरू लागतो आणि कालांतराने परभाषेवरही त्याला तितकेच स्वामित्व मिळवता येते. पण लहान बालकांना पहिल्यापासून कॉन्व्हेन्टमध्ये वा इंग्रजी माध्यमाच्या शाळातून घुसवण्याचे वेड जे आज सर्वत्र फैलावले आहे, त्यामुळे आपण कोणत्या अनर्थाला

निमंत्रण देत आहोत याची सुबुद्ध मातापित्यांनाही जाण राहिलेली नाही. इतर भाषांना जोडणारे हे पूल, बांधले जाण्यापूर्वीच मोडून टाकले जात आहेत. जी भाषा घरी वा सवंगड्यांच्या मेळाव्या बोलली जात नाही ती शाळेच्या चार भिंतीत काही तास घालवणाऱ्या बालकांना रडतखडतच शिकणे भाग पडते. त्यांची दयनीय अवस्था तर होतेच, पण विचार करणे, विचार बोलणे आणि विचार लिहिणे यासाठी भाषेबद्दल जो एक आत्मविश्वास असावा लागतो तो या मुलांत कधीच निर्माण होत नाही. आपण भाषा हवी तशी वाकवू शकतो, वळवू शकतो, पेलू शकतो, या आत्मविश्वासामुळे सजृनशीलता वाढते. मातृभाषेच्या माध्यमातून जी मुले हा पूल ओलांडून पुढे जातात, त्यांना मग कोणत्याच भाषेचे भय वाटत नाही. पण सक्तीने ज्या बालकांना कॉन्व्हेंटमधे वा इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घातले जाते ती मुले, वाणी-लेखणीचे सामर्थ्यच गमावून बसतात आणि न्यूनगंडाने पछाडली जातात, परिणामी ती 'बटलरी इंग्लिश' बोलू शकतात आणि मराठी लेखन-वाचनाकडे तुच्छतेने पाहू लागतात अशी मुले हाणून मारून पुढे कदाचित बऱ्यापैकी चाकरी मिळवू शकत असतीलही पण कोणत्याही क्षेत्रात पुढाकार घेऊन धडाडीने नेतृत्व करण्याची त्यांची कुवत मरून जाते. सांस्कृतिकदृष्ट्या ती मराठीपणालाच पारखी होऊन बसतात त्यांना इतिहास-भूगोलाबद्दल प्रेम वाटत नाही आणि मराठी साहित्य त्यांना समजूच शकत नाही 'गड आला पण सिंह गेला' या कादबरीपेक्षा 'ट्रेझर आयलंड'- मधील पात्रे त्यांना जिव्हाळ्याची व जवळची वाटतात. इंग्लिशमधून नऊ दहा वर्षाचा मुलगा जेव्हा शिवाजीमहाराजांचा इतिहास शिकू लागतो तेव्हा महाराजांचा जिरेटोप गळून पडतो आणि त्यांच्या मस्तकावर फेल्ट हॅट घातली जाते असे मला वाटते. असाच एक कॉन्व्हेंटमधे जाणारा माझ्या नात्यातला मुलगा इतिहासाचे इंग्लिश क्रमिक पुस्तक मोठमोठ्याने वाचत होता. त्याच्या वाचनात दोनतीन वेळा 'शिवाजी अॅंड हिज मवालीज' हे शब्द मला ऐकू आले, तशी मी त्याला थांबवून त्याचे पुस्तक घेऊन पाहिले, तर पुस्तकात Mavales असा शब्द होता. ग्रंथकाराला 'मावळे' म्हणायचं होतं, पण कॉन्व्हेंटमधल्या फादरने 'मावळ्यांचे' मवाली करून टाकले आणि मुलेही तेच घोकत बसली. या घटनेचा अन्वयार्थ मी विशद करून सांगण्याची गरज नाही. मातृभाषेचे वाघिणीचे दूध पिऊन भाषाशक्ती बलदंड करण्याच्या वयात मुलांना इंग्लिश वाघिणीच्या तोडात देण्याने, त्यांच्या ग्रहणशक्तीचा कणाच मोडला जातो, हे आमच्या पालकांना कधी कळणार आहे ? इंग्लिश उत्तम येण्यासाठी तरी मातृभाषा म्हणून मराठी उत्तम आली पाहिजे, हा शिक्षणशास्त्राचा सिद्धान्त आहे. अन्यथा बुद्धिमान मुलातून दुसऱ्या आणि तिसऱ्या दर्जाचे नागरिक मात्र निर्माण होत राहतील. महाराष्ट्रात मुंबई आहे, पण मुंबईत महाराष्ट्र आहे का हे आज ज्या अर्थाने विचारले जाते त्याच अर्थाने उद्या महाराष्ट्रात नेटीव्ह माणसे असतील पण इथली 'मराठी माणसे' कुठे नाहीशी झाली, असा प्रश्न विचारण्याची पाळी येईल. श्री. पु. भागवत यांनी एका

*व्यासपीठावरून "मराठी भाषा ही बोली भाषा म्हणून उरणार आहे का ?" असा सवाल केला होता. त्याकडे मराठी माणसांनी पुरेशा गांभीर्याने लक्ष दिलेले नाही. हिंदी आणि इंग्लिशसह मराठी मुलांनी जास्तीत जास्त भाषा जरूर शिकल्या पाहिजेत. पण भाषाशिक्षणाचा प्रारंभ आणि पाया मातृभाषेतच पक्का बांधला पाहिजे याबद्दल दुमत असू शकत नाही.* मराठी मासिके एका पाठोपाठ एक बंद पडत आहेत. प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांचा कस आणि संख्या रोडावत आहे. सरकारी अनुदान आणि ग्रंथालयांना वर्षासन मिळत असल्यामुळेच प्रकाशनाचा व्यवसाय कसाबसा उभा आहे. छापखाने बंद होऊ लागलेच आहेत. कालांतराने पुस्तक प्रकाशनही थांबेल. मग मराठी उरेल ती फक्त घरी बायकामुलांशी वा नोकराचाकरांशी बोलण्यापुरतीच. पुण्यातल्या एका श्रेष्ठ भाषाशास्त्रज्ञाने आपल्या घरात हॉलमध्ये एक पाटीच लावली आहे. त्यावर लिहिले आहे- "आमची मुले मराठी माध्यमातून शिकतात. आपली ?" मला वाटते या प्रश्नातच सगळे सार आले आहे. उत्तरे ज्याची त्यांनी आपल्या मनाशीच द्यावीत.

१९२६ साली पुण्यात भरलेल्या शारदोपासक संमेलनाच्या अध्यक्षपदावरून इतिहासाचार्य राजवाडे यांनी 'मराठी भाषा मुमुर्षू आहे काय ?' या विषयावर बोलताना मराठी भाषिकांना एक झणझणीत कडू डोस दिला होता. त्यात ते म्हणतात की- "काही थोडी सबल दुर्बल वर्तमानपत्रे, लेचीपेची गद्यपद्य पुस्तके, गृह्य व ग्राम्य व्यवहार यात मराठी भाषेचा उपयोग अद्याप आपण करीत आहोत. त्यावरून दिसते की मराठी भाषा अद्याप मेली नसून तिच्यात काही धुगधुगी उरली आहे. परंतु समाजाच्या व्यवहाराचे जे बाकीचे प्रांत, त्यात मराठी भाषेची झाःडून सारी अगे थंडगार पडून गेलेली आहेत...." त्याची उदाहरणे देऊन मीमांसा करीत राजवाडे पुढे निष्कर्षाला येतात की— ...."लवकरच सर्व महाराष्ट्र इंग्रजी भाषा, शुद्ध किंवा अपभ्रष्ट अशी, हॉगकॉगमधील पीज्यन इंग्लिशप्रमाणे बोलू लागेल, असा निश्चित अंदाज दिसतो." रसिक मित्रहो, १९२६ साली राजवाड्यांनी वर्तवलेली ही भविष्यवाणी स्वातंत्र्योत्तर कालात आपण आपल्या करंटेपणाने खरी करून दाखवणार आहोत काय ? खरी गोष्ट अशी आहे की, डॉ. अशोक केळकर म्हणतात त्याप्रमाणे "इंग्लिश भाषा मराठी भाषेपेक्षा प्रगल्भ आहे." याचा खरा अर्थ, इंग्लिश भाषी मराठी भाषियांपेक्षा प्रगल्भ झालेले आहेत. ही प्रगल्भता म्हणजे स्वतःचे नवे विचार, स्वतःच्या हिमतीवर, आपल्या भाषेत समर्थपणे मांडता येण्याची ताकद. याबाबत इंग्लिश भाषियांना त्यांच्या चार शतकांच्या पूर्वजांची तपश्चर्या उपयोगी पडलेली आहे. मराठी भाषीयांच्या पूर्वजांनी सहा-सात शतके मराठीतून स्वतंत्रपणे प्रगल्भ विचार करणे सोडूनच दिले होते. त्यांनी फक्त संस्कृतचे दुभाषेपण केले आणि ब्रिटिशांचा अंमल आल्यानंतर मेकॉलेसाहेबांच्या कृपेने इंग्लिशच्या दुभाषेपणाची त्यात भर पडली. हे सगळे सागूंन डॉक्टर केळकर सवाल पुसतात की स्वतःच्या हिमतीवर, स्वतःचे प्रगल्भ विचार तुम्ही कधीकाळी आपल्या भाषेत मांडणार आहात की फक्त दुभाषेपणातच

समाधान मानणार आहात ? स्वत:चे स्वतंत्र आणि प्रगल्भ विचार एकवेळ इंग्लिशमध्ये मांडले तरी हरकत नाही कारण डॉ. केळकर म्हणतात, असे विचार मांडणाऱ्या धनंजयराव गाडगिळांना वा जयंत नारळीकरांना ते विचार आपल्या बांधवांना मराठीत सांगण्याची उर्मी कधीतरी येणारच येणार. भाषाविषयक काळ्याकुट्ट ढगाला मित्रहो, हीच काय ती एक चंदेरी कड आहे. तरीपण हा विषय एवढ्याने इथे संपत नाही.

व्यवहारोपयोगिता आणि सामाजिकता ही मातृभाषेची प्रमुख अंगे खरी, परंतु तिचे सांस्कृतिक रूप समाजाच्या अस्तित्वाच्या आणि अभ्युदयाच्या दृष्टीने जास्त महत्त्वाचे आहे. भाषेचे हे सांस्कृतिक रूप म्हणजेच वैचारिक आणि ललित साहित्य होय. समाजाच्या आचार-विचारांवर आणि नैतिक धारणेवर या साहित्याचा शतकानुशतके ठसा उमटत आलेला आहे. उलटपक्षी समाजाच्या इतिहासातील सगळी स्पंदने आणि उलाढाली या साहित्यात उमटलेली आहेत पण मातृभाषेलाच तुच्छ लेखण्याच्या वाढत्या प्रवृत्तीमुळे नव्या जुन्या मराठी साहित्याचे संस्कार-सामर्थ्यच मावळू लागले आहे. जागतिक वाङमयाच्या तुलनेत मराठी साहित्याचे मोल काय आहे हा एक स्वतंत्र आणि वेगळा प्रश्न आहे पण मराठी मनाला संस्कारसंपन्न करण्याचे बळ कालच्या आणि आजच्या मराठी ललित साहित्याला आणि वैचारिक गद्यात निश्चितपणे आहे. हे संस्कार मराठी मनावर जर होण्याचे थांबले तर या महाराष्ट्रभूमीत फक्त पोटार्थी भ्रष्ट माणसेच उपजत राहतील. मात्र प्रबोधन वा संस्कार करणाऱ्या ललित वाङ्मयाची जात कोणती त्याचे भानही आम्हाला पक्के असायला हवे. इथेच 'गुड' आणि 'ग्रेट' लिटरचरमधली तफावत जाणवते. चित्रणशक्तीची सगळी कारागिरी आणि रंजकतेचे सगळे कौशल्य प्रगट करणारे साहित्य 'गुड' म्हणजे छानदार, मनोरंजक, चटकदार असते आणि त्याचीही समाजाला गरज असते यात शंका नाही. पण माणसावर प्रगल्भतेचा (Maturity) आणि शहाणपणाचा (Wisdom) संस्कार करणारे महान साहित्य गुणधर्मानेच वेगळे असते.

## परतत्त्वस्पर्श

चित्रणशक्तीत चिंतनशीलता मिसळली की कलाकृतीचा अवघा पोतच बदलतो. मग डेन्मार्कच्या राजपुत्राची गोष्ट, ही नुसत्या कोणा एका हॅम्लेटची गोष्ट राहात नाही, ती अवघ्या मानवजातीची गोष्ट होते. माणसाचे बळ, त्याच्या मर्यादा, त्याची स्खलनशीलता, त्याचा दुबळेपणा, त्याचा दुष्टावा, त्याचा आंधळेपणा, त्याच्या मनोधर्मातील सत्-असत्, त्याची क्षुद्रता आणि थोरवी त्याचे दैव आणि त्याची परिस्थिती या सर्वांचा विचार करीत चिंतनशील लेखक एका वैश्विक पातळीवर ही कहाणी सांगू लागतो. निर्मितीच्या या शक्तीलाच मी साहित्यातील '**परतत्त्वस्पर्श**' मानतो. "जाचे बरवे कवीत्व । कवीत्वी रसिकत्व । रसिकत्वी परतत्त्व । स्पर्शु जैसा" असे ज्ञानेश्वर जेव्हा म्हणतात

तेव्हा त्यांना पारमार्थिक आणि आध्यात्मिक स्पर्श अभिप्रेत असतो. मला हा अर्थ अभिप्रेत नाही. विश्वातल्या विराट शक्तींच्या पार्श्वभूमीवर माणसांची चित्रे मांडून त्यांच्या सुखदु:खांचाच नव्हे तर अवघ्या जीवनप्रेरणांचा एखादा थोर लेखक जेव्हा सर्वशक्तीनिशी शोध घेऊ लागतो तेव्हा तो 'कलेतल्या अध्यात्माला' म्हणजेच 'परतत्त्वाला' स्पर्श करतो. असा परतत्त्वस्पर्श होत असल्यामुळेच 'ट्रॅजिडी' या साहित्यप्रकाराला 'साहित्योद्यानातील सर्वात सुंदर पुष्प' (Fine flower of literature) असे मानले जाते. ट्रॅजिडीचा विषय निघालाच आहे म्हणून या संबंधातला गेले कित्येक वर्षे मी मनात घोळवत असलेला एक विचार रसिक जाणकारांच्या चिकित्सेसाठी मी मांडतो आणि माझे भाषण संपवितो.

## कर्मयोगी शोकात्मिका

ट्रॅजिडी हा एक महान वैफल्यविचार आहे. समर्थ माणसांच्या वाट्याला अकारण दु:ख, वैफल्य आणि सर्वनाश का यावा ?— या प्रश्नाचा एका कविमनाने घेतलेला तो एक विषण्ण आणि विदारक शोध आहे माणसातील सत् आणि असत् (Good and Evil) आणि व्यक्ती विरुद्ध नियती यांतील तीव्र संघर्ष चित्रित करण्याचा तो एक प्रयत्न आहे. या दृष्टीने ट्रॅजिडीचे पाय कलाविलासात बुडालेले असले तरी तिचे मस्तक अध्यात्मविचारात हरवलेले दिसते. शोकात्मिकाही मूलत: प्रचंड अन्त:शक्ती आणि मनस्वी वृत्ती असलेल्या नायक-नायिकांबद्दलच संभवते. ग्रीकांच्या काळापासून ते आजतागायत, देशकालाप्रमाणे ट्रॅजिडीचे विविध प्रकार विकसित होत गेले आहेत. प्रत्येक कालाची आणि समाजाची छाप या साहित्यप्रकारावर पडत गेली आहे. फक्त जुन्या भारतीय साहित्यात 'शोकात्मिका' हा प्रकार निर्माण होऊ शकला नाही, असे म्हटले जाते. पण ते बरोबर नाही. शोकात्मिकेचा नायक कितीही समर्थ आणि थोर असला तरी त्याच्या पुढील समस्येला तोड देताना त्याच्याकडून एक दुर्दैवी चूक (Tragic Mistake or Error) घडून जाते. ही चूक कधी त्याच्या स्वभावातून निर्माण होते तर कधी परिस्थितीतून, तर कधी दोन्हीतून. पण या चुकीमुळेच अखेर तो नियतीचा शिकार होतो आणि विनाश पावतो. त्याच्या चुकीच्या मानाने त्याला मिळालेले प्रायश्चित्त अर्थातच जबर आणि अपात्री असते.

'हिमालयाची सावली' आणि 'विषवृक्षाची छाया' ही नाटके लिहिताना ट्रॅजिडी या प्रकाराचे एक अगदीच वेगळे वळण माझ्या लक्षात आले. भारतीय मोठेपणाचा आदर्श नुसत्या पराक्रमात वा कर्तबगारीत नाही, तर तो **निष्काम कर्म करण्याच्या समर्पित वृत्तीत आहे.** अशी माणसे स्वत:च्या आयुष्यावर निखारा ठेवून जेव्हा आपल्या कार्याशी समर्पित होतात, तेव्हा त्यांनाही दु:ख-वैफल्य भोगावे लागून विनाशाला सामोरे जावेच लागते. शोकात्मिकेची सगळी वळणे आणि लक्षणे त्यांच्या जीवनकहाणीत

प्रकर्षानें प्रगट होतात. पण तरीही त्यांनी निवडलेल्या जीवनधारणेत 'ट्रॅजिक मिस्टेक' किंवा 'एरर' म्हणजेच 'दुर्दैवी चूक' होत नसते. त्याला फारतर Tragic Choice म्हणजे 'दुर्दैवी निवड म्हणता येईल. खरे तर या निवडीला 'दुर्दैवी' म्हणायचेही कारण नाही. कारण त्यांनी जाणूनबुजून, सगळे परिणाम जोखून हा मार्ग निवडलेला असतो आणि पुन्हा संधी मिळाली तरी ते याच मार्गाची निवड केल्यावाचून राहणार नसतात.... "की घेतले व्रत न हे आम्ही अंधतेने.... " असे जेव्हा स्वातंत्र्यवीर सावरकर म्हणतात तेव्हाच 'व्रत' या शब्दात क्रांतिकारकांच्या शोकात्मिकेचे मर्म प्रगट होते. इथे शोकात्मिकेचे अवघे रूपच बदलते. ख्रिस्त, गांधीजी किंवा नेताजी यांच्या समर्पिततेपुढे त्यांचे दैवच जेव्हा पांगळे होऊन पडते तेव्हा त्या शोकात्मिकेचा गगनाला भिडणारा आवाका जा 'ावतो. सर्वस्वी 'परतंत्र' असलेल्या प्रचंड शक्तीच्या निसर्गसृष्टीत, निसर्गपुत्र माणूस हाच एक असा प्राणी आहे की तो स्वत·च्या वर्तनाचे नैतिक निर्णय स्वतंत्रपणाने घेतो. त्याची किंमत तो जरूर मोजतो, पण दैवाबरोबरच्या झुंजीत तो आपले निर्णयस्वातंत्र्यही प्रस्थापित करतो हे 'नैतिक निर्णय-स्वातंत्र्य' शोकात्मिकेला भव्योदात्त पातळीवर नेते. विख्यात तत्त्वज्ञ कान्ट ज्या भव्योदात्त (Sublime) परिणामाचा उल्लेख करतो, तो या प्रकारच्या शोकात्मिकेतूनच झळाळीने प्रगट होतो. 'उत्तर रामचरित' ही शोकात्मिका या जातीचो आहे. ही शोकात्मिका खास भारतीय मातीतून उपजली असल्याने तिला '**कर्मयोगी शोकात्मिका**' असे नाव द्यावेसे मला वाटते. ग्रीक किंवा शेक्सपीरियन शोकात्मिकांचा रसिक मनावर होणारा परिणाम हा विषण्णकारी, विस्मयकारी, भयकारी वा शून्यकारी असतो असे जाणकार सागतात. कर्मयोगी शोकात्मिका हृदय पिळवटून टाकणारी असली तरी तिचा अखेरचा परिणाम उदास प्रमन्नसतेचा होतो - पहाटेच्या शुक्रताऱ्यासारखा.

# अमरावती : १९८९

# प्रा. के. ज. पुरोहित (शांताराम)

---

पूर्वाध्यक्ष प्रा. वसंत कानेटकर, साहित्य महामंडळाचे अध्यक्ष श्री. पु. भागवत, घटक व सलग्न संस्थांचे अधिकारी, स्वागताध्यक्ष रा. सु. गवई व स्वागतसमितीचे सदस्य उद्घाटक डॉ. प्रभाकर माचवे, प्रमुख अतिथी बालकवी बैरागी आणि महाराष्ट्रातून व बाहेरून आलेल्या मराठी वाचकांच्या प्रतिनिधीनो—

माझ्या आयुष्यातील एका अत्यंत आनंददायी प्रसंगाचे आपण आज साक्षी आहात. खरे म्हणजे आपणच मला या संमेलनाच्या अध्यक्षपदी निवडले आहे. मी या वेळी अधिक प्रसन्न आहे की कृतज्ञ आहे हे मला कळत नाही. या सन्मानासाठी मी लायक नाही असे म्हणण्याचा खोटा नम्रपणा मी दाखवणार नाही. मराठी कथेच्या घडणीत माझा महत्त्वाचा वाटा आहे, या विधानात अहंकार नसल्याची पावती आपण या अध्यक्षपदाच्या रूपाने दिली आहे.

सामान्यपणे मी स्वतःविषयी बोलत, लिहीत नसतो. परंतु या वेळी जर मी स्वतःबद्दल थोडेसेही बोललो नाही तर ते दांभिकपणाचे ठरेल. गाफीलपणाचा एक अपवाद सोडला तर अशा मानसन्मानाच्या वाटेने जाणारा मी नव्हे. मुळात मी टोपणनावाचा पक्का बुरखा घेतलेला, मोजके लिहिणारा एक लेखक. पण एक-दीड वर्षापूर्वी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाच्या कल्पनेचे पाणी काही मित्रमंडळींनी मला चढवले. आणि एखाद्या मुलीच्या प्रेमात पडावे तसा मी या कल्पनेने झपाटला गेलो. (हा नुसता दृष्टान्त आहे हे कृपा करून ध्यानात घ्यावे.) साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद मिळाले पाहिजे व तेही अमरावतीतच असा मला ध्यास लागला. अमरावती माझी यशोभूमी आहे हे माझे यापूर्वी अन्यत्र केलेले विधान आपण आज सर्वार्थाने सिद्ध केले आहे.

अमरावती हे माझे आजोळ, हा योगायोग झाला. परंतु स्वतःच्या खाजगी ग्रंथसंग्रहालयातल्या आणि येथील नगरवाचनालयातल्या विविध ग्रंथांचे संस्कार माझे मामा कै. राजाभाऊ देशपांडे यांनी माझ्यावर जाणीवपूर्वक केले, तो मात्र योगायोग नव्हे. येथील विदर्भ महाविद्यालयात जवळजवळ वीस वर्षे मी अध्यापनाचे काम केले. मधुकर केचे, सुरेश भट, रू. पां. पांजणकर, राम शेवाळकर हे माझे विद्यार्थी. उद्धव

शेळके, मनोहर तल्हार, तुळशीदास काजे हे माझे प्रत्यक्ष विद्यार्थी नसूनही माझ्याशी तसे वागत. या प्रतिभावताची घडण मी फार जवळून सक्रियपणे पाहिली आहे. येथील वाड्मयीन वातावरणावर माझा काही ठसा उमटला होता असे म्हटले तर ती गर्वोक्ती ठरू नये. विदर्भ महाविद्यालयाला कथासंग्रह अर्पण करणारा कदाचित् मी एकमेव लेखक असेन. रा. सु. गवई, प्रा. बी. टी. देशमुख, प्रा. शरद तसरे व बबन मेटकर हे राजकारणपटूही माझे विद्यार्थी होत. अर्थात् या मंडळीना राजकारण मी शिकवले नाही. ती त्यांची स्वत:ची कमाई होय. नाटेकराच्या घगतील माडीवरच्या खोलीत किंवा विदर्भ महाविद्यालयाच्या निरनिराळ्या बंगल्यांत माझ्या अनेक कथांचा जन्म झाला. त्यांतल्या काही निश्चितच जाणत्या वाचकांच्या स्मरणात दीर्घकाळ राहतील माझ्या लेखनाला जी एक संथ लय आहे असे म्हणतात ती या अमरावतीचीच. 'लोटसईटर्स लॅड' (आरामप्रदेश) कोठे आहे असे जर कोणी मला विचारले तर मी आनंदाने व गौरवाने निश्चितच अमरावतीचे नाव घेईन. या सर्व कारणांमुळे अमरावतीतील साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाला माझ्या दृष्टीने अनन्यसाधारण महत्त्व आहे

हे संमेलन आणखी एकदोन कारणांनी अनन्यसाधारण आहे.

केवळ एक मताने निवडून येण्याचा माझा विक्रम कोणालाही सहजासहजी मोडता येणार नाही असा आहे. खरे तर वाड्मयीन क्षेत्रात जयापजय इत्यादी गोष्टीना अर्थ नाही. एखादी कथा उंची गाठते, एखादी कादंबरी काळजाला हात घालते, हा झाला विजय. एखादी कविता नीट उतरत नाही, एखादे नाटक नीट जमत नाही, हा झाला पराभव. या दृष्टीनेच मी या सर्व प्रकाराकडे बघत आलो आहे

हे संमेलन व्यायामशाळेत भरत आहे. व्यायामशाळेत भरणारे हे जगातले पहिलेच साहित्यसंमेलन असावे. आखाड्यात उतरलेल्या खेळाडूंची पाठ मातीला लागणे येथे साहजिकच होते. स्पर्धा संपल्याबरोबर हातमिळवणी करणे हाही कुस्तीच्या नियमातील एक भाग. विजयी आणि पराभूत अशा उमेदवारांचा सत्कार, सारखा सन्मान करण्याची यापूर्वी कोणालाही न सुचणारी कल्पना फक्त अमरावतीकरांना सुचली ही या घटनेतील सर्वात अभिमानाची बाब आहे. माझ्या या भाषणात व्यायामशाळेचा उल्लेख आणला तो याचमुळे.

व्यायामशाळेची एक संस्कृती असते हे मला आवर्जून मांगावयाचे आहे मी कोठे तरी वाचल्यासारखे आठवते की, प्राचीन ग्रीसमध्ये काही अकादमीतून म्हणजे शिक्षंणसंस्थांतून फक्त तीनच विषय शिकवले जात. संगीत, गणित व व्यायाम हे ते तीन विषय होत. जगाच्या सांस्कृतिक व वाड्मयीन इतिहासात प्राचीन ग्रीसचे, महाकवी होमरच्या ग्रीसचे, तत्त्वज्ञ प्लेटो, ॲरिस्टॉटल यांच्या ग्रीसचे, सोफोक्लीस, इस्कीलस, युरिपिडीस व ॲरिस्टोफॅनीस या नाटककारांच्या ग्रीसचे महत्त्व किती आहे हे सर्वश्रुत आहे.

आत्तापर्यतचे माझे भाषण ऐकून आपला निश्चित समज झाला असेल की, आज

मी सर्वांची प्रशंसा करण्याचा निर्धार केला आहे. पण तसे मुळीच नाही. उलट, चार खरे शब्द सांगण्याच्या उद्देशाने मी येथे आलो आहे. माझ्या विद्यार्थ्यांचा यापूर्वी मी उल्लेख केला तो एवढ्याचसाठी. माझ्या विद्यार्थ्यांच्या भरवशावर मी काहीही बोलायला धजू शकतो.

या भाषणाच्या सुरुवातीला मी मराठी वाचकांना संबोधिले आहे. माझी निवड खरोखरच मराठी वाचकांनी केली काय ? याचे उत्तर मी काय द्यावे ? मी सर्व क्षेत्रात लोकशाही मानतो व म्हणून निवडणुकीतील बरेवाईट मी स्वेच्छेने स्वीकारतो. त्याबद्दल माझी तक्रार नाही. परंतु साहित्य संमेलनाचा अध्यक्ष निवडणुकीतून सिद्ध होतो, वाचकांच्या साहित्यविषयक जाणतेपणातून बहुधा सिद्ध होत नाही हे मी या ठिकाणी स्पष्टपणे नमूद करू इच्छितो याहीपलीकडे जाऊन मी असे म्हणेन की, ज्ञानदेव-तुकारामांचा वारसा सांगणाऱ्या आपल्या मराठी समाजाला आज तरी फारशी वाङ्मयीन संस्कृती उरलेली नाही. वाङ्मयाविषयी फारशी आस्था आज तरी आपल्या समाजात नाहीच याला अपवाद एकच—-दलित साहित्याचा, ते पोटतिडकीने निर्माण करणाऱ्या लेखक-कवीचा आणि त्याला भरघोस पाठिंबा देणाऱ्या विशिष्ट वाचकांचा. दलित साहित्य आक्रोशी आहे, कच्चे करकरीत आहे, त्यात कलात्मकतेला आवश्यक अशी तटस्थता आणि रचनासौंदर्य नाही, हे सर्व मला मान्य आहे साहित्याच्या मूळ प्रवाहापासून फुटण्याची वृत्तीही दलित साहित्य आणि साहित्यिकात आहे. परंतु तिचा बागुलबोवा करण्यात अर्थ नाही. नवकथा, नवकाव्य इत्यादी बिरुदे कालबाह्य झाल्यावरही आपल्या साहित्यचर्चेत ठाण मांडून बसली आहेत. त्यांच्या वेगळेपणाला आज जसा अर्थ नाही तसाच दलित साहित्याचा वेगळा संसार मराठी साहित्याच्या मोठ्या विश्वात कालान्तराने सामावून जाईल याविषयी मला शंका वाटत नाही एवढेच नव्हे, तर असे होताना मराठी साहित्याला दलित साहित्य मोठेपणाही देईल याची मला खात्री आहे. आज मला जे दिसते त्याप्रमाणे साहित्य आणि त्याचे निर्माते व वाचक यांच्यात जो खोल जिव्हाळ्याचा संबंध असावा लागतो तो फक्त दलित साहित्याच्या बाबतीतच आहे. जो कोणी या पुस्तकास स्पर्श करील तो केवळ पुस्तकालाच नव्हे तर माणसाच्या काळजालाच हात लावीत आहे, असे आज तरी काही प्रमाणात फक्त दलित साहित्याविषयी म्हणता येईल.

आजकाल ग्रामीण साहित्याची एक चळवळ सुरू झाली आहे 'जनवादी साहित्य' नावाच्या साहित्याचा आग्रह मधूनमधून धरण्यात येतो. या दोहीविषयीच्या माझ्या कल्पना व मते अस्पष्ट आहेत. कारण या चळवळीच्या प्रवर्तकांच्या आणि प्रचारकांच्या भूमिकेत मला पुरेशी स्पष्टता व सुसंगती दिसत नाही. कोण्यातरी काल्पनिक शत्रूच्या अंगावर हे साहित्य चालून जात आहे असे मला सतत वाटत असते. काव्याची समाजाशी बांधिलकी असावी आणि ती जर नसेल तर कवितेला आणि कवींना आपल्या राज्यातून हद्दपार केले पाहिजे ही भूमिका प्लेटोपासून चालत आली आहे व

या ना त्या स्वरूपात ती मधूनमधून डोके काढणारच. माझी याबद्दल तक्रार नाही. मला एवढेच म्हणावयाचे आहे की, जुजबी उदाहरणांच्या आधारावर कवींविषयी मोठा सिद्धान्त लादणाऱ्या प्लेटोला आजही सर्वत्र अनुयायी मिळताना दिसतात. साहित्यातील सामाजिकता मी मानतो. परंतु साहित्यातील सामाजिकता व राजकारणातील सामाजिकता एक नव्हे. ती एकाच स्वरूपाचो मानली तर धड राजकारण होत नाही, धड समाजकारण होत नाही, की साहित्यकारण. अर्थात् मी हे या प्रवृत्तीचा मित्र म्हणून बोलत आहे. एखाद्या वाटेने आपण अगोदर गेलो असलो तर आपल्या मागून येणाऱ्या मित्रांना त्या वाटेवरील खाचखळग्यांची माहिती द्यावी, एवढाच माझा उद्देश आहे. तथापि हे पुन्हा सांगावेसे वाटते की, साहित्यविषयीची आस्था आहे ती थोड्याफार प्रमाणात याच लोकांना. इतरत्र परिस्थिती निराशाजनक आहे.

पुष्कळांना असे वाटते की, आपल्या भाषेचा व्यवहारात वापर मोठ्या प्रमाणात होऊ लागला की, आपल्या भाषेतला साहित्यव्यवहारही जोरात बहरेल. या समजुतीत असलाच तर फार थोडा सत्यांश आहे. १९२६ मध्ये पुण्याच्या शारदोपासक संमेलनाच्या पहिल्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदावरून इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी काढलेले उद्गार मी आपणांपुढे ठेवीत आहे. "मराठी भाषा मुमूर्षू आहे काय ?" असा प्रश्न उपस्थित करून राजवाडे म्हणतात, "काही थोडी सबल दुर्बल वर्तमानपत्रे, लेचीपेची गद्य पद्य पुस्तके, गृह्य आणि ग्राम्य व्यवहार यांच्यात मराठी भाषेचा वापर आपण अद्याप करीत आहोत. त्यावरून दिसते की, मराठी भाषा अद्याप मेली नसून तिच्यात काही धुगधुगी उरली आहे. परंतु गृह, ग्राम, दुर्बल वर्तमानपत्रे व दुर्बलतर पुस्तके सोडली म्हणजे समाजाच्या व्यवहाराचे बाकीचे प्रांत, त्यांत मराठी भाषेची झाडून सारी अंगे थंडगार पडून गेलेली आहेत. देशातली सर्वात अत्यंत मोठी व महत्त्वाची संस्था म्हणजे राज्यसंस्था. तिचा सर्व महत्त्वाचा व्यवहार परकीय भाषेत चालतो....शिकलेले म्हणून ज्यांना म्हणतात ते प्रत्येक दहा शब्दांत पाच-चार इंग्रजी शब्द ढकलून देतात....मनात विचारांचा संकल्प प्रथम इंग्रजी भाषेद्वारा करतात व नंतर त्या इंग्रजीचे भाषांतर इंग्रजी-मराठीमिश्र अशा धेडगुजरी अपभ्रंशाच्या द्वारा तोडातून सहज उच्चारितात....येणेप्रमाणे मराठीची तोडदाबणी अशीच आणखी पाच-पंचवीस वर्षे होत गेल्यास सर्व महाराष्ट्र इंग्रजी भाषा शुद्ध किंवा अपभ्रष्ट अशी हॉगकाँगमधील पिजिन इंग्लिशप्रमाणे बोलू लागेल असा निश्चित अंदाज दिसतो."

सध्याची परिस्थिती पाहिल्यास आणि तपशीलाचा एखादा मुद्दा सोडल्यास राजवाड्यांचे उद्गार किती मर्मभेदी व द्रष्टेपणाचे आहेत हे आपल्या सहज लक्षात येईल.

आणखी एका मोठ्या विचारवंतांच्या उद्गारांची मी आठवण काढणार आहे. या अमरावतीलाच शिकलेले ज्ञानकोशकार डॉ. केतकर म्हणतात, "एकंदरीने पाहता मराठीतील काव्यवाङ्मय म्हणजे उष्टे आणि भिकार होय यात शंका नाही.....आजपर्यंत

झालेले मराठी वाङ्मय सर्व जळून गेले तरी जगाचे काव्यनाश या दृष्टीने काहीएक नुकसान व्हायचे नाही. झाले तर भाषेचा इतिहास, खुंटलेल्या राष्ट्राच्या मनःस्थितीचे व ज्ञानमर्यादेचे उदाहरण व स्त्रीशूद्रांच्या धार्मिक शिक्षणासाठी झालेल्या प्रयत्नाचा इतिहास या नात्यानेच होईल. मराठीतील प्रसिद्ध झालेली अर्वाचीन कविता पंचविशीच्या आतल्या पोरांनी लिहिली आहे व त्याच मंडळीनी प्रौढ वयात कवितारचनेचा क्रम टाकून दिलेला आहे.''

डॉ. केतकरांचे उद्‌गार खास केतकरी ढंगाचे आहेत हे नक्की. वयाची पासष्ट वर्षे उलटल्यावरही मधूनमधून कथा लिहीत राहणाऱ्या माझ्यासारख्याला केतकरांचे उद्‌गार शंभर टक्के कसे पटणार ? परंतु मराठी साहित्याची प्रकृती असावी तशी बरी नाही असे आपणांपैकी पुष्कळांना वाटत असते. मलाही तसे वाटते. हा प्रकृतिदोष का झाला असेल याचा विचार करताना सुचलेली काही कारणे मी आपणासमोर मांडणार आहे.

गेल्या चाळीस वर्षातील मराठी साहित्याचा आपण विचार केला तर असे दिसते, की नवकाव्य, नवकथा या नावाने प्रसिद्ध झालेल्या साहित्याने जणू एक क्रांतीच केली तोपर्यत साहित्यात आलेला साचलेपणा, कृत्रिमता, विषय आणि अभिव्यक्तीचा तोकडेपणा इत्यादीवर या वाडमयाने हल्लाच केला. नवी कविता, नवी कथा, नवे नाटक यांच्यासंबंधी केवळ विद्वत्तापूर्ण परिभाषेने भरलेली व्याख्याने न देता प्रत्यक्ष निर्मिती करून नवीन साहित्यिकांनी पूर्वीच्या साहित्याच्या आणि साहित्यिकांच्या मर्यादा उघडकीस आणल्या. येथपर्यत ठीक झाले. परंतु थोड्याच अवधीत हे नवसाहित्य इतके आत्मलक्षी (सेल्फ-कॉन्शस) झाले, इतके रूपवादी झाले की, त्याचा जीवनानुभवाशी संबंधच तुटला. हे विचार मी आज पहिल्यांदा मांडलेले नाहीत. मालवणच्या साहित्यसंमेलनात म्हणजे तीस वर्षापूर्वी याविषयी मी स्पष्ट बोललेलो आहे. तेथे मी मराठी कथेच्या मर्यादित संबंधात बोललो तेच अ[illegible] एका व्यापक संदर्भात मांडत आहे. गेल्या चाळीस वर्षात आपल्या वाङ्मयीन दृष्टीवर, आपल्या टीकालेखनावर, आपल्या समीक्षेवर व एकूण आपल्या वाङ्मयीन अभिरुचीवर आकृतिवाद व लयतत्त्व या दोन सिद्धान्तांचा प्रचंड प्रभाव पडलेला दिसतो या दोन्ही विचारांत साहित्याचे रूप समजून घेण्याचा प्रयत्न आहे यात शंका नाही. परंतु एकूण समीक्षाव्यवहारात आकृतिवादी भूमिकेला किंवा लयतत्त्ववादाला किती महत्त्व द्यायचे हा प्रश्न आहे. ज्या ॲरिस्टॉटलच्या काव्यशास्त्रात या भूमिका पहिल्यांदा स्पष्टपणे दिसतात, त्याचे म्हणणे काय आहे हे आपण स्पष्ट समजून घेतले पाहिजे. ॲरिस्टॉटलच्या मते [illegible] कलांप्रमाणेच वाङ्मयही अनुकृतिपर (Imitative) असते. अनुकृती करण्याची प्रेरणा माणसात जन्मजातच असते. ही अनुकृती आनंददायी असते म्हणजे कला ही आनंददायी असते. या आनंदाची कारणे देताना त्याने रंगकाम, तांत्रिक कौशल्य यांचा उल्लेख केला आहे. तसेच अनुकृतिजन्य कलेत जे लयतत्त्व असते तेही आनंदाचे एक कारण होय असे त्याने म्हटले आहे. परंतु त्याचा पहिला आणि मुख्य भर आहे तो कला आपल्याला जे ज्ञान देते त्यावर. हे ज्ञान

म्हणजे मानवाची किंवा त्याच्या जगाची संख्यात्मक माहिती नव्हे. आपण ज्याला जाण म्हणतो, माणसाच्या सुखदु:खांची, रागलोभांची, श्रद्धेची, संघर्षाची समज म्हणतो, तीच त्याला अभिप्रेत असलेले ज्ञान होय. एकंदर मानवी जीवनव्यवहाराचे आकलन हे त्याला ज्ञान या संकल्पनेतून सुचवायचे आहे. येथे हेही लक्षात घेतले पाहिजे की, प्लेटोने किंवा ॲरिस्टॉटलने आपला अनुकृतिवादाचा सिद्धान्त मांडताना चित्रकलेचे उदाहरण घेतले आहे. चित्रकलेचे माध्यम म्हणजे रंग, रेषा इत्यादी. त्यांना स्वत:चा स्वतंत्र अर्थ नसतो. चित्रापलीकडे त्यांना अर्थ नसतो. वाङ्मयाचे माध्यम जे शब्द, त्यांचे तसे नाही. शब्दांना सामाजिक आशय असतो, कधीकधी लेखक नवे शब्द बनवतो किंवा जुन्या शब्दाला नवे अर्थ देतो हे खरे आहे. परंतु बहुश: तो वापरीत असलेले माध्यम सामाजिक स्वरूपाचे असते. म्हणूनच आजच्या भाषेत बोलावयाचे झाले तर वाङ्मय आपल्याला सामाजिक जाण देते. व्यक्तीविषयी आणि व्यक्तीच्या समूहांविषयी जे भान आपल्याला साहित्यामुळे मिळते तोच साहित्याच्या आनंदाचा सर्वात महत्त्वाचा घटक होय. कोणत्या घटकाला अग्रक्रम द्यायचा हे लेखक विसरला किंवा दुय्यम घटकाला त्याने पहिले स्थान दिले तर साहित्य आणि त्यावरील टीका पुरेशी समाजस्पर्शी होऊ शकत नाही. आधुनिक मराठी वाङ्मय आकृतिवादात आणि लयतत्त्वात रुतल्यामुळे त्यातले पुष्कळसे देखणे पण क्षीण, नि:सत्त्व पण चकचकीत झाले आहे. त्याचा आपल्या जमिनीशी संबंध नसल्यामुळे ते परके वाटते. एका लहानशा समूहाने वाचावे, चर्चा करावी, असे त्याचे स्वरूप मर्यादित झाले आहे. त्याचा बहुसंख्य वाचकांशी संबंध उरला नाही. बहुसंख्य वाचक लोकप्रिय साहित्याकडे ('बेस्ट सेलर्स'कडे) त्यामुळे वळले आहेत. आपल्याला असे दिसते की, लोक बरेच वाचतात. आपल्यांतील तथाकथित सुशिक्षित लोक मराठीपेक्षा इंग्रजी पुस्तके जास्त वाचतात, हा भाग सोडला तरी ते काय वाचतात हे पाहण्यासारखे आहे. घाईघाईने वाचनालयातील पुस्तक बदलावयाला चाललेली स्त्रीपुरुष मंडळी संध्याकाळी आपल्याला कुठल्याही मोठ्या गावात दिसतील. प्रवासात त्यांच्याबरोबर कथाकादंबऱ्या दिसतात. पण ज्याला चांगली कथा म्हणता येईल, चांगली कादंबरी म्हणता येईल व चांगले नाटक म्हणता येईल, असे त्या वाचनात बहुधा नसते. लोकप्रिय, सोप्या व सुलभ वाङ्मयाकडे वळलेल्या वाचकांना आपल्याकडे ओढण्यासाठी चांगल्या लेखकांनी सवंग लिहावे असे मला मुळीच म्हणावयाचे नाही. लेखकाने वाचकापर्यंत जाण्याऐवजी वाचकाने लेखकापर्यंत गेले पाहिजे याबद्दल माझ्या मनात शंका नाही. परंतु मराठी वाचक व लेखक यांच्यात दरी निर्माण झाली आहे व नवीन लेखन ही काही विशिष्ट लेखकांची टूम आहे असा सार्वत्रिक समज झाला आहे. तो मुद्दाम दृढ करण्याचे प्रयत्न लेखकांनी आकृतिवादी वा लयतत्त्ववादी भूमिका घेऊन करू नये, एवढेच मला म्हणावयाचे आहे. मुळात नववाङ्मयाची आपल्याकडील प्रेरणा परिस्थितीपेक्षा वाचनातून

अधिक आली आहे. त्यात तिला आकृतिवादाचे आणि लयतत्त्वाचे खतपाणी मिळाले. त्यामुळे कथा-कवितेला जणू आत्मरत होण्याचा परवानाच मिळाला आणि व्यापक मराठी जीवनाचा आपल्या साहित्याशी संबध तुटू लागला. अभिरुचीचे संवर्धन जितक्या प्रमाणात नवसाहित्याकडून अपेक्षित होते तेवढे ते झाले नाही.

आकृतिवादी आणि लयतत्त्ववादी लेखकांपेक्षाही वाङ्मय वठवून दाखवणाऱ्या मंडळीनी आपल्या अभिरुचीचे अधिक नुकसान केले आहे. कथा ही मुख्यत: वाचायची असते, बघायची किंवा ऐकायची नसते, हे भान जिथे लेखकाला नाही तिथे वाचकाला कस असणार ? जास्तीत जास्त लोकांपर्यंत कथावाङ्मय पोचवण्याचा हेतू कदाचित कथाकथनामागे असेलही. परंतु कथाकथनाची लोकप्रियता जसजशी वाढली तसतशी कथावस्तू पातळ झाली, कथा मूल्यहीन झाली व ती केवळ एक रंजनसाधन होऊन गेली. नव्या घराच्या वास्तुशांतीच्या वेळी एखादा हलकाफुलका गाण्याचा कार्यक्रम ठेवावा, तसाच कथाकथनाचाही कार्यक्रम ठेवण्यात येऊ लागला. हे मी प्रगतीचे लक्षण समजत नाही. वठवण्याच्या कलेवर (परफॉरमिंग आर्टवर), प्रयोगनिष्ठ कलेवर, माझा आक्षेप नाही पु. ल. देशपांड्यांची 'बटाट्याची चाळ' प्रयोगरूपात पाहण्यासाठी धडपडणारा मी एक आहे. परंतु 'बटाट्याची चाळ' वाचून तिचा आस्वाद घेणे जर तिच्या प्रयोगाने थांबणार असेल तर ती दुर्घटनाच होय. वाङ्मयप्रकार जसा निर्माण झाला असेल तशा स्वरूपात वाचकाने ग्रहण करायचा असतो. कथा ही कथा म्हणूनच वाचली पाहिजे. कथाकथन सुरू झाले की, तिचे कथापण हळूहळू बारगळते; किंवा कथालेखन एका विशिष्ट प्रकारचेच, लोकांना भावेल असेच होऊ लागते. कवितेचा आनंद ती वाचून भोगायचा असतो. कविता नुसती ऐकू येऊ लागली की, तिच्यावर वक्तृत्व, गायन व नाट्य यांची छा‌ पडून तिचे कवितापण दुय्यम ठरते. वठवण्याच्या कलेत प्रावीण्य मिळविणे सोपे नव्हे. परंतु त्या कलेचा वाङ्मयाच्या निरनिराळ्या प्रकारांवर होणारा परिणाम माझ्या मते घातकच अधिक ठरलेला आहे. साहित्याने मनोरंजन करूच नये असे मी म्हणत नाही. परंतु कवी, कथाकार म्हणजे शब्दांचे चाळ पायांत घालणारा नाच्या पोर नव्हे असे माझे ठाम मत आहे. नाटककाराबद्दल मी असे आग्रही बोलणार नाही, कारण नाटक हा बोलूनचालून मिश्र प्रकार आहे. तेथे लोकप्रियता म्हणजे गुणवत्ता असा समज भल्याभल्यांमध्ये रूढ झाला आहे. शिवाय एकूणच मराठी नाटकांची स्थिती, काही अपवाद सोडता, [illegible] आहे. आमची रंगभूमी मुख्यत: उधारउसनवारीवर जग आहे. अशा बिकट परिस्थितीत नाटक टिकवून धरणाऱ्यांचे मी कौतुकच करीन, अधिक्षेप नाही

साहित्य-अभिरुचीच्या वाढीआड येणारे आणखी एक विघ्न म्हणजे रसाळ वक्तृत्त्व. गावोगावी व्याख्याने देऊन लोकांना मुग्ध करणारे वक्ते आपल्यांत आहेत उत्तम वक्तृत्त्व ही एक विरळा कला आहे. या व्याख्यानांमुळे श्रोत्यांना 'महाभारत',

'रामायण', शिवाजी, महात्मा फुले, विवेकानंद, टिळक, आंबेडकर यांच्याविषयी काही किमान माहिती मिळते हे खरेच. पण बहुश: ही माहिती उभयपक्षी म्हणजे वक्ता आणि श्रोता या दोहोच्याही बाबतीत किमान पातळीवरच राहते. ही व्याख्याने बंद व्हावीत असे मी म्हणणार नाही. समाजातल्या निरनिराळ्या घटकांची सांस्कृतिक गरज निरनिराळी असते व ती गरज ही व्याख्याने भागवतात. परंतु हे सर्व किमान पातळीवर, केवळ लोकप्रियतेच्या पातळीवर चालू नये असे मला वाटते. या व्याख्यानांचा उपयोग साहित्याविषयी वाढते कुतूहल, वाढती आस्था, वाढती समज निर्माण होण्याकडे झाला पाहिजे. तसे झाले तर तीच ती शिळी व्याख्याने पुन: पुन्हा देण्याचे धैर्य लोकप्रिय वक्त्यांना होणार नाही. सध्या तरी विनासायास आपणाला सारे काही कळले असा आभास असल्या व्याख्यानांमुळे श्रोत्यांमध्ये निर्माण होतो. साहित्याचे कळणे म्हणजे माहिती होणे नव्हे. वाङ्मयाचे कळणे, वाङ्मय स्वत: अनुभवल्याशिवाय शक्य नाही. म्हणून लोकप्रिय व्याख्यानाचे मूल्य किती हे आपण ठरवले पाहिजे.

आजकाल गावोगावी साहित्यमंडळे व साहित्यसंस्था स्थापन होत आहेत. या व्यासपीठांचा उपयोग साहित्यानुभव वाढवण्याकडे न होता नुसती साहित्याची वक्तृत्त्वपूर्ण माहिती मिळवण्याकडे झाला तर ते फार दुर्दैवाचे होईल. साहित्य हे मुख्यत: अनुभवण्याचे असते. त्यासाठी मुनीम ठेवून चालणार नाही. हे शृंगारासारखे आहे. त्यातील छळ, आनंद आपण स्वत: भोगावयाचा असतो. त्यासाठी आपला प्रतिनिधी म्हणजे सेक्रेटरी पाठवून कसे चालेल ?

आकृतिवाद, वठवण्याची कला, वक्तृत्व हे काही झाले तरी साहित्याचे शत्रू नव्हेत. त्यांच्यावर थोडे बारीक लक्ष असले की पुरे. परतु टी व्ही., व्हिडियो इत्यादी यत्रांचे साहित्यावरील आक्रमण अशा तऱ्हेचे नाही. त्याचा गभीरपणे विचार केला पाहिजे. या यत्रांचे सामर्थ्य व पोच विलक्षण आहे, हे कोण नाकारेल ? म्हणूनच त्याची भयप्रदता मोठी आहे. किती थोड्या काळात शहरांतूनच नव्हे तर खेड्यापाड्यातून आता एक टी. व्ही.-संस्कृती, एक व्हिडियो-संस्कृती मूळ धरू लागली आहे. ती जरा प्रमाणाबाहेर वाढू लागली तर ज्याप्रमाणे एक विशिष्ट गवत सगळीकडे पसरून इतर काही वाढूच देत नाही तसे होणार आहे. याला उपाय एकच तो म्हणजे वाङ्मयीन संस्कृतीचे प्रयत्नपूर्वक जतन करणे. सहा कोटीहून अधिक माणसे मराठी बोलतात. शिक्षणाचे प्रमाणही आपल्यांत बऱ्यापैकी आहे. असे असूनही पाचचार वाङ्मयीन मासिके आपण जगवू शकत नाही. कित्येक वर्षे खस्ता खाऊन शेवटी 'सत्यकथा' बंद पडली. 'अभिरुची'ला आपले रूप बदलावे लागले. 'आलोचना' पंचवीस वर्षापेक्षा जास्त काळ चालू आहे याचे एकमेव कारण प्रा. वसंत दावतरांची जिद्द. 'अनुष्टुभ', 'कवितारती' इत्यादी मासिके चालवणे, म्हणजे पोटाला चिमटा घेऊन करावयाची साधना. निरनिराळ्या साहित्यसंस्थांच्या मुखपत्रिका एखादे वेळी वाङ्मयीन मासिकासारख्या

वाटतात, पण बहुधा मात्र त्या संस्थांच्या बखरीमारख्या दिसतात. फार काय, ज्याला लोकप्रिय मासिक म्हणता येईल असे 'हंस'देखील बंद होण्याच्या बेतात आहे. 'किर्लोस्कर' मासिके पूर्वीची राहिली नाहीत. लेखकांनी चांगले वाङ्मय प्रसिद्ध कोठे करायचे व वाचकांनी ते कोठे वाचायचे ? दिवाळी अंक म्हणजे अक्षरशः उडदामाजी काळे-गोरे निवडण्याचे काम. तेथे लेख काय, चित्र काय, जाहिरात काय, सर्वांना सारखेच महत्त्व. तेथे संपादकापेक्षा वितरक मोठा ठरतो. महाराष्ट्रातल्या पुस्तकप्रकाशनाची स्थिती काय आहे ? जे चार प्रकाशक आपल्याला सुस्थितीत दिसतात ते साहित्याच्या खपामुळे नव्हे; क्रमिक पुस्तकांमुळे त्यांना बरकत मिळाली आहे, एरव्ही त्यांचे हालच झाले असते.

यावर उपाय काय ? पहिला उपाय म्हणजे साहित्य हे संस्कृतीचे वाहन आहे अशी सर्वत्र श्रद्धा असली पाहिजे. त्यासाठी साहित्य हे त्या दर्जाचे हवे हे ओघानेच आले. या बाबतीत योग्य मनोभूमी ही सर्वात महत्त्वाची बाब. पण तेथेच थांबून भागणार नाही. काही निश्चित पावले उचलावी लागतील. सरकारला या बाबतीत बरच काही करता येईल. साक्षरता वाढवणे हे जसे सरकार आपले कर्तव्य मानते तसेच सुशिक्षितपणा वाढवणे हेही त्याचे कर्तव्य आहे. काही वर्षे तरी मराठी पुस्तक-प्रकाशन-व्यवसायाला सरकारने विशेष संरक्षण दिले पाहिजे. ज्याच्या जिवाला मुळीच धोका नाही असा एखादा मंत्री गावात येऊन गेला तर सरकार त्याच्या सरंक्षणावर हजारो रुपये खर्च करते. आमच्या भाषिक जीवनाचे थोडी ताशीस सोसून सरकारने संरक्षण का करू नये ? शासन ग्रथालयांना उत्तेजन देते हे खरे आहे. पण निरनिराळ्या गटांतील वाचनालयांना मिळणाऱ्या अनुदानाचे कोष्टक आता पूर्णपण कालबाह्य झाले आहे. 'ड' गटातल्या वाचनालयाना सरकार वार्षिक ५००/- रुपये देते ही रक्कम तेथील संबधितांच्या बिडाकाडीलादेखील पुरत नाही. [illegible]नक.वे जतन करणे, त्यांच्या सूक्ष्मचित्रीकरणाची (Micro-filming) व्यवस्था करणे, ग्रंथालयांना पुरेशा जागा देणे इत्यादी बाबतीत सरकारला वारवार स्मरण का करून द्यावे लागते ? एशियाटिक सोसायटीच्या ग्रंथसंग्रहालयाची दुर्दशा सरकारला ठाऊक नाही का ? सरकार साहित्य संस्कृती मंडळाद्वारे अनेक पुस्तके प्रसिद्ध करते. या पुस्तकांचे उद्‌घाट राज्यपाल, मंत्री इत्यादी ती न वाचता करीत असतात. हे चालायचेच. परतु सरकार या पुस्तकांच्या वितरणात लक्ष का घालत नाही ? सरकारने ही पुस्तके मोफत वाटली तरी [illegible]च्या एकदोन पायांशिवाय काहीही तुटणार नाही. आपल्या सरकारने जर य[illegible]नीत लक्ष घातले तर ग्रंथप्रसाराच्या चळवळीत गुंतलेल्या कार्यकर्त्यांना तत्त्वांशी तडजोड करून परकीय पैसा घेण्याची गरज उरणार नाही. आमच्या पुस्तकव्यवहाराला अमेरिकेतील धर्मादाय फंडाने मदत करावी हे मला तरी भूषणावह वाटत नाही. अमेरिका काय, रशिया काय, ते लोक बदरे खोलूनच बसले आहेत. त्यांच्याकडून आपण काय घ्यायचे, घ्यायचे की नाही, हे ठरवले पाहिजे. सांस्कृतिक बाबतीत आपण परक्या देशांकडे पाहू लागलो की, सारेच

संपले. म्हणून सरकारने साहित्याच्या पाठीशी निष्काम बुद्धीने उभे राहावे अशी हाक मी देतो. त्यासाठी काही कलमी योजना देणे मी मुद्दाम टाळले आहे. सरकारने मनात आणले तर ते स्वत: उत्तम योजना तयार करू शकते. माझी फक्त एकच सूचना राहील : या कामी महाराष्ट्राबाहेरच्या कर्नाटक, गोवा, आंध्रप्रदेश, मध्यप्रदेश, गुजरात येथील संस्थांचाही विचार केला जावा; उपकार नव्हे, कर्तव्य म्हणून. त्यांच्या अडचणींची आपल्याला पुरेशी कल्पना दिसत नाही. ग्वाल्हेरच्या साहित्य संमेलनात १९६१ साली प्रा. कुसुमावती देशपांडे यांनी या विषयासंबंधी विचार मांडले होते. त्याबद्दल अजून काहीही झाले नाही. मी म्हणेन, "बापहो, उठा. लवकर उठा." संस्थांना द्यावयाची ही मदत राजेरजवाडे क्वचित् ज्या लहरीप्रमाणे खिरापत वाटत तशी असू नये. ही मदत कायम स्वरूपाची असली पाहिजे. 'राज्य मराठी विकास संस्था' स्थापण्याचा सरकारचा विचार कार्यान्वित केव्हा होणार ते सरकारच जाणे. लंडन विद्यापीठातील मराठीचे अध्यापन, संशोधन दोन वर्षानंतर बंद होणार. सिंहली भाषेवर असा प्रसंग ओढवला असताना श्रीलंका सरकारने अर्थसाहाय्य देऊन तो थांबवला. मराठीबाबत आपल्या सरकारने हेच करायला हवे. येथे एक गोष्ट स्पष्ट करावीशी वाटते. मराठीचा मी संदर्भभाषा, शासकीय भाषा, व्यापारभाषा म्हणून विचार करीत नाही. उपयुक्ततेच्या कसोटीवर मराठीचे महत्त्व कदाचित् कमीही ठरेल. परंत आपल्या संस्कृतीच्या आविष्काराची भाषा म्हणून तिचे मला अधिक महत्त्व वाटते. या दृष्टीनेच मराठीच्या संवर्धनाला अर्थ आहे. इतर बाबतीत मराठीच्या स्थानात कमीजास्त बदल होणे अपरिहार्यच आहे.

येथे एका व्यापक संदर्भाचा निदान उल्लेख करणे आवश्यक आहे. आपल्या देशात निरनिराळ्या भाषिक गटात तणाव आहेत; क्वचित् या तणावांचे रूपांतर संघर्षात होत असते. याचे कारण असे की आपल्या भाषिक चळवळींचा मुख्य हेतू राजकीय आहे, शासकीय आहे. या भाषिक चळवळींना सांस्कृतिक प्रयोजन व अधिष्ठान लाभले तर हे ताणतणाव, संघर्ष कमी होतील. निरनिराळ्या लोकांच्या भाषा वेगवेगळ्या असल्या तरी त्यांची संस्कृती बव्हंशी एकच आहे. भाषेचे सांस्कृतिक महत्त्व जाणणारे लेखक-वाचक प्रत्येक भाषिक गटात आहेत. त्यांची संख्या वाढली की काही काळाने अखिल भारतीय साहित्याची संकल्पना अधिक दृढ होईल. भारतीय भाषांतील निरनिराळ्या पुस्तकांना, लेखकांना, वाङ्मयातील प्रवाहांना जे महत्त्व आहे त्यांची नव्याने तपासणी होईल; पुनर्मूल्यन होईल. आपल्या काही आवडत्या ग्रंथांना आणि ग्रंथकारांना आपण आज जे स्थान देतो ते कदाचित् या अखिल भारतीय वाङ्मयीन दृष्टीला मान्य होणार नाही; आपल्या काही वाङ्मयीन आवडीनिवडी आपल्याला सोडाव्या लागतील. यात्रेला गेलेला माणूस आपल्या आवडीच्या वस्तूंचा स्वेच्छेने त्याग करतो तसा हा प्रकार आहे. यात्रिकाच्या भाविकतेने आपल्याला वाङ्मयीन संस्कृतीची, शक्य झाल्यास भारतीय वाङ्मयीन संस्कृतीची, जोपासना करायची आहे.

मी ज्या वाङ्मयीन संस्कृतीबद्दल आपणाशी बोलत आहे ती आपल्या समाजात रुजली तर काय परिणाम होतील ? जादूची कांडी फिरवल्यासारखा सगळा समाज बदलून जाईल काय ? विद्यार्थ्यांना नक्कल करण्यात मदत करण्याचे शिक्षक थांबवतील काय ? अशा समाजातल्या न्यायधीशांना निवृत्तीची वेळ जवळ येताच आपली जन्मतिथी चुकल्याचे वाटणे बंद होईल काय ? स्त्रियांवरील, दलितांवरील अन्याय एकदम संपेल काय ? भ्रष्टाचार नाहीसा होईल काय ? स्वत:ची भाषणे मंत्रिमंडळी स्वत: लिहितील काय ? यांपैकी काहीही होणार नाही.

येथे दोस्तोवस्कीच्या 'कारमाझाव बंधू' या पुस्तकातील एक प्रसंग मी तुम्हांला सांगतो : त्या कादंबरीतील वादळी स्वभावाचा नायक दिमित्री आपल्या घोडागाडीतून भरधाव पळून जात असतो. घोडे भयानक वेगात पळत असतात तरी तो आपल्या सारथ्याला—अ‍ॅड्रीला—म्हणत असतो, "घोडे आणखी जोरात पिटाळ, आणखी जोरात पिटाळ." त्यावर अ‍ॅड्री म्हणतो, "घोडे पिटाळताना त्यांच्या जीवाला काय यातना होईल याचा काही सारथी विचारदेखील करत नाही." त्यावर दिमित्री विचारतो, "का रे अ‍ॅड्री, मी या वेगाने सरळ नरकात जाईन का ?" अ‍ॅड्रीने दिलेले उत्तर मार्मिक आहे. तो म्हणतो, "महाराज, ते निश्चित सांगता येणार नाही. मी फक्त तुम्हांला एक लोककथा सांगतो जेव्हा परमेश्वरपुत्र येशूला सुळी देण्यात आले व तो मृत्यू पावला तेव्हा तो सरळ नरकात गेला आणि त्याने नरकात यातना भोगत असणाऱ्यांना मुक्त केले. त्याबरोबर नरकात एकच हाहा:कार माजला. आता नरकात पापी नावालादेखील राहणार नाही, यापुढे तेथे कोणी येणार नाही, अशी नरकाच्या स्वामींना—सैतानांना—भीती वाटू लागली. त्यांना दिलासा देत येशू म्हणाला, 'घाबरू नका, नरकाच्या सम्राटांनो, चिंता करू नका. आज नरकात असप े लोक माझ्या स्पर्शामुळे येथून निघून गेले तरी लोक रीघ लावून नरकात येत राहतील. त्यांत सरदार, दरकदार, राज्यपाल, मुख्य न्यायाधीश आणि सर्व प्रकारचे श्रीमंत लोक असतील. नरकात येणाऱ्यांचा तुटवडा कधीच पडणार नाही." सारांश, वाङ्मयीन संस्कृती आपल्या समाजात आली की, समाज एका क्षणात बदलेल असे नाही. कदाचित् अशा समाजात होणारी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाची निवडणूक अधिक स्वच्छ पद्धतीने होईल कदाचित् चांगले वाङ्मय कोणते, वाईट कोणते याचा विवेक अधिक होईल. कदाचित् लेखक अधिक प्रामाणिकपणे लिहितील व वागतील. मुख्य म्हणजे जे वाचतात, त्यांनाच वाचक म्हणून संबो[illegible] जाईल आणि साहित्यसंमेलनातील प्रदर्शिनी भाग बराच कमी होईल. हेही नसे थोडके. परंतु मुख्य बदल होईल तो माणसाच्या संवेदनशीलतेत. त्यामुळे त्याच्या अनुभवाची प्रत सुधारेल. तो स्वत:कडे व इतरांकडे माणूस म्हणून बघू लागेल तो जीवनातून जास्त रस उचलेल व जीवनाला जास्त रस देईल. सारी माणसे या यंत्रयुगात एकसारखी होत आहेत ते थोडेफार थांबून, निरनिराळी व्यक्तित्वे निरनिराळ्या तऱ्हेने घडतील आणि

जीवनात भावनिक विविधता अधिक येईल.

या वाङ्‌मयीन संस्कृतीची वैशिष्ट्ये काय असतील ? सध्या आपल्या समाजात उपभोगवाद (कंझ्युरिझम) बोकाळला आहे. धनसंचय व वस्तुसंचय कमालीच्या प्रमाणात वाढत आहे. उच्चभ्रू समाजातील प्रत्येक घरटी निदान एक मुलगा किंवा मुलगी अमेरिकेत स्थायिक होत आहे वा तिकडे धाव घेत आहे. ते 'कुर्वन्तु विश्वमार्यम्' या ध्येयासाठी नव्हे. प्रमाणाबाहेर वाढलेल्या उपभोगवादाचा तो विपाक आहे. साहित्य आणि साहित्यिक यांना बाजारवस्तूचे रूप आले आहे. साहित्यिक आपला माल म्हणजे भाषण वा लेखन यांचे विक्रेते बनले आहेत. त्यांची किंमत—मूल्य नव्हे—सतत वाढत आहे. एखादा लेखक केवळ लेखनावर जगत असेल तर या प्रकारातही आक्षेपार्ह असे काही नाही. परंतु प्राध्यापक, वकील, डॉक्टर, सरकारी वा खाजगी क्षेत्रातले अधिकारी इत्यादी कामे करणारे अनेक लेखक लेखनाचा जोडधंदा करीत असतात. त्यांच्यामुळे एकूणच साहित्यव्यवहाराला व्यापारी देवाणघेवाणीचे रूप आले आहे. वाङ्‌मयीन संस्कृतीत हे बसणारे नाही.

या संस्कृतीत संकुचित विचारांना व भेदांना स्थान असणार नाही, निदान मान तर नक्कीच असणार नाही. विदर्भ, कोकण, खानदेश, चंद्रपूर, वेगुर्ला असे भेद असले तरी त्यांचा उपयोग दुरावा वाढवण्यात होणार नाही. लिहिण्याचा विषय म्हणून एखाद्याने लहानसे क्षेत्र निवडणे वेगळे आणि त्या क्षेत्रात अंगभूत काही मोठे आहे असे समजणे निराळे. आपल्या लिखाणात तीव्रता यावी, उत्कटता यावी, जाण यावी म्हणून आपण लिहिण्याचे क्षेत्र अधिकाधिक लहान करत जातो, ते इतके की शेवटी आपण आपल्यावरच लिहू लागतो. तसे करण्यात काही दोष नाही. परंतु वैयक्तिकतेच्या या बिंदूत सामाजिक सिंधू दिसावा असा प्रयत्न असला पाहिजे. एखाद्या लहान घटातल्या पाण्यात आकाशाचे प्रतिबिंब पडावे तसे हे व्हायला हवे.

अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य हा या संस्कृतीचा पायाच होय. राजकीय क्षेत्रात येणाऱ्या अभिव्यक्तीवरील बंधनांबद्दल मी काही बोलू शकत नाही, कारण तो माझा प्रांत नव्हे. परंतु वाङ्‌मयातील अशा बंधनांची मला माहिती आहे व त्यांचा मी तीव्र निषेध करतो. रामायणातील कूट प्रश्नांवर आंबेडकरांनी लिहिताच एवढा गहजब का व्हावा हे मला कळत नाही. 'रामा रिहोल्ड' या ऑब्रे मेननच्या पुस्तकावर जवाहरलाल कारकिर्दीतही बंदी यावी यापेक्षा मोठे दुर्दैव कोणते ! पंडित नेहरूंचा उल्लेख केला कारण त्यांचे म्हणणे असे होते की, 'स्वातंत्र्यावर' प्रेम करणाऱ्यांनी बेलगामपणालाही भ्यायचे नसते.'' ["Those who love liberty are not afraid of licence"] ''टेन कमांडमेडस्'' प्रसारित होताच ख्रिश्चन धर्म संकटात आला अशी आवइ का उठावी ?

वाङ्‌मयीन संस्कृतीचा विशेष असा की ''ब्राह्मण नाही, हिंदुही नाही, न मी एक पंथाचा । तेचि पतित की जे आखंडिती प्रदेश साकल्याचा.'' असे म्हणणाऱ्या केशवसुतांना

ती डोक्यावर उचलून घेते. सलमान रश्दी या मुसलमान लेखकाला 'सॅटनिक व्हर्सीस' ['Satenic Verses'] लिहावेसे वाटते, कारण तो या वाङ्‌मयीन संस्कृतीचा पाईक असतो. या बाबतीत आपली मते बहुधा जातीय पूर्वग्रहावर आधारलेली असतात. हिंदूंचे एक मतस्वातंत्र्य, मुसलमानांचे दुसरे आणि ख्रिश्चनांचे तिसरे असे काही नसते.

अभिव्यक्तिस्वातंत्र्य आपल्या समाजात आज तरी पूर्णत्वाने नाही. फार पुरातन काळी ते असावेसे वाटते. आज आपले भाषणस्वातंत्र्य जातीयता आणि सोयीचे राजकारण यांच्या कचाट्यात सापडले आहे. तसे नसले तर ज्ञानपीठ पारितोषिक मिळविल्याबद्दल सरकार ज्या कुसुमाग्रजांचा सन्मान करू पाहते, त्या कुसुमाग्रजांच्या "सर्वात्मका सर्वेश्वरा गंगाधरा शिवसुंदरा" या ओळी पाठ्यपुस्तकाबाहेर का जातात ? पूर्ण अभिव्यक्तिस्वातंत्र्य आपल्या समाजात नसावे हे फार दुःखाचे आहे. जातिबद्ध अशा आपल्या बंदिस्त समाजात पूर्वी निदान एक गुण तरी होता : विचारस्वातंत्र्याचा, अभिव्यक्तिस्वातंत्र्याचा. आपली अशिक्षित जनाई प्रत्यक्ष देवाला ठणकावून म्हणते :

*"अरे विठ्या विठ्या । मूळ मायेच्या कारट्या ।।*
*तुझी रांड रंडकी झाली । जन्मसावित्री चुडा ल्याली ।।*
*तुझे गेले मढे । तुला पाहून काळ रडे ।।*
*उभी राहून अगणी । शिव्या देत दासी जनी ।।"*

ही परंपरा आपण गमावली. व इतरांनी आपल्याला कल्चरल फ्रीडमचे, सांस्कृतिक स्वातंत्र्याचे धडे शिकवावे असा प्रसंग आपण आपल्यावर ओढवून घेतला. वाङ्‌मयीन संस्कृती अभिव्यक्तिस्वातंत्र्याशिवाय अस्तित्वात येऊच शकत नाही आणि आली तर टिकू शकत नाही. वाङ्‌मयीन संस्कृतीचे आणखी एक वैशिष्ट्य असे की, एकाच वेळी ती निरनिराळ्या विचारधारांना समान महत्त्व देऊ शकते.

उदाहरणार्थ, माझ्या स्वतःच्याच वैचारिक भूमिकेबद्दल बोलावयाचे झाल्यास मी असे म्हणेन की, इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी केलेले अद्‌भुताचे विश्लेषण[१], वासुदेव बळवंत पटवर्धन यांनी कवितेचे स्फुरण आणि परिस्थिती यांविषयी मांडलेला विचार[२], सुप्रसिद्ध इंग्रज कवी आणि टीकाकार टी. एस. इलियट याचा 'अवैयक्तिक कविते'बद्दलचा [impersonal poetry] सिद्धान्त[३], डॉ. म. ना. वानखेडे यांची सौंदर्याची युगसापेक्ष कल्पना[४] आणि कलानिर्मिती आणि संकल्पना याबद्दल डॉ. रा. भा. पाटणकरांनी सांगितलेला सिद्धान्त[५] हे सगळे मान्य करताना मला अडचण वाटत नाही.

'कादंबरी' या आपल्या निबंधात श्री. वि. का. राजवाडे यांनी खालील उद्‌गार काढले आहे : (१)

*"या अनंत सृष्टीत ज्यावर मनुष्याचा काडीचाही ताबा नाही, ज्यांच्याशी त्याला यत्किंचितही ढवळाढवळ करता येत नाही अशाच बहुतेक मूर्तामूर्त वस्तू आहेत. ही*

*मनुष्याच्या दुर्बलतेची जी खात्री तीच अद्‌भुताच्या मुळाशी आहे. साक्षात सृष्टी, वास्तविक सृष्टीमध्ये आपले काहीएक चालत नाही अशी मनाची बालंबाल खात्री झाली म्हणजे मग मनुष्यप्राणी कल्पनेच्या सृष्टीत, अद्‌भुताच्या सृष्टीत आपला ताबा मनपुराद चालवू लागतो. वास्तविक सृष्टीतील अपूर्णता, अद्‌भुतसृष्टीत पूर्णतेप्रत पोचलेली आढळते.''*

'काव्य आणि काव्योदय' (१९०९) या आपल्या निबंधात वा. ब. पटवर्धन लिहितात : (२)

*''राजकीय परिस्थिती कोणतीही विशेष ठळक मनावर कायमचे संस्कार करणारी घडामोड होवो, तिच्यामागे प्रतिभाशाली कवींना काव्यवाणी फुटते, असा सर्वसाधारण नियम दिसतो. त्या वाणीने प्रगट होणारे मनोविकार जोमदार आणि तेजस्वी असणे हे भौतिक परिस्थिती, वंशपरंपरा, राजकीय स्थितीची कमीजास्त तीव्रता व वैयक्तिक प्रकृतिविशेष यावर अवलंबून असते. एकाच राजकीय परिस्थितीचे आणि भौतिक परिस्थितीचे कार्य त्या सर्वांवर झाले तरी त्यांच्या वैयक्तिक प्रकृतिभेदामुळे हे कार्य भिन्न स्वरूपात होते.''*

"Tradition and Individual Talent" ('परंपरा आणि वैयक्तिक गुण') या आपल्या निबंधाच्या शेवटी इलियट म्हणतो : (३)

*''कविता म्हणजे भावनेचा बांध फुटणे नव्हे. कविता म्हणजे भावनेपासून मुक्ती. कविता म्हणजे व्यक्तिमत्त्वाचा आविष्कार नव्हे. कविता म्हणजे व्यक्तिमत्त्वापासून मुक्ती.''* *["Poetry is not a turning loose of emotion, but an escape from emotion; it is not the expression of personality, but we escape from personality."]*

डॉ. म. ना. वानखेडे आपल्या १९७६ मधील अखिल भारतीय दलित साहित्यसंमेलनातील अध्यक्षीय भाषणात म्हणतात : (४)

*''खरे म्हणजे सौंदर्य ही सापेक्ष कल्पना आहे. हे निरंतर किंवा चिरंजीव सत्य आहे असे मला वाटत नाही. सौंदर्याच्या कल्पना त्या त्या युगाशी संबंधित असतात.''*

'कमल देसाई यांचे कथाविश्व' या पुस्तकाच्या प्रस्तावनेत डॉ. रा. भा. पाटणकर लिहितात : (५)

*''माणूस आपल्या स्वतंत्र संकल्पशक्तीचे (The will) प्रचोदन करून संकल्पनांच्या मार्गदर्शनाखाली कलानिर्मिती करत असतो. निसर्गापेक्षा कला जी वेगळी ठरते ती या कारणाने. निसर्गात गोष्टी घडतात व त्या कलेत घडविल्या जातात.''*

हे सर्व विचार माझ्या मनात एकत्र नांदतात. एवढेच नव्हे तर ने एकजीव होतात. काही लोकांना असे वाटले की, हे विचार एकमेकांशी काही प्रमाणात विरोधी असल्यामुळे माझ्या वैचारिक भूमिकेत विसंगती आहे. असेल, तसेही असेल. या बाबतीत मी वॉल्ट व्हिटमन या अमेरिकन कवीच्या ओळी उद्धृत करून म्हणेन :

*"Do I contradict myself ?*

*Very well, then I contradict myself.*

*I am large. I contain multitudes."*

("माझ्यात अंतर्विरोध आहे काय ? असेल तर असू दे. कारण मी विशाल आहे. माझ्या एकात अनेकांचा समावेश आहे.")

अशा या वाङ्मयीन संस्कृतीची मुळे आपल्या जमिनीत असली पाहिजेत. पूर्वी एकदा संस्कृत भाषेपासून मराठी माणसाची सुटका करण्याचा प्रयत्न संतांनी केला. त्याच प्रकारची पण त्याहून तीव्र आणि प्रखर अशी गरज आज आहे. ती इंग्रजी वाङ्मयापासून आपली सुटका करण्याची. काही झाले तरी संस्कृत ही आमच्या भाषांची जननी. त्यामुळे लेक आईपासून दूर जाऊन आपला स्वतंत्र संसार थाटू लागल्यासारखा प्रकार संस्कृत-मराठीच्या बाबतीत झाला. इंग्रजी भाषेचे तसे नाही. ती आमचे अस्तित्व पुसून टाकेल की काय, अशी भीती निर्माण झाली आहे. ब्रिटिशांनी येथे आणलेल्या इंग्रजीने काही वर्षे तरी वाघिणीच्या दुधाचे कार्य केले. समता, न्याय, बंधुत्व, वैज्ञानिक दृष्टी इत्यादी मूल्यांचा परिचय तिने करून दिला. परंतु आता इंग्रजी आमच्या मानगुटीवर बसू पहात आहे. तिचे स्वरूप व्यापारी आक्रमणासारखे आहे. हे आक्रमण सूक्ष्म असले तरी सर्वव्यापी आहे. १८३७ साली अमेरिकन विचारवंत इमरसन याने आपल्या 'अमेरिकन स्कॉलर' ['American Scholar'] या भाषणात अमेरिकन तरुणांना इंग्रजीच्या व युरोपच्या वैचारिक जोखडापासून मुक्त होण्याचा संदेश दिला होता. तसा संदेश आपल्या लोकांना देण्याची वेळ आली आहे. एका इंग्रजी वाङ्मयाने दुसऱ्या इंग्रजी वाङ्मयाशी घेतलेली ही फारकत अमेरिकेच्या अस्मितेच्या दृष्टीने आवश्यक होती. आपल्या दृष्टीने तर या संबंध-विच्छेदाचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. पण असे करण्यात एक धोकाही आहे. इंग्रजी भाषा आणि साहित्य यांचा प्रभाव झुगारून देणे हेच आपले केवळ उद्दिष्ट असेल तर कदाचित आपण पुन्हा एकदा भूतकाळात जाऊ व पुन्हा एकदा अंधारयुगाकडे, भाकडकथांकडे, अंधविश्वासाकडे, संकुचित व्यवहाराकडे जाण्याची भीती निर्माण होईल. आपल्या भाषेची अभिमानाने जोपासना करावयाची, पण हवे तेव्हा हवे तितके परकीय संस्कार घेत राहायचे ही एक तारेवरची कसरत असली तरी अत्यंत आवश्यक आहे.

"The Meaning of Art" ('कलेचा अर्थ') या आपल्या निबंधात ज्यांच्या भारतीयत्वाबद्दल तिळमात्र शंका नाही असे रवींद्रनाथ टागोर म्हणतात :

*"फक्त सुमार ताकदीच्या लोकांना परकीयांची उधारी करण्यात संकोच वाटतो. कारण घेतलेले सव्याज परत करण्याची त्यांची ताकद नसते. शेक्सपीयरने आपल्या राष्ट्रीय वारशाबाहेरचे इतरांपासून जे जे घेतले त्याबद्दल एखादा मूर्ख टीकाकार देखील*

*त्याला दूषण देणार नाही.*" "*Only mediocrities are ashamed and afraid of borrowing; for they do not know how to pay back the debt in their own coin. Even the most foolish of critics does not dare blame Shakespeare for what he openly appropriated from outside his national inheritance.*"

देशीपणा म्हणजे मागासलेपणा नाही, आंधळा अभिमान नाही. आपले साहित्य सच्चे असावे, आपले असावे, हाच देशीपणाचा मुख्य उद्देश आहे. आपल्या अस्तित्वाची ही जाण म्हणजे त्याविषयीची नुसतीच चर्चा किंवा माहिती नव्हे. लेखकाच्या व्यक्तित्वात मुरलेली ही जाण वाङ्मयाच्या स्वरूपात म्हणजे कथा म्हणून, कविता म्हणून, नाटक म्हणून प्रगट झाली पाहिजे. मातीची ही जाण साहित्यिक स्वरूपाची असेल; तिचे राजकीय रूप या ठिकाणी मला अभिप्रेत नाही.

अशा तऱ्हेची वाङ्मयीन संस्कृती हे एक स्वप्न आहे काय ? ते प्रत्यक्षात येऊ शकते काय ? कधी अशी साहित्यिक संस्कृती कोठे अस्तित्वात होती काय ? मला वाटते, जगाच्या इतिहासात अशी पर्वे आढळतात. ग्रीकच्या इतिहासात असे सुवर्णयुग ख्रिस्तपूर्व पाचव्या ते तिसऱ्या शतकांत अवतरले होते. चीनच्या इतिहासातला तांग राजवंशाचा काळ—सातव्या ते दहाव्या शतकांचा काळ—हा अशाच प्रकारचा काळ होता. आपल्याकडील संतवाङ्मयाचा काळ हे आणखी एक उदाहरण म्हणून देता येईल. अगदी जवळचे उदाहरण म्हणजे बंगाल आणि महाराष्ट्र या दोन प्रांतांत एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला घडून आलेले अपूर्ण प्रबोधन. त्यातल्या प्रत्येक पर्वाला एक मोठे प्रयोजन होते. ग्रीक सुवर्णयुगातल्या वाङ्मयाला लोकशाही मूल्याची, चीनच्या तांग-युगातल्या वाङ्मयाला टोळीचे जीवन सोडून स्थिर समाज स्थापण्याची, संतकाव्याला भागवतधर्माची, आणि आपल्याकडील जागरणाला राजकीय आणि सामाजिक स्वातंत्र्याची प्रेरणा होती.

असे काही प्रयोजन आज आपल्या वाङ्मयाला मिळेल काय ? मला वाटते की, आपल्या समाजाचे मानवीकरण करण्याची धडपड आपल्या नव्या वाङ्मयीन संस्कृतीतील प्रेरणा ठरेल. आपल्या समाजातील मानवीकरण साहित्याला दोन प्रकारे करता येईल : ज्यांना माणुसकीने वागवले जात नाही अशा पीडित जनतेशी एकरूप होणे, स्त्री-शूद्रांची आपल्या समाजात जी अवस्था आहे तिचा धिक्कार करणे हा एक भाग झाला. दुसरा भाग म्हणजे माणूस आहे तसा दाखवणे. आपल्याकडील साहित्यातला माणसू एक तर देवरूपाने प्रगट होतो, नाहीतर पशू म्हणून. मानवीकरणाची ही प्रेरणा आपल्या वाङ्मयीन संस्कृतीला आधारभूत ठरली तरच आपल्या साहित्याला अर्थ येईल. आणि त्याचे नाते जास्तीत जास्त लोकांशी प्रस्थापित होईल. म्हणूनच आपल्याला उद्याच्या महाकवीचे स्वागत आज करावयाचे आहे. शरच्चंद्र मुक्तिबोधांच्या शब्दात :

*'येई येई महाकवे । आज मुक्त कठाने ।*
*अन्नसागराचे प्रेमसरिताचे गीत गा ''*

हे आवाहन करण्याचे कारण मला दिसते ते असे प्रसिद्ध इग्रज टीकाकार मॅथ्यू अरनॉल्ड म्हणतो त्याप्रमाणे, आजउद्या धर्माचे स्थान साहित्य घेणार आहे धर्माची उचलबागडी करण्याचा प्रयत्न कोणी केला तर तो यशस्वी होणार नाही, हे मी जाणतो परतु धर्माचे पूर्वी जे सर्वजीवनव्यापी स्वरूप होते ते आता टिकणार नाही कारण सर्व धर्माच्या मुळाशी असणारे काव्यतत्त्व आता सपले असून आज धर्म म्हणजे रूढी, धर्म म्हणजे मस्था, धर्म म्हणजे असहिष्णुता असा प्रकार झाला आहे धर्माने इतिहासकालीन माणसाच्या मानवीकरणाचे कार्य केले आहे यात शकाच नाही परतु आज धर्मात ती ताकद उरली नाही आजची परिस्थिती अशी आहे की, श्रद्धावताला फक्त आपलाच धर्म खरा वाटता तत्त्वज्ञानी माणसाला कोणताही धर्म खरा वाटत नाही आणि राजकारणी माणसाला सर्व धर्म 'उपयोगी' वाटतात *("For a believer his own religion is true for a philosopher no religion is true and for a politician all religions are useful")*

धर्माची जागा साहित्य घेणार असे म्हणताना साहित्यिकाच्या मनावर असणाऱ्या धार्मिक सस्काराच महत्त्व मी कमी लेखत नाही उलट, माझे असे मत आहे की, प्रत्येक लेखकाच्या धार्मिक सस्काराचा स्पष्ट ठसा त्याच्या सवेदनशीलतेवर राहतो व तो राहिला पाहिजे एरव्ही त्याच्या लेखनात सच्चेपणा येणार नाही रवीद्रनाथ टागोराची सवेदनशीलता हिदू वळणाची, डॉ मोहम्मद इक्बाल याची सवेदनशीलता मुस्लिम वळणाची आणि टी एस एलियट याची सवेदनशीलता ख्रिश्चन वळणाची असण्यातच त्या त्या कवीच्या सवेदनशीलतेच्या सच्चेपणाची ग्वाही आहे जेम्स जॉइससारखा एखादा लेखक आपली ख्रिश्चन परपरा झुगारून देत असला तरीही त्याच्या सवेदनशीलतेतून ख्रिश्चन धर्माचा ठसा पूर्णपणे गेलेला आपल्याला दिसणार नाही स्वत बद्दलचे उदाहरण आत्मप्रशसेने नव्हे तर हा मुद्दा स्पष्ट करण्यासाठी मी येथे देत आहे

'कथाकार शाताराम' या माझ्यावरील पुस्तकात डॉ ग भा पाटणकर लिहितात "शातारामाच्या कथामध्ये दिसणारा व्यूह भारतीय परपरेतला आहे तिला उदार हिदू परपरा म्हटले तरी चालण्यासारखे आहे मला येथे एकरूपजीवनवादी हिदुत्वनिष्ठ परपरा अभिप्रेत नाही 'हिदुत्वनिष्ठ' या शब्दाला आज एक अपमूल्यात्मक अर्थ प्राप्त झालेला आहे या हिदुत्वनिष्ठ सकल्पनेचे स्वरूप प्रतिक्रियात्मक आहे नवव्या शतकाच्या आधी भारतात विविध अतिभौतिकीय, तत्त्वज्ञानात्मक मते होती, परतु आचाराबद्दल बरीच एकवाक्यता होती आणि जेथे ती नव्हती तेथे बरीच सहिष्णुता होती ब्रिटिशपूर्व काळातील भारतीय परपरेत (प्रामुख्याने हिदू परपरेत आणि जैन, शीख, बौद्ध व मुस्लिम याच्याही परपरेत) पुष्कळ सहिष्णुता होती शातारामानी ही परपरा स्वीकारली

आहे. कारण आपल्या येथील वैविध्यपूर्ण जनसमुदायाचे संश्लेषण करण्यासाठी दुसऱ्या कोणत्याच परंपरेची चौकट उपयोगाची नाही.'' मी किती श्रेष्ठ कथाकार आहे हे दाखवण्यासाठी हे अवतरण मी आपणांसमोर ठेवलेले नाही. हे अवतरण देण्याची उद्दिष्टे दोन : एक, वाङ्मयीन संस्कृतीत आवश्यक असणाऱ्या एका घटकाकडे— सहिष्णुतेकडे आपले पुन्हा लक्ष वेधावे हा; आणि दुसरा हेतू आधुनिक माणसाचा प्रश्न आपल्यापुढे मांडणे हा होय. ज्या गटात लेखक जन्मला, वाढला त्याच्या रूढी काही प्रमाणात तो झुगारत असला तरी सामाजिक गरज म्हणून त्यांतल्या काही तो पाळतही असतो. परंतु त्याचे खरे नाते, विशेषत: लेखक म्हणून वाङ्मयीन संस्कृतीवर त्याचा विश्वास असला तर, धर्माच्या काव्यतत्त्वाशी म्हणजे अध्यात्मतेशी असते. कामूच्या 'प्लेग' या कादंबरीत एक डॉक्टरचे पात्र आहे. प्लेगच्या साथीत लोकांना वाचवणे हे त्याच्या दृष्टीने अध्यात्म असते. तोच त्याचा धर्म असतो. तो म्हणतो : *''Modern man's problem is how to be spiritual without being religious.''* धार्मिक नसूनही अध्यात्मवादी कसे होता येईल, राहता येईल ही आधुनिक माणसाची समस्या आहे. या अध्यात्मवादाच्या केंद्रस्थानी मनुष्य असतो. एका विशिष्ट धर्माने मान्य केलेला ईश्वर नसतो. वाङ्मयीन संस्कृतीचे अध्यात्म या प्रकारचे असते.

येथे मी 'अध्यात्म' हा शब्द वापरला आहे इकडे आपण विशेष लक्ष द्यावे अशी माझी विनंती आहे. अध्यात्म ही केवळ मानसिक गोष्ट नव्हे. त्यात कृतीही अंतर्भूत असते. संस्कृती या शब्दातील कृतीचा स्वर तर कोणालाही ऐकू येईल इतका स्पष्ट आहे. या कृतीपासून लेखक स्वत:ला मुक्त ठेवू शकत नाही. लेखनस्वातंत्र्याच्या मूल्याविषयी मी बोललो आहेच. त्याचा पुनरुच्चार करावा एवढे ते महत्त्वाचे आहे. कोणत्याही स्वातंत्र्यासाठी किंमत मोजावी लागते, एक प्रकारची नैष्ठिकता आवश्यक असते, इकडे आम्हा लेखकमंडळींचे पुरेसे लक्ष नाही. लेखकाला कोणी फुकट प्रवास करू देत नाही; लेखनसामग्री—कागद, पुस्तके इत्यादींसाठी त्याला पैसे खर्च करावे लागतातच. परंतु लेखनावर त्याची उपजीविका अवलंबून नसेल तर त्याने पैशाच्या मागे किती लागावे हा खरा प्रश्न आहे. आमच्या लेखकांची—त्यांना लेखक म्हणून मान्यता मिळाल्यावर—स्वत:च्या खर्चाने प्रवास करण्याची ताकदच संपते असा प्रत्यय आपल्यापैकी अनेकांना आला असेल. पैसा देणारा कोणी असो, सरकार असो, व्यक्ती असो, खाजगी संस्था असो, 'ज्याचे खावे, त्याचे गावे' यातून सुटका नाही. भरपूर पैसे घेऊन एखाद्या गावी व्याख्यानाला—अगदी धार्मिक विषयावरील व्याख्यानाला—गेलेला प्रथितयश लेखक व्याख्या संपल्यावर तेथील आश्रयदात्या चाहत्यांच्या मैफलीत कंबरेखालचे विनोद (smutty jokes) सांगताना दिसला की मला कीव व चीड येते. आमची व्याख्याने, आमची सभासंमेलने यांच्यावर मोठ्या पैशाचे सावट फार जोरात पसरू लागले आहे. चॅपमनने भाषांतरित केलेले होमरचे साहित्य वाचून इंग्रज कवी कीटस्

म्हणाला : "I travelled in the realms of gold." —"मी सुवर्णाच्या राज्यात प्रवास केला." हे सुवर्ण पैशाचे नव्हे, ते भावनेचे, विचाराचे, कल्पनेचे होय हे नीट ओळखणे वाङ्मयीन संस्कृतीत अत्यावश्यक आहे.

आपल्या साहित्यावर मी फार मोठ्या कार्याचे ओझे लादतो आहे असा आपला समज झाला तर तो चुकीचा आहे. हे सगळे साहित्याच्या रूपात, त्याचे नियम सांभाळून, आणि आवश्यक वाटले तर नियम तोडून व्हायचे आहे.

मी काही नवीन सांगितलेले नाही. आपण ग्रंथदिंडी काढतो, ग्रंथयात्रा भरवतो. त्या सर्वांना विशिष्ट साहित्यिक जाणिवेचा आधार असावा आणि दिंडी, यात्रा इत्यादी केवळ रूढी वा क्लृप्त्या होऊ नयेत म्हणून वाङ्मयीन संस्कृतीच्या काही घटकांची फोड करण्याचा मी प्रयत्न केला आहे. मी सांगितलेले काम सध्याचे साहित्य थोड्याफार प्रमाणात करीतच आहे. मी फक्त त्यावर जोर दिला आहे एवढेच. या कामापुळेच आपल्या भाषेला महत्त्व आहे व राहणार आहे. आपली भाषा ही आपल्या संस्कृतीची वाहक आहे. पूर्वी संस्कृतला देवभाषा, गीर्वाणभाषा म्हणत, कारण तिचे साहित्य. एक विशिष्ट दर्शन घडविणारे, पुरुषार्थी जीवनदर्शन घडविणारे साहित्य निर्माण करण्याची संस्कृत भाषेची शक्ती. नाराणबास महानुभवाने मराठीला देववाणी म्हटले आहे, कारण ती प्रत्यक्ष चक्रधरांच्या मुखातून निघाली.

*जे आर्तवछनंदनी : तापोपसमन कादंबिनी*
*ते नमस्करू अमृतसंजीवनी : श्री देववाणी*

एखादी भाषा किती लोक बोलतात, त्यापेक्षा त्या भाषेत लोक काय बोलतात, काय लिहितात इकडे आपले लक्ष असावे एवढंच माझे म्हणणे आहे. साहित्याकडे लेखकाने, वाचकाने, गंभीरपणे बघावे हा या माझ्या भाषणाचा मथितार्थ. साहित्य केवळ गंभीरच असावे असे मी म्हणालो नाही. साहित्य हा विविध रसांचा संसार आहे, व तेच त्याचे रूप सर्वकाळ राहील. मी फक्त या संसाराच्या प्रेरणांचे व कार्याचे माझ्या बुद्धीने वर्णन केले आहे एवढेच.

मी आपल्याला काही सांगू शकलो असेन तर मला धन्यता वाटेल. आपण त्याचा गंभीरपणे विचार करावा, अशी माझी विनंती आहे. मराठी लेखकाला मिळणारा सर्वोच्च मान मला देऊन आपण माझे चार शब्द एकून घेतल्याबद्दल मी आपला कृतज्ञ तर आहेच आहे.

❑❑❑

**टीप : भाषणाच्या छापील प्रतीमध्ये तळटीपा दिलेल्या नाहीत.**

# पुणे : १९९०

# प्रा. डॉ. यू. म. पठाण

---

त्रेसष्टाव्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे उद्घाटक, स्वागताध्यक्ष, इथं उपस्थित असलेले पूर्वाध्यक्ष, मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व सदस्य, संमेलनाच्या स्वागत समितीचे सदस्य आणि महाराष्ट्रातील व बृहन्महाराष्ट्रातील साहित्यप्रेमी रसिकहो.

महाराष्ट्राचं सांस्कृतिक केंद्र असलेल्या पुण्यनगरीत हा साहित्यसोहळा 'ज्ञानेश्वरी'च्या सप्तशताब्दिवर्षात, म. फुले यांच्या स्मृतिशताब्दिवर्षात आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या जन्मशताब्दिवर्षात, साजरा होत आहे, याचा मला अत्यंत आनंद वाटतो. साहित्य संमेलनाचं हे अध्यक्षपद साहित्यातील दिग्गजांनी आजवर भूषविलं आहे, ज्यानं साहित्याची फार अल्प-स्वल्प सेवा केली आहे, अशा माझ्यासारख्या साहित्य-सेवकावर, मराठी रसिकांनी अत्यंत विश्वासानं व जिव्हाळ्यानं अध्यक्षपदाची ही फार मोठी जबाबदारी सोपविली आहे. त्याबद्दल कृतज्ञतेची भावना व्यक्त करून, मी माझ्या भाषणाला प्रारंभ करतो.

पुणे शहरानं महाराष्ट्राच्या सांस्कृतिक व वाङ्मयीन विकासाला फार मोठा हातभार लावला आहे. या नगरीला फार मोठी अशी परंपरा लाभली आहे. त्या परंपरेविषयी मी आपल्याला सांगायला हवं असं नाही. महात्मा जोतीराव फुले, न्या. महादेव गोविंद रानडे, विठ्ठल रामजी शिंदे, लोकहितवादी, चिपळूणकर, आगरकर, टिळक, राजवाडे, महर्षी कर्वे, वा. म. जोशी, म. म. दत्तो वामन पोतदार, तात्यासाहेब केळकर यांच्यासारख्या महापुरुषांनी पुण्याच्या व पर्यायानं महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जडणघडणीस मोलाचा हातभार लावला आहे. मराठी वाङ्मयाच्या विकासालाही त्यामळं फार मोठी गति लाभली आहे. अशा या पुण्यनगरीत होत असलेला हा साहित्य-सोहळा मोठा सुखद आहे, यात संशय नाही

## सन्तसाहित्य :

महाराष्ट्राला सन्तसाहित्याचा फार मोठा वारसा लाभला आहे. फार मोठी, उदात्त, भव्य, दिव्य अशी परंपरा लाभली आहे हे महाराष्ट्राचं भाग्यच होय. सन्तसाहित्याचा

हा नन्दादीप महाराष्ट्रात गेली अनेक शतकं तेवत आहे. अध्यात्माचा, मानवतेचा, उदात्त जीवनमूल्यांचा, विचार आणि आचार यांच्या शुचितेचा, 'सर्वभूती भगवद्भावा'चा नि समतेचा, विवेकाचा नि विशुद्ध प्रेमाचा, सहिष्णुतेचा नि समन्वयाचा, महाराष्ट्रधर्माबरोबरच विश्वधर्माचाही सन्देश या नंदादीपाच्या शीतल, सुखद प्रकाशानं सतत दिला आहे. मराठी मन या प्रकाशात उजळून निघालं आहे, सुसंस्कारित झालं आहे. 'को ऽ ह्म्' या गहन प्रश्नाचं उत्तर शोधत शोधत 'सो ऽ ह्म्' या अवस्थेप्रत येण्याची समग्र प्रक्रियाच या सन्तसाहित्यानं उलगडून दाखविली आहे. मराठी वाङ्मयही त्यामुळं अत्यंत संपन्न आणि समृद्ध झालं आहे. सन्त-प्रतिमेचे मनोहर नवनवोन्मेष त्यातून प्रकटले आहेत, आणि त्यांनी केवळ महाराष्ट्राला वा भारतालाच नव्हे तर संपूर्ण विश्वालाच दिपवून टाकलं आहे. ज्या 'ज्ञानेश्वरी' या अपूर्व, एकमेवाद्वितीय, ग्रंथाची सप्तशताब्दि आपण या वर्षी साजरी करीत आहोत, तो ग्रंथ या वाग्वैजयंतीतील जणू 'कौस्तुभ'च होय. ज्ञानदेव ही जशी महाराष्ट्राची माऊली, तशी 'ज्ञानदेवी' हीदेखील महाराष्ट्राची माऊलीच होय. या ग्रंथानं मराठी माणसाला मातेचं वात्सल्य दिलं. त्याच्यावर सुसंस्कार केले. आसुरी संपत्तीचा त्याग करून दैवी संपत्तीचा स्वीकार केल्यानं लौकिकातून पारलौकिकाची वाट कशी गवसते, याचा जणू वस्तुपाठच दिला. 'भेटीलागी गेले तव तेचि जालिये' अशा समाधीच्या अद्वैतावस्थेप्रत कसं जाता येतं, याचा मोठा रेखीव, देखणा, प्रेरक आलेख ज्ञानदेवांच्या व्यक्तिमत्त्वातून नि त्यांच्या 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथातून प्रतिबिंबित झाला आहे. पुढच्या अनेक शतकांनीही ज्यांच्या वाटेकडे मोठ्या आशेनं डोळे लावून बसावं, असे हे ज्ञानदेव आणि त्यांची 'ज्ञानदेवी'.

यादवकालीन सन्त-महन्तांनी मराठी भाषेची अस्मिता जागवली. महानुभाव सम्प्रदायाचे अवतारस्वरूप श्रीचक्रधरस्वामी आणि वारकरी सम्प्रदायाचे सन्त श्री ज्ञानदेव हे तर या महान कार्यातले अग्रणीच होत. संस्कृत भाषा ही गीर्वाणवाणी होती तर मराठी ही तत्कालीन जनसामान्यांची लोकभाषा होती. गीर्वाणवाणीचं सारं वैभव मान्य करूनही या महापुरुषांनी 'जनहिताच्या कळवळ्यापोटी' मराठी भाषेचा पुरस्कार केला. तुकोबांनी म्हटल्याप्रमाणं 'बुडती हे जन, न देखवे डोळां' हीच लोकभाषेच्या पुरस्कारामागील त्यांची प्रेरणा होती. 'तुमचा अस्मात् कस्मात् मी नेणे गा, माझिये मऱ्हाटी, तियेचि पुसा' असं म्हणणारे महानुभाव संत आणि

*"म्हणौनि माझे नीच नवे । श्वास ही प्रबंध होआवे ।*
*गुरुकृपा काइ न्हवे । ज्ञानदेओ म्हणे ॥*
*याकारणे मियां । गीतार्थु म-हाटिया ।*
*केला लोकालागि या । दीठिचा विखो ॥*
*परि म-हाटे बोल रंगे । कवळितां जै गीतांगे ।*

*तैं गातेयाचेनि पांगे। एकावट जाले ॥"*

असं म्हणून आपल्या 'म-हाटाच बोलां'नी अमृतातेही पैजा जिंकणारे ज्ञानदेव या दोहोंची लोकभाषेच्या पुरस्कारामागील भूमिका समानच होती. समकालीन प्रस्थापितांचा विरोध पत्करूनही त्यांनी मराठी भाषेचा आग्रह धरला आणि त्या भाषेतच लेखन करून तिला समर्थ केलं, समृद्ध केलं, संपन्न केलं. त्यांच्यापूर्वी भगवान गौतम बुद्धांची पाली या लोकभाषेचा व भगवान महावीरांची अर्धमागधी या लोकभाषेचा धर्मभाषा म्हणून स्वीकार करण्यामागील जी भूमिका होती, तिचंही इथं स्मरण झाल्याशिवाय राहात नाही.

लोकभाषेची अस्मिता जागवल्यावर महाराष्ट्राच्या सन्तप्रतिमेला कितीतरी धुमारे फुटले. मऱ्हाटी लोकसंस्कृतीचे अन्त:स्रोत त्यातून प्रकटले. लोकसंगीत, लोकगीत. लोककथा, लोकनृत्य, लोकविधि यांची शतकानुशतकं वाहणारी गुप्त गंगाही या अन्त:स्रोतातच दडली होती, तीही सन्तसाहित्यानं घेतलेल्या विविध रूपांतून प्रकटली. यांत धवळे होते, अभंग होते, धावे होते, विराण्या नि सौऱ्या होत्या, भारूडं नि सम्पादण्या होत्या, पदं होती, गवळणी होत्या, आख्यानं - उपाख्यानं होती, पौराणिक चरित्रं नि सन्तचरित्रं होती, स्फुट प्रकरणांप्रमाणंच भाष्यग्रंथही होते. जणू साहित्यसोनियाच्या खाणीच या विविध रूपांनी प्रकटल्या होत्या नि त्यांनी मराठी मनाला दिपवून टाकलं होतं, अवाक् केलं होतं.

मराठी संतांनी लोकभाषेचं हे माध्यम लोकप्रबोधनासाठी स्वीकारलं होतं. आत्मोन्नती किंवा मुक्ती हेच मानव जीवनाचं अन्तिम उद्दिष्ट व फलित होय, ही त्यांची श्रद्धा होती, निष्ठा होती. पण हे पारलौकिक उद्दिष्ट साध्य करायचं असलं तरी त्याला लौकिक जीवनाचंच अधिष्ठान लाभलं आहे, या गोष्टीचा सन्तांना कधीही विसर पडला नाही. म्हणूनच त्यांनी लौकिक जीवनाच्या अनेकांगांचा, त्यातील सुखदु:खांचा, त्यावर येणाऱ्या सावटाचा नि हे सावट कसं दूर करता येईल, याचा समरसून विचार केला आहे. धर्माच्या या अन्तिम उद्दिष्टाच्या प्राप्तीत अनेक अडसर निर्माण झाले होते. वर्णव्यवस्थेमुळं समाजात निर्माण झालेला श्रेष्ठ-कनिष्ठभाव व त्यातून निर्माण झालेली विषमतेची खोल खोल दरी सन्तांना तीव्रतेनं जाणवत होती. त्या दरीत कोसळलेला समाज कसा दुभंगत चालला आहे, याचं दारुण चित्र सन्तांनी पाहिलं होतं. धर्माच्या नावाखाली वर्णवर्चस्वाचा, पोथीपांडित्याचा, अनावश्यक कर्मकांडांचा, अनेकदैवतवादाचा, व्रतवैकल्यांचा, अंधश्रद्धेचा नि बुवाबाजीचा जो बडिवार माजवला जाऊ लागला त्यामुळं जनसामान्यांची 'थोर नागवण' झाली होती. सन्तांनी आपल्या परखड वाणीनं या पाखांडाचं खंडन केलं. तुकोबांसारख्या विविध सन्तांचे पाखांड खंडनात्मक अभंग याची साक्ष देतात. एका अर्थानं सन्तांनी त्या काळात केलेलं हे समाजप्रबोधनच होतं. महात्मा बसवेश्वरांनी ज्याप्रमाणं 'काय कवे कैलास' या वचनातून 'कोणतंही कर्म हे कैलासाप्रमाणं श्रेष्ठच असतं,' त्यात उच्चनीचता नसते, हे आग्रहपूर्वक प्रतिपादिलं, त्याप्रमाणं महानुभाव

सम्प्रदायाचे श्री चक्रधर स्वामी व श्री गोविंदप्रभू यांनी वर्णव्यवस्थेतून निर्माण झालेल्या विषमतेला तीव्र विरोध केला. तथाकथित प्रस्थापितांनी ज्यांना शूद्रातिशूद्र म्हणून अव्हेरिलं, त्यांना मातेच्या मायेनं आपल्या कुशीत घेतलं, पंथाची दीक्षा दिली आणि समाजात अन्य वर्णाच्या बरोबरीचं स्थान मिळवून दिलं. 'लीळाचरित्र' आणि 'श्री गोविंदप्रभु चरित्र' या ग्रंथांत याची जागोजाग प्रमाणं आढळतात. एके काळी ज्या स्त्रीला भारतीय संस्कृतीत मानाचं स्थान होतं, गार्गी आणि मैत्रेयी यांच्यासारख्या विदुषींनी जे स्थान भूषविलेलं होतं, ते स्थान जाऊन स्त्रीलाही भक्तीचा व मुक्तीचा अधिकार नाही, असं सांगितलं जाऊ लागलं होतं. महानुभाव संतांनी आणि ज्ञानदेवांसारख्या वारकरी संतांनी स्त्री आणि शूद्र यांना भक्तीचा व मुक्तीचा, अन्य वर्णियांप्रमाणंच, समान अधिकार आहे, या समतावादी विचाराचा पुरस्कार करून तत्कालीन धर्मव्यवस्थेचं पुनर्व्यवस्थापन केलं. दुभंगलेल्या समाजाची विस्कटलेली घडी पुन्हा नीट बसवली. दुभंगलेली मनं सांधली. महानुभाव संप्रदायाच्या ध्वजाखाली अन्य वर्णियांप्रमाणंच शूद्रातिशूद्रच नव्हे तर भिल्ल, गोड आणि आदिवासीही आहे. महदाइसा, हिराइसा, आउसा यांच्यासारख्या महानुभाव पंथाला अनुसरलेल्या स्त्रियांचं स्थान अनन्यासाधारण आहे. चोखामेळा, गोरा कुंभार, सेना न्हावी, सावता माळी यांच्यासारखे ज्ञानदेवांच्या प्रभावळीतील विविध जातिजमातीतले सन्त वारकरी सम्प्रदायाच्या ध्वजाखाली जमले. पुढच्या काळात शेख महंमदासारखे इस्लामधर्मीय सन्तही या सम्प्रदायाशी एकरूप झाले. सन्त एकनाथाच्या विठूनाथानं 'जोहारा'तून घातलेली गवांदी मोठी सूचक वाटते. 'बरा देवा कुणबी केलो । नातरि दंभे असतो मेलो' या तुकोबांच्या अभंगवाणीतून प्रकटलेली भावनाही लक्षणीय आहे. मन्मथस्वामी, बसवलिंग आणि शांतलिंग स्वामी यांच्यासारख्या वीरशैव सतांनीही आपल्या वर्णव्यवस्थेतील विषमतेचा प्रखर विरोध केला आहे. जैन मराठी सन्तांनीही या समतेचाच पुरस्कार आपल्या लेखनातून केला आहे. नागेश सम्प्रदाय हा तर तेराव्या-चौदाव्या शतकातील एक समन्वयवादी सम्प्रदायच होता. या सम्प्रदायाच्या अनुयायांत धनगर, तेली, वीरशैव, महार, मुसलमान, ब्राह्मण इ. विविध जातिधर्मातील लोक होते. एकलिंग तेली, अल्लंखान, अज्ञानसिद्धादी नागेश साम्प्रदायिक सन्तकवींचा इथं उल्लेख करायला हवा. या सर्वांनी पारलौकिक उद्दिष्ट साधण्यासाठी लौकिक जीवनात समता, बंधुभाव, एकता या उदात्त मूल्यांचा पुरस्कार केला. ज्या अपवादात्मक सम्प्रदायांत संकुचितता नि कर्मठता आली, ते महाराष्ट्रात पुढच्या काळात फारसे लोकप्रिय झाले नाहीत. लोकाभिमुखता हा सन्त-दृष्टिकोनाचा पाया होता, तर 'बहुजनहिताय'च नव्हे तर 'सर्वजनहिताय' ही या दृष्टिकोनाची फलश्रुती होती. या सम्प्रदायांच्या तत्त्वज्ञानात किंवा दार्शनिक दृष्टिकोनात तपशीलाचे काही भेद असले तरी त्यांना लाभलेलं मानवतेचं अधिष्ठान समानच होतं. वारकरी किंवा नाथ सम्प्रदाय हे अद्वैताधिष्ठित असले आणि महानुभाव सम्प्रदाय हा द्वैताधिष्ठित असला तरी एकेश्वरवाद आणि प्राणिमात्रांविषयीचा

समभाव ही तत्त्व या सर्वच सम्प्रदायांमध्ये समानच होती. सन्त एकनाथांचा 'भागवत' ग्रंथ नि 'हिंदू-तुर्क-संवाद,' शेख महमदाचं 'योगसंग्राम,' शहामुनीचा सिद्धान्तबोध, मन्मथस्वामीचं परमहस्य, फादर स्टीफन्सचं 'क्रिस्तपुराण' यांत ही तत्त्व आढळत नाहीत काय ? या महापुरुषांच्या विचारांत हे साम्य, हे अद्वैत का आढळतं, याचा आपण जसजसा विचार करू लागतो, तसतसे आपण अन्तमुर्ख होत जातो. धर्माधर्माच्या सीमारेषा, जाती-जातीच्या भिंती, वर्णावर्णामधला भेद मग तिथं लोपू लागतो. ज्ञानदेवानी म्हटल्याप्रमाणं तिथं मग विश्वात्मकतेचा प्रत्यय येऊ लागतो. माणूस हा इथून तिथपर्यंत एकच आहे, त्यात स्तर नाही, उच्चनीचता नाही, श्रेष्टकनिष्ठत्व नाही, या साऱ्या जीवाचं उद्दिष्ट एकच: ऐलतीरीचं लौकिक जीवन उच्च आदर्शाच्या सहाय्यानं व्यतीत करायचं नि पैलतीरीचं पारलौकिक सुख मिळवायचं. प्रपंच आणि परमार्थ यांचा समन्वय साधायचा आणि एकमेकांना साहाय्य करून अवघ्यानी सुपंथ धरायचा.

सन्तसाहित्यानं आपल्याला काय दिलं, हा प्रश्न कधी कधी आजच्या काळाच्या संदर्भात आपल्याला त्रस्त करतो. हे साहित्य केवळ निवृत्तिवादी आहे, ते आता कालबाह्य झालं आहे, त्याला आजचा कुठलाच संदर्भ नसल्यानं आज ते अनावश्यक आहे, त्यातून वर्णावर्णाच्या भिंती अधिक पक्क्या झाल्या, ते विषमतावादाचा वा श्रेष्ठकनिष्ठत्वाचा पुरस्कार करतं, त्यातून पोथीप्रामाण्य आणि कर्मकांडाचा बडिवार माजवला गेला आहे, त्यातील भाषा ही मध्ययुगीन भाषा असल्यानं ते काहीसं दुर्बोध वाटतं, असे किती तरी आक्षेप घेतले जातात आणि हे साहित्य आजच्या काळात कसं अनावश्यक आहे, हे सांगितलं जातं. मी यापूर्वी केलेल्या विवेचनात यातील काही प्रश्नांची उत्तरं मिळतील पण सन्तसाहित्य हे कालबाह्य झालं आहे काय ? या मताचा इथं आवर्जून विचार करायला हवा. सन्तसाहित्य - मग ते कोणत्याही जाति-धर्माचं असो, जनहिताचं उद्दिष्ट ही त्याची अपेक्षित फलश्रुती असल्यान, त्याचप्रमाणं लौकिक आणि पारलौकिक यांच्या समन्वयाची भूमिका त्यात असल्यानं, काही उदात्त जीवनमूल्यांचा वा जीवनादर्शाचा ते पुरस्कार करतं. उदात्त विचार आणि उदात्त आचार यांचा समन्वयही त्यात आढळतो. सामाजिक जीवनाचं सन्तुलन यामुळं साधता येतं. बंधुभावाच्या तत्त्वामुळं समाजातले सारे घटक समान आहेत, ही जाणीवही निर्माण होते. वेद, कुराण, बायबल, धम्मपद, महावीरांचं किंवा बसवेश्वराचं वचन-साहित्य तसंच गुरूग्रंथसाहेब यातही याचा प्रत्यय आल्यावाचून राहात नाही गाडगेबाबा आणि राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांनीही आपल्या कीर्तनांतून याच विचाराचा प्रसार करून समाजप्रबोधन केलं नाही काय ? विकार हेच आपल्या व आपल्या समाजाच्या अध:पतनास कारणीभूत असल्यानं विकारांवर नियंत्रण ठेवण्याचा, दुर्गुणांचा त्याग करून सद्गुणांचं संवर्धन करण्याच्या विचाराचा पुरस्कार सन्तसाहित्यानं सातत्यानं केला आहे. आजच्या समाजात दुर्गुणांचा, अविचाराचा, भ्रष्टाचाराचा, पराकोटीच्या स्वार्थाचा, भयानक हिंसेचा, कमालीच्या

असहिष्णुतेचा, विषयासक्तीचा, अविचाराचा व क्रोधाचा आपल्याला पदोपदी प्रत्यय येत नाही काय ? ही भयानक परिस्थिती निर्माण होण्यामागं समाजातील षड्विकारच कारणीभूत नाहीत का ? दैवी संपत्तीवर आज आसुरी संपत्ती वर्चस्व गाजवीत असल्याचं आपल्याला जाणवत नाही काय ? भावाभावात, घराघरात, गावागावात, राज्याराज्यात कलह निर्माण झाल्याचं आपण पाहात नाही का ? आणि हे सारं असंच घडत गेलं तर आपल्या देशाचं काय होणार, ही चिन्ता प्रत्येक दिवसाची पहाट उजाडल्यावर आपल्याला भेडसावत नाही काय ? या सर्वावर नियंत्रण ठेवण्याचा नेमका उपाय सन्तसाहित्यानं सुचविला आहे आणि तो आहे मनावर नियंत्रण ठेवणं नि मनावर सुसंस्कार करणं. विवेकाची कास धरणं. संपूर्ण सन्तसाहित्य हे विवेकाधिष्ठित आहे. विवेकनिष्ठ जीवनदृष्टीचा पुरस्कार सन्तसाहित्यानं सातत्यानं केला आहे. सन्तसाहित्याचे हे सुसंस्कार जनमानसावर केल्यास आजच्या या प्रलयकालातही समाजाची नि देशाची नौका तरून जाऊ शकेल, असं म्हटलं तर ते अप्रस्तुत ठरू नये. सत्-असत् यांच्यातील विवेक करण्याचा विचार माणसा-माणसात जागवला तर समाजातले कितीतरी प्रश्न सहज सुटतील. सन्तसाहित्यात हे सुसंस्कार करण्याचं, समाजाचं प्रबोधन करण्याचं, समाजात मानवतावादी दृष्टिकोन निर्माण करण्याचं, बंधुभाव नि समता या उदात्त मूल्यांची शिकवण देण्याचं, आचार-विचारातील शुचित्वाचा संदेश देण्याचं अपार सामर्थ्य दडलं आहे. ते आजही या समाजाला 'अवधान दीजे' म्हणून निश्चितपणे आवाहन करू शकतं आणि म्हणून ते पूर्वीही कालबाह्य नव्हतं नि आजही कालबाह्य झालेलं नाही. ते शाश्वत आहे, चिरंतन आहे. हे सुसंस्कार करून मन:शांती देण्याची विलक्षण क्षमता त्यात आहे. ज्यांचा आत्मोन्नती, मुक्ती आणि मोक्ष या कल्पनांवर विश्वास नसेल त्यांनाही हे सन्तसाहित्य बरंच काही देऊन जातं. पारलौकिक जीवनाची संकल्पना ज्यांना अमान्य असेल त्यांनासुद्धा लौकिक जीवनात संतुलन, शुचित्व, समभाव, बंधुत्व, सर्वांचं हित साधण्याची मंगल कामना या सर्वांचाच आढळ व्हावा, असं वाटत नाही काय ? आणि म्हणूनच सन्तसाहित्याला आजच्या काळाचाही संदर्भ आहे. त्यातील आजच्या काळाचं संदर्भमूल्य हरवलेलं नाही आणि ते कदापि हरवणार नाही, असं मला आवर्जून सांगावंसं वाटतं.

सन्तसाहित्याचा अन्तर्भाव प्राथमिक, माध्यमिक आणि महाविद्यालयीन व विद्यापीठीय स्तरावर काही प्रमाणात केला जातो. पण त्याबद्दलही अलीकडे एक प्रकारची अरुची वा अनास्था निर्माण झाल्याचं तीव्रतेनं जाणवतं नि फार खेद वाटतो. ज्या साहित्यानं समाज एकसंध केला, मानवतेचा नि समतेचा संदेश दिला, विषमतेवर आसूड उगारला, त्या विषयी काही चुकीचे समज प्रचलित झाले आहेत. वर्णाभिमानाविषयी वा अनावश्यक कर्मकांडाविषयी सन्तसाहित्यात काही ठिकाणी अपवादात्मक उल्लेख आले असल्यास तेच प्रातिनिधिक मानून त्यावर टीका केल्यास सन्तसाहित्यावर फार मोठा अन्याय केल्यासारखं होईल. असे उल्लेख व हे उल्लेख करणारे सम्प्रदाय महाराष्ट्रात फारसे

टिकूच शकले नाहीत. आध्यात्मिक लोकशाहीचं तत्त्व ज्यांनी स्वीकारलं, ते सम्प्रदाय मात्र अत्यंत लोकप्रिय झाले, याची ग्वाही ज्ञानदेवांपासून धुंडा महाराजांपर्यतची वारकरी सम्प्रदायाची आजवरची परंपरा देते.

मराठीच्या अभ्यासक्रमातून जसं आजच्या महाराष्ट्रीय मंस्कृतीचं नि साहित्यप्रवाहाचं चित्र उमटायला हवं तसंच मध्ययुगीन सन्तवाङ्मयाचंही पर्याप्त प्रतिबिम्ब उमटायला हवं. सन्तसाहित्याचा, सन्तकालीन 'मऱ्हाटी' संस्कृतीची नि आधुनिक साहित्य-संस्कृतीचा अनुबंधही त्यातून प्रकट होईल. सन्तसाहित्यातील उदात्त मूल्यांचा प्रसार व्हावा, त्यांनी मराठी मनं सुसंस्कारित व्हावीत, यासाठी महाराष्ट्र शासन 'सन्तपीठा'च्या निर्मितीचा विचार करीत होतं. त्यासाठी स्थापन झालेल्या समितीनं आपला अहवालही शासनाला सादर केला आहे तो कार्यान्वित व्हावा, यासाठी शासनानं अधिक आस्था दाखवावी, अशी माझी कळकळीची विनंती आहे. सन्तसाहित्यानं मन सुसंस्कारित करून माणसाला माणूस म्हणून जणू देणं. सर्वाच्या कल्याणासाठी सर्वानी प्रयत्नशील राहणं, एकमेकांच्या धर्माबद्दल आदर व जिव्हाळा बाळगणं, 'जे का रंजले गांजले,' त्यांना आपलं म्हणणं, 'सर्वाभूती भगवद्भाव' बाळगणं, ही आजच्या काळाची गरज आहे.

*ते वाट कृपेची करितु । ते दिशाचि स्नेह भरितु ।*
*जीवातळिं आंथुरितु । आपुला जीऊ ।।*

यातील ज्ञानदेवांचा भाव आणि 'महात्मेनि प्रियवक्तेआ होआवे,' या महानुभाव सम्प्रदायाचे प्रवर्तक श्रीचक्रधरस्वामी यांच्या वचनातील समान भाव जाणून 'पसायदाना'तील ज्ञानदेवांचं स्वप्न साकार करण्याचं उत्तरदायित्व तुम्हा-आम्हा 'मऱ्हाटी' माणसांचंच नाही का ?

हे सन्तसाहित्य महाराष्ट्रात व बृहन्महाराष्ट्रात खेडोपाड्यात, मठा-मंदिरांत तुळ्यांवर आणि देवघरात, बळदात आणि लादण्यात विखुरलं आहे. त्याचा संग्रह काही सन्तसाहित्यसंशोधकांनी केला, त्यांच्या अविरत परिश्रमांबद्दल मी इथं आदरभाव व कृतज्ञता व्यक्त करतो. इति. वि. का. राजवाडे, शंकरराव देव, तात्यासाहेब खरे, डॉ. मिराशी, डॉ. भाऊसाहेब कोलते, ह. ना. नेने, दादासाहेब पोहनेरकर, तात्यासाहेब कानोले, डॉ. श्रीधरराव कुलकर्णी, डॉ. शं. गो. तुळपुळे, महन्त नागराज महानुभाव, श्रीकृष्णदास महानुभाव, डॉ. रा. चिं. ढेरे, यांनी ही हस्तलिखितं धांडोळून त्यांच्याविषयी मौलिक संशोधन केलं आहे. या हस्तलिखितांचे काही संग्रहही आहेत. त्यांपैकी एक महत्वाचा संग्रह म्हणजे मराठवाडा विद्यापीठाच्या मराठी विभागातील सुमारे तीन हजार पोथ्यांचा मौलिक संग्रह होय. याशिवाय तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयातील संग्रह, ऋद्धिपूरचं गोपीराज महंत संग्रहालय, हैद्राबादच्या श्रीगीता आश्रमाचा व आंध्र प्रदेश मराठी साहित्य परिषदेचा संग्रह, विदर्भ संशोधन मंडळाचा संग्रह, भा. इ. सं.

मंडळाचा संग्रह, धुळ्याच्या समर्थ वाग्देवता मंदिर आणि राजवाडे संशोधन मंडळ या संस्थांचे संग्रह, नांदेडच्या गोदातीर इतिहास संशोधन मंडळाचा संग्रह, पैठणच्या बाळासाहेब पाटलांचा संग्रह, नगरच्या ऐतिहासिक वस्तुसंग्रहालयाचा संग्रह, पैठणच्या शिवदिन केसरी मठातील संग्रह, पुणे व नागपूर विद्यापीठाच्या ग्रंथालयांतील हस्तलिखित संग्रह, मध्यप्रदेशातील ग्वाल्हेर-इंदूरचे संग्रह असे कितीतरी संग्रह आहेत. शिवाय व्यक्तिगत संग्रहही बरेच आहेत. हे साहित्यधन वेळीच जतन केलं नाही, तर शतकाशतकांचा हा अमोल वारसा कालौघात केव्हा नष्ट होऊन जाईल, हे कळणारदेखील नाही. शासन आणि साहित्यसंस्था यांनीच ही जपणूक करायला हवी, त्यासाठी आवश्यक ती रक्कम उभारायला हवी. या सर्व हस्तलिखितांच्या चित्रफिती तयार करून घ्यायला हव्यात. महाराष्ट्रातील व बृहन्महाराष्ट्रातील या सर्व हस्तलिखितांची एक बृहत्सूची शक्यतो लवकर सिद्ध व्हायला हवी. ती सिद्ध झाली की देश-विदेशातील संशोधकांना बहुमोल सामग्री उपलब्ध होईल व मध्ययुगीन मराठी साहित्याची कितीतरी दालनं उजळून निघतील. आज शासन या संदर्भात केवळ कागदोपत्री नोद होण्याइतकाच प्रयत्न करीत आहे. एखाद्या शासकीय अधिकाऱ्यानं केलेला जुजबी पत्रव्यवहार, एवढंच या प्रकल्पाचं रूप नसावं तर हे साहित्य नष्ट होऊ नये, या तळमळीनं झपाटलेले संशोधक या कार्यासाठी पुढं यायला हवेत. दुर्दैवानं आज तशी फारशी परिस्थिती नाही, हे मान्य करायला हवं. मध्ययुगीन साहित्याचं संशोधन ही कष्टसाध्य बाब आहे. महानुभावीय संशोधनासाठी सांकेतिक लिप्यांचं ज्ञान आवश्यक असतं. शिवाय, सहजासहजी हे सारं साहित्य उपलब्धही होत नाही. यासाठी साम्प्रदायिक आणि संशोधक यांच्यामध्ये हृदयसंवाद होणं अगत्याचं आहे. ही भूमिका संघर्षाची नसून समन्वयाची असायला हवी. याचा अर्थ ऐतिहासिक सत्याला सोडून संशोधकांनी भूमिका घ्यायला हवी, असा नाही; पण कुणीही टोकाची भूमिका घेतली, की आपण एका ऐतिहासिक कार्यालाच नव्हे तर शतकानुशतकांच्या आपल्या सांस्कृतिक वारशाला मुकू, याचं भान ठेवलं की या कार्याला निश्चितपणे गती येईल, असं मला स्वानुभवानं सांगावंसं वाटतं. माझ्या उत्तरआयुष्यात या कार्यासाठी मी जे करायला हवं ते आनंदानं करीन व माझा वाटा मी उचलीन, हे इथं वेगळं सांगायची आवश्यकता नाही.

## मराठी साहित्यातील नवे प्रवाह :

मध्ययुगीन साहित्यानंतर विविध आधुनिक साहित्यप्रवाहांनी मराठी वाङ्मयाची कितीतरी दालनं संपन्न झाली. नवकाव्य, नवकथा, प्रायोगिक, रंगभूमीवरील नवनाट्य, नवसमीक्षा यांनी मराठी साहित्याचं रूपच पालटून टाकलं. त्यानंतर मऱ्हाटी जीवनाची कितीतरी अलक्षित, दुर्लक्षित व उपेक्षित अंगं मराठी साहित्यात प्रतिबिंबित होऊ लागली, ती दलित साहित्य, ग्रामीण साहित्य तसंच जनवादी साहित्य यांच्या समर्थ,

अन्तर्मुख करायला लावणाऱ्या व कधी कधी दिङ्मूढ करणाऱ्या लोकविलक्षण आविश्कारातून. मराठी साहित्यात ज्या उपेक्षित जाणिवा कधीही प्रकटल्या नव्हत्या, त्या दलित नि ग्रामीण साहित्याच्या रूपानं प्रकटल्या. दलित कथा, आत्मकथन, कविता, कादंबरी नि नाट्य यांचं मराठी साहित्यातील अवतरण ही एक महत्त्वपूर्ण सांस्कृतिक घटना आहे, असं मला सतत वाटत आलं आहे. म. फुले आणि डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या प्रेरणा लाभलेलं हे साहित्य महाराष्ट्रात निर्माण झालं, हे महाराष्ट्राचं भाग्यच म्हणायला हवं. या साहित्यातील जाणिवा कधी कधी फार प्रखर वाटल्या तरी त्या तशाच असणं कसं स्वाभाविक आहे, हे महाराष्ट्रीय संस्कृतीचा शतकानुशतकांचा अभ्यास करताना प्रत्ययाला आल्याविना राहात नाही.

लोकभाषेचा नि लोकसंस्कृतीचा आश्रय घेतला की त्यातून साहित्याचे नवनवोन्मेष सहजी प्रकटतात आणि त्यातून लोकभावना समर्थपणेच नव्हे तर अनेकांगांनी आविष्कृत होतात, हेच मराठी साहित्याचा आजवरचा इतिहास सांगतो. मराठी साहित्यातील दलित, ग्रामीण नि जनवादी हे सारे नवप्रवाह म्हणजे मराठी साहित्याची आशास्थानंच होत, असं मला वाटतं.

## बालसाहित्य :

अखिल भारतीय बालसाहित्यकारांचं एक संमेलन नुकतंच पुण्यात झालं. त्यांच्या नि बालसाहित्याच्या अनेकविध समस्यांचा त्यात सांगोपांग विचार झाला. साहित्याचं एक अविभाज्य अंग म्हणूनच बालसाहित्याचाही विचार व्हायला हवा. मुलांसाठी काव्य, कथा, कादंबरी, नाट्य, चरित्रात्मक, वैज्ञानिक दृष्टिकोन निर्माण करणारं, तसंच सम्कारक्षम साहित्य कसं निर्माण करता येईल, याचा अधिक सूक्ष्मपणे विचार व्हायला हवा. बालवाचक हा फार मोठा वाचकवर्ग आहे. त्याच्यात उत्कृष्ट साहित्याविषयीची अभिरुची निर्माण करणं, हे बालसाहित्यकारांपुढचं मोठं आव्हान आहे. मुलामध्ये अनेक वयोगट असतात, त्याच भावविश्वही त्या त्या वयोगटानुसार बदलत जात असतं. हे लक्षात घेऊन या विविध वयोगटांच्या मुलांसाठी विविध प्रकारच्या बालसाहित्याची निर्मिती होणं, ही आजच्या काळाची गरज आहे. वाङ्मयेतिहासात बालसाहित्याचा आलेख रेखाटला जायला हवा बालसाहित्यकारांना वाङ्मयाच्या प्रान्तात मानाचं स्थान मिळायला हवं.

## आंतरभारती :

'आंतरभारती'च्या चळवळीनं देशाची एकसंघता व एकात्मता साधण्यास फार मोलाचा हातभार लावला आहे. अन्य भाषातील उत्कृष्ट साहित्य जसं मराठीत अनुवादित व्हायला हवं, तसंच मराठीतील उत्कृष्ट साहित्यही सर्व भारतीय भाषात अनुवादित

व्हायला हवं. साहित्य अकादमी, नॅशनल बुक ट्रस्ट, म. रा. साहित्य-संस्कृती मंडळ आणि काही सामाजिक संस्था या दृष्टीनं जे प्रयत्न करीत आहेत, त्यांचा इथं आवर्जून उल्लेख करायला हवा. अन्य भाषात मराठी साहित्य अनुवादित करण्याच्या या प्रक्रियेला अधिक गती यायला हवी. या दृष्टीनं भारतातल्या अन्य भाषा जाणणाऱ्या मराठी साहित्यिकांनी यात विशेष लक्ष घातलं, तर हे कार्य सुकर होईल. यामुळं मराठी साहित्याच्या गुणवत्तेची दखलही भारतीय साहित्यात घेतली जाईल व त्याला मानाचं स्थान प्राप्त होईल. अनुवादित ग्रंथांना पुरस्कार देण्याच्या साहित्य अकादमीच्या योजनेचा राज्यशासनानं नि साहित्यसंस्थांनीही विचार करायला हवा. हिन्दीसारख्या अन्य भारतीय भाषांत मराठी साहित्याचा अनुवाद झाल्यास त्याला अधिक मोठा वाचकवर्गही लाभेल.

## मराठी भाषेचं अध्ययन – अध्यापन :

मराठी भाषेच्या सद्य:स्थितीविषयीचे काही प्रश्न लक्षात घेण्याजोगे आहेत व त्यांचा अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या या व्यासपीठावरून विचार व्हावा, असं मला वाटतं. मराठी भाषेच्या अभ्यासक्रमाविषयीचा, त्याचप्रमाणं मराठीच्या अध्ययन-अध्यापनाविषयींचा प्रश्न हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक, महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय अशा विविध स्तरांवर मराठी भाषेचा अभ्यास केला जातो. या सर्व पाच स्तरांतील अभ्यासक्रमांत समवाय व एकसूत्रता स्थापन होणं आवश्यक आहे. प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तरांवरील अभ्यासक्रम पाठ्यपुस्तक मंडळ व माध्यमिक शिक्षण मंडळ यांच्या अभ्यास मंडळांच्या वतीनं तयार करण्यात येतो. त्या अभ्यासक्रमांत समवाय साधण्याचा प्रयत्न करण्यात आला आहे आणि हा प्रयत्न मला लक्षात घेण्याजोगा वाटतो. या अभ्यासक्रमांवर आधारित पाठ्यपुस्तकांचं संपादन करणं ही एक अत्यंत अवघड, पराकोटीच्या जबाबदारीची व दूरगामी परिणाम करणारी गोष्ट आहे. म. रा. पाठ्यपुस्तक मंडळ व माध्यमिक शिक्षण मंडळ या संस्थांशी माझाही अनेक वर्ष संबंध आला असून या संस्था आपापल्या परीनं चांगलं कार्य करीत आहेत; पण त्यांनी काही बाबतीत विशेष दक्षता घ्यायला हवी, असं मला वाटतं. विशेषत: प्राथमिक शाळांतील मराठीच्या अध्यापनाविषयी अधिक दक्षता घ्यायला हवी. महात्मा फुल्यांनी हंटर कमिशनसमोर दिलेल्या साक्षीत नेमकं प्राथमिक शिक्षणाच्या प्रश्नावर बोट ठेवलं होतं. त्यातून त्यांच्या द्रष्टेपणाचा आपल्याला आजही प्रत्यय येतो. हे वर्ष जागतिक साक्षरता वर्ष असल्यानं मराठीच्या प्राथमिक स्तरावरील अध्यापनाचा यंदा फार काळजीपूर्वक विचार करायला हवा. प्राथमिक स्तरावर मराठीची पाठ्यपुस्तकं संपादित करणाऱ्या म. रा. पाठ्यपुस्तक मंडळाच्या सध्याच्या मराठी समितिसदस्यांना साहाय्य करण्यासाठी महाराष्ट्राच्या विविध विभागांतील शिक्षणतज्ज्ञ, मराठीचे अध्यापक व नाणावलेले साहित्यिक यांचं साहाय्य घेतलं की ही

'बालभारती'ची पाठ्यपुस्तकं अधिक चांगल्या प्रकारे संपादित करता येतील. सध्या तिसरी व चौथी या इयत्तांच्या पाठ्यपुस्तकांचं संपादन कार्य चालू असल्याचं कळतं. प्राथमिक स्तरावरील ही माला अधिक गुणवत्तायुक्त व संस्कारक्षम व्हायला, महाराष्ट्रातील विदर्भ, मराठवाडा, प. महाराष्ट्र, कोकण इ. सर्वच विभागांतील नाणावलेल्या मराठी साहित्यिकांचा व शिक्षण-तज्ज्ञांचा हातभार लागायला हवा. अ-मराठी भाषिकांच्या पाठ्यपुस्तकांच्या निर्मितीसाठी स्वतंत्र समिती असावी. त्याचप्रमाणं अन्य विज्ञानादी विषयांचं माध्यम मराठी भाषा हेच असल्यानं या समित्यांतही मराठी भाषा-तज्ज्ञांचं साहाय्य घेण्यात यावं म्हणजे भाषेच्या दृष्टीनं ही भाषेतर पुस्तकंही निर्दोष होतील.

शिक्षक- हस्तपुस्तिका हे पाठ्यपुस्तक मंडळाच्या कार्याचं एक वैशिष्ट्य आहे; पण त्याकडे जिल्हा परिषदांच्या शिक्षण समित्यांनी द्यायला हवं तितकं लक्ष दिलेलं नाही. मराठीच्या अध्यापनास या हस्तपुस्तिकांचा अत्यंत उपयोग होत असल्यानं त्यांच्याकडे जिल्हा परिषदांनी, खाजगी शिक्षण संस्थांनी व अध्यापकांनी दुर्लक्ष करून चालणार नाही. मराठीच्या प्राथमिक-माध्यमिक स्तरांवरील अध्यापनाचा स्तर उंचावण्यास त्यांचं निश्चितपणे साहाय्य होईल. पाठ्यपुस्तक मंडळाच्या संस्कार वाचनमालेनंही चांगलं कार्य केलं आहे. या वाचनमालेतील नवीन पुस्तकांची निर्मिती थांबली असल्यास तो उपक्रम पुन्हा सुरू करायला हवा. 'समाज शिक्षणमाले' सारख्या मालांनी गेली अनेक वर्ष संस्कारक्षम पुस्तकांची निर्मिती करून आजवर जे महत्त्वपूर्ण कार्य केलं, त्याचा आदर्श पाठ्यपुस्तक मंडळाच्या संस्कार वाचनमालेनंही ठेवायला हरकत नाही. मराठीच्या प्राथमिक व माध्यमिक शिक्षकांच्या प्रशिक्षणावर, अध्यापन-शिबिरांवर अधिक लक्ष द्यायला हवं. मराठी भाषेच्या अध्ययनाला पायाभूत असणाऱ्या या दोन्ही स्तरांचं महत्त्व दुर्लक्षून चालणार नाही. राज्य शिक्षणशास्त्र संस्थेचंही मोलाचं साहाय्य या बाबतीत होऊ शकेल.

मराठीच्या माध्यमिक शिक्षकांची राज्यव्यापी संघटना आहे; तथापि मराठीच्या प्राथमिक शिक्षकांची अशी संघटना नाही. अशा प्रकारच्या संघटनांच्या द्वारा परिषदा भरविल्या गेल्यास मराठीच्या प्राथमिक व माध्यमिक स्तराच्या अध्यापनात येणाऱ्या अडचणींचा विचार करता येईल, व त्यावर उपाययोजना सुचविता येईल. उच्च माध्यमिक स्तरावरील मराठीच्या अध्यापकांचीही अशी संघटना नाही. त्यांचीही अशीच संघटना निर्माण झाल्यास त्यांच्या परिषदामधून विचारविनिमय करून पुढील कार्याची दिशा ठरविता येईल. महाराष्ट्राच्या काही विभागांत महाविद्यालयीन मराठी प्राध्यापकांच्या परिषदांचं आयोजन केलं जातं, त्यांचा विधायक उपयोग होतो. विविध विभागातील मराठी प्राध्यापक-परिषदांचं महाराष्ट्र पातळीवरील व्यापक परिषदेत रूपान्तर होणंही आवश्यक आहे. त्याचप्रमाणं महाराष्ट्र पातळीवरील मराठीच्या विद्यापिठीय प्राध्यापकांच्या परिषदेचाही विचार व्हावयास हरकत नाही. गतवर्षी अखिल भारतीय पातळीवरील

मराठी विभाग-प्रमुखांची परिषद आयोजित केली होती, तिच्यात महाराष्ट्राच्या व बृहन्महाराष्ट्राच्या विविध विद्यापीठांतील मराठीच्या अध्यापनाविषयी विचार झाला होता. मराठीचं अध्ययन, अध्यापन व संशोधन करण्याच्या दृष्टीनं या सर्वच स्तरांवरील परिषदांत एकसूत्रता साधणं आवश्यक आहे आणि यासाठी मराठी भाषा विकास संस्थेसारखी संस्था स्थापन केल्यास तिचंही मार्गदर्शन लाभू शकेल.

मराठीच्या वर उल्लेखिलेल्या पहिल्या चार स्तरांवर व्यावहारिक मराठीच्या अभ्यासक्रमाचा अन्तर्भाव होणंही आवश्यक आहे. ती आजच्या काळाची एक महत्त्वाची गरज आहे. महाराष्ट्रातील विद्यापीठांनी या दृष्टीनं काही स्वागतार्ह पावलं उचलली आहेत. राज्यभाषा म्हणून मराठी भाषा ही खऱ्या अर्थानं शासनव्यवहारात यावयाची असेल तर व्यावहारिक मराठीच्या अभ्यासक्रमाचा मराठी भाषेच्या अभ्यासक्रमात अवश्य समावेश करायला हवा. अजूनही महाराष्ट्र शासन, महाराष्ट्रातील निमशासकीय संस्था आणि काही विद्यापीठं यांतील बराच पत्रव्यवहार मराठीत होत नाही. या संस्थांतील अधिकाऱ्यांनी व पदाधिकाऱ्यांनी ही गोष्ट मनावर घेतल्यास ते मराठीचा वापर सहज करू शकतील. इंग्रजी शब्दांचे मराठी प्रतिशब्द 'शासन व्यवहारात मराठी', 'पदनामकोश' किंवा भाषा सल्लागार मंडळाचे 'पारिभाषिक कोश' यांत सहज उपलब्ध होऊ शकतात. थोड्याशा कष्टात ही गोष्ट सहज साध्य होऊ शकते, हे लक्षात घेतलं आणि इंग्रजाळलेली मनोवृत्ती सोडली की मराठीचा वापर आपण सर्व क्षेत्रांत सहजपणे करू शकू.

## ग्रंथ-प्रकाशन :

मराठी ग्रंथ-प्रकाशनाचा प्रश्न हा आजच्या इतका बिकट कधीच झाला नसावा, असं मला वाटतं. कागद, शाई, मुद्रण-साहित्य नि मुद्रण इ. बाबीतील महागाईच्या झळा ग्रंथनिर्मितीला लागून ग्रंथ निर्मितीची प्रक्रियाच मंदावते की काय, अशा प्रकारचा गंभीर प्रश्न निर्माण झाला आहे. नियतकालिकांनाही या परिस्थितीत वरचेवर अपरिहार्य दरवाढ करावी लागली असून पूर्वी सहजपणे चारदोन वृत्तपत्रं, साप्ताहिकं वा मासिकं घेणारा मराठी माणूस हा आज एकदोन वृत्तपत्रं वा एखादंच साप्ताहिक - मासिक विकत घेतानाही दोनदा विचार करू लागला आहे. ग्रंथ विकत घेणं ही त्याच्या आटोक्यातली बाब राहिलेली नाही. सामान्य वाचकालाच नव्हे तर खेडोपाड्यातल्या ग्रंथालयांनादेखील ग्रंथ विकत घेता येतील का, असा बिकट प्रश्न भेडसावू लागला आहे. ग्रंथांच्या किमती गगनाला भिडताहेत, याच्यामागं महागाई हे जसं एक कारण आहे, त्याचप्रमाणं वितरण व्यवस्था हेही दुसरं कारण आहे काय, याचा विचार व्हायला हवा. कारणं काहीही असली तरी हा प्रश्न सोडविल्याशिवाय नव्यानं निर्माण होणाऱ्या साहित्याच्या मार्गातील अडसर दूर होणार नाही. केरळमधील सहकारी तत्त्वावरील ग्रंथ-प्रकाशनाचा आपण विचार करावा, असा एक विचार मागं प्रतिपादिला गेला होता त्याचं स्मरण इथं होतं.

'ग्रंथाली' सारख्या चळवळीचाही काही प्रमाणात हा प्रश्न सोडवायला उपयोग झाला हे खरं, पण प्रश्न अजून सुटलेला मात्र नाही. साहित्य-संस्कृती मंडळ ग्रंथप्रकाशनाला अनुदान देतं, पण मंडळाच्याही काही मर्यादा आहेत. शासन, साहित्यसंस्था, प्रकाशक व वितरक या सर्वांच्या सहकार्यानेच हा प्रश्न सुटू शकेल. शासनानं सवलतीच्या दरात अधिक कागद व मुद्रण-साहित्य उपलब्ध करून दिल्यास मोठीच सोय होणार आहे. ग्रंथांच्या किमती ज्या तत्त्वांवर ठरविल्या जातात, त्या तत्त्वांचा पुनर्विचार व्हायला हवा. ग्रंथ वाचकापर्यंत कसा नेता येईल व त्याच्या मार्गातील अडचणी कमी कशा करता येतील, याचा सर्व संबंधितांनी विधायक विचार करायला हवा.

## ग्रंथालयं :

ग्रंथांप्रमाणंच ग्रंथालयांचेही प्रश्न आहेत. 'गाव तिथं ग्रंथालय' असणं आवश्यक व अपरिहार्यच आहे. यासाठी ग्रंथालय परिषदांसारख्या परिषदा प्रयत्न करीत आहेत. ग्रंथालयाच्या चळवळीसाठी सर्व संघटनांनी एकवटणं, ही आजच्या काळाची गरज आहे. ग्रंथालयांना मिळणारं शासकीय अनुदान फारच अपुरं असतं आणि ग्रंथपालांच्या वेतनश्रेणीचा प्रश्नही समाधानकारकरीत्या सोडविणं आवश्यक आहे. गावातील ग्रंथालय ही शासनाची जशी जबाबदारी आहे, तशीच स्थानिक संस्थांचीही आहे. त्यांनीही अधिक समरसून प्रयत्न केल्यास व शासनावर फार अवलंबून न राहिल्यास प्रत्येक गावात एकेक समृद्ध ग्रंथालय आपल्या पायावर सहज उभं राहू शकेल. ग्रंथालयातील ग्रंथांच्या निवडीसाठी काही ठिकाणी समित्या असतात. जिल्हापरिषदांतही अशा समित्या असतात. या समित्यांत केवळ तज्ज्ञांचाच समावेश व्हावा, असाही प्रयत्न करणं आवश्यक आहे.

## लोप पावणारी मासिकं :

लोप पावणारी मासिकं ही आजची आपण सर्वांनी आवर्जून लक्षात घ्यावी, अशी एक समस्या आहे. वाङ्मयीन नियतकालिकांचे प्रश्नही बिकट झाले आहेत. त्यांना साहित्य-संस्कृती मंडळ अनुदान देतं त्यामुळं थोडंफार साहाय्य होतं; पण अनुदान अधिक प्रमाणात मिळालं तर या नियतकालिकांना आपलं अस्तित्व टिकवणं शक्य होईल. यासाठी शासनानंही साहित्य-संस्कृती मंडळाला अधिक अनुदान द्यायला हवं. अशा बिकट अवस्थेतही पंचधारा, प्रतिष्ठान, समुचित, युगवाणी, संशोधक, अनुष्टुभ्, कवितारती, अस्मितादर्श, मराठी संशोधन पत्रिका, महाराष्ट्र साहित्य पत्रिका, नवभारत यांसारखी वाङ्मयीन व संशोधनपर नियतकालिकं लक्षणीय कार्य करीत आहेत, याचा इथं आवर्जून उल्लेख करायला हवा.

मासिकांची जागा आज दैनिकांच्या साप्ताहिक पुरवण्या घेत आहेत व त्यांचा वाचकवर्ग वाढत आहे, ही त्यातल्या त्यात समाधानाची बाब होय. त्यांतील स्पर्धा हीही

उपकारच ठरत आहे. काही पुरवण्यांत तर वाङ्मयीन नियतकालिकांत प्रसिद्ध व्हावं, असं दर्जेदार साहित्य प्रसिद्ध होतं, याचीही नोद इथं घेतली पाहिजे.

## बृहन्महाराष्ट्राचे प्रश्न :

बृहन्महाराष्ट्राचे प्रश्न महाराष्ट्रातील प्रश्नांपेक्षा फार वेगळे आहेत. 'माय मराठी' सारख्या नियतकालिकांतून त्यांचं दर्शन घडतं. त्या प्रदेशात मराठी भाषा जगवणं व ती जतन करणं, हाच एक मोठा बिकट प्रश्न झाला आहे. त्या त्या विभागातील राज्यभाषेला प्राथम्य असणं अपरिहार्य असलं तरी मराठी माणसाच्या घरात, महाराष्ट्र-मंडळांत नि महाराष्ट्रीय संस्थांमध्ये मराठीची जपणूक होणं आवश्यक आहे. बृहन्महाराष्ट्रातील विद्यापीठांत मराठी विषय घेणाऱ्या विद्यार्थ्यांची कमी होणारी संख्या हा चिंतेचा विषय आहे. तिथं महाराष्ट्र शासनानं काही अभ्यासवृत्ती दिल्यास व तिथल्या मराठी विभागांना अध्ययन-संशोधन-प्रकाशनासाठी अनुदान दिल्यास फार मोठं साहाय्य होणार आहे. डॉ. वा. के. लेले यांनी काही दिवसांपूर्वी या विद्यापीठांत मराठीची अध्यासनं स्थापन करण्याविषयी केलेली सूचना मला मोलाची वाटते. काही विद्यापीठांत महाराष्ट्र शासनानं अशी अध्यासनं दिली आहेत. या विभागांत नव्यानं प्रकाशित होणारी मराठी पुस्तकं पोचणंही आवश्यक आहे. प्रकाशकांनी काही प्रमाणात कमी कमिशन घेऊन सहकार्य केल्यास व शासनानं तेथील ग्रंथालयांना व महाराष्ट्र-मंडळांना ग्रंथखरेदीसाठी काही अनुदान दिल्यास, तसंच त्या विभागांतील धनिकांनीही या कार्यास हातभार लावल्यास ही समस्या काही अंशी तरी सुटेल. महाराष्ट्रातील सांस्कृतिक उपक्रमांचं लोणही बृहन्महाराष्ट्रापर्यंत पोचवायला हवं. विशेषत: शासनाच्या साहाय्यानं काही चांगले नाट्यप्रयोग, कथाकथनाचे वा काव्यवाचनाचे कार्यक्रम या विभागात घडवून आणायला हवेत.

## दूरदर्शनचा प्रभाव :

महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनावर दूरदर्शनसारख्या प्रसारमाध्यमाचा फार मोठा प्रभाव पडत असल्याची जाणीव आज तीव्रतेनं होत आहे. आकाशवाणीसारख्या प्रसारमाध्यमाबाबत मात्र ही चिंता इतकी तीव्रतेनं जाणवली नाही व आजही जाणवत नाही. दूरदर्शनच्या तासन्तास चालेलेल्या कार्यक्रमांमुळे मराठी माणूस साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रमांपासून दुरावत चालला आहे, याची खंत आपण सारेच व्यक्त करतो. दूरदर्शननं चांगल्या साहित्याच्या प्रसाराला काही प्रमाणात हातभार लावला असला तर काही नीरस मराठी मालिका का व कशासाठी प्रक्षेपित झाल्या, असा प्रश्न पडतो. अन्य भारतीय भाषांतील साहित्य व विश्वसाहित्य यांचा परिचय हे दूरदर्शनचं एक लक्षणीय वैशिष्ट्य असलं तरी अधिक चांगल्या मराठी साहित्याची निश्चितपणे निवड करता येईल. दूरदर्शनच्या तज्ज्ञ समितीनं याचा आवर्जून विचार करायला हवा

दूरदर्शनवरील मराठी शीर्षकांचा व बातम्यांचाही इथं उल्लेख करावासा वाटतो. या शीर्षकांतील लेखनाच्या चुका खटकतात. थोडी काळजी घेतली तर त्या सहज टाळता येतील. प्रादेशिक वार्तापत्रांत महाराष्ट्राच्या विविध विभागांतील सांस्कृतिक घडामोडींचं प्रतिबिम्ब अधिक उत्कटतेनं उमटायला हवं.

दूरदर्शनचं महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनावरील अतिक्रमण थोपविण्याचा मराठी माणसानंच प्रयत्न करायला हवा. दूरदर्शनचे चांगले कार्यक्रम जरूर पाहावेत पण सांस्कृतिक - साहित्यिक उपक्रमांना प्रतिसाद देणं ही आपलीच जबाबदारी आहे, असंही मराठी माणसाला वाटलं तरच त्याचं 'मऱ्हाटपण' त्याला टिकविता येईल. साहित्यिक व सांस्कृतिक संस्थांनी आपल्या कार्यक्रमांत विविधता व नावीन्य आणण्याचा प्रयत्न केल्यास हे सहज शक्य होईल. त्याचप्रमाणं मराठी माणसानंही आपल्या मनात याविषयीची आस्था व जिव्हाळा जागवणं अगत्याचं आहे.

आजची मराठी भाषा, साहित्य नि संस्कृती यांच्या संदर्भात जाणवणाऱ्या काही समस्यांचा मी आपल्याशी हा विचार-विनिमय केला. आपण सारेजणच आपल्या भाषेच्या, साहित्याच्या नि संस्कृतीच्या अभिवृद्धीसाठी प्रयत्नशील राहिलो तर ज्ञानदेवांनी 'पसायदाना'त व्यक्त केलेल्या अपेक्षा पूर्ण व्हायला कितीसा विलंब लागेल ?

# रत्नागिरी : १९९०

# मधु मंगेश कर्णिक

---

चौसष्टाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे उद्घाटक, स्वागताध्यक्ष आणि स्वागतसमितीचे सदस्य, येथे उपस्थित असलेले पूर्वाध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष, उपाध्यक्ष व सदस्य, आणि बृहन्महाराष्ट्रातील साहित्यप्रेमी रसिक हो !

या रत्नागिरी नगरीमध्ये पन्नास वर्षांनंतर प्रथमच भरणाऱ्या या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद मला लाभले, यामध्ये नियतीचा एक संकेत मला दिसत आहे. येथे १९४० साली भरलेल्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद प्राध्यापक ना. सी. फडके यांनी भूषविले होते प्रा फडके हे मूलत: कादंबरीकार आणि कथालेखक. मीसुद्धा त्यांच्याप्रमाणेच एक कादंबरीकार व कथालेखक. दोघेही प्रामुख्याने ललितलेखक. शिवाय या वर्षीच मराठी लघुकथेला शंभर वर्षे पूर्ण होत आहेत आणि अशा कथाशताब्दिप्रसंगी एका कथाकाराला अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद लाभावे,हा माझ्यापेक्षा मराठी कथेचा भारतीय पातळीवरील गौरव आहे असे मी समजतो. परंतु त्यापेक्षाही महत्त्वाची वैशिष्ट्ये चालू वर्षाला लाभलेली आहेत : श्री ज्ञानेश्वरीची सप्तशताब्दी, महात्मा जोतिबा फुले यांची स्मृतिशताब्दी व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांची जन्मशताब्दी या वर्षीच साजरी होत आहे.-असा हा नियतीने मला बहाल केलेला मोठा पुण्यप्रद संकेत आहे.

मराठी भाषा आणि साहित्य यांतील या सर्वोच्च पदावर यापूर्वी जे दिग्गज आरूढ झाले होते त्यांच्या नुसत्या स्मरणानेही या घटकेला माझ्या शरीरावर रोमांच उठत आहेत आणि मनाला उल्हासाचे भरते आलेले आहे. मराठी कादंबरीचा पाया घालणारे हरी नारायण आपटे, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांच्यासारखे विनोदकार व टीकाकार, काकासाहेब खाडिलकरांसारखे नाट्याचार्य, डॉक्टर केतकरांसारखे ज्ञानयोगी, वामन मल्हार जोशी आणि शिवरामपंत परांजपे, डॉ. माधवराव पटवर्धन आणि स्वातंत्र्यवीर सावरकर, साहित्यसम्राट तात्यासाहेब केळकर आणि नाटककार मामासाहेब वरेरकर, आचार्य जावडेकर, आचार्य अत्रे, वि.स. खांडेकर, ना.सी. फडके, श्री. म. माटे, अ का. प्रियोळकर, गं. बा. सरदार, तर्कतीर्थ लक्ष्मण शास्त्री जोशी-अशी

पूर्वसूरींची किती म्हणून नावं घ्यावीत ? अशा एकूण त्रेसष्ट महनीय साहित्यिकांनी ज्या व्यासपीठावरून आपले उद्‌बोधक विचार प्रगट केले, त्या व्यासपीठावरून आपले वेडेवाकडे बोल ऐकविण्याचे अहोभाग्य मला लाभले, यामुळे मला अहंकाराचा मुळीच स्पर्श झालेला नाही, तर माझ्या ठायीचे लहानपण अधिकच विनम्र बनले आहे. या व्यासपीठाच्या थोरवीची मला पूर्ण जाणीव आहे.

सामान्यत: साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरून केलेल्या भाषणामध्ये अध्यक्षाने साहित्यक्षेत्राचा आढावा घेत त्याची समीक्षा करावी किंवा काही विशेष वाङ्‌मयीन मार्गदर्शन करावे असा प्रघात आहे. हा प्रघात मला कितपत पाळता येईल याबद्दल शंका वाटते. कारण मी मूलत: एक ललित लेखक आहे. आजूबाजूचे जग कुतूहलाने, स्वच्छंदपणे, विस्मयाने आणि संवेदना जागी ठेवून न्याहाळावे, त्या जगातील सौदर्य, कुरूपता-विरुपता, संगति-विसंगती, अंतर्विरोध आणि एकात्मता जाणून त्यांचा आविष्कार ललितलेखनातून, कथा-कादंबरीतून करावा एवढीच माझी मर्यादा आहे. स्वत:ला मी विचारवंत समजत नाही. समीक्षा हे माझे क्षेत्र नव्हे. विवेचक आणि विश्लेषक आढावा घेण्यासाठी लागणारी दीर्घ झेपही माझ्यापाशी आहे असे मला वाटत नाही.-त्यामुळे या भाषणात माझी काही निरीक्षणे, अवलोकने व मतप्रदर्शने तेवढी आढळतील. भाष्य आणि निष्कर्ष यांपासून मी स्वत:ला मुद्दामच दूर ठेवले आहे. या अवलोकनावर आपण सूज्ञांनी विचार करावयाचा आहे.

महाराष्ट्र राज्य निर्माण झाल्यानंतरच्या काळातील पहिल्या साहित्यिक पिढीचा मी एक प्रतिनिधी आहे. आजच्या साहित्यसृष्टीमध्ये गेल्या पंचवीस-तीस वर्षामध्ये जेवढ्या घडामोडी झाल्या, त्यांचा एक साक्षीदार व त्यांतील भागीदार या नात्याने माझे हे अवलोकन व विचार आहेत. मी ज्या कालखंडातील लेखक आहे, त्या कालखंडामध्ये पूर्वीच्या मानाने अनेक नव्या सामाजिक आणि साहित्यिक घडामोडी झाल्या. समाज आणि साहित्य यांना वेगळे करता येत नाही. समाजातील घडामोडीचे प्रतिसाद साहित्यामध्ये उमटणे अगदी स्वाभाविक आहे. भाषा हे साहित्याचे वाहन होय. ती भाषा बोलणारा, लिहिणारा समाज हे त्या साहित्याचे बलस्थान. साहित्य आणि समाज सतत गतिशील असतात. साहित्यातून घडणारी संस्कृतीही गतिशील असते. भाषा आणि साहित्य ही आपल्या संस्कृतीची मोठी लेणी होत भाषेतून साहित्यनिर्मिती आणि साहित्यातून सांस्कृतिक अभ्युदय हा क्रम नवा नाही. महाराष्ट्र-राज्य-निर्मितीनंतर मराठी भाषेचा वर्तमानकाळ आणि भवितव्य व महाराष्ट्रातील सर्वसामान्य वाचकासाठी निर्माण होत असलेले साहित्य, हा माझ्या भाषणाचा मुख्य विषय आहे. त्याच्या अनुरोधाने आपोआपच महाराष्ट्राच्या नव्या संस्कृतीचा मागोवा घेता येईल,असे वाटते.

१९६० साली महाराष्ट्राचे स्वतंत्र राज्य निर्माण झाले. संयुक्त महाराष्ट्राची मागणी या साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरूनच प्रथम आणि नंतर अनेकदा झालेली

होती. मराठी भाषकांचे एक स्वप्न आकाराला आले. नागपूर वऱ्हाड, मराठवाडा हे मराठी भाषिकांचे भाग आणि मुंबई-कोकणसह उर्वरित महाराष्ट्र यांचे एक विशाल राज्य स्थापन झाले. मराठी माणसे, त्यांची भाषा आणि त्यांचे साहित्य यांचा विकास घडवून आणण्याची संधी आपणास प्राप्त झाली. अनेक दृष्टींनी एक नवा कालखंड सुरू झाला. राजकीय, आर्थिक, सामाजिक, सांस्कृतिक आणि मुख्यत्वेकरून भावनिक पातळीवर विविध नवीन विचारांचे वारे वाहू लागले. लोकशाहीतील सत्तेच्या विकेन्द्रीकरणाची अपरिहार्य प्रक्रिया सुरू होऊन ग्रामीण भागातील लोकांना सत्तेमध्ये सामील होता आले. जनतेला नवे राजकीय बळ आले. शिक्षणाची कवाडे खुली झाली. राज्याच्या सर्व भागांतून विद्यापीठे आणि कृषिविद्यापीठे निघाली. खेड्यापाड्यांतील विद्यार्थी महाविद्यालयीन पातळीवरील शिक्षण गावी राहून घेऊ लागला. सहकारी आणि खासगी प्रयत्नांतून कारखानदारी वाढली. रोजगाराच्या संधी वाढल्या. शेतीचं नवे तंत्र सामान्य शेतकऱ्यापर्यंत पोचले. त्याला खते, जंतुनाशके, नवी बियाणी मिळाली. त्याच्या शेतमालाचे भाव सरकार बांधून देऊ लागले. पावसाची अवकृपा सोडली तर शेतकरी थोड्या अधिक सुखात राहू लागला. ग्रामीण महाराष्ट्राचे रूप पूर्वीपेक्षा थोडे बाळसेदार दिसू लागले. तेथील शेतकऱ्याचा मुलगा पदवीधर झाला.अभ्यासाची पुस्तके वाचता वाचता स्वत:सुद्धा काही बाही लिहिण्याची धडपड करू लागला. कारूनारू वर्गालासुद्धा नवी जाणीव उत्पन्न झाली. खेडी बदलू लागली. खेडूतही बदलू लागला. प्रसारमाध्यमांनी ग्रामीण भागात जाळे विणले. ग्रामीण महाराष्ट्र चहू अंगांनी विकसित होऊ लागला. त्याला एक नवे सांस्कृतिक भान आले.

पन्नास वर्षापूर्वीचा दोन कोटीचा महाराष्ट्र हां हां म्हणता सहा कोटी लोकसंख्येचा बनला. खेड्यांचे झपाट्याने शहरीकरण होऊ लागले.

खेड्यांबरोबर शहरांचाही तोंडवळा बदलला. तालुका-पातळीवरील गावं शहरे बनली आणि मुंबई-पुणे-नागपूर-औरंगाबाद यांचा अमर्याद विस्तार झाला. साऱ्या भारतातील लोक महाराष्ट्रात रोजगारच्या निमित्ताने येऊन तेथे स्थिरावू लागल. त्यांनी आपल्याबरोबर आपली भाषा, बोली, संस्कृती आणली आणि आपल्या मराठी मुलुखात त्यांचे सहज रोपण झाले. मुंबई शहरामध्ये दोन मराठी माणसे आपसांत हिंदी बोलताना दिसू लागली. इंग्रजी भाषेचा वापर अतोनात वाढला. पालक आपापली मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळांतून पाठवताना स्पर्धा करू लागले.

या साऱ्यामुळे मराठी समाजाची जडणघडण बदलू लागली. या बदलातून काही सांस्कृतिक संदर्भ उभे राहिले.

पहिला संदर्भ साहित्याचा;

आणि दुसरा भाषेचा.

दुसऱ्या महायुद्धाच्या पार्श्वभूमीवर मराठीमध्ये नव्या साहित्याचे वारे वाहू लागले.

हे नवे साहित्य लिहिणाऱ्या लेखकांनी तोवरच्या जुन्या साहित्याला जवळजवळ नाकारले होते. रविकिरण मंडळाची कविता असो वा फडके-खांडेकरांची कथा-कादंबरी असो, ती नव्या लेखकांना आपली वाटेनाशी झाली. हे नवे लेखक नव्या जाणिवांनिशी आपल्या वाटा धुंडाळू पहात होते. या काळात कथा, कादंबरी, कविता आणि नाटक या सर्व वाङ्मयप्रकारांमध्ये नवे उन्मेष अवतरले. 'रणांगण' लिहून विश्राम बेडेकरांनी आणि 'एल्गार' लिहून श्री. ना. पेडशांनी नव्या मराठी कादंबरीची दिशा सूचित केली, तर मर्ढेकर-मुक्तिबोधांच्या कवितेने नव्या मराठी कवितेचे दार उघडले. गंगाधर गाडगीळ,अरविंद गोखले, व्यंकटेश माडगूळकर व पु. भा. भावे यांनी नवी मराठी कथा लिहायला सुरुवात केली. तिला 'नवकथा' हे नामाभिधान मिळाले. त्याच वेळी अशा तऱ्हेची नवी कथा शांताराम, मोकाशी,चोरघडे व सदानंद रेगेही लिहीत होते. या कथाकारांपाठोपाठ मराठी साहित्यामध्ये नव्या जाणिवांचा आविष्कार करणाऱ्या कथाकारांची एक भक्कम फळीच उभी राहिली. कवितेमध्ये मर्ढेकरांपाठोपाठ मुक्तिबोध, करंदीकर, आरती प्रभू, दिलीप चित्रे, अरूण कोलटकर; कथेमध्ये ए. वि. जोशी, जीं. ए. कुलकर्णी, कमल देसाई, विजया राजाध्यक्ष, पुंडलीक, चिरमुले, पानवलकर, कादंबरीमध्ये उद्धव शेळके, भाऊ पाध्ये, नेमाडे, दळवी, कर्णिक, खानोलकर, नाटकामध्ये तेंडुलकर, एलकुंचवार, सतीश आळेकर यांसारख्यांनी आपापल्या प्रांतात नवे बावटे लावले व त्या बावट्यांच्या फडफडण्याबरोबर अनेक कवी, कथाकार, कादंबरीकार आणि नाटककार आपापल्या वाटा धुंडाळू लागले.

१९४५ ते १९६५ या वीस वर्षांमध्ये नवसाहित्य मराठीमध्ये स्थिरावल्याच्या खुणा प्रगट होत होत्या व त्या साहित्याला नवी परिमाणे देणारे नवे लेखकही निर्माण होऊ लागले होते या साहित्याच्या प्रेरणा जशा महायुद्धोत्तर काळातील सामान्य माणसाच्या कठीण झालेल्या जगण्यामध्ये सामावलेल्या होत्या, तशाच जगातील विफलता आणि विकलता यांनी ग्रस्त झालेल्या पाश्चिमात्य देशात जे साहित्य निर्माण झाले, त्याचा आपल्या साहित्यिकांवर झालेला परोक्ष परिणाम व आपल्याकडील गुंतागुंतीचा झालेला सामाजिक जीवनव्यवहार यांमध्येही सामावलेल्या होत्या. शिवाय पूर्वसुरींचे साहित्य नव्या लेखकांना नव्या काळाच्या संदर्भात 'आपले' वाटेनासे झाले होते. ती एक स्वाभाविक प्रतिक्रिया होती.

या काळामध्येच मुंबईपुण्याबाहेरचा नवा ग्रामीण महाराष्ट्र घडू लागला होता परतु वर उल्लेखिलेल्या नव्या साहित्यामध्ये त्याचे दर्शन घडत होते का ? त्या काळातील उद्धव शेळके यांची 'धग', मनोहर तल्हार यांची 'माणूस', शंकरराव खरात यांचे 'बारा बलुतेदार', कर्णिक यांची 'कोकणी ग वस्ती ऽ ऽ', शंकर पाटील, मिरासदार यांचे कथासंग्रह इत्यादी पाहिल्यानंतर असे दिसते की त्यातूनही बदलता महाराष्ट्र यथार्थतेने प्रगट झालेला नव्हता. ते लेखन जुन्या नव्याच्या सांध्यावर उभे होते

अण्णाभाऊ साठे, बाबुराव बागूल, बंधुमाधव हे लेखक गावकुसाबाहेरचे जनजीवन लिहीत होते; पण तेही नव्या काळाच्या संदर्भात अपूर्ण वाटत होते. अशा वेळी आनंद यादव, रा. रं. बोराडे, ना. धो. महानोर ही नव्या जाणिवांनिशी लिहू पाहणारी लेखकमंडळी मुंबई-पुण्याबाहेरील खेडूत महाराष्ट्राचे जिणे नुकते कुठे शब्दबद्ध करू पाहात होती. बदलत्या महाराष्ट्रामध्ये लवकरच नवे साहित्यिक धुमारे फुटणार आहेत याची जी खूणगाठ जाणकारांनी बांधली होती त्याचा अंधुकसा प्रत्यय येऊ पाहात होता. १९६५ साली हैदराबाद येथे झालेल्या मराठी साहित्य संमेलनामध्ये अध्यक्ष वा. ल. कुलकर्णी यांनी स्पष्टपणे म्हटले की, ''अनेक वर्षे ज्या जमिनीतून पीक काढले गेले नव्हते, नव्हे जी संपूर्ण दुर्लक्षिली गेली होती, अशी जमीन नांगरून पिकासाठी तयार होत आहे, हे उत्साहवर्धक दृश्य दिसत आहे. हे दृश्य कितीतरी अपेक्षा निर्माण करीत आहे माझ्या तरी डोळ्यांना पिढ्यान्‌पिढ्या पडून राहिलेली महाराष्ट्रातील व महाराष्ट्राबाहेरील काळी जमीन आता पिकासाठी तयार झाली आहे, होत आहे, अनेक ठिकाणी अंकुरले आहे हे दिसत आहे. हे पीक भरघोस यायला हवे, त्याने कसदारपणात नवा उच्चांक गाठायला हवा. कृत्रिम उष्णता देऊन कुंड्यांतून किंवा ठराविक आखीव रेखीव जमिनीतून काढलेले हे पीक नव्हे हे उघड्या जमिनीवर व हवापाण्यावर तरारलेले पीक आहे.''

प्रा. वा ल. कुलकर्णी यांना अभिप्रेत असलेल्या 'काळ्या मातीतून नैसर्गिकपणे तरारलेल्या नव्या महाराष्ट्रातील साहित्याच्या पिकाचे' स्वप्न त्याआधी आणखी एका समाजाभिमुख लेखकाने पाहिले होते. ते लेखक म्हणजे श्री. म माटे. खेड्यामध्ये दारोदार हिंडणारा वासुदेव 'काळीचा धंदा सोडू नको । काळीचा धंदा सोडू नको' असे गाणे म्हणतो. त्या वासुदेवाला तो स्वत: शेतकरी असूनही 'भिकारी' म्हटले गेले, त्याचा राग येऊन तो हे गाणे म्हणतो त्यावर प्रा.माटे असे म्हणाले की, ''त्याचा राग वासुदेवाचे आत्मकथन लिहून वाङ्‌मयरूपाने कुणी सांगितले आहे काय ? सभ्य गृहस्थ हो ! लेखक वर्गाचा मोहरा घसघशीतपणे समाजाकडे वळला पाहिजे, म्हणजे त्याच्या हातून वाटेल तितके जिवत वाङ्‌मय तयार होईल ।'' माटे मास्तरांना सर्वच उपेक्षित समाजाकडे लेखकवर्गाने 'घसघशीतपणे' पाहिले पाहिजे असे मनापासून वाटत होते. त्यांनी स्वत: पुरते ते कार्य अर्थातच पार पाडले होते. पण वा. ल. कुलकर्ण्यांच्या बारा वर्षे आधी माटे मास्तरांनी हा कानमंत्र मराठी साहित्यिकांना दिलेला होता. एकटे मामा वरेरकर तेवढे त्या दरम्यान नाटक व कादंबरी क्षेत्रात उपेक्षित कामगारवर्गाबद्दल तिडिकेने लिहीत होते. ते सोडले तर एकाही मराठी लेखकाचा मोहरा घसघशीतपणेच काय पण मामुलीपणानेही कामकरी, कष्टकरी वर्गाकडे वळलेला नव्हता. खेड्यापाड्यातील लोकांचे जीवन नुकते कोठे व्यंकटेश माडगूळकर आणि र. वा. दिघे यांनी चितारायला सुरुवात केली होती. पण प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी म्हणायला आणि १९६५-१९७० च्या काळात महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीनंतर प्रथमच ग्रामीण महाराष्ट्रातून

एकामागोमाग एक असे अनेक समर्थ साहित्यिक पेन्सिल, कागद घेऊन उभे राहायला बोलाफुलाची पडावी तशी गाठ पडली. 'नांगरून तयार' असलेल्या काळीतून मृगाचा पाऊस पडताच पीक तरारावे तसे झाले आणि खेड्यापाड्यांतून तेथील 'खरे जगणे' भोगलेल्या नव्या साहित्यिकांचा एक बलवान चमू साहित्यप्रांतात आत्मविश्वासाने वावरू लागला.

महाराष्ट्राची ही 'काळी' त्या आधी खरोखर कोणी नांगरून ठेवली होती ?

बहुजनसमाजाला शिक्षणासाठी, विद्येसाठी, विमोचनासाठी उद्युक्त करणाऱ्या महात्मा जोतिबा फुले, कर्मवीर भाऊराव पाटील आणि डॉक्टर बाबासाहेब आंबेडकर यांनी गेल्या शंभर वर्षामध्ये जे कार्य केले त्यातून खेड्यापाड्यांतल्या लोकांना एक नवे भान आले. त्याला 'अस्मिता' हे नाव अलीकडे मिळाले. पण या शेतात राबणाऱ्या, गावकुसाबाहेर राहणाऱ्या, तुटपुंज्या शेतीवर कसेबसे जगणाऱ्या, सधनांनी पीडलेल्या, सवर्णांनी छळलेल्या, प्रचंड संख्येच्या मानवसमूहाची मनोभूमी नांगरून तेथे शब्दरूपाचा आविष्कार होण्यासाठी या महात्म्यांनी जे अखंड परिश्रम केले, त्याचे फलित म्हणजे महाराष्ट्रनिर्मितीनंतर बहुजनसमाजामध्ये आपल्या अंगभूत सामर्थ्याचे, आत्मभानाचे प्रकर्षाने वाहू लागलेले मोकळे वारे हे होय. या वाऱ्यांतून जी शक्ती निर्माण झाली तिने बहुजनांना बोलके केले. त्यांना वाणी दिली. त्यांना लेखणी दिली आणि नागपूरपासून उस्मानाबाद-बीडपर्यंत आणि खानदेशापासून सातारा-कोल्हापूर-कोकणापर्यंत पुस्तकांच्या दुनियेमध्ये अंधारात राहिलेला बहुजनसमाज मुखर झाला. आवेशाने, आवेगाने लिहू-बोलू लागला. जे साहित्य आम्हांला आजवर शाळा-कॉलेजांतून शिकवले गेले, जी पुस्तके आम्हांला ग्रंथालयांमध्ये वाचायला मिळाली, त्यांचा नि आमच्या जगण्याचा काही ताळमेळ नव्हता, त्या साहित्यामध्ये आमचे रूप आम्हांला दिसत नव्हते, असे तो धीटपणे, स्पष्टपणे सांगू लागला.

जोतिबांनी आपल्या 'इशारा' या निबंधात त्यांच्या वेळच्या बहुजन समाजाच्या दुर्दशेचे असे चित्र उभे केले होते:'शेतकरी लोक शेतीसारा देण्यास थोडेसे चुकले, तर त्यांस उन्हामध्ये ओणवे करून पाठीवर एक मोठा दगड देत किंवा त्याच्या बायकोला पाठीवर बसवीत आणि खालून मिरच्यांचा धूर देत असत. ते प्रजा म्हणजे एक प्रकारची जनावरेच समजत. त्यांचा उपयोग म्हटला म्हणजे त्यानी राजाकरिता व त्याचे जातीचे लोकांकरिता, त्यांच्या स्त्रियांकरिता व मुलाबाळांकरिता धान्य उत्पन्न करावे, वस्त्रे विणावीत, उन्हातान्हात खपावे, ऐषआरामाच्या सर्व गोष्टी पुरवाव्यात....त्यावेळेस सरकारात फिर्याद वगैरे करावी लागत नसे. कारण त्यांचे (म्हणजे सावकारांचे) घरातच सरकार होते. मनास वाटेल त्याप्रमाणे कुळास मारावे, झोडावे. त्याचा सर्व माल हिसकावून घ्यावा. त्याची बैलढोरे विकावी. त्याच्या मुलांमाणसांचे हालहाल करावे, शरीराचे नाजूक भागास चाप लावावेत. सातआठ रुपयांचे रकमेकरिता शेत जाईत, गुरेढोरे जाई, विहीर व मळे जाईत. आणि सरतेशेवटी तोही देशोधडीस जाण्यास अथवा प्राणत्याग

करण्यास सिद्ध होई.''

हे हृदयद्रावक लेखन आजच्या ज्या नवशिक्षित शेतकऱ्याच्या वा दलिताच्या मुलाच्या वाचनात येईल, त्याची प्रतिक्रिया कोणती होईल ? त्याच्या मनात कोणते विचार येतील ?आजुबाजूला डोळसपणे बघताना त्याला काय वाटेल ? त्याला बहुधा हाच प्रश्न पडेल की, जोतिबांच्या व आजच्या परिस्थितीत कितीसा फरक पडलेला आहे ? शेतकऱ्याला नव्या युगातील कायदेकानूंमुळे थोडेफार संरक्षण व मदत मिळत असली तरी त्याचे शोषण वेगळ्या तऱ्हेने आजही चालूच नाही का ? पूर्वी छळ सावकार करीत असत; पण आता गावातील सधन राजकारणी, कारखानदार, कोरडवाहू जमिनीला पाणी न मिळू देणारे आप्पलपोटे बागायतदार आणि सरपंच, पाटील, भ्रष्टाचारी अधिकारी यांच्या रूपाने नवे पिळवणूकदार त्याला छळत नाहीत काय ?आणि गरिबी ? बदलत्या काळातील सुबत्तेचे झुकते माप सधन शेतकऱ्याला मिळाले आणि एकर, दोन एकर जिराईत जमीन पदरी असलेली बहुसंख्य शेतकरी गरीबच राहिला ! त्या शेतकऱ्याचा वा दलिताचा शिकलेला, लिहावेसे, बोलावेसे वाटू लागलेला मुलगा जर लिहिण्याची उर्मी आली तर काय लिहील ? बोलण्याची संधी मिळाली तर काय बोलेल ?

त्याचे लिहिणे वाचण्यासाठी गेल्या वीस-पंचवीस वर्षामध्ये निर्माण झालेल्या व होत असलेल्या शेतकऱ्याच्या मुलाच्या साहित्याकडे वळावे लागेल.

आनंद यादव, रा. रं. बोराडे, भास्कर चंदनशिव, आनंद पाटील, सखा कलाल, चारुता सागर, महादेव मोरे या नव्या पिढीच्या लेखकांनी उपेक्षितांच्या दु:खावर नेमके बोट ठेवल्याचा पडताळा येऊ लागला तो त्यांच्या वेगळ्या अनुभूतीमुळे व ती लिहिण्यामागच्या खरेपणामुळे.

अस्पृश्य मानल्या गेलेल्या लोकांनाही याच काळात साहित्यातील परिवर्तनाची दिशा सापडली. शिक्षण, आंबेडकरी चळवळीचा व विचाराचा प्रभाव, धर्मांतरातून जागी झालेली स्वत्वाची जाणीव यामुळे हा वर्गही आपल्या अनुभवांना शब्दबद्ध करू लागला. 'दलित साहित्य' हा शब्द याच काळात रूढ झाला. डॉक्टर आंबेडकरांनी साहित्यिकांना उद्देशून म्हटले होते: ''आपली लेखणी आपल्या प्रश्नांपुरतीच बंदिस्त करू नका, तिचे तेज खेड्यापाड्यांतील गडद अंधार दूर करील असे परावर्तित करा. आपल्या या देशात उपेक्षितांचे, दु:खितांचे फार मोठे जग आहे हे विसरू नका. त्यांचे दु:ख त्यांची व्यथा नीट समजावून घ्या आणि आपल्या साहित्याद्वारे त्यांचे जीवन उन्नत करण्यास झटा. त्यातच खरी मानवता आहे.'' डॉ. आबेडकरांची ही सांगी जरी सर्व साहित्यिकांसाठी असली तरी एखाद्या आदेशाप्रमाणे, नव्याने उद्गार लाभलेल्या दलित लेखक-कवींनी तिचा अंगीकार केला. अण्णाभाऊ साठे, शंकरराव खरात, बंधुमाधव यांनी एका नुकत्या सुरू केलेल्या पर्वामध्ये एका-मागोमाग एक असे अनेक दलित

साहित्यिक सामील झाले आणि दलित साहित्य आपल्या अस्सलपणाने आणि अव्वल बाजाने मराठी साहित्यात अढळ होऊन बसले. बाबूराव बागूल, दया पवार, केशव मेश्राम, अर्जुन डांगळे, जनार्दन वाघमारे, अशोक व्हटकर, ज. वि. पवार, राजा ढाले, नामदेव ढसाळ, माधव कोंडविलकर, लक्ष्मण माने, लक्ष्मण गायकवाड यांच्यासारखे साहित्यिक आपले अनुभव घेऊन मराठी साहित्यात उभे राहिले. हे सारे अनुभव अपूर्व होते. हे साहित्य अननुभूत होते. गद्याबरोबरच दलित कविताही फुलू लागली. 'अस्मितादर्श' सारखे समर्थ व्यासपीठ दलित साहित्यासाठी खुले झाले. पांढरपेशांच्या जगात दलित साहित्य मुसंडी मारून पुढे आले. त्याला तसे यावेच लागले. बहुसंख्य समाज हा आजवर लिखित शब्दावाचून वंचित राहिला होता. महाराचे गाणे हे तमाशातून बोलीभाषेत अत्यंत प्रतिभायुक्त रीतीने म्हटले जात होते. महारांची मुले शिकली व आंबेडकरांच्या परिवर्तनवादी विचारांनी लिहू लागली तेव्हा हेच गाणे लिखित शब्दातून विलक्षण प्रभावीपणाने अवतरले आणि दया पवार यांची 'पाणी' ही कविता साकार झाली ! दलित प्रतिभेला उद्‌गार सापडला तोच असा रसरशीत आणि बावनकशी !

याप्रमाणे ग्रामीण आणि दलित असे दोन प्रभावी साहित्यप्रकार मराठी भाषेमध्ये निर्माण झाले. वास्तविक पाहता ग्रामीण आणि दलित साहित्य हे दोन्ही वाङ्मयप्रकार एकाच झाडाच्या दोन फांद्या होते. पण देश-काल-परिस्थितीचा परिपाक असेल किंवा सामाजिक व राजकीय वातावरणाचा परिणाम असेल, या दोन्ही फांद्या मूळ झाडापासून आपण वेगळ्या आहो, असे सांगू लागल्या.

ग्रामीण आणि दलित साहित्याच्या प्रेरणा आणि त्याची वाटचाल याबद्दल मी येथे थोड्या विस्ताराने बोललो, कारण या साहित्याच्या उगमाशी मी डोळ्यासमोर ठेवलेला माझ्या पिढीचा कालखंड होता हे होय. माझ्या पिढीतील मराठी साहित्यातील हे महत्त्वाचे टप्पे आहेत. १९६०-६५ नंतर महाराष्ट्राच्या ग्रामीण भागात जसे मी नुकतेच बोललो त्याप्रमाणे स्थित्यंतर वाङ्मयप्रांती घडत होते, तसेच स्थित्यंतर महानागरी, नागरी भागांतल्या साहित्यक्षेत्रांमध्येही घडून येत होते. चाळीस-पंचेचाळीसनंतर निर्माण झालेली नवकथा दरम्यान रूढ झाली होती, काहीशी जुनीही झाली होती. जी.ए., कमल देसाई, तेंडुलकर यांच्यासारखे लेखक आपल्या वेगळेपणाने प्रभाव पाडीत होते; पण पाश्चिमात्य साहित्याच्या प्रभावाचे पाझर त्यांच्या मानसिकतेमध्ये, निर्मितीखाली नव्हते, असे निश्चितपणे म्हणता येत नव्हते. पण देशी वाणांत खानोलकरांसारखा प्रतिभावंत आपले प्रभावी अस्तित्व दर्शवीत होता. त्यावर त्याची स्वतंत्र मुद्रा होती. पण यापेक्षाही [illegible] होते नवकथा आणि नवकविता हे प्रस्थापित [illegible] आहे असे वाटलेल्या नव्या, सतप्त तरुण साहित्यिकांनी त्याविरुद्ध बंडाचे निशाण उभारले ते याच काळात. अनियतकालिकातून त्यांची चळवळ सुरू झाली-आणि ती लवकर संपलीही ! त्या चळवळीतील काही तरूण लेखक कालांतराने एक तर

स्वतःच प्रस्थापितांच्या वर्गात जाऊन बसले किंवा बाकीचे त्यांचा आवेश मंद होत जाऊन अज्ञातवासात गेले. त्या मंडळीचे काही वंशज आज 'पुरोगामी' साहित्यिक म्हणून अधूनमधून आपल्या अस्तित्वाच्या ललकाऱ्या देत असले तरी त्यांचे यशापयश तेवढेच म्हणावे लागेल. वास्तविक पाहता हे तरूण संतप्त लेखक बुद्धिवंत व प्रतिभेचे बळ असलेले होते. पण प्रस्थापितांविरुद्ध कृतक रोष निर्माण करण्यात त्यांची शक्ती वाया गेली. त्यांच्या सामर्थ्याचा जसा त्यांच्या विकासाला उपयोग झाला नाही तसाच तो मराठी साहित्यालाही फारसा झालेला नाही.

कदाचित ग्रामीण व दलित साहित्याचा वेग एवढा जोरदार होता की त्यापुढे हे प्रस्थापितांविरुद्ध लढू पाहणारे वीर हतबल झाले असावेत. परंतु ग्रामीण व दलित साहित्यही प्रस्थापितांविरुद्धच एकवटल्याचे दिसत होते. मात्र त्यांची एक पक्की भूमिका होती. त्या साहित्याला शहरी लेखकांचे साहित्य पांढरपेशे व परके वाटत होते आणि शहरातील पांढरपेशे साहित्यिकही या साहित्याकडे आपुलकीने पाहात नव्हते. साहित्य-संमेलनासारख्या व्यापक व्यासपीठावरही कालपरवापर्यंत या साहित्याला जागा नव्हती. समीक्षेमध्ये त्याची दखल कोणी घेत नव्हते. दरम्यानची मराठी समीक्षा स्वतःच्याच चक्रव्यूहात एवढी गुंतून पडली होती की तिचे साहित्यातील या नव्या, खळाळत्या प्रवाहाकडे लक्षच गेले नाही. काही नामवंतांनी मात्र या साहित्याची मनापासून भलामण केली. पण त्यात समीक्षेपेक्षा कौतुक अधिक होते. मात्र ते कौतुकही ग्रामीण-दलित लेखकांसाठी मोठे प्रोत्साहन होते, यात संशय नाही.

ग्रामीण व दलित साहित्य यांचे प्रभावी अस्तित्व हे माझ्या पिढीच्या कालखंडाचे मोठेच वैशिष्ट्य म्हणावे लागेल. या साहित्याच्या प्रभावाची जेव्हा प्रस्थापित समीक्षा दखल घेईनाशी झाली तेव्हा त्याच्या समीक्षेसाठी ग्रामीण व दलित क्षेत्रांतूनच नवे समीक्षक आपल्या बळाने रुजून वर आले. डॉ. यशवंत मनोहर, डॉ. आनंद यादव, प्रा. रा. रं. बोराडे, डॉ. नागनाथ कोतापल्ले, प्रा. जनार्दन वाघमारे, डॉ. गंगाधर पानतावणे, प्रा. द. ता. भोसले यांनी दलित व ग्रामीण साहित्याची समीक्षा सुरू केली. हे साहित्य नागर साहित्यापेक्षा का व कसे वेगळे आहे, त्याच्या मूलभूत प्रेरणा कोणत्या आहेत, त्याच्या संकल्पनेमागील वाङ्मयीन भूमिका व त्याचे वाङ्मयीन अन्वयार्थ कोणत्या सामाजिक संदर्भाशी निगडित आहेत त्याचे पद्धतशीर व समीक्षाशास्त्राला अनुसरून विचार ह्यांनी मांडायला सुरुवात केली. एका परीने हा स्वतःच्या व्यक्तित्वाचा शोध होता.

वस्तुतः या वाङ्मयाचा समीक्षात्मक शोध घेणे हे प्रस्थापित समीक्षकांचे काम होते. पण बहुजन समाजाला वेदोक्त अधिकार नाहीत असे ज्या महाराष्ट्रात एके काळी म्हटले गेले, तेथे त्यांच्या साहित्याची तरी 'वेदोक्त' चिकित्सा करणारे शंकराचार्य कसे सापडणार ? म्हणूनच बहुजन साहित्यकारांना स्वतःचे समीक्षक व समर्थकही शोधावे लागले.

साहित्यसंमेलनासाठीही वेगळी चूल मांडावी लागली.

या प्रक्रियेमध्ये अभिनिवेश अपरिहार्यच होता. त्यातूनच आपल्या साहित्याबद्दल विचार मांडताना ब्राह्मणी सौदर्यशास्त्र आणि अब्राह्मणी सौदर्यशास्त्र यांसारखे बुचकळ्यात पाडणारे विवेचन किंवा "जीवनातल्या कुरूपतेला दृढ करणाऱ्या परिवर्तनवादी साहित्यिकांच्या साहित्यशास्त्राला कौरूप्यशास्त्र म्हणावे" असे चमत्कारिक विधान केले गेले.

मला वाटते, ग्रामीण व दलित साहित्याबाबत आता तरी गंभीर विचार होणे निकडीचे आहे. साहित्याला प्रयोजन असावे, असे निक्षापूर्वक म्हणणारा हा नवा साहित्यिक वर्ग आहे. यातील साहित्यिक हे जोतिबा फुले व डॉ. आंबेडकर यांच्या प्रतिभेचे आज घडीचे आविष्कार आहेत. ते प्रथम कार्यकर्ते आणि नंतर साहित्यिक आहेत. कार्यकर्ता हा चळवळीतून येतो. चळवळ चैतन्यशील असते. पण चळवळीमध्ये आग्रह व अभिनिवेश असतो. या साहित्यनिर्मितीमागील अभिनिवेशही आता पुरेसा झाला असे सांगण्याची वेळ आली आहे असे मला वाटते. त्याची आता वकिलीही फार झाली. नकार, विद्रोह ही हत्यारे आहेत. ती काही काळपर्यंत वापरता येतात. पण साहित्यासारख्या सचेतन, जीवनस्पर्शी प्रांतात ती कधी वापरावी यापेक्षा ती कधी म्यान करावी याचे भान असले पाहिजे !

विशुद्ध साहित्याचा स्रोत हा एकच असतो व असावा. त्यामध्ये ग्रामीण, दलित, जनवादी, ख्रिस्ती, आदिवासी साहित्याचे वेगवेगळे तंबू टाकून आपण एक प्रकारची त्याज्य अशी वर्गभेद व वर्णभेद व्यवस्था तर निर्माण करीत नाही ना, याचा विचार या वेगवेगळ्या राहुटेदारांनी आतां केला पाहिजे असे मला वाटते. मी एका ग्रामीण साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष होतो. तेथे व्यक्त झालेले विचार ऐकून माझे असे मत बनले की या सर्व सामान्यजनांच्या साहित्याला एकत्र आणून त्यांना एकच 'बहुजन साहित्य' अशी संज्ञा देता येणार नाही का ? कारण या सर्वच साहित्याला सचेतन असा जगण्याचा एकच संदर्भ आहे. जर राजकीय, सामाजिक व सांस्कृतिक भेदभाव बाजूला ठेवले तर सर्वच ग्रामीणांचे एक 'बहुजनसाहित्य' निर्माण व्हायला कोणती हरकत आहे ?

अशा बहुजनसाहित्याकडून यापुढे अधिकच कसदार, सृजनशील साहित्यकृतीची अपेक्षा आहे. बहुजनसाहित्यातील आत्माविष्कार विशुद्ध 'साहित्य' म्हणून गणला जावा एवढा त्याचा कस असायला हवा. आत्मकथन आता पुरे झाले. त्यातील साचलेपण आता ठळकपणे जाणवू लागले आहे. बहुजनसाहित्यातून आता स्वतंत्र, कलात्मक, जीवनदर्शी व निखळ साहित्यविचारावर टिकणारी कलाकृती निर्माण झाली पाहिजे. उत्पादन म्हणजे निर्मिती नव्हे, हे जाणून घेतले पाहिजे. हे अशक्य नाही. त्या दृष्टीने अलीकडील काळात माझ्या प्रत्ययाला आलेल्या काही साहित्यकृतीचा मी येथे उदाहरणार्थ उल्लेख करतो : कोरडवाहू शेतकऱ्याला त्याला जीव की प्राण असलेल्या गुराढोरांच्या, पाऊस नसला की कशा विपदा होतात आणि शासनकर्ते तेव्हा कसे मखख

असतात,त्याचे चित्रण करणारी प्रा. रा. रं. बोराडे यांची 'चारापाणी' ही कादंबरी, इंद्रजीत भालेराव या तरूण कवीची 'पीकपाणी' ही कविता, योगेद्र मेश्राम यांची 'माझा गाव कुठाय' ही कादंबरी; 'पांगिरा' ही विश्वास पाटील यांची कांदबरी; दया पवार यांची 'पाणी' ही कविता आणि डॉ. यशवंत मनोहर यांची 'कालचा पाऊस आमच्या गावात पडलाच नाही'; केशव मेश्राम यांची 'जटायू' व 'हकीगत' या साहित्यकृती किती नोलामोलाच्या आहेत ! अनेक तरुण लेखक आत्मकथनाऐवजी आता स्वतंत्र रचना करू पाहात आहेत. कदाचित त्या कलाकृती समीक्षेच्या मानदंडाने उण्या वाटतील; पण त्यांचा सच्चा आविष्कार हा महत्वाचा मानला पाहिजे. मला असेही वाटते की या शेतकऱ्यांच्या, दलितांच्या, कामकऱ्यांच्या व साहित्याची कोणतीही पार्श्वभूमी नसलेल्या, नव्याने उद्‌गार आणि अभिव्यक्ती लाभलेल्या मुलांची निर्मिती आहे तशीच स्वीकारून पुढे जावे. त्यातील अनघड सौदर्याचाच तूर्त आस्वाद घ्यावा. कालांतराने त्या साहित्यालाही एक घाटीव, रेखीव, कलात्मक रूप येईल. कारू-नारू यांना यापुढे रोखता येणार नाही. त्यांच्या साहित्याचे खळाळ अप्रतिहत वाहातच राहाणार आहेत- ते तुम्हांला आवडोत वा न आवडोत. साहित्याच्या भांडाराच्या किल्ल्या यापुढे एकाच लहानशा वर्गाच्या कमरेला राहू शकणार नाहीत. ज्योतीबांना व डॉ. आंबेडकरांना अभिप्रेत असलेले परिवर्तन होऊ लागलेले आहे.

नव्याने अभिव्यक्ती करू पाहाणाऱ्या पहिल्या पिढीच्या बहुजन साहित्यिकांच्या रचनांबद्दल मी आत्ता बोललो. प्रस्थापित साहित्यिकांच्या बाबतीत समीक्षेने त्यांची यथायोग्य तुलना केलीच नाही. आणि माझ्या पिढीच्या साहित्याचीही, काही अपवाद वगळता, साक्षेपी समीक्षा झालेली नाही  असे मला वाटते. माझ्या पिढीतल्या अनेक साहित्यिकांची उदाहरणादाखल नावे मला घेता येतील. जयवंत दळवी, शं  ना. नवरे, व. पु. काळे, मधु मंगेश कर्णिक, उद्धव शेळके, मनोहर शहाणे, विजया राजाध्यक्ष, रत्नाकर मतकरी, नारायण धारप, ह  मो. मराठे, रा  रं. बोराडे, आनंद यादव, नामदेव ढसाळ, भाऊ पाध्ये, केशव मेश्राम, शरच्चंद्र चिरमुले, अरूण साधू, श्री. ज. जोशी,सुभाष भेडे, ज्योत्स्ना देवधर, ज्ञानेश्वर नाडकर्णी, रणजित देसाई, वसुंधरा पटवर्धन अशी काही नावे सहज आठवतात. या सर्व लेखकांचे लेखन गुणवत्तापूर्ण असले तरी एका परीने 'सोपे' आहे. अलीकडे मला 'सोपे लेखक' व 'कठीण लेखक' असे दोनच सोपे प्रकार साहित्यात पाडावेसे वाटू लागले आहे. आपल्या उच्चभ्रू समीक्षकांचेही मी एक वैशिष्ट्य पाहून ठेवले आहे. ते म्हणजे लेखक जेवढा दुर्बोध (म्हणजे माझ्या शब्दांत 'कठीण') तेवढ्या वेगाने ते त्याच्यावर झडप घालतील व समीक्षेसाठी त्याचे सर्व साहित्य उलटेपालटे करतील. पु. ल. देशपांड्यांसारख्या आजच्या घडीच्या मराठीतील सर्वश्रेष्ठ विनोदी लेखकाच्या, प्रवासवर्णनकाराच्या साहित्याचीही साक्षेपी समीक्षा झालेली नाही. मला वाटते, त्यांची लोकप्रियता व सोपेपणा तर समीक्षकांच्या मार्गात काट्यासारखी

आडवी येत नसावी ? पु. ल. देशपांडे आणि वर उल्लेखिलेले अनेक 'सोपे' लेखक आमच्या समीक्षकांना त्याज्य वाटावे याला काय म्हणावे ?

मला गंमतीने वाटते की, समीक्षकांचीही एक 'भाषावार प्रांतरचना' केली पाहिजे ! कारण त्यांच्यात तरी किती भेदाभेद आणि सवतेसुभे ? परवाच मी समीक्षकांच्या एका परिसंवादाबद्दल वाचले. त्यामध्ये समीक्षेच्या व समीक्षकांच्या किती तऱ्हा मला आढळल्या ! आस्वादक समीक्षा, भाषाविज्ञानाधिष्ठित समीक्षा, मार्क्सवादी समीक्षा, रूपवादी समीक्षा, जीवनवादी समीक्षा, मानसशास्त्राधिष्ठित समीक्षा, दलित साहित्यशास्त्राधिष्ठित समीक्षा, सौदर्यशास्त्रीय समीक्षा, आकृतिवादी समीक्षा, लयतत्त्ववादी समीक्षा, अस्तित्ववादी समीक्षा, आदिबंधात्मक समीक्षा- असे नाना प्रकार ! या नाना प्रकारांमध्ये मराठी भाषेतल्या सोप्या, सरळ अर्थ कळणाऱ्या माझ्या पिढीतील साहित्याला कुठे जागा मिळणार ? आणि या समीक्षकांचे तरी मतैक्य कुठे होते आहे ?

आमच्या समीक्षकांवर माझा रोष नाही; पण त्यांची साहित्याचा आस्वाद घेताना नक्कीच चकवणूक होत असावी असा माझा भोळाभाबडा तर्क आहे ! त्यासाठी एक जुने पण मार्मिक उदाहरण मी सांगतो :

केशवसुतांनी तत्कालीन प्रचलित कवीपेक्षा वेगळी कविता लिहिली व स्वत.ला योग्य वाटेल तशी शब्दरचना केली. पण साहित्यसम्राट व टीकाकार म्हणूनं त्या काळात गाजलेल्या नरसिंह चिंतामण केळकरांनी १९२१ सालच्या साहित्य-संमेलनातील अध्यक्षीय भाषणामध्ये केशवसुतांच्या कवितेची कशी समीक्षा केली ते पाहा. ते म्हणतात :" केशवसुतांचे मराठी भाषेवर प्रभुत्व नसल्यामुळे म्हणा किंवा भाषासौदर्याचे महत्व त्यांना विशेष न वाटल्यामुळे म्हणा; त्यांची कविता भाषेच्या व रचनेच्या दृष्टीने ओबडधोबड झाली आहे. त्यातही विषयानुरूपतेच्या हेतूने त्यांनी जी नवी वृत्ते उपयोगात आणिली, ती रचनेच्या दृष्टीने काहीशी शिथिल व अनियमित आहेत. 'प्रीती' व 'हरपले श्रेय' ही त्यांची दोन गाणी व या वृत्तशैथिल्याच्या बाबतीत नमुनेदार आहेत. त्याचप्रमाणे समर्पक शब्द योजण्याच्या भरात कित्येक वेळा गावंढळ शब्द त्यांच्या हातून पडल्याचे आढळून येते."

आता साध्या, सोप्या शब्दांना जवळ करणाऱ्या केशवसुतांची ही अशी समीक्षा तत्कालीन श्रेष्ठ टीकाकारांनी जर केली असेल तर आमच्यासारख्या अगदीच सोपे व सरळ लिहिणाऱ्या लेखकांची संभावना आजच्या समीक्षकांनी तशीच केली- किंवा अगदीच केली नाही-तर त्यात आम्ही तरी वैषम्य का वाटून घ्यावे ? असो. आपण आपले लिहीत राहावयाचे असते. वाचणारा आपल्या मागून येत असतो. समीक्षक मात्र येतोच असे नाही. आणि कदाचित तो आलाच आणि आपण त्याला 'गावंढळ' वाटलो तर काय करणार ?त्या आपत्तीपेक्षा तो जवळपास नसणेच चांगले. 'लेखक लिहिता बरा' या धोरणाने सर्व लेखकांनी आपापल्या परीने मनापासून लिहीत राहावे, एवढेच तात्पर्य.

पण असे असले तरी सर्वच मामला तसा नाही हेही मान्य केले पाहिजे. प्रा. वा.

ल. कुलकर्णी, प्रा. व. दि. कुलकर्णी, प्रा. म. द. हातकणंगलेकर, प्रा. गो. म. कुलकर्णी, प्रा. गंगाधर गाडगीळ, डॉ. विजया राजाध्यक्ष यांसारख्या आस्वादक समीक्षकांनंतर डॉ. अरूणा ढेरे, डॉ. अक्षयकुमार काळे, डॉ. सुधीर रसाळ यांची समीक्षेतील भूमिका आमच्या पिढीला दिलासा देणारी आहे, असे म्हणावे लागेल.

आजचे मराठी साहित्य ज्या मराठी भाषेच्या आधाराने उभे आहे त्या मराठी भाषेची आजची अवस्था कशी आहे हे पाहणे या ठिकाणी उद्‌बोधक ठरेल. मराठी ही आमची मायबोली. आज ती राजभाषासुद्धा झालेली आहे. परंतु तरीही कुसुमाग्रजांसारख्या कवींना म्हणावे लागते की, "डोक्यावर सोनेरी मुकुट आणि अंगावर फाटके कपडे अशा अवस्थेत ती मंत्रालयाच्या दाराशी उभी आहे." असे का व्हावे ? त्याला जबाबदार कोण ?

मराठी भाषेविषयी, तिच्या भवितव्याविषयी गेल्या काही वर्षांत खूपच 'विचार मंथन' झालेले आहे. सर्वात मोठा आक्षेप घेतला जात आहे तो इंग्रजीच्या आक्रमणाविरुद्ध हा आक्षेप खराच आहे. पण त्याला खरोखर कोण जबाबदार आहे ? आपल्याकडील सामाजिक व सांस्कृतिक परिस्थिती ज्या राजकीय शासन व्यवस्थेमधून निर्माण झालेली आहे त्या शासनव्यवस्थेवर या बाबतीत बव्हंशी जबाबदारी येते. शासनाचे शिक्षणविषयक आणि रोजगाराच्या संधीविषयक धोरणच या इंग्रजीच्या वाढत्या प्रभावाला कारणीभूत आहे असे मला वाटते. देशाच्या घटनेमध्ये राष्ट्रभाषा म्हणून हिंदीच्या विकासाची जबाबदारी केंद्रसरकारवर टाकलेली आहे. ही गोष्ट १९५० साली संमत झालेल्या राज्यघटनेची. तेव्हा भाषिक राज्ये स्थापन झालेली नव्हती. म्हणून राज्याच्या भाषेच्या विकासाबद्दल निश्चित धोरणही घटनेमध्ये अंतर्भूत नव्हते, जरी घटनेच्या आठव्या परिशिष्टामध्ये सर्व भाषांचा समावेश केलेला असला तरी त्यात विविध भाषांच्या स्थानिक 'विकासाबद्दल' स्पष्ट उल्लेख आढळत नाहीं. पण हिंदीबाबत केंद्रसरकारने पूर्वीच ती जबाबदारी घटनेतील तरतुदीनुसार स्वीकारली होती. भाषिक राज्ये निर्माण झाल्यानंतर जर त्या त्या राज्यांना त्यांच्या भाषेच्या विकासाबद्दल स्पष्ट आणि निःसंदिग्ध अशा धोरणविषयक सूचना मिळाल्या असत्या तर इंग्रजीच्या पकडीतून सुटण्यासाठी राज्यघटनेचा अडसर आडवा आला नसता. त्या त्या राज्यांनी आपसूकच आपल्या मातृभाषेसाठी शिक्षणक्रमात सक्तीचा व्यवहार आचरला असता पण आपल्या शेजारची अन्य राज्ये त्या बाबतीत कसलाही अडसर न बाळगता आपापल्या मातृभाषांचा विकास अस्मितापूर्वक करीत आहेत. आपल्या महाराष्ट्र राज्याला मात्र त्या बाबतीत घटनेची अडचण वाटत असली पाहिजे. घटनेमध्ये बदल झालेला नाही, ही आमची चूक नव्हे. आम्हाला आमच्या राज्यात मराठी भाषा अनिर्बंधपणे शिकता व शिकवता आली पाहिजे. त्यासाठी राज्यशासनच ठाम आणि स्पष्ट धोरण आखू शकेल. तसे झाले तरच 'कॉन्व्हेंट संस्कृती'ची जी अमर्याद वाढ घटनेच्या आधारावर होते आहे, ती थांबू शकेल. इंग्रजी भाषा घटनेनुसार अनिवार्य ठरत असेल तर ती या धोरणातील मोठी चूक

आहे. महाराष्ट्र राज्याच्या शासनाने या प्रश्नाची घटनात्मक तपासणी तातडीने केली पाहिजे व महाराष्ट्र राज्यामध्ये शाळांच्या प्राथमिक स्तरावर मराठी भाषेचीच अंमलबजावणी केली पाहिजे. विद्यार्थ्यांना जर बालवयात आपल्या मातृभाषेचा लळा लागला नाही, तर तो पुढे कधी लागणार व त्यांच्यावर मराठी भाषेचे, साहित्याचे व संस्कृतीचे परिणाम कसे होणार ? "अडगुलं मडगुलं सोन्याचं कडगुलं; रुप्याचा वाळा, तान्ह्या बाळा, तीट लावू ऽऽ" या बालगीतातील गोड मराठी शब्दांचा लळा आईच्या दुधाबरोबर जर बालकाला लागला नाही तर त्याचे मराठीपण पुढील आयुष्यात कसे टिकणार ? पालकांनी याचा गंभीरपणे विचार केला पाहिजे. आज ऊठसूठ इंग्रजी माध्यमाच्या शाळेमध्ये अजाण अर्भकांना दाखल करण्याची रीत वाढत आहे. खेड्यापाड्यांतील शिक्षणसंस्थाही इंग्रजी माध्यमाचा अट्टाहास धरताना दिसत आहेत. माझा इंग्रजीला विरोध नाही. बहुजनसमाजाला इंग्रजीपासून दूर ठेवावे असा यामागील प्रयत्न नाही; तर इंग्रजीचे शिक्षण प्राथमिक यत्ता संपल्यानंतर ऐच्छिक वा सक्तीचेही ठेवावे; पण धुळाक्षरे गिरवताना, पहिले शब्द लिहिताना-वाचताना ते मातृभाषेचेच असले पाहिजेत, हा आमचा आग्रह आहे. प्राथमिक स्तरानंतर इंग्रजीचे आकलन होण्याइतपत क्षमता विद्यार्थ्यांमध्ये नक्की येईल व त्याला मराठी भाषेची व वाङ्मयाची गोडी दरम्यान लागलेली असेल. त्यासाठी शैक्षणिक धोरणात बदल करणे आवश्यक असेल तर तो घडवून आणला पाहिजे. घटनाही दुरुस्त करावी लागल्यास ती दुरुस्त केली पाहिजे.

जी गंभीर समस्या महाराष्ट्रातील मराठी भाषेची आहे त्याहून अधिक गंभीर समस्या महाराष्ट्राबाहेरील मराठी भाषिकांची, विशेषत: सीमा-भागातील जनतेची आहे. मध्यप्रदेश, कर्नाटक, तामीळनाडू या राज्यांमध्ये मराठी भाषिक लोक मोठ्या संख्येने आहेत. त्यांचा महाराष्ट्राशी भावनिक व सांस्कृतिक लागाबांधा टिकण्यासाठी मराठी भाषा हा एकमेव दुवा आहे. तो बळकट करण्याचे अनेक मार्ग शासनाला चोखाळता येतील. पण महाराष्ट्र शासन त्या बाबतीत उदासीन आहे. बेळगावलगतच्या सीमाभागातील लोकांचा कोंडमारा तर विचारू नका ! तेथील मराठी भाषिकांवरील कानडीची सक्ती वाढते आहे; आणि महाराष्ट्र शासनाने मात्र सीमेलगतच्या महाराष्ट्र भागातील मराठीची सक्ती काढून टाकली आहे व तिथे कानडी मुक्तपणे शिकवली जात आहे ! परवा बेळगावला, एरवी जाहीरपणे कोठेही वक्तव्य न करणाऱ्या, ज्येष्ठ व वयोवृद्ध कवयित्री इंदिरा संत एका सभेत आर्तपणे उद्गारल्या, की "आम्हा सीमावासियांचा भाषेचा प्रश्न काही सुटत नाही. आम्ही इथून महाराष्ट्राला कळवळून हाक मारतो, पण महाराष्ट्रातून आम्हांला कोणी 'ओ' देत नाही !"-आणि ऐकणाऱ्यांची मने सुन्न झाली !

कविवर्य कुसुमाग्रज आणि इंदिरा संत यांच्यासारख्या तपस्व्यांनी तळमळून काढलेल्या उद्गारांना मंत्राचे सामर्थ्य व चैतन्य असते. महाराष्ट्र शासनाला त्याचा स्पर्श

होईल का ?

महाराष्ट्रामध्ये मराठी भाषेच्या सुदृढतेसाठी मराठी जनतेलाही बऱ्याच गोष्टी करता येण्यासारख्या आहेत. मुंबईसारख्या अठरापगड शहरांमध्ये मराठी माणसाने समोरच्या माणसाशी आवर्जून मराठीतच बोलण्याचा उपक्रम सुरू केला, तर समोरचा माणूस कोणत्याही भाषेचा असला तरी त्याला मराठीत प्रतिसाद देण्यासाठी प्रयत्न करावे लागतील व आपली भाषा न बिघडता दुसऱ्यावर मराठीचा अभिषेक सुरू होईल. लग्नप्रसंगी निमंत्रणपत्रिका इंग्रजीतून छापण्याचा अट्टाहास आपण सोडायला नको का ? आपल्या दारावरील नावाची पट्टी मराठीमध्ये नको का ? घरात मुलांसाठी उत्तम मराठी बालवाङ्मय ठेवायला नको का ? नेहमीच्या बोलण्याचालण्यात मराठीला प्राधान्य नको का ? सार्वजनिक उपक्रमातील वा खाजगी बहुराष्ट्रीय कंपन्यांतील कर्मचाऱ्यांनी आपले रजेचे अर्ज मराठीतून लिहायला सुरुवात केली तर ? महाराष्ट्रातील अनेक केंद्रीय सार्वजनिक उपक्रम व बहुराष्ट्रीय कंपन्या यामध्ये मराठीचा वापर करणे हे तेथील महाराष्ट्रीय कर्मचाऱ्यांच्या पुष्कळच हाती असते. त्यांनी ते केले पाहिजे. 'भारत पेट्रोलियम' सारख्या सार्वजनिक उपक्रमामध्ये केवळ हिंदी भाषेच्या वापरासाठी १९८८-१९८९ या एका वर्षात सुमारे ९ लक्ष रुपयांची तरतूद करण्यात आली होती. महाराष्ट्रामध्ये असलेल्या, अशी प्रचंड कर्मचारीसंख्या असलेल्या सार्वजनिक वा खाजगी कंपन्यांना मराठी भाषेच्या वापरासाठी पुरेशी आर्थिक तरतूद करण्याचे आदेश महाराष्ट्र शासन देऊ शकणार नाही का ? त्यामध्ये मराठी 'गृहपत्रिका' (हाऊस मॅगेझीन्स) सुद्धा काढता येऊ शकतील. आज सारा व्यवहार इंग्रजी हिंदीतून होत असतो, तो मराठीतून व्हायला हवा.

मुंबई दूरदर्शनवरील मराठी लेखन पुष्कळदा अशुद्ध असते. तिकडे कुणा मराठी अधिकाऱ्यांनी जाणीवपूर्वक लक्ष द्यायला हवे. वृत्तपत्रांतूनही चुकीची मराठी भाषा लिहिली जाते. ती शुद्ध असणे महत्त्वाचे आहे. पाठ्यपुस्तकातील मराठी भाषा अधिक सोपी, सुगम हवी. झोपडपट्टीत राहाणाऱ्या मुलाच्या झोपडीला खिडकी नसते, त्याला 'तावदान' किंवा 'झडप' हे शब्द माहीत नसतात, तेव्हा असे बहुसंख्य मुलांना अपरिचित शब्द पाठ्यपुस्तकारांनी टाळायला हवेत.

-आपल्या मराठी भाषेसाठी अशा अनेक गोष्टी शासनाला, तुम्हा-आम्हाला करता येण्यासारख्या आहेत.

भाषेचा विकास ग्रंथांवर अवलंबून असतो. मराठीमध्ये ग्रंथांचे विश्व हा संबंधितांना भेडसावणारा नेहमीचा प्रश्न होय. साहित्यव्यवहारात ग्रंथकार, मुद्रक, प्रकाशक व वितरक हे सर्वात महत्वाचे घटक. ग्रंथालये, वाचनालये हे त्यानंतरचे महत्त्वाचे घटक. मराठी ग्रंथांच्या प्रकाशनातील समस्यांबाबत तसेच मुद्रकांच्या अडचणीबाबत प्रकाशक परिषद, मुद्रण परिषद यांसारख्या व्यासपीठांवरून ऊहापोह झालेला आहे व शासनाकडेही

त्यांच्या सूचना सादर झालेल्या आहेत. ग्रंथांच्या वाढत्या किंमती ही एक न सुटणारी समस्या. त्याबाबत सामान्य वाचक अगतिक असतो. त्याला चांगली पुस्तके वाजवी किंमतीत हवी असतात. ही रास्त अपेक्षा पूर्ण करणे आज तरी प्रकाशकांना शक्य होईलसे वाटत नाही. त्यासाठी सरकारनेच पुढाकार घेतला पाहिजे असे मला वाटते. शेतकऱ्याला शेती, शेतमाल महत्त्वाचे वाटतात, त्याप्रमाणेच शिकलेल्याला, मग तो खेड्यातील असो वा शहरातील, पुस्तके महत्वाची वाटतात. पण सरकारला हा फरक समजत नाही. सरकार शेतकऱ्याला शेतमालाचे भाव बांधून देते, शेतीत नुकसान आले तर अनुदान देते, कर्जमाफी करते, बंडिंग माफ करते, कुजलेला कांदा, भिजलेला कापूस, सडलेली द्राक्षे यांच्यासाठी लक्षावधी रुपये खर्च करते; पण कविवर्य ना. धो. महानोरांनी मांडलेली, वाचकांना स्वस्त दराने पुस्तके पुरवण्याची योजना मात्र मंजूर होऊनही मार्गी लावत नाही! केद्र सरकारने तर गेल्या वर्षी साडेचार हजार कोटी रुपयांच्या अनुदानाची तरतूद देशातल्या फक्त रासायनिक खतांच्या उत्पादकांसाठी केली होती! महाराष्ट्र सरकारचे वार्षिक अंदाजपत्रक कित्येक हजार कोटींचे असते; त्यातील कितीशी रक्कम सांस्कृतिक कारणांखातर खर्च होते ? त्यातही साहित्य, ग्रंथालये, वाचनालये यांसाठी किती खर्च होते ? वाचनालय-ग्रंथालय यामधील कर्मचारी म्हणजे ग्रंथ व वाचक यांमधील महत्त्वाचा दुवा! त्यांच्या वेतनश्रेणी किती मामुली आहेत, त्याचा सरकारने विचार केला आहे काय ? ग्रंथालयांना मिळणाऱ्या अनुदानांची रक्कम किती तुटपुंजी असते याचा बारकाईने व आस्थेने शासनामध्ये कोणी विचार केला आहे का ? मुंबईसारख्या शहरांत प्रचंड संख्येने जेथे ग्राहक उपलब्ध आहेत, तेथे त्यांना आकर्षित करून ग्रंथविक्री वाढावी यासाठी तेथील क्रॉस मैदानांसारखी सरकारी मालकीची मोक्याची मैदाने, वर्षातून फक्त दोन आठवडे,मराठी ग्रंथजत्रा भरवण्यासाठी शासनाने मराठी प्रकाशकांना अल्प दराने दिली पाहिजेत.

'फिरत्या ग्रंथजत्रा' यासारख्या आत्यंतिक परिश्रम घेऊन चालविल्या जाणाऱ्या ग्रंथप्रसाराच्या उपक्रमांना प्रवासात सवलत, शासकीय विश्रामगृहांतून राहाण्याची सवलत यांसारखी मदत जरी शासनाने केली तरी खूप होईल. एके काळी 'सत्यकथे' सारखी दर्जेदार वाङ्मयीन मासिके लेखकांचे नवोन्मेष प्रगट करण्यासाठी व्यासपीठ असावे, तशी उपलब्ध होती. ती आर्थिक कारणामुळे बंद पडल्यानंतर नव्या गुणवत्तापूर्ण लेखन करणाऱ्या साहित्यिकांसाठी तसे व्यासपीठ उरले नाही. साहित्यसंस्थांची 'पंचधारा' 'युगवाणी', 'साहित्यपत्रिका', यांसारखी नियतकालिके आपल्या परीने उत्कृष्ट कार्य करीत आहेत; पण त्यांनाही आर्थिक अडचणी आहेत. त्यांना व 'आलोचना', 'अनुष्टुभ', 'आरती', 'कवितारती', 'अक्षरवैदर्भी', 'निकाय', 'उगवाई','अस्मितादर्श' यांसारख्या खाजगी प्रयत्नातून चालविल्या जाणाऱ्या नियतकालिकांना शासनाने भरघोस आर्थिक मदत दिली पाहिजे. साहित्य संस्कृती मंडळाच्या मर्यादित निधीतून त्यांना अशी भरघोस

मदत मिळण्याची शक्यता नाही. शिक्षणखात्याने ती परस्पर आपल्या अंदाजपत्रकातून दिली पाहिजे. अशी मदत वेळीच मिळाली नाही, तर 'सत्यकथा', 'संग्रहालय' यांची जी गत झाली तशी त्यांचीही होण्याची भीती वाटते. वाङ्मयीन 'ग्रंथाभिमुख मासिके बंद पडणे. हे आपल्या सांस्कृतिक अनारोग्याचे द्योतक आहे. शासन दरवर्षी उत्कृष्ट ग्रंथांना पुरस्कार देते. ही प्रथा स्तुत्य आहे. परंतु पुरस्कारप्राप्त ग्रंथ मोठ्या संख्येने खरेदी करून ते विशेषेकरून ग्रामीण भागातील ग्रंथालयांना मिळतील अशी व्यवस्था झाली पाहिजे. सगळ्याच मागण्यांसाठी शासनावर अवलंबून राहावे, हे मनाला पटत नसले तरी या गोष्टी खाजगी प्रयत्नांतून सिद्ध होणाऱ्या नाहीत. बालवाङ्मयाला या वर्षीपासून अ. भा. साहित्यसंमेलनाचे मानाचे व्यासपीठ मिळते आहे. पण बालवाङ्मयाची खरेदी होण्यासाठीही शासनाने अनुदान वाढवले पाहिजे. अमेरिकेतील फोर्ड फौंडेशनसारख्या संस्थांकडे महाराष्ट्रातील साहित्यिकांना व साहित्यसंस्थांना आर्थिक आशेने पाहावे लागू नये. त्यात महाराष्ट्र शासनाची शोभा राहात नाही. एशियाटिक लायब्ररीसारख्या सांस्कृतिक धनाला शासनानेच जपायला हवे.

एकूणच शासनाने महाराष्ट्राच्या भाषिक, वाङ्मयीन विकासाकडे अधिक आस्थेवाईकपणे ध्यान द्यावे, असे मला वाटते. बालकवीची जन्मशताब्दी खासगी प्रयत्नांतून साजरी झाली. कविवर्य महानोर व कुसुमाग्रज त्यासाठी जळगावला गेले. शासनमात्र स्वस्थ होते. मला वाटते, महाराष्ट्राच्या एकूण शासनव्यवहारात सांस्कृतिक गोष्टींना अधिक महत्व दिले जाणे अगत्याचे आहे.

सुदैवाने खासगी प्रयत्नांतून मात्र महाराष्ट्रामध्ये साहित्य आणि भाषा यांच्या अभिवृद्धीसाठी जागरूकपणे अनेक पद्धतशीर उपक्रम सुरू झालेले आहेत. 'जागतिक मराठी परिषदे' ने एक वातावरण निर्माण झाले आणि तिथे प्रगट झालेल्या कुसुमाग्रजांच्या मनोगतातून मराठी भाषेच्या आजच्या व उद्याच्या अवस्थेबद्दलच्या विचारांना चालना मिळाली. 'ग्रंथाली', मॅजेस्टिक साहित्यिक गप्पा ढवळे ग्रंथजत्रा यांचे ग्रंथप्रसाराचे प्रयत्न निर्विवादपणे स्वागतार्ह आहेत. नुकतीच मुंबईमध्ये झालेली 'वाचन परिषद' व तिला मिळालेले भव्य यश, हीसुद्धा ग्रंथवाचनाच्या आणि अभिरूची संपन्नतेच्या दृष्टीने घडून आलेली एक महत्वपूर्ण सांस्कृतिक घटना होय. मराठी भाषा आणि साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी महाराष्ट्रातील विविध विद्यापीठे उत्तम कार्य करीत आहेत. परंतु मुंबई विद्यापीठामध्ये इंग्रजी भाषेसाठी 'टागोर अध्यासन' आहे, तशी अध्यासने श्री ज्ञानेश्वर, संत तुकाराम, केशवसुत, महात्मा फुले, डॉ. आंबेडकर यांच्या नावांनी विविध विद्यापीठांतून केवळ मराठी साहित्य व भाषा यांच्या अभिवृद्धिप्रीत्यर्थ सुरू झाली तर त्यांच्याकडून होणारे कार्य विद्यापीठांतील मराठी विभागांना उपकारक ठरेल.

मित्रहो, माझे मनोगत सांगून होत आले आहे. मी नित्य लिहिणारा व नित्य समाजात मिसळणारा लेखक आहे. सर्वच लेखकांची वृत्ती समाजात मिसळण्याला

अनुकूल नसते. मला ते समजते. पण ज्या लेखकांना बैठेपणा सोडून बाहेरच्या उघड्या जगात येणे शक्य होईल, त्यांनी तसे केले पाहिजे. ज्या समाजाकडून आपण प्रेरणा घेतो, त्या समाजासाठी प्रत्यक्ष झटणे हे साहित्यिकांचेही कार्य आहे, असे मला वाटते. साहित्यिक हा विचाराने स्वतंत्र व मुक्त असावा, पण आचारामध्ये तो कृतिशील व बांधील असावा. त्याचा कलात्मक आविष्कार मुक्त असावा, पण समाजाभिमुखता त्याने गमावता कामा नये. या बाबतीत मला डॉ. कोट्टा शिवराम कारंथ या थोर कन्नड साहित्यिक-कलावंतांचे उदाहरण द्यावेसे वाटते : डॉ. कारंथ साहित्यात रमतात तेवढेच कर्नाटकातील यक्षगानाची पुरातन लोककला नव्या पिढीसमोर, नव्या स्वरूपात, नव्या संदर्भानिशी सादर करण्यातही रस घेतात. वयाची नव्वदी जवळ आल्यावरही 'कैगा' सारख्या प्रदूषण निर्मिणाऱ्या प्रकल्पाच्या विरोधात ते उभे राहातात. जन आंदोलन सुरू करतात. त्यासाठी गरज पडली तेव्हा शासनाविरूद्ध आवाज उठवण्यासाठी निवडणूकही लढवतात. त्यांची मुख्य प्रेरणा समाज हीच आहे. समाज सचेतन असतो. तोच साहित्य सचेतन ठेवतो व लेखकाला सतत चेतना, उर्जा पुरवतो. लेखकाने ही उर्जा समाजापासून मिळवली पाहिजे. मी स्वत: तरी ही उर्जा मिळवण्याचा सतत प्रयत्न करतो. यापुढील काळात जे साहित्यिक समाजाशी समांतर चालतील त्यांचेच भवितव्य सुदृढ राहील. हे घडून आले नाही तर साहित्याशी समाजाचा लागाबांधा उरेल असे वाटत नाही. 'मी समाजाचे काही देणे लागत नाही, मी फक्त कलेचा आविष्कार करीन', हे म्हणणे यापुढे समाजच मान्य करणार नाही. आजच्या बदलत्या समाजाला साहित्यापासून काय हवे त्याचे भान आम्ही ठेवलेच पाहिजे. साहित्य म्हणजे केवळ लेखनक्रिडा नव्हे. आज देशात सर्वत्र जे अनर्थकारक, जात्यंध व धर्मांध वातावरण पसरले आहे, ते शुद्ध बनण्यासाठी साहित्यिकांचा प्रभाव उपयुक्त ठरेल, असे अनेकांप्रमाणे मलाही वाटते

माझे साहित्य जसे सोपे असते, तसेच माझे हे भाषणही सोपे वाटेल असे मी मानतो. माझे हे प्रगट मनोगत आहे. ते माझेच नव्हे, तर माझ्या पिढीचे मनोगत ठरावे. माझी पिढी ही धडपडणाऱ्या लेखकांची पिढी आहे. यापुढील पिढी केवळ धडपडणारी असणार नाही, तर प्रवाहाविरुद्ध पोहणारी, साचलेपणा फेकून देणारी, कृतिशील,मनस्वी आणि तेजस्वी असणार आहे, कारण ती थेट समाजाच्या पाळामुळांतून उगवते आहे. साठ सालानंतरची आमची पिढी तिचे हुंकार आज ऐकते आहे. हे साहित्यसंमेलनाचे अध्यक्षपद जरी मला मिळालेले असले तरी ते माझ्या पिढीलाच मिळालेले आहे. असे मी समजतो. माझ्यापुरती साहित्याची व्याख्या मी अशी करतो, की 'साहित्य म्हणजे प्रेम'- जे माणसांना जोडते ते प्रेम. साहित्याचे कार्य माणसांना जोडणे. त्यांच्यातील माणुसकीचा ओघ आटणार नाही हे पाहाणे हे होय. आजूबाजूची सृष्टी, माणसे मी ज्या आत्मीयतेने व प्रेमभावाने न्याहाळतो, त्याच भावनेने मी त्याबद्दल लिहितो. साहित्याचे शास्त्र माझ्यापुरते असले तर एवढेच. साहित्य हे जसे सर्वांसाठी असावे तसेच प्रेमही

सर्वांसाठी असावे. आमच्या या रत्नागिरी जिल्ह्यात, आताच्या सिंधुदुर्गामध्ये, सावंतवाडीजवळ बांदे येथे अठराव्या शतकात सोहिरोबा आंबिये हे संतकवी होऊन गेले. त्या संत असलेल्या प्रासादिक कवीचे समाजाशी घट्ट नाते होते. पण वेळ आली तेव्हा ते म्हणाले :

*आम्ही न हो मंत्रातले, न हो तंत्रातले*
*आम्ही न ही लक्षातले, न हो पक्षातले ।*
*सोहिरोबा म्हणे, अनिर्वाच्य आम्ही*
*केवळ अलक्षातले !*

तर आम्ही या सोहिरोबांच्या पंथातील वारकरी आहो. आम्हांला साहित्यातील मंत्र आणि तंत्र माहीत नाही. ठाऊक आहे ते जीवनाबद्दलचे, माणसांबद्दलचे अनिर्वाच्य, अलक्ष प्रेम ! याच कविवर्य सोहिरोबांच्या पदातील आणखी एक कडवे मला इथे आठवते: "अंतरीचा ज्ञानदिवा मालवू नको रे !" सोहिरोबांना अभिप्रेत असलेला 'अंतरीचा ज्ञानदिवा' म्हणजे साहित्यातून घडणारा जीवनानुभवाचा साक्षात्कार, ज्ञानाचा साक्षात्कार. "अनुभवावीण नेत्रपाती हालवू नको रे" असेंही सोहिरोबा पुढे म्हणतात. साहित्यामध्ये वावरताना माझी नेत्रपाती मी कधी अनुभवावीण हलवली नाहीत. त्यामुळे माझे हे मनोगत म्हणजे अनुभवांतून आलेला, व्यवहारातून दिसलेला, निरीक्षणातून समजलेला एक ऐवज आहे. तो मी आपणांसमोर मोकळ्या मनाने उघडा केला आहे. त्यातील जे रुचेल ते आपण स्वीकारावे आणि न रुचेल ते टाकावे, एवढीच माझी प्रार्थना आहे.

लोकमान्य टिळक, सावरकर, कर्वे, केशवसुत, वरेरकर, साने गुरुजी यांच्या भूमीमध्ये भरलेल्या या साहित्यसंमेलनाच्या श्रेष्ठ व्यासपीठावरून 'नैऋत्येकडला वारा' अंगावर घेत माझे हे हृद्गत व्यक्त करण्याची आपण मला संधी दिलीत त्याबद्दल आपणा सर्वांचे मन:पूर्वक आभार मानून मी आपली रजा घेतो.

# कोल्हापूर : १९९२

# रमेश मंत्री

साहित्यप्रेमी बंधूनो आणि भगिनीनो,

कुलस्वामिनी अंबाबाई, राजर्षी छत्रपती शाहूमहाराज आणि माझे गुरू बॅ. बाळासाहेब खर्डेकर यांना नम्र अभिवादन करून मी माझ्या भाषणास प्रारंभ करीत आहे. कोल्हापूर या कलानगरीत भरलेल्या या ६५ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद आपण मला दिलेत याबद्दल मी आपला मन:पूर्वक आभारी आहे. मराठी साहित्य आणि ग्रंथव्यवहार यांच्याविषयीचे माझे विचार मांडण्याची संधी आपण मला दिली, हा आपला मोठाच अनुग्रह आहे.

या कोल्हापुराने मला घडविले आहे. माझ्या लहानपणी कोल्हापूर हे साहित्य, कलांचे माहेरच होते. मी ज्या मंगळवार पेठेत राहत होतो, त्या परिसरात संगीत, साहित्य, चित्रकला, चित्रपट, नाटक अशा अनेक क्षेत्रांतील रथी-महारथी राहत होते. संगीताचे गौरीशंकर अल्लदियाखाँ, त्यांचे चिरंजीव भुर्जीखाँ, मंजीखाँ, महाराष्ट्रकोकिळ शंकरराव व त्यांचे बंधू निवृत्तीबुवा सरनाईक, हे माझ्या घराजवळ राहत होते. विख्यात हार्मोनियमवादक गोविंदराव टेंबे तर माझ्या घरातच राहत होते. संगीताची श्रेष्ठ परंपरा असलेला देवल क्लब आणि नाटकांचे श्रीमान घर पॅलेस थिएटर माझ्या निवासाजवळच होते. मराठी साहित्याच्या क्षेत्रातील पहिले ज्ञानपाठविजेते वि. स. खांडेकर माझ्याच समोर होते आणि युगप्रवर्तक कादंबरीकार प्रा. ना. सी फडकेही त्यांच्याचजवळ राहत होते. डॉ बाळकृष्ण आणि कवी माधव ज्युलियन आमच्या राजाराम महाविद्यालयात होते. ज्ञानपीठ पुरस्कारविजेते व्ही. के. गोकाक यांनी मला शिकविले आहे. कलामहर्षी बाबुराव पेंटर आणि अबालाल रहेमान हे विख्यात चित्रकार माझ्या घराजवळ राहत होते. व्ही. शांताराम, मा. विनायक, भालजी पेंढारकर हे दिग्गजही याच परिसरात होते. महाराष्ट्र आणि कोल्हापूर सिनेटोन ही चित्रपटनिर्मितीची केंद्रे आमच्या आसपास होती. ज्ञानाचे आणि दयेचे सागर बॅ. बाळासाहेब खर्डेकर यांचे शिक्षणात आणि जीवनात मार्गदर्शन मिळण्याचे भाग्य मला लाभले होते. मी राहात होतो तो परिसर असा सर्व कलांत न्हाऊन निघत होता. अशा स्वर्गमय वातावरणात एखाद्या दगडालाही स्फूर्ती मिळाली असती. मग ज्या माझी बुद्धी दगडापेक्षा थोडी अधिक होती, त्या माझ्यावर या

अभिजात कलात्मक वातावरणाचा सुपरिणाम झाला, तर त्यात नवल ते काय ?

मराठी चौथीत असतानाच मी पहिली कथा लिहिली. सुदैवाने साहित्याची अभिरुची असलेले शिक्षक व नंतर प्राध्यापक मला मिळाले. या भाग्यवान वातावरणात मी घडत गेलो. मजल दरमजल प्रवास करीत इथपर्यंत येऊन पोहोचलो. या संदर्भात मला पन्नास वर्षापूर्वीची एक आठवण येते. १९४१ साली मी इंटरच्या वर्गात होतो त्यावेळी वर्टीकर नावाचे माझे विद्यार्थी मित्र व मी संध्याकाळी कलेक्टर कचेरीकडे फिरायला जात असू. एकदा त्यांनी मला विचारलं, "तुम्ही कोण व्हाल असं तुम्हाला वाटतं ?" मी म्हटलं, "मी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष होईन।" त्यावर ते मोठ्याने हसून म्हणाले, "काहीतरीच काय बोलता ? तुम्ही स्वप्नरंजनात्मक पुस्तकं वाचता की काय ? तुम्ही फार तर राजाराम कॉलेजच्या मराठी वाङ्मय विहार मंडळाचे अध्यक्ष व्हाल !" या पन्नास वर्षात माझे ते शब्द खरे झाले. माझ्या लहानशा जीवनात आणि रामशास्त्रींच्या महान जीवनात साम्यतेचा हा एक लहानसा दुवा.

मी मुख्यत: विनोदी लेखक असलो तरी माझे हे भाषण विनोदी नाही. कारण मराठी भाषा, साहित्य आणि ग्रंथव्यवहार यांचा गांभीर्याने विचार करण्याची ही संधीही आहे. यापूर्वी १९३२ साली कोल्हापूरला सतरावे साहित्य संमेलन भरले होते. बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड हे त्या संमेलनाचे अध्यक्ष होते. त्या संमेलनात अध्यक्षांनी मराठी पुस्तक व्यवहाराचा जो आढावा घेतला होता, त्यात म्हटले होते की जानेवारी १९३१ पासून जुलै १९३२ पर्यतच्या दीड वर्षात ८५८ पुस्तके प्रसिद्ध झाली. त्या दीड वर्षात धर्म व तत्त्वज्ञान या विषयात सर्वात अधिक म्हणजे १२७ पुस्तके प्रसिद्ध झाली. त्या खालोखाल ११४ काव्यसग्रह, ७३ कथा, ६२ नाटके, ५८ चरित्रे आणि ४५ बालवाङ्मय असे काही आकडे आहेत.

त्यावेळच्या ग्रंथांच्या अंतरगाविषयी अध्यक्ष सयाजीराव गायकवाड म्हणतात, "आपल्या वाङ्मयात विशेष कमतरता अशी दिसते की, तें विशिष्ट वर्गानें विशिष्ट वर्गासाठीच लिहिलेले आहेसें वाटते. जुन्या ग्रंथास सर्व जातीच्या लेखकांचा हात लागलेला आहे. पण गेल्या पन्नास वर्षातल्या कादंबऱ्याची, नाटकांची, किवा गोष्टीची पात्रे पांढरपेशा वर्गातली व मुंबईपुण्याकडलीच दिसतात. कोणी आपल्या पात्रांस मुद्दाम वांकडी वाट काढून हिमालयावर किंवा मलबारांत नेले तरी तेथले वर्णन पुण्यामुंबईस लागूं पडते. स्थानिक वैशिष्ट्य त्यांत नसते व भाषा तर फार बोजड असते. शेतकऱ्याच्या तोंडातली भाषा व त्यांचे विचार हेहि शहरांत राहणाऱ्या लोकांचेच असतात. म्हणजे *काही लेखकांनी जरी इतर वर्णांना किंवा वर्गांना घुसडण्याचा प्रयत्न केला तरी ते* पांढरपेशेच इतर वर्गाची सोंगे घेऊन *आल्यासारखे दिसतात. शास्त्रीय वाङ्मयातही* सुतार, लोहार वगैरे खेडवळांच्या उपयोगी पडण्याजोगी पुस्तके नाहीत. सबंध तीनशे मैलांचा समुद्रकिनारा महाराष्ट्राच्या कडेला असून मच्छीमारीविषयी किंवा दर्यावर्दीपणासंबंधी

एकहि मराठी पुस्तक नसावें हें आश्चर्य नव्हे काय ? सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, विशिष्ट वर्गांकडूनच लिहिलीं गेल्यामुळे सर्व मराठी पुस्तकें एकांगी झालीं आहेत. वाङ्मयात सर्व धंद्यांच्या, सर्व वर्गांच्या, सर्व स्थळांच्या लोकांनी लिहिलेला ग्रंथसंग्रह असला तरी भिन्न भिन्न वर्गांच्या आकांक्षांचें, भावनांचें, विचारांचें, सुखदु:खांचें चित्र त्यात उमटलेलें दिसतें व राष्ट्राच्या ऐक्यास तें संवर्धक होतें आणि भाषेंतील शब्दसंग्रह वाढतो."

या साठ वर्षात मराठी साहित्यिकांच्या जीवनानुभवाच्या कक्षा रुंदावल्या. पर्यायाने वाचकांनाही अनुभूतींचा नवा व विस्तृत साक्षात्कार झाला. शिक्षणाचा फार मोठ्या प्रमाणात प्रसार झाला. कर्मवीर भाऊराव पाटील यांचा त्यात सिंहाचा वाटा आहे. अशिक्षित समाजातही साहित्यविषयीचे कुतूहल वाढले. रसग्रहणक्षमताही वाढली. कारण वाचनापेक्षा वेगळे ज्ञानप्रसाराचे मार्ग नभोवाणी, चित्रवाणी, व ध्वनिफितीनी खुले केले. याच काळात कॉन्व्हेंट आणि इंग्रजी माध्यमाच्या शाळा निघाल्या. उच्च श्रेणीच्या नोकऱ्या आपल्या मुलांना मिळणे सुलभ व्हावे म्हणून महत्त्वाकांक्षी मराठी समाजातील लोक आपल्या मुलांना या इंग्रजी माध्यमाच्या शाळांत घालू लागले. काही मराठी भाषाभिमान्यांनी या प्रवृत्तीचा निषेध केला आहे. आणि त्यामुळे मराठी भाषा व साहित्यावर विपरीत परिणाम होईल असा निष्कर्ष काढला आहे. मला ही बाब त्यांच्याइतकी चिंताजनक वाटत नाही. इंग्रजी माध्यमामुळे आपण निराश होता कामा नये. खरे तर हा प्रवाह थोपविता येणार नाही. आंतरभारतीय आणि आंतरराष्ट्रीय पातळीवर आपली मुले कमी पडू नयेत असे पालकांना वाटणे अक्षम्य नाही. तेथे पहिल्या काही इयत्तांनंतर मराठी भाषा शिकणे अनिवार्य आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. या पालकांच्या घरी सर्रास मराठी भाषेत दैनंदिन व्यवहार चालतो शिवाय नभोवाणी, वृत्तपत्र, दूरदर्शन यातूनही मराठी भाषा या मुलांवर संस्कार करीतच असते.

काही मुले इंग्रजी माध्यमाच्या शाळेत जाणार, हे गृहीत धरून आपण आणखी आणि फेरआखणी केली पाहिजे. काही मुले कॉन्व्हेंटमध्ये जातात हे जितके खरे तितकेच हेही खरे की गेल्या वीस पंचवीस वर्षात अगदी लहान गावीही निघालेल्या शाळा आणि महाविद्यालये यांनी फार मोठ्या प्रमाणावर मराठी वाचकवर्ग निर्माण केला आहे. गडहिंग्लज, मंचर, मेहकर, गडचिरोली अशा अनेक दूरदूरच्या गावीही नव्या शिक्षणसंस्था निघाल्या, त्यामुळे मुलांची संख्या लाखोंनी वाढली आणि हा सारा नवा, ताजातवाना, ज्ञानपिपासू वाचकवर्ग आपल्याला लाभला आहे. महाराष्ट्रातील महाविद्यालयांत सुमारे साडेपाच लक्ष विद्यार्थी शिक्षण घेत आहेत.

गेल्या साठ वर्षात मराठी साहित्यातील अंतरंगातही विस्मयकारक आणि हितकर असा फरक पडला आहे. तीव्र सामाजिक जाणिवेच्या प्रभावाने मराठी साहित्य उज्ज्वल, सकस, समर्थ झाले आहे. दर्यावर्दीपणासंबंधी एकही मराठी पुस्तक नसल्याबद्दल १९३२ सालच्या अध्यक्षांनी खंत व्यक्त केली होती. या क्षेत्रात आता निदान पंचवीस

पुस्तके उपलब्ध आहेत. सर्व वर्गाच्या व व्यवसायांच्या लेखकांनी लिहिले पाहिजे ही त्यावेळच्या अध्यक्षांची अपेक्षा आता पूर्ण झाली आहे. दया पवार, लक्ष्मण माने, राम नगरकर, मेणजोगे, उज्ज्वल पाटील, शंकरराव खरात, बाबूराव बागूल, अनंत सामंत, मारुती चितमपल्ली, कुमार गंधर्व, डॉ. जयंत नारळीकर, डॉ. अनिल अवचट, लक्ष्मण गायकवाड, श्रीधर प्रधान ही अशा काही लेखकांची अभिमानास्पद नावे आहेत.

आजच्या मराठी साहित्यातील विविधता ही निराशजनक नाही, तसेच अल्पसंतुष्ट होण्यासारखीही नाही. या क्षेत्रात आपण केलेली प्रगती निश्चितच लक्षणीय आहे, पण अजून तीत भर घालण्यासही वाव आहे. विविध क्षेत्रांतील नव्या दमदार, तरुण लेखकांच्या आशयघन कलाकृतीकडे पाहता ही भर पडेल याबद्दल खात्री वाटते.

गेल्या साठ वर्षात आपल्या सांस्कृतिक जीवनावर सर्वात अधिक परिणाम झाला, तो दुसऱ्या महायुद्धाचा. त्याने केवळ वस्तूच महागल्या नाहीत, तर जीवनमूल्येही दुर्मिळ झाली. तरुण मुली नोकरीसाठी घराबाहेर पडल्या, स्वतंत्र अर्थार्जन करू लागल्या. या बदलांचे हृदयस्पर्शी वर्णन 'बटाट्याची चाळ' मधील चिंतनात आहे. सबंध समाज नव्या जाणिवांनी, नव्या जागृतीनी ढवळून निघाला. त्याचा प्रभाव मर्ढेकरांच्या 'काही कविता'त (१९४७) मध्ये स्पष्टपणे दिसतो. विज्ञानाने निर्माण केलेली असीम संहारक साधने त्यांना अस्वस्थ करतात. प्रखर वातावरणाने माणसे म्हणजे हाडांचे सापळे झाले आहेत हे सत्य सांगून ते म्हणतात,

*असशिल भोळ्या कुठे भैरवा*
*उघड तुझे तर तीनही डोळे*
*भस्म करी गा आता तरी हे-*
*हे हाडांचे खडे सापळे*

नव्या जाणिवा, नव्या प्रतिमा आणि नवे शब्दप्रयोग यामुळे मर्ढेकरांच्या काव्याने मराठी काव्यसृष्टीत क्रांती करून त्याला आधुनिकता दिली. भाकरीसाठी जीव देणारे सैन्य, गर्भपात झालेली कामवाली बाई, पिपात मेलेले ओले उंदीर, उष्ट्या अन्नाला महाग झालेल्या भिकाऱ्यांचे दु:ख, कामगारांचे भयाण जीवन, असे आतापर्यंत फुलामुलांच्या कवितेत न आलेले विषय मर्ढेकरांनी परिणामकारक शब्दांत मांडले.

*नाही कोणी गा कुणाचा । बाप लेक मामा भाचा,*
*मग अर्थ काय बेबीचा । विश्वचक्री ?*

अशा काव्यातून मर्ढेकरांनी बालकवीच्या कवितविश्वापासून फारकत घेतल्याचे जाणवते. काव्यात झालेली ही क्रांती साहित्याच्या इतर क्षेत्रातही पसरली आणि युद्धोत्तर मराठी साहित्य हे अधिक वास्तव होऊन पूर्वीच्या स्वप्निल सृष्टीहून अगदी वेगळे झाले.

या क्रूर, कुरूप, वास्तवातही नाजूक भावना कशा जपल्या जातात यांचे मोहक दर्शन मर्ढेकरांच्या 'न्हालेल्या जणु गर्भवतीच्या' किंवा 'पोरसवदा होतीस' या गर्भरेशमी कवितातून दिसते.

गेल्या साठ वर्षातील एक महत्त्वाचा विशेष म्हणजे मराठी लेखिकांत निर्माण झालेला नवा आत्मविश्वास. या दृष्टीने रमाबाई रानडे यांचे 'आमच्या आयुष्यातील आठवणी' (१९१०) हे आत्मचरित्र आणि सुनीता देशपांडे यांचे 'आहे मनोहर तरी' हे आत्मचरित्र या दोन्हीत जमीन अस्मानाचा फरक आहे. रमाबाईनी आपल्या पतीची छाया म्हणून निवेदन केले आहे. संपूर्ण समर्पणबुद्धी आणि आपले व्यक्तिमत्त्व पतीच्या व्यक्तिमत्त्वात पूर्णपणे मुरवून टाकण्याची वृत्ती ही रमाबाईच्या आत्मचरित्रात इतकी पराकोटीला गेली आहे की त्या आपल्या पतीचा उल्लेखही 'स्वत:' असा करतात. या उलट, सुनीताबाई मात्र आपण पतीपेक्षा वेगळे- काही बाबतीत विरोधी प्रवृत्तीचे- एक स्वतंत्र व्यक्तिमत्त्व आहोत याची पुरेपूर जाणीव ठेवून लिहितात. त्या पतीचा उल्लेख भाई या घरगुती नावाने करतात. आत्मभान हा आजच्या लेखिकांचा महत्त्वाचा विशेष आहे. 'नाच ग घुमा', 'मला उध्वस्त व्हायचंय', 'चंदेरी दुनियेत', 'अजुनि चालतेचि वाट' अशा आत्मचरित्रात आजच्या स्त्रियांचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व ठळकपणे दिसते आणि कधी कधी ते पतीच्या व्यक्तिमत्त्वापेक्षाही वाचकावर अधिक छाप पाडते. पाश्चात्य देशातून आलेल्या स्त्रीमुक्तीच्या विचारांचा हा काही अंशी परिणाम असला तरी बऱ्याच अंशी स्त्रियांनी जाणीवपूर्वक जोपासलेल्या त्यांच्या स्वतंत्र वृत्तीचाही तो परिपाक आहे. भारतातील इतर कोणत्याही भाषेत लेखिकांची आत्मचरित्रे इतकी स्वतंत्र आणि मूलगामी नाहीत. कमला दास किंवा अमृता प्रीतम यांच्यासारख्या काही लेखिका याला अपवाद आहेत. पण इतर भाषांतील लेखिकांची सर्व आत्मचरित्रे आणि मराठी लेखिकांची सर्व आत्मचरित्रे यांची तुलना केली, तर आपण या क्षेत्रात कितीतरी पुढारलेले आहोत असे आढळून येईल. साहित्यसृष्टीबाहेरच्याही काही स्त्रियांची आत्मचरित्रे लक्षणी आहेत. लीला चिटणीस यांचे 'चंदेरी दुनियेत', शांता हुबळीकर यांचे 'कशाला उद्याची बात', हंसा वाडकर यांचे 'सांगत्ये ऐका', गोदावरी परुळेकर यांचे 'जेव्हा माणूस जागा होतो !', स्नेहप्रभा प्रधान यांचे 'स्नेहांकिता', शीलवती केतकर यांचे 'मीच हे सांगितलं पाहिजे', उषाताई डांगे यांचे 'पण ऐकतं कोण ?', शांताबाई कृष्णाजी कांबळे यांचे 'माझ्या जल्माची चित्तरकथा', बेबी कांबळे यांचे, 'जिणं आमचं' आणि कुमुद पावडे यांचे 'अंत:स्फोट' ही यापैकी काही लक्षणीय आत्मचरित्रे आहेत.

दलित साहित्याचा उदय ही गेल्या आठ वर्षातील अत्यंत प्रभावी घटना आहे. राजर्षी शाहू महाराजांच्या कार्यामुळे दलितात जागृती होत होती. पण त्यांना संघटित करून त्यांच्यात आत्मविश्वास निर्माण करण्याचे महान कार्य केले ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी. शतकानुशतके दडपलेले विचार आणि भावना यांच्या प्रेरणेमुळे

उफाळून येऊन मराठी साहित्याला एक धगधगते नवे मनोगत मिळाले. बाबुराव बागुल (जेव्हा मी जात चोरली होती), दया पवार (बलुतं), लक्ष्मण माने (उपरा), वामन होवाळ (वारसदार), लक्ष्मण गायकवाड (उचल्या), भीमराव गस्ती (बेरड), शंकरराव खरात (तराळ अंतराळ), शरणकुमार लिंबाळे (अक्करमाशी), पार्थ पोळके (अभयन), कल्लप्पा यशवंत ढाले यांची डायरी, केशव मेश्राम (उत्खनन), यशवंत मनोहर, नामदेव ढसाळ, योगिराज वाघमारे, अर्जुन डांगळे, ऊर्मिला पवार, ज्योती लांजेवार, किसन फांगू, वामन निंबाळकर, त्र्यंबक सपकाळे, बेबी कांबळे, गंगाधर पानतावणे, कुमुद पावडे, हिरा बनसोडे, अशा अनेक सकस लेखक आणि लेखिकांनी अद्याप अज्ञात असलेले भीषण विश्व वाचकांच्या पुढे उभे केले, त्यामुळे नव्या जाणिवा निर्माण झाल्या. जे अजूनपर्यंत सांगू नये असा शिरस्ता होता ते उघडपणे, निर्भयपणे सांगितले गेले. दलित आणि दलितेतर यांच्या अनुभवांची भूमी किती भिन्न असते हे विदारक सत्य आपल्या पुढे मूळ स्वरूपात आले.

भाषेचे सौदर्य, अलंकार असे कोणतेही कृत्रिम लेणे न घेता दलितांचे रखरखीत अनुभव वाचकांपुढे आले आणि त्यांनी समाज अस्वस्थ झाला, जागृत झाला. काही दलितांनी सवर्ण विरुद्ध दलित असा एक ढोबळ पण सत्य संघर्ष मांडला. पण दलितातही अनेक प्रखर लेखक असे निघाले की त्यांनी अंतर्विरोधासही वाट करून दिली. धर्मातर करूनही जाती नष्ट झाल्या नाहीत हे कटु सत्य त्यानी मांडले. घाट कसा असावा, निरगाठउकल अशा कृत्रिम कचकड्यात अडकलेली मराठी कथा दलितांनी मुक्त केली. दलित आत्मचरित्र हे मराठी साहित्याचे एक महत्त्वाचे अग झाले आहे गुजरातीत जोसेफ मक्वाना आणि कानडीत देवनूर महादेव असे काही प्रभावी दलित लेखक आहेत. बंगाली भाषेतही दलित साहित्याचा उदय झाला आहे, पण गुणवत्तेने मराठी दलित साहित्य हे भारतात अग्रगण्य आहे दलित आत्मचरित्राप्रमाणेच दलित कथा, कविना आणि नाटक यांनीही अलीकडच्या काळात मराठी साहित्याला महत्त्वाचे योगदान केले आहे.

वन्यजीवन आणि पक्षीनिरीक्षण हे एक नवे दालन मराठी साहित्यासाठी अनेक समर्थ लेखकांनी गेल्या पंचवीस वर्षात खुले केले आहे. रसिकांना आनंदाचा हा नवा ठेवा मिळाला आहे मारुती चितमपल्ली, प्रकाश गोळे, बी. एस्. कुलकर्णी, व्यंकटेश माडगूळकर, लालू दुर्वे इत्यादी लेखकांचे या क्षेत्रातील योगदान फार मोठे आहे. त्यांच्यामुळे वाचकांच्या अनुभूती तरल झाल्या आहेत. पक्ष्यांचे व वन्य प्राण्यांचेही जीवन किती विविध, विस्मयकारी व कुतूहलजनक असते याचा साक्षात्कार या तज्ज्ञ, व्रती लेखकांनी घडविला आहे. खुशवंतसिंग हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे पक्षीनिरीक्षणतज्ज्ञ आहेत. ते एकदा मला म्हणाले, "भारतातील पक्षीजीवन आणि वन्य जीवन इतके चित्ताकर्षक आहे की वर्षानुवर्षे मी त्यांचे निरीक्षण करण्यात अतिशय आनंदात घालविली

आहेत. हे सारे सुंदर जीवन सोडून आमचे लेखक व पत्रकार उठल्या सुटल्या राजकारणासारख्या तत्त्वशून्य व उथळ विषयावर लिहितात याचा मला विस्मय वाटतो.''

## मराठी भाषेचे सामर्थ्य

मराठी भाषेचे सामर्थ्य अफाट आहे. अनेक श्रेष्ठ लेखकांनी या भाषेच्या प्रकटीकरणातील विविधता, बळ आणि सौदर्य यांचा साक्षात्कार घडविला आहे. या भाषेचा विकास करून शिक्षणाच्या सर्व शाखांतील अखेरची पदवीही मराठीत मिळेल अशी तरतूद करणे आवश्यक आहे. जपानची लोकसंख्या अकरा कोटी आणि थायलंडची पाच कोटी. पण जपानी आणि थाई भाषेत वैद्यक, अभियांत्रिकी शास्त्र, कायदा इत्यादी सर्व शाखांतील एम्. ए., पीएच. डी. या पदव्याही मिळू शकतात. अर्थात आंतरराष्ट्रीय व्यवहाराची भाषा आणि उत्कृष्ट साहित्याची खाण अशी इंग्रजी भाषाही आपण आत्मसात केली पाहिजे. पण अखेरच्या पदवीपर्यतच्या शिक्षणासाठी इंग्रजी ही अनिवार्य भाषा असता कामा नये. सर्व विषयांचे ज्ञान मराठीतून घेता यावे इतकी आपली भाषा समावेशक असली पाहिजे. त्यासाठी परिभाषेचा योजनापूर्वक विकास केला पाहिजे.

१९१२ साली अकोला येथे झालेल्या साहित्य संमेलनात नामवंत कादंबरीकार हरी नारायण आपटे यांनी म्हटले होते, ''मातृभाषेचा अभिमान आपण धरिला पाहिजे. तो ज्यांनी धरला, त्यांच्या अभिमानामुळेच मराठी भाषेला अर्थसमर्थता आली आहे. इतकी की, वाटेल ते शिक्षण तिच्याद्वारे देता येईल, वाटेल तो विचार तिच्याद्वारे करता येईल. सारांश, वाङ्मयाचे सर्व हेतू सिद्ध करण्याइतके निच्या अंगी सामर्थ्य आले आहे. त्या सामर्थ्याच्या उपयोग करून आपण तिला अधिक समर्थ करणे हे आपल्या हाती आहे. एवढ्याकरिता जे या कार्यक्षत्रात आज काम करताहेत त्यांना आणि जे अद्यापि मर्यादारेषेवर उभे राहून त्या काम करणाऱ्यांची नुसती मौज पाहत आहेत त्यांना मी पुनः एकदा त्या उपनिषदद्रष्ट्या ऋषिवरांच्या शब्दानी प्रार्थना करतो :- ''वाणीच सर्व ज्ञान करून देते. तेव्हा वाणीची उपासना करा, जो वाणीला ब्रह्म समजून तिची उपासना करतो तो वाणीच्या साम्राज्यात स्वतंत्र होतो.''

या भाषणानंतर, ऐंशी वर्षाच्या प्रदीर्घ कालात गणकयंत्रासारखे नवे शोध पाश्चात्य देशांतून येतात. त्यातील इंग्रजी शब्दांना मराठी शब्द तयार केले पाहिजेत भविष्यकाळात विज्ञान आपले सर्व जीवन व्यापणार आहे. ही क्रांती पूर्वीच सुरू झाली आहे. गेल्या पन्नास वर्षात जग जेवढे बदलले, तेवढे त्या पूर्वीच्या पाचशे वर्षात बदलले नव्हते, हा विज्ञानाचा प्रभाव आहे. ही क्रांती छपाईच्या आणि बांधणीच्या क्षेत्रातही आली आहे म्हणजेच साहित्य- व्यवहारापर्यत येऊन पोहोचली आहे. विज्ञानाच्या या असीम आव्हानाला तोड देण्यासाठी आपले साहित्य आणि भाषा सिद्ध झाली पाहिजेत. त्या दृष्टीने अलीकडच्या काळात उदयास आलेली विज्ञानकथा ही मला

विशेष आशादायक वाटते. डॉ. जयंत नारळीकर, लक्ष्मण लोंढे, बाळ फोंडके, निरंजन घाटे इत्यादी समर्थ लेखकांचे या क्षेत्रातील योगदान लक्षणीय आहे.

मराठी भाषेचे सामर्थ्य पाहायचे तर अच्युत बळवंत कोल्हटकर यांनी 'लोकमान्यांचा स्वर्गवास' हा लोकमान्यांवर लिहिलेला तेजस्वी मृत्युलेख पाहावा. शिवराम महादेव परांजपे, स्वातंत्र्यवीर सावरकर, श्री. म. माटे, दुर्गा भागवत, कुसुमाग्रज, आचार्य अत्रे, पु. भा. भावे, आचार्य विनोबा भावे अशा विसाव्या शतकातील अनेक साहित्यिकांनी मराठी भाषेचे ओज, तिची तरलता आणि तिचा नाजुकपणा यांचे मनोज्ञ दर्शन घडवले आहे. ज्ञानेश्वर तर अमृताबरोबरच पैजा जिंकतात ! तुकारामाचा रसाळ साधा गोडवा सानेगुरुजींच्या भाषेतही उतरला आहे. अशा या आपल्या कामधेनू मराठी भाषेत आजही किती गोड कविता होऊ शकते याचे उदाहरण म्हणून मी सुरेश भट यांची 'गे मायभू' ही कविता उद्धृत करतो-

*गे मायभू तुझे मी*
*फेडीन पांग सारे;*
*आणीन आरतीला*
*हे सूर्य, चंद्र, तारे.*

*आई, तुझ्यापुढे मी*
*आहे अजून तान्हा,*
*शब्दांत सोड माझ्या*
*आता हळूच पान्हा.*

*आई, तुझ्यापुढे ही*
*माझी व्यथा कशाला*
*जेव्हा तुझ्यामुळे ह्या*
*जन्मास अर्थ आला !*

*मी पायधूळ घेतो*
*जेव्हा तुझी जराशी,*
*माझी ललाटरेषा*
*बनते प्रयागकाशी !*

*आई, तुझी अशी मी*

*गाईन रोज गाणी,*
*माझी तुझ्या दुधाने*
*गेली भिजून वाणी !*

## विनोद हा काव्याइतकाच महत्त्वाचा वाङ्मयप्रकार

विनोदाकडे पाहण्याची आपल्याकडच्या उच्चभ्रूंची दृष्टी निकोप नसते. विनोद हा साहित्याचा एक कमी दर्जाचा प्रकार आहे अशी त्यांच्यात समजूत आढळते, ती बरोबर नाही. काव्य, नाटक या प्रमुख प्रकारांच्या बरोबरीचे आसन ते विनोदाला देत नाहीत हे अन्यायकारक आहे. विनोद हे साहित्याचे केवळ स्वतंत्रच नव्हे तर श्रेष्ठ दर्जाचे दालन आहे. एखादे शाश्वत सत्य प्रेक्षकांच्या किंवा वाचकांच्या दृष्टीस सहजतेने आणण्यासाठी कालिदासानेच नव्हे, तर इतर संस्कृत साहित्यिकांनीही विनोदाचा आश्रय घेतला आहे. संस्कृत नाटकातील विदूषक हे त्यांचे उत्तम उदाहरण आहे. बावळटपणाचे सोग घेऊन हा विदूषक राजाला आणि पर्यायाने सर्वच प्रेक्षक वाचकांना अनेक शाश्वत सत्ये हसत खेळत उलगडून दाखवतो. हीच परंपरा मराठीतही अनेक रूपांनी आली आहे. मराठी विनोदाकडे अधिक्षेपाने पाहणाऱ्यांनी हे लक्षात ठेवले पाहिजे की मराठी काव्य आणि मराठी नाटक यांच्यापेक्षा मराठी विनोदाच्या विकासाला मिळालेला काळ अगदी अत्यल्प आहे. ज्ञानेश्वरीबरोबरच मराठी काव्य सातशे वर्षाचे झाले आणि त्या तुलनेने मराठी विनोद अवघा ९१ वर्षांचा आहे. रामदास आणि तुकाराम यांच्या काव्यात अतिशयोक्ती किंवा इतर तुरळक मार्गांनी विनोदाचे दर्शन घडत असले तरी पूर्ण विनोदी लेखन मराठीत सुरू झाले, ते श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्यामुळे. त्यांनी १९०० साली 'साक्षीदार' हा लेख लिहून मराठी विनोदाचे दालन सुरू केले. म्हणजेच मराठी विनोदाच्या विकासाला फक्त ९१ वर्षे मिळाली. त्या मानाने या प्रकाराने स्पृहणीय प्रगती केली आहे. श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांच्यानंतर राम गणेश गडकरी, आचार्य अत्रे, चिं. वि. जोशी, पु. ल. देशपांडे अशा अनेक श्रेष्ठ साहित्यिकांनी मराठी विनोदाचे दालन समृद्ध केले आहे. अनेक विनोदी आणि व अर्थगर्भ व्यक्तिचित्रे त्यांनी निर्माण केली; मराठी वाचकांना केवळ हसविलेच नाही, तर शिकविले. अवघ्या ९१ वर्षांत अशी नेत्रदीपक प्रगती करणाऱ्या मराठी विनोदाला काव्यासारखी सातशे वर्षे मिळाली असती, तर त्यानेही विलक्षण प्रत्ययकारी आविष्कार दाखविले असते. दुसरे असे की, मराठी काव्याला सातशे वर्षाचा दीर्घ अवधी मिळूनही अद्याप कोणीही कधी ज्ञानेश्वरांच्या पुढे गेलेला नाही. विनोदाच्या क्षेत्रात चिं. वि. जोशी मात्र कोल्हटकर-गडकरी यांच्या खूपच पुढे गेले आहेत. त्यांनी विनोदाचा प्रकाश अनेक पावले पुढे नेला. श्री. वि. स. खांडेकर यांनी म्हटले आहे की, "विनोद ही काव्याहून अत्यंत भिन्न प्रकृतीची पण तितकीच महत्त्वाची ललित शाखा आहे हे कोल्हटकरांनीच आपल्या

विनोदी लेखनाने मराठी रसिकतेला प्रथम जाणवून दिले."

'काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्' या संस्कृत वचनानेही विनोदाला काव्याबरोबरचे स्थान देऊन विनोदाचे महत्त्व अधोरेखित केले आहे. 'ययाती आणि देवयानी' या वि. वा. शिरवाडकरांच्या नाटकातील विदूषक म्हणतो, 'मुळामधे सारीच माणसं विदूषक असतात. पेटलेली माणसं- मिटलेली माणसं, हसणारी माणसं, रडणारी माणसं, गाजणारी माणसं, लाजणारी माणसं, सिंहासनावर चढलेली- उकिरड्यावर पडलेली- सारी माणसं आमच्याच प्रांतातली. माणसाचं सांस्कृतिक सालपट जरा खरवडून काढलं की आतली विदूषकाची बनावट दिसायला लागते." याच नाटकात देवयानीच्या शापामुळे विद्रूप आणि विकलांग झालेल्या राजाला सतत संगत देण्याचं आश्वासन देताना हा विदूषक देवयानीला बजावतो, "लक्षात ठेव. महाराजांना अखंड यातना देण्याची तुझी आसुरी इच्छा कधीही पुरी होणार नाही. कोणत्याही दु:खाचा निचरा करणारी एक प्रकारची वल्ली माझ्याजवळ आहे आणि ती म्हणजे विनोद, हास्य."

स्वामी रामदासांच्या 'टवाळा आवडे विनोद' या वचनाचा आधार घेऊन विनोदी लेखकांना हिणकस मानणे चूक आहे. कारण वस्तुस्थिती अशी आहे की, गेल्या नव्वद वर्षात मराठी विनोदाचे सुसंस्कृत, मोहक आणि हितकर रूप विकसित झालेले होते, ते रामदासांच्या काळी अस्तित्वात नव्हते. टवाळ या शब्दाचा शब्दकोशातील अर्थ असा आहे : आळशी, उनाड, खोडकर, नेहमी निंदा करणारा, दोष काढणारा. यातील कोणताही अर्थ गेल्या नव्वद वर्षातील विनोदाला लागू पडत नाही. ज्ञानेश्वरीत (१३/८१०) टवाळ हा शब्द खोटे किंवा निरर्थक या अर्थी वापरला आहे. त्यामुळे रामदासांच्या त्या वचनाचा अर्थ टवाळांना टवाळी आवडते एवढाच घेतला पाहिजे. संस्कृत नाटकातील विनोदाचे उच्च स्वरूप कालांतराने नाहीसे होऊन रामदासांच्या कालात त्याला कुचाळकीचे किंवा टवाळीचे रूप आले होते एवढेच या वचनावरून दिसते. कोल्हटकरांच्या नंतरच्या मराठी विनोदावर टवाळीचा दोषारोप करता येणार नाही. हा विनोद अधिक सुसंस्कृत, समाजाची सुधारणा करण्याची तळमळ बाळगणारा पण खेळकर दृष्टीतून समाजातील व्यंगे दाखवणारा आहे. चिं. वि. जोशीचा विनोद हे मराठी विनोदाचे सर्वात गोजिरवाणे रूप आहे.

अलीकडच्या काळात कॅप्टन लिमये, वसंत सबनीस, बाळ गाडगीळ, सुभाष भेंडे, रमेश मंत्री, बाळ सामंत, वि. वा. बुवा, मुकुंद टाकसाळे, प्रभाकर ताम्हणे, विजय कापडी, इत्यादी लेखकांनी विनोदी साहित्यात विविधता आणि सकसता आणली आहे. हरिश्चंद्र लचके, वसंत सरवटे, शि. द. फडणीस, प्रभाकर ठोकळ, शाम जोशी, गवाणकर, विकास सबनीस अशा व्यंगचित्रकारांनी व्यंगचित्राचे दालनही समृद्ध केले आहे.

## सहृदय समीक्षा हवी

मराठी समीक्षेवर प्राध्यापकी दृष्टिकोनाचा प्रभाव पडला आहे. एखाद्या ग्रंथाचे

समीक्षण करायचे म्हणजे त्या लेखकाचा कान धरून त्याला काही शिकवायचे असा या प्राध्यापक- समीक्षकांचा समज असतो. त्यामुळे काही सन्माननीय अपवाद वगळता मराठी समीक्षा ही मास्तरकी झाली आहे. आदर्श समीक्षक ग्रंथकाराच्या चुका व नजरचुका दाखवीत असला तरी त्याचे मुख्य कार्य काकदृष्टीने दोष काढणे हे नसून त्या ग्रंथातील सौंदर्याची उकल करून वाचकांना ते ग्रंथ अधिक आवडतील अशा पद्धतीने रसग्रहण करणे हे आहे.

प्राध्यापकी दृष्टिकोनाचा विशेष असा की, या पद्धतीचे समीक्षक ग्रंथाजवळ येतात तेच आपण ग्रंथकारापेक्षा श्रेष्ठ असून त्यांच्या पुस्तकाचे आपण परीक्षण करतो म्हणजे त्यांच्यावर अनुग्रह करतो ही दृष्टी ठेवून ! अशा अहंगंडाच्या भावनेने केलेली समीक्षा निकोप असण्याचा संभव फारच थोडा असतो. या प्रकारच्या मारक समीक्षेने साहित्य व साहित्यिक यांचे आजवर फार मोठे नुकसान केले आहे. अशा समीक्षेने साहित्यिक निरुत्साही होतात आणि वाचकही ग्रंथापासून दुरावतात. समीक्षा करताना कृपण दृष्टी ठेवू नये. मराठी विनोदाचे सर्वोत्तम गोजिरे रूप दाखविण्याऱ्या चिं. वि. जोशी यांच्यावर समीक्षकांनी फार मोठा अन्याय केला आहे. हे वर्ष चिं. वि. जोशी यांच्या जन्मशताब्दीचे आहे. या वर्षी तरी हा अन्याय दूर व्हावा अशी अपेक्षा करणे गैर ठरणार नाही.

## वाङ्मयीन नियतकालिके

एकेकाळी 'करमणूक', 'चित्रमयजगत', 'मनोरंजन', 'ज्योत्स्ना', 'पारिजातक', 'यशवंत', 'रत्नाकर', 'ध्रुव', 'सह्याद्री', 'विविध ज्ञानविस्तार', 'निबंधमाला', 'प्रतिभा' अशा दर्जेदार नियतकालिकांनी महाराष्ट्रातील ललित साहित्य आणि ज्ञानप्रसाराच्या क्षेत्रात फार मोठे कार्य केले आहे. पण हळूहळू ही श्रेष्ठ नियतकालिके बंद झाली. त्यानंतर 'किर्लोस्कर' आणि 'वसंत' यांसारख्या अधिक लोकप्रिय तरीही ह्या दोन्ही क्षेत्रात जाणीवपूर्वक कार्य करणारी मासिके निघाली. गेल्या काही वर्षात मात्र अनेक मासिके बंद पडून साहित्यिकांच्या आत्माविष्काराच्या वाटा बऱ्याच अंशी बंद झाल्या. 'सत्यकथा', 'हंस', 'मोहिनी', 'वीणा', 'सुषमा' अशी या मासिकांची नावे आहेत. 'छंद' आणि 'समीक्षक' यासारख्या वाङ्मयीन नियतकालिकांची परिस्थिती नेहमीच बिकट होती. कालमानाने तीही नियतकालिके बंद पडली. परप्रांतातही वाङ्मयीन नियतकालिकांची अवस्था अशीच आहे. ज्ञानपीठ पुरस्कारविजेत्या अमृता प्रीतम या 'नागमणी' हे वाङ्मयीन नियतकालिक चालवितात. पण त्याची परिस्थिती बिकटच आहे. महाराष्ट्र शासनाच्या आर्थिक साहाय्यातून साहित्य संस्थांची त्रैमासिके चालू आहेत. त्यांचा दर्जा चांगला असला, तरी खप मर्यादित आहे.

मात्र आपल्याकडे मराठी दैनिकांच्या साप्ताहिक आवृत्त्यांचे खप झपाट्याने

वाढत आहेत. ललित साहित्याला पुन: आविष्कारासाठी व्यासपीठ मिळावे म्हणून एक उपाय सुचवावा असे मला वाटते. तो असा, की दैनिकांच्या रविवारच्या आवृत्त्यांनी महिन्यातून एकदा अधिक मूलगामी व चिरस्थायी साहित्य प्रसिद्ध करावे. सध्या या आवृत्तीतील बहुतेक मजकूर हा प्रचलित व तात्पुरत्या विषयाशी निगडित असतो. लोकप्रिय दूरदर्शन मालिका, क्रिकेटच्या मोसमात त्या विषयावरील लेख, राजकीय टिकाटिपणी असा प्रासंगिक मजकूर या आवृत्त्यांतून प्रसिद्ध होतो. वाचकाला बहुश्रुत करणे आणि कालाबरोबर ठेवणे यासाठी याची आवश्यकताही आहे. पण महिन्यातून एकदा जर या रविवारच्या आवृत्त्यात नामवंतांचे व उदयोन्मुख सकस लेखकांचे चिरस्थायी स्वरूपाचे साहित्य प्रसिद्ध झाले तर ते उपकारक ठरेलच, पण वाचकाच्या अभिरुचीसही पोषक ठरेल. दैनिकांच्या साप्ताहिक आवृत्त्यांचा खप लाखांच्या घरात असल्याने उत्तम साहित्य लक्षावधी वाचकांच्यापर्यंत जाईल आणि दर्जेदार ललित साहित्य देणाऱ्या मासिकांची उणीव भरून निघेल.

गेल्या पाच तपात भारत स्वतंत्र झाला आणि मराठी भाषिकांचे राज्यही स्थापन झाले. मात्र या राज्याने मराठी भाषिकांच्या अपेक्षा पूर्ण केल्या नाहीत. मराठीचा वापर सर्वत्र होईल अस महाराष्ट्राच्या स्थापनेपूर्वी वाटले होते. पण तसे झाले नाही. न्यायालयात, शासनयंत्रणेमध्ये मराठी भाषेला अद्याप दुय्यम स्थान आहे. मराठीचा वापर सर्व थरांत कसा होईल याचा सखोल विचार झाला पाहिजे आणि त्यात ज्या अडचणी असतील त्या दूर केल्या पाहिजेत. राज्याची स्वतंत्र साहित्य अकादमी स्थापन करून सध्याच्या साहित्य संस्कृती मंडळाचे कार्य त्या अकादमोकडे सोपविले पाहिजे. या मागणीवर पूर्वी विचार झाला होता, पण नंतर ती बारदानातच पडून आहे. अकादमी स्थापन होत नाही तोपर्यंत साहित्य संस्कृती मंडळाचे विकेंद्रीकरण करून नागपूर, औरंगाबाद, मुंबई आणि कोल्हापूर अशी या मंडळाची चार केंद्रे स्थापन करावीत असे मला वाटते. सध्या साहित्य संस्कृती मंडळावर सरकारी नेमणुकीचे जे प्राबल्य आहे, ते कमी करून चार प्रमुख संस्थांचे प्रतिनिधी भरपूर प्रमाणात या मंडळावर असावेत, म्हणजे खऱ्या स्वायत्ततेच्या दिशेने टाकलेले ते योग्य पाऊल ठरेल. मराठी भाषा आणि साहित्य यांचा विकास व्हायचा असेल तर सरकारी नियंत्रणाच्या चौकटीतून त्यांना बाहेर काढले पाहिजे, कारण सरकारपुढे भाषा व साहित्यापेक्षा अधिक अग्रक्रमाच्या अनेक बाबी असल्याने या क्षेत्राकडे सरकारचे दुर्लक्ष होते हे अनेकवार सिद्ध झाले आहे.

## सरकार आणि साहित्यिक

गेली अनेक वर्षे महाराष्ट्रात सरकार आणि साहित्यिक यांचे संबंध असावेत तितके जिव्हाळ्याचे व घनिष्ठ नाहीत. आणीबाणीच्या काळात ते इतके दुरावले की त्यांना संघर्षाचे स्वरूप आले. विचारस्वातंत्र्याला या काळात धोका आल्याने साहित्यिकांनी

सरकारविरोधी भूमिका घेणे साहजिक व योग्यच होते. पण त्यानंतरही तोच तणाव पुढे चालू ठेवणे प्रशस्त नव्हते. काही साहित्यिक सरकारला सतत शत्रू मानतात. या भूमिकेशी मी सहमत नाही. सरकारशी अकारण दुरावा बाळगू नये असे मला वाटते. सुदैवाने महाराष्ट्रातील सरकार समंजस आणि मराठी साहित्यासाठी काही विधायक करण्याच्या मन:स्थितीत आहे. लेखकांना अपेक्षित तेवढे हे कार्य होत नसेल. पण त्यासाठी दुरावा न धरता सरकारशी वाटाघाटी करून चांगल्या योजनांना सरकारचे सहकार्य मिळवणे हा मार्ग आहे. राज्यातील ग्रंथालयांना सरकारचे अनुदान असते. त्यामुळे ग्रंथव्यवहाराला सरकारचा हातभार लागतो. साहित्य संस्कृती मंडळ, वाङ्मयासाठी पुरस्कार, विद्यापीठ अनुदान योजना, अशा अनेक क्षेत्रात सरकारने साहित्यासाठी कार्य केले आहे.

अशा योजनात त्रुटी असतील, तर सरकारशी चर्चा करून त्या आपण दूर केल्या पाहिजेत. सरकार आपले आहे, आपला त्यावर हक्क आहे. साहित्याच्या विकासासाठी आपण काही योजना सुचविल्या तर सरकार त्यांचे स्वागत करते आणि अनुकूल कृतीही करते असा सुखद अनुभव अनेकदा आला आहे. महामंडळासकट राज्यातील चार प्रमुख साहित्यसंस्थांना कायमची आर्थिक मदत, केशवसुत स्मारक, गडकरी स्मारक, नाट्यसंकुल ही त्याची काही उदाहरणे आहेत साहित्यिकांनी सरकारशी समानतेच्या पातळीवर संबंध ठेवावेत असे मला वाटते. सरकारने उपकारकर्त्याची किंवा लेखकाने उपकृतीची भावना अजिबात बाळगू नये. सरकारकडून सहकार्य व साहाय्य घेऊनही जेव्हा काही तात्त्विक प्रश्नात मतभेद होतील तेव्हा साहित्यिकांनी आपली मते स्पष्टपणे मांडण्यात काहीही गैर नाही अर्थात असे प्रसंग अपवादात्मक असतील. पण सरकारशी उत्तम संबंध ठेवून आपण मानाने राहू शकतो आणि साहित्याचे व ग्रंथप्रसाराचे काम चांगले करू शकतो. अकारण सतत संघर्षाऐवजी सतत सहकार्य आणि तात्त्विक प्रश्नावर परखड मतप्रदर्शन असे आपले धोरण असावे असे मला वाटते. कर्नाटकात सरकार आणि साहित्यिक यांच्या सहकार्याने किती मोठे कार्य झाले ते मी प्रत्यक्ष पाहिले आहे. केरळमध्येही तीच स्थिती आहे. केरळचे बहुतेक मुख्यमंत्री साहित्य व नाट्यक्षेत्रातून आल्याने साहित्य-प्रवर्तिनीसारखी अत्यंत प्रगत संस्था स्थापन होऊ शकली. या दोन्ही राज्यांत उत्तम साहित्य अतिशय अल्प किंमतीत वाचकांना उपलब्ध करून देण्याच्या योजना सरकारच्या सहकार्यामुळे कार्यान्वित होऊ शकल्या. केरळमध्ये साहित्य, नाट्य, नृत्य व संगीत या शाखांच्या स्वतंत्र ॲकॅडमी आहेत. त्यांचे कार्य त्या त्या क्षेत्रातील तज्ज्ञ चालवितात. सरकारचे या ॲकॅडमीना भरपूर साहाय्य असते. पण त्यांच्या कामकाजात सरकार ढवळाढवळ करीत नाही. ही आदर्श व्यवस्था आहे.

या संदर्भात महाराष्ट्र शासनातर्फे देण्यात येणाऱ्या वाङ्मय पुरस्कारांची अक्षम्य हेळसांड गेली अनके वर्षे चालली आहे, इकडे मी सरकारचे लक्ष वेधू इच्छितो. दरसाल

नियमितपणे पुस्तके मागवली जात नाहीत, परीक्षक समित्या नेमल्या जात नाहीत आणि अर्थात वेळच्या वेळी निकालही लागत नाहीत. ज्या शिक्षणखात्यातर्फे हे पुरस्कार दिले जातात, त्या शिक्षणखात्याला इतकी इतर कामे असतात की या कामाची कागदपत्रे वर्षानुवर्षे धूळ खात पडतात. दरम्यान या काळात नवीन पुस्तके जुनी होतात. अशा सरकारी अनास्थेपायी संबंधित साहित्यिकांत निराशा व अपेक्षाभंग तीव्रतेने पसरले जातात. हे टाळण्यासाठी माझी सरकारला अशी सूचना आहे की, हे काम अ. भा. मराठी महामंडळाकडे सोपवावे. पारितोषिकांची रक्कम आणि परीक्षकांचे मानधन व इतर संबंधित खर्चाचा धनादेश सरकारने महामंडळाकडे द्यावा आणि महामंडळाने वाङ्मय पुरस्काराचे निकाल दरसाल वेळेवर लागतील याची दक्षता घ्यावी.

## परभाषिकांशी आदानप्रदान

मराठी साहित्यिकांनी केवळ मराठीपुरतेच आपले सास्कृतिक व्यवहार मर्यादित न ठेवता भारतातील इतर भाषिकांशी अधिकाधिक आदानप्रदान केले तर ते अतिशय उपकारक ठरेल. माझ्यापुरती ही योजना मी गेली अकरा वर्षे अमलात आणत आहे. प्रत्येक वर्षी भारतातील एका राज्याला भेट देऊन त्या राज्याचा सांस्कृतिक वारसा समजावून घेणे आणि तेथील प्रमुख साहित्यिकांना भेटून त्यांच्या साहित्याची माहिती घेऊन मराठी साहित्याविषयी त्यांना माहिती देणे हे काम मी माझ्या कुवतीनुसार करीत आहे. आतापर्यंत मी गुजराथ, मध्यप्रदेश, पश्चिम बंगाल, तामिळनाडू, उत्तरप्रदेश, आंध्रप्रदेश, कर्नाटक, राजस्थान, बिहार, ओरिसा आणि केरळ या राज्यांतील तीनशे पन्नासवर साहित्यिकांच्या भेटी घेऊन अकरा पुस्तके लिहिली आहेत. पण माझ्या एकट्याचे हे कार्य अतिशय लहान आहे. महाराष्ट्रातून असेच काम करणारे अनेक लेखक परप्रांतात गेले पाहिजेत आणि त्या त्या प्रांतातील लेखकांनाही महाराष्ट्रात बोलावून त्यांच्याशी आपल्या लेखकांच्या चर्चा घडवून आणल्या पाहिजेत. यामुळे मराठी लेखकांच्या जाणीवांच्या कक्षा वाढतील, आणि पर्यायाने मराठी साहित्य अधिक सकस होण्यास मदत होईल.

डॉ. शिवराम कारंथ, अमृता प्रीतम, जागतिक कीर्तीचे आर. के. नारायण, मनोहर माळगावकर, डॉ. पुटप्पा, व्ही. के. गोकाक अशा दिग्गजांना भेटून त्यांच्या उत्तम प्रतिभेचा परिचय करून घेणे हा केवळ आनंदाचाच नव्हे, तर नवीन स्फूर्ती घेण्याचा मार्ग आहे. त्यामुळे भारतीय एकात्मतेलाही बहुमोल साहाय्य होईल. माझ्या परप्रांताच्या दौऱ्यात मराठी संस्कृती आणि साहित्य यांच्याविषयी जिव्हाळा बाळगणारे अनेक महान लेखक भेटले. उडिया भाषेतील ज्ञानपीठ पारितोषिकविजेते डॉ. गोपिनाथ महंती यांनी भुवनेश्वर येथे इंग्रजी-मराठी शब्दकोश मागवून मराठी भाषेचा अभ्यास केला आणि छत्रपती शिवाजी महाराजांच्याविषयीची मराठी पुस्तके वाचली. लखनौ

येथील अमृतलाल नागर यांनी तर आपल्या लेखनाच्या मेजासमोर समर्थ रामदासांचे 'वन्हि तो चेतवा रे चेतवा, चेतविताची चेततो' हे वचन लावले आहे. अनेक परभाषिकांनी मराठी नाटकाविषयी विचारणा केली. विमल मित्र, अमृता प्रीतम, अमृत राय, महादेवी वर्मा, बलवंत गार्गी, शिवराम कारंथ, सी. नारायण रेड्डी अशा ज्येष्ठ लेखकांना मराठी साहित्य व साहित्यिक यांच्याविषयी असीम कुतूहल असल्याचा सुखद अनुभव मला आला. परप्रांतातील लेखक विजय तेंडुलकरांच्या नव्या लिखाणाची माहिती घेण्यास सर्वाधिक उत्सुक असतात. तेंडुलकरांचे नवे नाटक कोणते, त्यात त्यांनी कोणता नवा विषय हाताळला आहे, त्यांचे इतर लेखन काय आहे, याविषयी महाराष्ट्राबाहेरही खास कुतूहल आहे. रंगभूमीवर नवे, प्रक्षोभक, महत्त्वपूर्ण विषय आणणारे विजय तेंडुलकर हे मराठीतच नव्हे, तर सबंध भारतात सर्वाधिक चैतन्यशील नाटककार आहेत. त्याचबरोबर जयवंत दळवी, प्र. ल. मयेकर, वसंत कानेटकर, प्रशांत दळवी यांनी मराठी नाटकांचा झेडा भारतात अग्रभागी ठेवला आहे ही अभिमानाची बाब आहे.

इतर भाषातील साहित्याची तुलना करता मराठी कादंबरीची कामगिरी निराशाजनक वाटते. 'स्वामी', 'पानिपत', 'रथचक्र' अशा लोकप्रिय कादंबऱ्या या गतकालाकडे पाहणाऱ्या आहेत. आजच्या गतिमान कालाचे भान ठेवून भविष्याचाही वेध घेण्याचा प्रयत्न करणाऱ्या कादंबऱ्या मराठीत फारच कमी आहेत. त्या मानाने बंगाली कादंबरी भारतात अग्रगण्य आहे. कानडी आणि मल्याळी काव्याने इतर भाषांच्या तुलनेने खूपच प्रगती केली आहे. कानडीने सर्वाधिक म्हणजे पाच ज्ञानपीठ पुरस्कार मिळविल आहेत. आणि त्यातील तीन काव्यासाठी आहेत. विनोदाच्या क्षेत्रात शरद जोशी (हिंदी) आणि चो रामस्वामी (तामिळ) यांच्या तोडीचे-किंवा काहीसे सरसच- लेखन आचार्य अत्रे आणि पु. ल. देशपांडे यांनी केले आहे. कथावाङ्मय हिंदीत जेवढे विकसित झाले आहे, तेवढे मराठीत किंवा अन्य भाषांत झालेले नाही. गुजरातीतील नाटके बव्हंशी मराठी-इंग्रजीची नक्कल करणारी आहेत. पण उमाशंकर जोशी यांच्यासारखे श्रेष्ठ कवी गुजरातीने दिले आहेत. एकेकाळी आघाडीवरती असलेले बंगाली आता रंगभूमीवरील नेपथ्याच्या हिकमतीत अडकून आशय गमावून बसले आहे. मात्र 'प्रतिद्वंद्वी'चे लेखक सुनील गांगुली हे भारतातील एक आदर्श लेखक आहेत. वर्तमानकाळाचे भान ठेवून भविष्याचा वेध घेणाऱ्या त्यांच्या कथांवर सत्यजित रे यांनी जे कलात्मक चित्रपट काढले, त्यामुळे जागतिक पातळीवर भारतीय चित्रपट गेला आहे. श्रेष्ठ साहित्यावर आधारलेले चित्रपटच उत्कृष्टतेच्या कसोटीवर उतरतात हे सत्य या चित्रपटांनी अधोरेखित केले आहे.

या संदर्भात आजच्या मराठी चित्रपटांचा विचार अपरिहार्य आहे. मराठी चित्रपट हे एके काळी वि. स. खांडेकर, आचार्य अत्रे, अनंत काणेकर, य. गो. जोशी अशा श्रेष्ठ साहित्यिकांच्या कथांवर आधारित होते तेव्हा त्यांनी कलात्मक उंचीचे टोक गाठले

होते. पण अलीकडच्या काळात मराठी चित्रपटांनी उत्तम साहित्यिकांची संगत सोडली आहे आणि हिंदी व इंग्रजी चित्रपटांच्या भ्रष्ट नकलांवर ते विसंबून राहू लागले, तेव्हापासून त्यांची सतत घसरण चालली आहे. तर्कसंगीताचा अभाव, बाष्कळ विनोद आणि पुनरावृत्ती यामुळे मराठी चित्रपटांना आज हीन कळा आली आहे. मराठी नाटक आणि मराठी चित्रपट ही गुणवत्तेची विरुद्ध टोके झाली आहेत.

मराठी चित्रपटांच्याबरोबरच दूरदर्शनवरील मराठी कार्यक्रमांचाही विचार करावा लागेल. या कार्यक्रमांचा दर्जा अत्यंत सुमार असतो. या मालिकांनाही श्रेष्ठ लेखकांचे सहकार्य क्वचितच मिळते. त्यामुळे ठराविक नायक-नायिका, ठरलेले पेचप्रसंग आणि अपेक्षित उकल हे या मालिकांचे ठरीव साच्यातल्यासारखे बेचव रूप असते. आचरट हावभाव म्हणजे विनोद ही दूरदर्शनची कल्पना दिसते. दूरदर्शनचे व्यवहार भयंकर वशिलेबाजी, भ्रष्टाचार आणि परिणामी नित्कृष्ट कार्यक्रम यांनी लडबडलेले आहेत. जो भ्रष्टाचार सिद्ध करता येत नाही तो खपवून घ्यावा लागतो. पण कार्यक्रम पाहिल्यावर लक्षात येते की गुणवत्ता सोडून इतर कोणत्यातरी निकषावर त्यांची निवड झाली असावी. लेखकांनी आपण होऊन दूरदर्शनवरील अधिकाऱ्यांकडे जावे आणि कार्यक्रमांची याचना करावी अशी दर्पयुक्त अपेक्षा अधिकारी करतात. वरिष्ठांच्याकडे तक्रारी करून काही उपयोग नसतो; कारण तेही त्याच माळेतील मणी असतात. उद्योगपती, भांडवलवाले, व्यापारी, बॅंका याही याच भ्रष्ट प्रवृत्तीना खतपाणी घालीत असतात. अन्यथा एखाद्या बॅंकेच्या शाखेचे उद्‌घाटन किंवा गबर उद्योधंद्याचा परिसंवाद यांना दूरदर्शनवर स्थान कशाला मिळाले असते ? सर्वसामान्य रसिकाला या कार्यक्रमात अजिबात रस नसतो. वरिष्ठ पातळीवर झालेल्या देवघेवीचा आशीर्वाद अशा कार्यक्रमांना असतो हे उघड आहे. अशा संबंधितांचा मतलब साधणाऱ्या कार्यक्रमांची चंगळ होत असतानाच ग्रंथप्रसाराच्या, लोकहिताच्या कार्यक्रमासाठी मात्र दूरदर्शनकडे पैसा किंवा वेळ उपलब्ध नसतो.

'प्रतिभा आणि प्रतिमा' हा मूलतः सृजनशील साहित्यिकांचा कार्यक्रम. पण पुढे याच कार्यक्रमात प्रतिभेशी संबंध नसलेल्या धनिकांचीही वर्णी लागली. याच गतीने 'प्रतिभा आणि प्रतिमा' मध्ये धुळ्याचे धर्मभास्कर वाघ यांची मुलाखत दूरदर्शनवर झाली तर मला आश्चर्य वाटणार नाही, कारण त्यांनीही थोर कल्पनाविलास दाखविला आहेच !

नव्या पुस्तकांकडे दूरदर्शनचे दुर्लक्ष होत आहे. ग्रंथपरिचयाचे काही फुटकळ कार्यक्रम दूरदर्शनवर झाले, पण त्यात सातत्य ठेवण्यात संयोजकांना यश आले नाही. दूरदर्शनवर दोन प्रकारचे ग्रंथविषयक कार्यक्रम असावेत असे मला वाटते. एका कार्यक्रमासाठी सुमारे पंधरा नव्या ग्रंथांचा त्रोटक परिचय असावा. हा कार्यक्रम महिन्यातून एकदा असावा. दुसऱ्या कार्यक्रमात दोन किंवा तीन निवडक, महत्त्वाच्या नव्या पुस्तकांचे रसग्रहण असावे. हाही कार्यक्रम महिन्यातून एकदा ठेवावा. या दोन्ही नियमित कार्यक्रमांमुळे नव्या व महत्त्वाच्या पुस्तकांची माहिती लक्षावधी वाचकांना मिळेल आणि तिचा

ग्रंथप्रसारासाठी फार मोठा उपयोग होऊ शकेल. या दोन्ही कार्यक्रमांचे स्वरूप असे असावे की संबंधित ग्रंथ वाचण्याविषयी लोकांचे कुतूहल जागृत व्हावे. ग्रंथांच्या मूल्यमापनाच्या नावाखाली त्यांची चिरफाड करण्याची अगर लेखकाला खाली ओढण्याची प्रवृत्ती असू नये; पण जे वाचनीय आहेत त्यातील सौंदर्य उलगडून दाखवायचे हा या कार्यक्रमाचा प्रधान हेतू असावा.

दूरदर्शनवर दाखविण्यात येणाऱ्या फलकावरील भाषा अनेकदा अत्यंत अशुद्ध असते. 'भाग दूसरा' (दुसरा), अवीकसीत (अविकसित) असे अशुद्ध लेखन पाहायला सापडते. कार्यक्रमांची निर्माते म्हणून दोघांची नावे पण फलक मात्र 'निर्माता' असा एकवचनी. असे करता करता 'दूरदर्शन' ऐवजी 'दुर्दर्शन' असा सत्याच्या अधिक जवळ जाणारा शब्द या फलकावर दिसेल असे वाटते.

## मराठी पुस्तकांचा प्रसार

मराठी पुस्तकांचा प्रसार ही एक जटिल समस्या आहे. पुस्तके महाग असल्याने वैयक्तिक ग्राहकाला ती विकत घेणे परवडत नाहीत अशी तक्रार ग्राहक करतात; तर खप कमी असल्याने आणि कागद, मुद्रण वगैरेचे दर वाढल्याने पुस्तके स्वस्त देणे परवडत नाहीत असे प्रकाशक म्हणतात. वस्तुत: सोन्यासारख्या इतर जिनसा गेल्या चाळीस वर्षात जितक्या महाग झाल्या, त्या प्रमाणात पुस्तकांच्या किंमती वाढलेल्या नाहीत. पण धान्य, कापड अशा अत्यावश्यक गरजेसारखी पुस्तकांची गरज ही अत्यावश्यक नसल्याने वाढत्या महागाईत काटकसरीची कुऱ्हाड पुस्तकखरेदीसारख्या प्रकारावर पडते हेही खरे आहे. मात्र सध्याच्या परिस्थितीतही पुस्तकांचा खप वाढविण्यासाठी बरेच काही करता येईल.

त्यासाठी नवे नवे मार्ग शोधले पाहिजेत. या संदर्भात मला अमेरिकन प्रकाशन संघटनेने केलेल्या चतुर उपाययोजनेची आठवण येते. त्या संघटनेने अमेरिकन वास्तुशिल्पकार संघटनेस सूचना केली की त्यांनी नवीन घरे बांधताना त्या घरात ग्रंथालयासाठी स्वतंत्र खोली ठेवावी. मग आपोआपच नव्या घरमालकांना ती ग्रंथालये भरून काढण्यासाठी ग्रंथखरेदी करावी लागेल. ही कल्पना यशस्वी ठरली आणि हळूहळू अमेरिकन घरात ग्रंथालये ही आवश्यक आणि सांस्कृतिक अभिमानाची बाब करून लक्षावधी डॉलर्सची खरेदी झाली. एका नव्या घरमालकाने ग्रंथालयाची जागा मोजून 'एक हजार चौरस फूट पुस्तके पाठवा.' असे प्रकाशकांना कळवले. तेव्हा या कल्पनेचे टीकाकार म्हणाले की, 'पहा ! प्रकाशकांच्या हिकमतीचा काही उपयोग झाला नाही.' पण प्रकाशकांनी त्यावर उत्तर दिले, 'नाही कसा ? ही एक हजार चौरस फूट पुस्तके घरात आल्यावर घरातील मंडळी कुतूहलाने पुस्तके चाळतील, वाचतील आणि नंतर तरी त्यांना वाचनाची गोडी लागेल.' प्रकाशकांचे ते म्हणणे खरे ठरले.

एक पुस्तकविक्रेते तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना भेटून कैद्यांच्यासाठी पुस्तके विकतात. फिरती ग्रंथप्रदर्शने यशस्वी झाली आहेत. पुणे-मुंबई-नागपूरसारख्या मोठ्या शहरी पुस्तके सुलभतेने उपलब्ध असतात. पण दूरवरच्या लहान गावी पुस्तके नेली व त्यांचे प्रदर्शन मांडले तर पुस्तकांचा चांगला खप होतो असा अनुभव आहे. या दृष्टीने ढवळे व ग्रंथाली यांची ग्रंथप्रदर्शनाची योजना आणि एका मालमोटारीतून गावोगाव ग्रंथ नेऊन विक्री करणाऱ्या श्रीरेखाची पुस्तकपंढरी हे उपक्रम कौतुकास्पद आहेत. अनेक गिरण्यांतून नियमित वेळी कोट्यावधी रुपयांचा बोनस वाटला जातो त्यातील अल्पांश जरी पुस्तकांच्या रूपाने दिला, तर पुस्तकांचा खप वाढेल आणि कामगारांना वाचनाची गोडी लागेल. मुंबईत कापड गिरणी कामगारांना दिवाळीपूर्वी बोनस वाटला जातो, तो काही कोटीचा असतो त्यावेळी हा प्रयोग करून पाहण्यासारखा आहे. या योजनेत गिरणीमालकांना कामगारनेत्यांनी सहकार्य देऊन कामगारांच्या सांस्कृतिक विकासास हातभार लावावा. तीच गोष्ट महाराष्ट्रातील साखर कारखान्यांची. जे कारखाने भरपूर कायद्यात आहेत, त्यांनी शेतकऱ्यांना ऊस खरेदीचे पैसे वाटताना अगदी अल्प प्रमाणात जरी पुस्तके दिली, तरी शेतकऱ्यांच्या घरोघर ही ज्ञानगंगा जाऊ शकेल. सरकार लॉटरीची जी बक्षिसे देते त्यातील अर्धा किंवा पाव टक्का जरी पुस्तकांच्या कूपन्सच्या रूपात दिली तरी ग्रंथप्रसाराला मोठाच हातभार लागेल. पुस्तकविक्रेत्याने आपल्या दुकानात स्वस्थ बसायचे आणि ग्राहकाने मागणी केल्यावरच पुस्तक काढून द्यायचे ही पारंपरिक, यांत्रिक पद्धत सोडून ग्रंथप्रसाराच्या अशा नव्या वाटा शोधून हा व्यवहार विकसित करणे आवश्यक आहे 'रीडर्स डायजेस्ट' सारखे कोट्यवधींच्या खपाचे मासिकही नवे वर्गणीदार मिळविण्यासाठी नाताळ, दिवाळीसारख्या सणाच्यावेळी खास मोहीम काढते. तसे प्रयत्न पुस्तक प्रकाशनाच्या बाबतीतही करता येतील. सैन्यासाठी साहसकथांची पुस्तके पुरवण्याबाबत संरक्षण खात्याकडेही सहकार्य मागता येईल. त्यामुळे लक्षावधी मराठी सैनिकांना साहित्य मिळू शकेल.

पुस्तकप्रसाराबाबत परप्रांताकडे आणि परदेशाकडे आपले आतापर्यंत बरेच दुर्लक्ष झाले आहे. अहमदाबाद, कलकत्ता, भोपाळ, लखनौ, मद्रास, कोचीन, बंगलोर, अजमेर, जयपूर अशा दूरदूरच्या भागात लक्षावधी सुशिक्षित मराठी लोक राहतात; पण त्यांना उत्तम मराठी पुस्तके सहजपणे उपलब्ध होत नाहीत. वर्षातून तीनचार वेळा जर आपले प्रकाशक त्या त्या भागात आपली पुस्तके पाठवतील तर त्यांना उत्तम प्रतिसाद मिळेल. या बाबतीत त्या त्या शहरातील महाराष्ट्र मंडळांचा खूपच उपयोग होऊ शकेल. परप्रांताप्रमाणेच परदेशातही मराठी लोक मोठ्या प्रमाणावर स्थायिक झाले आहेत. काही गुजराथी पुस्तकविक्रेते दक्षिण अफ्रिका, इंग्लंड, जर्मनी, अमेरिका, हॉंगकॉंग, अशा दूरदेशी पुस्तके नेऊन ती गुजराथी वाचकांच्यापर्यंत पोचविली जातात आणि त्यांना उत्तम प्रतिसादही मिळतो. प्रकाशक संघटना आणि त्या त्या देशातील

महाराष्ट्र मंडळे यांच्या सहकार्याने परदेशात मराठी पुस्तके नेण्याची महत्त्वाकांक्षी योजना राबविता येईल. परदेशातील मराठीभाषिकांची क्रयशक्ती चांगली असते. तिचा फायदा या योजनेला मिळू शकेल.

आचार्य विनोबांनी भूदान चळवळ केली, तशीच आपण ग्रंथदान चळवळ करू या. महाराष्ट्रातील खेड्यापाड्यात ग्रंथ देणे हे या चळवळीचे सूत्र राहील. जेथे ग्रंथ सहसा उपलब्ध होत नाहीत, तेथे भेट म्हणून ग्रंथ पाठविले तर त्या भागातील लोकांना वाचनाची गोडी उत्पन्न होईल आणि कालांतराने ते स्वतःच ग्रंथ खरेदी करतील एका लेखकाचे एखादे चांगले पुस्तक वाचले, तर त्याच लेखकाची इतर पुस्तके वाचण्याचीही उत्सुकता वाटते. लेखक, प्रकाशक, उदार धनिक यांनी या ग्रंथदान चळवळीत भाग घ्यावा. मी स्वतः तीन वर्षात एक हजार ग्रंथ भेट म्हणून देण्याचा संकल्प सोडीत आहे. या वर्षभरात मी निदान दहा मित्रांना विनंती करून एकंदर दहा हजार ग्रंथ लहान लहान गावी पाठविण्याचा प्रयत्न करीन.

## ग्रंथालयाचे महत्त्व

आपल्या एकंदर ग्रंथव्यवहारात ग्रंथालयांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. पुस्तकाच्या वाढत्या किंमतीमुळे वैयक्तिक गिऱ्हाईक रोडावत चालले आहे. अधिकाधिक लोक वाचनासाठी आता ग्रंथालयांवर अवलंबून राहू लागले आहेत. लेखन, प्रकाशन, प्रसार आणि आस्वाद या साहित्य व्यवहारातील चार प्रक्रिया आहेत. लेखकाचे चिंतन व प्रतिभा यांचा परिपाक अशी जी कलाकृती ती वाचकांपर्यत पोचविण्याची मुख्य मदार आता ग्रंथालयांवर आहे. युनेस्कोच्या अहवालानुसार ग्रंथप्रसाराबाबत भारताचा क्रमांक आठवा लागतो. महाराष्ट्रात सुमारे ३,’०० ग्रंथालये आहेत. मराठी पुस्तकांची सुमारे १,००० ची आवृत्ती खपण्यास तीन ते चार वर्षे लागतात. यावरून हे सिद्ध होते की या ३,८०० ग्रंथालयात सुमारे ७०० च प्रती घेतल्या जातात. म्हणजे सर्व प्रकाशित पुस्तके घेण्याची ग्रंथालयांची आर्थिक कुवत नाहा, असे या आकडेवारीवरून सिद्ध होते. त्यासाठी सरकारने ग्रंथालयांना अधिकाधिक आर्थिक साहाय्य देऊन ग्रंथप्रसाराला हातभार लावणे आवश्यक आहे. तसेच ग्रंथालयांच्या सेवकांच्या वेतनात वाढ करण्याच्या त्यांच्या अनेक वर्षाच्या मागण्यांकडेही सरकारने लक्ष पुरविले पाहिजे. कारण समाधानी सेवक किंवा ग्रंथपाल हा महत्त्वाचा दुवा आहे. उत्तम ग्रंथपाल केवळ वर्गणीदाराने मागितलेले पुस्तकच देतो असे नाही, तर एकंदर वाचनाची अभिरुची वाढविण्यास मोलाचे साहाय्य करतो. त्यासाठी तो स्वतः उत्तम वाचक असावा लागतो. आदर्श ग्रंथपाल, कपाटातून पुस्तक काढून देण्याचेच यांत्रिक काम न करता एखादे पुस्तक नसेल तर त्याऐवजी दुसरे कोणते पुस्तक वाचकाची गरज भागवू शकेल याबद्दलही मार्गदर्शन करतो.

१८९८ साली डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्स्लेशन कमिटीने सादर केलेल्या अहवालात म्हटले आहे, "मराठी भाषेत ग्रंथ कमी होतात याचे कारण मराठी लोकांत ग्रंथकर्तृत्वशक्ती कमी आहे हे नाही; तर ग्रंथवाचनाची अभिरुची कमी आहे हे होय." म्हणजे मराठी लेखक कमी पडत नाहीत, पण वाचक कमी पडतात. हे वाचक वाढविणे व जे वाचक ग्रंथालयात येतील त्यांना उत्तम पुस्तके देऊन त्यांची अभिरुची अधिक तरल करणे ही ग्रंथालयांची व ग्रंथपालांची कामे आहेत.

'गाव तेथे पाणवठा' या घोषणेबरोबरच 'गाव तेथे ग्रंथालय' ही घोषणाही अंमलात आली, तर मराठी ग्रंथप्रसाराला मोलाचे साहाय्य होऊ शकेल. मानवी जीवनाला पाण्याचे जे महत्त्व तेच आपल्या आत्मिक विकासात ग्रंथांना आहे. ही ज्ञानगंगा प्रत्येक गावी जाईल अशी महत्त्वाकांक्षी योजना राबविली पाहिजे निदान महाराष्ट्राच्या पंचक्रोशीत एक ग्रंथालय असावे एवढी माफक योजना तूर्तास अंमलात आली तरी मोठेच काम होईल.

ग्रंथव्यवहारात चातुर्वर्ण्य नसावे. लेखक, प्रकाशक, मुद्रक आणि विक्रेते हे सर्वच घटक महत्त्वाचे आहेत. साहित्याचा निर्माता लेखक असला तरी इतर तीन घटकांनी उत्तम काम केले, तरच त्यांचे लेखन आस्वादकापर्यत जाऊन पोहोचेल. ग्रंथव्यवहारातील या सर्व घटकांना मानाने वागवले पाहिजे. गणकयंत्राद्वारे होणाऱ्या अक्षरजुळणीमुळे मुद्रणाच्या क्षेत्रात क्रांती झाली आहे. प्रकाशनाच्या कामाकडे प्रकाशक जितके लक्ष पुरवितात तितकेच त्यांनी ग्रंथाच्या प्रसाराकडे पुरविले पाहिजे. विक्रेता हा आजच्यापेक्षा अधिक सक्रिय झाला पाहिजे. येणारे गिऱ्हाईक जे पुस्तक मागेल तेवढेच काढून देणे हे त्याचे काम नाही. प्रथम तो स्वत: उत्तम वाचक असला पाहिजे. वारंवार येणाऱ्या गिऱ्हाइकाची अभिरुची अजमावून त्याप्रमाणे नव्या पुस्तकांची शिफारस विक्रेत्याने केली पाहिजे. एकदोन उदाहरणांवरून सर्वच प्रकाशकांविषयी गैरसमज करून घेणे योग्य होणार नाही. मराठी प्रकाशक हे नाविन्याची हौस असणारे, उत्तम लेखन वाचकांना उपलब्ध करून देण्याचा प्रयत्न करणारे आहेत असा माझा अनुभव आहे.

सरकारी पारितोषिक वितरणाच्यावेळी लेखकांप्रमाणेच ती पुस्तके प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकांनाही पारितोषिके असावीत. त्यामुळे प्रकाशकाने केलेल्या श्रमांचे चीज होईल. प्रकाशक परिषदेने या कामी स्तुत्य कार्य केले आहे हे नमूद केले पाहिजे. जेथे मराठी साहित्य सध्या पोहोचत नाही तेथे ते ग्रंथप्रदर्शन अगर अन्य विक्रीव्यवस्थेद्वारे पोहोचेल अशी व्यवस्था प्रकाशक आणि विक्रेते यांनी केल्यास ती प्रकाशक आणि वाचक या दोन्ही घटकांना उपकारक ठरेल.

## विविध संमेलने

सध्या मराठी भाषकांची अनेक साहित्य संमेलने आहेत. ख्रिस्ती साहित्य संमेलन, दलित साहित्य संमेलन, ग्रामीण साहित्य संमेलन, कामगार साहित्य संमेलन,

विनोदी साहित्य संमेलन, मराठी साहित्य संमेलन अशी काही नावे सांगता येतील. इतक्या साहित्य संमेलनांची उपयुक्तता किंवा आवश्यकता आहे काय आणि ही साहित्य संमेलन म्हणजे अखिल भारतीय साहित्य संमेलनाशी सवतेसुभे काढून केलेल्या संघटना आहेत काय ? असे प्रश्न उपस्थित केले जातात. मला वाटते की विविध साहित्य संमेलने मराठी साहित्याच्या वाढीला पोषकच आहे. हे काही सवतेसुभे किंवा प्रतिस्पर्धी नाहीत. या संमेलनांची आवश्यकता आहे ती अशासाठी की अखिल भारतीय साहित्य संमेलनात या विषयांना पुरेसा वेळ मिळत नाही आणि न्यायही मिळत नाही. उदाहरणार्थ, विनोदावर अखिल भारतीय साहित्य संमेलनात चारसहा वर्षांनी एखादा परिसंवाद होतो. मात्र स्वतंत्र विनोदी संमेलन घेतले, तर मराठी विनोदी साहित्याची प्रगती आणि त्यातील विविधता यावर अधिक सखोल चर्चा होऊ शकते. अनेक विनोदी लेखक भाग घेऊ शकतात. मुख्य संमेलनात ख्रिस्ती साहित्याचा विचार सहसा होतच नाही. पण फादर स्टीफनपासून ख्रिस्ती साहित्याची मोठी परंपरा आहे. तिचे योगदानही लक्षणीय आहे. दलित साहित्य हा अत्यंत महत्त्वाचा व ओजस्वी प्रकार असूनही अखिल भारतीय साहित्य संमेलनात हा विषय कधी स्पर्शिला जात नाही, तर कधी कोठेतरी कोपऱ्यात किंवा वळचणीला कसाबसा बसविला जातो. मात्र स्वतंत्र दलित संमेलनात त्याला न्याय मिळतो. ग्रामीण साहित्य संमेलनाची हीच अवस्था आहे. आपल्याकडे इतके सकस ग्रामीण साहित्य आहे की त्याचा स्वतंत्र विचार व्हायला हवा आणि ग्रामीण साहित्य संमेलनात तो होऊ शकतो.

जिल्हा व तालुका पातळीवरही साहित्यविषयक चळवळ पसरावी म्हणून महाराष्ट्राच्या प्रत्येक जिल्ह्यात स्वतंत्र जिल्हा संमेलन भरावे असे मला वाटते. त्यामुळे लहान लहान गावातही कार्य करणारे कवी, कथालेखक, नाटककार, कादंबरीकार व इतर ललित लेखक यांना न्याय मिळेल. सोलापूर, अकोला, अमरावती, कोल्हापूर, गडचिरोली, सिंधुदुर्ग अशा सर्व जिल्ह्यांची संमेलने होऊन शेवटी नद्या सागराला मिळतात त्याप्रमाणे या संमेलनांची साहित्यविषयक चळवळीची परिणती अखिल भारतीय साहित्य संमेलनात व्हावी हे उचित आहे. रायगड, नाशिक यासारख्या जिल्ह्यात या संमेलनांची प्रथा आहेच आणि त्यांची उपयुक्तताही सिद्ध झाली आहे.

## परप्रांतातील मराठी भाषिक

परप्रांतात स्थायिक झालेल्या मराठी भाषिकांच्या अनेक समस्या आहेत. तेथील मराठीची पिछेहाट होत आहे. व्यवहाराची भाषा हिंदी, कानडी, तेलगू अशी भिन्न आणि घरात बोलली जाणारी भाषा मराठी अशी द्विधा „परिस्थिती आहे. सीमावर्ती प्रांतात लोकसंख्येच्या दृष्टीने हा समाज दुसऱ्या स्थानावर असतो. वास्तविक देशाच्या घटनेप्रमाणे मराठी भाषिकांना अल्पसंख्याकांचे फायदे मिळायला हवेत. पण त्या त्या राज्यातील

शासनांची मराठीकडे दुराव्याने व अनास्थेने पहाण्याची दृष्टी असल्याने हे फायदे मराठी भाषिकांना मिळत नाहीत. या भागातील मराठी भाषिकांच्या मागण्यांपैकी भाषिक व सांस्कृतिक गरजांकडे शासनाने लक्ष पुरविणे, नभोवाणी व दूरचित्रवाणीवरील कार्यक्रमात मराठीला वाजवी प्रतिनिधित्व मिळणे, शाळा व महाविद्यालयात मराठीचा अभ्यासक्रम ठेवणे व तशी पुस्तके तयार करणे, मराठी माध्यमांच्या शिक्षणसंस्था चालविणे, महाराष्ट्र मंडळासारख्या संस्थांना पुरेसे अर्थसाहाय्य देणे, मराठी ग्रंथालयांना पुरेसे अनुदान देणे या प्रमुख मागण्या आहेत. भाषावार प्रांतरचनेनंतर सीमा भागात त्या त्या राज्यांच्या भाषेची सक्ती आणि मराठीवर अन्याय यात वाढच झाली. बेळगाव, निपाणीसारख्या अनेक भागानी त्याविरुद्ध दीर्घ आणि चिकाटीचा लढा दिला आहे. महाराष्ट्रात विलीन होण्याच्या त्यांच्या मागणीला कोल्हापूरने अपूर्व व सक्रिय पाठिंबा दिला आहे. भविष्यकालात लवकरच त्या विभागांची दीर्घकाळाची मागणी पूर्ण व्हावी असे मला वाटते.

सीमाभागातील राज्यांत आणि प. बंगाल व राजस्थान अशा दूरच्या भागातील मराठी भाषिकांनी शासनाकडे आपल्या मागण्याचा पाठपुरावा करीत असतानाच स्वत: मराठी भाषेचा विकास आपापल्या क्षेत्रात अखंडित होईल या दृष्टीने प्रयत्न करायला हवा. मराठी साहित्यिकांची भाषणे ठेवणे, शारदोत्सवासारखे उत्सव करणे, मराठी नाटकांचे प्रयोग सातत्याने करणे अशा अनेक मार्गांनी हे कार्य करता येईल व काही प्रमाणात केले जात आहे. कलकत्ता, राजकोट, जयपूर, लखनौ, अहमदाबाद अशा अनेक ठिकाणच्या महाराष्ट्र मंडळांना मी भेटी दिल्या असून, त्यांचे कार्य पाहिले आहे. व्याख्याने, गणशोत्सव, ग्रंथालय अशा अनेक मार्गांनी त्यांचे हे काम चालू आहे व त्यामुळे तेथे मराठी भाषा अजून पाय रोवून उभी आहे. मात्र त्या त्या भागातील शासनाकडून या प्रयत्नांना अत्यल्प प्रतिसाद मिळतो हे खेदपूर्वक नमूद करावे लागते.

परदेशात स्थायिक झालेल्या मराठी भाषिकांचे प्रश्न अधिकच बिकट आहेत. विशेषत: पुढील पिढीत ही भाषा कशी टिकून रहावी ही मोठी समस्या आहे. दिवाळी, गणेशोत्सव अशा काही शुभप्रसंगी परदेशातील मराठी भाषिक एकत्र येतात आणि त्यानिमित्ताने मराठी नाटकांचेही प्रयोग करतात. पण त्यात हिरीरीने भाग घेण्याबद्दल नवी पिढी उदासीन असते. घरी व जाहीर ठिकाणी आपसात कटाक्षाने मराठीच बोलणे, महाराष्ट्रातून मराठी पुस्तके, ध्वनीफिनी व ध्वनीचित्रफिती सातत्याने मागवून त्याचा वापर करणे, मराठी साहित्यिकांचे कार्यक्रम ठेवणे, परदेशातील नव्या पिढीला महाराष्ट्राच्या भेटीला नियमित पाठवणे, मराठी नियतकालिके परदेशात चालविणे अशा अनेक उपायांनी त्या त्या देशात मराठीचे निशाण फडकत ठेवता येईल.

## जागतिक मराठी परिषद

१९८९ *साली स्थापन झालेली जागतिक मराठी परिषद म्हणजे जगभर* पसरलेल्या

मराठीभाषिकांसाठी कार्य करण्याचा एक सफल व महत्त्वाकांक्षी प्रकल्प आहे. मराठी भाषा हा या परिषदेचा एक विषय असला तरी ही साहित्य संस्था नाही. विज्ञान, अर्थशास्त्र, उद्योगधंदे इत्यादी अनेक क्षेत्रांत कार्य करणाऱ्या सर्व देशांतील कर्तृत्वान मराठी लोकांना एकाच व्यासपीठावर आणून आपली प्रगती करण्याचा हा स्तुत्य प्रयत्न आहे. या परिषदेच्या विविध ॲकॅडमी आता स्थापन होत आहेत. परदेशातील व परप्रांतातील मराठी भाषिकांशी संपर्क साधायचा दुवा आतापर्यंत उपलब्ध नव्हता, तो आता जागतिक मराठी परिषदेने उपलब्ध करून दिला असून आपण या संधीचा लाभ घेतला पाहिजे. परदेशातील मराठीभाषिक हे मराठीपासून दुरावणार नाहीत यासाठी जाणीवपूर्वक प्रयत्न केले पाहिजेत. ही समस्या विशेषत: तेथे स्थायिक झालेल्यांच्या दुसऱ्या पिढीची आहे. दिवाळी आणि गणेशोत्सव यासारख्या मोजक्या प्रसंगी जमण्यावर समाधान न मानता या मराठीभाषिकांनी सतत एकत्र येणे आणि मराठी भाषेचा दुवा पुढच्या व त्यापुढच्या पिढीत नेणे हे अगत्याचे आहे. जागतिक मराठी परिषदेची मुंबई आणि मॉरिशस येथे झालेली दोन अधिवेशने यशस्वी व फलदायी ठरली आहेत. हीच प्रगती आता अकादमीद्वारा अपेक्षित आहे.

अलीकडच्या काळात आंतरराष्ट्रीय पातळीवर झालेल्या प्रचंड घडामोडींची दखल घेतली पाहिजे. त्यांचे दूरगामी परिणाम होत आहेत, होणार आहेत. आतापर्यंत बंदिस्त असलेल्या डाव्या विचारसरणीच्या देशात स्वातंत्र्याचे वारे वाहू लागले आणि तेही मिखाइल गोर्बाचोव्ह यांच्या असीम कर्तृत्वामुळे ही घटना अत्यंत महत्त्वाची आहे. जागतिक स्वातंत्र्याच्या संदर्भात गोर्बाचोव्ह, नेल्सन मंडेला आणि ब्रह्मदेशच्या तुरुंगात धैर्याने दिवस काढणाऱ्या आँग फॅन सु की यांची नावे सुवर्णाक्षरात लिहिली गेली पाहिजेत. मतस्वातंत्र्याशिवाय साहित्यिकांच्या आविष्काराला अर्थ उरत नाही. बंदिस्त लेखक आपले उत्कृष्ट सृजन करू शकत नाही. यानंतर ब्रह्मदेशही स्वकीयांच्याच जुलमी कारभारापासून लवकरच स्वतंत्र होईल. कारण स्वातंत्र्य हे फार काळ दडपले जात नाही, तसा जगभरचा अनुभव आहे.

साहित्यासाठी खाजगी क्षेत्रांनी ठेवलेली काही पारितोषिके अनुकरणीय आहेत. भैरू रतन दामानी, प्रियदर्शिनी, कोठावळे, विखे पाटील, जनस्थान इत्यादी पारितोषिकांनी साहित्यिकांना नवा धीर दिला आहे. इतर अनेक उद्योगपती अशीच पारितोषिके ठेवू शकतील. काही प्रकल्प योजून त्यासाठी अनुदान देण्यात आले, तर त्यामुळे साहित्यजगतात चैतन्य येईल असे मला वाटते. आपले बहुतेक लेखक कोठे ना कोठे नोकरी करतात. त्यांनी वर्ष दोन वर्ष रजा घेऊन तो काळ अशा अनुदानाच्या बळावर साहित्यनिर्मितीकडे खर्च केला, तर ते अतिशय उपकारक ठरेल. त्यामुळे साहित्यविषयक चळवळीला उत्तेजन मिळेल. अशाच अनुदानावर शंकर पाटील यांनी लिहिलेली 'टारफुला' ही कादंबरी या सृजनशील कार्याचे उत्तम उदाहरण आहे.

आपले साक्षरतेचे प्रमाण कमी आहेच. शिवाय केवळ साक्षर माणूस हा साहित्याचा वाचक असतोच असे नव्हे. साहित्याचा हा सारा व्याप आपल्या समाजाच्या दहापंधरा टक्के लोकांतच राहतो. या टक्केवारीपेक्षा अधिक दुःखाची गोष्ट अशी की, आपल्या जीवनात साहित्याला फारच कमी स्थान आहे. आज जो अल्प वाचक आहे, त्यापैकी बहुतेकांना उपयुक्त माहिती व्हावी आहे- जी त्यांच्या दैनंदिन जीवनातील प्रश्न सुलभ करण्यासाठी उपयोगी पडते. म्हणूनच दैनिकांचे खप लाखांच्या घरात आणि पुस्तकांचे खप हजारांच्या आसपास अशी परिस्थिती आहे. गणकयंत्र म्हणजे काय ? नोकरी कशी मिळवावी ? राहण्याची जागा स्वस्त आणि सोयीची कोठे मिळेल ? कोणत्या चित्रपटाची ध्वनिफीत बाजारात आली आहे ? कोणत्या सत्तास्थानावर कोण आला आहे ? ही उपयुक्त माहिती मिळविण्यासाठी वाचक जितका उत्सुक असतो तितका तो कथाकादंबरीतील कोण्या वसंताचे कोण्या मालतीशी प्रेम जमले काय आणि त्यांचा विवाह झाला काय हे जाणून घेण्यासाठी उत्सुक नसतो. माहिती घेणे हा बुद्धीशी निगडित असणारा प्रकार आहे आणि ललित साहित्य हा भावनात्मक अनुभव आहे. पण ललित साहित्याने प्रत्यक्ष जीवनातील प्रश्न सुटत नसतात. All art is useless म्हणजे सर्व कला निरुपयोगी आहेत असे ऑस्कर वाईल्डने म्हटले आहे, ते याच अर्थाने. तरीही जीवनातील समस्यांची जाणीव ललित साहित्याने होऊ शकते.

साहित्याने व्यावहारिक प्रश्न सुटले नाहीत तरी जीवनातील अत्यंत उदात्त अनुभव देऊन भावनांचे शमन (कॅथार्सिस) करण्याचे थोर कार्य साहित्य करते. श्रेष्ठ साहित्याचे वाचन करीत असतानाच आपण अंतर्यामी बदलत असतो. जीवनाकडे पाहण्याची आपली दृष्टी अधिक जिव्हाळ्याची आणि सहृदय होते. 'फुलराणी' वाचीत असताना कवितेप्रमाणेच आपल्याही भावना तरल व नाजूक होत असतात आणि त्यातील बराच अंश नंतरही मनात टिकून राहतो. सामान्य, रुक्ष, व्यवहारी माणसेही अभिजात साहित्याचा अनुभव घेतल्यानंतर संस्कारक्षम होतात.

जन्मभर मी हा साहित्याचा खटाटोप का केला आणि त्याचे कोणते फलित मला मिळाले ? या क्षेत्रात उद्योगव्यापारासारखी सुबत्ता नाही आणि वैभवही नाही. हजारो कर्मचाऱ्यांवर हुकुमत नाही. आंतरराष्ट्रीय पातळीवरचे व्यवहार नाहीत. सत्तेच्या केंद्रस्थानी असलेल्या बड्या धुरिणात वजन नाही. शुष्क वादांच्या गुंत्यात ओढले जाणे हा साहित्यक्षेत्रातील सततचा धोका. फक्त लेखनावर उत्तमप्रकारे जगता येणे अद्याप तरी सुलभ नाही आणि तरीही मी जन्मभर साहित्याशी इमानदार का राहिलो याचे उत्तर देऊन मी माझे हे भाषण संपवितो.

लहानपणीच मी साहित्याच्या प्रेमात पडलो आणि त्यानंतर जन्मभर त्याच्याशी एकनिष्ठ राहिलो. निर्वाहासाठी आवश्यक असणारी नोकरी संपल्यावर आणि ती करीत असताही साहित्याखेरीज इतर कशातही माझे मन रमले नाही. केशवसुत, चंद्रशेखर,

कुसुमाग्रज अशा दिग्गजांनाही याच अक्षरांनी कायमचे मोहात पाडले. या साहित्याने मला वैभव दिले नाही किंवा उद्योगधंद्यात मिळणारी सुबत्ताही दिली नाही. पण त्याने मला जो आनंद दिला आहे आणि इतरांना आनंद देण्याची थोडीफार कुवत दिली आहे त्यामुळे वैभव आणि संपन्नता या सर्व त्रुटी भरपूर भरून निघाल्या आहेत. साहित्याने मला दिलेले समाधान मला इतर कोणत्याही क्षेत्रात मिळाले नसते. म्हणूनच अखेरची प्रार्थना ही की, मराठी साहित्याला माझा विसर पडला तरी चालेल, पण मला मात्र कधीही मराठी साहित्यापासून दुरावा घडू नये.

## सातारा : १९९३

# विद्याधर गोखले

माझे भाग्य खरोखरच थोर आहे. हिंदवी स्वराज्य संस्थापक, चारित्र्य - महामेरु, श्रीमंत योगी छत्रपति श्री शिवाजी महाराज ह्यांच्या वंशजांनी जिला मराठी साम्राज्याची राजधानी केली, त्या सातारा - नगरीत भरणाऱ्या ह्या ६६ व्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचा मी अध्यक्ष झालो आहे. ह्या नगरीचा महिमा काय वर्णावा ? उच्च ध्येयाचा अजिंक्य ध्रुव-तारा नजरेसमोर ठेवणारी ही नगरी, अस्मानातील ऋषींच्या सात ताऱ्यांची कृपादृष्टि जिच्यावर आहे अशी ही नगरी ! ज्यांनी 'आनंदवभुवना'चे भव्य स्वप्न राष्ट्रासमोर ठेवले — ज्यांनी 'शहाणे करून सोडावे सकलजन' ह्या उद्देशाने मूर्खत्वाचीच नव्हे तर पढतमूर्खत्वाचीहि लक्षणे परखडपणे सांगितली; उत्तम-पुरुष-लक्षणे जनतेपुढे ठेवून तिला अखंड सावधानतेचा इशारा दिला; 'यत्न तो देव जाणावा' असा संदेश देऊन दुर्बल दैववाद दूर भिरकावला. फार काय सांगावे - महात्मा गांधींच्याही ३०० वर्षे आधी **'अल्ला निरंजन दोऊ नही रे'** असा सर्वधर्मसमभाव लोकांना शिकविला, आणि साहित्याच्या संदर्भात विशेष म्हणजे -—

*'वाचवें बरवें कवित्व । कवित्वीं रसिकत्व ।*
*रसिकत्वीं परतत्त्व— । स्पर्श जैसा ॥'*

हा विचार देवी सरस्वतीच्या उपासकांसमोर ठेवला, त्या सज्जनगडनिवासी समर्थ रामदासांच्या छायेत वाढलेली ही पुण्यशील नगरी !

जुना इतिहासकाळ राहोंच, आधुनिक काळांत — विशेषत: स्वातंत्र्य-आंदोलन-पर्वात- मोठमोठी नररत्ने ह्या नगरीने आणि तिच्या परिसराने महाराष्ट्राला दिली. सातारा नि सातारा-परिसर ह्यांच्याशी जिव्हाळ्याने संबंधित असलेली सर्व कर्तबगार माणसे मला आज आठवतात. लंडनलाही आपल्या बुद्धिमत्तेने चकित करणारे मुत्सद्दी रंगो बापूजी, महर्षि अण्णासाहेब पटवर्धनांचे पट्ट शिष्य नि क्रांतिकारक भटजी भिडे, साहित्यसम्राट, न. चिं. केळकर, कथाकार ना. ह. आपटे, बाबासाहेब आंबेडकरांचे समग्र चरित्र लिहिणारे चां. भ. खैरमोडे, पाली भाषेचे अभ्यासक मा. शं. मोरे, दलित कवि चोपडे गुरूजी, आप्पासाहेब रणपिसे— नावे तरी किती सांगावीत ? ह्याच

सातारा-नगरीजवळ महात्मा ज्योतिबा फुले ह्यांच्या मूळ वतनाचे गांव आहे, आणि ह्याच नगरीने बाबासाहेब आंबेडकरांच्या बाळपणाचे कांही दिवस पाहिले आहेत !

येथेच १९०५ साली देशभक्त र. पां. ऊर्फ दादासाहेब करंदीकर आणि १९६२ साली काकासाहेब गाडगीळ साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून विराजमान झाले. ह्या पूर्वसूरींच्या पुण्य स्मृतीला, उपस्थित पूर्वाध्यक्षांना आणि माझ्या सर्व गुरूवर्यांना वंदन करून मी माझे विचार व्यक्त करतो.

'माझे विचार व्यक्त करतो' म्हणत असतांनाच ह्यापूर्वी थोर थोर संमेलन - अध्यक्षांचे सद्‌विचार माझ्यासमोर उभे राहतात. कोणी साहित्यांतील 'सविकल्प समाधी'चा विचार मांडला; कोणी 'दलित साहित्या' संबंधी मौलिक विचार मांडले; कोणी श्लील-अश्लीलतेची मूलगामी चर्चा केली; कोणी मराठी भाषेला जीवनात दुय्यम स्थान मिळत असल्याची खंत प्रकट केली, कोणी म्हणाले, 'जो जे वांछील तो ते लिहो ।।' विज्ञाननिष्ठ हिंदुत्वाचे पुरस्कर्ते स्वातंत्र्यवीर सावरकर संमेलनाच्या अध्यक्षपदावरून गर्जले होते - "साहित्यिकांनो ! लेखण्या मोडा नि बंदुका हाती घ्या !"

त्या स्वातंत्र्यसमराच्या कालखंडात— त्या आपत्कालांत आपद्‌धर्म म्हणून— वीर सावरकरांनी दिलेला तो संदेश यथार्थच होता. पण आता लोकशाही स्वराज्यांत ? मी म्हणेन 'साहित्यिकांनो, तुमच्या लेखणीत बंदुकीचे सामर्थ्य येऊं द्या; राष्ट्रोद्धारक ध्येयवादाच्या आकांक्षेने, तळपणाऱ्या भवानी तलवारीचे तेज तुमच्या लेखणीला चढू द्या !'

पण साहित्यिकांनी आपला साहित्य धर्म पाळला नाही, तर अशी धार कशी चढेल ? **राजकारणाच्या दृश्य-अदृश्य मायापाशांनी जर आम्ही साहित्यिक जखडलो गेलो; साहित्य-सृष्टीची सार्वभौमता-स्वायत्तता नि स्वतंत्रता जर आम्ही कळत वा नकळत गहाण ठेवू लागलो, लोकाश्रयापेक्षा राज्याश्रयाच्या हत्तीवरील अंबारीत जर आम्ही साहित्यशारदेला बसवू लागलो, तर 'अमृतातें हि पैजा जिंके' असे बोल तिच्या वीणेंतून कसे उमटतील ?** कै. श्री. म. माटे ह्यांच्या शब्दांत सांगायचं म्हणजे, "आमचे सारे जीवनच राजकारण-ग्रस्त झाले आहे." बहुसंख्य राज्यकर्ते (मग ते कोणत्याहि पक्षाचे असोत) सर्वच क्षेत्रावर आपला 'रिमोट कंट्रोल' ठेवू इच्छितात. म्हणूनच राजकारणाचे साहित्य-संस्कृति-क्षेत्रावरील असांस्कृतिक आक्रमण मूषकदंशाप्रमाणे सहजासहजी लक्षात येत नाही. यासाठींच साहित्यकारांनी ह्याबाबत जागरूक राहण्याची गरज आहे.

पण ही जागरूकता तेव्हाच येईल कीं जेव्हा आम्हां साहित्यिकांना आणि साहित्यप्रेमींना साहित्याचे राष्ट्राच्या जडणघडणीतील अत्युच्चस्थान लक्षांत यईल. साहित्य म्हणजे केवळ फावल्या वेळांतील करमणूक, केवळ शब्दांची क्रीडा, केवळ 'रंडा-गीतानि काव्यानि' एवढीच जर आपली समजूत असेल आणि जर साहित्य संमेलन हा दिल बहेलवण्यासाठी योजलेला तीन दिवसांचा उरूस अशी आपली भावना असेल, तर त्याहून दुर्दैवाची गोष्ट दुसरी नाही !

* * *

राष्ट्राला राजकारण आवश्यक आहे, समाजकारण आवश्यक आहे, अर्थकारण आवश्यक आहे, शस्त्र-सज्जता आवश्यक आहे. पण 'शस्त्रेण रक्षिते राष्ट्रे शास्त्र-चर्चा प्रवर्तते' हे सत्य प्रभावी साहित्यच मनावर ठसविते,

ह्या दुनियेत 'अर्थ एक प्रधान:' हे साहित्यांतून कळते.

'जनी पहावा जनार्दन' अथवा 'इशरते कतरा है दरिया में फना हो जाना' हे समाजकारणाचे मूलमंत्र साहित्याच्याच माध्यमातून समाजमनांत ठसतात ! फार काय सांगावे, **राष्ट्राची प्राणशक्ति म्हणजे त्याची संस्कृति आणि ती निर्मिण्याचे सर्वात प्रभावी साधन म्हणजे साहित्य-संस्कार !**

'नरेच केला हीन किती नर' हे सत्य उपदेशात्मक पद्धतीने अथवा जबरदस्तीने नव्हे तर खूबसूरत कलात्मक पद्धतीने साहित्यच समाजाला सांगते आणि 'वानराचा नर आणि नराचा नारायण' होण्याचे ध्येय समाजापुढे ठेवते !

'ब्रह्मानंदसहोदर' असे ज्याचे वर्णन करता येईल, असा उच्चतर आल्हाद देणे; मानवी दु:खाच्या नि शोकांतिकेच्या चित्रणातूनहि दु:खाचे नि शोकाचे विरेचन करणे; मानवी भावभावनांचे सहस्त्रावधि पापुद्रे उलगडून दाखवून मानवी मन उन्नत-सुसंस्कृत करणे हेच साहित्याचे प्रधान उद्दिष्ट आहे. पण त्यामुळेच आपोआप (उपदेशाच्या वा दरडावणीच्या शब्दांची हाणाहाण न करता, सहजगत्या) - समाज-प्रबोधन होते समाजाला सहजच उमगते की 'रामवत् वर्तितव्यम् न तु रावणादिवत्' (रामाप्रमाणे वागावे, रावणादि उन्मत्ताप्रमाणे नव्हे) ! आपल्याकडे एक आख्यायिका रुढ आहे, आणि ती ही की आधी वाल्मीकीचे रामायण रचले गेले आणि नंतर प्रभु रामचंद्राचे चरित्र घडले ! ह्या 'अनैतिहासिक ऐतिहासिक' आख्यायिकेने साहित्याचे राष्ट्र-उभारणीतील महत्त्वाचे स्थान सूचित केले आहे.

भारताच्या इतिहासातील उन्नतीचे नि अध पतनाचे कालखंड आणि त्या त्या कालखंडातील साहित्य ह्यांचा अभ्यास केला, तर ह लक्षात येईल की हरेक उन्नतीच्या कालखंडाची मशागत साहित्याने केलेली आहे. हे सुप्रसिद्धच आहे की संत साहित्याचे कळस असे श्रीतुकाराम-रामदास जेव्हा देहूच्या भंडारा डोंगरावर नि सज्जनगडावर तळपत होते, तेव्हांच प्रतापगडावर नि रायगडावर शिवरायाच्या कल्याणकारी हिंदवी स्वराज्याचा भगवा झेंडा नि जरिपटका अभिमानाने फडफडू लागला !

साहित्याचे हे महत्व लक्षात घेऊनच एका हिदी कवीने म्हटले आहे.

*'अंधेर है वहाँ जहाँ आदित्य नही है ।*
*मुर्दा है वो देश जहाॅ साहित्य नही है ।।*

* * *

सूर्यकिरणांसमान सहजगत्या प्रबोधनाचा प्रकाश पाडणारे, त्यायोगे समाजाला

सुसंस्कृत करणारे, राष्ट्रवैभवाला पायभूत ठरणारी संस्कृति निर्मिणारे साहित्य, मुक्त वातावरणांतच निर्माण होऊ शकते. यासाठींच साहित्यिकांनी लोकशाही स्वातंत्र्याचे उपासक असणे, अपरिहार्य आहे. ज्वलंत लोकशाही निष्ठेविना, (लोकशाहीला पायाभूत असलेल्या स्वतंत्रता-समता-बंधुता ह्या तत्त्वत्रयीवर निष्ठा असल्याशिवाय) साहित्याच्या विशाल गगनावर होणारे राजकारणग्रस्त मेघांचे आक्रमण लेखकांच्या मनाला बोचणारच नाही. कधीकधी बाल्यावस्थेमधील लोकशाहीतील आजच्या झुंडशाही-गुंडशाही-जथ्थड नोकरशाही- भंपकगिरी (डेमगॉगी) इत्यादी दोषांमुळे वैतागून कित्येक सुशिक्षित महाभाग - लेखकदेखील - वैतागाने म्हणतात - भारतात हुकूमशाही हवी; हिटलरशाही हवी, त्याविना ही बजबजपुरी संपणार नाही ! परंतु अशा प्रतिक्रियेपासून साहित्यिकांनी तरी दूर राहणे जरूरीचे आहे... हुकूमशाहीत अथवा लोकशाहीचा मुखवटा चढविलेल्या सर्वाधिकारशाहीत साहित्य संस्कृतीची निकोप वाढ होऊच शकणार नाही. मी हे आज नव्हे, तर साहित्यसेवेला प्रारंभ केला तेव्हापासून सांगत आलो आहे.

सोव्हिएत रशियांतील स्तालिनयुग ह्या दृष्टीने अत्यंत उद्बोधक आहे. ह्या युगात साहित्यिकांना, 'बुर्ज्वा'' पेटी बुर्ज्वा'' 'देशद्रोही', 'प्रतिक्रांतिकारक' इत्यादी शिव्या देऊन, त्यांच्याविरुद्ध खोटेनाटे आरोप करून त्यांची क्रूर पारध करण्यात आली. येसेनिन् सारख्या भावनाप्रधान कवीला तर इतक्या असह्य मानसिक यातना झाल्या की' त्याने आत्महत्या केली. रशियन क्रांतीने निष्ठेने भाग देऊन हाल-अपेष्टा भोगलेला हा जानपद-कवी ! पण तो आपल्या कलेला राजकारणाची बटीक करण्यास तयार नव्हता. तो म्हणाला होता —

*I give my whole soul to October and May.*
*Only my Loved Lyre I will not give !*

(मी ऑक्टोबर क्रांतीला व मे क्रांतीला माझे सर्वस्व वाहत आहे. मात्र माझ्या कलेची वीणा मी कोणालाही देणार नाही !)

* * *

मित्रांनो ! इतक्या दूरचे नि ८० वर्षापूर्वीचे उदाहरण कशाला हवे ? आपल्या शेजारच्या पाकिस्तानातील साहित्याची हालत काय आहे ? अय्युबखानाच्या कारकिर्दीपासून तो आजच्या नवाज शरीफ - राजवटीपर्यंत, लेखकांच्या लेखण्या राजदंडाच्या दडपणाखाली असल्यामुळे, तेथे साहित्याची खुशबूदार बहुरंगी उद्याने बहरूच शकली नाहीत. गालिब, इक्बाल, जिगर ह्यांच्या तोडीचा एकहि शायर तेथे पैदा होऊ शकला नाही. अय्यूबच्या कारकिर्दीत सर्व साहित्य 'मार्शल लॉ अदब' म्हणून ओळखले जात असे ! आजही तीच लांछनमुद्रा पाकिस्तानी साहित्याच्या भालपट्टावर विराजमान आहे.

फैज अहमद फैजसारख्या थोर निरपराध शायराला शासनाने अटक केली तेव्हा

फैज साहेबांनी विचारले, "का म्हणून मला अटक झाली ? मी तर गप्प आहे. राजद्रोही लिखाण केलेले नाही !"

त्यांना सांगण्यात आले- "पण आपण राजद्रोही लिखाण करण्याची शक्यता आहे. ते करू नये म्हणून !"

फैज अहमंद फैज ह्यांनी जाणले की, 'आपण काही बोललोच नाही, हाच केवळ गुन्हा नाही. तर सरकारच्या बाजूने बोललो नाही हा खरा गुन्हा आहे !' आणि त्यांनी सुंदर शेर लिहिला.

*वो बात, जिसका जिक्र महेफिल में न था ।*
*वही उनके एतराज का बायसे हुआ ।।*

(आम्ही मैफलीत तिच्या समर्थन पर चर्चा केली नाही गप्पच बसलो हेच आमच्या प्रेयसीच्या इतराजीचे कारण बनलें !)

* * *

रसिकहो, आपण म्हणाल "जुन्या रशियांतील हुकूमशाही अथवा शेजारच्या पाकिस्तानातील लष्करशहाग्रस्त नकली लोकशाही ह्यांच्या कथा राहू द्या. आपल्या भारतात काय हालत होती आणि आहे हे सांगा."

सांगतो - भारतात आज जिला हुकूमशाही राजवट म्हणतात अशी राज्यपद्धत अवतीर्ण झालीच नाही. आद्य गणराज्यांनंतर राजेशाही-साम्राज्यशाही आणि नंतर स्वातंत्र्योत्तर काळांत लोकशाहीच येथे आली ! पण लेखणी आणि राजदंड ह्यांचे परस्पर-संबंध कसे असावेत हा सनातन प्रश्न जुन्या राजेशाहीतहि होताच. लेखणी आणि राजदंड ह्यांचे संबंध परस्पर सामंजस्याचे नि स्वातंत्र्ययुक्त सलोख्याचे असावेत; उभयतांनी आपापला स्वाभिमान नि स्वातंत्र्य न सोडता परस्परांची इज्जत राखून, समाजसेवा करावी, ही आदर्श स्थिती !

अशोक, विक्रमादित्य, भोज, शालिवाहन इत्यादि पुण्यश्लोक राजांच्या राजवटीत ह्या आदर्श स्थितीला धक्का पोचलेला दिसत नाही. साहित्य नि साहित्यिक ह्यांचा उपयोग प्रचलित राजकारणाकडे करण्याची विशेष गरजच प्राचीन मध्ययुगीन राजांना वाटली नाही. आमच्या साहित्य-संगीत इत्यादि कला मुख्यत: मंदिराच्या प्रांगणांत लोकांच्या आश्रयाने वाढत होत्या आणि चांगले राज्यकर्ते त्यांचे कोडकौतुक करीत होते. आपल्या दरबारांत गुणीरत्नांचा गौरव करावा, हीच भावना तेव्हा प्रबळ होती. म्हणूनच आपले चरित्र लिहिण्याची फर्माइश विक्रमादित्याने कालिदासाला केली नाही ! तो कविराज रामायण-महाभारतादि ग्रंथांच्या आधारे काव्य-नाटकांच्या कुंजात रमण्यास मोकळा होता ! बुद्ध महाकवि अश्वघोष ह्याच्यावरहि राजसत्तेचे दडपण असल्याचे दिसत नाही.

पण असें असले तरी, राजदंड आणि लेखणी ह्यांचे संबंध नेहमीच परस्पर सामंजस्याचे होते असे नाही. कारण पुण्यश्लोकात ज्यांची गणना व्हावी असे राजे असून असून किती असणार ? राजाविरुद्ध बोलणाऱ्या-लिहिणाऱ्या परखड साहित्यिकांना राजदरबारी बहुश: मज्जावच असे भर्तुहरी कवींचा एक श्लोक आजहि उद्‌बोधक वाटावा असाच आहे. एका दरबारी समारंभाचे आमंत्रण त्याला मिळाले नाही, तेव्हा तो उपरोधाने उद्गारला होता -

*न नटा न विटा न गायका*
*न परद्रोह-निबध्द-बुध्दय: ।*
*नृपमीक्षितुमत्र के वयं*
*स्तनभारानमिता न योषित: ॥*

(आम्ही नट नाही, जरकर्मकुशल विट नाही, राजस्तुती गाणारे गायक नाही, दुसऱ्याचे नुकसान करण्यास टपून बसलेले दुर्जन नाही किंवा स्तनभाराने किंचित नम्र झालेल्या फटाकड्या युवतीहि नाही ! मग आम्हांस राजाचे दर्शन कसे घडावे ?)

'राजा हा श्रीविष्णूचा अंशावतार' ही श्रद्धा असल्यामुळे राजदंडाविरुद्ध लेखणीने बंड पुकारण्याचा प्रश्नच सहसा उद्‌भवत नसे. प्राचीन वा मध्ययुगांत राजेलोकांवर टीकास्त्र सोडण्याचे साहस सहसा कोणी केलेच नाही. दोन-चार अपवाद सांगता येतील. उदाहरणार्थ, साहित्य-संगीतादि कलांचा आश्रयदाता अकबर ह्याचे जे चरित्र बदायुनी ह्याने लिहिले आहे, त्यात अकबरावर नुसती आगपाखड केली आहे. पण अकबराच्या हयातीत तो ग्रंथ बाहेर पडला नाही ! औरंगजेबाचा एक अधिकारी नेमतखान ह्याने आपल्या ग्रंथात औरंगजेब नि त्याचा सेनापती ह्यांची खूप टिंगल उडविली आहे. पण हाही ग्रंथ बाहेर आला तो औरंगजेबाच्या मृत्यूनंतरच !

राजेशाहीत स्तुतिपाठक भाटांची वा दरबारी शायरांची राजरोस नियुक्तीच होत असे. शिवाय, राज-प्रशंसेबद्दल कविजनांना सहज बक्षिसी मिळत असे. कां ? तर एका कविवर्याने राजेलोकांना चक्क इशाराच दिला आहे. (ब्लॅकमेल केले आहे, असे मी म्हणत नाही !) इशारा हा की —

*लंकापते: संकुचितं यशोयत्*
*यत् कीर्तिपात्रं रघुराजपुत्र: ।*
*तत् सर्व एवादिकवे: प्रभाव:*
*न कोपनीया: कवय: क्षितीन्द्रै: ॥*

("रावणाचे यश संकुचित, मलिन आणि श्रीरामचंद्राची कीर्ति मात्र दिगंत नि उज्ज्वल, हे कुणामुळे झाले ? तर केवळ आदिकवी वाल्मीकीच्या करामतीमुळे—

प्रभावामुळे ! म्हणूनच राजेलोकांनी कविजनांचा कोप ओढवून न घेता त्यांना संतुष्ट ठेवावे !")

***

. पण तरीहि एक प्रकारे ती जुनी राजेशाही परवडली. तेव्हा निवडणुकीचे राजकारण नव्हते. राज्यकर्त्यांची "इमेज" लेखणीपेक्षा स्वत:च्या पराक्रमी तलवारीवर अवलंबून असे. हरेक बाबतीत लुडबूड करणारे सर्वंकष सरकार नव्हते.

पण आधुनिक काळांत राजकारण परमेश्वराखालोखाल सर्वव्यापी बनले आहे. सर्वच राजकारण्यांना दर पाच वर्षांनी लोकांना सामोरे जावे लागते. म्हणूनच साहित्यिक-पत्रकार-बुद्धिमंत ह्यांचे तुष्टीकरण जरुरीचे होऊन बसले आहे. सत्तारूढच नव्हे तर सत्ताकांक्षी राजकारणीही हे जाणतात की साहित्यिक पत्रकार आदि बुद्धिजीवींचा वर्ग संख्येने अल्प असला तरी अखेर तोच जनमत घडविण्यास वा बिघडविण्यास कारणीभूत होतो. हा बोलका पत्थर (Vocal class) 'वाचि वीर्य द्विजानाम्' हे जुने सुभाषित आज सार्थ करू शकतो. 'बहुतांशी अंतरे' राजी राखण्यासाठी ह्या अल्पसंख्य नागवीरांना (त्यांची संख्या कितीही टक्के असो. त्यात आतां सर्वच जाति-जमातीतील चळवळ्ये-वळवळ्ये वाचिवीर समाविष्ट आहेत !) संतुष्ट राखणे हा झुंडशाहीवजा लोकशाहींत राजधर्म होणे साहजिक असते. जुन्या काळी राजेशाहीत बोलक्या मृदंगांचे मुखलेपन सरळसरळ होत असे, आता ते अप्रत्यक्ष शिताफीने होते एवढाच काय तो फरक ! ह्यामुळे समतेचे तत्व पायदळी तुडवून साहित्यिकांचा-पत्रकारांचा खास अधिकार नि सवलती भोगणारा वर्ग (Privileged class) तयार होतो आहे. लेखणीची धार बोथट करण्यासाठी राजदंड नाना युक्त्या योजीत आहे. प्राथमिक माध्यमिक शाळांमधील शिक्षक कमी उपयुक्त आहेत काय ? पण त्यांचे उपद्रव-मूल्य फारच कमी. म्हणून त्यांच्यावर राजकारण्यांच्या कृपेचा मेघ फारसा बरसत नाही. परंतु साहित्यिक-पत्रकार-नाटककार इत्यादींना प्लॉट-फ्लॅट-नि पारितोषिकांचे भरगच्च 'जॅकपॉट' मिळतात !

वस्तुत: लोकशाहीत सरकारी साह्य घेणे हा नागरिकांचा हक्क आहे. तो सरकारचा उपकार नव्हे. त्यात मिंधेपणा वाटण्याचे कारण नाही. परंतु, हे साह्य कसे द्यावे आणि कसे घ्यावे ह्याची काही आचारसंहिता असली पाहिजे. सामाजिक न्यायनीती पायदळी न तुडवता, समतेच्या तत्त्वाचा भंग न करता, खुल्या व्यवहाराने खुशाल साह्य घ्यावे-द्यावे, पण **साहित्यिक जर मंत्री-खासदार-आमदार ह्यांच्या वशिल्याने, कृपेच्या कृत्रिम पावसांत ओलेचिंब होत असतील तर त्यांचा ध्येयवादाचा अग्नि विझल्याविना राहणार नाही.**

साहित्याच्या अभिवृद्धीसाठी लोकशाही सरकारांनी आपल्या अर्थसंकल्पात पुरेशी तरतूद केलीच पाहिजे. परंतु भारतात पुरेशी तरतूद होत नाही. साहित्याला पोषक क्षेत्र आहे शिक्षणाचे व ग्रंथालयांचे. पण साहित्याप्रमाणेच ह्याही क्षेत्रांच्या उन्नतीला भारतात अग्रक्रम नाही. शिक्षणावर, ग्रंथप्रसारावर नि साहित्य-संस्कृति कार्यावर पुरेसे द्रव्य

आमच्या केंद्रीय नि राज्यीय सरकारांना उपलब्ध होत नाही. कधी देश गरीब असल्याची सबब, तर कधी तीव्र आर्थिक टंचाईची नि महागाईची सबब !

ठीक आहे. देश जर गरीब आहे तर किमानपक्षी ह्या क्षेत्रांना गरजेच्या नि गुणवत्तेच्या निकषावर (आणि राजकीय अथवा नोकरशाही वशिलेबाजी विना) अर्थ-सहाय्य व्हावयास हवे ना ? सध्याच्या शासकीय पद्धतीनुसार तसे होणे शक्य नाही. आमच्या साहित्य-नवाझांचे ह्या मूलभूत गोष्टीकडे हवे तेवढे लक्ष नाही ! लक्ष देतील तरी कसे ? पद्मश्री-पद्मभूषण पदव्यांचे, पारितोषिकांचे वशीकरण-चूर्ण शासनाकडून फवारण्यात येते. आणि मग ह्या पदव्यांसाठी, पारितोषिकासाठी, सरकारी समित्यांवर वर्णी लावण्यासाठी आमचे अनेक साहित्यशौण्ड मंत्री-महालांची वा मंत्रालयाच्या सहाव्या मजल्याची वारी करतात. मंत्रालय हेच त्यांचे पंढरपूर, आमदारनिवास हीच आळंदी ! सरकारी वशीकरण- चूर्ण थोडे जरी चाखले तरी अनेक साहित्यिकांना, लेखकांना ह्या ना त्या सरकारी समितीवर असल्याविना चैनच पडत नाही. मग 'सेन्सॉरबोर्ड' असूंच नये. 'प्री-सेन्सॉरशिप असू नये', ह्या भूमिकेला जाहीर पाठिंबा देणारे महाभागही "पूर्वपरीक्षण-मंडळा"च्या बोहरल्यावर वशिल्याची बाशिंगे घुडघ्याला बांधून उतावीळ नवऱ्यागत चढतात ! सांस्कृतिक नि साहित्यिक संस्थांना अनुदाने खिरापतीप्रमाणे वाटली जातात. त्यामुळे सांस्कृतिक वनीकरणाऐवजी सरकारी एरंडीकरणच ज्यास्त होते. सरकारी कृपेमुळे "**एरण्डोऽपि द्रुमायते !**" मग ते एरंड ईक्षुदंडाच्याच नव्हे तर साहित्य-कल्पवृक्षाच्या दिमाखांत वावरू लागतात ! राजकीय 'उल्हास' नगरांतील ही बनावट नाणी साहित्य-सृष्टीतील खऱ्या कलदार नाण्यांना हद्दपार करतात !

सर्वसामान्य लोकांचा अनुनय करण्यासाठी अनेक 'सांस्कृतिक' समारोह आधुनिक सरकारे करीत असतात. पण त्यांत साहित्य-संस्कृतीचे फारसे आरोहण होत नाही ! "अपना उत्सव" सारख्या उरूसांत कोट्यावधि रुपये उधळले जातात. पण त्यायोगे भरीव साहित्य संस्कृतीचा विकास कितपत होतो ?

भारतांतील सरकारे कोणत्याहि पक्षाची असोत, त्यांची प्रवृत्ति ठोस साहित्य-संस्कृतिकार्यापेक्षा दिखाऊ प्रसिद्धीबाज उत्सवांकडे असते. गावोगांव साहित्य-अभ्यास-मंडळे चालविणे, साहित्याच्या प्राज्ञ-विशारद परीक्षांचे वर्ग घेणे, आमच्या बहुसंख्य साहित्यसेवकांना परवडणारे नाही आणि अशा अबोल सेवेला सढळ मदत करणे सरकारांना (मग ते कोणत्याही पक्षाचे असो) रुचणारे नाही कारण अशा कामांना प्रसिद्धीचा झगमगाट लाभत नाही.

मित्रहो, 'शासनसंस्था नि साहित्य' हा माझ्या व्याख्यानाचा विषय आहे. मी अराजकवादी नाही. मला वाटते की लोकांनी निवडून दिलेले कोणतेहि सरकार ह हरेक नागरिकाने पक्ष-पंथ विसरून आपलेच मानले पाहिजे. पण म्हणूनच ते निर्दोष होण्यासाठीच त्याचे कठोर परीक्षण आवश्यक ठरते. हा अधिकार प्राप्त होण्यासाठी पत्रकार-साहित्यिक-

बुद्धिमंत म्हणविणाऱ्याने स्वत:ची काही आचारसंहिता ठरविली पाहिजे, असेहि माझे मत आहे.

आजच्या विषयावर बोलण्याचा माझा अधिकार काय, हे स्पष्ट करण्यासाठी मी, आत्मश्लाघेचा दोष पत्करून, ह्या पवित्र व्यासपीठावरून जाहीर करू इच्छितो की मी स्वत·पुरती एक आचार-संहिता तरुणपणीच ठरवली असून, ती आजवर प्रामाणिकपणे पाळण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ, सध्याच्या प्रथेनुसार मला जे जे सरकारी पुरस्कारांचे वा पारितोषिकांचे द्रव्य मिळाले, ते ते मी 'इंद न मम' म्हणून सार्वजनिक सांस्कृतिक संस्थांनाच देऊन टाकले आहे. मी ४२ च्या चळवळीत स्वयंस्फूर्तीने कॉलेज सोडून भाग घेतल्यामुळे, 'स्वातंत्र्य सैनिक' ह्या पदवीस (आणि पेन्शनलाही) पात्र होतो. पण त्याचा मोह मी टाळला आहे. संपादक-पत्रकार-नाटककार-कलावंत म्हणून मला सरकारी सदनिका सहज मिळाली असती, पण मी तिचाही मोह कटाक्षाने टाळला आहे 'खासदार-पेन्शन-बिला'ला मी जाहीर विरोध केला आहे. 'पूर्व परिनिरीक्षण मंडळा'चे प्रमुखपद मला शासनाने देऊ केले असता, तेहि मी सविनय नाकारले आहे. सत्तारूढाना कदाचित् न आवडणारा माझ्या ललाटीचा अरुण-तिलक मी आजवर कधीही लपविला नाही की पुसलेलाहि नाही. इतके नव्हे तर माझ्या सकल्पनेतील भारतीय धारणांपायी मी स्वजनांनाच नव्हे तर प्रियजनांना देखील दुखविले आहे !

* * *

असा मी आजच्या विषयाच्या संदर्भात हे सांगू इच्छितो की आपल्या महाराष्ट्र शासनाने आजवर सांस्कृतिक क्षेत्रासाठी जे जे चांगले केले त्याचे मला पूर्णत: स्मरण आहे. उदाहरणार्थ, कै. यशवंतराव चव्हाण ह्यांनी नाटकांवरील करमणूक-कर एका फटक्यात उडविला, हे कोण विसरू शकेल ? महाराष्ट्र शासनाने तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी ह्यांच्या नेतृत्वाखाली जे 'विश्वकोशा'चे कार्य जवळजवळ पूर्ण केले आहे, ते भूषणावह नाही, असे कोण म्हणेल ? तुकाराम महाराजांची गाथा, ज्ञानेश्वरी इत्यादि संतसाहित्य अल्प किंमतीत जनतेला उपलब्ध करून देणे; भाषा संचालनातर्फे पारिभाषिक शब्दकोष तयार करणे; उर्दू मराठी कोशाची नि भारतीय संस्कृति कोशाची निर्मिती, 'साहित्य संस्कृति मंडळा'तर्फे झालेले कांही दुर्मिळ ग्रंथाचे प्रकाशन, समग्र गडकरी वाङ्मयाचे प्रकाशन, महात्मा फुले गौरव ग्रंथ प्रकाशन, अन्य कोणत्याही राज्याला हेवा वाटावा अशा राज्यनाट्य स्पर्धा, अण्णासाहेब किर्लोस्कर - श्रीपाद कृष्ण कोल्हटकर - भाषाप्रभु गडकरी इत्यादि साहित्य-श्रेष्ठांचे नि बालगंधर्वासारख्या कलाकारांचे जन्मशताब्दि महोत्सव अशी अनेक कामे महाराष्ट्र शासनाच्या जमेच्या बाजूस आहेतच. आजच्या सुधाकरराव नाईक शासनाने जी साहित्य-संस्कृतिविषयक आस्था प्रकट केली, ती तर आपल्या ताज्या स्मरणांत आहे. तरीहि मला म्हणावेसे वाटते की स्वायत साहित्य-व्यवहार करणाऱ्या समर्थ साहित्य-संस्था निर्मिण्यांत आपले महाराष्ट्र शासनहि सफल

झालेले नाही. कारण **'That is the best Government, which governs the least'** हा दृष्टीकोण त्याला प्राप्त झालेला नाही. महाराष्ट्र कला-अकादमी काढू पाहणाऱ्या आपल्या शासनाने हे पक्के लक्षांत घ्यावे की लोकशाहींत साहित्य-संस्कृतीबाबतचे त्याचे खरे कर्तव्य समर्थ सांस्कृतिक संस्थाना फक्त अनेक सुविधांची सोय **(Infra structure)** उपलब्ध करून देणे हेच असते. म्हणूनच १९५४ साली दिल्ली येथे 'ललितकला अकादमी'चे उद्‌घाटन करतांना तत्कालीन शिक्षणमंत्री नामदार अबुल कलम आझाद म्हणाले होते :-

"कलेच्या संवर्धनांत सरकारने रस घ्यायला हवा यांत शंकाच नाही. परंतु कलेचा फुलोरा संपूर्णपणे, फुलविण्याची किमया बिनसरकारी कलासक्त संस्थांकडूनच होऊ शकते, हे सत्य विसरून चालणार नाही. 'ललित 'कला अकादमी' जरी सरकारने प्रायोजित केलेली असली तरी ती एक स्वायत्त संस्था म्हणूनच कार्य करील....आजच्या उद्‌घाटनानंतर सरकारचे काम संपले आहे....."

आणि साहित्य अकादमीच्या उद्‌घाटन प्रसंगी डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन (जे तेव्हां तिचे पहिले उपाध्यक्ष होते) म्हणाले होते -

"ही अकादमी पूर्णत: स्वायत्त राहणे आवश्यक आहे तिच्या कारभारांत नि उपक्रमांत सरकारने हस्तक्षेप करणे उचित ठरणार नाही."

पंडित जवाहरलाल नेहरूंनी देखील वेळोवेळी ह्या स्वायत्ततेच्या मुद्यावर भर दिला होता.

* * *

परंतु असे असूनही ही स्वायत्तता खऱ्या अर्थाने आजतागायत अमलांत येऊच शकली नाही. जनसामान्यांत राहोच, साहित्यिकांच्या विश्वातहि तिला अपेक्षित प्रतिष्ठेची उंची गाठता आली नाही. तिच्या कारभाराविषयी तक्रारींचे बदसूर अनेकदा उठत राहिले. म्हणून तर १९६४ साली डॉ. एच्. जे. भाभा ह्यांच्या अध्यक्षतेखालील समितीकडून; १९७०-७२ मध्ये न्यायमूर्ति जी. डी. खोसला समितीकडून आणि अलीकडेच १९९० साली श्री. पी. एन. हक्सर ह्यांच्या अध्यक्षतेखालील समितीकडून ह्या अकादम्याच्या कारभाराची पाहणी करण्याचा प्रसंग आला.

गत ४० वर्षात कोट्यवधी रुपये खर्च झाले, तरी ह्या केंद्रीय अकादम्या नि भोपाळचे भारत भवन (विभा मिश्रा-कारंथ प्रकरणाने भारतभर गाजलेले), गोव्याची कला-अकादमी इत्यादी सरकार - निर्मित संस्था अपेक्षित उद्दिष्टे का गांठू शकल्या नाहीत ? त्यांचा साहित्य-संस्कृती-जगतावर ठसा कां उमटू शकला नाही ? ह्याचा अभ्यास महाराष्ट्र शासनाने केला पाहिजे.

गोमंतकांतील 'शासन-पुरस्कृत' कला-अकादमीपाशी हेवा करण्याजोगती सुंदर वास्तु आहे; पण तिचा प्रभाव नाही. त्याच गोव्यांत श्री. शशिकांत नार्वेकर, प्रा.

गोपाळराव मयेकर इत्यादींनी प्राय: लोकाश्रयावर चाळविलेली 'गोमंतक मराठी अकादमी' पहा - ती कशी चैतन्यशाली बनली आहे; तेथील जनमानसांत रुजली आहे.

आमच्या अकादम्यांना सरकारने दिलेली स्वायत्तता कागदी घोड्यांवरून सिद्ध होऊ शकते. पण प्रत्यक्ष कार्यावरून नाही. त्या एका बाजूने सरकार-प्रासादिक साहित्यिकांच्या वा कलाकारांच्या गरबाजीने, तर दुसऱ्या बाजूने राज्यकर्त्यांशी संगनमत असलेल्या नोकरशाहीने ग्रस्त नि त्रस्त झाल्या आहेत !

गत महिन्यात हक्सर-समितीच्या अहवालांतील शिफारशीवरून जे वादळ साहित्य-वर्तुळांत उठले, त्याला अनुलक्षून खुशवंतसिंग एका लेखात म्हणतात, **"अकादम्यांना स्वायत्तता असावी ह्याच मताचा मी आहे. पण त्यांना चांगली. प्रामाणिक माणसे मिळाली पाहिजेत-अशी बाणेदार माणसे की जी लाळघोटेपणाला आणि चाटुस्तुतीला बळी पडणारी नाहीत !"** परंतु, दुर्दैवाने आमच्या अकादम्या चालविणारी कैक माणसे-कट कारस्थानांना बळी पडणारी आणि स्वत:चा मतलब जपणारी आहेत. म्हणूनच (थोडे अपवाद वगळतां) दुय्यम दर्जाच्या साहित्यालाच आजवर अकादमीचे आशीर्वाद लाभले आहेत. साहित्य अकादमीने प्रकाशित केलेली बहुतांश पुस्तके एकतर गोदामांत धूळ खात पडली आहेत अथवा ग्रंथालयांच्या बोकांडी मारली गेली आहेत !

आपल्या ग्रंथांना पुरस्कार मिळावा म्हणून खटपट करणारे-'कॅनव्हासिंग' करणारे-कैक महाभाग अकादमीच्या प्रांगणांत याचकाप्रमाणे भटकतांना दिसतात. अकादमीच्या 'पंजाबी भाषा समिती' वर मी होतो, तेव्हाची गोष्ट. तेव्हा तर एका लेखिकेने चक्क डॉ. राधाकृष्णन ह्यांचा आशीर्वाद मिळविला आणि अखेर आपल्या चोपड्याला पुरस्कार पटकावला ! प्रस्तुत समितीवरील सर्वच सदस्य पुरस्कार-विजेते होते. आणि त्यांच्यात जणू अलिखित करारच झाला होता की, 'इस साल मैं, अगले साल तुम !...'

मी स्वत: 'साहित्य अकादमी' (दिल्ली) चा सदस्य होतो. आणि म्हणून अशा गैर कारभाराच्या रंजक (आणि उद्वेगजनकही) कथा मीहि सांगू शकेन. पण तरीही 'आमच्या अकादम्या शासन नियंत्रित असाव्यात', असे घातक मत मी कधीच प्रतिपादन करणार नाही. कारण —

*जरी संस्कृतिक संस्था दोषयुक्त*
*तरी त्या असाव्यात स्वायत्त*
*काही केल्या शासन-नियंत्रित । असूंच नये ।।*

अशी माझी ठाम भूमिका आहे. कारण, त्या शासन-नियंत्रित झाल्या तर त्यांच्यातील दोष कमी न होता, उलट वाढीसच लागतील. म्हणूनच हक्सर समितीने मोठ्या परिश्रमाने तयार केलेला अहवाल एरव्ही कितीही चांगला असला आणि त्यांतील

कांही शिफारसी कितीही योग्य असल्या तरी, अध्यक्षाच्या निवडीबाबत ह्या समितीने केलेली शिफारस स्वायत्ततेच्या तत्त्वाला सुरुंग लावणारी असल्याने, तिला विरोध करणे क्रमप्राप्त आहे.

हक्सर-समितीच्या शिफारसीनुसार "शासनाने नेमलेले दोन सदस्य व विद्यमान कार्यकारिणीचा एक सदस्य यांच्या सल्लागार मंडळाने सुचविलेल्या नांवातूनच राष्ट्रपतींनी नव्या अध्यक्षाची निवड करावी. आणि अकादमीच्या वित्त-समितीचे सदस्य सचिव म्हणून, केंद्रीय मनुष्यबल विकास-मंत्रालयाच्या वित्तीय सल्लागाराची नियुक्ती व्हावी" असे आहे.

अशा शिफारसी अमलांत आणण्याबाबतच्या सरकारी पत्राला तीव्र विरोध दर्शविणारा खलिता भारतातील २८ नामवंत लेखकांनी पंतप्रधानांकडे पाठविला. साहित्य अकादमीचे अध्यक्ष वीरेन्द्रकुमार भट्टाचार्य ह्यांनीही स्वायत्तवादी लेखकांचा तीव्र संताप पंतप्रधानांच्या कानी घातला 'केंद्रीय मनुष्यबल विकास नि सांस्कृतिक कार्य' खात्याने अकादमीच्या घटनेंत ज्या सुधारणा (हक्सर समितीच्या शिफारसीनुसार) सुचविल्या, त्या अकादमीच्या कार्यकारिणीने साफ फेटाळून लावल्या. हे योग्यच झाले.

कारण **अकादमींच्या कारभारांतील व घटनेतील दोष दूर करण्याचा अधिकार ह्या 'स्वायत्त' संस्थेच्या सर्वसाधारण मंडळाचा आहे.** सरकारने त्यांत हस्तक्षेप करण्याचे कारण नाही. अकादमीच्या कार्यकारिणीवरील केंद्रसरकारचे प्रतिनिधी जी. वेंकटरमणी ह्यांचे उद्गार तर अशोभनीय अन् अपमानास्पदच म्हटले पाहिजेत. वेंकटरमणी गत २७ डिसेंबरला बंगलोरच्या कार्यकारिणीत उद्गारले होते : "अकादमी स्वायत्त असली तरी, ती शेवटी सरकारने स्थापन केलेली आहे. तिचे कांही ही भले-बुरे करण्याचा अधिकार सरकारला आहेच. तेव्हा सचिवाच्या सूचनेनुसार अकादमीच्या सर्व-साधारण मंडळाची पुनर्रचना त्वरित केली जावी आणि मगच नवीन अध्यक्षांची निवड व्हावी."

* * *

हे दिल्लीचे प्रकरण मी येथे जरा विस्ताराने मांडले, ह्याचे कारण महाराष्ट्रांत आता 'कला-अकादमी' येऊ घातली आहे. आणि १ मे १९९२ रोजी महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली (रजिस्टर केलेली) 'राज्य मराठी विकास संस्था' सध्या तरी दुग्धपान न लाभलेली नऊ महिन्याची बालिका आहे ! ह्या नवजात संस्थेला अद्यापि कांहीच अर्थपुरवठा झालेला नाही आणि तिच्या घटनेनुसार तिच्या अध्यक्षपदी मुख्यमंत्रीच विराजमान होणार आहेत, असे कळते ! म्हणूनच पुढच्यास ठेंच मागचा शहाणा, ह्या न्यायाने, दिल्लीच्या ठेंचावरून महाराष्ट्राने शहाणपण शिकावे अशी माझी विनंती आहे. कोणतीहि अकादमी अथवा साहित्य-संस्कृति विषयक संस्था उभारत असनांना, एक मुख्य तत्त्व पाळलेंच पाहिजे आणि ते म्हणजे त्यावर सरकार-नियुक्त सदस्य अगदी

आवश्यक तेवढेच असावेत. फार तर ५-१० टक्के. बाकी सारे सदस्य ज्यांनी किमान २० वर्षे भरीव कार्य केले आहे, अशा साहित्य वा साहित्यसंबंधित संस्थांचे असावेत ते शक्यतेवढे मान्यवर साहित्यिक असावेत (साहित्य क्षेत्रातील खटपटे लटपटे नकोत !) दिल्लीच्या साहित्य अकादमीची सध्याची सदस्य-संख्या अपुरी, म्हणून साहित्य-क्षेत्राचे पुरेसे प्रतिनिधित्व करणारी नाही.

दुसरी महत्त्वाची गोष्ट ही की तीन-तीन वर्षांच्या दोन टर्म्सहून (म्हणजे ६ वर्षांहून) अधिक काळ कोणीहि सदस्य पदावर राहतां कामा नये.

सर्व-साधारण मंडळानेच अध्यक्ष, उपाध्यक्ष, कार्यवाह इत्यादीसह कार्यकारिणीची निवड तीन वर्षांसाठी करणे, हीच सर्वत्र अवलंबिली जाणारी सर्वमान्य पद्धत डावलण्यांत येऊ नये.

* * *

साहित्य-अकादमी इत्यादि सांस्कृतिक संस्था गटबाजी, वशिलेबाजी, परस्पर हेवेदावे-ह्यांनी बुजबुजतात आणि लोकांच्या अनादरास पात्र होतात ह्याचे मुख्य कारण म्हणजे घसघशीत आर्थिक पुरस्कार नि पारितोषिके ! तसे पाहूं जातां, ह्या पुरस्कार-पारितोषिकांच्या खिरापतीने अशी काय मोठी प्रतिष्ठा ग्रंथांना प्राप्त होते ? जेव्हां समर्थ लेखकांच्या ग्रंथांना प्रतिष्ठा लाभतच नव्हती काय ? रसिकमान्यता हीच खरी प्रतिष्ठा ! ती लाभल्यामुळे कसदार दमदार ग्रंथांच्या आवृत्त्यावर आवृत्त्या, (कोणताही अकादमी पुरस्कार न मिळताही) निघाल्या नाहीत काय ? निघत नाहीत काय ? **चांगल्या गुणशाली ग्रंथाला पुरस्कारांच्या कुबड्यांची जरूरीच नसते; सरकारी 'जयपूर फूट' आवश्यक नसतो ! असे जर आहे, तर हे अकादम्यांच्या वा सरकारच्या पुरस्कारांचे जालिम जंजाळ तोडून टाकणेच योग्य नाही काय ? आमच्या साहित्य सृष्टीत वृथा जळजळ (हार्टबर्निंग) निर्माण करणारे; थेट मंत्र्याकडून निवड-समितीवर दडपण आणण्यास कारणीभूत होणारे, 'ग्रंथोपजीवींना लाचार बनविणारे हे पुरस्काराचे खूळ नि कलहांचे मूळ नष्ट करणेच इष्ट !'**

साहित्य-अकादमीच्या पुरस्कारावरून वेळोवेळी उठलेली वितंडदाची वादळे, हा एक 'पी.एच्.डी.' प्रबंध होऊ शकेल. ह्या कांही घटना पाहा-

★ १९८३ साली 'काजळमाया' ह्या आपल्या पुस्तकाला मिळालेला पुरस्कार बिचाऱ्या जी. ए. कुलकर्णींना परत करावा लागला. कारण त्या पुस्तकावर दिलेले प्रकाशन-वर्ष बरोबर नव्हते !

★ व्ही. आर. नारला ह्यांच्या तेलगू नाटकाला (सीता जोस्यम्) पुरस्कार होता. पण तो श्री. नारलांनी संतापाने परत केला. कां ? तर ह्याच पुस्तकावर खुद्द अकादमीच्या 'इंडियन लिटरेचर' मध्ये कडक टीका प्रसिद्ध झाली !

★ देशबंधू डोग्रा ह्यांच्या कादंबरीला मिळालेला पुरस्कार, त्यांनी पुरस्कार-

वितरण-समारंभातच नाकारला आणि तेथेच लेक्चर झोडले. 'हा पुरस्कार मला पूर्वीच मिळायला हवा होता!' असे म्हणून त्यांनी शेरा मारला की, "गतवर्षी पुरस्कार लाभलेली कांही पुस्तके त्या लायकीची नव्हती!"

★ १९८३ साली सुरेश जोशी ह्यांनी त्यांना मिळालेला पुरस्कार नाकारतांना म्हटले, "किरकोळ निबंधांचा संग्रह असलेले माझे पुस्तक मलाच पुरस्कार-योग्य वाटत नाही! ज्यांच्यात कांही दम उरलेला नाही अशा 'स्पेन्टप् फोर्स' लेखकांनाच बहुश: पुरस्कार देण्यांत येतात!"

★ पण सर्वात कमाल केली 'चन्ना दी रात' ह्या पजाबी पुस्तकाने. त्याचे लेखक हरिंदरसिंग मेहबूब ह्यांना १९९१ चा अकादमी पुरस्कार मिळाला! त्याविरुद्ध खूप वादळ उठले. कारण त्यांत इंदिरा गांधींच्या मारेकऱ्यांचे उदात्तीकरण केलेले होते! ह्याहून वैतागजनक गोष्ट ही की निवडसमितीच्या एक सदस्या श्रीमती अमृता प्रीतम ह्यांनी 'आपण हे पुस्तक मुळी वाचलेलेच नव्हते' असा खुलासा नंतर केला होता!

★ साहित्य अकादमीवर लत्ताप्रहार करणाऱ्या ग्रंथांच्या गळ्यांत ॲवॉर्डची 'स्वयंवर'-माला कशी पडली, हा किस्सा मराठी वाचकांच्या स्मरणांत असेलच! ह्याच संदर्भात कांही वर्षापूर्वी महाराष्ट्र-शासन-पुरस्कारांच्या आधुनिक रमण्यांत 'जनांचा प्रवाहो चालला' ह्या विनय हर्डीकरांच्या पुस्तकाची कशी परवड झाली होती, हेहि वाचकांना सहज आठवेल!

दिल्लीची बात जाऊं द्या. महाराष्ट्र-शासनाने तरी हे पक्के लक्षांत ठेवावे की बहुश: पुरस्कारांच्या खिरापतींनी साहित्याची उंची वाढत नाही, तर दुय्यम दर्जाच्या लेखकांचा माज मात्र वाढूं शकतो. मग आपण खरोखरच 'ग्रेट' आहोत ह्या भ्रमांत हे साहित्य मतंगज बेगुमान वागूं लागतात! संयमाच्या लक्षण-रेषाहि वेळप्रसंगी ओलांडतात!

पुरस्कार नि पारितोषिक ह्यावर खर्च होणारे लक्षावधि रुपये जर साहित्य-संस्थांच्या विधायक कार्य-प्रकल्पांना दिले तर? ग्रंथ-प्रसार-कार्य करणाऱ्या संस्थांना दिले तर? तर ते साहित्याच्या दृष्टीने अधिक हितावह होईल.

**किमानपक्षी, ग्रंथ-प्रसारार्थ एक गोष्ट महाराष्ट्रांत सहज करतां येईल, आणि ती म्हणजे गौरव पुरस्काराबाबत 'तामीळनाडू'चे अनुकरण करणे.** आपल्याकडे लक्षावधि रुपयांचे पुरस्कार साहित्यिकांना रोकड स्वरूपांत देण्यांत येतात. त्या ऐवजी 'तामीळनाडूं'त गौरव-प्राप्त साहित्यिकांची पुस्तके विकत घेऊन, ती ग्रंथालयांना विनामूल्य वाटली जातात. आणि हेच योग्य नव्हे काय? - साहित्यिकाला आपल्या ग्रंथाहून दिलप्यार असे काय आहे? 'तामीळनाडू' पद्धतीप्रमाणे लेखकाचा गुणगौरव तर होतोच; शिवाय त्याच्या खरीदलेल्या ग्रंथाची, रीतसर 'रॉयल्टी' त्याला मिळतेच.

***

आमच्या साहित्यिक नि सांस्कृतिक संस्थात आज खरे महत्व कोणाला? कैक

ठिकाणी सरकारी अनुदान नि धनवत्तर प्रायोजकांचे दान, सहज खेचून आणू शकणाऱ्या लटपट्यांना- 'मनी स्पिनर्स'ना! आमची ही गत, तर शासनाची प्रवृत्ती आहे सर्व क्षेत्रांच्या किल्ल्यांचा जुडगा आपल्याच कमरेला लावण्याची! ह्यामुळेच शासन अपरिहार्यपणे नोकरशाही विळख्यात अडकते. मग शासनापुढे ठेवलेल्या विधायक सांस्कृतिक योजना वर्षानुवर्षे केवळ 'अंडर कन्सिडरेशन' (विचाराधीन) होऊन पडून राहतात.

नोकरशाहीच्या विळख्यांत पडलेल्या भल्या योजनांचे कसे मातेरे होते, ह्याचे अलीकडील उदाहरण म्हणजे "खडूफळा योजना"! ४-५ धूर्त प्रकाशकांनी केवळ वशिल्याच्या बळावर आपले उखळ पांढरे करण्यासाठीच खडूसपणाचा खडू कसा वापरला आणि योजनेचा त्रिफळा कसा उडविला, ते आता जगजाहीर झाले आहे. (ह्या प्रकाराची सी-बी-आय-मार्फत चौकशी चालू आहे.) सद्‌हेतुमूलक चांगल्या योजनांचे असे मातेरे व्हायचेच; कारण ह्या योजना अखेर दरबारी धूर्तांच्याच हाती जाव्यात, अशीच आमची शासकीय यंत्रणा आहे.

उपरोक्त 'ऑपरेशन ब्लॅकबोर्ड' मुळे मराठी प्रकाशन व्यवसाय बदनाम झाला यांत शंकाच नाही. पण रोज वाढत जाणारी जबरदस्त महागाई नि कमिशनबाजी ह्यामुळे तो गुमनाम होईल की काय, असे भय वाटू लागले आहे. प्रकाशकांतील गब्बरसिंग - सधन प्रकाशक - काही तरी तग धरू शकतील. पण लहानग्या प्रकाशकांचे काय? कागदाच्या किंमती गेल्या ३-४ वर्षांत दुपटीहून अधिक वाढल्या, शाईचे दर गेल्या वर्षांत दीडपट वाढले. छपाईचे दर वाढले. बॅकाच्या व्याजाचे दर वाढले. वाहतूक दरातही वाढ झाली. ह्या सगळ्यांचा अपरिहार्य परिणाम म्हणून पुस्तकांच्या किंमती वाढल्या. ४-५ वर्षांपूर्वी पुस्तकनिर्मितीच्या मूळ खर्चाच्या तिप्पट एवढीच पुस्तकाची दर्शनी किंमत ठेवली जात असे. आता ती ५-६ पट ठेवली जाते, असे जाणकार सांगतात. ह्या भरमसाट किंमतीमुळे पुस्तक विक्रीवर घोर परिणाम झाला असल्यास नवल कसले?

परंतु असे असले तरी बडे प्रकाशक आपली कमिशन-निष्ठा आणि बडे लेखक आपली 'रॉयल्टी'-निष्ठा सोडावयास तयार नाहीत! आपले ईमान प्रथमतः वाचकांशी बांधले गेले आहे, हे लक्षात घेऊन लेखक-प्रकाशक-विक्रेते ह्या सर्वांनी आपापल्या स्वार्थाला यथाप्रमाण आळा घातल्यास ग्रंथांच्या किंमती खाली येऊन, साहित्य-प्रसाराला गती मिळू शकेल. पुस्तक-प्रकाशन हा धंदा आहे खरा; पण तो धर्मही आहे ह्याचा विसर, पडतां कामा नये.

तथापि एवढे पुरेसे नाही. शासनाने प्रकाशकांच्या दीर्घकालीन मागण्या मनावर घेतल्या पाहिजेत. पुस्तकांचा साठा सुरक्षित ठेवण्यासाठी अद्ययावत् गोदामे बांधून ती प्रकाशकांना रास्त भाड्याने दिली पाहिजेत. पुस्तकांसाठी वापरल्या जाणाऱ्या कागदावरील अबकारी कराला माफी दिली पाहिजे. केवळ ह्या दोन गोष्टी शासनाने केल्या, तरी

पुस्तकांच्या किंमती खाली येतील, ग्राहकवर्ग वाढेल.

मित्रांनो ! विद्यार्थ्यांच्या अभ्यासावर, नागरिकांच्या वाचनावर, उद्बोधक व्याख्यानांच्या श्रोतृवर्गाच्या उपस्थितीवर टी. व्ही. उर्फ दूरदर्शनने कसा प्रतिकूल परिणाम केला आहे, हे आपण जाणतांच. झी टीव्ही-स्टार टीव्हीच्या वाढत्या आक्रमणाच्या आजच्या जमान्यांत वाचक वर्ग ग्रंथांना पाठमोरा होऊं द्यायचा नसेल तर ? तर जागोजागी आकर्षक अद्ययावत् ग्रंथालये उभी करणे हाच उपाय आहे; ही ग्रंथालयेच लेखक वाचकांमधील दुवा ठरणार आहेत, ह्याचे भान सर्व साहित्यप्रेमींनी ठेविले पाहिजे.

"गांव तेथे ग्रंथालय' 'शाळा तेथे ग्रंथालय' हे ध्येय नजरेसमोर ठेवून, साहित्यिकांनी ग्रंथालय-चळवळ चालविली पाहिजे. पण ह्या चळवळीत तन-मन-धनपूर्वक काम करणारे साहित्य-चूडामणी फारच थोडे आहेत. कारण हे कष्टांचे जिकीरीचे काम आहे आणि त्यात प्रसिद्धीचा झगझगाट नाही ! नेमक्या ह्याच कारणांमुळे, साहित्यप्रसाराला पोषक असलेल्या ग्रंथालय चळवळीकडे सरकारांचे दुर्लक्ष होते. आपल्या "राप्य ग्रंथालय परिषदे"च्या दीनदुबळ्या अवस्थेकडे पहा, म्हणजे माझ्या विधानाची सत्यता पटेल.

सरकारने एक 'ग्रंथ-निवड-समिती' नेमलेली असते. तिचे काम ग्रंथालय-योग्य पुस्तकांची निवड करणे. परंतु हे काम निर्दोष होईलच कसे ? कारण ह्या निवड समितीत ग्रंथ-तज्ज्ञांपेक्षा वशिल्याचा तट्टांचाच समावेश अधिक असतो. परिणामी रटाळ किंवा बिनदर्जेदार अशी २५ ते ३० टक्के पुस्तके गावोगावीच्या ग्रंथालयात घुसतात ! पण आमचे साहित्यिक ह्याबाबत फारसे जागरूक नाहीत. "हे ग्रंथ-निवड-कार्य, स्वायत्त ग्रंथालय-परिषदेच्या तज्ज्ञ- समितीकडे सोपविले पाहिजे", अशी मागणी साहित्यिकांनी एकमुखाने आग्रहाने करावयास हवी.

खरे पुसाल तर, "राप्य ग्रंथालय परिषदे"ची रचनाच अत्यंत सदोष आहे. कारण तिच्यात ग्रंथालयाचे प्रतिनिधित्व करणाऱ्या लोकनियुक्त प्रतिनिधीचे प्रमाण सुमारे १/४ आहे. बाकी सदस्य आहेत सरकारी वा निमसरकारी अर्थात् सरकार-नियुक्त. शासनाचा १९६७ चा ग्रंथालय-कायदा अनेक दोष-पीडित आहे. संयुक्त-महाराष्ट्र-पूर्व काळात मराठवाड्यात ग्रंथालयांचा अर्धभार उचलण्यासाठी ग्रंथालय-कर (Cess) होता आणि विदर्भात खेडोपाडी ग्रंथ पोचविण्यासाठी '४ क' योजना होती. या दोन्ही गोष्टींचा अंतर्भाव ग्रंथालय कायद्यात करण्याचे आश्वासन तत्कालीन राज्यकर्त्यांनी दिले. पण आजतागायत हे आश्वासन सफल झाले नाही. आज महाराष्ट्रांत सुमारे ५ हजार ग्रंथालये आहेत आणि फिरत्या ग्रंथालय योजनेखाली ११४० केन्द्रें आहेत. पण त्यांना होणारे सरकारी साह्य शेळीच्या शेपटाप्रमाणे आहे. — ना लज्जा-रक्षणास ना माशा वारण्यास उपयोगी ! ग्राम-ग्रंथालयास वर्षाला एक हजार रुपये अनुदान मिळते. मग सांगा, त्यांत दर्जेदार ग्रंथांची खरेदी कशी नि कितपत व्हावी ? 'शाळा तेथे ग्रंथालय' ही मागणी कैक वर्षांपासून ग्रंथालय कार्यकर्ते करताहेत. पण त्यानुसार

अद्यापि शालेय नियमांत (Education Code) सुधारणा झालेली नाही.

ग्रंथालयात काम करणाऱ्या सेवकांची हालत तर फार शोचनीय आहे. अनेक विनंती-अर्ज झाले, मोर्चेही निघाले. पण ग्रंथालय कर्मचाऱ्यांसाठी वेतनश्रेणी आकारास आलीच नाही. काही ग्रंथालयात तर ग्रंथालयसेवकांना मिळणारे वेतन हमाली करणाऱ्या मजुरांहून कमी आहे !

ही दु:स्थिती दूर व्हावी म्हणून शासनाच्या ग्रंथालयखात्याच्या (डायरेक्टोरेट ऑफ लायब्ररीज) विस्तार आला पाहिजे आणि त्याची कार्यक्षमताही वाढली पाहिजे; १९६७ च्या ग्रंथालय कायद्यात आमूलाग्र सुधारणा झाली पाहिजे. ह्यासाठी शासनाचे दरवाजे ठोठावणें हे साहित्यिक नि ग्रंथ-प्रकाशक ह्यांचेही कर्तव्य आहे.

मित्रहो, प्रगत देशांतील शहरांत १ किलोमीटर परिसरात एक, तर खेड्यात ५ कि. मीं. परिसरांत एक ग्रंथालय असते. हे उद्दिष्ट गाठण्यासाठी ग्रंथालय-चळवळ किती प्रबळ व्हायला पाहिजे, ह्याचा विचार व्हावा. केवळ सरकारी झारीतील तुटपुंज्या अनुदान-जलाच्या वृष्टीने हे उद्दिष्ट साध्य होणारे नाही. साहित्यिक नि साहित्यप्रेमी ह्यांनी तन-मन-धनपूर्वक प्रयत्न केल्याविना ग्रंथालयांचे आजचे दैन्य फिटणार नाही.

ग्रंथप्रसारच खुरटलेला असेल तर साहित्य-प्रसारहि खुरटलेलाच होणार. आज आपल्या महाराष्ट्रांतील ग्रंथ-विक्री समाधानकारक नाही. भल्या भल्या लेखकांचे ग्रंथ कसे नि कितपत खपतात ? सुमारे १००० ते १२०० प्रतीची जी आवृत्ती निघते, ती बहुत: रेगाळतच खपते. त्यांतील ६००-७०० प्रती वाचनालये (प्रामुख्याने सरकारी अनुदानांतूनच) विकत घेतात. ग्रंथ व्यक्तिश: विकत घेऊन वाचणारे वाचक फार थोडे. वाचकांची संख्याच जर थोडी, तर प्रकाशक ग्रंथ-प्रकाशनाची हिंमत कितपत धरणार ? ह्या क्षेत्रांत आपण केरळ नि बंगाल ह्यांच्या मानाने खूप मागे आहोत.

जोपर्यंत साहित्य लोकाश्रयी होत नाही, आणि राजाश्रयावर अवलंबून राहते, तोपर्यंत श्रीशारदेची उद्याने बहरणार कशी ?

* * *

म्हणूनच ग्रंथ-प्रसार नि ग्रंथ-विक्री ह्यांना वाचकांचा पाठिंबा लाभावा ह्या उद्देशाने सुरू असलेली दिनकर गांगल प्रवर्तित 'ग्रंथाली'ची वाचक चळवळ, 'मॅजेस्टिक प्रकाशनाच्या साहित्यिक गप्पा', 'ढवळे ग्रंथ-यात्रा', 'नॅशनल-बुक ट्रस्ट', 'माग्रस' (माझा ग्रंथ संग्रह) इत्यादीची ग्रंथ-प्रदर्शने, रमेश मंत्री प्रवर्तित 'साहित्य जत्रा' इत्यादी उपक्रम अभिनंदनीय वाटतात. ह्या संदर्भात विदर्भ साहित्यसंघाची ग्रंथ सहवास-चळवळ मला विशेष उल्लेखनीय वाटते. श्री. चंद्रकांत कुलकर्णी व सौ. कुंदा केळापुरे ह्यांनी प्रवर्तिलेला हा उपक्रम ग्रंथ-विक्रीचा व्यवसाय करीत नाही, तर ग्रंथाचा परिचय वाचकांना करून देतो. प्रा. गंगाधर गाडगीळ ह्यांनी सक्रिय कौतुक केलेल्या ह्या 'ग्रंथ-सहवास'- उपक्रमाचे स्वरूप "ग्रंथ तुमच्या घरात; ग्रंथ तुमच्या भेटीला" असे आहे. तो आता फ्लॅटपासून

झोपडपट्टीपर्यंत पोहोचला आहे. गावांतील वेगवेगळ्या विभागातील 'ग्रंथ-प्रेमी' घरे केंद्रस्थानी कल्पून, आजवर सुमारे ५० हजार वाचकांशी ह्या योजनेच्या द्वारा संपर्क साधला गेला आहे.

हे सर्व स्तुत्य आहे खरे. पण ग्रंथ-प्रकाशन नि ग्रंथ-प्रसार ह्या बाबतींत समर्थ नि स्वायत्त होण्यासाठी केरळीय साहित्यिकांनी जी आघाडी मारली आहे, तिथपर्यंत आम्ही कां पोहचू शकलो नाही, ह्याचा विचार झाला पाहिजे. महाराष्ट्राच्या राजकीय-आर्थिक क्षेत्रांत ठायी ठायी 'सहकार महर्षि' उद्‌भवले आहेत; 'विना सहकार नही उद्धार' अशा गर्जना घुमत आहेत ! पण आमच्या साहित्य क्षेत्रांत सहकार-तत्वाचा बिलकुल प्रभाव नाही. आपल्या ग्रंथ प्रकाशनासाठी भल्या भल्या साहित्य-सिंहांनाही गब्बर प्रकाशकाशी अथवा 'राज्य साहित्य संस्कृति मंडळा'तील गब्रूंशी संधान बांधावे लागते. परंतु केरळातील साहित्यिकांनी सहकारी तत्वावर ग्रंथ-प्रकाशनाचा आणि ग्रंथ-वितरणाचा डोळे दिपवील असा प्रयोग, यशस्वी करून दाखविला आहे. १९४५ साली कोट्टायम येथे, अवघे १२ सभासद आणि १२० रुपये भागभांडवल, ह्यांच्या आधारावर 'साहित्य प्रवर्तक सहकरणसंघम्' ही साहित्यिकांची सहकारी संस्था स्थापन झाली. आज ह्या संस्थेचे सभासद सुमारे ५०० आणि भाग भांडवल सुमारे १० लक्ष आहे ! (ह्यांत सरकारी भांडवल फक्त अडीच अक्ष रुपये) ह्या संस्थेची स्वतःची मालमत्ता सुमारे रु. ४५ लक्षांची असून, ग्रंथ-विक्री दरसाल साठ लक्ष रुपयांची होते. प्रतिवर्षी सुमारे हजार हस्तलिखिते संस्थेकडे येतात. त्यातून निवड करून सुमारे ३६० पुस्तके दरवर्षी प्रकाशित होतात- आणि तीहि अत्यंत रास्त किमतींत !

लेखणीची स्वायत्तता नि तेजस्विता अबाधित राखण्याची जर आम्हांस तळमळ असेल, तर आम्ही असे स्वावलंबनाचे मार्ग चोखाळले पाहिजेत.

आणि साहित्य-संस्कृतीच्या क्षेत्रांत जर राजकारणी हेतूने गलेलट्ठ पुरस्कारांच्या खुराकावर सरकार जमा-साहित्य-नवाझ निर्माण न करता, आमच्या शासनाला साहित्याचा निकोप उत्कर्ष साधावयाचा असेल, तर त्याने अशा- 'साहित्य प्रवर्तक सहकरण संघम्' सारख्या समर्थ संस्था उभारण्यास हातभार लावला पाहिजे-आणि तोहि निखळ साहित्य प्रेमाने !

* * *

मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी, शासनाच्या पाठ्यपुस्तकांत नि अभ्यासक्रमांत परिवर्तन होण्याची जरूरी आहे. ह्यासाठी साहित्य महामंडळाने पुढाकार घेऊन, नामवंत साहित्यिकांच्या सहकार्याने एक नमुनेदार (Model) व्यापक योजना तयार करून ती शासनाला विचारार्थ सादर करणे जरूरी आहे. आजच्या अभ्यासक्रमांत व पाठ्य पुस्तकांच्या अभिजात साहित्याचे पुरेसे प्रतिबिंब पडलेले आढळत नाही. कै. आचार्य अत्रे नि वि. द. घाटे ह्यांनी संपादिलेल्या पाठ्य पुस्तकांच्या तोडीची पाठ्य-पुस्तके आजच्या

विद्यार्थ्यांना उपलब्ध नाहीत. कारण त्यात कैक वशिल्यांच्या पाठांची घुसखोरी झाली आहे !

आधुनिक वैज्ञानिक संस्कृतीच्या संवर्धनासाठी नि व्यवहारातील यशस्वितेसाठी इंग्रजी भाषा-शिक्षणाची सोय जशी सर्व इयत्तात उपलब्ध आहे, त्याचप्रमाणे सर्व देश-भाषांची जननी आणि परंपरागत भारतीय संस्कृतीचा मूलाधार असलेली जी संस्कृत भाषा, तिच्याही शिक्षणाची सोय उपलब्ध व्हायला हवी. इंग्रजी भाषा आजच्या ज्ञान-विज्ञानाच्या 'वाघिणीचे दूध' देत असेल, तर संस्कृत भाषा ही भारताच्या परंपरागत ज्ञान-विज्ञान-संस्कृतीचे सिंहिणीचे दूध देण्यास समर्थ आहे ! ह्या संदर्भात संस्कृत भाषेबाबत केंद्र शासनाने जी नवीन शैक्षणिक नीती स्वीकारली आहे, ती योग्यच आहे. त्या नीतीतील संस्कृतविषयक पुढील उल्लेख माननीय आहे-

"Considering the speecial importance of Sanskrut to the growth and development of Indian Languages and the unique contribution to the cultural unitiy of the country, facilities for its teaching at tho school and univercity stages should be offered on a more Liberal scale."

समाधानाची गोष्टी ही की ह्या धोरणाचा मान सध्याच्या महाराष्ट्र शासनाने एकंदरीत राखला आहे. इतकेच नव्हे तर "अभ्यासक्रमांत अभिजात भाषांच्या शिक्षणाची सोय असावी, पण सक्ती नसावी", ह्या म. म. दत्तो वामन पोतदारांनी सांगितलेल्या सूत्राचा अवलंब करून संस्कृत-पाली-अर्धमागधी, फारसी, अरेबिक या अभिजात भाषांना ऐच्छिक स्थान दिले आहे, हे ठीकच आहे.

विशेषत: नागपूर येथे "कवि-कुलगुरू कालिदास संस्कृत विश्वविद्यालय" स्थापन करण्याचा जो ऐतिहासिक निर्णय शासनाने अलीकडेच घेतला आहे, तो अभिनंदनास पात्र आहे. पण आतांपर्यंत इ. ८ ते १० असा तीन वर्षाचा असलेला संस्कृतचा अभ्यासक्रम यापुढे केवळ इ. ९ व १० वी असा दोनच वर्षात उरकण्याचे धोरण हितावह नाही. त्याचा पुनर्विचार झाला पाहिजे.

* * *

येथवर लेखणीच्या पावित्र्याची नि तेजस्वितेची जबाबदारी ज्यांच्यावर आहे ते माझे साहित्यिक बांधव आणि राजदंडाच्या पावित्र्याचे उत्तरदायित्व जिच्यावर आहे ती लोकशाही शासनसंस्था ह्यांना अनेक सूचना मी आपुलकीच्या कळवळ्याने केल्या. ह्या सर्व सूचना सर्वांनाच पटतील असे नाही. पण 'यद्रोचते तद् ग्राहयम् । यन्न रोचते तत् त्याज्यम्' एवढीच माझी विनंती आहे.

साहित्यक्षेत्राची स्वायत्तता, ग्रंथ-निर्मिती, ग्रंथ प्रसार, पाठ्यपुस्तके, अभ्यासक्रम इत्यादी बाबत काही भरीव घडवून आणण्याची जबाबदारी प्रामुख्याने आम्हा साहित्यिकांची नि साहित्यप्रेमी रसिकांची आहे. त्या सर्वांची अभेद्य एकजूट होणे ही आजच्या घडीची आद्य गरज आहे. आम्ही एकजुटीने आणि आग्रहाने महाराष्ट्र शासनाला तसेच केंद्रशासनाला

सांगू इच्छितो की, "साहित्य महामंडळाच्या झेंड्याखाली ह्या पहा सर्व साहित्य-संबधित संस्था एकजूटीने उभ्या आहेत ! त्या एकच मागणे मांडत आहेत आणि ते हे की राष्ट्राची शानच नव्हे तर जान असलेल्या साहित्याचा वृद्धीसाठी आपण अर्थ-सहाय्याबाबत कर्णासमान उदार व्हा, पण सर्व साहित्यविषयक व्यवहाराची सूत्रे आमच्या हाती सोपविण्यासाठी **'यथेच्छसि तथा कुरू'**- म्हणणाऱ्या श्रीकृष्णाची लोकशाही वृत्ति धारण करा" !

हे घडून आणण्यासाठी साहित्य-संस्थांची केवळ एकजूटच पुरेशी नाही, तर वाटेल ते कष्ट सोसण्यासाठी सिद्ध असलेली तेजस्वी ध्येयवादिताही आवश्यक आहे. झटपट प्रसिद्धि नि चटपट पैसा ह्यांना चटावलेल्या पोटार्थी लेखणी-ढकल्यांचे हे काम नव्हे. 'साहित्य-शारदेची सेवा हीच, हिंदमातेची सेवा' मानणाऱ्या, शूर शारदा-पुत्राचे हे काम आहे ! यासाठीच **'सोने रूपे आम्हां मृत्तिकेसमान'** असे म्हणणाऱ्या महान संतकवींची परंपरा आमची पाठराखण करो ! मराठी भाषेचा आद्यकवी 'रुख्मिणी-स्वयंवर' कर्ता नरेंद्र ह्याने हजारो मोहरांचे आमिष ठोकरून राजाला स्पष्टपणे सुनावले होते की आम्ही जर द्रव्यलोभापायी आमचे काव्य विकले तर 'आमुचिया कविकुला बोलु लागेल.' ही नरेंद्र कवीची निर्लोभिता आमची पाठीराखी होवो !

दक्षिण कोंकणचे महान् विरक्त कवि सोहिरोबा आंबिये ह्यांनी महादजी शिंदे ह्यांच्यासारख्या शूर ग्वाल्हेर-नरेशाला तोंडावर सांगितले होते की, "तुमच्या कविता प्रासादिक नाहीत" आणि जेव्हा दिलदार शिंद्यांनी त्यांना हजारो रुपयांचा नजराणां नि वतनं देऊ केले तेव्हा सोहिरोबा उद्गारले होते—

*सोना-चांदी हमे न चाहिये, अलख-भुवन के वासी ।*
*महल-मुलुख सब मिट्टी-बराबर हम गुरूनाम-उपासी*

सोहिराबांचा हा बाणेदारपणा आमची साथ करो !-

असे झाले तरच सर्व प्रकारच्या साहित्याची उपेक्षा थांबेल आणि छत्रपती शिवराय, लोकमान्य टिळक, महात्मा फुले, गोपाळ गणेश आगरकर, वीर सावरकर, बाबासाहेब आंबेडकर इत्यादि नररत्नांच्या ह्या महाराष्ट्रात-

*"साहित्य-सोनियाच्या खाणी । उघडवी देशियेचिया क्षोणीं ।*
*विवेक-वल्लीची लावणी । हो देई सैंघ ।।"*

ही ज्ञानेश्वरांची प्रार्थना सफळ होईल !

□□□

# पणजी : १९९४

# राम शेवाळकर

---

मित्रहो !

गोमंतकाच्या या निसर्गसुंदर यक्षभूमीत भरणाऱ्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी आपण माझी एकमताने निवड केली, याबद्दलच्या सादर कृतज्ञतेने माझे मन भरून आले आहे. निवडणुकीतील रणधुमाळीचा त्याग करून आपण या निवडीने सांस्कृतिक क्षेत्रातील एका निर्मल व निकोप प्रथेचे पर्व सुरू केले आहे असे मी मानतो. लोकशाहीचे मूल्य स्वीकारल्यानंतरच्या काळात असंख्यांमधून एखाद्याची निवड करण्यासाठी निवडणुकीचाच मार्ग स्वीकारणे अटळ असते. अर्थात कोणत्याही काळामध्ये बावनकशी गुणवत्तेचा निर्णय निवडणुकीच्या द्वारा होऊ शकत नाही, हे उघड आहे. गुणवत्तेचा प्रश्न तेवढासा अग्रक्रमाचा नसलेल्या कर्तृत्वाच्या व जबाबदारीच्या क्षेत्रात निवडणुकीचेच तत्त्व स्वीकारण्याशिवाय गत्यंतर नसते. तो मार्ग अभिजनांना अप्रिय वाटला, तरी बहुजनांना पथ्यकर ठरत असतो. समूहाचे निर्णय त्याच अटळ अनिष्टाच्या साहाय्याने घेणे त्यामुळेच क्रमप्राप्त ठरते. सुसंस्कृतांच्या जगात या अटळ अनिष्टाची नखे बोथट करण्याचे प्रयत्न अर्थातच अपेक्षित असतात. त्यातूनच सांस्कृतिक विश्वातील प्रदूषण कमी व्हायला मदत होऊ शकेल.

साहित्यसंस्थातील व मतदारसंघांतील सामंजस्य माझ्यासारख्याच्या बाबतीत प्रगट व्हावे, याचे अनेकांप्रमाणे मलाही कोडे पडले आहे. साहित्यक्षेत्राची सर्वांगाने वाढ व्हावी, कोणत्याही अभिनिवेशाच्या आहारी न जाता गुणवत्तेची बूज राखण्याची प्रवृत्ती वाढावी, कुठेही उगवलेल्या सृजनांच्या अंकुरांना फोफावण्यासाठी पोषक असे वातावरण निर्माण व्हावे, साहित्यव्यवहार निकोप पद्धतीने चालावा, यासाठी निष्ठेने व तळमळीने कार्य करणाऱ्या य:कश्चित कार्यकर्त्यालाही गुणवंतांच्या हक्काचा हा सर्वोच्च सन्मान मिळू शकतो, हे आपण माझ्या निवडीने सिद्ध केले आहे. त्यामुळे सांस्कृतिक क्षेत्रातील सुरेख स्वरसंगम चालू राहण्यासाठी कळकळीने मरमर कष्ट करणाऱ्या इतर ज्ञात-अज्ञात कार्यकर्त्यांचीही उमेद वाढेल, हीही फलश्रुती लहान नाही.

या पाचूच्या भूमीत भरणारे हे तिसरे साहित्य संमेलन आहे. तीस ते चौतीस वर्षांच्या अंतराने ही संमेलने भरत आलेली आहेत. श्री. वामन मल्हार जोशी व कवींद्र

कुसुमाग्रज यांच्यासारखे थोर साहित्यमहर्षी यांनी यापूर्वी भूषविलेल्या या सर्वश्रेष्ठ पदावर आरूढ होताना माझे मन ओशाळून जाणे स्वाभाविकच आहे. साहित्यनिर्मिती व चिंतन या क्षेत्रातील त्या दोघांचीही तपश्चर्या लक्षात घेतल्यावर कुणाचीही छाती दडपून जावी. त्या तुलनेत आपले लघुत्व जाणवून माझी अवस्था कुचंबून जाणे अटळ आहे.

व्याख्यानासाठी पहिल्यांदा गोव्यात आलो, त्याला आज वीस वर्षे सहज उलटून गेली असतील. आल्या आल्याच मी गोव्याच्या प्रेमात पडलो होतो. तो अंमल कलत्या वयातही ओसरलेला नाही. गोव्याबद्दलचे पहिले आकर्षण माझ्या मनात कविवर्य बोरकरांच्या कवितेने उत्पन्न केले. इथली हिरवीगार सृष्टी, उभय बाजूंनी गर्द वनराईची प्रसन्न मानवंदना स्वीकारीत अदबीने चालणाऱ्या पायवाटा, वृक्षबहुल डोगर, फेसाळते समुद्रकिनारे, आपापले मांगल्य सांभाळून ठेवणारी देवळे व माणकूरच्या आंब्याप्रमाणे स्वभावात व वागण्यात गोडवा असणारी माणसे, हे विलोभनीय जग कारे-बोरकर-रामाणी या कविमित्रांनी पहिल्यांदा परिचित करून दिले. श्री. महादेवशास्त्री जोशी, लक्ष्मणराव सरदेसाई, बा. द. सातोस्कर, सां. घ. कंटक यांच्या साहित्याने ही ओळख दृढावण्यात महत्त्वाचे योगदान केले. धर्मानंद कोसंबी व डॉ. पिसुर्लेकर यांच्यामुळे ही ओळख अधिक गाढ झाली. लयभास्कर खाप्रूजी पर्वतकर, सूरश्री केशरबाई केरकर, पं. दीनानाथ, पं. जितेंद्र अभिषेकी, मंगेशकर भावंडे, पेडणेकर, कारेकर या थोर कलावंतांनी व गानतपस्व्यांनी गोव्याबद्दलचे माझे गूढ आकर्षण वाढवलेच होते.

हे सगळे पूर्वसंचित घेऊन मी पहिल्यांदा गोव्याला आलो. माझ्या वाङ्मयीन ओळखीच्या गोव्याचे वास्तवातल्या गोव्याशी कुठे नाते जुळते काय ते शोधू लागलो. या सर्व सरस्वतिपुत्रांनी माझ्या मनात रंगवलेल्या गोवाविषयक स्वप्नापेक्षा प्रत्यक्षातल्या गोव्याचे लावण्य अधिक लाघवी आहे, हे मला उत्तरोत्तर प्रतीत होत गेले. असामान्य प्रतिभावंतांनाही चकवा देऊन गोव्याचे सर्वांगीण सौंदर्य आम्हा परस्थ रसिकांसाठी केवळ दशांगुळे नव्हे, तर अंगुळांनी शिल्लक उरते. हा प्रत्यय येथील सृष्टिसौंदर्यापेक्षाही उन्मादक ठरला.

दीर्घकाळ परकीय राजवटीत राहूनही गोव्याने आपला मराठीपणा पतिव्रतेच्या शीलाइतका जपून ठेवला, याचेही महाराष्ट्राप्रमाणेच मलाही मोहत होते. स्वतःच्या राजवटीत व स्वभाषेला अधिकृत पट्टाभिषेक होऊनही महाराष्ट्रातील नागर कुटुंबात अवमानित होऊन रुसून बसलेली मराठी गोमतकीय कुटुंबात बाकी हसत खेळत राहिली, गेली सहाशे वर्षे महाराष्ट्राशी असलेल्या जिव्हाळ्याच्या ऋणानुबंधाशी कोणत्याही परिस्थितीत इमान राखण्याचा गोव्याने कटाक्ष ठेवला, त्याचेच हे मधुर फलित आहे.

सुदैवाने गोव्याच्या मराठीपणाला गेल्या सातशे वर्षांच्या इतिहासाची परंपरा आहे. इ. स. १३०० मध्ये खांडोळे येथे, इ.स १३०२ मध्ये वेळूसला व इ. स. १३१३ मध्ये बांदोड्याला सापडलेले तिन्ही शिलालेख मराठीत असावेत हे कशाचे

लक्षण आहे ? भागवताच्या दशमस्कंधावर टीका लिहिणारा कृष्णदास श्यामा पंधराव्या शतकापासूनचे मराठी लेखनाचे वळण व आवड अधोरेखित करण्यास पुरेसा आहे. फादर स्टिफन्सच्या ख्रिस्तपुराणातील-

*जैसी पुस्पामाजी पुस्प मोगरी*
*की परिमळामाझी कस्तुरी*
*तैसी भासामाजी भासा साजरी*
*मराठीआ ।*

अशी प्रशंसा गोमांतकाच्या मराठीमयतेतूनच उगवली होती, हे निर्विवाद. "अंतरीचा ज्ञानदिवा मालवू नको रे"अशी आर्त काकुळत करणारे सोहिरोबा आंबिये, तसेच महेश्वरशास्त्री सुखटणकर, कृष्णभट बांदकर, श्रीरामचंद्र करंडे, दादा वैद्य, शांबाराव व यशवंतराव सरदेसाई, द.व्यं. पै, श्री.शणै गोंयबाब, प्रा. प्रियोळकर, गो. ना. माडगावकर, वि. स. सुखटणकर, पु. मं. लाड, मो. ग. रांगणेकर ही मराठी सारस्वतकारांची उज्ज्वल परंपराही गोव्याच्या पारदर्शक मराठीशीलतेची साक्ष द्यायला पुरेशी आहे. गोव्यामध्ये वर्षभरात होणारी असंख्य नाटके मराठी रंगभूमीने व नाट्यसंगीताने या गंधर्व भूमीला कसे वेड लावले आहे, याची नादमधुर कबूली देते. महाराष्ट्राला गोव्याबद्दल ममत्व आहे व गोव्याला महाराष्ट्राची ओढ आहे. गोव्याच्या सांस्कृतिक धमन्यांमधून मराठीचेच रक्त सळसळत असते.

पारतंत्र्याच्या काळात राजभाषा नसतानाही मराठी भाषेबद्दलचे प्रेम येथील रहिवाश्यांच्या मनात काठोकाठ भरले होते. स्वराज्याच्या वातावरणात स्वभाषेच्या सर्वांगीण वाढीला विपुल वाव असतो, पण पारतंत्र्याच्या काळात तिच्याबद्दलचा प्रेमभाव व अभिमान कडवा होत असतो. महाराष्ट्रातही मराठीवर अशी अनेक गंडांतरे आलीत. अनेक राजवटी आल्या आणि गेल्या. मराठीने तत्कालीन राजभाषेशी गनिमीकाव्याने संगनमत करून आपले अस्तित्व टिकविले. या कामरूपिणीने राजभाषेचा विश्वास संपादून पण स्वत्व न सोडता आपला कस वाढवला, जोमही वाढविला-

*"अडवतील जरी देव तरी*
*झगडू त्यांच्याशी निकरी"*

हा बाणा जिने प्रत्यक्ष देवभाषेचे वर्चस्व झुगारण्यात प्रगट केला, तिला इतर हंगामी राजवटींची भीती बाळगण्याचे काहीच नव्हते. संस्कृत, अरबी, फारसी, इंग्रजी, पोर्तुगीज, उर्दू या सर्व भाषांचे सासुरवास तिला सहन करावे लागले. त्या त्या वेळी हेतुपूर्तीसाठी तिने तात्पुरत्या काही तडजोडी पत्करल्या. पण त्यातून मुक्त झाल्यावर परधार्जिणेपणाची कात टाकून दिली व स्वतःची मूळची झगमगणारी कांती प्रगट केली.

स्वराज्यात स्वभाषेला राजभाषेचा पट्टाभिषेक होणे त्या भाषेच्या सर्वांगीण फुलण्यासाठी आवश्यक असते. स्वभाषेच्या आग्रहाचा लढा हा मूलतः विझत चाललेल्या स्वाभिमानाच्या प्रज्वलनाचा लढा असतो. त्या त्या भाषेच्या गर्भात त्या विशिष्ट संस्कृतीची बीजे विद्यमान असतात. भाषेला अवकळा येण्याने ती संस्कृतीही काजळून जाण्याची काळजी असते. याचे भान दुर्दैवाने इंग्रजीचे जिरेटोप डोक्यात घालण्याची हौस असणाऱ्यांच्या डोक्यात अद्याप आले नाही.

त्याहीपेक्षा दुर्दैवाची गोष्ट म्हणजे मध्याच्या मराठीच्या दीनवाण्या स्थितीला परकीय राज्यकर्ते जबाबदार नसून खुद्द या मायभाषेची लेकरेच जबाबदार आहेत. नजीकच्या ऱ्हस्व स्वार्थाचा मोह पडून त्यांनी आपल्याच घरात मालकिणीला मोलकरीण बनविले आहे. कवी विनायकांच्या शब्दात-

*कारटी करंटी जिथे*
*निपजली भुते*
*मातृशोणिते*
*स्वत:ला लाली*
*आणाया धावली*

अशी सध्या या 'हतभगिनी' मराठीची अवस्था आहे. आपण स्वत:च स्वत:वर लादून घेतलेल्या या आत्मघातकी भाषिक पारतंत्र्यातून मुक्तता होण्यासाठी ज्ञानेश्वर, शिवाजी व विष्णुशास्त्री या तिघांचेही स्मरण आपल्याला निश्चितच स्फुरण देईल. आजच्याहीपेक्षा किती तरी प्रतिकूल परिस्थितीत त्यांनी मराठी भाषेचे सत्त्व प्राणपणाने जपले व निष्कलंक राखण्यात यश मिळविले. स्वभाषेबद्दलचा न्यूनगंड, तिच्या अभिव्यक्ति-सामर्थ्यावरचा अविश्वास आणि विशेषत: परधार्जिणेपणा या त्रिदोषामुळे आपण या महत्त्वाच्या प्रश्नांकडे दुर्लक्ष करीत आहोत. महाराष्ट्रनिर्मितीच्या वेळी मराठी राजभाषापदावर झालेली स्थापना, त्यानंतर साजरे केलेले राजभाषावर्ष, त्यानंतर झालेली मराठी जागतिक परिषद, त्यातून निघालेली उच्चाधिकार समिती व तिचे फलित असलेली मराठी विकास परिषद-या क्रमाने महाराष्ट्रात शासकीय पातळीवरून मराठीच्या प्रतिष्ठापनेचा प्रवास चालू आहे. या प्रवासात आता तेहतीस वर्षे निघून गेली आहेत. महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले, त्यावेळी जन्माला आलेल्या मुलाला या तेहतीस वर्षात मायभाषेचे महत्व पटविण्यात शासनाला व पालकांनाही यश मिळू शकले नाही. कारण मराठी भाषा हा विषय आपल्या भौतिक भरभराटीच्या मोहिमेमध्ये आपल्याला कधीच गांभीर्याचा वाटला नाही. पालकांच्या बाजूने स्वाभिमान व शासनाच्या बाजूने राजकीय इच्छाशक्ती यांच्याबद्दलच्या वाढत्या दुष्काळाची झळ विनाकारणच बिचाऱ्या मायभाषेला भोवते आहे.

१९६४ मध्ये गोव्याला जे पंचेचाळिसावे साहित्य संमेलन झाले, त्याच्या

अध्यक्षपदावरून कवींद्र कुसुमाग्रजांनी नेमकी हीच व्यथा पोटतिडकीने मांडली होती. तीस वर्षांनी मला पुन्हा तीच तक्रार करावी लागावी, याचा अर्थ अडीच तपांमध्ये वातावरणात म्हणण्याजोगा फारसा फरक पडलेला नाही, हे उघड आहे. हे मराठीचे दुर्दैव म्हणावे की मराठी भाषिकांचे औदासिन्य ?

जिथे मराठी भाषेची ही कथा तिथे तिची जन्मदात्री असलेल्या संस्कृत भाषेबद्दल काय बोलावे ? संस्कृतचे स्तन्य पिऊनच मराठी कांतिमान झाली. संस्कृतभाषा, भाषाशास्त्र, व्याकरण, साहित्य, साहित्यशास्त्र, रंगभूमी, नाट्यविचार यांनी मराठी भाषेला व वाङ्मयाला ऊर्जेचा व शक्तीचा पुरवठा केला. नव्या काळात संस्कृत ही पूर्वग्रहाचा विषय झाल्यामुळे तिच्याकडे दुर्लक्ष करणे शहाण्यासुरत्यांनासुद्धा कर्तव्यबुद्धीचे वाटले. त्यामुळे आपली केवढी वैचारिक व सांस्कृतिक हानी होईल, हेही विचारात घ्यावेनासे वाटू लागले. संस्कृत हे मराठीच्या माहेरचे मोलाचे स्त्रीधन आहे. मराठीच्या तेजासाठी व वैभवासाठी तिचा आधार नेहमीच उपयोगाचा ठरतो आहे, एवढेच नव्हे तर ठरत आला व पुढेही ठरेल.

संस्कृतला राजाश्रय नसला तरी, ती आजपर्यंत केवळ लोकाश्रयावरच जिवंत राहिली आहे व लोकाश्रयावरच ती यापुढेही जगेल.

राजभाषेचा हक्क मान्य करण्याच्या बाबतीत असह्य चालढकल होण्याचा प्रश्न विचारात घेतल्यावर राजभाषा प्रतिष्ठित झालेल्या मायदेशातील मातृभाषेची अवस्था विचारात घेणे निकडीचे आहे. महाराष्ट्र राज्याच्या स्थापनेबरोबरच मराठी राजभाषेची घोषणा करण्यात आली, तरी न्यायालयीन कारभार, प्रशासकीय कारभार व इतर मुलकी कारभार मराठीमध्ये चालत असल्याचा सुखद अनुभव अद्यापही फारसा येत नाही. अजूनही आपण आपल्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांवर परस्परांशीसुद्धा परक्यांच्या मुखानेच बोलण्यात फुशारकी मिरवीत आहोत.

इंग्रजी ही आपली पन्नास वर्षांपूर्वीची राजभाषा होती, जवळ जवळ दीडशे वर्षे तिने आपल्यावर राज्य केले. एके काळची ती आंतरराष्ट्रीय व्यवहाराचीसुद्धा खिडकी होती. विविध देशांतील ज्ञानाचे, संस्कृतीचे व साहित्याचे वारे या खिडकीमधूनच आमच्या घरात शिरकाव करू शकत होते. उपजीविकेसाठी आम्ही आमच्या तत्कालीन धन्याची भाषा स्वीकारली यात काही चुकले नाही; पण धनी पाठ फिरवून निघून गेल्याला अर्धशतक उलटत आले, तरीही आपण त्यांची भाषा सोडायला तयार नाही ही चूक अक्षम्य आहे. राजवट बदलली, की निशाणाबरोबरच भाषाही बदलायला हवी. पण निशाण गेले, तरी भाषा मागे रेंगाळत राहिली. उलट इथे तिचा स्वगृहाइतकाच जम बसलेला आहे. स्वातंत्र्यातील आपले हे भाषिक परावलंबन अतिशय लाजिरवाणे आहे. पारतंत्र्याची आपली चटक उणावली नाही, याचे ते दुर्दैवी द्योतक आहे.

आपले मनोगत, आपल्या अंतरीचे गूज, प्रेमादि नाजुक भावना व्यक्त करण्याएवढा

आम्हाला स्वभाषेबद्दल विश्वास वाटत नाही. आमचे अंत:करण आणि आमची वाणी यांचे परस्परांशी पटत नाही. साता समुद्रापलीकडील भाषेच्या उंबरठ्यापाशी आमचे अंत:करण भीक मागेल तरच त्याला जीभ फुटण्याची आशा असते. हा मातृद्रोह संपवण्याची निकड आपल्याला अजूनही जाणवू नये, हा मानसिक गुलामगिरीचा कळस झाला

राजा रामचंद्राने गोप्रतर तीर्थावर आत्मविसर्जन केल्यावर कुशाने कुशावती नगरी स्थापून आपली राजधानी तिथे नेली, तेव्हा ओस पडलेल्या अयोध्येची नगरदेवता कुशाला त्याच्या शयनमंदिरात भेटायला गेल्याचे चित्रण कालिदासाने रघुवंशात केले आहे. तिने रामचंद्रानंतरच्या ओसाड अयोध्येची हृदयद्रावक दुर्दशा कुशाजवळ निवेदन केली. आज मराठी राज्यकर्त्यांच्या दरबारात मराठी भाषेला त्याच निवेदनाचे आवर्तन पुन्हा एकदा करण्याची पाळी आली आहे.

गोमंतकातील मराठी भाषेच्या अस्तित्वाचा प्रश्न आज गंभीर वळण घत आहे. मराठीला गोमंतकात राजभाषेचे हक्काचे स्थान प्रतिष्ठापूर्वक मान्य केले जावे अशी केवळ गोमतकीयांचीच नव्हे, तर अख्ख्या महाराष्ट्राची तळमळ आहे. स्वातंत्र्यानंतरच्या प्रशासनाने प्रजेला दिलेले आश्वासन पाळले जाणे अगत्याचे आहे. त्या बाबतीत कोकणीने पुढाकार घ्यायला हरकत नाही

गोमंतकाची भूमी ही महाराष्ट्राची वसाहत नाही. महाराष्ट्राचा तो अविभाज्य व भूषणीभूत असा अवयव आहे. अवयवाच्या आरोग्याचा प्रश्न हा मूळ शरीरापेक्षा वेगळा नसतो. अवयवाच्या दुखण्यामुळे अवघ्या शरीराचेच आरोग्य धोक्यात येत असते.

कोकणीबद्दल कुठल्याही मराठी भाषकाला दुस्वास वाटण्याचे कारण नाही. ती मराठीचीच धाकटी बहीण आहे. अ ापर्यंत दोघीही गुण्या गोविंदाने एकत्रच वाढल्या, खेळल्या, बागडल्या. वाढत्या वयाबरोबर धाकटीला उत्पन्न झालेल्या गरजांच्या पूर्तीसाठी काही सोयी-सवलती मिळाल्या, तर त्याचा मोठीला आनंदच वाटेल. कोकणीचा वेगळा संसार स्वतंत्रपणे फुलला, बहरला तर त्याबद्दल मराठीइतका आनंद कोणत्याच भाषेला होणार नाही. कोकणी भाषेत विपुल व सकस साहित्य उत्पन्न व्हावे, तिला स्वत:ची स्वतंत्र लिपी बनवण्याइतपत आत्मविश्वास यावा, तिचा सर्वांगाने विकास व्हावा असेच कोणाही मराठी मनाला वाटेल. मराठी भाषेचा अभिनिवेशपूर्ण आग्रह धरणारा मराठी माणूस व्यवहारात कोकणीच बोलतो, पण प्रमाणभाषा म्हणून मराठीला स्थान देतो. खाजगी बोलण्यात आपण जी भाषा वापरतो ती व्यासपीठावर वापरीत नाही, (वापरू नयेही) पण इतरेजनांशी बोलतानासुद्धा त्या भाषेत बोलण्याचे टाळतो. स्वभाषेबद्दल आपुलकी व अभिमान बाळगूनही लोकव्यवहारामध्ये आपण प्रमाणभाषेबद्दल कटाक्ष बाळगीत असतो. या पार्श्वभूमीवर विचार करता गोव्यातील कोकणी-मराठी वाद आता जितक्या लवकर इतिहासजमा होईल तितके चांगले. कोकणीला साहित्य अकादमीने

मान्यता दिली, आठव्या परिशिष्टात स्थान मिळाले, गोव्यामध्ये राजभाषेचा दर्जा मिळाला. तेव्हा आता कोकणीच्या प्रतिष्ठेचा प्रश्न बव्हंशी सुटल्यासारखा झाला आहे. कोणत्याही भाषेचे चैतन्य त्या भाषेत बोलणाऱ्यांच्या संख्येवरून व निर्माण होणाऱ्या साहित्यावरून ठरत असते. सुदैवाने मराठीचा आग्रह धरणारे गोवेकर आपसात कोकणीच बोलत असतात व कोकणीचा पुरस्कार करणारे प्रतिभावंत मराठी साहित्याची वा भाषेचीच भूषणे वाढवीत असतात. मराठीचे भूषणीभूत सारस्वतकार कविश्रेष्ठ बा. भ. बोरकर यांची सर्वांगसुंदर साहित्यनिर्मिती हा मराठी भाषेचा चिरंतन अलंकार ठरला आहे. कोकणी-मराठी वादाच्या निमित्ताने भडकलेल्या कडवटपणाच्या झळांनी त्यांना कळवळून आठवण झाली ती मराठीचीच. मराठी भाषा, मराठीतील संत-साहित्य, मराठी संस्कृती याच स्तन्यावर बाकीबावमधील भावकवीचे पिंडपोषण झाले होते. ज्ञानेश्वरांपासून सोहिरोबा आंबियेपर्यंतच्या प्रतिभावंताचे ऋण बोरकर विसरू शकले नव्हते. त्यांच्या मराठीतील ओव्यातून त्याची रसव्याकुळ प्रतीती येते-

*दूध आईचे आटतां तिच्या हाके धावलीस*
*माय होवूनियां मला वेळोवेळी पावलीस*
*उचलूनी ओटीपोटी सुखे लाविलेस उरा*
*पान्हा पोसणारा तुझा लाल झाला अमृताचा झरा*
*तुझ्या ज्ञानियाने मला कटीखांदी खेळविले*
*प्रकाशाच्या आकाशांत उंच फेकून झेलिले*
*आणि भोळ्या नामयाने तीर्थे आणिली अंगणी*
*कडे घेऊन पंढरे गेली आषाढीला जनी*
*तेथे पुंडलिकामुखे तिने देवविला पाठ :*
*"होई पांगळ्या आईची दिव्य पुढाराची वाट"*
*तुका वाटेत भेटला धुंद इंद्रायणी थडी*
*मला खांदी घेऊनिया त्याने टाकियली उडी*
*दोन्ही हाती आली तेव्हा त्याच्या अभंगाची पाने*
*पांग फेडावया तुझे, शब्द-शब्द झाला लेणे*
*तृप्त होऊनी बोलसी, "माझ्या लाडक्या सोनारा*
*माझ्या बहिणाबाईच्या आता सावर संसारा"*
*तुझ्या अनुज्ञेप्रमाणे नवे घडवितो घाट*
*तुमच्या ग भेटीसाठी नवी रेखाटितो वाट*
*तुक्या-ज्ञान्याला छळिले तेच पण देती शिव्या*
*त्यांचा विसर पडाया गातो अशा तुझ्या ओव्या.*

कोकणीत आत्मप्रत्यय जागृत झाला व वेगळेपणाच्या मोकळ्या वातावरणात

आपल्या मुक्त विकासाला वाव मिळेल या आशेने तिच्या अस्मितेला पंख फुटत असतील, तर हे तिचे मानस महाराष्ट्राने व गोव्यातील मराठीवाद्यांनी समजून घेतले पाहिजे. कोकणीच्या स्वाभिमानाला इजा होईल, असे आपल्या हातून काही घडणार नाही याची दक्षताही घेतली पाहिजे. विचार व उच्चार याबाबतीत सजग राहिले, तर आचारामध्येही गोडवा यायला वेळ लागणार नाही. मराठी व कोकणी दोन्ही भाषकांना आता कडवटपणा सोडून परस्परांची मने साधण्याचे काम केले पाहिजे. दोन्ही भाषा परस्परांशी भांडत राहिल्या, तर त्याचा फायदा इंग्रजी या परकीय भाषेला अधिकाधिक होण्याची भीती आहे. झाले गेले त्यावर पडदा पाडून आता दोघीनीही परस्परांच्या पोषणाची व विकासाची हमी घेतली पाहिजे व आपल्या दुफळीने परकीय भाषा आपल्यावर शिरजोर होणार नाही, असे विश्वासाचे वातावरण निर्माण केले पाहिजे. मराठीचा दुस्वास करून कोकणीचा लाभ होणार नाही व मराठीचे तेजही क्षीण होणार नाही.'मराठी भाषा ही मुमुर्षु आहे व ती मरणारच' ही एका आर्ष इतिहाससंशोधकाची तळतळाटातून आलेली शापवाणी इंग्रजीचा बडिवार वाढल्याच्या काळातही खरी ठरू शकली नाही. एखाद्या भाषेला नेस्तनाबूत करण्यात राज्यकर्त्यांचे सत्तासामर्थ्यही सफल झाल्याचा इतिहासाचा निर्वाळा नाही. त्यामुळे गोव्यामध्ये विद्वेषाचे मळे पिकविण्याचे पर्व आता संपुष्टात यायला हवे. पृथ्वीराज चव्हाण व जयचंद राठोड यांच्यातील यादवीचा लाभ महंमद घोरीला उपटण्याची संधी पुन्हा मिळायला नको. परस्परांच्या झुजीत जखमी झालेल्या हातांनी नव्या भाषिक पारतंत्र्याला औक्षण करण्याचा अपराध कुणाकडूनही घडता कामा नये.

गोव्याच्या भूमीत भरणारे हे ६७ वे साहित्य संमेलन या नव्या सामंजस्याच्या सर्गाची नांदी ठरेल, अशी मला आशा आहे.

साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी प्रामुख्याने वक्तृत्वासाठी प्रसिद्ध असणाऱ्या साहित्योपासकाची निवड व्हावी,ही बाब मला यासाठी लक्षणीय वाटते, की सुदैवाने मी कीर्तनकुळामध्ये जन्माला आलो कीर्तनसंस्थेने गेल्या दोन शतकांपासून महाराष्ट्राचे रंजन व उद्‌बोधन केले आहे. उपदेशकाच्या अगोदर कीर्तनकाराची भूमिका बहुरूपी अशा एकपात्री कलाकाराची असते. वक्तृत्व, संगीत, अभिनय या तिन्ही कलांचे उपयोजन त्याच्या कीर्तनाविष्कारात होत असल्यामुळे त्याच्यामध्ये व्यासंग, बहुश्रुतता, उपस्थिती, श्रुतयोजन, नाट्य इत्यादी गुणांची अनिवार्य आवश्यकता असते. त्याशिवाय त्याच्या आविष्काराची प्रभावक्षमता सिद्ध होणार नाही. साहित्यक्षेत्राच्या संदर्भात कीर्तनसंस्थेचा उल्लेख तिच्याकडून प्रदीर्घ काळ झालेल्या साहित्यप्रसारामुळे करावा लागतो. औपनिषदिक *ऋषी, भाष्यकार, संत कवी, पंडित कवी व अर्वाचीन कवी या सर्वांशीच त्याला जिव्हाळ्याचे नाते जोडावे लागले. महाराष्ट्रात विशेषतः संत काव्य व पंत काव्य* कीर्तनसंस्थेला अखंड उपजीव्य ठरले आहे. पूर्वरंगासाठी संत कवी, व उत्तररंगासाठी

पंडित कवी कीर्तनसंस्थेला विश्वासाचा आधार ठरत आले. हे ऋण फेडण्याकरिता कीर्तनसंस्थेनेही संतांची व पंताची कविता सर्वसामान्य श्रोत्यांच्या कानांपर्यंत पोहचवली. स्वरांचा स्पर्श झाल्यामुळे ती कविता आपोआप रोचक, आस्वाद्य व नित्य स्मरणीयही झाली. विशेषत: प्राचीन मराठीतील आख्यानक कविता लोकप्रिय करण्यात कीर्तनसंस्थेचा महत्तम वाटा आहे. त्या कवितेचे अशेष सौंदर्य व सामर्थ्य प्रथम कीर्तनसंस्थेनेच ओळखले व आपल्या सादरीकरणासाठी फुलवलेही.

सार्वत्रिक शिक्षण व मुद्रणकला अस्तित्वात येण्यापूर्वी समाजाला ज्ञानार्जन व प्रबोधनासाठी श्रुती हे एकच माध्यम होते. अक्षरशिक्षण वरिष्ठ वर्गापुरते मर्यादित होते. त्याला वंचित झालेल्या बहुजन समाजाला तर श्रवणाद्वारेच जीवनपोषक विचारांचा लाभ होत असे. पोथ्या, पुराणे, प्रवचने या सर्व सांस्कृतिक उपक्रमांमध्ये लोकमानसावर सत्प्रवृत्तींचे संस्कार करणारे कीर्तन हे अधिक आकर्षक व लोकप्रिय साधन होते. लोकांच्या श्रवणेंद्रियावर जास्तीत जास्त आनंददायक व कल्याणकारक परिणाम कीर्तनसंस्थेनेच केला. संतवाङ्मयाबद्दलची भक्ती व पंडित काव्याबद्दलची प्रीती समाजमनात रुजवण्यास कीर्तनसंस्था कटिबद्ध होती.

तिचे नाट्य व संगीताप्रमाणेच वक्तृत्व हे एक महत्वाचे सामर्थ्य आहे. वक्तृत्वाच्या द्वारेच एखाद्या नीतितत्त्वाचे वा समाजोपयोगी विचाराचे प्रभावी प्रतिपादन कीर्तनकाराला शक्य होत असते. वक्तृत्त्वासाठी त्याच्याजवळ नादजयाबरोबरच भाषासिद्धीही आवश्यक मानली जाते. ज्ञानसंपन्नतेचे चांदणे वक्तृत्वामुळेच प्रगट होते. ज्याप्रमाणे भूमीचे मार्दव कोंबाच्या लवलवीतून सूचित होते, किंवा एखाद्या कुलीन व्यक्तीचा घरंदाजपणा त्याच्या आचारगौरवातून अविष्कृत होतो, तसे ज्ञानवंताचे ज्ञान त्याच्या वक्तृत्वातून प्रकाशित होते.

कालिदासाने 'मालविकाग्निमित्र' नाटकात ज्ञान व त्याची अभिव्यक्ती याबद्दलचा नित्य परिचित पेच सोडवून दाखविला आहे :

*श्लिष्टा क्रिया कस्यचित् आत्मसंस्था*
*संक्रातिरन्यस्य विशेषयुक्ता ।*
*यस्योभयं साधु स शिक्षकाणां*
*धुरि प्रतिष्ठापयितव्य एव स : ॥*

एखाद्याजवळ ज्ञान प्रचंड असते, पण अन्यसंक्रांतीचा गुण नसतो. ते ज्ञान इतरांपर्यत पोचण्याची शब्दसिद्धी नसते. ती एखाद्याला वश झाली असली, तरी तिचा वापर ज्यासाठी करायचा ते ज्ञानच अभावाने असते. ज्ञान व ते संक्रमित करण्याचे कौशल्य अशा दोन्ही गोष्टी तुल्यबळ असणाऱ्या शिक्षकाच्या निमित्ताने कालिदासाने लोकशिक्षकाचे, वक्त्याचे व प्रबोधनकाराचेच लक्षण आपल्यासमोर विशद केले आहे. याच पद्धतीने ग्रंथोदयापूर्वीच्या काळात वक्तृत्त्वाने फिरती ज्ञानपोई चालवली. समाजाच्या

सर्वच स्तरांना साहित्याची गोडी लावण्याचे काम कुठलाही आव न आणता वक्तृत्त्वाच्या द्वारे कीर्तनसंस्थेने केले.

मुद्रणकला-त्यामुळे ग्रंथनिर्मिती, वाहतुकीच्या सोयी, त्यामुळे ग्रंथप्रसार सुलभ झाल्यावर वक्तृत्वाचे अवतारकार्य क्षीण होणे अपेक्षितच होते. आता माणूस स्वतंत्रपणे ग्रंथाचे वाचन करू लागला. त्यातील विचाराचे वा विवेचनाचे मनन करू लागला, त्यातील सौदर्याचा आस्वाद घेऊ लागला. ग्रंथांच्या उपलब्धतेमुळे व सान्निध्यामुळे त्यातील प्रतिपाद्यावर सवडीने चिंतन करणेही त्याला शक्य होऊ लागले. त्यामुळे ग्रंथलावण्यातील त्याचा आनंद वाढू लागला. परिणामी ग्रथप्रकाशन व ग्रंथालये यांचे साहित्यव्यवहारातील स्थान अधिकाधिक महत्वाचे होत गेले. पुढे माणसाचे जीवनही धावपळीचे व संकीर्ण होऊ लागले. या धावपळीत व व्यग्रतेत ग्रंथाने त्याला विश्वसनीय सोबत केली व त्याच्या स्वास्थ्यानुसार व सवडीनुसार त्याच्या आत्म्याची भूक भागविण्याचे व्रत मूकपणे चालवले. आपोआपच वक्तृत्वाच्या श्रवणशाळांना ओहोटी लागली

-हे सर्व क्रमप्राप्त होते. त्याबद्दल वैषम्य बाळगण्याचे कारण नाही. अधिक सुलभ, तरीही अधिक समर्थ व प्रभावी पर्याय उपलब्ध होणे हे प्रगतीचेच लक्षण आहे. तिथपर्यंत परिस्थितीला आणून सोडण्याचे आपले कालसापेक्ष कार्य पूर्ण झाले, या ममाधानात अगोदरच्या साधनांनी निवृत्त होणे निसर्गनियमाला धरूनच आहे.

पण वक्तृत्वाच्या बाबतीत घडले ते वेगळेच. नव्या परिस्थितीतसुद्धा वक्तृत्व टिकून राहिले. त्याने आपली भूमिका तेवढी बदलली, रूपही कालोचित घेतले. आता ज्ञानदानासाठी वक्तृत्वाचा उपयोग इतिहासजमा झाला असला, तरी प्रबोधनाबाबतचा प्रभाव ओसरला नाही. नव्या काळामध्ये वक्तृत्वाने प्रयोगात्मक ललितकलेचे रूप घेतले. प्रतिपाद्य विषयाच्या अनुषं.ाने हाणारा वाग्विलास असे स्वरुप तिने स्वत:साठी निश्चित केले. जो विषय मांडायचा, त्यावर प्रेम व घट्ट मांड, विषयांतर्गत प्रतिपाद्यांवर पकड व प्रतिपादनाच्या क्रमाचे नियोजन व शैलीचे आकर्षण असल्याशिवाय त्या वाग्विलासालाही मूल्य येत नाही. श्रोत्यांपर्यंत प्रतिपाद्य पोचायलाच पाहिजे. ते त्यांच्या गळीही उतरले पाहिजे. ते उतरत असताना त्याच्या अवधानाला कुठेही चीर पडणार नाही याची काळजी घेण्यासाठी व तेवढ्यापुरतेच लालित्यही हवे. हे होऊ शकल्यास विषय कोणताही असला, तरी ते व्याख्यान हा आपोआप एक कलास्वाद बनतो. चांगल्या व सराईत वक्त्याला विषयाची नाड। +ळते व शब्दांचाही विश्वास संपादन करता येतो. शब्दही तसे सावध असतात सर्वमामान्य माणसाला त्याच्या व्यवहारसाधनासाठी ते कटाक्षाने आपला वाच्यार्थच तेवढा हवाली करतात. प्रतिभावंताजवळ बाकी आपल्या गूढ अर्थाच्या सर्व छटा प्रसन्नपणे बहाल करतात. समर्पक, विविधार्थी व नादमय शब्दांच्या अस्खलित उपस्थितीने अभिप्रेत असा प्रभाव श्रोतृमनांवर घडून येतो. तेवढा वेळ श्रोता रंगून जातो. तेवढा काळ का होईना आपण लौकिक जीवनापासून थोडे वर

उचलले गेलो आहोत, अशी प्रचिती त्याला येते. त्याच्या मनाचा प्रसाद हीच अशा व्याख्यानाची कमाई असते.

व्याख्यान हवेवर उडून जाते, लेखन कागदाला बिलगून बसते, त्यामुळे व्याख्यानापेक्षा लेखनावर भर देण्याची प्रवृत्ती सर्वत्र आढळते. त्यातील 'व्याख्यान हवेवर उडून जाते' या आक्षेपात काहीसे तथ्य आहे. संगीत, नाट्य या माणसाला धुंद करणाऱ्या सर्वच प्रयोगात्मक कलांचे भागधेय वक्तृत्वाला कसे चुकवता येणार ?अभिनयाचा व स्वरांचा विलासही काही काळ श्रोत्यांमध्ये बेहोषी उत्पन्न करतो. त्यानंतर शिल्लक राहतो तो त्या बेभान आनंदाचा परिणाम. पुढे पुढे तोही आठवणींपुरताच उरतो. त्याबद्दल आपल्या मनात कुठलाही आक्षेप नसतो. कारण त्या अलौकिक आनंदाच्या अनुभवाबद्दल आपण प्रसन्न असतो, कृतज्ञही असतो. असे दुर्मिळ क्षण आपल्या आयुष्यात आल्याबद्दल आपल्याला धन्यताही वाटत असते. वक्तृत्वाला ही पावती देण्याची मात्र आपली अद्याप तयारी नसते. कारण ज्ञानदानाच्या उद्देशाशी आपले नाळसंबंध वक्तृत्वाने नुकतेच कापले आहेत हे आपल्या लक्षात नसते. नाटक आणि संगीतासारखेच वक्तृत्वही वाऱ्यावर उडून जात असले तरी संस्काररूपाने शिल्लक राहते. या संस्कारांनीच माणूस स्वत:च्याही नकळत प्रगल्भ होत असतो, व उन्नत होत जातो.

लेखक आपले शब्द कागदावर उमटवतो, वक्ता ते श्रोतृहृदयावर उमटवतो. कागदावरचे शब्दसुद्धा कालांतराने विसरले जाऊ शकतात. काही काळ त्यांनी केलेला संस्कार बाकी कायम राहतो. पुढे पुढे लेखकाचे व पुस्तकाचे नावही लक्षात राहत नाही. पण त्या लेखकाने आपल्या लेखनाद्वारे केलेले संस्कार माणसाला सोडून जात नाहीत. लेखनामुळे त्याच्या वृत्तीत, जाणीवेत व एकूणच मानसिकतेत जो सूक्ष्म बदल झालेला असतो, तो तत्काळ लक्षात येत नाही. विद्वत्ता व बहुश्रुतता प्रदर्शित करण्यासाठी पुष्कळदा लेखनातील काही अंश उपयुक्त ठरतात ही गोष्ट खरी आहे; पण त्या उद्धरणांचा माणसाच्या मानसिकतेशी संबंध अल्प असतो व प्रदर्शनप्रियतेशी अधिक असतो. व्याखानाच्या बाबतीत तेवढे करता न आले, तरी आंतरिक संस्कारशीलतेच्या दृष्टीने लेखन आणि वक्तृत्व यांच्यातील साम्य लक्षात यायला हरकत नाही. सुदैवाने आरंभीचे *बव्हंशी 'साहित्य' खऱ्या अर्थाने 'वाङ्मय'च होते, हे ही अशा संदर्भात* विचारात घेतले जावे.

मित्रहो,

एका अभूतपूर्व परिस्थितीत आपण आज हा साहित्य सोहळा साजरा करीत आहोत. गेल्या संमेलनानंतरच्या एका वर्षात महाराष्ट्राला मानवी व नैसर्गिक अशा अकल्पित व असह्य आपत्तींना तोंड द्यावे लागले. तत्पूर्वी अयोध्याकांडाच्या निमित्ताने उभा देश होरपळून निघालाच होता. यानंतर महाराष्ट्राच्या राजधानीतील भीषण बाँबस्फोटांनी

सर्वांच्या विवेकबुद्धीला अकल्पनीय हादरा दिला. जातीय विद्वेषाने पोळून निघालेली मने देशद्रोहीच्या अक्षम्य उद्रेकाने विदीर्ण झाली. या संकटातून सावरतो न सावरतो तोच निसर्गकोपाचा भयानक तडाखा महाराष्ट्राला सोसावा लागला. मराठवाड्यातील भूकंपाने गावेच्या गावे क्षणार्धात उध्वस्त झाली व असंख्य जीवांना झोपेतच चिरनिद्रा घेण्याची पाळी आली. प्रचंड प्रमाणात वाताहत झाली. कालचा सूर्य मावळेपर्यंत चालते बोलते असलेले जग काहीही अपराध नसताना त्याच्याही नकळत अकस्मात मातीला मिळाले. त्या सर्वांची मनोगते, स्वप्ने. इच्छाआकांक्षा व अभिवचने अपूर्ण ठेवूनच कृतांताची काळझडप त्यांच्यावर पडली व होत्याचे नव्हते होऊन गेले. सकाळचा सूर्य ही विनाशाची वार्ता घेऊन आल्यावर महाराष्ट्राला भल्या पहाटेच सांजावल्यासारखे झाले. काळाचे हे कराल तांडव पाहून संवेदना गोठून गेल्या. निसर्गाच्या एका साध्या लहरीपुढे माणूस किती नगण्य आहे, याचा अंतर्मुख करणारा सुन्न प्रत्यय आला. नियतीच्या एका भ्रूक्षेपासरशी पुरुषार्थाने उभारलेली माणसाची जगे आंदोळू लागावीत आणि पाहता पाहता मानवी अहंतेचा चोळामोळा होऊन जावा, हे अनुभवास आलेले वास्तव मोठे भयंकर होते.

या सर्व गदारोळात साहित्यक्षेत्रच नव्हे, तर त्याला आधारभूत असलेले माणसाचे अस्तित्वच अशाश्वत होऊन जाते. अदृश्य शक्तीला पदच्युत करून आपण नव्या युगधर्मानुसार सामान्य माणसाला राज्याभिषेक केला व त्याच्या सार्वभौम प्रभुत्वाची द्वाही फिरवली. मानवी जीवन सर्वश्रेष्ठ मानून त्याचे ऐहिक सुखवर्धन, सर्वांगीण विकसन, निरामय पोषण व नैतिक उन्नयन साधण्यासाठी विज्ञान, कला व साहित्य याच्या सर्व शक्ती पणाला लावण्याची योजना आखली, परंतु आपापल्या परीने या प्रयत्नांचा कस लागत असतानाच एकाएकी ज्ञात व अज्ञात दिशेकडून असा तडाखा बसतो आणि माणसाची विवेकबुद्धी प्रश्नचिन्हांच्या गजाआड कैद होऊन पडते.

क्षणमात्र न थांबणारा काळ, व माणसाचा न हरणारी हिंमतच अशा भळभळत्या जखमांवर तत्परतेने व तडफेने उपचार करीत असतात. माणूस हळूहळू स्वतःला सावरतो व स्वतःच्याच राखेतून उडणाऱ्या फिनिक्स पक्ष्याप्रमाणे पुन्हा एकदा उभारी धरतो व नव्या आकांक्षांच्या आभाळामध्ये झेप घेतो. सुदैवाने महाराष्ट्राची ही अपराजित परंपरा आहे.

अशा सर्वभक्षी व भयाकुल परिस्थितीत साहित्य संमेलनासारखे आनंद सोहळे करावेत काय असाही प्रश्न काही संवेदनशील कोनांमधून प्रतिध्वनित होणे अपेक्षित होतेच. स्वतःच्या शारीरिक व बौद्धिक पराक्रमाबद्दल सार्थ गर्व बाळगणारे अखखे मानवी जीवनच जिथे बापुडवाणे होऊन जाते, तिथे बाकीच्या बाबी आपोआपच निरर्थक ठरल्यास नवल नाही.

पण सुदैवाने अशी दिङ्मूढ करणारी परिस्थिती चिरस्थायी नसते. मानवी

बुद्धीला क्षणकाल लुळीपांगळी करणारी कारणे कालांतराने इतिहासजमा होतात. सर्व अवयवांमध्ये नवा जोम भरला जातो. बुद्धीला नवी तरतरी येते व विचारशक्तीला नवा तजेला येतो. द्वितीय महायुद्धाने मनुष्यतेच्या केलेल्या अशाच निर्घृण दुर्दशेनंतर माणसाच्या या सर्वांगीण अपंगत्वाचे व अगतिकतेचे पडसाद जागतिक वाङ्मयामध्येही उमटले होते. पण मानवी विजीविषा व विजीगिषा यांनी पुन्हा डोके वर काढले आणि नवा इतिहास घडवला. पुन्हा एकदा दग्धभूमधून चैतन्याने सळसळणारे नवे राष्ट्र आकाराला आले. निसर्ग व माणूस यांच्या लढ्यात अधून मधून मानवी अहंकाराला कायम लक्षात राहील, असा धडा शिकवण्याचा निसर्गाचा स्वभाव असला, तरी त्याने घातलेल्या प्रश्नचिन्हांच्या प्रत्येक हातकडीतून सुटका करून घेऊन आपल्या अजिंक्य कर्तृत्वाची विजययात्रा अप्रतिहत चालू ठेवण्याचा माणसाचा इतिहास आहे.

कारण त्याला हे माहीत आहे की, अतिवृष्टी, महापूर, वादळे किंवा भूकंप ही सृष्टीची प्रकृती नाही. असे उत्पात होतात अन् विलय पावतात. पुन्हा सृष्टीमध्ये दिवस-रात्र, सकाळ-संध्याकाळ, ऊन-पाऊस यांची लयबद्ध आवर्तने सुरू होतात. ताजीतवानी होऊन पहाटेच्या सूर्यप्रकाशात सृष्टी सुस्नात होते व रात्रीच्या निरभ्र चांदण्यात स्मितहास्य करू लागते. माणसावर असली संकटे कितीही आली, तरी सृष्टी आपली मूळ प्रकृती सोडत नाही. पुन्हा नवी नवी रोपे उगवतात. नवी रंगीबेरंगी फुले उमलतात. वृक्षाचा मोहर किंवा फुलोर सुगंधाचे निःश्वास सोडू लागतो. जणू काही घडलेच नाही असे भासवून सृष्टीचे गतिचक्र निरंतर चालू राहते. कितीही नैसर्गिक प्रकोप झाले, तरी त्याचा परिणाम काही काळच नद्यांचे मन कलुषित होण्यात होतो. नंतर निवळशंख पाण्याने त्या संथपणे वाहत राहतात.

सृष्टीचा हा स्वभाव मानवानेही आत्मसात केल्यामुळे प्रचंड उलथापालथीनंतर त्याचेही नित्याचे व्यवहार श्वासोच्छवासाप्रमाणे चालू राहतात. सांस्कृतिक स्पंदन तरी त्याला अपवाद का असावे ?

काही आकस्मिक आघातांमुळे क्षणकाल रक्त गोठून जाते व मनही बधीर होते खरे. पण सुदैवाने ती अवस्था दीर्घकाल टिकत नाही. जगण्याची व जगवण्याची इच्छा त्याला सावध करते. कालांतराने तो सावरतो व पुन्हा एकदा नव्या अवसानाने जीवनाला सामोरा जातो. लोकमान्य म्हणाले होते, ''आकाश जरी माझ्यावर कोसळले, तरी कोसळलेल्या आकाशाच्या ढिगाऱ्यावर पाय रोवून मी परिस्थितीशी सामना करीन.'' प्लेगमध्ये बळी गेलेल्या आपल्या सख्ख्या मुलाच्या प्रेतावर पांघरूण घालून 'केसरी' चा अग्रलेख कर्तव्यबुद्धीने पूर्ण करणाऱ्या कर्मयोगी महापुरुषाचे हे उद्‌गार महाराष्ट्राने नेहमीच शिरसावंद्य मानले आहेत.

अशा नैसर्गिक आपत्ती वारंवार येत नाहीत; पण अलीकडे काही वर्षात मानवतेच्या हननाचे क्रूर प्रसंग बाकी वरचेवर व वाढत्या प्रमाणात घडून येत आहेत. अशा

निरपराध हत्यांचे निष्करुण वृत्तांत आकाशवाणीवरून व प्रकाशवाणीवरून निर्विकार मनाने ऐकण्याचा आपला सरावही वाढत चालला आहे. क्रिकेटमधील धावसंख्या ऐकावी तितक्या निर्ममत्वाने आपण रोजच्या वार्तापत्रातील निष्पापांच्या हत्यांच्या बातम्या ऐकतो. त्या वेळचे आपले औदासीन्य वा बेदरकारपण हत्यातील क्रौर्याइतकेच अपराधी असते. माणसाचे जीवन हे सर्वोच्च मूल्य मानले जाणाऱ्या काळात अशा अनंत जीवनांची विल्हेवाट निर्दयपणे लावल्याचे ऐकूनही आपल्या दैनंदिन स्वास्थ्यावर एवढासाही ओरखडा उमटू नये, ही बाब कुणालाही निःसंशय अमानुषपणाची वाटेल.

साहित्यात माणूस हाच मध्यवर्ती असतो. त्याचे प्रेम-द्वेष, हर्षामर्ष, दैन्य-वैभव, त्याची अकर्मण्यता व कर्तृत्व, त्याच्या जीवनातील अनाकलनीय गुंतागुंत हे तर साहित्याचे सनातन आकर्षण आहे. त्या मूल्यवान मानवी जीवनाला मानवानेच प्राप्त करून दिलेली आजची कळा हा सर्वांच्या चिंतेचा व विचारवंतांच्या चिंतनाचा विषय बनलेला आहे संवेदनशील सारस्वतकारांच्या शाब्दिक आविष्कारात त्याचे प्रतिबिंब उमटले नसेल तरच नवल!

या उत्पाताची शिकार झालेला, मानवी संहारात घायाळ झालेला, महापुरात वा भूकंपात बळी गेलेला वा सर्वस्व हरपलेला हा माणूस आणि तुमचे आमचे साहित्य यांचा नेमका संबंध काय? हा संबंध केवळ वाचिक हळहळीपुरता व शाब्दिक सहानुभूतीपुरता आहे की याच्याही पलीकडे जाऊन अधिक खोलवर आहे? जगाला हादरवून टाकणाऱ्या वा मोजक्या सवेदनशीलांच्या जिव्हारी जाऊन बसलेल्या अशा एखाद्या ऐतिहासिक स्वरूपाच्या हानीबद्दल पुष्कळदा हतबुद्धता किंवा निर्जीव सुतकी शब्दांचे ढिगारे याखेरीज तिसरी प्रतिक्रिया उमटलेली आढळत नाही.

*फुटेल (होती वेडी आशा)*
*आभाळाचा कर्मठ सांदा*
*जाईल किंवा तडा भयंकर*
*वसुंधरेच्या अर्ध्या अंगा*

दगडांचे ऊर उलावेत व वज्राने दुभग व्हावे अशी एखादी घटना घडते, जिचा काही तरी अपूर्व व चिरस्थायी परिणाम होईल असे वाटू लागते, पण यांपैकी काहीच घडत नाही. अनंत सुतकी शब्द उठतात, रंगहीन होऊन लय पावतात. पौषाच्या मागोमाग सरावाने माघ येतो, माणसे काच पुसून चष्मा डोळ्यावर चढवतात व काहीच घडले नाही, या थाटात जगरहाटी पुढे चालू राहते.

झोपेतच महापुरात वाहून गेलेली माणसे किंवा स्वतःच्या पिढीजात घराखाली जाग येण्यापूर्वीच चिरडून चेदामेदा झालेली माणसे साहित्याची कोण लागतात? दंगलीत मेलेल्या वा मारणाऱ्या माणसांचे साहित्याशी नाते काय? स्वतःलाही कल्पना

नसताना अवचित मरणाच्या खाईत लोटल्या जाणाऱ्या माणसांच्या हानीचा कार्यकारण संबंध आपल्याला अद्याप उलगडता आलेला नाही. दैवी वा मानवी क्रौर्याचे बळी झालेल्या या असंख्यांचा गुन्हा काय ? ही अक्षम्य अद्दल त्यांना का घडावी ? अपराध आणि शिक्षा यांच्यात हा कल्पनातीत विसंवाद का ? या प्रश्नांची उत्तरे मिळू शकतील; पण ती खुद्द देणाऱ्यांचेही समाधान करू शकणार नाहीत. या उत्तरांचा शोध अधिक खोलात जाऊन करावा लागेल. दैवी आपत्तीच्या बाबतीत माणसाचा अगदीच निरुपाय असतो. तो तिथे अगतिक व हतबल झालेला असतो. पण त्या आपत्तीनंतर माणसाचे जे दर्शन घडते, ते धीर देणारे, आशा वाढवणारे मानवी जातीबद्दलचा विश्वास जागवणारे असते, तसेच बुचकळ्यात पाडणारे, उबग व संताप आणणारे व पुनर्वसनाच्या भुलावणीपेक्षा आप्तांच्या बरोबर सहगमन पत्करले, असे मनोमन वाटायला लावण्याइतके विविध प्रकारचे असू शकते. धर्म, जात, भाषा यांच्या अभिनिवेषाची नशा चढलेले, तसेच राजकारणातील तत्काळ लाभाच्या स्वार्थी लोभाने पशू बनलेले असेही एक माणसाचे रूप या सामुदायिक नरसंहारात सक्रिय असते.

या माणसाच्या मनाची विचारपूस साहित्यनिर्मात्यांकडून अपेक्षित नाही काय ? या घाऊक नरमेधाचे होते व बळी साहित्याचे नायक असू शकतील काय ? किंवा निदान वाचक तरी असू शकतील काय ? या दोन्ही नात्यांनी साहित्याशी त्याचे नाळसंबंध संभवतात काय ? त्याचे मनोव्यापार समजावून घेण्याचे कुतूहल वा मानवाच्या पशूमध्ये किंवा दानवामध्ये होणाऱ्या रूपांतरामागील कारणमीमांसा उलगडण्याबाबत जिज्ञासा उगवण्याची शक्यता आहे काय ? या विराट विश्वाच्या मुळाशी असणाऱ्या गूढ शक्तीपुढे आजचा विज्ञानवीर अहंपीडित माणूसही नगण्य आणि केविलवाणा का होऊन जावा, हे कधी जाणून घेता येईल काय ? माणसाची आत्मकेंद्रित सुखलालसा, आपल्या पुरुषार्थाने त्याने वाढविलेली लोकसंख्या व समृद्धी, त्यातून त्याचा फुगलेला आकांक्षांचा डोलारा, आणि हे सर्व क्षणार्धात होते की नव्हते करून टाकणारी नियतीची अतर्क्य लीला- हे खरे म्हणजे माणसाच्या कुतूहलाचे सनातन विषय असायला हवेत. या कुतूहलपूर्तीच्या प्रयत्नातूनच त्याला जीवनाबद्दलची खोल उमज प्राप्त होईल व त्याची दृष्टीही विशाल होईल. विश्वरचनेचे, विश्वचक्राचे व विश्वाच्या पर्यवसानाचे प्रयोजन व गूढ उकलण्याचे प्रयत्न करणाऱ्या प्रबुद्ध वा आर्ष विचारवंतांचा व दर्शनकारांचा आयता वारसा मिळालेल्या चिंतकांनी तो क्षीण स्वरूपात का होईना, पुढे चालविण्याची जिद्द बाळगण्यास काय हरकत आहे ?

अकल्पित निसर्गप्रकोपामुळे व मानवातील पशुत्वाच्या स्फोटामुळे हतबुद्ध होणारा, निसर्गाने उभे केलेले अडचणीचे परंपरागत गड आत्मविश्वासाने सर करणारा, स्वजातीयातील सुप्त पुरुषार्थ जागवणारा व त्याच्या संघटित उद्रेकाने जगाचे रंगरूप पालटून टाकणारा, स्वत:च्या प्रतिभेने स्वर्गातील उडूरत्नांचे अलंकार पृथ्वीच्या कंठात

घालणारा, आपल्याच कर्तृत्वाने दु:खाचे पहाड व सुखाची सरोवरे निर्माण करणारा, निर्मितीमध्ये विधात्याशी स्पर्धा करू पाहणारा हा सामान्य माणूस साहित्यविश्वाचा जीवाभावाचा नातलग आहे. विषयरूपाने हा साहित्याच्या अंत:पुरात प्रवेश करतो, तिथे डौलाने मिरवितो, आपल्या भरजरी सुखदु:खांची गौर मांडतो, या विराट दर्शनाने अवघ्या विश्वाला कवेत घेतो. आभाळाला मिठी मारायला धावतो, तर दुसरीकडे वाचकाचे रूप घेऊन तो आपणच निर्माण केलेल्या या विश्वाला नवलाने न्याहाळतो व विस्मयानंदाने त्याच्याशी एकरूप होतो.

*पतंजलीने योगशास्त्रात ईश्वराचे रूप द्विविध कल्पिलेले आहे,*
*ईश्वरो द्विविध: । अणुर्विभुश्च ।*

अणु आणि विभु अशी ईश्वराची दोन रूपे आहेत. अणुरूपाने तो विश्वाच्या मूलकंदाशी स्थिर असतो, त्याच वेळी विभुरूपाने सर्व विश्वाला व्यापून टाकीत असतो. तसाच माणूस पात्ररूपाने वाङ्मयात आपल्या व्यक्तिमत्त्वाचे सर्व उन्मेष प्रगट करीत असतो व वाचकरूपाने त्याच अनुभवविश्वाचा समरसून आस्वादही घेत असतो. देश, काल, भाषा यांची कुंपणे ओलांडून हाच माणूस सर्वत्र संचार करतो. सर्वांची भेटही घेत असतो. मनुष्य जातीच्या जन्मापासून याच्या भावना, वासना व सुखदु:खे सामान्यपणे तीच राहिली आहेत. यातून येणाऱ्या अनुभवांना सामोरे जाण्याची प्रत्येकाची प्रवृत्ती किंवा प्रकृती तेवढी वेगळी असते. या माणसाचे उन्नयन झाले, तर त्याचा राम, कृष्ण, बुद्ध, महावीर होतो. पतन झाले तर त्याचा रावण, दुर्योधन किंवा आयागो, कमलाकर होतो. आयागो वा कमलाकरामध्ये आपल्याला क्वचित आपली पुसट प्रतिबिंबे पाहायला मिळतात. निदान ओळखीच्या खुणा तर आढळतातच. राम-कृष्णांमध्ये आपल्याला आपली कधीही पूर्ण न होणारी स्वप्ने दिसतात. या स्वप्नांचा ध्रुवतारा अखंड समोर ठेवल्यामुळेच एखाद्या वाल्याचा वाल्मीकि होण्याच्या व कमलाकराचा कृष्ण होण्याच्या शक्यता पालवू लागतात. शब्दशक्तीच्या आरंभापासून साहित्याने ही आपली जबाबदारी जाणीवपूर्वक सांभाळलेली आहे.

साहित्य हा प्रतिभावंत व रसिक यांचे मधुर ऋणानुबंध चिरंजीव करणारा सेतू आहे. त्याचा आरंभ प्रतिभावंतांच्या अतंर्मनापासून होतो. प्रतिभावंताला प्रतीत झालेला अनुभवविशेष शब्दांच्या माध्यमातून रसिकाच्या अंत: करणात विश्रांत होत असतो. या दृष्टीने सर्वच कलाव्यापार अष्टमीच्या चंद्रासारखा असतो, असे म्हणावे लागेल. प्रतिभावंतांची निर्मिती पूर्ण झाली की तिचे उरलेले विकसन सहृदयाच्या अंत:करणात आस्वादप्रक्रियेने होऊ लागते.

आस्वादकाची अभिज्ञता जेवढी सूक्ष्म व तरल असेल तेवढा त्याच्या अंत:करणातील कलाकृतीच्या विकसनाला वाव अधिक. मूकपणे अभिताच रसिकाची प्रतीक्षा करणारी

वाङ्मयकृती त्याच्या भेटीबरोबर सर्वांगी फुलून येते. तिच्या षोडष कला सहृदयाच्या हृदयात क्रमाक्रमाने उमलू लागतात. तिच्या अंतर्गत लावण्याची पौर्णिमा प्रगट झाली की, रसिकाला 'आनंदाचे डोही, आनंद तरंग' असे होऊन जाते.

अशा रसिकांच्या अभावी ती कलाकृती बिचारी हिरमुसून जाते. रसिकतेच्या प्रतवारीनुसार ती वाचकाला विश्वासात घेते व आपल्या सौंदर्याची दुमडलेली एक-एक घडी त्याच्या समोर उलगडू लागते. प्रतिभावंताच्या अंतर्गुहेतून उगम पावलेला हा कलाव्यापार रसिकांच्या अंत:करणात पोचून विकसित झाल्यावरच कृतकृत्य होतो. निर्मितीच्या अंगाने कलावंत व आस्वादाच्या अंगाने रसिक आपापल्या मुक्कामावरून निघतात. त्यांची स्नेहभेट जिथे होते, ते ठिकाण अष्टमीच्या चंद्राचे. तिथून कलाकृतीबरोबर रसिकाचा सहप्रवास सुरू होतो. रसिकहृदयात उलगडलेला सौंदर्याचा पिसारा पाहून कित्येकदा स्वत: निर्माताही चकित होतो. एका बेभान अवस्थेत हे सौंदर्य आपणच निर्माण केले याचे त्याला आश्चर्य वाटतेच, पण हे सर्व आपल्याला प्रतीत झाले होते काय, अभिप्रेत होते काय याचाही त्याला पेच पडतो. निर्मितीच्या क्षणी खुद्द विधात्यालाच चकवून कलाकृतीने स्वतंत्रपणे आपली सौदर्ययात्रा सुरू केलेली असते. स्वत: जन्मदात्यालाच अज्ञात राहिलेल्या आपल्या लावण्यकळा ती-एखाद्या विश्वासू रसिकाजवळच प्रेमाने प्रगट करते.

असा रसिक भेटणे हे खुद्द त्या कलावंताचे व कलाकृतीचे अहोभाग्य असते. कारण, त्याच्या अंत:करणाच्या प्रांगणात-तिचा वेगळाच लीलाविलास चालू असतो. त्याला भावणारा हा विलास पाहताना रसिकही बेभान होऊन जातो. त्यातून जी आस्वादप्रक्रिया सुरू होते तिचे फलित लेखनरूपाने उपलब्ध झाल्यास ती एक वेगळी निर्मितीच ठरते. किंवा मूळ कलाकृतीने स्वत्वाचे भान येऊन रसिक हृदयात घेतलेला तो नवा पुनर्जन्मच ठरतो. मूळ वाङ्मयकृतीइतकाच तोही आस्वाद्य असतो.

अशा लेखनात मूळ वाङ्मयकृतीतील सौंदर्यकंदालाच धुमारे फुटतात.सूर्यबिंब जसे बचकेएवढे असते, पण प्रकाशाने ते त्रैलोक्यालाही तोकडे करून सोडते. हा त्रिभुवनव्यापी प्रकाश त्या बिंबातून निघालेला असतो. मूळ बिंबाचाच तो विशाल विस्तार असतो. जगाला सुख देण्यासाठी त्या बिंबानेच आपले प्रकाशाचे हात पसरलेले असतात व वात्सल्याने जगाला कवेत घेतलेले असते. ह्या प्रकाशाचा आनंदही जगालाच मिळतो. मूळ कलाकृती सुंदर असावीच लागते. पण सहृदयाच्या आस्वादामुळे हे सौदर्य अधिक विशद होते व तिचा प्रभावही वृद्धिंगत होतो. रवींद्रांनी 'प्राचीन साहित्य' या पुस्तकात वाल्मीकी व कालिदास यांच्या कलाकृतीच्या घेतलेल्या आस्वादामुळे कलाकृतीची लज्जत तर वाढलीच, पण कलास्वादालाही एका स्वतंत्र कलाकृतीची कांती प्राप्त झाली. कलाकृतीला थेट भिडणारी, कोणाच्याही मध्यस्थीशिवाय तिची स्वतंत्रपणे विचारपूस करणारी, मनमोकळेपणाने तिच्याशी हितगुज करणारी, विश्वासाने तिचे मर्म

समजावून घेणारी अशी आस्वादक समीक्षा कलाकृतीला खरा न्याय देते कलाकृतीचे जन्मरहस्य समजून घेण्याने, तिचे बलस्थान जाणून घेण्याने व कलेकलेने प्रगट होणाऱ्या तिच्या लावण्याचे हळुवार चुबन घेण्यानेच तिचे अवतारकार्य कृतार्थ होत असते मराठी वाड्मयात शिवराम महादेव पराजपे, गगाधर गाडगीळ, माधव आचवल, अरुणा ढेरे, त्र्यं वि सरदेशमुख, द भि कुळकर्णी याच्या लेखणीला माझ्या मते हे यश लाभले आहे

प्रियतमाच्या भेटीसाठी सर्वांगी आतुर झालेल्या रमणीचे समाधान तिच्या कमनीयतेचे, सौष्ठवाचे, उत्कंठतेचे व विभ्रमाचे तटस्थ स्तवन करून होणार नाही एकही शब्द न उच्चारता कडकडून दिलेल्या आलिगनामुळे व आधाशी प्रेमवृष्टीनेच ते होण्याची आशा असते तसेच कलाकृतीच्या सौदर्याची चिकित्सा करून, तिच्या रीतिगुण-अलंकाराची प्रशसा करून तिला न्याय देता येणार नाही, तृप्त होईपर्यत तिचा आस्वाद घेण्याने व हा अलौकिक आस्वादानुभव समर्थपणे सक्रमित केल्यानेच तो देता येईल

माझ्या अष्टमीच्या चद्राच्या दृष्टातामध्ये मी रसिकाचाही सहभाग तुल्यबळ मानलेला आहे किबहुना निर्मिती व आस्वादाद्वारेच कलाव्यवहार पूर्णावस्थेला पोहचतो असेही मानलेले आहे त्यावरून, कलावताने अशी रसिकसापेक्षता बाळगणे खरोखरच गरजेचे आहे काय असा प्रश्न काही विचक्षणाच्या मनात उद्भवणे शक्य आहे

कलानिर्मिती ही कलावताची आत्यतिक वैयक्तिक बाब आहे एखाद्या घटनेच्या, दृश्याच्या, स्मरणाच्या किवा चेतकाच्या उत्तेजनामुळे कलावताला त्या क्षणी प्रतीत झालेला सौदर्यानुभव ही त्या क्षणी तरी त्याची एकट्याची बहुमूल्य ठेव असते तिच्याशी शभर टक्के प्रामाणिक (मर्ढेकराच्या शब्दात आत्मनिष्ठ) राहणे एवढेच त्याचे धर्मकर्तव्य असते त्या अनुभवाशी साधलेल्या आत्यतिक एकतानतेतूनच त्याला अभिप्रेत असणारी कलाकृती निर्माण होऊ शकेल निर्मितीपूर्वी व निर्मितीच्यावेळी (मर्ढेकरानी ज्याला लेखनपूर्व व लेखनगर्भ आत्मनिष्ठा म्हटले आहे) त्याला निर्मितीबाह्य असे कोणतेही मोह होता कामा नयेत एकाग्रतेने आपल्याला गवसलेल्या अनुभवाचे रूप, त्याला हळूहळू प्राप्त होणारे आकार, त्याची एका सजीव कलाकृतीमध्ये रूपातर होण्याची प्रक्रिया न्याहाळणे व त्या निर्मितीचा आनद लुटणे एवढेच त्याचे काम वाचकाचा, त्याच्या अभिप्रायाचा व प्रतिक्रियाचा विचार करण्याचे त्याला कारण नाही

*अशी असावी कविता म्हणून*
*तशी नसावी कविता फिरून*
*सांगणार कोण तुम्ही कवीला*
*आहात मोठे पुसतो तुम्हाला ?*

-या केशवसुताच्या रुष्ट उद्गारात तोच ध्वनी उमटला आहे

वाचक कविता वाचतो. त्याच्या कुवतीप्रमाणे त्याला ती आवडत असेल किंवा नसेल. कळत असेल वा नसेल. पण तो आपला अभिप्राय बाकी हमखास नोदवतो. या अभिप्रायाची प्रतिक्रिया कवीच्या हळव्या मनावर उमटवल्याशिवाय निश्चितच राहत नाही. त्यातूनच उपरोक्त उद्‌गारातील रोष बाहेर पडत असतो. आपण निर्मिलेले काव्य स्वत:शीच गुणगुणत राहावे व त्याचा आनंद लुटावा असा कवीचा हेतू त्यातून स्पष्ट दिसतो. त्यामुळे कविता ही कवीच्या स्वानंदासाठीच निर्माण होते, असा अर्थ त्यातून निष्पन्न होणे अनिवार्य आहे. मूलत: कवीलाही तोच अर्थ अभिप्रेत असतो. 'कविता स्वानंदासाठी निर्माण होते' या विधानाचा अर्थ निर्मिती श्वेतरनिरपेक्ष असते असा होतो. आणि तो खरा आहे. निर्मितीच्या वेळी कवीला मुळात स्वत:चेच भान नसते, तर इतरांचे विचार त्याच्या मनात कसे येऊ शकणार असेही एक मत वरील विधानाच्या पुष्ट्यर्थ अभिनिवेषाने मांडले जाते.

ही सर्व मते खरीच मानायला हवीत. निर्मितीच्या वेळी कवीला निर्मितीखेरीज अन्य कशाचेही भान नसणे इष्टच आहे. प्रसूतीच्या वेळी मातेला ज्याप्रमाणे वेदनातिरेकामुळे सुखरूप सुटका हाच एक ध्यास असतो, तसाच कलावंताला आनंदरूप-निर्मितीचा असावा. यात खोटे वा गैर काही नाही. पण प्रसूतीनंतर ज्याप्रमाणे आपल्या या जीवनसर्वस्वाला डोळे भरून न्याहाळल्यानंतर त्याच्या वडिलांच्या व आप्तांच्याही ते दृष्टीस पडावे, अशी तिला स्वाभाविकच इच्छा होते. तशी निर्मितीनंतर वाचक-सापेक्षतेची गरज कवीलाही जाणवण्यात काही वावगे आहे, असे मानण्याचे कारण नाही.

निर्मितीपूर्वी व निर्मितीकाळी वाचकाचा विचार मनात येणे कवीला अनुनयाचा मोह उत्पन्न करण्यास प्रवृत्त करते. त्यामुळे ते निश्चितच अनिष्ट आहे. पण निर्मितीनंतर आपल्याला भावलेला आगळा अनुभव वाचकांमध्येही संक्रमित करावा, आपल्या आनंदात त्यांनाही सहभागी करून घ्यावे, त्यांच्या कौतुकाचे शब्द ऐकून आपण उत्तेजित व्हावे असे वाटणेही अगदीच अस्वाभाविक नाही. कितीही चांगला कवी झाला, तरी तो वाचकांना विश्वासात न घेता आपल्या निर्मितीवर आपणच प्रेम करीत बसला, तर ही नार्सिसस वृत्ती जास्तीत जास्त त्याची आत्मलालनाची हौस वाढवील आणि आत्मलालन आत्मविकसनाच्या मार्गात निव्वळ अडथळे उत्पन्न करीत असते हे विसरून चालणार नाही. निर्मितीच्या वेळी वाचकनिरपेक्षता काव्यकृतीचे शील निष्कलंक राहण्याच्या दृष्टीने अत्यावश्यक आहे. पण निर्मितीनंतरची वाचकनिरपेक्षता कवीची आत्मकेंद्रितता व अहंता वाढवण्यास पोषक ठरेल. एवढेच नव्हे तर त्यातून वाचकांबद्दलची अवहेलनेची बुद्धी वाढत जाईल.

एखादा अनुभवच मुळी गुंतागुंतीचा असला, तर त्या अनुभवाचे सर्व पापुद्रे उलगडताना कवीलाच क्लेश पडतात. प्रत्येक अलवार पापुद्रा कलात्मक पातळीवर पोहचतो, तेव्हा येणारा दुर्बोधतेचा दोष कवीचा नसतो, त्या व्यामिश्र अनुभवाचाच तो

विशेष असतो. कवीकडून त्या अनुभवाला कलारूप मिळूनही तो सहजासहजी आकलनग्राह्य होऊ शकत नाही. ''काही कविता'च्या बाबतीत हे स्पष्टीकरण समर्थनीय आहे. जगावेगळा अनुभव येणाऱ्या मोजक्या भाग्यवंतांच्या बाबतीत वाचकही तेवढे औदार्य बाळगू शकतो. पण एरवी वाचकनिरपेक्षतेचा आव आणणे केवळ अहंपीडितांना शोभण्यासारखे आहे. साहित्यकलेला दीर्घायुष्य ज्यांच्या आस्वादनशीलतेमुळे मिळू शकले, त्या वाचकाबद्दलची ती कृतघ्नताही ठरण्याचे भय आहे.

'कालोह्ययं निरवधिर्विपुलाचा च पृथ्वी ·।' असे उद्‌गार भवभूतीला निराशेपोटी काढावे लागले आहेत. आढ्यतेपोटी नाहीत. हे लक्षात घेतलेले बरे. एखादी कविता निर्माण करून कवी संतुष्ट होईल. काही दिवसांनी त्याचे आयुष्यही संपुष्टात येईल. पण आकलनसलभतेच्या गुणांमुळे रसिक शतकानुशतके त्या कवितेचे लालन करीत राहील व त्या कवीचेही नाव घेत राहील.

एकीकडे वाचकाला असे तुच्छ लेखणे व _ कड त्याच्याकडून कातुकाचा अपेक्षा बाळगणे असे दुटप्पी वर्तन प्रतिभावंतांकडून अपेक्षित नाही. केवढाही मोठा प्रतिभावत झाला, तरी तो फक्त निर्मितीच्या वेळीच कलावंत असतो. (आणि त्या वेळी फक्त तो कलावतच असतो.) कलेची समाधी उतरल्यावर तो सर्वसामान्य माणूसच उरतो. विकार-वासना, लोभ-मोह, स्वार्थ-असूया इ. माणसाच्या सर्व मर्यादा त्यालाही असतात. निर्मितीच्या वेळी कवीला 'बोला हवे ते मला काय त्याचे, पुरे जाणतो मीच माझे बल' असा आत्मसामर्थ्याचा केवढाही मोठा साक्षात्कार झाला, तरी तेवढ्यावरच त्याचे समाधान नसते. तो कैफ ओसरल्यावर 'उणीव रसिकांचीच परी । आज भासते खरोखरी' अशी हळहळ व्यक्त करायला तो मोकळा होतो. तेव्हा रसिकमान्यता ही कवीची भूक नसली, तरी तहान असते,हे नाकारण्यात अर्थ नाही.

राजशेखराने वाङ्‌मयाचे दोन प्रकार कल्पिले आहेत. तो म्हणतो-

*'वाङ्‌मय द्विविधं । शास्त्र काव्यं च '* त्यानुसार शास्त्र आणि काव्य म्हणजे प्रबोधनात्मक व ललित असे वाङ्‌मयाचे दोन प्रकार मान्य करता आले, तर सामाजिक सस्कारातले वैचारिक वाङ्‌मयाचेही योगदान आपल्या लक्षात येऊ शकेल. स्वरूपभिन्नतेमुळे ललित वाङ्‌मयाच्या आस्वादकांपेक्षा वैचारिक वाङ्‌मयाच्या जिज्ञासूंची संख्या अल्प राहणे स्वाभाविक आहे. ललित वाङ्‌मयाकडून प्रथमदर्शनीच आल्हादाचे आश्वासन मिळत असल्याने त्याची लोकप्रियताही अधिक असणार. आल्हादाबरोबरच माणसाची जाणीव प्रगल्भ करण्याचे व जीवनाबद्दलची उमज सखोल करण्याचे कार्य अबोधपणे ललित वाडमयाकडून होते, तसे सुबोधपण ते वैचारिक वाङ्‌मयाकडूनही होत असते. ललित वाङ्‌मय जे नेणीवपूर्वक करते, तेच वैचारिक वाङ्‌मय जाणीवपूर्वक घडवून आणते. ललित व वैचारिक हे दोन्ही वाङ्‌मयप्रकार अनुक्रमे प्रतिभाजन्य व प्रज्ञाजन्य मानले जातात. पण सूक्ष्मपणे विचार केला, तर ललित वाङ्‌मयाच्या रूपनिश्चितीला

झालेले प्रज्ञेचे साह्य जसे नाकारता येत नाही, तसे एखाद्या नवीन विचाराच्या स्फुरणामागचे प्रतिभेचे ऋणही अमान्य करता येत नाही. विचाराचे विश्लेषण, विवेचन, व्यवस्थीकरण करणे बुद्धिमत्तेचे काम असले, तरी मूळ विचाराचे, नव्या अपूर्व अन्वयार्थाचे किंवा संगतीचे स्फुरण प्रतिभेशिवाय शक्य होत नसते. तेव्हा प्रज्ञा व प्रतिभा, बुद्धी व भावना असा भेद करून वैचारिक वाङ्‌मयाशी होणाऱ्या पक्षपाताचे समर्थन करण्यात अर्थ नाही. स्थूल अर्थाने वैचारिक वाङ्‌मय त्यामुळे सृजनशीलच ठरते.

लालित्याच्या अनुपानासह आलेल्या आशयघन वैचारिक साहित्याचे उज्ज्वल उदाहरण आपल्याला विनोबांच्या साहित्यात आढळेल. विनोबांनी मोजकीच पण मूल्यवान ग्रंथसंपदा निर्माण केली आहे. गीताई, गीताप्रवचने, उपनिषदांचा अभ्यास, स्थितप्रज्ञदर्शन, स्वराज्यशास्त्र व विचारपोथी या विनोबांच्या वाङ्‌मयकृती आकाराने वामन असल्या तरी प्रभावाने नरसिंह आहेत. अत्यल्प शब्दात व सूत्रमय आर्ष शैलीत विनोबांनी जीवनाशयाच्या विशाल लेण्या प्रगट केल्या आहेत. विनोबा-वाङ्‌मय म्हणजे देशीयेच्या क्षोणीमध्ये उघडलेल्या साहित्यसोनियांच्या खाणी आहेत. त्यांचे शब्दही अत्यंत नीटस, नेमके, बोलके, नादमय अशा मराठमोळ्या सौदर्याने माखलेले आहेत. याखेरीज भूदान यात्रेच्या निमित्ताने त्यांनी लिपीमुक्त वाङ्‌मयाचीही विपुल निर्मिती केली आहे. (सुदैवाने ते सर्व वाङ्‌मय आज लिपीबद्ध स्वरूपात आले आहे.) या सर्व विनोबा-वाङ्‌मयाचा भारतातील सर्व भाषांमध्ये अनुवाद होऊन महत्तम प्रसार झालेला आहे. पुढील वर्षी येणाऱ्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने या वाङ्‌मयाचा ललित साहित्याच्या उपासकांनी आस्वाद घेण्याचे ठरवले, तर मराठी साहित्यातील आतापर्यंतच्या अलक्षित पण श्रीमंत दालनाकडे पाठ फिरवल्याबद्दल त्याला हळहळ वाटल्याशिवाय राहणार नाही.

वैचारिक साहित्याबरोबरच प्रबोधनात्मक साहित्याचेही मराठी माणसाला झालेले योगदान लक्षात घेणे क्रमप्राप्त ठरेल. काळाच्या गरजेनुसार शब्दांच्या द्वारा अशा वाङ्‌मयाने केलेल्या प्रचंड लोकजागृतीचे फलित म्हणूनच आपली स्वातंत्र्याची व विकासाची स्वप्ने साकार होऊ शकली हे आपल्याला विसरता येणार नाही. राष्ट्रसंत तुकडोजी महाराज यांच्या लिखित वाङ्‌मयाचे व गाडगे महाराज यांच्या लिपिमुक्त वाङ्‌मयाचे बहुजन समाजावरील ऋण फार मोठे आहे. राष्ट्रसंतांच्या संस्कारोन्मुख लोकप्रिय गीतांना अनेक ठिकाणी आपोआप काव्याचा स्पर्श झालेला आहे. राष्ट्रसंतांची 'ग्रामगीता' म्हणजे तर एका समाजमनस्क संत पुरुषाचे जीवनोपनिषदच आहे.

साहित्यविचाराने नेहमी श्रेष्ठ कलात्मक साहित्याची दखल घेणे स्वाभाविक आहे. त्यातूनच वाङ्‌मयीन निकष व मूल्ये निष्पन्न होत असतात. अशा साहित्यकृती आपल्या कलागुणांनी तळपत राहिल्यामुळे त्यांच्या प्रकाशात नंतरच्या साहित्याला निर्वेधपणे आपली वाटचाल करता येते. त्यामुळे चर्चा नेहमी निखळ साहित्यमूल्यांचीच होणे आवश्यक व रास्तही आहे. मर्ढेकरांच्या 'प्रेमाचे लव्हाळे' या पहिल्या नवकवितेला

या वर्षी पन्नास वर्षे पूर्ण झाली. त्यामुळे त्यांनी प्रवर्तित केलेली नवीन कलामूल्ये, दिलेली नवीन वाङ्मयीन दृष्टी, त्यांचे साहित्यविचार यांना पुन्हा नवा उजाळा देण्याचे प्रयत्न समीक्षाक्षेत्रातील प्राज्ञांकडून होणे अपेक्षितच आहे. साहित्याची नवी रूपे, नवी वळणे, नवी प्रयोजने, नवे आशयबंध ह्यांच्या अनुषंगाने आता नवे निकषही निर्माण होणे क्रमप्राप्त आहे. साहित्य, कला आपले नवे चैतन्य प्रगट करते, तसे तिचे रूपवैशिष्ट्य, प्रयोजन व सामर्थ्य समजावून घेण्यासाठी व देण्यासाठी समीक्षकांना नवे निकष शोधावे लागतात किंवा सिद्ध निकषांची नवी मांडामांड करावी लागते. कलेच्या नित्यनूतन विकसनाबरोबर साहित्यविचारही आपोआप नव्या रीतीने प्रगट होत जातो. निकषांच्या चौकटीला न जुमानता व सर्वभक्षक कालाचाही पराभव करून ज्या साहित्यकृती सनातनासाठी लखलखत राहिलेल्या असतात, त्यांच्याही चिरयौवनाचे व लावण्याचे रहस्य समजून घेण्यासाठी नव्या नव्या निकषाचे सशोधन व उपयोजन होत असते. आपल्या मूल्यमापनासाठी सिद्ध व नवप्रस्थापित निकषांची होणारी तारांबळ पाहून नित्यनूतन साहित्यकृती आपल्याशीच मंद मंद स्मितहास्य करीत असते. सर्व जुन्या नव्या निकषांच्या तळमळीच्या खटाटोपीनंतरही अगम्य राहिलेल्या स्वतःच्या रूपरहस्याचा एखादा उन्मेष ती मोनालिसाच्या स्मिताप्रमाणे हळूच प्रगट करते व मूळचे गूढ अधिकच वाढवते.

अधून-मधून निर्माण होणाऱ्या अशा जिवंत व सच्च्या कलाकृतीला प्रचलित निकषांचा फेरविचार करायला लावण्याची आवडच असते.

हे झाले थोर कलाकृतीबद्दल. मानदंड नेहमी हिच्यामुळे व हिच्यासाठीच निर्माण होत असतात.

पण हे मानदंड प्रत्यही उगवणाऱ्या सर्वच साहित्यकृतींना सरसहा लावणे न्यायाचे होईल काय ?

-हा प्रश्न उपस्थित होण्याचे कारण, लेखनक्षेत्रातील परिस्थिती गेल्या पाच दशकात फार झपाट्याने बदलून गेली आहे. आपल्या शिक्षणप्रसाराचा वेग व व्याप्ती पाहता समाजाच्या सर्वच स्तरांमधून कधी नव्हे एवढी वाचनाची आवड व लेखनाची ऊर्मी वाढीला लागली आहे. साहित्याशी आतापर्यंत हक्काचे संबंध असलेल्या मध्यमवर्गीय भाजून काढतील इतके अपरिचित व दाहक अनुभव पहिल्यांदाच शब्दबद्ध होऊ लागले आहेत. अवकाशाच्या ओसाडीतील अनंत मूक पडसादांना आता प्रथमच वाचा फुटत आहे. त्यातून अनेक लपलेले लेखक अपूर्वाईने व आत्मविश्वासाने आत्माविष्कार करू लागले आहे.

या लेखनाच्या प्रेरणा विविध प्रकारच्या असू शकतील. अनुभवाचे व अभिव्यक्तीचे सच्चेपण व वेगळेपण हेच अशा वाङ्मयकृतींचे लक्षणीय वैशिष्ट्य आहे. या वेगळेपणामुळेच जाणकारांच्याही पसंतीला या वाङ्मयकृती पात्र ठरत आहेत. श्रेष्ठ कलाकृतीबद्दलच्या सिद्ध निकषांची सबब सांगून या धगधगत्या अनुभवांना अडसर घालण्याचे पांढरपेशी

प्रयत्न उत्तरोत्तर लटके पडत जाणार आहेत. जेव्हा चाकोरीपेक्षा नवे अनुभव वाङ्मयात प्रविष्ट होतात तेव्हा मूल्यमापनासाठी ते नव्या निकषांना खुणावीत असतात. रुढ कसोट्यांच्या द्वारे डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांचे कादंबरीपण नाकारण्यात आल्यावर बेगुमानपणे डॉ. केतकर समीक्षकांना म्हणाले होते, 'तुमच्या कसोट्यांना माझ्या कादंबऱ्या उतरत नसतील, तर कसोट्या बदला.' एखाद्या विद्वान समाजशास्त्रज्ञाला आपल्या लेखनातील वेगळेपणाच्या जाणीवेमुळे असे दरडावून बोलता आले. नव्या वाङ्मयकृती समीक्षेजवळ तीच मागणी अजीजीने करतील. अशा वाड्मयकृतीना कलामूल्यांच्या नावावर निकालात काढणे अवघड नसून त्यांचे वाड्मयमूल्य अमान्य करणे सोपे नाही. हा पेच सोडवण्यासाठीच समाजशास्त्रीय, राजकीय, प्रादेशिक, ग्रामीण, विज्ञान व दलित कादंबरी अशा संज्ञा चलनात आल्या. वसंत वरखेडकरांचे 'प्रतिनिधी', ग. प्र. प्रधानांचे 'साठा उत्तराची कहाणी', चळवळीवरील ग्रंथालीच्या कादंबऱ्या, कादंबरीच्या अंगाने जाणारी दलित आत्मकथने, अनिल अवचटांचे वृत्तांतवजा लेखन, वासंती मुझुमदार, शरदिनी डहाणूकर आणि विशेषत: यशवंत पाठक यांचे कामरूप ललित गद्य अशा वाङ्मयकृतीची व्यवस्था एरव्ही आपण कशी लावणार ? कथा, कविता, कादंबरी या वाङ्मयप्रकारांमध्ये अलीकडे उत्साहाने होणारे विपुल लेखन आतापर्यतच्या सीमारेषा पुसून टाकत आहे. नाट्यछटेप्रमाणेच लघुनिबंधही आता अस्तंगत होत असून शब्दचित्र, ललित चिंतन, आत्मकथन, गद्यकाव्य यांची ललित गद्याच्या नावाने परस्परांमध्ये विलक्षण सरमिसळ होत आहे. हरिभाऊंची गोष्ट आज कादंबरीत सहज खपून जाईल व त्यांच्या कादंबरीला गद्य महाकाव्याची मान्यता मिळेल.

वाढत्या संख्येबरोबर वाड्मयकृतीची रूपेही आता वेगाने बदलत आहेत खंडकाव्ये, कथात्मक दीर्घकाव्ये, विषयनिष्ठ काव्ये आता गतार्थ झाली असून आत्मलक्षी कविता गवता ऐसी उदंड वाढत आहे. वस्तुनिष्ठ वैचारिक कवितेची जागा लयबद्ध चिंतनिकांनी काबीज केली आहे. बाह्य वास्तवाची आत्मनेपदी प्रतिक्रिया काव्यात वैपुल्याने उमटत आहे. आवेशपूर्ण गद्यप्राय उद्‌गारांना कवितेचे प्रमाणपत्र मिळण्याच्या वाढत्या सोयीमुळे लयतालाचे बंधन मानणाऱ्या कवितेला संकोचल्यासारखे होत आहे. कवितेबद्दलच्या आजवरच्या सर्व नाजुक साजुक कल्पना सोडून द्याव्या लागत आहेत. परंपरागत प्रतिमाने अग्राह्य ठरत असून पूर्वी वाचेमध्ये बरवे मानले गेलेले कवित्वही कवितेसाठी अनावश्यक ठरू लागले आहे. अशा वेळी वृत्तदर्पण, अलंकारचंद्रिका, छंदोरचना व रीतिगुणरसादि सौदर्यतत्त्वे अर्थशून्य ठरत असून सामाजिक आशय, बांधिलकी, काव्यात्मकता हे नवे निकषही हंगामी ठरण्याचे भय आहे

काही वर्षापूर्वी नवीन प्रवाहसुद्धा जुन्या चाकोरीत बसवून दाखवण्याची प्रवृत्ती होती. त्यातूनच रसचर्चेचा व रसव्यवस्थेचा पुनर्विचार करण्याची गरज निर्माण झाली. परिणामी वात्सल्य, प्रक्षोभ, क्रांती, मानवता यांनाही रसत्व मिळून रसव्यवस्थेत त्यांचा

समावेश करण्याचा प्रयत्न झाला. आज पुरोगामी, मार्क्सवादी, आंबेडकरवादी अशा नव्या नामपट्टिका उपलब्ध झाल्या असल्या तरी कवितेचे स्वत:सिद्ध श्रेष्ठत्व ठरवण्याची उत्तरे देण्यास त्या असमर्थ ठरतील. आज मर्ढेकर, विंदा करंदीकर, नारायण सुर्वे व दलित कवीच्या साहित्याचे सामर्थ्य नेमके कशात आहे हे समजावून सांगण्याचा आग्रह आकृतिवाद्यांना होत असून ना. घ. देशपांडे, महानोर, ग्रेस ह्यांच्या कवितेची वैशिष्ट्ये समजावून सांगणे आशयवाद्यांना अवघड होत आहे.

महाकाव्याची किंवा निबद्ध काव्याची लक्षणे अनिबद्ध व स्फुट काव्याला लागू पडत नाहीत. प्रत्येक नव्या समर्थ वाङ्मयकृतीसाठी व प्रवाहासाठी नवी लक्षणे व नव्या कसोट्या बांधाव्या लागतात. त्यानंतर काही काळ या नव्या निकषांच्या जरबेखाली अनुकरणशील निर्जीव कविता निर्माण होतात. आधी काव्य व नंतर काव्यशास्त्र हा नैसर्गिक क्रम बदलून आधी काव्यशास्त्र व त्यानंतर काव्य असा अनैसर्गिक क्रम प्रचलित झाल्यावर 'कविता लतिकेवरती । कर्णिकार सुमनांची भरती' झाल्यास उपाय नाही.

सर्व वाङ्मयप्रकारांना व वाङ्मयकृतीना योग्य न्याय देता यावा, यासाठी त्यांची प्रतवारी निश्चित करणे अगत्याचे आहे. श्रेष्ठ साहित्य, चांगले साहित्य, प्रबोधनात्मक साहित्य, प्रचारात्मक साहित्य, करमणुकीचे साहित्य अशी साहित्याची विभागणी व प्रतवारी करून त्यांचे स्वतंत्र निकष निश्चित केल्यास समग्र साहित्यसंपदेतील त्यांचे स्थान, योगदान व मूल्य निश्चित करता येईल. श्रेष्ठ साहित्याचा एकच दंडक सर्वांना लावून निकालात काढले जाणे न्याय्य ठरणार नाही. काही साहित्यकृतीचा जीवच लहान असतो. अशा वेळी दंवबिंदूची समुद्राशी तुलना होऊ नये. दंवबिंदूचे थरथरते व चकाकते सौंदर्य वेगळे व समुद्राचे विराट व गहन सौंदर्य वेगळे. समुद्र आवडणाऱ्यांनी दंवबिंदूला धिक्कारले, तर अरसिकतेचा दोष पदरी येईल. म्हणूनच दोन भिन्न वाङ्मयकृतीतील सौंदर्याचे व परिणामांचे तारतम्य बाळगणे निर्मळ व निर्लेप मूल्यमापनाच्या दृष्टीने इष्ट असते. काही साहित्यकृतीची आकांक्षा व प्रतिज्ञाही मर्यादित असते. हाताशी असलेल्या निकषांचा जाच झाला नाही, तर स्वत:च्या प्रतिज्ञेपुरते समाधान त्या निश्चितच वाचकांना देतील. संत काव्य, पंत काव्य, तत काव्य, कला काव्य यांपैकी प्रत्येकाचे प्रयोजन, विहारक्षेत्र, स्वरूप व प्रभावक्षमता भिन्न भिन्न आहेत. ते लक्षात घेऊन त्या वाङ्मयप्रकाराला किंवा वाङ्मयकृतीला सामोरे गेलो, तर आपल्याला निराश होण्याचे वा आपल्याकडून अन्याय होण्याचे भय नाही.

आज सुदैवाने विविध प्रकारचे विपुल साहित्य निर्माण होत आहे. त्यानुसार समीक्षा डोळस, उदार व सर्वस्पर्शी होण्याची गरज आहे. कारण साहित्याची बहुआयामी वाढ होऊनही समीक्षा आपल्याच आवर्तात गरगरताना दिसत आहे. अधिकाधिक तंत्रग्रस्त होत चालली आहे. वाङ्मयकृतीतील ताजेपणाचा व सळसळत्या सजीवत्वाचा वेध घेण्याऐवजी तंत्रात्मकतेचा सूक्ष्मातिसूक्ष्म कीस पाडण्यातच ती दंग आहे. नवे ताजेतवाणे

लेखक, अनर्घ्य सतेज अनुभव, व ताजी रसरशीत अभिव्यक्ती हे खरे म्हणजे समीक्षेला उत्तेजित करणारे चेतकच नाहीत काय ? त्यांच्याकडे पाठ फिरवून तंत्रांचा व नियमांचा काथ्याकूट केल्याने समीक्षा कर्कश होत गेली की एखाद्या 'बी' कवीला-

*कर्कशशुष्क तर्कनिपुण*
*प्राज्ञवर पंडित परिपूर्ण*
*हे तो विशाल मणिगोटे*
*भिजले नच सद्रस लोटे*

-असे खडसावण्याची पाळी येते.

संस्कृत साहित्यविचार जसजसा अग्रेसर होत गेला तसतशी त्यातही ही पिंजण व गुंतागुंत वाढत गेली. भरताचे एखादे 'नाट्यशास्त्र' निर्माण होते, आनंदवधनाचा एखादा 'ध्वन्यालोक' लिहिला जातो. त्यानंतर त्यावर भाष्यकारांची झुंबड तुटून पडते व मूळ शास्त्रकाराचे एखादे सूत्र प्रमाणाबाहेर ताणण्यातच त्यांना कलेतील कैवल्य गवसल्याचा आनंद होतो. नाट्यशास्त्राने आरंभ, यत्न, प्राप्त्यांशा, नियताप्ति व फलागम हे पंचसंधी सांगितल्याबरोबर त्याचे मुख-प्रतिमुख, गर्भ-अवमर्ष, निर्वहण असे पाच उपप्रकार निघतात. लगेच मुखाचे उपक्षेप, परिकरादि बारा प्रकार, तर प्रतिमुख संधीचे विलासपरिसर्पादि तेरा प्रकार उपसले जातात. प्रत्येक संधीचे असे तेरा प्रकार होऊन संधीची संख्या वाढत जाते.

अलंकारांचेही तेच. एकट्या उपमेचेच पंचवीस भेद, व्यतिरेकाचे अठ्ठेचाळीस, तर उत्प्रेक्षेचे शहाण्णव भेद सांगितले जातात.

नायिकेचे स्वाधीनपतिकादि आठ प्रकार सुपरिचितच आहेत. त्यातही बारीक-सारीक श्लेष काढून शेवटी नायिकांची संख्या तीनशे चौऱ्यांशी म्हणजे अठ्ठेचाळीस पट वाढत जाते.

आनंदवर्धनाने ध्वनीला काव्यात्मा ठरवले. ध्वनीचे मुख्य दोन भेद- अविवक्षितवाच्य व विवक्षितांन्यपरवाच्य-त्याचे पुन्हा दोन भेद-अर्थातर संक्रमित व अत्यंत तिरस्कृत. असे ध्वनीचे शुद्धभेद एक्कावन्न तर मिश्रसहित भेदांची संख्या तेराशे सव्वीस.

एवढ्यावरच टीकाकारांचे समाधान झाले नाही. संसृष्टीसंकरासकट ध्वनिभेदांची संख्या विद्यानाथाच्या मते पाच हजार तीनशे चार, तर मम्मटाच्या मते दहा हजार चारशे चार होते. या टीकाकारांच्या बिचाऱ्यांच्या हेही लक्षात येत नाही की सूक्ष्मतम कीस पाडून ध्वनीची संख्या हजारावर वाढवण्याने व्यंगार्थातला आनंद वाढत नसतो, तर काळवंडून जातो. समीक्षकांची ही साहित्यवियुक्त बौद्धिक क्रीडा समीक्षकांनाच आनंददायी ठरते. खुद्द प्रतिभावंताला किंवा रसिकाला तो आनंद मिळेल की नाही, हा संशोधनाचा विषय ठरावा.

सिद्धनिकषावलंबन, आत्मप्रीती व साहित्यविन्मुखतेमुळेच आरंभीच्या काळात दलित साहित्य व नारायण सुर्वेच्या कवितेला न्याय मिळण्यास उशीर लागला. या सूर्यकुलोत्पन्न साहित्याचे नेमके बलस्थान शोधण्यातही कुचराई झाली. बव्हंशी साहित्यबाह्य कारणांसाठी शब्दावडंबराच्या पालखीत या साहित्याच्या मिरवणुका निघाल्या. चुकीच्या मुद्यांवर केलेली प्रशंसा ही एका अर्थाने अवहेलनाच असते, हेही लक्षात घेतले गेले नाही.

गेल्या दशकभरात आविष्कारस्वातंत्र्याचा प्रश्न साहित्य क्षेत्राला फार भेडसावीत आहे. सलमान रश्दी, तसलिमा नसरीन यांच्या निमित्ताने या प्रश्नाने केवढे प्राणांतिक रौद्ररूप धारण केले आहे हे आपण सगळेच संचित होऊन सध्याच अनुभवीत आहोत. ललितकृतीतील एखादे चित्रण, वैचारिक लेखनातील एखादा निष्कर्ष, ऐतिहासिक घटनेचा एखाद्या अन्वयार्थ पारंपरिक मनाला भावेनासा झाला, की त्यातून एकदम सामाजिक प्रकोपाची ठिणगी पडते, पाहता पाहता त्याचा वणवा भडकतो व त्यात तो लेखक बिचारा होरपळून निघतो. विशेषत: रूढ संकेतांच्या, सामाजिक श्रद्धेच्या, विभूतिपूजेच्या व धार्मिक भावनेच्या संदर्भात लोकक्षोमाचे असे उद्रेक वरचेवर होताना दिमतात. लोकमानस सामान्यपणे भावनाप्रान व परंपरापूजक असते आणि समूहाची विवेकबुद्धी बहुधा अपंगच असते. या लोकभावनेला प्रदीप्त करण्याचा प्रयत्न कुणीही केला तरी तृणपुंज-स्फुल्लिंग न्यायाने त्याचा भडका उडण्यास वेळ लागत नाही. माणूस व्यक्तिश: विचार करू शकतो, कार्यकारणभाव समजून घेऊ शकतो; पण झुडीला ते शक्य नसते. झुंडीला मेंदू तर नसतोच पण डोळेही नसतात. असतात फक्त शस्त्रधारी हात. त्यांच्या साह्याने भावविद्धतेचा सूड व्यापक विध्वंसाने घेतला जातो. यातूनच विचारस्वातंत्र्याचे, अभिव्यक्तिस्वातंत्र्याचे प्रश्न उत्पन्न होतात. अशा वेळी प्रज्ञावंतांचा शहाणा व सावध तोडगा 'विचाराचा मुकाबला विचारानेच झाला पाहिजे' असा निघतो व अर्थातच ते अविलंबे विद्वन्मान्य ठरतो. पण अविचाराच्या कर्कश कोलाहलात विवेकबुद्धीचा हा क्षीण आवाज संबंधितांच्या कानांपर्यंत पोचू शकत नाही. शेवटी प्रलयापासून अलिप्त राहण्याचा सदैव कटाक्ष बाळगणाऱ्या विचारवंतांच्या आत्मसंतुष्ट चर्चेसाठी तो मुद्दा शिल्लक राहतो.

प्रलय ओसरल्यावर तरी या विषयांच्या इतर बाजूंबाबत सखोल विचार होण्याची आवश्यकता सर्वमान्य व्हायला हरकत नाही. आविष्कारस्वातंत्र्याच्या मुद्यालाही शिक्षितांच्या यात्रेमध्ये सवंग स्वरूप येत चालले आहे किंवा काय, हेही एकदा तपासले गेले पाहिजे. त्याशिवाय या मुद्यावर लोकक्षोभ व वादांची वादळे वरचेवर उत्पन्न होण्याचे थांबणार नाही. लोकक्षोभाचे इष्टफलदायी नेतृत्व करणारी मंडळीही एरवीच्या स्वस्थतेच्या व शांततेच्या काळात आविष्कारस्वातंत्र्याचे महत्त्व डोळे मिटून मान्य करीत असतात. लोकक्षोभाचा लाभ उठवण्याची संधी साधण्याचे आपले स्वातंत्र्य अबाधित ठेवूनच

आविष्कारस्वातंत्र्याच्या मुद्याला ते साळसूदपणे मान्यता देत असतात.

लेखनक्षेत्रातील स्वातंत्र्याचा प्रश्न हा मुख्यत: वाचकसापेक्षतेतूनच उत्पन्न झालेला असतो हे पहिल्यांदा डोळसपणे लक्षात घ्यायला पाहिजे. एरवी निर्मिती स्वातंत्र्याबद्दल कोणाचा आक्षेप असण्याचे कारण नाही. आपापल्या क्षेत्रात 'जो जे वांच्छील तो ते लिहू' शकतो. त्याला कुणाचीही आडकाठी येण्याची भीती नाही. पण आपण लिहिलेले कुणी तरी वाचावे, अशी एकदा अपेक्षा निर्माण झाली, की वाचकांच्या इष्टानिष्ट प्रतिक्रियांचा ससेमिरा चुकविता येत नाही. त्यातील अनुकूल प्रतिक्रिया हमखास सुखद ठरतात. प्रतिकूल प्रतिक्रिया तेवढ्या प्रश्न जन्माला घालतात. प्रतिकूल प्रतिक्रिया प्रकट करणाऱ्यांचे अभिव्यक्तिस्वातंत्र्य सामान्यपणे लेखकांना मानवत नाही. लेखकाला लिहिण्याचे व विचार व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य आहे, तसेच वाचकाला वाचण्याचे व अभिप्राय व्यक्त करण्याचे स्वातंत्र्य असावे, हे सहजासहजी गृहीत धरले जात नाही.

स्वातंत्र्याच्या बाबतीत पंक्तिप्रपंच करण्याचा आग्रह वेगळ्या मुखवट्याखाली कित्येकदा धरण्यात येतो. लेखक-वाचक यामध्ये भेद करणे अशांच्या मते भाग पडते ते या मुद्यावर, की लेखक हा प्रतिभासंपन्न, व्यासंगसमृद्ध,चिंतनशील प्रतिभावंत असतो. म्हणून त्याची इयत्ता नेहमीच वाचकांपेक्षा वरची असते. हा युक्तिवाद वरपांगी वाचकवर्गाचा सराईत उपमर्द करणारा वाटला, तरी तो मुख्यत: लेखकाचा व्यवच्छेद विशद करणारा आहे. त्यामुळे चर्चेपुरता तो मान्य व्हायला हरकत नाही. मुख्य मुद्दा आपल्या समाजात एखाद्याला निर्मितीचे वा लेखनाचे स्वातंत्र्य आहे किंवा नाही हा आहे. त्याचे उत्तर नि:शंकपणे होकारार्थी आहे. जिथे या लेखनाचा व निर्मितीचा वाचकांशी संवाद सुरू होतो, तिथे त्याच्या परिणामांचाही विचार करण्याची जबाबदारी पत्करावी लागते. वाचकांच्यापक्षी आल्हाद, उद्बोधन, संस्कार, अनुभवाचे वैचित्र्य, व्यक्तित्वाची समृद्धी, प्रबोधन, विचारप्रवणता हे साहित्याचे परिणाम लेखकांच्या मते अपेक्षित असतात. पण याव्यतिरिक्त नको ते अनपेक्षित अप्रिय परिणामही होण्याचे भय नाकारता येत नाही. साहित्यकृती बहुमुखी असते, तसा विचारही इंद्रासारखा सहस्राक्ष असतो. त्यातून ज्याच्या त्याच्या संवेदनक्षमतेपुरते व विचारशक्तीइतके प्रत्यय येणे सहज शक्य आहे. ज्ञानेश्वरीत दृष्टांतादाखल सोन्याचे 'साडेपन्हरे' असे नामकरण आढळले तर त्यातून निघणारा 'यादव काळामध्ये सोन्याचा भाव साडेपंधरा रुपये होता' असा शोध एखाद्याला अधिक उपयुक्त वाटू शकेल. तेवढेच निदर्शनास आणण्याचा ज्ञानेश्वरीचा उद्देश आहे काय, याचा तो विचार करणार नाही. वाङ्मयकृतीतून उन्मीलित होणाऱ्या एखाद्या छटेमुळे कुणाच्या भावना दुखावल्या व त्यातून लोकक्षोभ उसळला, तर तेवढ्यासाठी ती अख्खी वाङ्मयकृती निकालात निघते. लोकांना प्रतीत झाले, ते (वा तेवढेच) त्या वाङ्मयकृतीला अभिप्रेत नव्हते, हे खुद्द लेखकाने वा त्याच्या समर्थकांनी कितीही जीव तोडून सांगितले, तरी ते यामुळेच निष्फळ ठरते

रूढ नीतिनियम, सामाजिक संकेत, लोकश्रद्धा यांची तमा न बाळगता ज्यांना आपल्याला भावलेली अपूर्व व लोकोत्तर प्रतीती व्यक्त करण्याची अनावर उर्मी असेल, त्याने या असामान्य अभिव्यक्तीचे मूल्य चुकवण्याची मानसिक तयारी ठेवलेलीच्च असणार ! त्याखेरीज रुढ समजुतीच्या जुनाट शृंखला निखळून पडणार नाहीत, मुक्त विचार पुढे जाणार नाही, व समाजमन प्रगत होणार नाही. उभयपक्षी दांडगाईने हा प्रश्न सुटणार नाही. समाजमन प्रगल्भ करण्याची इतिहासदत्त जबाबदारी ज्याला पत्करायची असते, तो त्या क्रांतिकारक कृतीचे तात्कालिक मूल्य चुकवण्यास खळखळ करणार नाही.

शवटी आविष्कारस्वातंत्र्य हा संपूर्ण मानवमुक्तीचाच एक अंश आहे. समग्र स्व. ंत्र्याचा विशाल अर्थ उमगल्याशिवाय सुट्या सुट्या स्वातंत्र्याच्या आंदोलनांना बळ येत नाही 'बी' कवी म्हणाले होते-

*ते स्वातंत्र्य खरे न,*
*फक्त अपुली जे तोडिते बंधने*
*अन्यांच्या पदशृंखलांस बघते*
*निष्कंप ऐशा मने*

आपल्या स्वातत्र्याची आच बाळगणारा मनुष्य दुसऱ्यावेही पारतंत्र्य सहन करणार नाही समग्र स्वातंत्र्याचे मोल जाणणारा मनुष्य आविष्काराचे पारतंत्र्य सहन करणार नाही. म्हणूनच समग्र स्वातत्र्यासाठी लढा देणाऱ्या सैनिकाला आविष्कार-स्वातंत्र्याच्या मागणीचा आपोआप नैतिक अधिकार पोचतो. कैद्याच्या फक्त हातातच हातकड्या घालतात. ह्याचा अर्थ हातच तेवढे बंधनात आहेत असा नाही. त्याचे अवघे अस्तित्वच बधनात असते. हातकड्या काढून घेतल्या आणि त्याच्या चालण्या-बोलण्यावरचे निर्बंध कायम ठेवले, तर माणूस मुक्त होत नसतो. माणूस तुरुंगातून सुटला, तर तो अखखाच्या अखखा सर्व अंगोपांगानिशी व मन·शक्तींनिशी सुटतो. स्वातंत्र्याचा हा व्यापक अर्थ लक्षात घेतला, की आविष्कारस्वातत्र्याच्या लढ्याला खरे बळ येते.

स्वातंत्र्य हे मानवान दीर्घ संघर्षातून संपादन केलेले एक सांस्कृतिक मूल्य आहे. हे मूल्य न कळलेले लोक शतकानुशतके पारतंत्र्यातले ऐषाराम आनंदाने चघळीत असतात. त्यांना स्वातंत्र्याची तहान कधी लागतच नाही याउलट स्वातंत्र्यभक्त गुलामीतल्या सुखविलासामध्येही अस्वस्थ असतो, तडफडत असतो. तशा व्यापक स्वातंत्र्याबद्दल उदासीन राहून केवळ अंगुष्ठमात्र अनुभवाच्या अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य मागणे कचखाऊपणाचे आहे.

गेल्या दशकात आविष्कारस्वातंत्र्याची मागणी करावी अशा समाजप्रकोपाच्या ज्या घटना घडल्या, त्यांचा अभ्यास या दृष्टीने फार उद्‌बोधक ठरेल. आचार्य तुलसी, रिडल्स ऑफ रामायण, कोल्हापूर गंझेटियर, लीळाचरित्र, मनुस्मृती, सहदेव भाडळी ही प्रकरणे व त्या निमित्त अस्तिपक्षी व नास्तिपक्षी झालेल्या लढाया परस्परविरोधी

प्रेरणेने तर झाल्या नाहीत ना अशी शंका घेण्यासारखे त्या वादंगाचे स्वरूप होते. विचारस्वातंत्र्याचे मूल्य मनापासून पटल्यास त्याचा लाभ निरपवादपणे सर्वांना देण्याची तयारी ठेवावी लागेल. आपल्या श्रद्धाकेंद्रांबद्दलचा हळवेपणा थोडा कमी करावा लागेल व दुसऱ्यांच्या श्रद्धाकेंद्राबद्दलच्या हळवेपणाची बूज राखावी लागेल. असे व्यापक उदारपण व आत्मसंयम अंगीकारल्याशिवाय स्वातंत्र्याच्या निमित्ताने उद्‌भवणाऱ्या द्वेषाच्या सामूहिक विषप्रयोगांना आळा बसणार नाही.

मराठीला कोशकारांची अभिमानास्पद परंपरा लाभली आहे. कोशयुगाचे जनक डॉ. केतकरांपासून डॉ. य. रा. दाते, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, प्रा. दे. द. वाडेकर, पंडित महादेवशास्त्री जोशी, प्रा. कृ. पां. कुळकर्णी, हणमंते यांच्यासारख्यांच्या अविश्रांत परिश्रमाने विविध प्रकारची कोशनिर्मिती मराठीमध्ये होऊ शकली. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे धर्मकोश, विश्वकोश व मीमांसाकोशाचे कार्य अभ्यासकांच्या दृष्टीने अतिशय मोलाचे आहे. प्रज्ञाभारती डॉ. श्री. भा. वर्णेकर व पंडित विश्वनाथ नरवणे या मराठी विद्वानांचे अन्य भाषातील कोशकार्यही भूषणावह आहे. या भूषणीभूत परंपरेत आता श्रीराम पांडुरंग कामत यांच्या विश्वचरित्रकोशाची अपूर्व भर पडणार आहे. जगाच्या ज्ञानविज्ञानादि विविध क्षेत्रांतील जवळ जवळ वीस हजार कर्तृत्ववंताच्या जीवितकार्याचा समावेश या कोशात होणार आहे. भारतीय भाषेत व्यापक प्रमाणातील हा पहिलाच प्रयत्न ठरणार असून कामत यांनी गेली अठरा वर्षे स्वत:ला याच कामासाठी वाहून घेतले आहे. महाराष्ट्रात कोणत्याही गोष्टीचा एकच ध्यास घेतलेल्या अशा निष्ठावंतांच्या एकाकी तपश्चर्येतून मराठीतील कोशयुग समृद्ध झाले आहे. भविष्यकाळाला उपयुक्त ठरणाऱ्या अशा प्रचंड कामाला हात घातल्याबद्दल कामत यांना वैफल्य उत्पन्न होण्याची पाळी येऊ न देण्याची जबाबदारी आता भाषा व वाङ्मयाच्या श्रीमंतीबद्दल आस्था असणाऱ्या केंद्र व राज्य शासनाची तर आहेच, पण सधन मराठी भाषकांचीही आहे.

कोशकार्याप्रमाणेच स्वत:च्या वेडापायी व एकट्याच्या बळावर विविध प्रकारच्या वस्तुसंग्रहालयांच्या प्रयत्नाचाही महाराष्ट्राला छंद आहे. विविध प्रकारची नाणी, प्राचीन व ऐतिहासिक वस्तू, एखाद्या कलाक्षेत्राविषयीचे अनंत संदर्भ, थोरांची हस्ताक्षरे यांचे एकत्र दर्शन अशा छंदामुळेच घडण्याची आशा असते. के. टी. देशमुख व पंडित यांचे रंगभूमीविषयक वस्तुसंग्रह, गो. ग. जोशी यांचा वास्तुविद्याविषयीचा वाङ्मयसंग्रह, राम देशपांडे यांचा नामवंतांच्या हस्ताक्षरातील लेखनसंग्रह-ही अशी चटकन आठवणारी उदाहरणे होत. आर्थिक परिस्थिती अनुकूल नसतानाही केवळ आपल्या ध्यासापोटी या छंदयोग्यांनी पदरमोड करून असे संग्रह जमवले व त्यांचे अपत्यवत् प्राणमोलाने संगोपन केले. या अनमोल संग्रहांचे आपल्या पश्चात काय होणार याची काळजी आयुष्याच्या सायंकाळी या सर्वांना पडणे स्वाभाविकच आहे. डॉ. य. खु. देशपांडे, वि. अं.कानोले यांच्या आयुष्यभराच्या अशा बहुमूल्य संपत्तीला त्यांच्या नंतर दक्ष वाली उरला नाही. या तपस्व्यांची

जीवनसाधना केविलवाणी होऊन कोळीष्टकांच्या वा वाळवीच्या भक्ष्यस्थानी पडते. आयुष्यभराचे तप वाया गेल्याची हळहळ या आत्म्यांना होऊ नये यासाठी जागरूकतेने व तत्परतेने पाऊल उचलण्याची जाग वेळीच आली, तरच काही उपयोग !

शेक्सपियर, वर्डस्वर्थ यांच्या गावी जाऊन त्यांच्या निवासस्थानाला कुतूहलाने भेट देणाऱ्यांच्या वाढत्या संख्येबद्दल वाचण्यात आले, की प्रत्येक वेळी श्रेष्ठ मराठी सरस्वतीपुत्रांच्या बाबतीतील आपले औदासीन्य प्रकर्षाने सलत राहते. विष्णुशास्त्री, आगरकर, शि. म. परांजपे, खाडिलकर, कोल्हटकर, तांबे, बी, सावरकर, पांगारकर यांच्या वास्तू, वस्तू व ग्रंथसंग्रह याबाबत असे कधी होऊ शकेल ? बंगालमध्ये रवींद्रनाथ व शरदबाबूंच्या निवासस्थानाबद्दल ही दक्षता घेतलेली आढळते. महाराष्ट्रात अशा संरक्षित वास्तू कधी उभ्या राहू शकतील ?

आचार्य जावडेकर, प्रियोळकर, कविवर्य गिरीश व माधव ज्युलियन यांच्या जन्माला यंदा शंभर वर्षे पूर्ण झाली. वैचारिक संशोधनपर वाङ्मयातील जावडेकरांचे व प्रियोळकरांचे योगदान मोठे आहे. विशेषत: गांधीजीच्या जन्माला सव्वाशे वर्ष पूर्ण होण्याच्या सुमारास 'आधुनिक भारत' कारांचे व महाराष्ट्र-गोमंतक संबंधाच्या नव्या पर्वाच्या पार्श्वभूमीवर प्रियोळकरांचे स्मरण होणे अपरिहार्य आहे. मराठी कविता जनसामान्यांपर्यंत लोकप्रिय करण्याच्या व मराठी कानांना काव्यश्रवणाची आवड उत्पन्न करून अभिज्ञतेचे व रसज्ञतेचे क्षितिज विस्तीर्ण करणाऱ्या माधव ज्युलियन व गिरिशांनाही कृतज्ञतेने अभिवादन करणे त्यामुळेच अगत्याचे ठरते.

तंजावरच्या 'सरस्वती महाल' या ग्रंथसंग्रहात अनमोल ग्रंथसंपत्ती संशोधकांची व अभ्यासकांची आसावून वाट पाहात पडून आहे. त्यातील निदान मराठी संस्कृतीशी संबंधित हस्तलिखिते वा त्यांच्या प्रतिलिप्या हस्तगत करण्याची त्वरा होणे आवश्यक आहे. ही हस्तलिखिते कोणत्याही कारणाने दुर्वाच्य किंवा दुष्प्राप्य होण्याच्या आधी महाराष्ट्रातील संशोधन संस्थांनी या बाबतीत पुढाकार घेणे निकडीचे आहे. पण खुद्द मुंबईच्या मध्यवर्ती ग्रंथालयाच्या दुर्दशेबद्दल जे वाचायला मिळते तेच मराठी मनाला अस्वस्थ करणारे आहे. मराठी भाषेत प्रसिद्ध झालेले प्रत्येक पुस्तक हमखास मिळण्याची हमी देणारे, महाराष्ट्रातील प्रमुख व एकमेव ग्रंथालय पुरेशा जागेच्या अभावी स्वकर्तव्याबाबत हतबल व्हावे, हे दृश्य केवळ चिंताजनकच नाही, तर उद्वेगकारकही आहे. प्रगत शासन म्हणून प्रसिद्ध असलेल्या महाराष्ट्राची ग्रंथालयाबाबतची भूमिका सुधारणेही आता अत्यावश्यक झाले आहे. 'गाव तेथे ग्रंथालय' ही आपली लोकप्रिय घोषणा कार्यान्वित करताना ग्रंथालय कर्मचाऱ्यांचे सेवानियम निश्चित करण्याचे प्राथमिक कामही अद्याप पूर्ण होऊ नये, यासाठी नेमलेल्या अभ्यास समित्याच्या अहवालावरही अंमलबजावणीच्या दृष्टीने पावले उचलली जाऊ नयेत, ही बाब नवशिक्षणाचा पहिला उष:काल झाल्याच्या धन्यतेच्या भरात विसरून चालणार नाही. राज्याच्या एकूण

महसूलाच्या १० टक्के रक्कम शिक्षण विभागावर खर्च होण्याची काळजी घेतली, तर ग्रंथालयांनाही आपल्या निर्वाहासाठी न्याय्य वाटा उपलब्ध होऊ शकेल.

भारताच्या सांस्कृतिक विकासावर केंद्र सरकारने गेल्या पस्तीस वर्षात ६० लक्ष कोटी रुपये खर्च केल्याचे सांगितले जाते. ही रक्कम एकूण वार्षिक महसूलाच्या ०.११ इतकी येते. संरक्षण व शिक्षणाच्या खालोखाल सांस्कृतिक विकासाला राष्ट्रीय नियोजनात अग्रक्रम कल्याणकारी प्रशासनात अभिप्रेत असतो. सध्या केंद्र व राज्य शासनातर्फे वेगवेगळे सांस्कृतिक विकासाचे उपक्रम आखले जात असतात. पण त्यात फार विस्कळीतपणा आहे व निश्चित दृष्टिकोनाचाही अभाव आहे. भारताचे सांस्कृतिक संचित मोठे आहे. सर्व भाषकांच्या इतिहासातील कलांच्या व लोककलांच्या परंपराही समृद्ध आहेत. संस्कृत भाषेतील व विविध प्रादेशिक भाषांमधील सर्व विषयांवरील ज्ञानसाहित्यही श्रीमंत आहे. याशिवाय स्थापत्य, वास्तू, शिल्प, चित्र, नृत्य, नाट्य, संगीत या सर्व कलांचा अत्यंत उज्ज्वल वारसा भारताला लाभलेला आहे. जुनी मंदिरे, किल्ले, उत्खनने, गोपुरे, लेण्या, गुहाचित्रे या देशाच्या सांस्कृतिक ऐश्वर्याच्या आठवणी जतन करीत आहेत. पौराणिक व ऐतिहासिक संदर्भ असलेल्या वास्तू व वस्तू यांचे संशोधन, संरक्षण व संगोपन होण्याच्या दृष्टीने शिक्षण, सांस्कृतिक संचालन, पुरातत्त्व अशा खात्यांचे सामंजस्यपूर्ण सहकार्य डोळसपणे वाढणेही आवश्यक आहे. खरे म्हणजे अत्यंत जाणीवपूर्वक देशाचे सांस्कृतिक धोरण आता तातडीने आखले जाणे अगत्याचे आहे. सध्या देशातील विविध क्षेत्रात कार्यरत असणाऱ्या शासकीय, निमशासकीय वा स्वयंसेवी सांस्कृतिक चळवळीचा समन्वय साधून सर्वांगीण सांस्कृतिक विकासाच्या दृष्टीने त्या सर्वांचे बळ वाढविणे, त्यांना सतत प्रेरणा उद्युक्त करणे, त्या संस्थांच्या निर्वाहासाठी व विकसनाच्या वाटचालीसाठी भक्कम आर्थिक पाठबळ देणे, त्यांच्या कार्याची स्वायत्तता मान्य करून त्यांना पूर्ण स्वातंत्र्य देणे, राजकीय व सत्तेच्या हस्तक्षेपापासून त्यांना निश्चित करणे, नोकरशाहीच्या लालफितीच्या अडवणुकीतून त्यांना मुक्त ठेवणे, सर्व अभिमानास्पद प्राचीन परंपरा अविच्छिन्न राखून त्यांना अधिक अर्थपूर्ण, कालसंगत व संपन्न बनवणे आणि याद्वारे देशाचे सांस्कृतिक आरोग्य निकोप व रसरशीत राखण्याची आवश्यकता आमच्या शासनाला जितक्या लवकर पटेल तितके आवश्यक आहे. त्यासाठी राष्ट्रीय सांस्कृतिक नीती शासनाने जाहीर करावी व शीघ्रातिशीघ्र कार्यान्वित करावी असे माझे कळकळीचे आवाहन आहे. देशात भूषणावह अशा नव्या तेजस्वी परंपरा त्याशिवाय सुरू होणार नाहीत

धन्यवाद !

❑❑❑

# परभणी : १९९५

# नारायण सुर्वे

---

साहित्यप्रेमी बंधू-भगिनीनो !

६८ व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाचे उद्‌घाटक प्रख्यात भारतीय कवी अशोक वाजपेयी, अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे सर्व मान्यवर पदाधिकारी व परभणी येथील स्वागत समितीचे सर्व सदस्य आणि मित्रांनो !

प्रथम मी लातूर जिल्ह्यातील धरित्रीच्या कोपाने झालेल्या भूकंपात मृत्युमुखी पडलेले आपले बांधव, माता-भगिनी व लहान तान्हुल्यांना श्रद्धांजली अर्पण करतो.

रझाकारविरोधी मुक्तिसंग्रामात व भारतीय स्वातंत्र्य संग्रामात सहभागी झालेल्या सर्व देशभक्तांना व हुतात्म्यांना मी अभिवादन करतो मराठवाड्यातील थोर विचारवंत व लेखक प्रा. भालचंद्र महाराज कहाळेकर, प्रा. नरहर कुरुंदकर, बी. रघुनाथ आणि वा रा. कांत ह्यांनाही अभिवादन करतो.

मित्र हो !

ज्या महाराष्ट्राने माझ्यावर कृपाछत्र धरले, मुलासारखे प्रेम केले, त्या महाराष्ट्रात आणि भारत देशात काय घडत आहे ?

आज आपण अशा एका वातावरणात जगत आहोत की, हे वातावरण मोठे संमिश्र आहे. आपल्या देशावर संकटाचे मोठे मावट जातीय शक्तीच्या रूपाने उभे राहिले आहे. ही मंडळी विघटनवादी शक्तीना एकवटत, फुटिरता निर्माण करणाऱ्या राक्षसांना संघटित करत आहेत. धर्मांध शक्ती वाढतच आहेत. इतकेच नव्हे तर ह्या शक्ती आपल्या देशाची सत्ता हातात घेण्यासाठी मिळेल त्या साधनाने स्वत:चे बळ वाढवत आहेत. कर्मठ धर्माचा पुरस्कार करणाऱ्या शक्ती व पिळवणुकीवर आधारलेली शोषणव्यवस्था या आजच्या नव्या, समता मागणाऱ्या युगात कालबाह्य व्हाव्यात, अशी आपणा सर्वांची इच्छा असली तरी त्या प्रभावी व बलदंड रूपाने वावरत आहेत आपल्या देशाचा आर्थिक इतिहास इतर अर्धविकसित व मागासलेल्या देशांपेक्षा प्रगत औद्योगिक विकासापर्यंत म्हणजे थोडा स्वावलंबनापर्यंत झाला असला तरी त्याच्या भोवतीचे विळखेही देशी-परदेशी हितसंबंधीयांचेच आहेत, हे चित्र काही बदललेले नाही.

स्वातत्र्य मिळाले खरे परतु ते फक्त धनदाडग्या शक्तीच्या पाशातच जखडलेले राहिले याच कालखंडात सर्व दलित, भटक्या व आदिवासी शक्तीमध्ये नवे जागरण, नवी अस्मिता उभारली खरी परतु त्याच्यातही स्वत पुरताच मर्यादित दृष्टिकोन आहे एकदर प्रागतिक शक्तीशी व प्रागतिक विचाराशी आणि लढ्याचा दीर्घकाळ अनुभव असलेल्या मूलभूत राष्ट्रीय प्रवाहाशी स्वत ला जोडून घेणे त्यानाही जमलेले नाही डाव्या व लोकशाही शक्तीनाही ह्या आपला खरा मित्र कळला नाही, असे काहीसे धूसर चित्र आपल्या लक्षात येते मदगतीने वाहत असणारी साक्षरता, खेड्यात पोचलेली एस टी व काही कॉलेजे तसेच काही सहकारी साखर कारखाने, नव्या प्रचड इमारती व रस्ते, काही लघुउद्योग व नवनवे छोटे मोठे कारखाने आणि त्या द्वारा काही सवलती बस्स। वाढते धन राष्ट्रीय मालकीचे न होता ज्या धनिकाकडे पोचायचे त्याचेकडेच पोचते व वाढते बेकारी व भिकारी अवस्था मात्र ज्यावे खरी पोचायला हवी त्या गोरगरीब जनतेच्या पदरी सुखरूपपणे पोचवण्यात येते

तसेच आत्मकेंद्रित व केवळ ऐहिक भोगाला वाहिलेले एक बाजारू अर्थतत्त्वज्ञान वाढते आहे त्यामुळे पिळवणुकीची एक नवीच व्यवस्था तयार होत आहे ह्याकडेही लक्ष वेधावे लागेल कारण ह्या ऐहिक तत्त्वज्ञानामुळे कमालीची सभ्रमावस्था वाढते आहे माणसे गोंधळत आहेत आणि हा गोंधळ वाढता राहावा म्हणून तशी पद्धतशीर रचना करण्यात येत आहे अशा वैचारिक कोलाहलात व ताणतणावात एक कमालीची असुरक्षितता वाढते आहे द्वेषभाव, माणसा-माणसातील गैरसमज, आपल्याच इतिहासाविषयी व प्रगत परपराविषयीचा अपसमज आणि विकृतीकरण विचारातून नवा विचार घडण्याऐवजी, नव्या प्रगत बाधिलकीतून नवा एकवटलेपणा येण्याऐवजी एक प्रकारचा उदासवाणा सूर व तुच्छतावाद, आपल्या देशाविषयीचा कटाळवाणा नाराजीचा सूर, खोटा अहकार आणि सर्वत्र खोट्या मूल्याचा वाढता जोर, निरसभाव व कोडगेपणा ह्या दुर्दैवी वास्तवाविषयी एक लेखक, कलावत, विचारवत व रसिक म्हणून आणि समतोल विचार करणारे आपण सर्वच ह्या भारत देशाचे नागरिक म्हणूनही पाहावे लागेल ह्या वस्तुस्थितीच्या मूळ दुखण्याशी भिडून, सर्व गलबल्यातूनही कार्यकारणभाव शोधावा लागेल

आपण असे म्हणाल की, मी फक्त समाजशास्त्रीय अथवा राजकीय अगानेच मराठी साहित्याचा विचार करतो आहे तर ते तसे नसून, तो समग्र साहित्याकडे पाहण्याचा माझ्या विचाराचा पाया आहे आपण सर्वांना हेही माहीत आहेच की साहित्याचा व जीवनाचा अतूट सबध असतो उदा कादबरीसारखा वाड्मयप्रकार हा सामाजिक द्रव्यातून आपले आशयद्रव्य वेचतो, असे आपण मानतोच जे तर्कशास्त्र कादबरी व समाज यांच्या रक्तामासाचा सबध मानते तेच तर्कशास्त्र इतर वाड्मयप्रकार आणि समाजद्रव्य याचाही रक्तामासाचा सबध सहजतेने मान्य करील असे मला वाटते. माणूस हा एक सामाजिक प्राणी आहे हे जर आपण मान्य करत असू, तर या सामाजिक

प्राण्यानेच निर्माण केलेल्या कलाकृती आपण आजवर डोक्यावर घेऊन मिरवत आहोत. मग त्या कृतीचा व त्या माणसाचा सामाजिक जीवनाशी किंवा सामाजिकतेशी असलेला संबंध नाकारण्यात काय अर्थ आहे ?

संस्कृतीचा निर्माता माणूसच असतो, हे विसरून कसे चालेल ?

वर मी वर्णन केलेल्या सर्व गोष्टी ह्याच माणसाच्या भावविश्वाशी केवळ जखडलेल्या नाहीत, तर त्या त्याला हतबल करीत,विचित्र कोडीत पकडून निष्क्रिय करत आहेत. एक भयाकुल वातावरण आज सर्व देशावर पसरलेले आहे. मराठी जनमानसातही तेच आहे

माणसे भरणपोषणासाठी आपली ऊर्जा खर्च करतात, हे जितके खरे आहे तितकेच या माणसांना स्वतःच्या सांस्कृतिक उन्नतीसाठी अथवा एकूण सांस्कृतिक भानासाठी देखील संस्कृतीची आवश्यकता असते हेही खरे आहे. व्यक्तिश· आपण स्वतः, आपला देश, भोवतालचा समाज व सामाजिक ताणेबाणे कळायला शेवटी संस्कृतीच्या व साहित्याच्या प्रदेशात प्रवेश करणेच हिताचे ठरते. भौतिक संस्कृतीच्या विकासामुळेच मानवी जीवन सुखकारक होते आणि अभौतिक संस्कृतीमुळे मानवी जीवनालाही अलौकिकत्व प्राप्त होते, असे म्हणतात व ते खरेच आहे.

अशा वेळी आपण आपल्या मराठी साहित्याची एकंदर प्रकृती तपासून पाहिली, किंवा जे स्वातंत्र्यपूर्व कालखंडात निर्माण झाले आणि आजही मोठ्या उत्साहाने व उमेदीने निर्माण होत आहे त्याकडे बारकाईने पाहिले, तर चित्र कोणते दिसते ?

भारतीय स्वातंत्र्य-चळवळीच्या नवजागरणाच्या कालखंडात नव्यानेच सुरू होत असलेल्या सांस्कृतिक, साहित्यिक व शैक्षणिक क्षेत्रातील वातावरणात नव्या उमाळ्याचा वैभवपूर्ण वारसा दिसतो. कलाकृतीद्वारा आपले केशवसुत व हरि नारायण आपटे आणि वैचारिक व सामाजिक क्षेत्रात महात्मा जोतीराव फुल्यांपासून, लोकहितवादी आगरकर व राजवाडे, शैक्षणिक क्षेत्रात राजर्षी शाहू, शिक्षणमहर्षी कर्वे व कर्मवीर भाऊराव पाटील व महर्षी शिंदे या महनीय व्यक्ती कार्य करताना आढळतात. एकूण देशप्रेम व सामाजिक भाव, त्यातील असंतोषासह ह्या थोर मंडळीना दिसत होते. हे लेखन आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याशी व सामाजिक मानसिकतेशी स्वतःला जोडून घेताना दिसते. इथे समाज आणि लेखक विभक्त नव्हता. जरी ते मध्यमवर्गीय व नवशिक्षितांच्या पिढीचे लेखक होते तरीही हे उत्स्फूर्तपणे व आत्मीयतेने घडत होते.

परंतु पुढे म्हणजे १९२० नंतर हा सांधा तुटताना दिसतो. १९२० ते १९६० च्या कालखंडात एकंदरीत भारतीय म्हणजेच राष्ट्रीय व महाराष्ट्रीय जीवनाशी, संपूर्ण घडामोडीशी आपले धागे तुटताना दिसतात; निखळलेले दिसतात. याचा अर्थ साहित्यनिर्मिती होतच नव्हती असे नाही. ते शक्यही नसते. लेखक कोणत्याही स्थितीत लिहीत राहाणारच. प्रश्न एवढाच आहे की,ह्या कालखंडाने असे अलगपण किंवा तुटलेपण का स्वीकारले आणि जे लेखन होत होते त्यात कोणते चित्रण प्रामुख्याने होत होते ?

मला ह्यात दोन प्रवृत्ती मुख्यत: दिसतात. एक सामाजिक भान ठेवणारे लेखक आणि दुसरे स्वान्त:सुखाय व आत्मकेंद्रित झालेले लेखक. मुख्यत: हेच लेखन किंवा हीच प्रवृत्ती म्हणा पुढे वरचढ झाली. खरे तर मराठी लेखक हा मध्यमवर्गातील असला तरीही तो गरीब ह्या श्रेणीतीलच होता, हे ऐतिहासिक सत्य नाकारून चालणार नाही. त्या वेळचे त्या वर्गाचे सामाजिक स्थान 'तत्कालीन चातुर्वर्ण्य समाजातही उच्चशिक्षित असलेला समाजगट,' असेच होते. प्रश्न हा आहे की, वाङ्मयाच्या किंवा सांस्कृतिक क्षेत्रात प्रामुख्याने किंवा हिरीरीने काम करणाऱ्या-त्यातील बंडखोर अपवाद वगळता-ह्या वर्गाची कृती कोणती होती ? चातुर्वर्ण्याच्या छायेखाली हा वर्गही वावरत असणारच. चित्र असे दिसते की, एकूण सामाजिक मानसिकता होती त्याच दबावाखाली वावरत हा वर्ग पुढे उपलब्ध झालेल्या शैक्षणिक संधीने विकसित होत राहिल्याने, आंग्लविद्याविभूषित म्हणून गौरविल्या जाणाऱ्या तकलादूपणाने त्यांना आपले सर्वव्यापी संबंध जुळवता आले नाहीत. परिणाम हा मध्यमवर्ग स्वत:च्या सुरक्षिततेला अधिक जपत राहिला व इतरांशी स्वत:ला जोडीत जाण्याऐवजी तोडीत जाणाऱ्या मनोवृत्तीला, किंवा वृत्तीनाच त्याने स्वीकारले. असे का झाले याचा शोध विद्वानांनी नीटपणे घ्यायला पाहिजे. मध्यमवर्गीय वृत्तीचा इतिहास तपासायला पाहिजे.

परंतु त्यामुळे झाले काय की, मुख्यत: लेखन करणारा, वाचणारा व शिकवणारा आणि सौंदर्यशास्त्रीय व वाङ्मयीन मूल्यांची चर्चा करणारा हाच वर्ग होता, तो स्वत:चे सामाजिक तुटलेपण झाकण्यासाठी मग इतर गोष्टी म्हणजे स्वान्त:सुखाय, आत्मकेंद्रित व आत्मानंदाची भाषा करत राहिला. मागच्या पिढीतील केशवसुतांना 'मजूर' दिसला, 'अंत्यज' दिसला आणि 'बाबा, जग हे बदलायचे' इत्यादी सर्व काही त्यांना दिसले. स्वत:मधील व भोवतालचे कल्लोळ त्यांनी टिपले. हरिभाऊंनाही ते दिसले. आगरकरांनी 'कलहच' उभा केला आणि वि. का. राजवाड्यांनी सर्वांनाच म्हणजे सर्व समाजमंथनाविषयी झडझडून फटकारले होते, तरीही हे असे का घडले हा प्रश्न उरतोच.

चातुर्वर्ण्याच्या नावाखाली रुढिग्रस्त धर्मकांडे, ईश्वरादि मंत्राचा धाक, प्रारब्धाची आखणी व उच्चनीचतेचे भयानक ओझे वागवीतच आपला समाज वाट चालतो आहे आजही तो त्यातून बाहेर पडलेला दिसत नाही. आजही धर्माच्या नावावर प्रगत मानवी मूल्याना आव्हान दिले जाते ही किती शोचनीय घटना आहे ! महात्मा फुल्यांनी व डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी सामाजिक समतेसाठी मोठा लढा दिला व प्रचंड धडक मारली असतांही हे सर्व ओझे आमच्या मानगुटीवर अद्यापही बसलेले आहे. त्याचा परिणाम मराठी साहित्यात असा झाला की, मध्यमवर्गीय लेखनातील निर्मितीचा एक प्रगत लहानसा विभाग सोडला तर एकूण साहित्याची मानसिकता वरील ओझ्याखाली वाकलेलीच राहिली. त्यांना स्वत:च्या वर्गापलीकडे कोट्यवधी माणसे विविध दु:खांनी गांजलेली होती, हे दिसून आले नाही. गावकुसाबाहेरचा आमचा दलितबांधव, आदिवासी, शेतकऱ्यांतील

विविध थर, शेतमजूर, उगवता कामगारवर्ग आणि मध्यमवर्गातील खालच्या थरात होत जाणारी परवड व त्या वर्गातील कामधंद्यासाठी बाहेर पडणारा महिला वर्ग-हे सर्व सदैव साहित्याच्या क्षेत्राबाहेरच राहिले. आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या संदर्भातही किती नावाजलेल्या कलाकृती निर्माण झाल्या आहेत किंवा त्यांनी त्या त्या कालखंडाचे विविधांगी चित्रण केले आहे व ह्या राजकीय प्रश्नांना सखोलपणे साहित्यात व्यक्त केले आहे, असे आढळत नाही. (अर्थात् या बाबतीत शरच्चंद्र मुक्तिबोध, विंदा करंदीकर यांच्यासारख्या काही मोजक्या साहित्यिकांचा अपवाद करावा लागेल.) हे असे का घडले याचाही पुनर्विचार करावा लागेल. तरीही हा सर्व नाडला गेलेला समाज धडका मारतच नव्हता, असे नाही. त्याची जगण्यासाठी लढाई चालूच होती. ही अशी जीवनमरणाची लढाई सदैव चालूच असते. मग तुमचे वाङ्मय त्यावर लिहो न लिहो. तमचे साहित्य ह्या वादळी संवेदनांची, संभावनांची आणि आक्रोशांची दखल घेवो अथवा न घेवो ही झुंज आदिम कालापासूनची आहे आणि तिचा इतिहास हाच खराखुरा मानवी प्रगतीचा इतिहास आहे.

हा आविष्कार आधुनिक काळात प्रथम कविता व कथांच्या रूपाने प्रकट झाला त्यांच्या लेखनातील विषय, भाषा, मांडणी व एकूण वळण, त्यांनी आणलेले नवनवे धुमारे यांनी मराठी साहित्याचे वातावरण दुमदुमून गेले. मुख्यत: बाबुराव बागुलांच्या कथा, नामदेव ढसाळांच्या कविता, यशवंत मनोहर, वामन निंबाळकर, राजा ढाले, दया पवार, लक्ष्मण माने, योगीराज वाघमारे, केशव मेश्राम आणि विशेषत: प्रा. गंगाधर पानतावणे ह्यांच्या 'अस्मितादर्श' ने मराठी साहित्याला मोठेच योगदान दिले.

ह्या पिढीने नवे समीक्षक दिले मुख्यत: डॉ. रावसाहेब कसबे आणि डॉ. जनार्दन वाघमारे यांचा आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. त्याचप्रमाणे दलित आत्मचरित्रांनीही मराठीतील चरित्रवाङ्मयात ऐतिहासिक महत्त्वाची भर घातली व हे दालन समृद्ध केले प्रा. प्र. ई. सोनकांबळे, दया पवार, लक्ष्मण माने, लक्ष्मण गायकवाड आदींचा प्रामुख्याने उल्लेख करावासा वाटतो. आदिवासी साहित्य, ग्रामीण साहित्य, मुस्लिम साहित्य व ख्रिस्ती आणि स्त्रीवादी साहित्य ह्यांचाही वाटा आहेच. मुख्यत: डॉ आनंद यादव, प्रा. रा. रं. बोराडे, प्रा. भास्कर चंदनशीव आदी मित्रांनी ग्रामीण साहित्याला एक नवे भान दिले. स्त्रियांचे साहित्य मोठ्या वेगाने नवी भूमिका घेऊन निर्मितीच्या पातळीवर प्रभावीपणे व्यक्त होत आहे,ही देखील आनंदाची गोष्ट आहे.

मात्र १९६० नंतरचा कालखंड नवे ऐतिहासिक वळण देणारा व सर्वच जुन्या कालबाह्य मूल्यांतील प्रागतिक भाग स्वीकारून कर्मठपणा नाकारणारा कालखंड असून, तो नव्याने सर्व समाजाला जोडीतच प्रकर्षाने उभा राहिला. या कालखंडातील उपस्थित प्रश्नांनी व त्याभोवती जमा झालेल्या सर्वच नव्या शक्तींनी राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक व साहित्यिक मूल्यांना प्रश्न विचारीतच प्रवेश केला. जुन्या प्रामाणिक

नत्वाला जोडीत, कलाकृतीतील वारसाही स्वत:त सामावित नव्याकडे झेप घेण्याचा तो एक अटळ व अपरिहार्य आणि विकसनशील मार्ग होता.

वैचारिक अथवा कलाकृतीच्या पातळीवरही नव्या मूल्यांना स्वीकारीत नवनवे बंध हाताळणे हा एक संघर्षच असतो. या घटनेमुळे एक हादरलेपण सुरू झाले किंवा आगरकरांच्या भाषेतच सांगायचे तर विचार कलहांना सुरुवात झाली, असेही म्हणता येईल मराठी साहित्यक्षेत्रातील ही केवळ वैचारिक स्थित्यंतराची किंवा मन्वंतराचीच सुरुवात नव्हती तर कलाकृतीच्या पातळीवरही स्वत:तील शक्तिशाली संवेदनांना, विविधरूपाने आकार देत व आपल्या भोवतालच्या समाजघटकांतील कल्लोळांना, संवेदनाना स्पर्श करीत, त्यांना शब्दांकित करण्याचा हा प्रयत्न होता. इतिहासानेच पुन्हा फेरमांडणीला सुरुवात केली, असे म्हटले तर वावगे ठरू नये.

या घडण्यामागे मराठी साहित्यातील एकूण तुंबलेपणच कारणीभूत होते. इतकेच कारण नव्हते तर एकंदरीतच भारतीय किंवा मराठी लोकमानसात उठणारे साद-पडसाद, त्यांच्यात येणारे नवे आत्मभान किंवा नवे राजकीय व सांस्कृतिक बदलांविषयीचे भान आणि जागरूक व शिक्षित झालेल्या सर्व थरातील लोकांची अस्मिता व त्यासाठी संघटितपणे उभे राहण्याची त्यांनी मिळवलेली क्षमता, या बाबी नव्या बदलांची संभाव्यता मांडणाऱ्या व लोकमानसातील खळबळीना सतत विकसित करत असलेल्या राजकीय किंवा सामाजिक धुरिणांनीही लक्षात घेतल्या नाहीत. आपल्या मराठीच्या सांस्कृतिक क्षेत्रात तर या बाबतीत उदासीनताच दिसत होती. किंबहुना सावधपणे व साशंकपणेच या बदलांकडे पाहिले जात होते.

तरीही ह्या साठोत्तरी पिढीला किंवा संस्कृतीच्या व परिवर्तनच्या सर्वच क्षेत्रांतून पुढे येत राहणाऱ्या तरुण उद्गारांना एवढे वैचारिक व सांस्कृतिक संचित कुठून मिळाले असावे, असाही प्रश्न उपस्थित करता येईल. या पिढीच्या मागे असा काही वारसा होता काय तेही पाहता येईल. १९६० नतरच्या नवशिक्षित मध्यमवर्गातील तरुणांना सांस्कृतिक व शैक्षणिक वारसा असला तरी तत्कालीन मध्यमवर्गीय लेखनातील त्रुटी व मर्यादा त्याच्या ध्यानात येऊ लागल्या होत्या.स्वातंत्र्यप्राप्तीमुळ सर्वदूर पसरलेली बहुजन समाजाची पिढी नव्याने शिकू लागली होती. त्यात दलित, आदिवासी, ग्रामीण तरुण, मुस्लिम, ख्रिस्ती व स्त्रिया यांचाही समावेश झाला. शिक्षण व ज्ञान सार्वत्रिक होण्याच्या प्रक्रियेने साहजिकच सांस्कृतिक क्षेत्राच्या कक्षाही अधिक रुंदावत गेल्या त्यामुळेच पाश्चिमात्य विचार, नव विज्ञान यांचा परिचय, साहित्याविषयी व संस्कृतीच्या प्रश्नांविषयीचे नवे भान आले. चिकित्सकपणे नवे संदर्भ पाहण्याची व त्यातील अर्थ शोधण्याची दृष्टी मिळाली आणि 'मौखिक' परंपरा असूनही लिखित परंपरेचा तिसरा नेत्र मिळताच शोधक वृत्ती तयार झाली. तत्पूर्वी ह्या सर्वच कष्टकरी वर्गाचा स्वत:चा असा चळवळीचा वारसा त्यांना होताच. भारतीय स्वातंत्र्य चळवळीकडून व समाज-परिवर्तनाच्या चळवळीकडून

मिळालेली स्फूर्ती, जगातील सर्व प्रागतिक व मानवमुक्तीसाठी होणाऱ्या लढ्यांतील मानवकेंद्रित दृष्टी, त्यांचे साहित्य आणि समाजवादी चळवळी यामधून मिळालेले शास्त्रशुद्ध ज्ञान, एकूण शोषणातून मुक्त करतील असे विचार व साहित्य- या सर्वांचाच परिणाम साठोत्तरी पिढीच्या जीवनदृष्टीवर आणि लेखनावरही झालेला आढळतो. एक शास्त्रशुद्ध व वस्तूनिष्ठ विचार जेव्हा समाजमनाची पकड घेतो तेव्हाच मानवीमुक्तीच्या संभवांची शक्यता व त्याची प्रक्रिया सुरू होते तेच ह्या सर्व साठोत्तरी चळवळीच्या केंद्रस्थानी घडत गेले. वाङ्मयाच्या क्षेत्रातही हा नवा दृष्टीकोन साहित्यातील परिवर्तनशील वृत्तीना उपकारक ठरतो.

साहित्य व्यवहार हा केवळ आनंद देणारा व्यवहार आहे किवा सहित्य ही केवळ कलानिर्मिती आहे, एवढ्यापुरता साहित्याचा विचार बंदिस्त करून चालणार नाही-तर त्या व्यतिरिक्तही एकूण जीवनाचे जे काही संदर्भ आहेत, सहभाग आहेत, त्यातील बदलत्या नवसवेदना, नव्या जाणिवा किंवा नव्या सभाव्यता याच्याशीही तो निगडित असतो.

स्थूलमानाने १९६० पूर्वीच्या मराठी नवसमीक्षेने, साहित्याने साहित्यच राहावे, कवितेने कविताच राहावे, अशा तऱ्हेची विचित्र एकागी भूमिका घेतली त्यामुळे झाले काय की, समग्र जीवनदर्शनाचे नाते अथवा संदर्भच त्यानी तोडले आणि काव्यातर्गत घटक म्हणजे भाषा, अनुभव, लय, सौदर्य व प्रतिमा एवढेच पाहण्यात आले त्यामुळे साहित्याने जीवनाच्या संदर्भातील इतर अगाकडे कटाक्षाने पाहिले पाहिजे, याकडे दुर्लक्ष झाले. खरे तर साहित्य हे माणसाला आनद देण्याइतकेच त्याला घडवण्याचे आणि जगण्यासाठी उभे राहण्याचेही सामर्थ्यही देत असते हेच टाळण्यात आले मुख्यार्थ बाजूला राहिला व इतर घटकांनाच जादा महत्व प्राप्त झाले. ते मध्यमवर्गीय सुखवस्तूंना सुखविणारे ठरले व अफाट जीवनातील सुखदु:खे भोगणाऱ्या समाजाकडे पाठ फिरविणारे ठरले. त्याला तुच्छ लेखू लागले आज मानवी मूल्यांचाच ऱ्हास होत आहे. अमानवता आणि पाशवीपणा वाढत चालला आहे, त्याला एक कारण साहित्याने मूल्यांचे जतन करायला पाहिजे होते, त्याची प्रतिष्ठा ठेवायला हवी होती, तीच न ठेवल्याने व केवळ सौदर्याची आणि केवळ आनदाची निर्मिती केली पाहिजे, हाच आग्रह धरल्याने हे घडलेले आहे.

परंतु वास्तव मोठे गतिमान असते. ते थाबलेल्या, साचलेल्या प्रवाहाना ऐतिहासिकता देत-देत पुन्हा जिवंतपणे खळखळाट करत वाहत राहते. पुढचा टप्पा गाठते मध्यमवर्गीय साहित्यिक मूल्यांना, वाङ्मयीन संकेतांना, नीतिविषयक संकल्पनांना व एकूणच ठराविक चाकोरीतल्या जीवनदर्शनाला त्यांनी नाकारले. सुखासीन प्रवृत्ती व पायघोळ इग्रजी झग्याखाली मिरवणाऱ्या समीक्षेला आणि त्यांच्या मानदंडांना अव्हेरले.

१९६० नंतरच्या सर्व समाजघटकांतील नव्या पिढ्यांनी हे ऐतिहासिक कार्य

सुरू केले. निर्मितीच्या व सांस्कृतिक प्रश्नांच्या संदर्भात नवे भान, नवे चैतन्य व नवे जीवनदर्शन घडवले. एवढेच नव्हे तर साठपूर्वीचे बहुतांशी मराठी मध्यमवर्गीय लेखन हेच पूर्ण महाराष्ट्राच्या समाजदर्शनाचे व त्यांच्या जगण्यावागण्याचे दर्शन घडवते, असा जो भ्रामक आभास निर्माण झाला होता, त्यालाच ह्या पिढ्यांनी दृढपणे नाकारले. याचा अर्थ असा नव्हे की, मध्यमवर्गीय लेखकांच्या लेखनात इतरत्र पसरलेल्या मराठी माणसाच्या जगण्याला स्पर्श करण्याचा प्रयत्न नव्हताच. असे प्रयत्न आढळतात. परंतु ते तुरळक व सहानुभूतीपरच होते. भोवताली घडणाऱ्या पडसादांची ती प्रतिक्रिया होती इतकेच. मुख्यत: अभिव्यक्त होत होते ते फक्त वैफल्य आणि नैराश्येने ग्रासलेले साहित्य होते. त्या वेळच्या कथा-कवितेत त्याचे पडसाद सातत्याने उमटत होते व भांबावलेला आणि एका विचित्र कोंडीत सापडलेला नवा तरुण वर्ग अस्तित्वहीन जिणे जगत असताना, स्वप्नरंजनात्मक वास्तव त्याच्यापुढे मांडण्यात येऊ लागले. साहजिकच आपण जगतो एक व वागतो दुसरेच, अशी विचित्र अवस्था होती. म्हणूनच अशा विचित्र कोडीत सापडलेल्या साहित्याला बाहेर खेचण्याचे व त्याला वास्तवाच्या खऱ्या भूमिकेकडे वळवण्याचे काम त्यांच्यातील तरुण प्रतिभावंतांनी केले. अनियकालिकांच्या माध्यमांद्वारे, त्याला वाङ्मयीन चळवळीचे रूप देऊन, जुन्या कृत्रिम व ढोगी लेखनाला नाकारण्यास सुरुवात केली. त्यात प्रामुख्याने अशोक शहाणे, भालचंद्र नेमाडे, दिलीप चित्रे, अरूण कोलटकर व प्रा. चंद्रकांत पाटील ही मंडळी प्रमुख होती. नेमाड्यांच्या 'कोसला'ने व दिलीप चित्रे आणि अरूण कोलटकरांच्या कवितांनी मराठी लेखनाला अस्तित्वाचे वेगळेच भान आणून दिले.

मात्र सर्वात जोरदार धडक दिली ती दलित साहित्याने. या साहित्यातील प्रमुख प्रतिभावंतांनी महात्मा जोतीराव फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर आणि मार्क्सवादी व पुरोगामी प्रवाहांचा वारसा सांगतच एका दाहक वास्तवाचे चित्रण केले. त्या साहित्यामुळे मराठीसकट सगळा भारतीय समाजच हादरून गेला. नवे दलित तरूण किंबहुना समाजातील जवळपास सर्वच जाती-जमातीतले तरुण स्वत:चे अस्तित्व सांगत साहित्याच्या प्रदेशाकडे वळले तेव्हा नवाच प्रक्षोभ, नवेच भान मराठी रसिक मनाला आले. नापेर जमिनीचे बहुसंख्य प्रदेश नांगरले जाऊ लागले. त्यांनी फुले, आंबेडकर, राजर्षी शाहू, केशवसुत, कुसुमाग्रज, मर्ढेकरांशी नाते जोडले. महाराष्ट्रातील प्रचंड जनमानसाच्या किनाऱ्यावर त्यांनी स्वत:चे बावटे रोवले आणि शिडे हाकारली. आदिवासी, भटका-विमुक्त समाज, बेरड, मातंग, चर्मकार, कोल्हाटी, इत्यादी तळागाळातील लोकजीवनाला स्पर्श केला. त्यातून नव्या शक्ती प्रस्फुटित झाल्या. ह्या सर्वच तळागाळातील प्रवाहांचे एक वादळच सुरू झाले व वाङ्मयातील परिवर्तनाची प्रमुख सांस्कृतिक आणि साहित्यिक मूल्ये तपासून घेण्याची प्रक्रिया सुरू झाली.

१९६० ते १९८० पर्यतचा हा बहुजनांच्या रसरशीत वाङ्मयनिर्मितीचा

कालखंड मराठी साहित्याला एक नवे परिमाण व आकार देत होता, हे जितके खरे आहे तितकेच आज थांबलेपण किंवा स्थिरावलेपणही आलेले आहे. हे नम्रपणे नमूद करावेसे वाटते.

या नव्या प्रवाहातील बहुसंख्य लेखक/कवीना एका बाजूने कार्यकर्ते व तेच वाङ्मयाच्या क्षेत्रातील लेखक, अशी दुहेरी भूमिका घ्यावी लागते. आजच्या एकूण बदललेल्या परिस्थितीनेच त्यांना असे करणे भाग पाडलेले असते, असेही सांगितले जाते माझ्या मते त्यात गैर काहीच नाही उलट ते भोवतालच्या धगीजवळ उभे राहिल्याने किंवा गुंतल्याने अधिक नीट व धीट राहू शकतात. त्यांना सभोवार जगणाऱ्या माणसांचे भान येऊ शकते व ते एक कलावंत म्हणूनही आवश्यक असते. मात्र धोका इथे आहे की, स्वत:चे वाङ्मयीन अवधान व निर्मितीतील प्रामाणिकपणा सोडून जर ते लेखन करू लागले, त्यातील कलात्मकता विसरू लागले, तर ते फक्त 'शब्दसोयरे'च उरतील म्हणून त्यांचे अवधान निर्मितीच्या सच्च्या प्रक्रियेपासून किंचितही ढळले तर दुरावले जाण्याची शक्यताच जास्त आहे. लेखनाचा उत्साह असावा, परंतु अभ्यासही असावा

सतत स्वत:शी बोलत, वादविवाद करीत, विविध कलाकृतीना विचारीत, माणसातील कल्लोळांचे व त्यांच्या व्यथा वेदनांचे सच्चे आकलन करीत अनुभवातील व्यापकता आणि सडी सृजनशीलता व चैतन्य हेरीत साहित्यिक वाटचाल करतील, म्हणजेच माणसे नीट वाचतील तर त्यांना माणसाच्या सृजनाचे व संभवांचे सर्व दरवाजे उघडे राहतील, असे मला वाटते. म्हणूनच आज एकूण नव्या प्रवाहातील लेखनात जो रितेपणा आढळतो, जो अर्धामुर्धाच चेहरा व्यक्त झालेला आढळतो तो एकूण सामाजिक भान, आत्मभान व एकूण कलात्मक भान ठेवून व्यक्त व्हावा, यापरती दुसरी कोणतीही मौल्यवान गोष्ट नाही. हे संचित व प्रतिभा आपल्या लेखकांपाशी नक्कीच आहे. याविषयीची चर्चा सर्वच नव्या प्रवाहांतील सुजाण व समंजस विचारवतांकडून, कलावताकडून सुरू झालेली आहे, ही स्वागतार्हच घटना आहे.

आणखीही एका गोष्टीकडे मला आपले लक्ष मुद्दामच वेधावेसे वाटते. ते हे की वेगवेगळी वाङ्मयीन व्यासपीठे कशासाठी ?असा प्रश्न विचारला जात असतो. मला हा प्रश्न गैर वाटतो. याचे कारण असे की, नवशिक्षितांची विविध बहुजन स्तरातून येणारी शिकलेली पिढी ही स्वअस्मिता, प्रेरणा व वारसा सागत वाङ्मयीन चळवळीकडे आकर्षित झाली तर त्यात गैर काय आहे ? या विविध वाङ्मयीन चळवळी आपापल्या मराठी समाजघटकांना सांस्कृतिक प्रश्नांभोवती एकत्र करत आहेत, हा महत्त्वाचा केद्रबिंदू त्यात आहेच. सांस्कृतिक अथवा साहित्यिक चर्चा केवळ लेखकांनीच किवा विचारवंतांनीच कराव्यात, इतपत ही गोष्ट आता नव्या बदलत्या कालखडात राहिलेली नाही, हे कृपा करून लक्षात घ्यावे. जनतेतील व्यापक घटक जर सांस्कृतिक प्रश्न समजावून घेऊ इच्छित असतील तर ती अधिक सुखद घटना आहे सांस्कृतिक

विकासाशिवाय जनमनांचाही विकास नाही व जनतेच्या किंवा रसिकांच्या भक्कम आधाराशिवाय संस्कृतीही दोन पावले पुढे जात नाही, असा इतिहास आहेच. मात्र या संघटनांकडूनच एखादा मोठा लेखक जन्माला येतो हा भ्रम बाळगणे गैर आहे. तो त्या त्या वाङ्मयीन चळवळींनी उभ्या केलेल्या खऱ्या व वस्तुनिष्ठ उत्साही साहित्यिक वातावरणाने घडत असलाच तर, अशा लेखक / कवीचा डोळसपणे शोधही घ्यावा लागेल. जनचळवळींसोबत वाढत गेलेले व विकसित झालेले कितीतरी लेखक व कवी आपल्या भारतीय साहित्यात आजही शीर्षस्थानी आहेत, याची मी याठिकाणी नोंद करून ठेवतो. मात्र अशा संस्था साहित्य प्रेम व सांस्कृतिक प्रश्नाभोवती आपला रसिक एकवटून त्याला वैचारिक खाद्य व त्याची वाङ्मयीन नाळ आपल्या साहित्याशी, विचारांशी जोडीत असतात व माझ्या मते ते होणे इष्टच होईल.

आणखीही एका गोष्टीकडे मी आपले लक्ष वेधू इच्छितो. ती म्हणजे मराठी भाषा टिकणार की मरणार याची चर्चा सदैव मराठी प्रदेशात चालू असते. खरे तर केवळ मराठी भाषाच जिवंत राहण्याइतपत हा प्रश्न नाही, तर मराठी भाषा व निरक्षर मराठी समाज यांच्या नात्याविषयी अधिक खोलवर जाऊन पाहणे आवश्यक आहे. आपले मराठी बांधव आजही प्रचंड प्रमाणावर निरक्षर आहेत, ही गोष्ट दुर्लक्षित करता येण्यासारखी नाही, याची मी इथे नोंद करून ठेवत आहे.

मराठी भाषेवर होणारे आक्रमण आणि आपल्याच मराठी बांधवांची स्वाभाषेविषयीची अनास्था पाहिली की मन शरमेने भरून जाते. आपले थोर विचारवंत डॉ. य. दि. फडके यांनी त्यांचेशी चर्चा करताना त्यांनी पुरविलेली माहितीच मी ह्या ठिकाणी त्यांचे ऋण मानून उध्दृत करतो.

१९२५ साली पुणे येथे भरलेल्या पहिल्या शारदोपासक साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्षीय भाषणात थोर विचारवंत आणि संशोधक प्रा. दत्तोपंत पोतदारांनी जे विचार मांडले त्यातील काही ओळी व त्यांनी सुचविलेला अष्टसूत्री कार्यक्रम इथे देत आहे. ते म्हणाले होते-

'स्वभाषेला स्थानभ्रष्ट केल्याच्या महापापाचे असे विलक्षण फळ आले की, आज १०८ वर्षे झाली, आपली स्थिती 'चौ दिसा कोस चालै'पैकी झाली आहे. यावरून खात्री होईल की, **चांगले जिवंत वाङ्मय निर्माण होण्यास वरिष्ठ, कनिष्ठ, सर्व शिक्षण देशी भाषेंतूनच मिळणे अवश्य आहे. तसे झाले म्हणजेच शिकणारांचे मन मराठी राहील.** एवढेच नव्हे, त्यांचे कानही मराठीच राहतील आणि ते स्वभाषेवर निरतिशय प्रेम करतील. स्वकियांनी स्वभाषा सोडली त्यामुळे ती स्वदेशातच आणि स्वगृहातच विपत्ती भोगीत आहे ! आणि स्वभाषेचा पुनरपि अंगिकार केल्याखेरीज आमचे विपत्तीयुग संपणार नाही-हे निःसंदेह !'

त्यांनीच सुचवलेला अष्टसूत्री कार्यक्रम असा :

**स्वभाषानियमाष्टक**

१. मी प्रत्यही काही तरी उत्कृष्ट मराठी मजकूर वाचीन.

२. मी एक तरी चांगले मराठी पुस्तक प्रतिमासी विकत घेईन.

३. मी एक तरी प्रतिष्ठित मराठी मासिक-पुस्तक वर्गणी भरून घेईन.

४. मी आपला सर्व लेखी, तोंडी व्यवहार, प्रासंगिक अपवाद सोडून होता होईल तेवढा मराठीतच करीन.

५. मी आपल्या मुलाबाळांत व आप्तइष्टांत मराठीचा योग्य अभिमान जागृत करण्यासाठी झटेन.

६. मी एक तरी मराठी वर्तमानपत्र विकत घेईन.

७. मी शक्य असेल तर माझ्या अज्ञान बांधवांसाठी मराठीत ग्रंथ लिहीन.

८. मराठी वाङ्मयेतिहासात अभ्युन्नतीकरिता झटणाऱ्या संस्थाना यावच्छक्य मदत करीन.

हा महामहोपाध्याय पोतदारांनी दिलेला अष्टसूत्री कार्यक्रम यच्च्ययावत् मराठी बांधवांनी अंमलात आणला तर त्यासारखी भाग्याची दुसरी कोणतीही गोष्ट नाही.

आणखी पाच वर्षानी हे शतक आपला सर्व लवाजमा घेऊन एकविसाव्या शतकातच प्रवेश करील. अजूनही आपणाला या शतकाच्या काठावर उभे राहून आपले सर्व संचित, हरवलेपण आणि संकल्प याविषयी आत्मपरीक्षण करायला आणि पुन्हा पुन्हा सांस्कृतिक वारसा घासूनपुसून घ्यायला, विचार करायला अवधी आहे. विसाव्या शतकाला सलाम करतांना आणि एकविसाव्या शतकाला सामोरे जाताना आपण आपले आत्मशोधन, विकसनशील प्रगत परंपरा, जयपराजय, विसाव्या शतकातील कालबाह्य विचारांना, कृतीना व वृत्तीना त्याज्य ठरवून, नव्या प्रागतिक शक्यतांना विकसित करून, नव्यानेच उपस्थित होणाऱ्या सांस्कृतिक व मानवी मूल्यांच्या प्रश्नांना, संदर्भाना, लक्षात घेऊन एकविसाव्या शतकाचा उंबरठा ओलांडण्याच्या तयारीत असू तेव्हा शांत चित्ताने, मोकळ्या व प्रसन्न वृत्तीने, एकविसाव्या शतकातील नव्या आव्हानांना, कदाचित भयावह अथवा सुखावह प्रसंगांना सामोरे व्हावे लागेल.

माणूस हा नगण्य प्राणी नाही. तोच या पृथ्वीचा सर्वश्रेष्ठ कर्ताधर्ता आहे, रचनाकार आहे. माणसाइतका पवित्र शब्द आपल्या शब्दकोषात दुसरा कोणताही नाही. त्याला आकार देऊ या. त्याच्यातले आजचे पोरकेपण, हरवलेपण, निर्माण झालेले करंटेपण घालवून पुन्हा त्याला शक्तिशाली पोलादासारख्या विराट रूपात साकार करू या. सर्व संभवांची व शक्यतांची बीजे या मानवीकृतीतच दडलेला आहेत मानवी सर्जनशीलतेच्या व विचारांची इतिहासात हाच क्रम सतत विकसित व तेजाळत राहिलेला आहे. त्याचा आदर करू या. सर्व परिवर्तनवादी विचारांच्या केंद्रस्थानी हा सर्वसामान्य, व कष्टकरी समाजच अग्रदूताची भूमिका बजावीत आलेला आहे

म्हणून पुन्हा एकदा नम्रपणे सांगावेसे वाटते की, ज्ञानोबांच्या, चक्रधरांच्या, तुकोबांच्या, चोखोबांच्या अथवा फुले, आंबेडकरांच्या आणि केशवसुत, कुसुमाग्रज, मर्ढेकरांच्या कालखंडांना व त्यातील एकूण मानवी प्रेरणांना, त्यांचा आवाका ध्यानात घेऊनही, त्रुटींचा पाढा सतत वाचत न राहता मराठी संस्कृतीचा किंबहुना एकंदरीत भारतीय साहित्यातील प्रागतिक परंपरांचा हाही एक मूलस्रोत आहे, हे नीट ध्यानात वागतूनच पुढचा प्रवास करावा लागेल. प्रत्येक मानवी व सांस्कृतिक विकासातही किंवा वैचारिक संचितातही त्रुटींचाही एक कायमचा पदर राहतो. तो राहतो म्हणूनच की काय इतिहास पुन्हा नव्याने वळण घेऊन हा अपुरेपणा टाळत, नवी भर घालीत वाटचाल करीत राहतो. कदाचित् पुढचा इतिहास असे अपुरेपण आपल्याही वाट्याला आले होते, असे सांगतच पुन्हा वेगळे वळण घेत राहील. तेव्हा आपण असू की नसू मला माहीत नाही. म्हणून आपले जीवनाचे व साहित्याचेही सर्व निखळलेले सांधे जुळवून नव्या उमेदीने येत्या शतकाला सामोरे जाऊ या.

*हात उंचावून माझी फुले स्वागतास जातील*
*त्या क्षणी मी असेन की नसेन कोणास ठाऊक ?*
*जेव्हा तारे आप्त म्हणून माझ्या घरी येतील*
*उभा दारी असेन नसेन कोणास ठाऊक ?*
*येणाऱ्या नवरचनेस माझाहि सलाम सांगा*
*ह्याच भव्य क्षणासाठी उभी हयात जाळली*
*काही जण लोहघण; हाती धरून उठलो*
*बंडव्याची कोटी बीजे याच भूमीत पेरली*
*ऋतूंनो, वाऱ्यांनो, फुलांनो, नाजुक पऱ्यांनो*
*जेव्हा ह्या देशात याल कदाचित मी नसेन*
*आताच तुमच्या हालचाली शब्दांत येतात*
*तेवढ्या दर्शनानेच मी पुलकित पावेन.*

## श्री क्षेत्र आळंदी : १९९६

# श्रीमती शान्ता शेळके

साहित्यप्रेमी रसिक बंधुभगिनीनो,

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या या एकोणसत्तराव्या अधिवेशनासाठी आपण सर्वजण आज इथे जमलो आहोत. हे संमेलन आळंदी इथे भरत आहे हा मोठाच भाग्ययोग आहे. एक तर संतश्रेष्ठ आणि कविश्रेष्ठ श्रीज्ञानदेव यांच्या संपर्काने या स्थळाला अलौकिक पावित्र्य लाभलेले आहे. दुसरे म्हणजे ज्ञानेश्वरांच्या संजीवन समाधीच्या सप्तशताब्दीचे हे वर्ष आहे. असा अपूर्व योग साधून भरणाऱ्या या संमेलनाच्या अध्यक्षपदी आपण माझी योजना केली. मराठी साहित्यिकाला लाभणारा सर्वोच्च मान आपण मला दिलात. यामुळे माझे मन यावेळी किती विविध भावनांनी उचंबळून आले आहे हे मी आपणांस कसे सांगू ? त्यासाठी ज्ञानोबारायांच्याच शब्दांचा मला आधार घ्यावा लागत आहे. 'बहुत सुकृताची जोडी' म्हणून या सुंदर आणि पावन शब्दोत्सवात आपण मला सहभागी करून घेतले आहे. त्याची नम्र आणि कृतज्ञ जाणीव मला आहे.

निवडणुकीचा निर्णय लागला त्याच्या दुसऱ्याच दिवशी मी इथे येऊन गेले. त्यावेळी ज्ञानेश्वरांच्या समाधीपुढे मस्तक टेकवताना कवी अनिल यांच्या या काव्यपंक्ती अचानक माझ्या ओठांवर आल्या-

*नसे संत कोणी, भाविक ना भक्त*
*असे जीव मात्र जीवनीं आसक्त*
*तुमच्या चरणी मस्तक ठेविलें*
*उचलावयाचे भान ना राहिलें !!*

तीच भावना या क्षणीही माझ्या मनात आहे. या संमेलनाच्या अध्यक्षपदी विराजमान होण्यासाठी शोभून दिसणारे वाङ्मयीन आणि सांस्कृतिक कर्तृत्व ज्यांच्या ठायी आहे असे कितीतरी थोर, विचारवंत साहित्यिक आज सभोवती दिसत असताना आपण माझ्यासारख्या सर्वार्थाने सामान्य असलेल्या व्यक्तीला हे स्थान दिले आहे. यामुळे, खरी अंतरंगातली गोष्ट सांगावयाची तर मी अगदी संकोचून आणि भांबावून गेले आहे. योगायोगाने जरी मी आज इथे या अध्यक्षस्थानावर बसले असले, तरी

मनाने मी तुमच्यांत, तुमच्याबरोबरच मंडपात आहे. मीही तुमच्यासारखीच एक रसिक आहे; तुमच्या मनातील प्रश्नच मी बोलून दाखविणार आहे. माझ्या संकोचाचे आणखीही एक कारण आहे. गेले काही दिवस पूर्वी कुठे तरी वाचलेली एक कथा सारखी माझ्या मनात घोळत आहे. आपणांसही ती कथा ठाऊक असेल. राजा विक्रमादित्य याचे सिंहासन जमिनीच्या पोटात गडप झालेले होते. नंतर कुण्या राजाला उत्खननात ते सापडले. शुद्ध सुवर्णाच्या त्या सिंहासनाला बत्तीस कोन होते आणि बत्तीस सुवर्ण पुतळ्यांनी ते आपल्या खांद्यांवर तोललेले होते. हा राजा जेव्हा त्या सिंहासनावर पाऊल ठेवू लागे, तेव्हा एक एक पुतळी विक्रमादित्याच्या संदर्भात एक एक कथा त्याला सांगे. कुणी त्याचे शौर्य वर्णन करी, तर कुणी त्याचे औदार्य. कुणी त्याची न्यायनिपुणता सांगे, तर कुणी दयाळूपणा. आणि मग ती पुतळी राजाला म्हणे, 'असा काही गुण तुझ्या अंगी असेल तरच तू या सिंहासनावर बसण्यास पात्र आहेस!' राजाला मात्र प्रत्येक वेळी त्या त्या गुणाचा आपल्या ठायी असलेला अभावच तीव्रतेने जाणवे आणि तो आपले पाऊल मागे घेई. आज साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी पाऊल ठेवताना माझी अवस्थाही त्या राजासारखीच झाली आहे. माझ्या आधी इथे विराजमान झालेल्या अनेक थोर साहित्यिकांचे मला स्मरण होत आहे. कुणी नामवंत कादंबरीकार होते. कुणी प्रतिभासंपन्न कवी होते. कुणी विचक्षण समीक्षक होते. तर कुणी विद्वान भाषापंडित होते. पूर्वी होऊन गेलेल्या या थोर अध्यक्षांचे जसे मला स्मरण होत आहे, त्याप्रमाणेच या पदाला सर्वस्वी पात्र असूनही ज्यांच्या वाट्याला ते आले नाही असे अनेक साहित्यिक मला यावेळी आठवत आहेत. वि. का. राजवाड्यांसारखे थोर प्रज्ञावंत, विचक्षण, निर्भीड सशोधक, बोरकरांसारखे प्रतिभासंपन्न कवी, चिं. वि. जोश्यांसारखे असामान्य विनोदी लेखक केवळ योगायोगाने या अध्यक्षपदावर बसू शकले नाहीत. या दिवंगत साहित्यिकांचीच गोष्ट कशाला? आजही आपणांसमोर श्री. ना. पेंडसे, विंदा करंदीकर, रा. चिं. ढेरे, विजय तेंडूलकर, इंदिराबाई हे आणि यांच्यासारखे किती तरी अनेक मान्यवर साहित्यिक वावरत आहेत. या व्यासपीठावर विराजमान होण्याचा खरा हक्क त्यांचा आहे. असे असताना त्यांच्याऐवजी गेली अनेक वर्षे लेखनकामाठी करणाऱ्या माझ्यासारख्या एका सामान्य कलाकाराची आज आपण इथे योजना केली आहे यामुळे मला खरोखर फार अवघडल्यासारखे वाटत आहे. तरीही या पूर्वीच्या आणि आताच्याही साऱ्या ज्येष्ठांना आणि श्रेष्ठांना अत्यंत नम्रतेने वंदन करून मगच इथे पाऊल ठेवण्याचे धाडस मी करत आहे, त्याचे एकच कारण आहे आणि ते म्हणजे साहित्यावरचे माझे उत्कट आणि निस्सीम प्रेम. आपणही माझा तेवढाच गुण ध्यानी घेऊन बहुधा या ठिकाणी माझी योजना केली असावी. कवी म्हणतो, 'सबसे उँची प्रेमसगाई.' प्रेमाचे नाते सर्वांत मोठे असते. त्याच नात्याने आज मी आपणांसमोर आले आहे आणि त्याच अधिकाराने आपल्यासमोर चार शब्द मी बोलणार आहे.

साहित्य संमेलनाच्या सुंदर सोहळ्यासाठी आपण सारे आज इथे एकत्र जमलो आहोत. पण मुळात साहित्य संमेलन या गोष्टीलाच काही मंडळीचा विरोध आहे. ही संमेलने या गोष्टीलाच काही मंडळीचा विरोध आहे. ही संमेलने म्हणजे निव्वळ उत्सव किंवा जत्रा असून त्यांत वेळेचा आणि पैशाचा अपव्यय होण्याखेरीज अन्य काही पदरात पडत नाही अशी या लोकांची तक्रार आहे. मला असे म्हणायचे आहे की, साहित्य संमेलने म्हणजे उत्सव किंवा जत्रा जरी असल्या, तरी त्यांच्याकडे इतक्या तुच्छतेने किंवा अवहेलनेने बघण्याचे काही कारण नाही. उत्सव, जत्रा हा आमच्या सास्कृतिक परपरतला एक महत्त्वाचा घटक आहे आणि तो फार सुंदर आहे. वेळेच्या आणि पैशाच्या अपव्ययाचीच गोष्ट घेतली, तरी तसा अपव्यय आजकाल आपण अनेक बाबतीत करत असनो त्यातला थोडा भाग साहित्य संमेलनासाठी खर्ची पडला तर त्यामुळे फारसं काही बिघडते असे मला वाटत नाही. अशा संमेलनांची फलश्रुती काय, हा प्रश्नही मला असाच निरर्थक वाटतो. आनंद हीच स्वतंत्रत: फलश्रुती होऊ शकत नाही का आणि हा आनंद तर साहित्य संमेलनात अनेक प्रकारे, अनेक पातळ्यावरून मिळत असतो

इथे येणाऱ्या आधीच्या पिढीच्या ज्येष्ठ साहित्यिकाची भेट नव्या पिढीच्या उमेदवार लेखकांना घेता येते. या भेटीचा आनद मोठा असतो यात शंका नाही. जीवनातल्या सर्वच गोष्टीकडे निरसलेल्या वृत्तीने बघणारे काही कुरठे लेखक सोडले, तर इतर तरुण लेखकाच्या दृष्टीने हा एक रोमांचकारक अनुभव असतो. ज्या लेखकांचे साहित्य आपण आवडीने व प्रेमाने वाचले, ज्याने आपण विलक्षण प्रभावित झालो, त्या आपल्या पूज्य दैवताना याचि देही याची डोळां पाहावे ही तरुण वयातली एक उत्कट असोशी असते. आजच्या अनेक पोक्त साहित्यिकांनी आपल्या उमेदीच्या वयात ही असोशी अनुभवली असेल. माधव ज्युलियन आपण पहिल्यांदा पाहिले तेव्हा आपल्याला त्या भेटीचे केवढे अप्रूप वाटले याचे कुसुमाग्रजांनी एके ठिकाणी फार सुंदर वर्णन केले आहे. माझा स्वत:चा एक अनुभव सांगते. तांबे आणि माधव ज्युलियन हे कवी आजही मला फार प्रिय आहेत, आणि या माझ्या आवडत्या कवीचे मला कधी दर्शन होऊ शकले नाही याची खंत मला सतत वाटत आली आहे. गमतीची गोष्ट ही की, तरुणांना वडिलधाऱ्याबद्दल कुतूहल असते, तशीच वडीलधाऱ्या लेखकांनादेखील तरुण लेखकांना भेटण्याची ओढ असते. तांबे यांना बोरकरांविषयी वाटलेले कौतुक किंवा खांडेकरांनी बोरकर-कुसुमाग्रज यांच्याविषयी व्यक्त केलेली आस्था आणि जिव्हाळा हा याच प्रकारचा नव्हता काय ? जुन्यानव्या साहित्यिकाच्या होणाऱ्या अशा परस्पर गाठीभेटी आणि त्यातून रुजत जाणारे वाङ्‌मयीन ऋणानुबंध यांना अवसर प्राप्त करून देणे हादेखील साहित्य संमेलनाचा एक मोठा उपयोग आहे.

जुन्यानव्या पिढीतल्या लेखकानी एकत्र येण्याइतकेच लेखक आणि रसिक

यांच्या होणाऱ्या परस्पर भेटीचेही मला मोल वाटते. इतक्या आस्थेने आणि एवढ्या मोठ्या संख्येने साहित्य संमेलनाला उपस्थित राहणारे रसिक हा एकूण साहित्य-व्यवहारातला एक महत्त्वाचा घटक नाही का ? आपल्या पदरचे पैसे खर्चून, अनेक अडचणी सोसून, प्रसंगी बैलगाड्या करूनही, आपला आवडता साहित्यिक डोळे भरून बघावा, त्याचे चार शब्द ऐकावेत म्हणून संमेलनाला येणारा हा अनामिक, काहीसा भाबडा तरी उत्कट मनोवृत्तीचा रसिक-त्याला लाभणारा आनंद मी कमी मोलाचा मानत नाही.

मध्यवर्ती साहित्य संमेलन दरवर्षी भरत असताना इतर अनेक संमेलनांची आवश्यकता काय हा नेहमी विचारला जाणारा असाच आणखी एक प्रश्न आहे. मला विचारल तर, या अशा छोट्यामोठ्या इतर संमेलनांचीही मला नितान्त आवश्यकता वाटते. आपणास माहीत आहे की, आज दलित, ग्रामीण, कामगार, ख्रिश्चन, मुस्लिम अशा अनेक प्रकारच्या लेखक-वाचकांची स्वतंत्र संमेलने भरत आहेत. परवा मी औरंगाबादेस गेले होते. तिथे लौकरच उद्योजकांचे संमेलन भरत आहे. त्याचे औपचारिक उद्घाटन मी आनंदाने केले. दरवर्षी बाल साहित्य संमेलन भरते. कोकण मराठी साहित्य परिषद आपले स्वतंत्र संमेलन भरवत असल्याची माहिती आपणांस आहेच. विभागीय संमेलने भरतात. बडोदे, इंदूर अशा दूरदूरच्या ठिकाणी या प्रकारची संमेलने भरतात. आणि आता तर मॉरिशस, न्यू जर्सी अशा परदेशांतील ठिकाणीही मराठी माणसांची संमेलने भरत आहेत आणि आमचे मान्यवर साहित्यिक त्यांची अध्यक्षस्थाने भूषवीत आहेत. अशा सर्व प्रकारच्या संमेलनांची इष्टता आणि आवश्यकता मी खाजगीच नव्हे, तर जाहीर रीतीनेही अनेकदा बोलून दाखवली आहे. मध्यवर्ती साहित्य संमेलनाशी अविरोधी भूमिकेवरून जर ही संमेलने भरत असतील, तर त्यांना आक्षेप घेण्याचे कुणालाही काही कारण नाही. एक तर, मराठी लिहिणारांची आणि वाचणारांची संख्या पूर्वी जशी मर्यादित होती ती तशी आता राहिलेली नाही. ती प्रत्यही वाढते आहे. एक मोठे संमेलन या साऱ्यांना यापुढे सामावून घेऊ शकेल असे मला वाटत नाही. दुसरी गोष्ट, सर्व साहित्यविश्वाचे म्हणून काही समान प्रश्न असले, तरी दलित, ग्रामीण, कामगार, ख्रिश्चन, मुस्लिम अशा साहित्यिकांचे काही स्वतंत्र वाङ्मयीन प्रश्नही असण्याची शक्यता आहे. मोठ्या संमेलनापर्यंत ज्यांची पोच नाही अशा काही त्रयस्थ कलावंतांना अशा संमेलनांत व्यासपीठ मिळते. तिथे त्यांना आपल्या कलेचा आविष्कार करता येतो. या संदर्भात आणखीही एक गोष्ट मला नेहमी जाणवते. पंढरीच्या वारीला जाण्याचे भाग्य सर्व भाविकांना लाभत नाही. परंतु त्यांच्यासाठीही गावोगावी विठ्ठलाची मंदिरे असतात आणि त्याच्या दर्शनाला त्या त्या गावची मंडळी तेवढ्याच प्रेमाने,तेवढ्याच भक्तिभावाने जातात. पंढरीच्या वारकऱ्यांइतकेच विठ्ठलाच्या दर्शनाचे पुण्य आणि आनंद त्यांनाही लाभतो. शेवटी भक्ती ही महत्त्वाची आहे. तेव्हा स्थानिक किंवा सामूहिक साहित्यिकांसाठी अशी वेगवेगळी संमेलने असायला हवीत असे मला वाटते

इथे आज आपण सर्व रसिक मंडळी माझ्यासमोर जमलेली मला दिसत आहात. यांतले काही मान्यवर साहित्यिक आहेत, तर काही साहित्यावर निर्हेतुक पण उत्कट प्रेम करणारे केवळ रसिकही आहेत. परंतु आपल्या साऱ्यांच्या साहित्यप्रेमाचा, साहित्यविषयक कुतूहलाचा उगम हा सारख्याच प्रकारे झालेला असतो. आजचे साहित्यिक हे कालचे रसिक आहेत, तर आजचे रसिक हे कदाचित् उद्याचे नामवंत साहित्यिक होण्याची शक्यता नाकारता येत नाही. रसिकतेची साधना, जोपासना हा एक आनंदमय प्रवास असतो आणि हा आनंद आपण इतरांबरोबर वाटून घेत असतो. माझ्याबाबतीत सांगायचे झाले तर, मी लेखक झाले हा माझ्या आयुष्यातला निव्वळ एक योगायोग आहे. पण त्या आधी व त्यासाठी माझी रसिकता लहानपणापासून कशी फुलत गेली, संस्कारित होत गेली, कशी समंजस आणि प्रगल्भ होत राहिली त्याचा अनुभव ही माझी आयुष्यातली मोठी घटना, मोठीच कमाई आहे. आपलाही अनुभव असाच असणार. तपशील वेगळे असतील, पण आनंदाची जात तीच असणार. ही रसिकता कशी सिद्ध होत जाते तिचा मागोवा घेणे, त्या संदर्भातले आपले अनुभव परस्परांशी जुळून बघणे ही गोष्टही तितकीच आनंददायक आहे, आणि आपण सारेजण शेवटी एकाच नात्याने एकमेकांशी कसे जोडले गेलो आहोत त्याचाही प्रत्यय आणून देणारी आहे.

आपल्या रसिकतेच्या जोपासनेत श्रवणाचा भाग किती मोठा आहे हे पाहिलं म्हणजे आश्चर्य वाटते. बाळपणी आपण काय काय तरी ऐकलेले असते. त्यांत शब्द असतात. वाक्प्रचार असतात म्हणी असतात. बायकी ओंव्या असतात. स्त्रीगीते असतात. भिक्षेकऱ्यांची गाणी असतात आणि घरोघरी ऐकायला मिळणारी आरत्या-भूपाळ्यांसारखी धार्मिक गाणीही असतात हे सगळे कानांवर पडते. मनात मुरते आणि त्यातून हळूहळू आपल्याला भाषेची जाण येते. वाङ्मयीन अभिरुची समृद्ध होते. साधे रोजच्या व्यवहारातले बोलणे घेतले, तरी शब्दांच्या उच्चारांतून नादांची वळणे, लयीचा गोडवा, स्वरांचा उंचसखलपणा कळतो. त्यातून येणारी अर्थपूर्णता उमगते. अशिक्षित बायकांची ठसकेदार भाषा, वयात येणाऱ्या मुलीची चिंचेचे बोटूक चोखल्यासारखी मिटक्या मारणारी आणि आतला भाव लपवूनही प्रकट करणारी भाषा, वृद्धांची थकलेली भाषा, संस्कृत शालजोडी पांघरलेली पंडिती भाषा आणि मळकट मुंडासे घातलेली रांगडी भाषा-नुसत्या भाषेच्या श्रवणातून आपली रसिकता चारी अंगांनी भरत जाते

भाषेप्रमाणे लोकसाहित्यही हवेसारखे आपल्याभोवती भरून राहिलेले असते. त्यातून आपणा सर्वांच्याच कानांवर किती गमतीदार संदर्भ पडत जातात आणि पुढे आपण अभिजात साहित्याकडे वळलो म्हणजे या पूर्वी ऐकलेल्या संदर्भाचे या साहित्याशी अचानक आणि अतर्क्य असे दुवे जुळतात. पोरगे बाहेर जाऊन, धुळीत खेळून, मळून आले की, अडाणी आई त्याला म्हणते, 'हनुमंता, आलास का रे बाळा ! लंका जाळून झालास काळा' आणि रामायणासारख्या महाकाव्यात प्रवेश करण्यासाठी एक दार खुले

होते. एखाद्या स्त्रीगीतात आपण पुढीलसारख्या ओळी ऐकल्याल्या असतात-

*पाणी चढलंय ग चढलंय ग पहिल्या पायरीवरी*
*घागरी उचलली उचलली दण्डामाण्ड्यांवरी*
*चोळी तडकली तडकली डाव्या भुजेवरी*
*शिंपी बोलवा बोलवा मायेच्या साजणी !*

त्या ओळी किती तरी वर्षे मनात नुसत्याच पडून असतात. पुढे संस्कृतशी परिचय झाल्यावर महाकवी कालिदासाचे 'अभिज्ञान-शाकुन्तल' आपण वाचतो. त्यामध्ये 'चोळी घट्ट होत असेल तर त्याबद्दल आपल्या तारुण्याला दोष दे.' असे शकुंतलेला सांगणारी तिची सखी आपल्याला भेटते आणि डाव्या भुजेवर तडकलेल्या चोळीचा एक वेगळाच अर्थ आपल्या मनात जागा होतो. एकाद्या अशिक्षित कवयित्रीने रचलेली ओवी असते-

*मातीचे मढले*
*मांडिये चढले*
*मातेने मानले । मोक्षसुख ।।*

आणि कधी तरी एकाद्या वेळी 'धन्यास्तदङ्गरजसा मलिनी-भवन्ती' या शाकुंतलातल्या प्रसिद्ध ओळीचा पडसाद तिच्यामध्ये उमटलेला आढळतो. खेडेगावी ब्राह्मणेतर जमातीत लग्नसमारंभामध्ये नवऱ्या मुलीला वोसंगी घेऊन तिच्या तोडात साखर घालतात. हा 'वोसंगी' शब्द आधी अगम्य वाटतो. पण 'मेघदूता' तली यक्षपत्नी जेव्हा मांडीवर वीणा वाजवताना दिसते आणि उत्सङ्गे वा मलिनवसने सौम्य निक्षिप्य वीणां' अशा ओळीत कालिदास तिचे वर्णन करतो, तेव्हा 'वोसंगी' म्हणजे 'उत्संगी-मांडीवर असा अर्थ मनात उलगडतो आणि ग्रामीण भाषेचा संस्कृतशी असलेला अनुबंध ध्यानात येतो. खेड्यापाड्यात वरवर अर्थशून्य वाटणारी अनेक गाणी सतत कानांवर पडत असतात. असेच एक गाणे आपण ऐकतो-

*वाकडी तिकडी बाभळ*
*तिच्यावर बसला होला*
*त्याला मारला टोला*
*तर गगनाला गेला !*

पुढे जपानी हायकूंची इंग्रजी भाषांतरे वाचताना या लोकगीताच्या ओळी आठवतात, हायकूमधल्या शब्दचित्राशी त्यांचे असलेले आश्चर्यकारक साम्य चकित करते आणि मग जपानी हायकूसुद्धा आपलीच वाटू लागते. जी गोष्ट शब्दांची, वाक्प्रचारांची, म्हणीची, बायकांनी रचलेल्या ओव्यांची तीच गोष्ट कृषिगीतांची, धार्मिक गाण्यांची, लोककथांची

आणि कहाण्यांचीसुद्धा. कुठल्या शब्दाने, कोणत्या उल्लेखाने कोणत्या गाण्याच्या ओळीने कुठली तार मनात छेडली जाईल, कुठला पडसाद कसा उमटेल, आणि स्मरणाच्या कुठल्या गुहेचे दार अवचित उघडेल ते सांगता येत नाही. आणि हा प्रवास सारखा चाललेला असतो. त्यातूनच आपली वाङ्मयीन जाण वाढते. आपल्यातला रसिक हळूहळू आकाराला येत असतो. या साऱ्यांबरोबर कानांवर पडणाऱ्या गाण्यांमधून नादांचे, स्वरांचे, लयीचे एक सुंदर विश्वही आपल्याभोवती तयार होऊ लागते. आनंदाचे अनामिक झरे कुठून कुठून फुटत राहतात. मन आर्द्र करतात.

शाळेच्या चिमण्या जगात एव्हाना आपण प्रवेश केलेला असतो आणि तिथे या रसिकतेला आणखी परिमाणे मिळतात. पाढेपरवचे पाठ म्हणणे, न कळणारी स्तोत्रे देखील पाठ करणे, सर्व मुलांनी मिळून कविता एका सुरात म्हणणे याचीही कवितेच्या सौदर्याशी समरस होण्यासाठी फार आवश्यकता असते. पाढेपरवच्यांना विशिष्ट ठेका असतो. स्तोत्रांत ठराविक जागी आघात असतात. वर्गात शिकविल्या जाणाऱ्या कविता पाठ म्हणताना छंदांचे, वृत्तांचे. जातीचे माधुर्य मुलांना हलके हलके कळू लागते. कविता चालीवर मोठ्याने म्हणणे, सामुदायिक पाठांतर करणे या गोष्टीचे खोल संस्कार मुलांच्या मनांवर होतात व तो आनंद जन्मभर त्यांना साथ करतो. गेल्या पिढीतले लोक या आनंदाची साक्ष देतील. कविता मुखोद्गत करण्यातला सुंदर आनंद आपण विद्यार्थ्यांकडून आज हिरावूनच घेतला आहे याची मला फार खंत वाटते. आज कवितांचे पाठांतर करणे ही गोष्ट अनेक शिक्षकांनाच नव्हे, तर चांगल्या लेखक-कवींनाही निरुपयोगी वाटत आहे. 'कवितांची पुस्तके हाताशी उपलब्ध असताना मुलांच्या कोवळ्या मनांवर पाठांतराचे ओझे कशासाठी द्यायचे ?' असा प्रश्न शहाणीसुरती माणसेही विचारताना दिसतात. लहानपणी मुलांना पाठांतराची सवय लावली नाही, तर त्यांच्या उमलत्या जाणिवेत ती एक उणीव राहील आणि मग अर्धेकच्चे, अपरिपक्व असे रसिक तयार होतील ही शंकाही कुणाला येत नाही. संस्कृतप्रचुरतेमुळे येणारी दुर्बोधता आणि एकूणच भाषेचे ब्राह्मणी वळण यामुळे पंडित कवीचे काव्य शालेयच नव्हे, तर महाविद्यालयीन पातळीवरही पध्दतशीरपणे बहिष्कृत केले जात आहे की काय असे भय मला आताच वाटू लागले आहे. पंडिती कवितेतील भाषावैभव, वृत्तांची विविधता, यमकानुप्रासामुळे येणारे नादाचे अनुरणन ही गोष्ट रसिकतेच्या साधनेतला एक महत्त्वाचा टप्पा आहे हे विसरून कसे चालेल ? कवी काय किंवा रसिक काय, केवळ शब्दांनी नादावून जाण्याचा, ते तोडात सतत घोळवण्याचा असाही एक काळ असतो आणि पुढच्या अस्सल साहित्याभिरुचिला सामोरे जाण्यासाठी या शब्दवेडाची, शब्दांच्या धुंदीची नितान्त आवश्यकता असते. मला आठवते. एका इंग्रजी कादंबरीत मी वाचले होते. एका शाळकरी मुलीला कुठेतरी पुढील ओळ सापडते. 'The great green translucent sea ' ती शब्दसंहती तिला इतकी आवडते की, ती ओळ ती स्वत:शी

सारखी, पुन्हा पुन्हा म्हणत राहाते. माझ्या पिढीतले किंवा नंतरच्याही पिढीतले जे लोक आज इथे असतील त्यांना शाळकरी वयात मोरोपंताच्या आर्या, रघुनाथपंडित किंवा वामनपंडित यांचे श्लोक, फारसा अर्थ न कळतासुद्धा, केवळ त्यातल्या यमकांसाठी, अनुप्रासांसाठी, त्यातून रुणझुणत असलेल्या नादासाठी आपण किती मनापासून पाठ केले होते हे खचित आठवत असेल. काव्याच्या मनोहर यक्षसृष्टीकडे नेणारा तो एक प्राथमिक मार्ग होता यात शंका नाही.

*-त्या सौभद्रावरि बलसागर गरगर गदेसि फिरवीत*
*दुःशासनसुत धावे निजभुजभुजगप्रताप मिरवीत*

यासारखी मोरोपंतांची आर्या, किंवा

*-माळाकार परस्परें कर गळां घालोनि गोपांगना*
*साऱ्या नाचति पाहती अवघिया एका जगज्जीवना*
*सोन्याचे मणि ओविले भुजगुणीं गोऱ्या शशांकानना*
*पाचूचे पदक स्थळीं स्मर मना श्रीदेवकीनन्दना*

हा वामन पंडितांचा श्लोक किंवा भर्तृहरीच्या श्लोकांची वामनपंडित किंवा कृष्णशास्त्री चिपळूणकर यांनी केलेली सुश्लिष्ट रूपान्तरे ही सारी पूर्वी आपल्या नित्य पाठांतरात असलेली काव्ये. त्या पाठांतराने आपल्याला किती दिले. प्रगल्भ रचनेचे सौंदर्य मनावर ठसवले. शब्दांचा गोडवा कळला. विविध वृत्तांमध्ये नादाने भुरळ घालणारी सुंदर अंतर्गत लय कशी असते याची जाण आली. इतकेच नव्हे, तर नंतरच्या काळात पंडिती वळणाचीच पण आधुनिक कविता लिहिणारे वासुदेवशास्त्री खरे, चंद्रशेखर यांच्या रचनेचेही आकर्षण वाटू लागले. नुसते आकर्षण नव्हे, तर पुढच्या अधिक विचक्षण काव्याभिरुचीकडे ते काव्य आपल्याला अलगद घेऊन जाते आहे याचा प्रत्यय आला. मग वासुदेवशास्त्री खरे यांच्या 'यशवंतराय महाकाव्या'तला पुढील-सारखा उतारा वाचताना त्यातल्या एका श्लोकाने संध्याकाळ उत्कटपणे मनात खोलवर ठसली-

*अस्ता प्रतापनिधि भास्कर जात आहे*
*हें विस्मयें जग चराचर पाहताहे*
*येतां समीप तम भीतिभरें समस्त*
*झाडे, नद्या, गिरिशिरें दिसतीं तटस्थ !*

आणि चंद्रशेखरांच्या पुढील कवितापंक्तींनी वर्षाकाळ तसाच आपल्या सौंदर्यासह मनात मूर्तिमंत साकार केला-

*अहो, आला आला नवजलद हा अंबरपंथी*
*बसोनी वायूच्या अतिचपल वेगान्वित रथीं*
*कसे नानारंगी विकट धनु त्याचें विलसतें*
*विजेची ती दोरी फिरफिरुनि झंकार करिते !*

या आणि या तऱ्हेच्या अनेक कवितांनी काव्यप्रेम मनात रुजवले. फुलवले. इथकेच नव्हे, तर प्राचीन काव्यपरंपरेशी नव्या कवितेचे नाते अगदी सहजपणे, विनासायास जोडून दिले. हा माझाच नव्हे, नर इतरही अनेक काव्यरसिकांचा अनुभव असेल असे मला निश्चितपणे वाटते.

या दृष्टीने शाळकरी वयात तेव्हा भेटलेल्या काही सुंदर वाचनमालांचा उल्लेख केल्याखेरीज माझ्याने राहवत नाही. 'नवयुग वाचनमाला', 'गद्यवैभव' आणि 'महाराष्ट्र रसवन्ती' या त्या माला. त्या आधी शाळेत भेटलेल्या मालांमधले धडे आणि कविताही आवडल्या होत्या. पण साधी सरळ रचना. माहितीवर असलेला भर आणि ढोबळ बोधवाद यामुळे त्या साहित्याने मन फारसे संस्कारित केले असे वाटत नाही. साहित्याच्या निखळ आनदमय आणि अद्‌भुत यक्षसृष्टीत तीन एक पिढ्यांना प्रवेश मिळवून दिला तो या तीन मालांनी ! 'नवयुग वाचनमाले' तले धडे आणि कविता बालमनाला विलक्षण आनंद देऊन गेल्या. नंतर 'गद्यवैभव' मधले उतारे आणि 'रसवन्ती'तल्या कविता भेटल्या. वयाच्या संस्कारक्षम वळणावर इतकी नेमकी पुस्तके क्वचितच कुणाला भेटली असतील ! हे गद्य उतारे आणि कविता यांची निवड संपादकांनी अत्यंत रसिकपणे आणि चोखंदळ वृत्तीने केलेली होती. 'गद्यवैभव' च्या एका भागात मोडक नावाच्या कुणा लेखकाच्या 'सुख आणि शांती' या पुस्तकातले दोन उतारे वाचनात आले. एकाचे शीर्षक होते 'भुजंग', तर दुसऱ्याचे शीर्षक होते 'खार'. 'भुजंग' उताऱ्यातले सर्पाचे वर्णन केवळ अप्रतिम होते. कुसुमाग्रजांच्या 'अहिनकुल' कवितेतल्या सर्पाआधी भेटलेला हा अत्यंत देखणा, पण तितकाच भयानक सर्प. ते वर्णन अजून अंगावर काटा उभा करते. तीच गोष्ट 'रसवंती' मधल्या कवितांच्या उताऱ्यांची. त्या तीन भागांनी विद्यार्थ्यांच्या किमान तीन पिढ्यांची रसिकता जागी केली. जोजवली. जोपासली. त्याच्या जरा आधीच्या काळात 'बालशारदा' या गणेश हरी पाटील यांच्या संकलनाने किंवा 'वासंती' या वि. स. सुखटणकर यांच्या संकलनाने हे कार्य थोड्याबहुत प्रमाणात केले होते. पण 'महाराष्ट्र रसवन्ती' ने तत्कालीन विद्यार्थ्यांना काव्याची जी समज दिली, तिच्यावर जे सूक्ष्म व खोल संस्कार घडवले त्याला खरोखर तोड नाही. 'रसवन्ती' पुढे अभ्यासक्रमातून का व कशी गेली मला माहीत नाही. पण त्यामुळे विद्यार्थ्यांची फार हानी झाली असे मला वाटते. आज आपण 'आठवणीतल्या कवितां' चे चार भाग जर वाचले, तर 'रसवन्ती' च्या श्रीमंतीची थोडीबहुत कल्पना करता येईल. कारण त्यांतल्या अनेक कविता अनेक जुन्या पाठ्यपुस्तकांप्रमाणे 'रसवन्ती'तूनही घेतलेल्या आहेत.

'रसवन्ती' चे सर्वांत उल्लेखनीय वैशिष्ट्य म्हणजे तिच्या संपादकांची सर्वसमावेशक दृष्टी आणि एकूण काव्यपरंपरेच्या सलगतेचे त्यांना असणारे स्पष्ट भान. त्या काळी एक तर जुन्या काव्याचा प्रचंड अभिमान असे, नाहीतर नव्याची उतावळी उत्सुकता असे. 'रसवन्ती' च्या संपादकांनी ही दोन्ही अतिरेकी टोके टाळली. ओवी-अभंगापासून तो कटावापर्यंत, मोरोपंती आर्यापासून तो वामनी श्लोकांपर्यंत, सुनीतापासून तो रुबायांपर्यंत जे जे जुने-नवे रचनाबंध, कवितेचे जे आविष्कार उपलब्ध होते ते सारे केवळ रसवत्तेचा निकष लावून संपादकांनी मधुकर वृत्तीने 'रसवन्ती'त समाविष्ट केले होते. 'फुलराणी', 'हिरवे तळकोकण', 'संत तुकाराम', 'एका रात्रीची गंमत', 'ते पाऊल कुणाचे ?' एक ना दोन-या साऱ्या सुंदर कविता 'रसवन्ती'त आपण प्रथम वाचल्या आणि त्यांचे खोल संस्कार पुढे जन्मभर साथ करत राहिले. पुढच्या काळात सामोऱ्या आलेल्या काव्याचे स्वागत करण्यासाठी मनाची सुंदर मशागत त्यांनी केली, त्याबरोबर काव्यातील प्रयोगशीलतेचे महत्त्वही शिकवले. सुनीताचा रचनाबंध 'रसवन्ती'त प्रथम ओळखीचा झाला. तशाच उमरखय्यामच्या रुबाया. त्याही 'रसवन्ती' तच वाचायला मिळाल्या. तोपर्यंत 'रुबाया' म्हणजे काय ते ठाऊक नव्हते आणि उमरखय्यामचे तर नावही कधी ऐकलेले नव्हते. तथापि, 'रसवन्ती' त माधव ज्यूलियन यांनी केलेले रुबायांचे अनुवाद वाचले आणि एक अनोखा, सुंदर अनुभवप्रदेश नजरेपुढे उलगडत गेला. खरे तर तेव्हा रुबायांचा खोल अर्थ उमगलाही नव्हता-

*ये भर प्याला अन् कुसुमाकर होळींत*
*वैराग्यवस्त्र तें फेक ऋतूंतिल शीत*
*नच दूर जायचे उडुन काळपक्ष्याला*
*अन् पंख पहा निजराही हा मारीत !*
*किंवा*
*अन् एक दिनान्तीं बघे फिरत मी हाटीं*
*कुंभार भिजवुनी तिंबी अपुली माती*
*अन् क्षुण्ण जिभेने ती पुटपुटली कांही*
*'हळु जपून भाई ! जपून हलक्या हातीं !'*

शालेय वयात भेटलेल्या या क्रमिक पुस्तकांनी आपल्या सर्वांच्याच मनात तेव्हा वाचनाचे वेड निर्माण केले. साहित्यप्रेम जागवले. जुन्या साहित्याचा अधिक्षेप न करता नव्याबद्दलचे कुतूहल, स्वागतशील रसिकता आपल्या ठायी रुजवली आणि त्याचा परिणाम म्हणून त्या लेखकांची, कवींची जास्त ओळख करून घेण्यास आपण प्रवृत्त झालो. ती ती पुस्तके मुळातून मिळवून वाचावीत अशी अधीरता वाटू लागली. 'रसवन्ती'त वाचलेल्या रुबायांमुळे पुढे फिट्झेरल्डचा अनुवाद तर वाचलाच, पण नंतर

माधव ज्युलियन यांनी अनुवादित केलेल्या उमरखय्यामच्या मूळ रुबायाही वाचल्या. यातूनच पुढे महाविद्यालयात जी अभिजात वाङ्मयाची पुस्तके समोर आली त्यांचा आनंद परिपूर्ण घेण्यासाठी आवश्यक ती वृत्ती आपल्या ठायी निर्माण झाली. मेघदूत, उत्तररामचरित, हॅम्लेट अशा थोर साहित्यकृती जेव्हा अभ्यासक्रमात नेमल्या गेल्या, तेव्हा त्यांचा आस्वाद घेण्याचे कुतूहल शालेय क्रमिक पुस्तकांनीच आपल्या मनात जागे केले होते हे ध्यानात आले आणि रसिकतेचा प्रवाह अखंडपणे वाहता राहिल्याचे साक्ष पटली. वाढत्या वयाचा, ताणलेल्या तारांइतक्या झंकारू लागलेल्या संवेदनांचाही यात काही भाग होता. प्रेमकवितांचे आकर्षण त्यावेळी अधिक तीव्रतेने वाटू लागल्यास त्यात काही आश्चर्य नव्हते. इथेच आपण साऱ्यांनी ऋण मानायला हवे ते महाविद्यालयात तेव्हा भेटलेल्या प्राध्यापकांचे. नुकत्या नुकत्या रुजू लागलेल्या मनातल्या कोवळ्या अंकुरांना त्यांनी खतपाणी घातले. त्यांना योग्य दिशा दाखवली. कालिदासाची काव्ये, शेक्सपियरची नाटके संत-पंडितांची काव्ये, अनेक आधुनिक वाङ्मयकृती यांची आधी नुसती तोंडओळख असते. तिचे घट्ट परिचयात रूपान्तर झाले ते महाविद्यालयीन जीवनातच आणि मग आपण मुख्य साहित्यप्रवाहाशी अलगद येऊन पोहोचलो.

या अभ्यासक्रमातल्या पुस्तकांच्या जोडीनेचं मग आपण बाहेरचे वाचनही सुरू केलेले असते आणि त्यात कधी कधी अकस्मात् काही नवे, अनोखे पण सुंदर भेटून जाते. मला त्या वयात भेटलेली आणि मनावर खोल ठसा उमटवून गेलेली कृती म्हणजे 'सुर्गी' हे कवितांचे पुस्तक. साहित्यविषयक एक नवी प्रयोगशील दृष्टी बाळगून ग.ल. ठोकळ यांनी ग्रामीण कवितांचे हे संकलन तयार केले होते तसे रविकिरण मंडळातले ज्येष्ठ कवी तेव्हा 'न्ह्यारिचा वखुत होईल', 'झाल्या तिन्हिसांजा,' 'लेजिम,' 'भलंरी' सारख्या प्रयोगशील, पण काहीशा कृतक ग्रामीण कविता लिहीत होते. पण त्यांच्या बरोबरीने खेड्यांपाड्यात वावरणारे आणि कृषिजीवनाचा अस्सल अनुभव घेतलेले अनेक दुय्यम दर्जाचे कवी आपापल्या बोलीभाषेत ग्रामजीवनाचे चित्रण जिवंतपणे आणि उत्कटतेने रंगवत होते. सोपानदेव चौधरींसारखा कवी खानदेशी भाषेत आपल्या सगबहिणीला म्हणजे मानलेल्या बहिणीला पेरणीसाठी साद घालताना म्हणत होता -

*चाल सोना येती काव्हं माह्या घरी पेरनीले*
*आज कुठलचा होका आला पेरनीचा तुले ?*

'सुरेश' या नावाने कविता लिहिणारा कुणी एक अज्ञात कवी अशाच बोलीभाषेत पाटील-पाटलिणीचा लेकीच्या लग्नाबद्दलचा संवाद सुंदर रीतीने सांगत होता -

*मांगनं उन आज ले*
*सांग मंग देस अठ्ये तारिले !*

तर आणखी कुणी कवी बाणकोटी की बागलाणी - अशाच कोणत्या तरी बोलीभाषेतले नणंद-भावजयांचे संभाषण तितक्याच नाट्यपूर्ण रीतीने आपल्याला ऐकवत होता. त्यातली गंमत अनुभवायला सहजपणे शिकवत होता -

*व्हंजि चाललं चाकरमानी घेऊन डोईवरी*
*गुळीचा ओझा इकया शेरी*
*ठनकत होता कपाल म्हुन म्या वायंच चोललाय चुना*
*येईना त्येंच्या कंदी मना !*

या कवितांनी ग्रामीण जीवनाबद्दल बरेच काही सांगितले, सुचवले आणि मग ठोकळ, दिघे, रामतनय, बापूसाहेब माटे यांनी तर थेट ग्रामीण परिसरासून प्रत्यक्ष फिरवूनच आणले. आपल्या रसिकतेला त्या काळात असे कितीतरी आणि किती दिशांनी पैलू पडत गेले हे आज आठवले तरी मनात कृतज्ञता दाटून येते.

याच तऱ्हेचे वाङ्मयीन कार्य करणाऱ्या त्या काळातल्या अनेक माला या क्षणी मला आठवत आहेत. साहित्यात त्यांचे स्थान काय आहे मला माहीत नाही. पण आपल्या स्मरणात मात्र त्यांना अढळ जागा लाभलेली आहे. भारत गौरव ग्रंथमाला, हिंद एजन्सी माला, महाराष्ट्र कुटुंब माला. सरस आणि सुरस वाङ्मयरत्नमाला अशा कितीतरी माला आपण सर्वांनीच एके काळी वाचलेल्या आहेत. त्यींनी आपले रंजन केले. वाचनाची भूक प्रज्वलित केली. मुख्य म्हणजे त्यांतले बरेच लेखक जरी सामान्य होते, तरी त्यांनी ठोस मराठमोळ भाषा वाचण्याचा आनंद दिला, तसेच आज वापरातून गेलेले अनेक मराठी वाक्प्रचारही मला शिकवले. 'जिकडे पुढा तिकडे मुलुख थोडा.' 'सुटले केस पाठीलाच शरण येतात,' 'सर घोड्या पाणी खोल,' 'पाठी येऊन छळीन पोटी येऊन छळीन असं पोरानं केलं बघा !' या वाक्प्रचारांत सुंदर प्रतिमा आहेत. कल्पनारम्य काव्य आहे. मुख्य म्हणजे जीवनाचा अनुभव आहे. एकीकडे हरिभाऊ, देवल, किर्लोस्कर, गडकरी, मामा वरेरकर अशी मराठी साहित्यातली उत्तुंग शिखरे बघत असतानाच भोवतालचे हे अवांतर साहित्यही आपण आवडीने वाचत नव्हतो का ? भारत गौरव ग्रंथमालेची अनेक पुस्तके वाङ्मयगुणांनी संपन्न होती. अच्युत बळवंत कोल्हटकरांसारखा हरहुन्नरी लेखक 'संदेश' च्या संपादनाबरोबरच हिंद एजन्सी मालेमधून छोट्या पण वेधक कादंबऱ्या लिहीत होता. त्यातूनच पुरवणीदाखल 'वत्सलावहिनी' ची पत्रेही मी अनेक वेळा वाचली आहेत. पुरुष लेखकाने स्त्रीची मनोव्यथा आणि तिची भाषेची लकब इतकी उत्कृष्टपणे आत्मसात केल्याचे दुसरे उदाहरण-हरिभाऊंची यमू, गतभर्तृका -असे काही अपवाद सोडून अन्यत्र क्वचितच आढळेल वत्सलावहिनीच्या ठसकेदार बोलण्याचा हा एक नमुना बघा -'इश्श मेलं भावजी. मी म्हणते, आमची बायकांची अक्कल तर बोलून चालून चुलीपुरतीच. पण तुमच्यासारखे चांगले शहाणेसुरते

पुरुष तरी असेंब्लीत जाऊन काय मोठे दिवे लावतात हो ?' तर या अशा अनेक मालांनीदेखील संस्कारक्षम वाढाळू वयात आपली रसिकता घडवण्यात बऱ्याच मोठ्या प्रमाणात हातभार लावला आहे. आणि या मालांबरोबर नाथमाधवांच्या स्वराज्यावरील कादंबऱ्या आणि हडपांच्या पेशवाईवरील कादंबऱ्या या मालांचीसुद्धा एके काळी आपण आवडीने पारायणे केली नाहीत का ?

तरुण वयात केलेले हे सारे वाचन. त्यातले बरेचसे आज विस्मृतीत गडप झालेले असले, तरी त्या त्या वेळी त्याने आपले वाङ्‌मयीन भरणपोषण केलेले असते आणि त्याच्या जोडीने वाचलेल्या अनेक वृत्तपत्रांनी व नियतकालिकांनीही आपली अभिरुची प्रगल्भ, संपन्न, समृद्ध केलेली असते. अगदी बालोद्यान, शालापत्रक, आनंद अशा शाळकरी वयात वाचलेल्या मासिकांपासून तो थेट चित्रमयजगत्, स्फूर्ती, किर्लोस्कर खबर अशा तत्कालीन मासिकांपर्यंत साऱ्यांचे ऋण याबाबतीत मानावे लागते.

आपणांसारख्या रसिकांच्या आणखी काही गरजा आहेत. एक काळ असा होता की, लेखन केवळ हौसेपोटी आणि एका आंतरिक ऊर्मीने केले जाई. लेखकांना त्यातून काही अर्थलाभ होत नसे. 'काव्यं यशसेऽर्थकृते' असे जरी साहित्यशास्त्रज्ञांनी सांगून ठेवलेले असले, तरी लेखकांना लेखनातून द्रव्यलाभ क्वचित होई. आज ही परिस्थिती पालटली आहे. लेखकांना मोठमोठी पारितोषिके मिळत आहेत. गेल्या वर्षीपासून महाराष्ट्र फौंडेशन दोन दोन लाखांची पारितोषिके लेखकांना देऊ लागले आहे. इतरही धनिक, उद्योजक, साखर कारखानदार, वेगवेगळ्या संस्था यांच्याकडून लेखकांना भरघोस पारितोषिके मिळतात. अत्यंत गौरवपर असे 'ज्ञानपीठ' पारितोषिक आहे. कुसुमाग्रज प्रतिष्ठानचे पुरस्कार आहेत. साहित्य अकादमीचे पुरस्कार आहेत. अखिल भारतीय पातळीवरचे कबीर पुरस्कार, बिर्ला फौंडेशनचे पुरस्कार आहेत, आणि शासकीय पुरस्कारांचे वाटपही दर वर्षी होते.

पूर्वीच्या काळी 'अशा कवीची बूज नाही कोणी करायला' असे दुःखोद्‌गार एखादा कवी काढत असे. आज ती परिस्थिती राहिलेली नाही. आमचे कविमित्र नारायण सुर्वे म्हणतात त्याप्रमाणे लेखकांना, कवींना सध्या बरे दिवस आले आहेत. माझ्यासारख्या साहित्योपजीवी लेखिकेला अर्थातच या गोष्टीचे मनःपूर्वक समाधान वाटते. 'वाणीचे ओघ कविदुर्दशेमधून येतात.'असे केशवसुत म्हणतात. पण त्यांचा तो उद्‌गार केवळ आर्थिक विपन्नावस्थेच्या संदर्भात असेल असे मला वाटत नाही.या पारितोषिकांनी साहित्य विश्वात एक आनंददायक वातावरण निर्माण केले आहे यात शंका नाही.

माझ्यासारखीला एकच वाटते, लाखांनी आणि हजारांनी मोजता येणाऱ्या या पारितोषिकांमधला काही भाग जुन्या दुर्मिळ पुस्तकांची पुन्हा छपाई करणे आणि ती पुस्तके वाचकांना कमी किंमतीत उपलब्ध करून देणे यासाठी वापरता येणार नाही का ? अशी अनेक पुस्तके या क्षणी मला आठवत आहेत की, जी मला आणि

*आपणांपैकी अनेकांना फार मनापासून हवी असतील. हरिभाऊ आपटे यांच्या 'वज्राघात',* 'मी', 'यशवंतराव खरे', 'उष:काल' अशा काही कादंबऱ्या मोजक्या किंमतीत मिळायला हव्यात. विठ्ठलराव घाटे यांचे 'दिवस असे होते,' आनंदीबाई शिर्के यांचे 'सांजवात' ही आत्मकथने आज बाजारात मिळत नाहीत. मला ती हवीशी वाटतात. माट्यांचे समग्र साहित्य मिळावे असे वाटते. माडगावकरांचे 'मुंबई-वर्णन', वा. ब. पटवर्धन यांचे 'काव्य आणि काव्योदय' हे मिळायला हवे. चंद्रशेखर यांची 'चंद्रिका' आणि 'माधव कवीची कविता' ही संकलनेही फार हवीशी वाटतात. ही पुस्तके आम्हाला कोण मिळवून देणार ? व्यावसायिक प्रकाशक -काही अपवाद सोडून-अशा जुन्या पण दुर्मिळ पुस्तकांकडे वळत नाहीत. वळले तर किंमती जास्त ठेवतात. कारण व्यवसायाच्या आर्थिक लाभाकडे दुर्लक्ष करणे त्यांना परवडणार नाही.असा हा पेच आहे. पारितोषिकांवर खर्ची पडणाऱ्या पैशांतला काही भाग जर अशा पुस्तकांच्या प्रकाशनाच्या कामी आला, तर हा तिढा काही प्रमाणात तरी सुटेल अशी आशा करायला जागा आहे.

आज आणखी एक उणीव तीव्रतेने भासत आहे ती उत्तम वाङ्मयीन नियतकालिकांची. मराठी साहित्याचा आधुनिक काळातला प्रवास कुणी पाहिला, तर आपली अभिरूची सुजाण आणि चोखंदळ करण्याचे कार्य सर्जनशील साहित्याच्या बरोबरीने करणाऱ्या नियतकालिकांची एक प्रदीर्घ आणि अखंड अशी परंपरा त्याला आठवल्यावाचून राहणार नाही. विविधज्ञान-विस्तारापासून तो मनोरंजन, पारिजात, रत्नाकर, यशवंत, ज्योत्स्ना, साहित्य, अभिरुची, सत्यकथा अशी किती तरी वाङ्मयीन नियतकालिके आपण त्या त्या वेळी अगदी आसासून वाचली आहेत. 'प्रतिभा' पाक्षिकाचे एकत्र बांधलेले अंक प्रा. रा. श्री. जोगांनी मला अनपेक्षितपणे वाचायला दिले होते तेव्हा बसलेला सुखद आश्चर्याचा आणि आनंदाचा धक्का या क्षणीही मला स्पष्ट आठवत आहे. या नियतकालिकांतल्या कविता, कथा, हप्त्याहप्त्याने त्यात येणाऱ्या कादंबऱ्या, वाङ्मयीन आणि सांस्कृतिक चिंतनात्मक लेख यांनी वयाच्या त्या त्या वळणावर आपणा सर्वांचीच अभिरूची समृद्ध केली याचे स्मरण आपणालाही असेल. त्यात आपल्याला आपले आवडते लेखक, कवी सापडले. काही अज्ञात प्रतिभावंतांचा शोध लागला. साहित्यात येऊ लागलेली नवी वळणे कळली. शैलीबद्दलची जाण विकसित झाली. वाङ्मयव्यवहारात अशा नियतकालिकांचे स्थान फार महत्त्वाचे आहे. मुख्य म्हणजे नव्याने आपल्या सर्जनशीलतेचा शोध घेत चाचपडणाऱ्या तरुण लेखक-कवींना या नियतकालिकांच्या संपादकांनी जे साहाय्य केले, जे मार्गदर्शन केले त्याचे ऋण ते कलावंत विसरणे केवळ अशक्य आहे. त्या काळातले संपादकही तसेच साहित्यप्रेमी जाणकार होते. साहित्यक्षेत्रातला त्यांचा अधिकार फार मोठा होता. या क्षेत्रात उदयाला येणाऱ्या प्रतिभावंतांची ओळख त्यांना एका सूक्ष्म अंत:प्रेरणेने पटत होती व ती ओळख ते आपल्यालाही करून देत होते. वि. स. खांडेकर, वा. रा. ढवळे, 'अभिरुची'

चे चित्रे, 'सत्यकथे'चे श्री. पु भागवत आणि राम पटवर्धन यांची या क्षेत्रातली कामगिरी केवळ अजोड आहे. आज दूरदर्शनसारख्या प्रसारमाध्यमांचे, चित्रपटांचे, झगमगत्या गुळगुळीत मासिकांचे एकूणच आपल्या जीवनावर आक्रमण होत आहे आणि वाङ्मयीन नियतकालिके तर संपुष्टातच आली आहेत. महाराष्ट्र साहित्य पत्रिका, प्रतिष्ठान, अनुष्टुभ्, कविता-रती अशी काही नावे आठवतात. पण ती फारच मोजकी आहेत याची मला खंत वाटते. वेगवेगळ्या वृत्तपत्रांच्या पुरवण्या ललित आणि वैचारिक साहित्याला थोडा वाव देण्याचा प्रयत्न करत आहेत, पण तो पुरेसा नाही. आणि नव्या प्रतिभांचा शोध घेणे हे काम तर त्यांच्या आटोक्यातलेही नाही. कवींनी किंवा लेखकांनी काही बरे लेखन केले, तर ते आवर्जून छापणारी मासिके आज अस्तित्वात नाहीत आणि म्हणून वाचकांनाही ते लेखन वाचायला मिळत नाही. त्यासाठी दिवाळी अंकांची आशाळभूत प्रतीक्षा करावी लागते.

जी गोष्ट वाङ्मयीन नियतकालिकाची, तीच वाचनालयांची देखील. एकेकाळी तात्यासाहेब केळकरांनी ग्रंथालयांना 'ज्ञानाची सदावर्ते' असे सुंदर नाव दिले होते. चांगले ग्रंथालय हा वाचकांसाठी एक प्रसन्न विरंगुळा, एक आधाराचे ठिकाण असते. अभिरुचीसंपन्न वाचक तयार करण्याचे कार्य ही ग्रंथालये करत असतात. आपल्यापैकी बहुतेकांना आपल्या तरुण वयात अशी ग्रंथालये भेटली असतील. तिथून पुस्तक आणावे आणि अर्धी रात्र उलटून गेली तरी डोळ्यांवरची पेग दूर उडवून बेभानपणे ते वाचत राहावे हा अनुभव तरुण संस्कारक्षम वयात ज्यांनी घेतला नाही ते खरोखर अभागी म्हटले पाहिजेत. एखाद्या आवडत्या पुस्तकाच्या शोधात आपण असावे आणि आपल्या ग्रंथालयाच्या एखाद्या कप्प्यात ते अकस्मात सापडावे यातला थरार काही विलक्षण असे, कालिकामूर्ती आणि इंद्रभुवन गुहा, वीरधवल आणि कोरलईचा किल्लेदार, पालखीचा गोंडा आणि शृंगेरीची लक्ष्मी सैतानी चक्कर आणि सोनेरी टोळी ही माझी आवडती चित्रविचित्र पुस्तके काही आमच्या घरी भेटली, पण बरीचशी पुणे नगर वाचन मंदिरानेच मला दिली. आणि अशा रंजनपर अद्‌भुतरम्य पुस्तकांच्या जोडीला कितीतरी वैचारिक गंभीर ग्रंथदेखील तिथे मिळाले. आज वाचनालयांचे हे सर्वसमावेशक स्वरूप कुठे बघायला मिळते ?

रसिकतेची अशी साधना, जोपासना करतानाच तिच्या वाटेत आडव्या येणाऱ्या विघ्नांबाबतही आपण जागरूक राहायला हवे. ही रसविघ्ने कधी ठळकपणे जाणवणारी असतात, तर कधी सूक्ष्मपणे ती आपल्या अभिरूचीवर आक्रमण करत असतात त्यांच्यापासून स्वत:ला सावध व सुरक्षित ठेवणे हे रसिकतेच्या जोपासनेसाठी आवश्यक असणारे एक कर्तव्य ठरते. यातले अगदी पहिले रसविघ्न म्हणजे छापील पुस्तकांचे आपणाला वाटणारे अवास्तव महत्त्व आणि श्रवणाच्या द्वारा जे साहित्य आपण अनुभवतो त्याविषयी उगाचच वाटणारी एक तुच्छतेची भावना. वस्तुत: आपली साहित्यपरंपरा प्रामुख्याने मौखिक आहे वेद पाच हजार वर्षापूर्वी निर्माण झाले. ज्ञानेश्वर सातत्याने श्रोत्यांना आवाहन करतात संत-पंडितांचे काव्य आपण श्रवणाद्वारेच अनुभवत होतो.

आपली कथा आणि कीर्तने, पुराणे आणि प्रवचने, गोधळ आणि भारुडे, पोवाडे आणि लावण्या-सारे आपण कानाने ऐकत आलो. मनात साठवत आलो. मागे व्यंकटेश माडगूळकर म्हणाले होते ते अगदी बरोबर आहे. शहाण्या माणसाला आपण Welread म्हणत नाही. बहुश्रुत म्हणतो. कारण पूर्वी श्रवण हेच ज्ञान संपादनाचे प्रमुख साधन होते. त्या मानाने छापील पुस्तकांची आपली परंपरा केवळ दोनशे वर्षांची आहे. पण छापील मजकुराचा आपल्याला एक दबदबा वाटत असतो. त्यामुळे संत-पंडितांची कितीतरी स्फुट कवने आपण विसरून गेलो आहोत आणि लोकगीतांच्या समृद्ध आणि सुंदर भांडाराकडेही आपण दुर्लक्ष केले आहे. त्यांच्या श्रवणाने रसिकतेला जो भरदारपणा येतो त्याला आपण मुकलो आहोत. या स्फुट कवनांत, बायकी गाण्यांत वाङ्मयाचे सुवर्णकण चमकत असतात. पण बघते कोण ? मग मध्वमुनीश्वरासारखा एखादा पंडित कवी दुय्यम म्हणून बाजूला पडतो. आणि त्याचे असे सुंदर गाणे आठवणे अवघड होऊन बसते.

*साजणि, लागलि मजला नीज !*
*मावळले रविशशि पंचांगी नुरली बीज न तीज*
*जागर आणि स्वप्नावरती अवचट पडली वीज*
*मध्वमुनीश्वर म्हणतो माजी निजसुखावरी रीझ*
*साजणि, लागली मजला नीज !*

किंवा अगदी कोकणस्थ ब्राह्मणी भाषेचीदेखील जुनी वळणे काही बायकी गाण्यांतून कानांवर पडतात हे आपल्याला ठाऊक नसते. मला आवडणारे हे एक गाणे सांगावेसे वाटते-

*चुली चुली तू शंभरांचे शिजव*
*शंभरांचे अन्न हजारांना पुरो*
*चुलीपाठीमागे हंडाभर उरो ।*
*किंवा*
*दिव्या दिव्या सुंदरा*
*जा आपल्या मंदिरा*
*आई करील ताटवाटी*
*बायको करील शेजबाज*
*आवडत्या राणीला, नावडत्या राणीला*
*फार फार पुसले म्हणून सांग !*

मौखिक काव्याकडे असे दुर्लक्ष आपण करत असल्यामुळे शब्दांचा, बोलीभाषेचा गोडवा, लयीची वळणे, नादांचे आघात यातल्या सौदर्याकडेही आपण पाठ फिरवली. कविता श्रेष्ठ की गीत श्रेष्ठ याची शुष्क चर्चा करत राहिल्यामुळे ग. दि. माडगूळकरांच्या गीतांतले अव्वल दर्जाचे काव्यगुण आपण ओळखू शकलो नाही. मासिकात छापून

आलेली सामान्य कविता श्रेष्ठ समजायची, पण अनेकांच्या ओठांवर खेळणाऱ्या काव्यसमृद्ध गीतांनाही कवितेच्या पंक्तीत पाट द्यायचा नाही - रसिकतेचे हे करंटेपण आपण दाखवत राहिलो ते केवळ छापील मजकुराला आपल्या मनात असलेल्या अवास्तव महत्त्वामुळे. आज सुदैवाने आमचे अनेक प्रतिभासंपन्न कवी आवडीने गाणी लिहू लागले आहेत याचा मला आनंद वाटतो.

सर्जनशील लेखकाइतकेच उत्तम समीक्षकांचेही महत्त्व आपण ओळखायला हवे. कुणी काही म्हटले, तरी समीक्षक हा साहित्यव्यवहारातला एक अत्यावश्यक असा घटक आहे. रवींद्रनाथ टागोरांच्या समीक्षात्मक ललित लेखांचा एक संग्रह 'प्राचीन साहित्य' या नावाने मराठीत फार पूर्वी अनुवादित झाला आहे. त्यातला 'काव्यसृष्टीतील उपेक्षिता' हा लेख आपणांपैकीही अनेकांनी वाचला असेल. 'मेघदूता'वरही एक फार सुंदर लेख त्यात होता. सर्जनशील कलावंत जेव्हा समीक्षेकडे वळतो, तेव्हा तिथेही तो नवनिर्मिती करतो आणि कलाकृतीमधली अज्ञात सौंदर्ये तो आपल्याला दाखवून देतो. रसिक आणि जाणकार समीक्षक हा आपणा रसिकांचा मोठा उपकारकर्ता आहे. श्री. पु. भागवतांसारखे संपादक हेही उत्तम समीक्षाकार असतात. त्यांच्यामुळे आपली रसिकता जास्त समृद्ध होते यात शंकाच नाही. गंगाधर गाडगीळांनी नवकथा आपल्याला समजावून दिली. मर्ढेकर, इंदिरा, अनेक जुने कलावंत यांचे रसिकतेने मर्मस्पर्शी समीक्षण केले. तीच गोष्ट माधव आचवल, दि. के. बेडेकर, म. वा. धोंड अशा इतरही समीक्षकांची. त्यांनी आपल्याला किती दिले आहे ते आपण कसे विसरणार ?

इथेच आपणा सर्व रसिकांच्या वतीने मला एक विनंती या समीक्षकांना करावीशी वाटते. मराठीत अधूनमधून काही कलाकृती निर्माण होतात. वाहत्या प्रवाहात बाजूला पडणारे काही खडक असावेत अशा त्या वाटतात. त्या आपल्याला कळत नाहीत. पण मोठे संपादक त्यांची भलावण करतात. समीक्षक त्यांचे भरभरून कौतुक करतात. मग आपणांसारखे सामान्य वाचक गांगरून जातात. समीक्षकांना ते भितातसुद्धा ! इतक्या थोरामोठ्यांनी गौरवलेल्या या कलाकृती मला दुर्बोध वाटतात. त्यांच्या अंतरंगापर्यंत मी पोचू शकत नाही, आपला दरवाजा त्या जराही किलकिला करत नाहीत ही माझी खंत असते. अशा वेळी जाणकार समीक्षकांनी या साहित्यकृतींचे गारुड आम्हांला थोडे तरी समजावून द्यावे असे वाटते. काही समीक्षक ते काम करतातही. पण इथेच पुन्हा आणखी एक धोका संभवतो. काही लेखक, कवी दुर्बोध होतात, कारण अनुभूतीच्या निबिड अरण्यात ते खरोखरच दूरवर शिरलेले असतात आणि तिथले काही गूढ भाग ते आम्हांला ओझरते दाखवतात. परंतु असे प्रामाणिक लेखक जेव्हा साहित्यात येतात तेव्हा त्यांचे चलाख व चटपटीत अनुकरण करून स्वत:ही नामवंत होऊ पाहणारे काही धूर्त धंदेवाईकही असतातच. एक मर्ढेकर आले की, अनेक कृतक नवकवींची रांग लागते. एक नारायण सुर्वे आले की, सारे 'बाप हो' म्हणून वाचकांना आर्त साद

घालतात आणि 'रोजी रोटीचे हिशेब' करू लागतात. अशा अनुकरणशील कलाकारांचे पितळ नंतर उघडे पडत असले, तरी काही काळ साहित्यात त्यांची सद्दी असते यात शंका नाही, आणि अनेक समीक्षकदेखील अशा आविर्भावाने चकतात यातही शंका नाही. या कलावंतांपासून, तसेच समीक्षकांपासूनही रसिकांनी जरा जपून राहायला हवे. 'सतां हि सन्देहपदेषु वस्तुषु प्रमाणमन्त: करणप्रवृत्तय: ॥' हा इषारा इथेही ध्यानी घ्यायला हवा.

एक थोडी वेगळी शंका आपणांसमोर मांडते. धूर्त धंदेवाईकांची गोष्ट सोडू. पण अनेक प्रांजल कलाकारही याबाबतीत फसताना दिसतात. त्याचे कारण नाविन्य आणि आधुनिकता यांबद्दल त्यांनी करून घेतलेले अपसमज. साहित्यात नव्या लाटा येतात. पण त्यामुळे जुने नाहीसे होते असे नाही. किंवा त्याची थोरवी मी होते असेही नाही. लेखकांचा— विशेषत: कवींचा एक वर्ग अशा कृतक नाविन्यासाठी हपापलेला असतो. सुनीत हा रचनाबंध आला तेव्हा रसहीन व कृत्रिम सुनीतांचा सुळसुळाट झाला. मुक्तछंद आला तेव्हा केवळ मुक्तछंद किंवा मुक्त रचना म्हणजेच नाविन्य असे अनेक कवी समजू लागले आणि छंद, जाती, वृत्त यांचा ते विटाळ मानू लागले. सुरेश भट उत्तम गझल लिहितात हे पाहिल्यावर 'गझल के सिवा बात नही।' अशी हवा सर्वत्र पसरली. शिरीष पै, सुरेश मथुरे या कवींनी जपानी हायकूचे रचनातंत्र, आशय नीट समजावून घेऊन हायकू लिहिल्या. पण बऱ्याच सामान्य कवींनी 'हायकू' हे सध्या चलनी नाणे आहे म्हणून हायकू लिहिण्याचा सपाटा लावला. चंद्रशेखर गोखलेसारख्या कवीचा चिमुकल्या कवितांचा संग्रह तुफान लोकप्रिय झालेला पाहून मराठीत 'चारोळ्यां'ची भरमसाट निपज होऊ लागली. असे वरवरच्या नाविन्याला हुरळणारे आणि त्यातच आधुनिकतेचे सारसर्वस्व भरलेले आहे असे मानणारे कवी सर्व काळात आणि सर्व परिस्थितीत आढळतात. कृतक नव्याचा काही काळ उदोउदोही होतो. पण या लाटा येतात नि जातात. मूळचे आशयगर्भ आणि सुंदर असे साहित्यविश्व त्याने उद्ध्वस्त होत नाही.

आपल्या रसिकतेच्या मार्गातले एक रसविघ्न म्हणजे साहित्यातील श्रुतयोजनासंबंधी काही मान्यवर लेखकांचेही असलेले अज्ञान. श्रुतयोजन म्हणजे पूर्वीच्या प्रसिद्ध गद्य वचनांचे किंवा काव्यपंक्तींचे लेखकाने आपल्या लेखनात केलेले पुनर्योजन. इंग्रजीत त्यालाच Allusion असे म्हणतात. अशा मार्मिक श्रुतयोजनाबद्दल एखाद्या लेखकाचे आपण कौतुक केले, तर त्याला तो आपल्यावर होणारा वाङ्मयचौर्याचा आरोप वाटतो आणि रागावतो. तथापि श्रुतयोजन म्हणजे वाङ्मयचौर्य नव्हे. रसिक आणि चोखंदळ लेखकाने पूर्वसाहित्यपंक्तींचे श्रुतयोजन करताना आपल्या व्यक्तिमत्वात ते मुरवून त्याची सुंदर पुनर्निर्मिती केलेली असते. त्याला स्वत:चे असे एक नवे परिमाण दिलेले असते. शेक्सपियरपासून कालिदासापर्यंत, गडकऱ्यांपासून पु. ल. देशपांडे यांच्यापर्यंत आणि ज्ञानेश्वरांपासून मर्ढेकरांपर्यंत अनेक प्रतिभावंतांनी अशी श्रुतयोजने केली आहेत. खरे तर श्रुतयोजन हा साहित्यातला एक रसगर्भ अलंकार आहे लेखकाच्या गाढ

व्यासंगाची तिथे साक्ष पटते आणि वाचक जितका बहुश्रुत असेल तितका त्याला तिथे पुन:प्रत्ययाचा आनंद लाभतो. ही संदर्भसंपन्नता सुखद असते.

ज्ञानेश्वर संस्कृतमधल्या सुभाषितांचे फार सुंदर पुनर्योजन करतात. एक सुभाषित आहे—

*बन्धनानि खलु सन्ति बहूनि*
*प्रेमरज्जुकृत बन्धनमन्यत्*
*दारुभेदनिपुणोऽपि षडंघ्री*
*दुर्बलो भवति पङ्कजकोशे ॥*

याचे श्रुतयोजन ज्ञानेश्वर किती सुंदर करतात पाहा—

*जैसा भ्रमर भेदी कोडे*
*भलतैसे काष्ठ कोरडे*
*परि तो कमळकळिकेमाजी सापडे*
*कोवळिये ॥*
*तेथ उत्तीर्ण होईल प्राणे*
*परि ते कमळदळ चिरू नेणे*
*ऐसे कठिणपणे कोवळे*
*स्नेह देखा ॥*

आणि याचाच पडसाद पुन्हा तुकारामांच्या 'नाही काष्ठासी गुमान । गोवी भ्रमरा सुमन' या ओळीमध्ये उमटलेला दिसून येतो. गडकरी जेव्हा 'एका जुन्या श्लोकाची आठवण ही कविता लिहितात, तेव्हा त्या श्लोकाचे त श्रुतयोजनच करत असतात. पु. ल. देशपाडे याच्या साहित्या.ून जे अनेक आनंद आपल्याला मिळतात, त्यांत त्यांच्या सदर्भसंपन्नतेचा, श्रुतयोजनाचा आनद फार मोठा असतो. त्यामुळे वाचकाच्या मनातल्या अनेक वाड्मयीन स्मृतीना जाग येते आणि तो विलक्षण सुखावतो. माधव ज्युलियन यांच्या 'विरहतरंगा'त श्रुतयोजनांची नुसती बरसात आहे. 'कामी स्वतां पश्यति', 'कोठे आंतरहेतुदर्शि वचने केली अधोरेखित', 'जे जे रम्य निसर्गसुंदर तया शोभाच दे विकृति' अशी अवतरणे सस्कृतप्रेमी रसिकाला एक वेगळाच आनंद देऊन जातात. एखादे अवतरण जसेच्या तसे वापरण्याऐवजी प्रतिभावंत कवी त्याचे distortion विरूपीकरण करतो आणि त्यातून नव्य आशयाचा मनाला थक्क करणारा प्रत्यय तो रसिकाला देतो. मर्ढेकरांनी जुन्या परिचित कवितांतली अशी किती तरी अवतरणे वापरली आणि त्यांचे विरूपीकरण करून अर्थाचे नवे भांडार त्यात खच्चून भरले —

*'घनश्यामसुंदरा श्रीधरा गिरणोदय झाला,'*

*'गयागोपिचा उतरे राजा ।*
*सुटला म्हणती सारे प्राणी'*
*'देवाजीने करुणा केली*
*भाते पिकुनी पिवळी झाली'*
*'सर्वे छिद्राणि पञ्चन्तु ।*
*मा कनिश्चत् दुःखलॉग भरेत्'*

अशी एक ना दोन, किती उदाहरणे सांगावीत ? रसिक वाचकांनी अशी श्रुतयोजनांना वाङ्मयचौर्य समजण्याची चूक करू नये. उलट त्यातून मिळणारा नवा अर्थप्रत्यय आनंदाने स्वीकारावा.

आपल्या रसिकतेच्या मार्गातला आणखी एक अडथळा म्हणजे अनुवादांना कमी लेखणे. पण उत्तम अनुवाद ही आपली साहित्याभिरुची चौरस आणि चौफेर करणारी एक अत्यावश्यक गोष्ट आहे. अव्वल इंग्रजीच्या काळात शेक्सपियरचे अनेक अनुवाद आपल्याकडे झाले. वि. मो. महाजनी यांनी 'सिंबेलिन'चा 'तारा' हा अनुवाद केला. वा. ब. केळकर यांनी 'टेमिंग ऑफ द श्रू'ची मराठी 'त्राटिका' बनवली. महादेवशास्त्र कोल्हटकर यांनी 'ऑथेल्लो' मराठीत आणला आणि त्याच्या आधाराने देवलांचा 'झुंजारराव' अवतरला. आगरकरांनी 'हॅम्लेट' या अद्वितीय शोकान्तिकेचे 'विकारविलसित' हे रूपांतर सिद्ध केले. इथपासून तो नाना जोगांचे 'हॅम्लेट', शिरवाडकरांनी 'मॅक्‌बेथ'चे केलेले 'राजमुकुट'हे रूपांतर असा हा आंग्ल भाषेतला महाकवी सातत्याने मराठीत येत राहिला. एकीकडे इंग्रजी काव्य-नाटके अनुवादित होत असताना दुसरीकडे तत्कालीन शास्त्रीपंडितांनी संस्कृतमधली मृच्छकटिक, शाकुन्तल, उत्तररामचरित, वेणीसंहार अशी उत्तमोत्तम काव्यात्म नाटके मराठी आणली. याबाबतीत परशुरामतात्या गोडबोले यांचे कार्य फार मोलाचे आहे. त्यांनी अनेक अलौकिक संस्कृत नाट्यकृतींचे अतिशय प्रसादपूर्ण व रसाळ अनुवाद केले आहेत. नाटकांतल्या श्लोकांचे त्यांनी केलेले भावानुवाद हा उत्तम भाषांतराचा वस्तुपाठच म्हणायला हवा. काही उदाहरणे आपणाला ऐकवावीशी वाटतात — 'उत्तररामा-' तला हा एक अनुवाद बघा —

*फलमधुकुसुमांनी वृक्ष पूजोत सारे*
*स्फुटकमलसुगंधी मंद वाहोत वारे*
*मधुरतर करावा शब्द येथे शकुन्ती*
*फिरुनि सहज आला राम की या वनान्ती !*

किंवा शूद्रकाच्या 'मृच्छकटिक' नाटकातले पर्जन्याच्या वर्णनाचे जे श्लोक आहेत त्यांतल्या एकाचा अनुवाद पहा —

*हा मेघ आर्द्रमहिषोदरतुल्य काळा*
*शंखाकृती धरि करांत बलाकमाळा*
*विद्युत्प्रभा वसन पीत कसोनि हाते*
*वाटे दुजा हरिच आक्रमितो नभाते !*

इथेच आणखी एका गोष्टीकडे आपले लक्ष मला वेधून घ्यावेसे वाटते. संस्कृत नाटकांचे अनेक अनुवाद मराठीत झाले आहेत. 'मेघदूता'ची तर सत्तावीस-अठ्ठावीस भाषांतरे मराठीत उपलब्ध आहेत. त्या मानाने संस्कृत सुभाषितांकडे - मोजके अपवाद सोडून - फारसे लक्ष आज दिलेले दिसत नाही. वस्तुत: ही सुभषिते म्हणजे काव्य आणि कल्पकता, व्यावहारिक शहाणपण आणि चिंतनशीलता यांचा अमोल ठेवा आहे या आपल्या प्राचीन बहुमोल ठेव्याकडे आपण दुर्लक्ष करता कामा नये.

विंदा करंदीकर म्हणतात, 'प्रत्येक मराठी, इंग्रजीच्या प्राध्यापकाने एका तरी अभिजात अशा परभाषीय साहित्यकृतीचा मराठी अनुवाद केला पाहिजे.' त्यांनी स्वत: गटेचा 'फाउस्ट', ॲरिस्टॉटलचे काव्यशास्त्र, शेक्सपियरचा 'किंग लियर' यांची मराठी भाषांतरे केली, 'अमृतानुभवा'चे अर्वाचिनीकरण केले. जुन्या काळी वि. सी. गुर्जर, वा. गो. आपटे यांनी प्रभातकुमार मुकर्जी, बंकिमचंद्र हे बंगाली लेखक मराठीत आणले. मामा वरेरकर यांनी बंगाली शरदबाबू आपल्याला परिचित करून दिले. जी. ए. कुलकर्णींनी कॉन्राड रिक्टरच्या कादंबऱ्या मराठीत आणल्या. दुर्गाबाई भागवतांनी बाणाच्या 'कादंबरी'चा अनुवाद केला. अगदी आजसुद्धा पु. ल. देशपांडे रवीद्रनाथ टागोरांचे 'पोरवय' आपल्यासमोर मराठीत साकार करतात. उमा आणि विरूपाक्ष कुलकर्णी हे पतिपत्नी कन्नड भाषेतील अनेक उत्कृष्ट साहित्यकृतींचे मराठीत अनुवाद करत आहेत. नॅशनल बुक ट्रस्ट, साहित्य अकादमी यांनीही मोठ्या प्रमाणात प्रांतिक भाषांतील कथा, कादंबऱ्या यांचे अनुवाद इतर भाषिकाना उपलब्ध करून देण्याचे कार्य हाती घेतले आहे. सानेगुरुजीच्या आंतरभारतीच्या कल्पनेचाही इथे कृतज्ञतापूर्वक उल्लेख करायला पाहिजे.

या संदर्भात काही फार जुन्या अनुवादांचे मला स्मरण होते. मघाशी ज्या अनेक जुन्या ग्रंथमालांसंबंधी मी बोलले त्यांनी इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, गुजराती, बंगाली अशा भाषांतील कलाकृतीचे अनुवाद तत्कालीन वाचकांना उपलब्ध करून दिले होते. टॉलस्टॉयची 'रिझरेक्शन', एरिश मारिया रेमार्कची 'ऑल क्वाएट ऑन द वेस्टर्न फ्रंट' यांचे अनुवाद शाळकरी वयातच माझ्या वाचनात आले होते आलेक्सांद्र ड्युमा या फ्रेंच लेखकाच्या कादंबऱ्या 'तीन शिलेदार', 'राणीचा रत्नहार', 'राणीचा खुषमस्कऱ्या' अशा नावांनी मराठीत अवतरल्या होत्या. आणि रेनॉल्डस्‌च्या 'मिस्टरीज् ऑफ ओल्ड लंडन'चेही मराठी रूपांतर झाले होते. हे अनुवाद फारसे कलापूर्ण नसतील, पण मराठी साहित्याचा परभाषांतील कलाकृतीशी अनुबंध जोडण्याचे कार्य काही प्रमाणात तरी त्यांनी खचित केले होते.

भाषांतर काय किंवा रूपांतर काय, स्वतंत्र निर्मितीच्या जवळपास लेखकाला नेण्याचे, जवळजवळ पुनर्निर्मितीचा आनंद त्याला देण्याचे कार्य निश्चित करतात. लेखकाच्या दोन्ही भाषांतील प्राविण्याचा तिथे कस लागतो. सामान्य दर्जाचे स्वतंत्र लेखन करण्यापेक्षा उत्तम अनुवाद करणे अधिक श्रेयस्कर असते. याविषयी एकोणीसशे तेहतीस साली माधव ज्युलियन यांनी एका भाषणात जे उद्‌गार काढले होते ते आजही मला तितकेच महत्त्वाचे वाटतात. ते म्हणाले होते, 'रसिक लेखकाला भाषान्तरासारखी नि:स्वार्थ साहित्यसेवा दुसरी नाही. मी भाषान्तरे केली आहेत आणि मला हा व्यापार नीच वाटत नाही. जे आपल्याला उत्कृष्ट नि जिव्हाळ्याचे वाटते, त्याचे भाषान्तर करण्यात खरोखर आनंद आहे. हे अतिशय कष्टाचे काम असले, तरी मुळात जर आपल्याला त्यात आनंद असेल तर भाषान्तर म्हणजे एक खेळ वाटतो. पद्यरचनेची आवड आहे, दांडगा उत्साह आहे तर महाराष्ट्रकवींनी भाषान्तर हाती घ्यावे. भाषान्तराने स्वतंत्र वाङ्मयनिर्मितीलाही चालना मिळते.'

आतापर्यंतच्या माझ्या भाषणात प्रामुख्याने मी रसिकतेची साधना, जोपासना यांवरच भर दिला आहे. उत्तम साहित्यिक होण्यासाठी तर व्यासंग, परिश्रम यांची आवश्यकता असतेच; परंतु चांगला चोखंदळ रसिक होण्यासाठीही काही साधना करावी लागते. ही साधना करताना काही पथ्ये पाळावी लागतात. काही रसिक असे असतात की, त्यांना सारे सहज सोपे, बुद्धीला किंवा संवेदनेला अजिबात ताण न देणारे असेच साहित्य हवे असते. पण उत्तम साहित्य केवळ रसिकाला काही देते असे नाही, तर ते त्याच्याकडून काही मागतही असते. त्याला सामोरे जाताना पूर्वग्रह बाजूला ठेवावे लागतात. आपल्या साकेतिक कल्पनांच्या आड येणारे काही असेल तर तेही समजून घेण्याचे औदार्य दाखवावे लागते. आवेश आणि अभिनिवेश, आग्रह आणि आढ्यता बाजूला सारून या कलाकृतीच्या हृदयांत हळुवारपणे शिरावे लागते. राजा दुष्यन्त जेव्हा कण्वमुनीच्या तपोवनात प्रवेश करता झाला तेव्हा 'विनीतवेषेण नाम प्रवेष्टव्यानि तपोवनानि' असे मोठे मार्मिक वाक्य कालिदासाने त्याच्या तोंडी घातले आहे. मला ते वाक्य खरे तर प्रतीकात्मक वाटते. आपण कितीही विद्वान असलो, जाणकार असलो तरी तो सारा अहंकार बाजूला ठेवून समीक्षेचेदेखील पूर्वसिद्ध निकष घडीभर दूर सारून सुंदर कलाकृतीला 'विनीत' भावनेनेच सामोरे जायला हवे. यासाठी अत्यंत आवश्यकता जर कशाची असेल तर ती अनाग्रही, स्वागतशील, निकोप अशा सहृदयतेची. पण एवढ्यानेही भागेल असे नाही. चांगल्या रसिकतेला एक ठाम आत्मप्रत्ययाचीही आवश्यकता असते आणि तो आत्मप्रत्यय सातत्याने केलेले वाचन, चिंतन, मनन यांतून सिद्ध होतो. अशी समंजस रसिकता कशाला भीत नाही. कशाने गांगरत नाही. ती ठाम पण लवचिक असते. जुन्यातला आनंद घेण्यात जशी तिला ओशाळगत किंवा अपराधीपणाची भावना वाटत नाही त्याप्रमाणे नवे, अनोखे, विलक्षण सुंदर असे जर काही सामोरे

आले तर ते आपल्याला आवडले असे मोकळेपणाने सांगताना ती संकोचत नाही, किंवा नव्याची थोरवी मान्य करताना जुने कवी, जुने साहित्य एकजात भिकार आहे असा अडाणीपणाचा निष्कर्ष काढण्याचीही तिला गरज भासत नाही.

रसिकतेच्या पोषणाच्या संदर्भात आणखी एक गोष्ट मला आपणाला आवर्जून सांगावीशी वाटते. काळाने किंवा भौगोलिक अंतराने काही कलावंत आपणांपासून दूर पडतात. विजनातून अकस्मात बासरीचे अस्पष्ट पण मोहक सूर कानी पडावेत तसे त्यांचे काव्य दुरून कुठून तरी आपल्यापर्यंत येत असते. पण या दूरस्थ जिवलगांचे, त्याच्या साहित्याचे आपण स्मरण ठेवले पाहिजे. एखादा श्रीनिवास पाटणकर आपल्या प्रतिभेची 'प्राजक्ताची फुले' मागे ठेवून अकाली जग सोडून गेलेला असतो. एखादा बी. रघुनाथ तिकडे मराठवाड्यात परभणीला उमलतो आणि मिटून जातो. एखादे भा रा. लोवलेकर माळव्यात चोरलकाठी आपल्या सुंदर कविता लिहितात आणि त्यांच्या निधनानतर चार मित्र मिळून त्यांच्या कविता संकलिन करतात, पण ते संकलन आपल्यापर्यंत पोहोचतदेखील नाही. आपल्याजवळच्या नामवंतांची जशी आपण दखल घेतो, तशी दूरस्थ ताऱ्यांप्रमाणे अंधुकपणे चमकणाऱ्या या प्रतिभावंतांचीही आपण जाण ठेवली पाहिजे. मला आठवते, ना. घ. देशपांडे यांच्यासारखा गुणशाली कवी असाच विदर्भात दूर, मेहेकरला आपली कविता लिहीत होता. जी. एन्. जोश्यांनी गाइली म्हणून त्यांची 'शीळ' आपल्या कानी पडली. तांब्यांसारख्या कवीना मायदेव, माधव ज्युलियन, जोग असे तोलामोलाचे संपादक भेटले तेव्हा तांबे महाराष्ट्राला परिचित झाले.

रसिकतेच्या संदर्भात आणखी एका गोष्टीचा मला आवर्जून उल्लेख करावासा वाटतो. चांगल्या साक्षेपी रसिकाने आपल्या रसिकतेच्या जपणुकीसाठी साहित्य वाचले पाहिजे, इतकेच नव्हे, तर पुन्हा पुन्हा वाचले पाहिजे. आपण वयाने वाढत जातो तसे आपल्या रसिकतेचे स्वरूपही पालटते. लेखक, कवी तेच असतात; पण कालमानाने त्याची वेगळी ओळख पटू लागते. वेगळी महत्ता कळू लागते. तरुण वयात माधव ज्युलियन आवडत ते त्यांच्या पुढीलसारख्या धुंद बेहोष कवितापंक्तीमुळे —

*भिल्लीण न तू सुन्दरि, बाणा न शिकारी*<br>
*का तेज असे मारिसी हे बाण जिव्हारी*<br>
*मी होउन होई वश तूते वनबाले*<br>
*आकर्ण धनुष्ये तर ही व्यर्थ तयार। !*

पण तेच माधव ज्युलियन या वयात जेव्हा मी वाचते, तेव्हा त्यांच्या वेगळ्याच कवितापंक्ती हृदयाला भिडतात —

*दु:ख तुला कधी । प्रभो, होते का रे ।*

*हट्टी तुझी पोरें । बघोनिया ॥*

*किंवा अशी एखादी कविता त्या वयात लक्षातही आलेली नसते ती आता वाचताना* काळजाचा ठाव घेते आणि माणसाच्या सनातन एकाकीपणाचा प्रत्यय देते.

*अन्धारून आलें चिम्ब झालें जग*
*स्तब्ध झाले खग झाडांवरी.*
*गच्चीवर पडे गार दहिंवर*
*आणि गंहिवर दाटे मनी.*
*पाण्याची चादर जमे क्रीडाङ्गणीं*
*पावसाचे मणी क्रीडतात.*
*काय चुकचुके माझ्या अन्तर्यामीं*
*पुढील दर्या मी केंवी तरूं ?*
*आलों मी अेकला जाणार अेकला*
*अेकान्त येथला कां न साहे ?*

गेली काही वर्षे मराठीत सातत्याने एक हताशपणाची भावना पसरत चालल्याचे दिसते. मराठी साहित्याला उतरती कळा लागली आहे अशी खन्त श्री. पु. भागवतांसारख्या रसिक आणि साक्षेपी संपादकाने कोकण मराठी साहित्य परिषदेच्या अध्यक्षपदावरून प्रकटपणे व्यक्त केली. त्याचे कारण काय असेल बरे ? झाडांना सर्वकाळ बहराचे ऋतू भेटत नाहीत. काही काळ 'बॅरननेस'चा - ओसाडपणाचा जातो हेही खरे. पण श्री. पु. म्हणतात त्यात तथ्य आहे हे आपणा सर्वांना जाणवत आहे. एखादा जी. ए. कुलकर्णी, एखादा आरती प्रभू असा उंच व बेलाग सुळका क्वचित नजरेत भरतो. पण बाकी मात्र खुजेपण, करंटेपण, आत्मतृप्ती यांचेच रान माजलेले दिसते. इतर साहित्यबाह्य आक्रमणे मराठीवर सतत चालू आहेत हेही खरे. दूरदर्शनचे अनेक चॅनलवरचे कार्यक्रम, हिंसाचार आणि लैंगिकता यांवर भर देणारे भडक चित्रपट, दैनंदिन जीवनातला एकूण करंटेपणा यांनी आपली संवेदनाक्षमता बधिर होत चालली आहे. रसिकता बोथट झाली आहे. वरून सारे ठीकठाक, साजरे गोजरे दिसत असले तरी आतून कुठे तरी आपण ढासळत चालल्याची भावना मनाला भयभीत, उदास करत आहे. अशा वेळी, सर्जनशील लेखकांचे काय व्हायचे असेल ते होवो, आपणांसारख्या साहित्यप्रेमी रसिकांनी तरी आपले रसिकत्व निकोप राखले पाहिजे. चांगले साहित्य जुने-नवे असा भेद न करता साक्षेपाने आणि सतत वाचले पाहिजे. तकलादू नाविन्याच्या झगमगाटाने दिपून न जाता जे अस्सल असते ते अचूक ओळखले पाहिजे, आणि मुख्य म्हणजे आपली आत्मश्रद्धा, आत्मप्रत्यय यांची जपणूक केली पाहिजे.

मित्रहो, आपणा सर्वांना आज इथे येवढ्या मोठ्या संख्येने उपस्थित असलेले

बघून मी आनंदाने बेभान झाले आहे. 'माझिये जातीचे मज भेटो कोणी । आवडीची धणी पुरवाया' असे केवळ संतांनाच वाटते असे नाही. एका ध्यासाने वेडावलेल्या साऱ्यांनाच ती असोशी असते. तो आनंद तुमच्या भेटीने मला लाभला आणि तुमच्यांतली एक, तुमच्याप्रमाणेच साहित्यावर मनापासून प्रेम करणारी आणि साहित्यविषयक साऱ्या घडामोडीत रमणारी एक व्यक्ती या नात्याने तुमच्यापाशी मनातले असे काही मी मोकळेपणाने बोलले. काही विचार तुमच्यासमोर मांडले कलेच्या क्षेत्रात अंतिम मुक्काम नसतो. असते ती एक अखंड वाटचाल असते. इथे कोणत्याही प्रश्नांची गणितासारखी ठाम आणि निश्चित उत्तरे नसतात. उलट आज मिळणाऱ्या उत्तरांतून कदाचित् उद्याचे नवे प्रश्न निर्माण होण्याची शक्यता असते. या सर्व गोष्टीची जाण तुमच्याप्रमाणेच मलाही आहे. साहित्यप्रवासातला आनंद जसा मी जाणते, तसे त्यातले चकवे आणि भुलाव, मोह आणि धोके हेही मला उमगतात. उमगतात इतकेच नव्हे, तर भयभीत करतात. अशा आवर्तात सापडून भलेभले इथे नामशेष झाले आहेत हे मला दिसते. पण त्याबरोबरच नव्या प्रतिभावंतांची नवी पिढी जोमाने अंकुरत आहे हेही मला जाणवते. किंबहुना इथे नवेजुने असे काही नसतेच. असतो तो एक अखंड, अतूट स्रोत. जुने नव्याला निर्माण करते आणि आपण बाजूला होते. केशवसुत म्हणतात :

*जुन्या नभी या ताजे तारक*
*जुन्या भूमिवर नवी टवटवी*
*जुना समुद्रहि नवरत्ने वी*
*जुन्यांतून जी निष्पत्ति नवी*
*काय नव्हे ती श्रेयस्क' क*

त्याप्रमाणे ही साहित्यधारा पुढेही सतत प्रवाहित होणार आहे. तिची नवी वळणे बघण्यास आपणांपैकी अनेकजण कदाचित उद्या इथे नसू. पण ती असेल यात शंका नाही. मराठी साहित्य भाग्यशाली आहे. कारण आपल्या पाठीशी सतश्रेष्ठ ज्ञानेश्वर-तुकारामांसारख्या वंद्य लोकोत्तर विभूती आहेत आणि सर्वसमावेशक भक्तिमार्गाची सुंदर परंपरा वाट दाखवायला सिद्ध आहे. मीही आतापर्यंत जे बोलले तो साहित्यातला भक्तिमार्ग नाही तर दुसरे काय आहे ? सर्व थोरांना मी पुन्हा एकदा आदरपूर्वक वदन करते आणि आपणा सर्वांचा निरोप घेते न[illegible]ार.

□□□

**टीप : शान्ताबाई शेळके यांनी हे भाषण लिखित स्वरुपात असूनही संमेलनस्थळी वाचले नाही. ते म्हणून दाखवले. शान्ताबाई शेळके यांचे हे कौशल्य विलक्षण आहे.**

## अहमदनगर : १९९७

# ना. सं. इनामदार

साहित्यप्रेमी जनहो !

सत्तराव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनासाठी आपण अहमदनगर या ऐतिहासिक नगरात जमलेलो आहोत याचा मला आनंद होतो आहे. या शहरात हे संमेलन सुमारे अठ्ठावन्न वर्षानंतर भरत आहे. त्या वेळी महामहोपाध्याय द. वा. पोतदार हे अध्यक्ष होते. त्यांच नाव इतिहासाशी इतकं निगडित आहे आणि त्यांचा इतिहासाचा अभ्यास इतका चौफेर आहे की, त्याबद्दल अधिक बोलून मी आपला वेळ घेणार नाही. मात्र अठ्ठावन्न वर्षानी याच नगरात ना. सं. इनामदार या नावाचा इतिहासाची अल्पस्वल्प सेवा करणारा लेखक प्रत्यक्ष अध्यक्ष म्हणून मराठी रसिकांसमोर उभा राहावा याला योगायोगाशिवाय दुसरे नाव नाही. नगरच्या ज्या संमेलनाला महामहोपाध्याय अध्यक्ष होते, त्याच संमेलनाला शाळेत शिकणारा मी एक विद्यार्थी हौस म्हणून संमेलनाची लहानमोठी कामे करीत होतो. आजच्या मानानं त्या वेळी लहान भासणाऱ्या या शहरात, अ. भा मराठी साहित्य संमेलन, त्यांचे सर्वमान्य इतिहासतज्ज्ञ अध्यक्ष आणि इतिहासाचं कणभरही ज्ञान ज्या त्याला सामान्यतः विद्यार्थ्याला असणार नाही असा मी शाळेतर्फे वावरणारा विद्यार्थी अशी पात्रं नियतीनं एकत्र आणलेली होती.

अहमदनगरला जीवनाला एक अकल्पित वळसा देण्यासाठी माझं दैव माझी वाट पाहात तिष्ठत होतं.

अहमदनगर या सुमारे साडेचारशे वर्षापूर्वीच्या निजामशाहीच्या माजी राजधानीत, मी माझ्या आयुष्यातला महत्त्वाचा काळ घालवला. उणीपुरी बारा वर्षे या शहरात मी राहिलो. हे गाव ऐतिहासिक आठवणींनी आणि अवशेषांनी समृद्ध आहे. मोगलांना टक्कर देणाऱ्या मराठ्यांच्या पराक्रमी इतिहासाच्या पार्श्वभूमीवर अहमदनगरचा इतिहास काहीसा मागे पडला आहे. एके काळी पराक्रम गाजवलेल्या व्यक्तीला निसर्गक्रमानं वार्धक्य येऊन तो अडगळीत पडल्यासारखा व्हावा, तसं या शहराचं झालं आहे. पुणे 'शहर' म्हणून अस्तित्वात नव्हतं तेव्हापासून अहमदनगर बहामनी राज्याच्या एका शाखेची राजधानी म्हणून वैभव भोगीत होतं. त्याच्या काही खुणा अद्यापही दिसतात. वयाच्या नवव्या किंवा दहाव्या वर्षी मी वडिलांच्या बरोबर या शहरात आलो. पुढे

कालांतरानं मला नगर सोडावं लागलं, तेव्हा माझी विशी ओलांडली होती. माझ्या व्यक्तिमत्त्वाची बहुतेक जडणघडण याच शहरामध्ये झाली. ओल्या मातीला आकार इथंच मिळाला. त्या आकारात नंतर किरकोळ बदल झाले असतील; पण मूळ साचा बदलला असा दावा मला करता येणार नाही.

पंधरा, सोळा वर्षाच्या मला, कार्यकर्त्यांनी त्या वेळच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांच्या खास दिमतीसाठी नेमलेलं होतं. वाद्यांच्या आवाजात अध्यक्ष गाडीतून खाली उतरले आणि त्यांनी आपलं ऐतिहासिक भाषणाचं दफ्तर माझ्या हातात देऊन ते योग्य वेळी त्यांना उपलब्ध करून द्यायला सांगितलं. रसिक हो ! सुमारे अठ्ठावन्न वर्षापूर्वी महामहोपाध्याय यांनी माझ्याकडे दिलेलं ते ऐतिहासिक दफ्तर मी शक्य तितक्या श्रद्धेनं आणि पूज्य भावानं सांभाळतो आहे याबद्दल आपलंही दुमत नसावं. अध्यक्षीय पदासाठी माझी निवड झालेल्या दिवसापासून माझ्या नावाचा उल्लेख बहुतेक सर्व वक्ते एक ऐतिहासिक कादंबरीकार असाच करीत आहेत. गुरुपरंपरेनं त्या वेळेपासून पदरात पडलेलं ज्ञान आजपर्यंत निष्ठेनं सांभाळून ठेवणारा आणि माझ्या कुवतीप्रमाणे वाङ्मयीन प्रांतात थोडीफार भर घालण्यासाठी सातत्यानं धडपडणारा मी मराठी वाङ्मयाचा एक उपासक आहे.

मराठी सारस्वताच्या दरबारात गेल्या ७० वर्षापासूनच्या कालखंडामध्ये काव्य, लघुकथा, दीर्घकथा, सामाजिक कादंबरी यांची दालने वैभवशाली व समृद्ध आहेत. त्यावर पूर्वीपासूनच्या सा. संमेलनांतून वारंवार चर्चाही होत आल्या आहेत. मात्र गेल्या अर्धशतकात मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांमधून स्वतंत्र ऐतिहासिक मराठी कादंबरीस एकदाही महत्त्वाचे स्थान मिळालेले आढळून येत नाही, ही आश्चर्यकारक बाब आहे. आपल्यासारख्या साक्षेपी रसिकांच्या नजरेखालून माझ्या ऐतिहासिक कादंबऱ्या गेल्या असतीलच व त्यावर अन्यत्र झालेल्या चर्चा आपण ऐकल्या असतील, हे लक्षात घेऊन माझ्या या अध्यक्षीय भाषणात प्रामुख्याने आधुनिक ऐतिहासिक मराठी कादंबरी या विषयावर मी भर देणार आहे.

१९४५ ते १९५५ या दशकात मी कथा लिहीत होतो. त्या कथांचे विविध प्रकार हाताळत होतो. रहस्यकथा हा त्यांपैकी एक प्रकार, विनोदी कथा, प्रणयकथा इत्यादी जोडीला होतेच. माझे हे ललितवाङ्मय त्या कालखंडात विविध नियतकालिकांमधून प्रसिद्ध होत होते.

ऐतिहासिक कादंबरीलेखनाकडे मी वळलो ते साल १९५५. म्हणजे माझ्या लेखनाला सुरुवात होऊन त्या वेळी सुमारे एक तप उलटलं होतं. 'झेप' ते 'राजेश्री' या माझ्या नंतर गाजलेल्या ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या निर्मितीचं बीज या काळात पडलं असावं.

कादंबरी या प्रकाराकडे वळायला एक तात्कालिक कारण घडलं. इंग्रजांविरुद्ध भारतीयांनी जो उठाव केला होता त्याला १९५७ साली शंभर वर्षं होत होती.

वातावरण नुसत्या कल्पनेनंच भारल्यासारखं झालं होतं. गुलामगिरी मी पाहिलेली, अनुभवलेली. स्वातंत्र्यलढा तर चांगल्या जाणत्या दृष्टीनं डोळे भरून पाहिलेला. प्रत्यक्ष स्वातंत्र्याची पहाट झाली ती रात्र जागून काढलेली माझी तरुण पिढी. शंभर वर्षांपूर्वीचा तो ऐतिहासिक काळ, त्या प्रतिज्ञा, त्या अफाट हालचाली, त्या वीर गर्जना साऱ्या स्वप्रवत् वाटत होत्या. 'त्या वेळी फसलेलं या वेळी साध्यं केलं होतं.' या विचाराने अंगावर रोमांच उभे राहत होते. लेखणीची तृष्णा वाढत होती. भावना अनावर झाल्या होत्या. लेखणी आपली करामत दाखवायला उत्सुक झाली होती. सरस्वतीच्या मयूराचं नृत्य धुंद करीत होतं. पण एवढंच कारण होतं असं मी म्हणणार नाही. हे तर होतंच, पण आणखी बरंच काही होतं. या साऱ्यांचा परिपाक म्हणजे ही माझ्या ऐतिहासिक कादंबरीलेखनामागची प्रेरणा.

माझा ऐतिहासिक कादंबरीकार म्हणून जो बोलबाला झाला तो 'झेप' कादंबरीमुळे. या कादंबरीनं प्रकाशनानंतर काही काळ लहानथोर वाचकांना वेड लावलं होतं. झेपचा नायक त्र्यंबकजी डेंगळे हा सामान्यातला सामान्य माणूस. तो आपल्या कर्तबगारीनं राज्याच्या दिवाणपदापर्यंत पोहोचला. मोठ्या माणसांची दु:खं मोठी असतात त्याप्रमाणे दु:खातून तरून जाण्याची त्यांची शक्तीही मोठी असते. परंतु याच ठिकाणी त्याला दैवाने

*'अंत उन्नतीचा पतनी होइ या जगात ।*
*सर्व संग्रहाचा वत्सा नाश हाच अंत ॥'*

याच नियतीच्या फटक्याचा अनुभव दिला. सामान्यांच्या जीवनात जे दु:ख मधून मधून त्यांना अनुभवावं लागतं त्या दु:खाचे फटके कर्तबगार व्यक्तीलाही सोसावे लागतात. या वाङ्मयीन जाणिवेमुळे सामान्य मराठी वाचकाला ही कादंबरी त्याची स्वत:ची वाटली. अनेक मार्गांनी सामान्यांच्या या प्रतिक्रिया माझ्यापर्यंत पोहोचत होत्या, त्यावरून हे विधान मी करतो आहे.

'झेप' कादंबरी प्रसिद्ध झाल्यानंतर आलेला अनुभव, कमी-जास्त फरकाने, माझ्या इतर सर्व ऐतिहासिक कादंबऱ्यांबाबत पुन्हा पुन्हा आला. त्याबाबत अधिक काही सांगत नाही.

या माझ्या आठ ऐतिहासिक कादंबऱ्यांतल्या प्रमुख व्यक्तींच्या सामाजिक आणि राजकीय स्थानांचा विचार केला तर यात कोण नाहीत ? यात नायक म्हणून मराठा आहे, धनगर आहे, ब्राह्मण आहे, मुसलमान आहे, विधवा दुबळी स्त्री आहे आणि मराठी-राज्य-संस्थापकही आहेत. हुजऱ्या आहे, सरदार आहे, अनामिक प्रेमिक आहे, पेशवा आहे, सामाजिक बहिष्काराला न जुमानणारा राज्यकर्ता आहे, लंडनच्या रंगमंचावर ज्याच्या हयातीतच त्याच्या जीवनाच नाट्य, रसिक अतृप्त नयनांनी पाहतात असा मुघल बादशहा आहे. क्षत्रिय कुलावतंस छत्रपती शिवाजीमहाराज तर आहेतच. या

कादंबऱ्यांत चितारलेला कालपट सन १६४८ पासून १८५८ पर्यंत आहे. अनुक्रम मात्र जवळच्या काळापासून दूरच्या काळापर्यंत असा आहे. ज्ञाताकडून अज्ञाताकडे जाण्याचा हा एक प्रयत्न झाला असंही म्हणता येईल. याच वेळी सर्वश्री. रणजित देसाई, शिवाजी सावंत यांनी या वाङ्मयप्रकारात आपले बहुमोल योगदान दिले.

नव्या मराठी ऐतिहासिक कादंबऱ्यांचं एकूण मराठी साहित्यात स्थान कोणतं हेही तपासून पाहणं आज आवश्यक आहे. त्यासाठी मराठीतल्या या ललित-वाङ्मयाचा ऐतिहासिक दृष्टीनं आढावा घ्यावा लागेल. मराठीत हा साहित्यप्रकार त्या मानानं नवा आहे. एकूणच एकोणिसावं शतक भारतीय जीवनात अनेक नव्या स्रोतांची जननी आहे. पारतंत्र्य असलं तरी त्या शतकात इंग्रजांच्या रूपानं भारतीयांना नव्या खिडक्या उपलब्ध झाल्या. नवा प्रकाश आणि नवे विचार यांचा प्रवेश आपल्या जीवनात झाला. आपल्याच भोवती गिरक्या मारणाऱ्या इथल्या जनतेला वेगळं काही असू शकतं, ते नवं असतं, आकर्षक असतं, त्यानं जीवन सुखी करता येतं वगैरे शोध लागू लागले. प्रथम आपण ते आश्चर्यानं पाहिलं आणि नंतर त्याचं रूपांतर आपल्या मागासलेपणाची जाणीव ती होण्यात झालं. माणसं डोळे फाडून आपसात पाहू लागली, विचार करू लागली. आत्ममग्न संतुष्टपणा बरा नव्हे असे विचार त्यांच्या कानावर पडू लागले. परिणामी या शतकाच्या पहिल्या अर्ध्या भागात हळूहळू पारतंत्र्याचा धक्का कमी होऊ लागला. आपल्यातले दोष शोधण्याचा प्रयत्न होऊ लागला. हे दोष धर्म, विचार, सामाजिक चालीरीती, नैतिक वर्तन, ज्ञानाच्या कक्षा इत्यादी बाबतीत मागासलेपणाला कारणीभूत झाले आहेत अशी त्या काळातील प्रमुख आणि मोजक्या नवशिक्षितांची खात्री होऊ लागली. हे लोक संख्येनं थोडे असले तरी बोलके होते. शिक्षण, छापखान्यांचं अस्तित्व, परक्या शासनकर्त्यांची नेटीव्ह लोकांना सुधारण्याची तळमळ, मिशनऱ्यांची इथल्या लोकांबद्दल कणव, गरीब जनतेला अंधश्रद्धेच्या गर्तेतून वर काढण्यासाठी समुद्रापलीकडून भारतात येणारा पैसा व त्याला सत्ताधाऱ्यांचा आशीर्वाद, वगैरे अनेक कारणांनी जनतेसाठी काय करू आणि काय नको असं त्यांना झालं होतं. इग्रजी राज्याच्या संदर्भात आपण अनेक दोषांची जंत्री केली तरी वरीलप्रमाणे अनुकूल हालचालीची नोद आपल्याला घ्यावी लागेल. शिवाय त्यांच्यापुढे विकासाची ही कामे करताना अडचणीचे केवढे डोगर उभे होते हेही पाहावे लागेल.

पहिली अडचण हा होती की, ते परके होते. त्यांच्या प्रत्येक हालचालीकडे इथले लोक संशयानं पाहात होते. धार्मिक परिवर्तनानं यातून काहीसा मार्ग निघण्याजोगा होता. तसा प्रयत्नही कुठे कुठे झाला. पण त्यांच्या पूर्वीच्या राजवटीत धार्मिक हालचालीना केवढा जबरदस्त प्रतिकार इथली जनता करते ते त्यांनी पाहिलं होतं, ऐकलं होतं. म्हणून प्रत्यक्ष धार्मिक परिवर्तन न करता त्याचे सारे फायदे मिळू शकतील अशी आर्थिक धोरणं कंपनी सरकारनं मोठ्या सावधगिरीनं आखली. त्याला यशही येऊ

लागलं. मराठी राज्य ज्यांनी आपल्या डोळ्यांनी पाहिलं नव्हतं अशी नवी पिढी १८४० च्या सुमारास उदयास आली, आणि कार्यरत झाली. त्यांनी जुनं वैभव आणि देशी सत्ता पाहिली नव्हती. मात्र नवा थाटमाट आणि जुन्यांबद्दल तुच्छता त्यांना रोज दिसत होती, अनुभवास येत होती. या नव्या पिढीतल्या काहीना इंग्रजांनी हाताशी धरलं आणि परिवर्तनाचं चक्र हलके हलके फिरायला लागलं. तरीही हे सारं एका रात्रीत घडून आलेलं नाही. जुनी पिढी अजून अस्तित्वात होतो. ती त्या काळातल्या कथा कुरबुरीच्या स्वरूपात का होईन नव्यांच्या कानावर घालीत होती. शिवाय जुने वाडे, घरातले दाग-दागिने, गाड्या, घोडे, संपत्तीचं केंद्रीकरण झाल्यानं येणारी सुबत्ता आणि सत्ता हीही दिसत होतीच. परंपरेने येणारे सण-समारंभ, मंगलकार्ये, त्यांच्या आठवणी हीही बेचैन करणारी कारणे जमेच्या बाजूला होती. तरीही इंग्रजांनी शर्थीचे प्रयत्न चालवले होते. त्यांची फळं लगेच दिसली असती. तेवढ्यात उत्तरेकडे प्रस्थापित सत्तेविरुद्ध हिंदू व मुसलमान या दोघांनीही उठाव केला मग मुंबई इलाख्यापुरत तरी आस्ते कदम धोरण झालं.

या सुमारास पुण्या-मुंबईत सरकारी कृपेनं निघालेली काही वृत्तपत्रं, देशोद्धार या कल्पनेतून निर्माण झालेले काही मवाळ पुढारी, नंतरच्या काळात धुमसणारे काही जहाल पुढारी, त्यांचं लेखन आणि वर्तन यानं देशी वातावरणात वेगळा रंग भरू लागला.

या मराठी मुलुखात या वेळी न्यायमूर्ती रानडे यांचा प्रवेश झाला. तिथून मराठी जीवनाला जे अनेक धुमारे फुटले त्यांत साहित्याला नेटकं वळण/स्वरूप देण्याचा प्रयत्न झाला. जहाल मंडळीचा पुढे राजकारणात जोर झाला. जीवनाची सर्व अंगं जहाल विचारांशी अनुरूप राहायला हवीत तरच इंग्रजांचं हे जोखड फेकून देता येईल हा विचार प्रबळ झाला. त्यासाठी शाळा, कॉलेज, स्वतंत्र ग्रंथनिर्मिती इत्यादी मार्गानं देशोद्धाराची कल्पना राबवण्यात येऊ लागली.

मराठी साहित्यातल्या कादंबरीचा जन्म या सुमारास झाला. पाठोपाठ ऐतिहासिक कादंबरीही आली, आणि एक नवे संकट म्हणून जहाल पुढाऱ्यांसमोर उभं राहिलं. या कादंबरीसाठी इतिहास कुठून आणणार ? चेतना मिळेल असा इतिहास कसा प्रकट होणार ? त्याचं उत्तरही त्या सुमारास उपलब्ध झालं. देशोद्धाराच्या कल्पनेच्या पोटात देशाच्या इतिहासाचीही कल्पना होतीच लोकमान्यांसारखे चतुरस्त्र पुढारी स्वस्थ बसले नव्हते. माणसं हेरून ऐतिहासिक समारभाना जशी त्यांनी चालना दिली, तशीच खटपट करून इतिहाससंशोधकांनाही त्यांनी प्रेरणा दिली, मदत केली. पाहता पाहता जोमाचे इतिहास-प्रेमी या कामासाठी मिळाले आणि त्यांचं इतिहास-संशोधन जनतेला जागं करण्याच्या दृष्टीनं उपयुक्त ठरू शकेल हे पुढाऱ्यांच्या लक्षात आलं.

या वेळी हरि नारायण आपटे या नावाचा मराठी साहित्यात उदय झाला. सामाजिक विषयावर ते नियतकालिकांतून लिहीतच होते. ते आता ऐतिहासिक विषयांवर लिहू लागले. तत्कालीन परिस्थितीत मराठी वाचकांना 'भव्य-दिव्य पूर्वकाळात' नेण्याचं

काम या कादंबऱ्यांनी केलं. ही गोष्ट एकोणिसाव्या शतकाची अखेर आणि विसाव्या शतकाची पहिली दोन दशके यांत घडली. त्यानंतरच्या काळात तर ह. ना. आपटे हे ऐतिहासिक 'कादंबरीचं' आद्यपीठ बनले. ही झाली स्वातंत्र्यपूर्व काळातली वस्तुस्थिती. सन १८८८ ते १९१९ हा हरिभाऊंचा संबंधित काल.

हरिभाऊंनी निर्माण केलेली ऐतिहासिक कादंबरी त्यानंतरही आपला प्रभाव टिकवून होती. राजकीय वातावरण उग्रतेकडून सौम्यतेकडे झुकलेलं असलं तरी मूळ प्रेरणेसाठी हा साहित्यप्रकार पुढाऱ्यांना आवश्यकच वाटू लागला. सेनानी नेहमीच संख्येनं थोडे असतात, अनुयायांची फौज मोठी असावी लागते. या साहित्यप्रकारामुळे अनुयायी गोळा करता येतात, टिकवता येतात. त्यांना त्याग सुसह्य वाटू लागतो. हे ओळखण्याइतके नेते नेहमी चतुर असतात.

जहाल आणि मवाळ या दोन्ही नेत्यांना देशप्रेम रुजविण्यासाठी आणि वाढवण्यासाठी अनेक खटपटी कराव्या लागतात. त्यांच्या आशीर्वादाने आणि प्रोत्साहनाने इतर अनेक अंगाबरोबर साहित्याचं हे अंगही बाळसं धरीत होतं.

या काळात ऐतिहासिक कादंबरीबाबत लेखकाची काय कल्पना होती ते पाहता येतं. खुद्द ह. ना. आपटे यांनी आपल्या ऐतिहासिक कादंबरीला लिहिलेल्या प्रस्तावनेमध्ये त्याबाबत नोंद केली आहे—

'— ऐतिहासिक कादंबरीचे हृद्‌गत, पूर्वकालीन सत्य व सत्याभास यांचे मिश्रण होय. या मिश्रणात सत्य किती अंश पाहिजे आणि सत्यभास किती अंश असावा म्हणजे कोणत्या रंगाची खुलावट होईल हे कारागिराच्या कौशल्यावर अवलंबून असणार—'

तत्कालीन ऐतिहासिक कादंबरीमागची प्रेरणा मोजक्या शब्दात इथं त्या आद्य कादंबरीकारानं जाहीर केलेली आहे. तो काल विचारात घेता स्पष्ट शब्दात आपला हेतू व्यक्त करून कादंबरीकारानं आपल्या वाचकांशी मोकळेपणानं संवाद साधला आहे. या व्याख्येत पूर्वकालीन सत्य आणि सत्याभास हे दोन शब्द महत्त्वाचे आहेत. अधिक स्पष्टतेसाठी 'पूर्वकालीन सत्य' म्हणजेच आजच्या भाषेत ऐतिहासिक सत्य आणि 'सत्याभास' म्हणजे त्या ऐतिहासिक सत्याचा कादंबरीत झालेला ललित आविष्कार असे मानावयास हरकत नाही.

आजच्या ज्या ऐतिहासिक कादंबऱ्यांचा आपण इथं विचार करतो आहोत ती कादंबरी म्हणजे हरिभाऊंच्या कादंबरीचा पुढचा टप्पा आहे असं विधान करण्याचा मोह होतो. पण १९४७ साली भारत स्वतंत्र झाला; आणि पाठोपाठ पूर्वी स्वीकारलेल्या अनेक आदर्शांचा आणि मूल्यांचा पुनर्विचार करणं अपरिहार्य झालं. मराठी साहित्यही त्याला अपवाद नव्हतं. स्वातंत्र्य आल्यामुळे देशप्रेमासाठी आता फारसा आटापिटा करण्याची आवश्यकता नव्हती. देशभक्तीनं ओतप्रोत भरलेले मूठभर पुजारी आता राज्याची धुरा संभाळणारे असल्यामुळे सामान्यांनी फक्त श्रम करण्याची आवश्यकता

होती. पुढाऱ्यांचे हुकूम बिनतक्रार अंमलात आणले की आपला भारतवर्ष जगात सर्वश्रेष्ठ आपोआपच होणार होता. त्यामुळे पूर्वकालीन सत्य वगैरे कल्पना आता भाकडकथा ठरणार होत्या. त्यांचा पाठपुरावा करून जनतेत निष्कारण फूट पडणार होती. स्वीकारलेल्या समाजवादी विचारांना धक्का पोहोचणार होता. १९५५ साली लेखन करीत असताना माझ्यासमोरही प्रश्नचिन्हं तर होतीच; पण त्याचबरोबर पूर्वकालीन सत्य तरी काय होतं हे एकदा आपण स्वतंत्रपणे तपासून पाहावं हाही विचार होता. योग असा की, त्या वेळी माझ्या भोवतालची परिस्थिती या विचाराला पोषक होती. माझं वास्तव्य पुण्यात होतं. अनेक विद्वान इथं होते. अभ्यास करण्यासाठी डेक्कन कॉलेजच्या ग्रंथालयासारखी समृद्ध ग्रंथालयं होती. मुख्य म्हणजे माझ्या मनात अभ्यासाची उभारी होती. मी पुढील काही वर्ष याच कामात एकलव्याप्रमाणे व्यतीत केली. त्याचा निष्कर्ष सांगण्यापूर्वी स्वातंत्र्योत्तर काळात ऐतिहासिक वाङ्मयाच्या दालनात काय हालचाली होत्या आणि त्यांच्या परपरा काय होत्या त्या थोडक्यात सांगतो.

न्यायमूर्ती रानड्यांचा उल्लेख वर आलाच आहे. त्यांनी प्रथम या विषयाला तोड फोडलं असं सामान्यपणे विधान करता येईल. 'राईझ ऑफ मराठा पॉवर' (मराठी सत्तेचा उत्कर्ष) हा त्यांचा ग्रंथ इतिहासाच्या अंगाने पूर्वकालीन सत्य सांगण्याचा प्रयत्न करणारा पहिला ग्रंथ. लोकमान्यांनी न्यायमूर्तींच्या कर्तबगारीचा उल्लेख करताना थंड पडलेल्या महाराष्ट्रीय लोकांत ऊब आणण्याचा त्यांनी प्रयत्न केला असं लिहिलं आहे : ते उघडच या ग्रंथाच्या संबंधात आहे. त्यानंतर लोकमान्यांचेच शिष्य आणि त्यांचे राजकीय वारसदार केळकर यांनी १९१८ साली 'मराठे आणि इंग्रज' हा ग्रंथ लिहून मराठी राज्याच्या अंताचे शतसांवत्सरिक श्राद्ध घातलेलं आहे. त्यात मराठी राज्याची बलस्थानं आणि कमकुवत जागा याचा विचार केला आहे. हे दोन ग्रंथ वगळता नावाजलेले असे इतिहाससंबंधित स्वतंत्र ग्रंथ तोपर्यंत उपलब्ध झालेले नव्हते. मात्र इतिहासासाठी कागदपत्रे जमा करणे, त्यांचे संशोधन करणे, त्यांचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न करणे, ही कामे मनापासून पदरमोड करून, फारशा फलाची आशा न धरता करणारी माणसं महाराष्ट्रात आणि बाहेरही होती. विसूभाऊ राजवाडे, दत्तोपंत आपटे, साने, फाटक, सरदेसाई, मिरजेचे खरेशास्त्री, पारसनीस, दत्तोपंत पोतदार, गं. ह. खरे, शं. ना. जोशी, य. न. केळकर, शेजवलकर, वाड, जदुनाथ सरकार ही त्यांतली काही नावे. या विद्वानांनी गावोगाव हिंडून मराठी फारशी, इंग्रजी इ. कागदपत्रे मोठ्या साक्षेपाने गोळा केली. शक्य होईल त्याप्रमाणे ती प्रसिद्ध केली. त्या ऐतिहासिक साधनांचे खंड छापून प्रसिद्ध करताना अभ्यासकांनी आपापल्या मगदुराप्रमाणे त्यांचे अर्थ लावून त्या अनुषंगाने आपले काही विचार प्रस्तावनांतून मांडलेले आहेत. पुण्यात पेशवे दफ्तर या नावाने ऐतिहासिक कागदपत्रांचा एक प्रचंड खजिना संशोधकांची वाट पाहात सरकारी लाल फितीत अडकलेला आहे. तो तपासून काही संशोधकांनी त्यातील

निवडक कागदपत्रांचे खंड प्रसिद्ध केले. त्यासंबंधात सरदेसाई, चितळे, जदुनाथ सरकार, वाड इत्यादींनी घेतलेले श्रम इतिहासप्रेमी कधी विसरणार नाहीत. सुमारे अर्धशतकभर मान मोडून गोळा केलेली लाखभर साधनं पाहून तज्ज्ञांनी अंदाज केला की, अद्याप कित्येक लाख मराठी कागदपत्रे संशोधकांची वाट पाहात जगभर विखुरलेली असणार आणि तितकीच अनास्थेनं आतापावेतो नष्टही झालेली असणार.

अशा वातावरणात प्रथम मी हाती घेतलेल्या विषयाची ऐतिहासिक साधने बारकाईनं वाचून काढली. त्यानंतर सवडीनुसार इतरही कागदपत्रे नजरेखालून घातली. पेशवे दफ्तरातील कागदपत्रे योगायोगाने मला सहज उपलब्ध होत होती. त्यांतली काही दफ्तरं मी पाहिली. मोडी लेखन वाचनाच्या शाळेतल्या अभ्यासाचा या वेळी मला अनायासे उपयोग झाला. कागदपत्रांचा हा अभ्यास चालू असताना प्रख्यात इतिहास-संशोधकांशी मी मधून मधून चर्चा करून माझ्या काही शंका विचारून घेत होतो. त्यासंबंधी मी अन्यत्र लिहिलं असल्याने इथं पुनरुक्ती करीत नाही.

हरिभाऊंनी वारसा म्हणून सांगितलेलं 'पूर्वकालीन सत्य' या साधनांच्या पसाऱ्यात कुठं गवसतं ते मला पाहायचं होतं. विशेषतः 'बंड' नंतर त्यापुढच्या कादंबऱ्यांसाठी तर या सूत्रावाचून माझं फार अडलं होतं. 'झेप'चे जे कथानक माझ्या मनात तयार झालेलं होतं, त्याच वेळी 'मंत्रावेगळा'च्या कथानकाचं बीज मनात पडलेलं होतं. त्याची ऐतिहासिक बैठक पक्की करण्यासाठी मला इतिहासकारांनी त्या कालासाठी सांगून ठेवलेलं ऐतिहासिक सत्य निश्चित स्वरूपात हवं होतं. म्हणून मी त्या वेळी उपलब्ध असलेले सर्व ग्रंथ नजरेखालून घालीत होतो. हळूहळू मला वेगळ्याच सत्याचा साक्षात्कार होऊ लागला. तो पुढं अभ्यासानं पक्का झाला. आणि मला माझी दिशा सापडली. ते 'पूर्वकालीन सत्य' असं होतं की, माझ्यासमोर अर्धवट ऐतिहासिक साधने असली तरी ती शोधून काढणारे सारे फक्त इतिहास-संशोधक होते. इतिहासकार नव्हते. आपापल्या क्षेत्रात ते साधनं जमवीत चाललेले होते. त्या साधनांचं स्वरूप कधी हिशेबाच्या वह्या, कधी घटना घडून गेल्यानंतर कित्येक वर्षांनी कुणी हाताखालच्या साक्षर ब्राह्मणांकडून लिहून घेतलेली आपल्या पूर्वजांची शौर्याची वर्णनं, तर कधी पिढ्यान्‌पिढ्या वतनासाठी भांडत असताना हेतुपूर्व लिहवून घेतलेल्या कैफियती तर कुणाला प्रभू रामचंद्रापासून आपला ज्ञातपूर्वज कसा संबंधित होता व त्यामुळे तो कसा शूर होता, न्यायी होता, ज्ञानी होता याची अतिशयोक्तीनं भरलेली वर्णनं असं त्या पूर्वकालीन सत्याचं थोडक्यात रूप होतं. ऐतिहासिक सत्यासाठी लागणारी राजकीय हालचालीची समज, सर्व स्तरांवरच्या माणसांच्या अंतःकरणात डोकावण्याची कुवत, साधनांचे परस्पर-संबंध एकसंघ हकीकत तयार होण्यासाठी हवा असलेला साधनांचा पुरेपणा यापैकी त्यात काही म्हणता काही नव्हतं.

ज्या दुसऱ्या बाजीरावावर मी लिहू इच्छीत होतो त्या पेशव्यानं, पानांमागून पानं *अशा काही नोंदी स्वतःच्या हस्ताक्षरात करून ठेवलेल्या माझ्या वाचनात आणि पेशवे*

दफ्तरात पाहण्यात आल्या. त्या गूढ आणि कूट अशा नोंदी आहेत. त्यांच्या अर्थांचा बोध होत नाही. त्यातल्या काहीचा उल्लेख रियासतकार सरदेसायांनी पेशवे दफ्तरांचा संबंधित खंड प्रसिद्ध करताना केलेला आहे. त्यांनाही ते कोडं उलगडलेलं नाही.

बाजीरावाच्या हस्ताक्षरातील या नोंदीचं रहस्य समजल्याशिवाय बाजीरावासंबंधीचे आपले वाचन पूर्ण झालं असं मला वाटेना. मी त्या कूट नोंदीचे कागद माझ्या खिशात घालून इतिहास-संशोधकांना भेटू लागलो.

भारत इतिहास संशोधक मंडळामध्ये दर आठवड्यास नामवंत इतिहासतज्ज्ञांची सभा भरत असे. त्यामध्ये काही खास ऐतिहासिक विद्यांचं चर्वितचर्वण होत असे. कुणी नवीन संशोधनाची इतरांना माहिती देत असत, तर कुणी त्याच संशोधनाचा वेगळा अर्थ लावून दाखवीत. तिथं माहिती मिळेल असं वाटून एके दिवशी मी माझा विषय तिथं काढला. एका संशोधकानं मला सांगितलं, "अहो, राजवाडे आणि कृ. पां. कुलकर्णी यांच्यासारख्या चिकाटीच्या संशोधकांनी आपला बराच वेळ खर्च करूनही त्यांना या कूट नोंदी उलगडता आल्या नाहीत. त्या आजही आव्हान देत दफ्तरात पडून आहेत."

त्याच्या पुढं जाऊन एक संशोधक म्हणाले, "तुम्हाला त्याच्या मुळाशी जाऊन काय करायच आहे ? तुम्हाला कादंबरीच लिहायची आहे ना ?"

"अर्थातच. पण बाजीरावाच्या व्यक्तिमत्त्वावर या नोंदीमुळे काही वेगळा प्रकाश पडतोय का ते मी पाहतो आहे."

"प्रकाश काय डोंबलाचा पडणार ? फार तर त्या नोंदीत काय असेल ! बाजीरावाच्या विलासासाठी दोन-तीन बाया पाठवून द्याव्यात. अशा सूचना त्यानं एखाद्या सरदाराला दिल्या असतील."

"त्यासाठी पेशवे स्वतः सांकेतिक अक्षरात नोंदी कशाला करतील ?" माझी शंका.

"त्यात दुसरं काही नसणार म्हणून आम्ही त्याला महत्त्व देत नाही." संशोधकांचं उत्तर.

त्यानं माझं समाधान होत नव्हतं. इतिहासाचा माझा जो अभ्यास झाला होता त्यावरून त्या काळी नैतिक वर्तनाचा आविष्कार काही वेगळ्या तऱ्हेनं होत होता याबद्दल माझी खात्री झालेली होती. सरसकट अंगवस्त्रं बाळगणाऱ्यांच्या त्या काळात एखादा राजकारणी पुरुष स्वतः त्या गुप्त नोंदी करीत बसेल यावर माझा विश्वास नव्हता. पण इतिहास-संशोधक कष्ट घ्यायला तयार नव्हते. या कूट नोंदी उलगडल्याशिवाय आणि त्यात नेमकं काय आहे ते मला समजल्याशिवाय, मी बाजीरावाबद्दल एक वाक्यही लिहू शकत नव्हतो. शेवटी माझ्यातल्या ललित साहित्यिकानं हे आव्हान स्वीकारलं. याविषयी अधिक तपशिलानं माझ्या 'चांदराती रंगल्या' या आत्मकथेत मी लिहिलं आहे.

बाजीरावाच्या एका वेगळ्या विश्वाचं दर्शन या कूट नोदीतून मला झालं. समोरच्या ह्या नोदीत 'एखादी रूपसुंदरी तरुणी भोगासाठी पाठवून द्या' असं त्या शेवटच्या दुर्दैवी पेशव्यानं कुणालाही म्हटलेलं नव्हतं. तशा आज्ञा आपल्या लाचार सेवकांना दिल्या नव्हत्या. मग त्यात होतं तरी काय ? तर दूरदूरच्या आपल्या सरदारांना, विश्वासातल्या नोकरांना पैसा पाठवून देऊन, अंतिम लढ्यासाठी, किल्ल्यावर दारूगोळा भरून ठेवण्याचे आदेश त्या कूट नोदीतून दिलेले होते, आणि हे सारं त्यांच्या हस्ताक्षरात. मुत्सद्देगिरीनं लपवलेल्या भाषेत.

नुसता अस्सल साधनांचा ढीग म्हणजे इतिहास किंवा पूर्वकालीन सत्य नव्हे. याकडे दुर्लक्ष करून ही संशोधक मंडळी आपापल्या संशोधनाच्या बळावर जनमानसात इतिहासकार या संज्ञेनं ओळखली जाऊ लागली होती. ती त्या काळाची गरजही होती. इतिहास हवा होता. तो गरजेनुसार हव्या त्या रंगाचाही पाहिजे होता. म्हणून त्यांनी शोधून काढलेली साधनंच मग इतिहास बनली आणि मूलत: कोण्या राजपुरुषाच्या पुत्राला शिकविण्यासाठी गतकालीन सत्य म्हणून लिहून काढलेला मजकूर 'रियासती' या नावानं पूर्ण इतिहासग्रंथ म्हणून नावारूपाला येऊ लागला. स्वातंत्र्यानंतर तर वेगळंच 'अर्थ'पूर्ण सत्य नेत्यांच्या डोळ्यांसमोर असल्यानं आपण सामान्य माणसं ज्याला इतिहास म्हणतो तो विषय बाजूला पडला आणि नवा इतिहास घडविण्याचा पुढारी छाप उद्योग सुरू झाला,

थोडक्यात इतिहास नाही, इतिहासकार नाही, जागतिक राजकारणाची समज नाही आणि तरीही एक विशाल सत्ता राबवण्यासाठी स्वप्नांचा नवा कारखाना हाताशी आहे, असा प्रकार होऊन बसला. कुणी योग्यतेच प्रश्न काढला तर हजारो वर्षांचा भव्य-दिव्य हवाला देऊन मोकळं व्हावं किंवा जातीचा आधार घेऊन शौर्याच्या गर्जना कराव्यात. वाटल्यास तोच आधार घेऊन दुसऱ्या जातीला हिणवावं किंवा समाजाचा एकसंघपणा कसा हादरेल यासाठी जातीचा उपयोग करून घ्यावा आणि सत्ता अबाधित राखावी अशी अनोखी घडण सुरू झाली.

मी तिथे अडलो. पण लिहायचं होतं शासनसत्ता कशी आणि कशासाठी चालवली जाते ते मी जवळून पाहात होतो. मानवी जीवनात काही सत्यं चिरंतन असतात हे विचारात घेऊन, बदललेल्या परिस्थितीत समोरच्या साधनांतून मी माझा इतिहास शोधून काढला. माझं पूर्वकालीन सत्य ते होतं.

हे अधिक स्पष्ट करतो. मी ज्या इतिहास-संशोधकांचा यापूर्वी उल्लेख केला आहे त्यांची एक अडचण होती. ते कष्ट घेत होते. साधनं गोळा करीत होते. त्यावरून काही ग्रंथरचनाही करीत होते. हे सारं आवश्यकच होतं. पण त्रुटी अशी होती की, त्या महाभागांपैकी कुणीही सत्ता राबवणारा देशी सार्वभौम राज्यकर्ता डोळ्यांनी पाहिलेला नव्हता. त्याच्या अंतरंगात ते शिरू शकत नव्हते. त्यांच्या उभारीच्या काळात सार्वभौम

सत्ताधारी होते ते सारे परके इंग्रज लोक. ते एतद्देशीयांपासून हेतुत: दूर राहात होते. मुसलमान राज्यकर्त्यांनी हिंदुस्थानात राहण्याची जी चूक केली ती या गोऱ्यांनी केलेली नव्हती. त्यामुळे सामान्य हिंदी लोकांसमोर आपण देवभूमीचे खास लोक आहोत हा मुखवटा त्यांना कायम ठेवता आला. इंग्लंडमधल्या धूर्त मुत्सद्द्यांनी ही भावना वाढीला लावली. या त्रुटीमुळे या संशोधकांच्या आकलनातच मोठी उणीव राहून गेली. परिणामत: गतकालीन सत्य आदर्शाच्या पानळीवरच घोटाळत राहिलं. जहालांना तेवढंच पुरेसंही होतं हा भाग वेगळा.

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर दोन दशकांत या परिस्थितीत आमूलाग्र फरक पडला. यात वृत्तपत्रांचा बराच वाटा आहे, त्या तपशिलात मी इथं शिरत नाही.

तरीही एक गोष्ट मला खटकत होती. स्वातंत्र्योत्तर काळात शिक्षणाचा विकास चहू अंगांनी झाला होता. नवी महाविद्यालयं आणि विद्यापीठं निघत होती. आपले विद्वान देशपरदेशात फिरत होते. त्यांच्या लक्षात ही गोष्ट का आली नाही हा एक विचार करण्याचा मुद्दा आहे. ती सामग्री वापरून विद्वत्तेचा डौल घालता येत असेल तर ही नवी खटखट अंगावर घेऊन विनाकारण कष्टत का बसा असा सोईस्कर विचार करून ते स्वस्थ बसले असावेत असं मी समजतो.

तसं मला करता येत नव्हतं. म्हणून मी या विषयात खोलवर बुडी मारून हाताला काय लागतं ते पाहात होतो. गतकालीन सत्य किंवा ऐतिहासिक सत्य म्हणजे नेमकं काय या मुद्द्याचा मी स्वतंत्रपणे विचार करू लागलो.

सत्य म्हणजे काय हा निरंतरचा प्रश्न जसा आहे तसाच दुसरा प्रश्न असा आहे की, सत्य कुणाला सापडलं आहे काय ? ऐतिहासिक कादंबरीसाठी ऐतिहासिक सत्याची जशी आवश्यकता आहे तशीच कादंबरीचीही स्वच्छ कल्पना लेखकाच्या डोळ्यासमोर हवी. मी प्रथम सत्याचा विचार करू लागलो तेव्हा लक्षात आलं की, प्रथम इतिहास आणि सत्य यांच्याच व्याख्या मला नक्की करायला हव्यात. इतिहास म्हणजे 'मानवी प्रगतीच्या प्रवासाची नोंद करणारी एक प्रयोगशाळा' अशी माझी व्याख्या झाली. सत्य म्हणजे 'काय घडले' याचे ज्ञान हीही व्याख्या त्याच्या पाठोपाठ आली.

पण प्रवास इतका सुकर नव्हता. इतिहासाच्या प्रयोगशाळेचे आपल्या संदर्भात कसे धिंडवडे निघाले हे सारांशरूपाने मी वर कथन केले आहेत. सत्याचा प्रकार आणखी अजब आहे. ते निरपवाद नसतं. इतकंच नव्हे तर ते माणूस आणि त्याच्या गरजा या अंगान बदलतही असतं हे माझ्या लक्षात आलं.

सनातन सत्य म्हणजे 'काय घडलं' या संकल्पनेला आणखी काय तपशील चिकटलेले असतात. हे सत्य तत्त्वज्ञान्यांना हवं असतं. त्याचे स्थूल, सूक्ष्म आणि अतिसूक्ष्म असे आणखी भाग पडतात. उदाहरणाने स्पष्ट करतो. शिवाजीमहाराज होऊन गेले हे स्थूल सत्य. ते अमुक सालात जन्मले (म्हणजे १६२७ किंवा १६३०) हे सूक्ष्म

सत्य आणि त्यांच्या जन्मसालात वाद असण्याचं कारण म्हणजे अतिसूक्ष्म सत्य होय, असं म्हणता येतं.

वरील फरक हा ढोबळ सत्याच्या संदर्भात झाला. किशोरवयीन सत्य याहून निराळं असतं. कोणती घटना सत्य म्हणून धरलेली आपल्याला आवडते हे आपलं किशोरवयीन सत्य असतं. मुरारबाजीनं मुंडकं तुटलेलं असताना नुसत्या धडाच्या साहाय्यानं दुष्मनांचे पन्नास हजार स्वार कापून काढले ही घटना या प्रकारात मोडते. ऐतिहासिक थोर पुरुषाचं चरित्र लिहिणाऱ्या चरित्रकारासमोर त्याचं म्हणून एक वेगळं सत्य असतं. काय घडलेलं चरित्रकाराला आवडतं हे त्याचं सत्य असतं. चरित्रात त्याची व्यक्तिगत आवड-निवड व्यक्त होत असते. तेच सत्य म्हणून तो आग्रहानं मांडत असतो. सत्याचा आणखी एक प्रकार अस्तित्वात आहे. त्याचा वापर सार्वजनिक संस्था व शासकीय संस्था सतत करीत असतात. काय घडलं आहे असं इतरांनी समजावं असं विवेचन सत्य नावाखाली ही मंडळी मांडत असतात. गरिबी हटलेली आहे, स्वस्ताई झालेली आहे, देश प्रगतिपथावर वाटचाल करतो आहे ही यांची उदाहरणं. ती सत्य म्हणूनच विकली जातात. या गदारोळात ऐतिहासिक कादंबरीकारही आपले ग्रंथ हातात उंच धरून उभा असतो. काय काय घडलेलं आपल्याला आकलन झालं आहे, असं इतरांनी समजावं हे त्याच ऐतिहासिक सत्य असतं. अमुक राज्यकर्ता हा युगपुरुष आहे असं म्हटलं जात असताना तो माणूसही होता, दुष्ट राज्यकर्ता काही बाबतीत सुष्टही असू शकतो हे आपलं इतिहासाचं आकलन आहे असं सत्य या नावाखाली त्याचंही विवेचन असतं. ऐतिहासिक सत्याची जशी आणखीही काही वेगळी परिमाणं वाचकांच्या पुढे मांडता येतील पण विस्तार टाळतो.

एकूण ऐतिहासिक सत्य हा शब्द उच्चारायला जेवढा सोपा तेवढाच तो कळायला कठीण आहे. सवंग नाही. सत्याच्या या शोधात कधी कधी असा तपशील मिळून जातो की नव्या शोधाने मूळच्या गृहीत तत्त्वांना हादरे बसू लागतात. या बाबतीत माझा एक विलक्षण अनुभव या ठिकाण नोंदतो.

एके दिवशी रात्री, औरंगजेबाच्या जनानखान्यातल्या खासगी दरबारात, बादशहाच्या नातसुनेनं- शम्स उन् निसानं त्याच्यासमोर तक्रार केली. तिच्या नवऱ्यानं निसाच्या माहेरचा उल्लेख 'हलक्या दर्जाचं खानदान' म्हणून केला होता. तो तिचं नाव टाकणार होता. म्हणून आता तीही नवऱ्याशी बोलत नव्हती. मुद्दाम भांडण उकरून काढून 'तू हलक्या कुळातली असल्यामुळे माझ्यासारख्या उच्चकुलीन राजपुत्राची बरोबरी करणं तुला शोभत नाही' असे शब्द उच्चारून त्यानं हिणवलं होतं. बिचारी बहूबेगम त्यामुळं दुखावली गेली होती. मनातली तिची ही तक्रार बादशहासमोर आल्यावर, राज्यकारभारात आकंठ बुडालेल्या, आयुष्याच्या शेवटच्या घटका मोजणाऱ्या त्या म्हाताऱ्यानं कोणता आदेश द्यावा ? त्यानं हुकूम म्हणून एक कविताच उद्धृत केली. औरंगजेब आणि

कविता याबद्दलच्या मराठी माणसाच्या कल्पना इतक्या चुकीच्या आहेत की, त्या खोडून काढण्याचा प्रयत्न करणंही व्यर्थ आहे. कितीतरी ठिकाणी हा मुघल बादशहा काव्याच्या ओळी लीलया लिहून जातो. जनानखान्यातल्या त्या छोट्या बहूनं केलेल्या तक्रारीवर औरंगजेबानं जो अभिप्राय काव्यात व्यक्त केला आहे त्याचा मराठी तर्जुमा रसिक (वाचकांसाठी) श्रोत्यांसाठी इथं दाखल करतो.

*ऋतुराजाच्या पहाट समयी*
*वदला पक्षी कठोर वचने,*
*"नकोस कलिके गे, तोरा मिरवू*
*कितीक तुजसे आले गेले !"*
*उपवन शरमे शरमे वेली,*
*तरीही कलिका नव ती वदली,*
*"आहे सारा ज्ञात पसारा*
*प्रेमाला हा शाप खरा ।।*
*परन्तु नव्हते माहीत इतुके ते की,*
*पराग गधी मंद समीरी*
*हृदये भिडता परस्परांना*
*वधील ऐसे कुणी कुणाला ।।"*

तत्कालीन वातावरणाची आणि व्यक्तिमत्त्वाची अल्पशी तरी समजूत व्हावी म्हणून विस्ताराचा दोष पत्करून हा तर्जुमा दिला आहे.

ऐतिहासिक कादंबरीत इतिहास हे साधन आहे, साध्य नव्हे हे समजून घ्यावं लागत नुसत्या सनावळी आणि तहांची कलमे किंवा लढाईतल्या नफानुकसानीचे कलमवार हिशेब यानंही कादंबरी सिद्ध होत नाही. त्याचप्रमाणे या प्रकारातल्या लेखकानं इतिहासाच्या नावाखाली कुणीही आपल्या माथा मारलेले पूर्वग्रहावर आधारित तथाकथित इतिहासग्रंथ बाजूला ठेवण्याचं धैर्य दाखवावं लागतं हे ग्रंथ ज्या ऐतिहासिक साधनांवर आधारित असतात ते एक तर अत्यंत अपुरे असतात, धर्म, जाती, प्रदेश इत्यादीच्या दुरभिमानावर भर देणारे असतात किंवा जेते आणि जित या इतिहासबाह्य दुर्गुणांनी ते भरलेले असतात. साधनांच्या या अंदाधुंदीमुळे [illegible] इतिहास-विचार आपल्याला पारखा होतो. ही साधनं अपुरी तर आहेतच पण एकांगीही आहेत. श्रेष्ठ पुरुष म्हणून ज्या ऐतिहासिक पुरुषांना आदर्शापोटी मान्यता देतो त्या पुरुषाच्या निकटच्या नातेवाईकांना त्यांचं श्रेष्ठत्व कसं नाही, भावत नाही हे आश्चर्य आहे. उघडउघड वैचारिक शत्रू असलेल्यांना हे नातेवाईक जाऊन मिळतात, त्याची बाजू विजयी व्हावी म्हणून प्रयत्न करतात आणि तरीही देशप्रेमापोटी आम्ही या विसंगतीकडे दुर्लक्ष करावं किंवा एखाद्या

आडवळणाचा तर्क करून ते नातेवाईक मूळ उद्देशाच्या पूर्ततेसाठीच हे करीत असतात असं सर्वांनी समजून घ्यावं असं सुचवतात. देशप्रेमाच्या आणि राष्ट्रप्रेमाच्या गोष्टी एकीकडे बोलत असताना देशद्रोही वर्तन करायला जातभाई, संबंधित किंवा सगेसोयरे कमी करीत नाहीत. या पूर्वकालीन सत्याची मग संगती लावायची कशी हा प्रश्न पडतो. ब्राह्मण सत्ताधाऱ्यांविरुद्ध दुसरा ब्राह्मण सरदारच देशाच्या शत्रूशी संगनमत करतो हे या साधनांतून स्पष्ट दिसत असताना देशप्रेमाची आमची पोथी गुंडाळून ठेवायची की काय असा संभ्रम पडतो. प्रत्येक जातीत तट पडून ते तट आळीपाळीनं देशाच्या उघड शत्रूंशी संगनमत करतात तेव्हा सत्य कशाला म्हणायचे हे कळेनासं होतं. बारकाईनं शोधलं तर शत्रूच्या गोटातही याहून वेगळं चित्र दिसत नाही. मग देशप्रेम ही एक भोगळ कल्पना आहे की काय ? रायगड सिद्द्याकडून जिंकून घेण्यासाठी स्वराज्याचा सरदार प्रयत्न करीत असताना त्याला मदत करायचं सोडून सिद्द्याला दिलासा देणारे स्वदेशी मुत्सद्दी आणि सरदार यांना कोणत्या कोटीत बसवावं ? नाना फडणिसासारख्या सर्वमान्य नवकोट नारायण मुत्सद्द्याला आयुष्याच्या अखेरीस आपल्या संरक्षणासाठी देशी फौजांचा भरवसा येईना म्हणून अरबस्तानातून अरब लोक आणून त्यांच्या संरक्षणात स्वदेशी राहावं लागलं, हे देश, धर्म यांचं प्रेम म्हणावं का काही वेगळे तर्क काढावेत ? शत्रूंशी लढाईला मदतीला या म्हणून फर्मानं जारी झाल्यानंतर या लढाईतून माझा फायदा काय होईल याचा विचार करून, परक्यांशी मंधान बांधून कटकारस्थान करीत टाळाटाळ करायची या कृतीला कोणतं नेमकं नाव शोभतं याचा विचार करावा लागतो. आदर्शवादी विचारांच्या पगड्यामुळे वास्तवाशी आमची नाळ तुटलेली आहे. त्यामुळे शत्रू आणि मित्र, धर्म आणि अधर्म, स्वार्थ आणि त्याग यासारख्या संकल्पना सतत तपासून घ्याव्या लागतात.

हरिभाऊंच्या वेळी हे काम किती कठीण असणार याची कल्पनाही करता येत नाही. म्हणून मग वास्तवाचं आपलं भान, आपला अभ्यास आणि आपला अनुभव यांचा आधार घेऊन पूर्वकालीन सत्याचा शोध लेखकाला स्वत:ला घ्यावा लागतो पूर्वसूरींनी मान्य केलेले काही आदर्श नाकारावे लागतात. काही ग्रंथाना निर्धारानं बाजूला सारावं लागतं.

पण एवढ्यानं ही नवी ऐतिहासिक कादंबरी लगेच सिद्ध होते असं नाही. ती कादंबरीही असते. म्हणून तिला आणखी एक परीक्षा द्यावी लागते. ती वाङ्मयीन निकषाची असते. ललित साहित्याची असते. रुक्ष इतिहासाचा चिरेबंदी पाया ही तिची गरज असते हे खरं. त्या पायाला ऐतिहासिक आकलनामुळे निश्चित केलेल्या विचारांचा आधारही असावा लागतो, हेही तितकंच खरं. पण या डौलदार वास्तूला सुबक घाट यावा म्हणून सत्याचं अधिष्ठानही असावं लागतं. ही तांत्रिक बाजू मान्य केल्यावर ती कादंबरी वाङ्मयीन लेण्यांची अपेक्षा करते. ही लेणी ललित अंगानं येतात. त्यात

लडिवाळ गोडवा असावा लागतो. वाचकांना/रसिकांना खिळवून टाकणाऱ्या भावनांचा आधार या लडिवाळपणाला लागतो. या उभय घटकांतून रसनिष्पती व्हावी लागते.

या रसनिष्पत्तीचा निकष कोणता ? परंपरागत रसचर्चेत आलेला हा वाङ्मयीन रस असतो. पण त्याचा रंग किंचित वेगळा भासतो. त्यामुळे भलेभले इथं फजित पावण्याची शक्यता असते. म्हणून उदाहरणांचा आधार घेतो.

ललित धाटणीची दोन वाक्यं समोर ठेवतो. 'हेडक्लार्क माधव भटांनी ऑफिसात प्रवेश केला आणि कारकुनांच्या गप्पा एकदम थाबल्या माना खाली घालून पेन फिरू लागले '

दुसरं वाक्य—

'श्रीमत माधवराव पेशवे फडावर आले आणि कचेरीच्या दालनात शांतता पसरली. उपरणी सावरून कारकुनानी लेखण्या उचलल्या आणि जुन्नरी कागदावर बोरू कुरकुरू लागले.'

या दोन्ही वाक्यांतील आशय सामान्यत: एकच आहे. पण ती वाक्यं वाचताना मनात ज्या प्रतिक्रिया उमटतात त्या अगदी वेगळ्या असतात. हे वेगळेपण कशामुळे आलं ? दुसऱ्या वाक्यात काहीतरी अधिक आहे. हा रस वेगळा आहे. तो साधा तांबडा रंग नसून केशरी आहे त्याला सुगंधही आहे. हे वेगळेपण 'इतिहास' या शब्दानं ओळखता आल तर ललित वाङमयीन व्यवहाराला हे एक आगळे परिमाण लाभले असे म्हणता येईल रूढ साहित्यिक भाषाव्यवहारात याला 'इतिहास रस' म्हणावे का ? हा रस ज्या कृतीत सहज जागा होतो ता वाङ्मयीन कृती ऐतिहासिक म्हणावी का ? ऐतिहासिक कादंबरी सिद्ध होण्यासाठी इतिहास आणि ललित कादंबरी यांना जोडणारा अत्यावश्यक दुवा असं या इतिहास-रसाचं स्वरूप असावं का ?

हे प्रश्न उत्पन्न करून त्याची उत्तरे देण्यासाठी मी मराठीचे अभ्यासक, प्राध्यापक आणि विचारवंत यांना आवाहन करतो. त्यांचं ज्ञान, अभ्यास, वाङ्मयीन व्यवहारातलं त्यांचं स्थान त्यामुळे माझ्यासारखा लेखक ही अपेक्षा त्यांच्याकडून करतो आहे.

मोचनगड, कोरलईचा किल्लेदार इत्यादी जुन्या ऐतिहासिक कादंबऱ्यांपासून फारकत घेऊन हरिभाऊंनी या वाङमयप्रकारात आपला नवा पंथ सुरू केला हे सत्य असलं तरी गुलामगिरीच्या त्या कृत्रिम वातावरणामुळे स्वातंत्र्यपूर्वीची ही कादंबरी आदर्शवादात गुंतून पडली होती ही बाब नजरआड करता येत नाही. ती मर्यादा स्वातंत्र्योत्तर काळात आलेल्या माझ्या आठ कादंबऱ्यांना त्याचप्रमाणे तात्यासाहेब शिरवाडकर, वसंत कानेटकर, गो. नी. दांडेकर, रणजित देसाई, बाबासाहेब पुरंदरे, देशमुख विजयराव, शिवाजी सावंत, ज्ञ. बेलवलकर, विश्वास पाटील व अन्य समकालीन ऐतिहासिक लेखकांच्या कादंबऱ्यांना नव्हती. त्यामुळे या कादंबऱ्यांनी आपल्या प्रकारात नव्या युगाला सुरुवात केली असं नि:शंकपणे म्हणता येतं. या कादंबऱ्यांना वाचकांनी

भरभरून दाद दिल्यामुळे आता हा प्रकार सुस्थिर झाला आहे. मराठी सोडून इतर प्रांतांत त्यांच्या भाषेत या कादंबऱ्या वाचल्या जातात हेही एक चांगलं लक्षण आहे. असं असलं तरी इथंच मला एक धोक्याची सूचना द्यायची आहे. आपल्या समाजात विविध हितसंबंधांचे आणि विचारांचे गट अस्तित्वात आहेत. साहित्यबाह्य हेतूंसाठी हे गट या साहित्यप्रकाराकडे वळत आहेत. त्यामुळे ऐतिहासिक कादंबरीचं शुद्ध रूप विकृत होऊन नव्या लेखकांना शृंगापत्ती येण्याची शक्यता आहे. नव्या कादंबरीचे काही लेखक या प्रांतात चांगली निर्मिती करताहेत. त्यांनी या कादंबरीचा असा कुणी गैरफायदा घेणार नाही याबद्दल सतर्क राहिलं पाहिजे. दारा-शुकोहनं हिंदूंच्या उपनिषदांचं फार्शीत प्रथम भाषांतर केलं, आणि त्यामुळे लॅटिन भाषेत ते भाषांतर जाऊन जर्मनीमार्गे युरोपखंडाला ज्ञात झालं. हे पूर्वकालीन सत्य ध्यानात ठेवावं. दारा शुकोह हा औरंगजेबाचा थोरला भाऊ होता. उत्तर प्रदेशातल्या अलिगढ मुस्लिम युनिव्हर्सिटीत आजही संस्कृत भाषेचा अभ्यास मुस्लिम युवती करताहेत आणि तिथे त्या संस्कृत विद्या शिकवतही आहेत, याचा अर्थ तारतम्यानं ओळखलेला बरा. परंपरेनं संस्कृत विद्या जपणारी काही मुसलमान घराणी या भारतात जशी आहेत तशी उर्दू-फारशी जाणणारी हिंदू कुटुंबंही संख्येनं कमी नाहीत हेही एक सत्य आहे.

यापुढील ऐतिहासिक कादंबरीचा मार्ग सुखकर व्हायचा असला तर लेखकाचं हे भान सुटू नये म्हणून ही नोंद. या निमित्ताने वारंवार घेतल्या जाणाऱ्या एका आक्षेपाबाबत मतप्रदर्शन आवश्यक आहे. मराठी प्रदेशात असा एक विचारवंतांचा वर्ग आहे की, जो 'जुने गाउ द्या मरणालागुनि' असं म्हणून भूतकाळाऐवजी भविष्यकाळाकडे लेखकांनी नजर देऊन लिखाण करावं असा आग्रह धरतो. वरवर पाहता हा आक्षेप बरोबर वाटतो. भूतकालीन घटनांना आपण अवास्तव महत्त्व देऊन वाङ्मयात एक तऱ्हेचा पलायनवाद जोपासतो की काय अशी शंका येणं स्वाभाविक आहे. पण विचारांती त्याचा फोलपणा स्पष्ट होतो. या नव्या ऐतिहासिक कादंबऱ्यांतून जे मानवी जीवनाचं चित्रण केलेलं असतं हे त्या त्या वेळी या जगात वावरणाऱ्या हाडामांसाच्या मानवाच्या संबंधातलं असतं. आज आपण या भूतलावर वावरतो आहोत. वेगवेगळ्या समस्यांना तोड देत झगडत जीवन जगतो आहोत. तसंच गतकालीन वास्तवातील जीवन एकेकाळी घडत होतं, वाढत होतं आणि निसर्गक्रमानुसार बदलतही होतं. मानवी जीवन प्रवाही आहे हे आपण एकदा ध्यानी घेतलं म्हणजे त्या प्रवाहातल्या एका भागाला गतकाल म्हणून संबोधल्यानं एकूण जीवनात गुणात्मक फरक पडत नाही. वर्तमानकाळाला जसा भूतकाळ भिडलेल असतो तसा भविष्यकाळही असतो, आणि गतकाळाला त्याचा वर्तमानकाळ आणि भूतकाळही असणार, हे उघड आहे. त्या त्या काळात माणसं पूर्वीच्या आणि नंतरच्या काळाचा विचार करीत असणार. हे नीट समजून घेण्यासाठी वर्तमानाचा भूतकाळ आणि भूतकाळाचा वर्तमान काळ याचं भान

समतोल मनानं ठेवलं तर जीवनाचं हे कोडं उलगडणार आहे. ऐतिहासिक कादंबरीचं हे जीवितकार्य आहे.

माझ्या सर्व कादंबऱ्यांतून कथानकाच्या आडून नियतीचं एक सूत्र मी खेळवलं आहे. प्रत्येक कादंबरी ही स्वतंत्रपणे शोकांतिका असली तरी त्या साऱ्या शोकांतिकांत एक समान सूत्र रसिकांना दिसेल. ते म्हणजे सर्व मानवी व्यवहारांवर नियतीचं प्रचंड नियंत्रण आहे. एका मर्यादेपलीकडे प्रयत्नवादाला अर्थ राहात नाही. 'वर्धमान ते ते चाले मार्गे रे क्षयाचा' हे जितकं पूर्वकालीन सत्य आहे तितकंच ते वर्तमानकालीनही आहे, आणि भविष्यकालीनही राहणार आहे.

एका हुजऱ्याच्या जीवनात त्याला अखेरीस याचा जसा अनुभव येतो तसा चक्रवर्ती सत्ताधारीही नियतीच्या खेळण्यापुढे हतबल होताना इथ आपण पाहतो. वाचक त्या टप्प्यावर अंतर्मुख होऊन काळापलीकडे जाऊन स्वतःच्या आयुष्याचा विचार करू लागतो. इथं या कादंबरीचं यश आहे. साक्षात्कार आहे. इतिहासाच्या प्रदीर्घ कालपटाचा विचार करताना नियतीची ही कालबद्ध क्रीडा मानवाच्या ध्यानात येते. मनाची कवाडं उघडी ठेवली तर-

आता अखेरचं. गेली पन्नास वर्षे प्रतिभेचा दीप हाती घेऊन, इतिहासाच्या दिवाणखान्यातून, मुत्सद्द्यांच्या खलबतखान्यातून, प्रांगणातून, हवेल्यांतून, रस्त्यातून आणि रणमैदानातूनही मी सतत फिरत होतो, ऐकत होतो, पाहात होतो, प्रश्नही विचारत होतो. या साऱ्यांचं फलित म्हणजे माझी ऐतिहासिक कादंबरी. या माझ्या वाङ्मयीन प्रवासात मी त्या वेळीही एकटा नव्हतो. माझ्या जीवनात जगलेल्या प्रत्येक क्षणाला आणखी एक श्वास-सुगंध आहे. मराठी साहित्यात मी थोडंफार काही करू शकलो असेन तर त्यात माझ्या सहधर्मचारिणीचा बरोबरीचा वाटा आहे. पण हे मला स्पष्टपणे तुम्हांपुढे उच्चारता येत नाही. अशा वेळी आंग्लभाषेचा आधार घेऊन या भाषणाअंती मी हलक्या आवाजात माझ्या शेजारीच बसलेल्या सौ. मालतीस म्हणेन-

*Come madam wife, sit by my side*
*And let the world slip, we shall never be younger.*

धन्यवाद ! धन्यवाद !! धन्यवाद !!!

# परळी वैजनाथ : १९९८

# द. मा. मिरासदार

---

मित्रहो,

७१ व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी आपण रसिकांनी माझी निवड केली याबद्दल लेखक म्हणून मला आनंद होणे स्वाभाविक आहे. जे आसन पूर्वीच्या दिग्गज साहित्यिकांनी भूषविले आणि त्याला फार मोठी प्रतिष्ठा मिळवून दिली, त्या आसनावर बसण्याचा मान आपण मला दिला, या गोष्टीचा आनंद खरोखरीच फार मोठा आहे. हा आनंद मला दिल्याबद्दल आपल्या सर्वांचा मी मन:पूर्वक आभारी आहे. अशा वेळी "वास्तविक माझी एवढी योग्यता नाही, हे मी जाणून आहे. केवळ आपल्या प्रेमामुळेच हे पद आज मला मिळाले आहे—" असे विनयाने म्हणण्याची पद्धत आहे. ती सुसंस्कृतपणाची आहे यात शंका नाही पण तरी मी हे वाक्य उच्चारीत नाही कारण आपल्या चोखंदळ रसिकतेचा तो अवमान ठरेल असे मला वाटते. म्हणून खोटा विनय सोडून मी एवढेच म्हणतो की, माझे काही लेखन - कर्तृत्व आणि आपली जाणती रसिकता यांचा मेळ जमल्यामुळे हा योग आज घडून आला आहे. म्हणून आनंद आणि कृतज्ञता या दोन्ही भावना आज माझ्या मनात उचंबळत आहेत.

आनंद आणखी एका कारणासाठी. माझी ही निवड अविरोध झाली. निवडणूक होऊन झाली नाही. आपण आपल्या देशात लोकशाहीची जीवनप्रणाली स्वीकारली आहे. ही पद्धत एकदा का स्वीकारली की 'निवडणूक' ही गोष्ट अगदी अपरिहार्य. त्यामुळे साहित्याच्या क्षेत्रातही निवडणुकीचा गदारोळ उठतो साहित्य-संमेलनाचा अध्यक्ष हा बहुधा निवडणूक होऊनच ठरतो. जे विरोध न होता या उच्चासनावर बसतात 'तेचि पुरुष भाग्याचे' असे म्हणावे लागते. कारण अविरोध निवड ही घटना फार थोड्या भाग्यवंत साहित्यिकांच्या बाबतीतच घडली असा आजवरचा इतिहास आहे. काही ज्येष्ठ आणि श्रेष्ठ साहित्यिकदेखील प्रथम पराभूत झाले आणि नंतर केव्हा तरी निवडून आले. चिं. वि. जोशी यांच्यासारख्या श्रेष्ठ विनोदकाराच्या वाट्याला तर हा योग दुर्दैवाने आलाच नाही. ही निवडणूकही खेळीमेळीच्या वातावरणात होतेच असेही नाही. या निवडणुकीच्या निमित्ताने साहित्याचे क्षेत्र ढवळले जाते. आरोप-प्रत्यारोप होतात.

वातावरण विनाकारण गढूळ होते. साहित्यिक मंडळीत वादंगाचा धुरोळा उडत राहतो आणि परस्परांच्या मनात सकारण अथवा अकारण किल्मिषे निर्माण होतात. साहित्याच्या निकोप वाढीसाठी हे वातावरण काही चांगले नव्हे. पण तसे होते खरे! म्हणून 'सर्वेषाम् अविरोधेन' ही अत्यंत आनंदाची गोष्ट. हा आनंद आपण मला मिळवून दिला - तोही आचार्य अत्रे यांच्या जन्मशताब्दी वर्षात—म्हणून पुन्हा एकदा आपल्याला धन्यवाद देतो.

साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षपदासंबंधी सामान्य वाचकांच्या मनात अनेक गंमतीदार गैरसमजुती आहेत, किंवा भ्रम आहेत म्हणा. कित्येकांना वाटते की, संमेलनाचा अध्यक्ष म्हणजे साहित्य नावाच्या शासकीय खात्याचा तो जणू काही मंत्रीच झाला! त्याच्या हातात आता बऱ्याच गोष्टी असतील. काही अधिकार असतील, काही निधी असेल. "त्यांचा विनियोग तुम्ही कसा करणार ? आमच्या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी त्यातून काही अर्थसाहाय्य होईल काय ? वर्षभरासाठी तुमच्या काय काय योजना आहेत ? खरे म्हणजे एक वर्ष तुमच्या कार्याला फार अपुरे आहे ना हो ? निदान पाच वर्षे तरी तुमची नेमणूक व्हायला पाहिजे !".... वगैरे वगैरे. साहित्य, साहित्यिक चळवळी, साहित्य-संमेलन या स्वायत्त गोष्टी आहेत. त्यांचा शासनाशी तसा काहीच संबंध नाही या गोष्टी त्यांच्या गावीही नाहीत. शासन साहित्य-संमेलन भरविण्यासाठी आर्थिक मदत करते ही गोष्ट खरी. पण यापलीकडे शासनाचा या सांस्कृतिक चळवळीशी काही संबंध नसतो आणि तो असूही नये, ही गोष्ट अशा वेळी त्यांना समजावून सांगावी लागते.

साहित्य-संमेलनाचे अध्यक्षपद हे फक्त सन्मानाचे पद आहे. ते काही अधिकाराचे पद नाही. संमेलनाध्यक्षाला कसलेही अधिकार एरवी नाहीत. ठिकठिकाणच्या साहित्य-परिषदांचे जे कार्याध्यक्ष आणि त्यांच्या कार्यकारणीचे जे सदस्य आहेत त्यांना काही अधिकार आहेत. त्यांना स्वतःचे कार्यालय आहे, सेवकवर्ग आहे आणि काही निधीही उपलब्ध आहे. असा अधिकार असलेल्या पदासाठी निवडणूक ही पद्धत अपरिहार्य आहे आणि योग्यही आहे. संमेलनाध्यक्षाला कसले अधिकार ! तो फक्त तीन दिवसांचा गणपती आहे. पहिल्या दिवशी आगमन आणि पूजाअर्चा. दुसऱ्या दिवशी काही आरत्या आणि कार्यक्रम. तिसऱ्या दिवशी टाळ्यांच्या गजरात प्रेमपूर्वक विसर्जन ! हा फक्त सन्मानच आहे. मात्र साहित्याच्या क्षेत्रातला तो सर्वोच्च सन्मान आहे. म्हणूनच त्याची निवडणूक शक्यतो होऊ नये असे मला मनःपूर्वक वाटते. सन्मान हा सन्मानपूर्वकच मिळावा. हा सन्मान अविरोध निवडीतून मिळतो. लोकशाहीतील घटनेनुसार निवडणूक अपरिहार्य असली तरी ती टाळता नाही का येणार ? तसे झाले तर या सन्मानाचे त्या त्या व्यक्तीला भूषण वाटेल. सुसंस्कृतपणा आणि समंजसपणा, न्यायबुद्धी यांचे महत्त्व नेहमीच असते त्या दृष्टीने एखाद्या ज्येष्ठ व्यक्तीसाठी आपण माघार घेतली तर त्यात कमीपणा कसला ? सन्मानासाठी निवडणूक ही कल्पना मला तरी फार विचित्र आणि

विसंगत वाटते. उद्या 'पद्मश्री', 'पद्मभूषण', 'भारतरत्न' या सन्मानासाठी निवडणूक घ्यायचे शासनाने ठरवले तर ते कसे दिसेल ? लोकशाहीत लिखित घटनेपेक्षा काही निरोगी, सुसंस्कृत अलिखित संकेत निर्माण करणे ही गोष्ट मला खऱ्याखुऱ्या लोकशाहीसाठी महत्त्वाची वाटते. अध्यक्षपदासाठी असा चांगला अलिखित संकेत आपण निर्माण करू शकणार नाही काय ?

काही लोक असेही म्हणतील की, एवीतेवी निवडणूक होणे अपरिहार्यच ठरत असेल तर मग संमेलनाध्यक्षाला काही अधिकार द्या. 'त्याला काही निधीही साहित्य-परिषदांनी किंवा शासनाने उपलब्ध करून द्यावा. काय हरकत आहे ?' — असे एका माजी संमेलनाध्यक्षांनी म्हटल्याचे मी ऐकले आहे ही सूचना जर त्यांनी गंभीरपणे केली असेल, तर मी या सूचनेला अनुकूल नाही, हे मी स्पष्टपणे सांगतो. सन्मानाबरोबर अधिकार आणि अर्थलाभ आला तर तो सन्मान मुळीच राहात नाही. तसे साहाय्य कुणाला करावयाचा इच्छाच असेल तर त्यांनी व्यक्तीला नव्हे, संस्थेला अधिकार आणि अर्थसाहाय्य करावे असे मी म्हणेन. साहित्य-परिषदांचे कार्याध्यक्ष किंवा महामंडळ यांना हे साहाय्य देण्यास हरकत नाही. उद्या संमेलनाध्यक्षाला शासनाने निवृत्ती-वेतन द्यावे अशीही सूचना पुढे येण्याचा संभव आहे. साहित्याच्या क्षेत्रात एक तरी स्थान केवळ सन्मानाचे असेच असावे. त्यासाठी इतर आमिषे असू नयेत. काही नसताना जर एवढा वादंग आज माजतो, तर अर्थलाभही होणार आहे म्हटल्यावर किती मारामाऱ्या होतील, याची कल्पना केलेली बरी !

साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षाला एक गोष्ट मात्र नक्की करता येण्यासारखी आहे. ती गोष्ट म्हणजे साहित्याच्या जगातली सौजन्याची परंपरा चालू ठेवणे. ही परंपरा आज क्षीण झाली आहे. ज्येष्ठाबद्दल आदरभाव दाखवणे (अध्यक्षपदाच्या निवडीच्या वेळी त्याच्यासाठी माघार घेऊन हा आदर, प्रत्यक्षात व्यक्त करणे) आपल्या पिढीतील इतर साहित्यिक मंडळीबद्दल स्नेहभाव बाळगणे, व्यक्तिगत निंदानालस्तीपासून दूर राहणे आणि नवोदितांचे प्रेमपूर्वक कौतुक करणे- याला मी साहित्यातील सौजन्याची परंपरा समजतो. आमच्या पूर्वीच्या पिढीत वामन मल्हार जोशी आणि वि. स. खांडेकर हे दोन ज्येष्ठ लेखक या परंपरेतले होते. 'कलेसाठी कला की जीवनासाठी कला' हा वाद एकेकाळी फडके-खांडेकर यांच्यात खूप गाजला होता. पण त्यात व्यक्तिगत निंदानालस्ती नव्हती वामन मल्हारांनी या दोघाही लेखकांच्या मोठेपणाला बाधा येऊ न देता, समतोल वृत्तीने वेळोवेळी त्यासंबंधी लिहिले होते. इतकेच नव्हे तर, अत्रे-फडके वाद जेव्हा व्यक्तिगत कुचाळकीच्या पातळीवर गेला तेव्हा त्यासंबंधी नापसंती व्यक्त करून, साहित्याच्या क्षेत्रातला हा शेणसडा थांबावा म्हणून ज्यांनी प्रयत्न केले, त्यात वामन मल्हार हेही एक होते. वि. स. खांडेकर हे स्वत: वाचकप्रिय कादंबरीकार. पण त्यांनी आत्मकेंद्रित वृत्ती कधीच दाखवली नाही. एकूणच साहित्य आणि लेखक

ही जमात यांच्याबद्दल त्यांना प्रेम वाटे. नव्या लेखकांचे लेखन ते कटाक्षाने वाचत. इतकेच नव्हे तर कुठे काही नवीन, चांगले लेखन कुणाचे आढळले तर त्या नवोदित लेखकाला चार कौतुकाचे शब्द असलेले एखादे पत्रही ते पाठवीत. असे एक पत्र त्यांचे मला आलेले आठवते. त्यांच्या या पत्रामुळे मला झालेला आनंद आजही आठवतो. कुसुमाग्रजांच्या उमेदवारीच्या काळात त्यांच्या कविता खांडेकरांनी वाचल्या आणि त्यांना त्या आवडल्या. त्या पुस्तकरूपाने प्रसिद्ध व्हाव्यात आणि मराठी रसिकांपर्यंत पोचून त्यांना योग्य तो न्याय मिळावा यासाठी खांडेकरांनीच खटपट केली होती, हे अनेकांना आठवत असेल. ज्येष्ठ समीक्षक वा. ल. कुळकर्णी आणि मौज-सत्यकथेचे साक्षेपी संपादक श्री. पु. भागवत हे याच सौजन्य परंपरेतले असे मी मानतो. या उभयतांनी युद्धोत्तर काळातील नव्या लेखकांचे, नव्या जाणिवा व्यक्त करणाऱ्या लेखनाचे केलेले कौतुक आणि मित्रभावाने त्यांना केलेले मार्गदर्शन हे अनेकांना चांगले परिचित आहे. मला तर ते स्वानुभावानेच माहीत आहे. हिलाच मी साहित्यातील सौजन्याची परंपरा म्हणतो. ही परंपरा आज क्षीण झाल्यासारखी वाटत आहे. संमेलनाध्यक्षाला हे काम निश्चित करता येण्यासारखे आहे. माझ्या परीने, यथाशक्ती ते मी केले आहे. त्या दृष्टीने खांडेकर-कुसुमाग्रज हे ज्ञानपीठ पारितोषिक मिळण्याच्या योग्यतेचेच नाहीत असे उद्गार आमच्याच एका मराठी लेखकाने अमराठी विद्वज्जनांसमोर काढावेत ही मला सर्वस्वी अनुचित आणि खेदाची गोष्ट वाटते.

* * *

मित्रहो, मी लेखन करायला प्रारंभ केला त्यास आता जवळजवळ पन्नास वर्षे होत आली. मी साहित्यिकांची जुनी पिढी पाहिली, आमच्या बरोबरीची पाहिली आणि आता लेखककवींची नवीन पिढीही पाहात आहे. मी बाकी काही न होता लेखकच का झालो या प्रश्नाचे उत्तर देणे मला आजही अवघड आहे. आज मला आठवते ते एवढेच की, लहानपणी मला वाचनाचे विलक्षण वेड होते हाती येईल ते पुस्तक घेऊन मी वाचत बसत असे. आमच्या घरात एकही ललित वाङ्मयाचे पुस्तक नव्हते. (फक्त 'केसरी' नियमितपणे पोस्टाने यायचा) पण सुदैवाने आमच्या गल्लीतच धार्मिक पुस्तकांची एकदोन दुकाने होती. तिथे जाऊन मी त्या पुस्तकांचा फडशा पाडीत असे. रामविजय, हरिविजय, पांडवप्रताप नवनाथकथासार असलीही पुस्तके असत. त्याशिवाय हातीमताई, गुलबकावली, वेताळपंचविशी, सिंहासनबत्तिशी, शुकबहात्तरी असली अद्‌भुत आणि मनोरंजक घटनांनी भरलेली पण चटकदार पुस्तकेही तेथे होती शेजारच्या घरात असलेल्या 'सुरसग्रंथ माला' या प्रकाशन संस्थेची जुनीजुनी पुस्तके- मुख्यत: कादंबऱ्या- मला याच काळात वाचावयास मिळाल्या. गुजराथी, बंगाली आणि इंग्रजी भाषेतून भाषांतरित केलेल्या अनेक कादंबऱ्या त्यात होत्या. या सर्व पुस्तकांची भाषा अगदी सोपी, प्रासादिक आणि रसाळ असायची. इंग्रजी किंवा उर्दू, फारशी शब्दांचा या भाषेला

स्पर्शही नव्हता. अगदी शुद्ध, बाळबोध, जुन्या वळणाचे मराठी असे तिचे स्वरूप होते.

या पुस्तकांच्या वाचनाचा शैलीच्या दृष्टीने माझ्यावर शाळकरी वयात फार परिणाम झाला. कुठलेही लेखन हे गोष्टीच्या स्वरूपातच असावे आणि ते साध्या सोप्या, निरलंकृत भाषेत पण रसाळपणे करावे हा पहिला संस्कार माझ्यावर अगदी प्रारंभीच्या काळातच झाला. तो आजही कायम आहे. आपले लेखन अगदी सहजपणे वाचकांच्या मनापर्यंत जाऊन पोचावे आणि ते रंजक असावे, त्याने वाचकांना चांगल्या प्रकारचा आनंद द्यावा, अशी माझी लेखक म्हणून आजही भूमिका आहे. लेखनात 'प्रसाद' हा गुण मी फार महत्त्वाचा मानतो. आपल्याला जे काही सांगावयाचे आहे ते संपूर्णपणे, रसिकांनाच नव्हे तर सामान्य वाचकालाही समजले पाहिजे, असे मला पहिल्यापासून वाटत आले आहे आणि त्या मुद्द्यावर मी आजही ठाम आहे. शेवटी लेखक हा 'स्वांतसुखाय'- म्हणजे स्वत:च्या आनंदासाठी- लिहितो ही गोष्ट खरी आहे. पण हा आनंद तो लिहीत असतानाच फक्त असू शकतो. एकदा ते लेखन प्रसिद्ध झाले आणि वाचकांपर्यंत जाऊन पोचले की मग तो आनंद त्याचा एकट्याचा राहात नाही. तो सर्व वाचकांपर्यंत जाऊन पोचतो. तेही त्या आनंदाचे वाटेकरी होतात. नव्हे, झाले पाहिजेत. 'रंजकता' हे कुठल्याही कलेचे प्राथमिक मूल्य आहे असे मी मानतो. मानवी मनातील कोमल, नाजूक वृत्तींना ललित कलेने अगदी हळुवार स्पर्श केला पाहिजे. तर ती ललित कला लेखनकलेच्या बाबतीत हे तर निश्चितच सत्य आहे. रंजकता असेल तरच वाचक हे पुस्तक हातात धरील. नसेल तर न फाडलेली पाने तशीच ठेवून ते पुस्तक न वाचल्या जाणाऱ्या पुस्तकांच्या कपाटात धूळ खात पडून राहील. पुस्तकाचे दोनच प्रकार असतात असे एका लेखकाने म्हटले आहे. कधीही वाचू नयेत अशी पुस्तके आणि कधीही वाचली जात नाहीत अशी पुस्तके. आपले पुस्तक वाचनीयही असले पाहिजे आणि ते वाचलेही गेले पाहिजे, अशी माझी भूमिका आहे. अगदी फार मोठी पुस्तके जी 'क्लासिक' म्हणून ओळखली जातात- मग ते बायबल असो, शेक्सपीयरची नाटके असोत किंवा कालिदासाचे 'शाकुंतल' किंवा 'महाभारत' असो. ती जीवनाचा गाभाच आपल्याला उलगडून दाखवतात हे खरे असले तरी ती प्रथम रंजक असतात. या रंजकतेतूनच ती या गूढ, अनाकलनीय जीवनाचा अर्थ आपल्याला समजावून सांगत असतात. तसे नसते तर ही पुस्तके कुणी हातातही धरली नसती. मात्र 'रंजकता' हे साहित्याचे 'प्राथमिक' मूल्य असे मी म्हणतो आहे. रंजकतेपाशीच लेखकाने थांबत कामा नये. ते साधन आहे, साध्य नव्हे. त्याने या मार्गाने आणखी पुढे जाऊन विविध जीवनानुभवांचे दर्शन घडवून त्याचा अर्थ लावण्याची धडपड केली पाहिजे. रंजकता म्हणजे केवळ वाचनीयता एवढाच अर्थ मला अभिप्रेत नाही. वाचनीय असूनही जे लेखन वाचकाचे मन समृद्ध करते, क्वचित त्यातील अनुभवांनी वाचकाला अस्वस्थ करते ती रंजकता मला अभिप्रेत आहे. लेखन हे केवळ सामान्य रंजकतेच्या पातळीवरच

राहिले तर ते सामान्य प्रकारचे लेखन ठरेल. काही श्रेष्ठ साहित्यात तर ही रंजकता इतक्या उत्तम तऱ्हेची असते की, रंजकता हेच साहित्याचे अंगभूत मूल्य ठरते, असे कधीकधी मला वाटते.

पण केवळ पुस्तके वाचून लेखक होता येत नाही. निदान चांगला लेखक होत नाही. कारण पुस्तकातून प्रतीत होणारे अनुभव हे शेवटी त्या त्या लेखकाचे असतात. अनुभवाकडे पाहण्याची त्याची दृष्टीही विविध प्रकारची असते. जीवनातले अनुभव उसने घेता येत नाहीत. लेखकाचे मन समृद्ध होण्यासाठी या पुस्तकांचा उपयोग निश्चितच होतो. पण शेवटी त्याने स्वतःही हे विविधरंगी जीवन अगदी समरसतेने भोगले पाहिजे. माझा एक बुद्धिमान मित्र स्वतः उत्तम वाचक होता. त्याच्या घरी त्याने संग्रहित केलेली शेकडो इंग्रजी-मराठी पुस्तके होती. त्यांचे मर्म तो छान सांगे. काही ज्येष्ठ लेखकांशी त्याचा पत्रव्यवहारही होता. तो चांगली पत्रेही लिही. मला त्याचा फार हेवा वाटे. तो चांगला लेखक होईल असे मला नेहमी वाटे. पण तसे काही झाले नाही. आज माझ्या लक्षात येते की तो केवळ पुस्तकातल्या अनुभवावर जगत होता. स्वतः तो घरकोंबडा होता. या आयुष्यातली थक्क करणारी विविधता त्याने स्वतः कधी अनुभवलेलीच नव्हती. लेखकाने स्वतः अनेक प्रकारचे बरेवाईट, खारटतुरट अनुभव स्वतः घेतले पाहिजेत. 'ब्राह्मणु हिंडता बरा' असे समर्थांनी म्हटले आहे. त्या चालीवर 'लेखकु हिंडता बरा' असे मी म्हणेन. तरच या विशाल, विविधरंगी जीवनाचे थोडे तरी दर्शन त्याला घडते. स्वतः अनुभव घेत राहिले तरच त्याची या आयुष्याकडे बघण्याची एक विशिष्ट दृष्टी तयार होते. या दृष्टीमुळेच त्याच्या लेखनाला एक विशिष्ट आकार येतो. म्हणून लेखक हा समाजाभिमुख पाहिजे. तो माणसात मिसळणारा पाहिजे. 'माणसाळलेला माणूस' असे मी त्याचे वर्णन करीन. माणसापासून, समाजापासून फटकून वागणारा लेखक हा श्रेष्ठ लेखक होईल यावर माझा तरी विश्वास नाही. मी जर मराठीतला एक बऱ्यापैकी लेखक झालो असेन तर त्याचे प्रमुख कारण 'माणूस' या प्राण्याबद्दल मला विलक्षण कुतूहल आहे. मी माणसात रमतो, त्यांच्यात मिसळतो. माणसे पाहणे हाच छंद अगदी लहानपणापासून मला लागला आहे. माणसाची साधीसाधी सुखदुःखे, त्याचे हर्षखेद, त्याच्या आकांक्षा, धडपड, आशानिराशा, हेवेदावे, मत्सर, मूर्खपणा.... त्याच्या विशिष्ट जीवनाने त्याच्या मनःप्रवृत्तीला दिलेला आकार, हे सर्व मी कळत नकळत, पण मनःपूर्वक पहात आलो. हे जीवन म्हणजे प्रामुख्याने आपण आणि आपल्या भोवतालचा समाज- हे जर सत्य असेल तर माणसामाणसातील परस्परसंबंधातून या मानवी जीवनाचे मर्म थोडेफार तरी आपल्याला समजू लागते. म्हणून मनुष्यप्राण्याबद्दल त्याचे कुतूहल कायम असले पाहिजे. तो या जीवनाशी समरस झाला पाहिजे. मात्र लेखनात या अनुभवांचे चित्रण करताना त्याची चित्तवृत्ती तटस्थपणाची किंवा अलिप्ततेची पाहिजे हे खरे. तरच त्याचे लेखन हे साहित्यगुणांनी सरस ठरेल.

त्या वयात मला खूप भटकण्याचे वेड होते. या भटक्यातून मला नाना प्रकारची माणसे पहायला मिळाली. त्यांच्याशी गप्पागोष्टी करता आल्या, किंवा त्यांच्या ऐकता आल्या. कधीकधी मोठ्या माणसांच्या गप्पागोष्टी चाललेल्या असल्या तरी मी त्यांच्या टोळक्यात हळूच जाऊन बसत असे आणि त्यांचे चावट बोलणे मन लावून ऐकत असे. कधीकधी ही मंडळी मला त्यांच्यातून हाकलूनही देत असत. पण माझा हा छंद कमी झाला नाही. 'गातात भक्त मम जेथे, वसतो मी तेथे, नारदा....' असे भगवंतांनी म्हटले आहे. मीही जिथं जिथं गप्पागोष्टी चाललेल्या असतील तिथं असायचाच ! वाचन आणि हे प्रत्यक्ष अनुभव या दुहेरी शिदोरीमुळेच मी बऱ्यापैकी लेखक झालो असे मला वाटते. वाचनाच्या वेडामुळे मी एकदा आमच्या नगरवाचन मंदिरात तास दोन तास अडकूनही पडलो होतो. आणि माणसांना अगदी जवळून पाहण्याच्या आणि ऐकण्याच्या नादामुळे काही वेळेला अपमानित होण्याचाही प्रसंग आला आहे. पण हा नाद कमी झाला नाही. खरे म्हणजे हा सगळा त्या शाळकरी वयातला उनाडपणाच होता. पण त्यामुळेच मी लेखक झालो, असे आज मला वाटते.

शाळकरी वयात दोन लेखकांचे माझ्यावर विशेष संस्कार झाले. एक आचार्य अत्रे आणि दुसरे चिं. वि. जोशी दोघांच्याही लेखनात शाब्दिक कोट्या क्वचित आढळतात. पण ते त्यांच्या विनोदाचे वैशिष्ट्य नाही. मानवी स्वभावातील विसंगतीच्या अनेक गमतीदार मिश्रणातून निर्माण होणारा स्वभावनिष्ठ विनोद हे आचार्य अत्रे यांच्या विनोदाचे ठळक वैशिष्ट्य आहे. त्यांच्या कथा, नाटके, चित्रपट यांतून अनेक तऱ्हेची तऱ्हेवाईक माणसे आपल्याला भेटतात. त्यांची बरीचशी नाटके ही प्रहसनाच्या स्वरूपातीलच आहेत आणि फार्स किंवा प्रहसन यान अशा तऱ्हेवाईक, विक्षिप्त मंडळींचेच अधिराज्य असते. 'साष्टांग नमस्कार' मधील नमस्कार घालण्याचे वेड असलेले रावबहादूर, ज्योतिषाचे वेड असलेला त्यांचा मुलगा सिद्धेश्वर, 'भ्रमाचा भोपळा'मधील औषधांचा नाद असलेला म्हातारा कचेश्वर, त्यांचा मूर्ख चाकर किशा, भंपक पंडित भुलेश्वर, 'पाणिग्रहण'मधला I is Ghodke म्हणणारा श्रीमंत व्यापारी घोडके, कुठल्याही अडचणीत O.K. म्हणणारे ओक भटजी, थापा मारणारा राधेश्याम महाराज.... अशी असंख्य पात्रे आपल्याला सतत भेटतात आणि त्यांची आपल्याला गंमत वाटत राहते.

चिं. वि. जोशी यांच्या विनोदातही स्वभावनिष्ठ विनोदाचे अनेक हास्यकारक नमुने आहेत. पण चिंतामणराव त्याचबरोबर मूळ अनुभवातली विसंगती आणि हास्यकारकता शोधतात आणि विनोदाची निर्मिती करतात. त्यांचा चिमणराव हा स्वत:मधीलच विसंगती प्रकट करतो आणि स्वत:लाच हास्याचा विषय बनवतो. त्यांचा विनोद जीवनातील वास्तवतेपासून दूर जात नाही स्वत:लाच हास्याचा विषय बनवणे हा अत्यंत श्रेष्ठ सुसंस्कृत विनोदाचा नमुना म्हटला पाहिजे. कधीकधी त्यांनी निवडलेल्या प्रसंगातच हास्यकारकता लपलेली असते. म्हणून स्वभावनिष्ठ विनोद आणि प्रसंगातून सहजपणे

निर्माण होणारा प्रसंगनिष्ठ विनोद यांचेच मला जास्त आकर्षण वाटले आणि माझ्या लेखनात तोच विनोद प्रामुख्याने आला आहे. शब्दनिष्ठ विनोद किंवा कोटी मला आवडते. पण त्या विनोदाकडे माझा फारसा ओढा नाही. माझ्या लेखनात असा विनोद क्वचितच येतो.

* * *

अलीकडे आणखी एक प्रश्न मला फार अस्वस्थ करतो. असे म्हणतात की, विनोदी लेखन कितीही उत्तम असले तरी अभिजात साहित्यात किंवा श्रेष्ठ साहित्यात त्याची गणना कधीच करता येत नाही. निदान काही रसिकांना तरी तसे वाटते. असा अभिप्राय व्यक्त करणाऱ्या मंडळींना विनोदाचे वावडे असते असे नाही. त्यांनाही विनोद आवडतो. विनोदी साहित्याचे तेही चाहते असतात. पण तरीही त्यांना वाटते की, विनोदी साहित्याला काही अंगभूतच मर्यादा आहेत. गंभीर लेखनातून जे जीवनानुभव व्यक्त होतात ते अधिक सच्चे आणि परिपूर्ण असतात. गंभीर लेखन हे अनुभवांच्या मुळाशी जाऊन काही शोध घेते आणि जीवनाचे अस्सल स्वरूप आपल्याला दाखवते म्हणून हे लेखन ज्या उंचीवर जाते ती उंची विनोदी लेखनाला कधीच गाठता येत नाही. त्यामुळे अभिजात साहित्यात विनोदी साहित्य कधीच समाविष्ट करता येणार नाही.

हे कितपत खरे ? मला वाटते, या बाबतीत एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. ती ही की, सगळेच गंभीर लेखन हे श्रेष्ठ साहित्य असतेच असे नाही. त्यातले काही गंभीर लेखनच हे चांगल्या दर्जाचे असते. तसेच काही विनोदी लेखनच चांगल्या दर्जाचे असते. ते जर खरेखुरे विनोदी लेखन असेल तर त्या विनोदी लेखनात चांगले साहित्यगुण असावयासच पाहिजेत.

विनोदी किंवा हास्यनिर्मिती ही एखाद्या विसंगतीतून निर्माण होते ही विसंगतीची जाणीव अगदी नैसर्गिक असते. एखाद्या लहान मुलालासुद्धा ही जाणीव असते. अगदी रांगणाऱ्या मुलाला एखाद्या सतरंजीवर किंवा गालिच्यावर ठेवले आणि त्या सतरंजीला एखादे छिद्र किंवा गालिच्यावर एखादा शाईचा डाग असला तर त्या मुलाचे लक्ष तिकडे प्रथम जाते आणि रांगतरांगत येऊन ते मूल बोटानी ते काय आहे हे खरवडून पाहते. त्याला बोलता येत नाही. पण आपल्या कृतीतून ही गोष्ट येथे विसंगत आहे असे ते दाखवते. म्हणजे ही जाणीव अगदी नैसर्गिक आहे. पण या विसंगतीतून हास्य निर्माण होत नाही. गणिताच्या पायऱ्या मांडताना एखादी पायरी चुकली किंवा विसरली तर पुढची पायरी विसंगत वाटते. पण तरीही येथे हास्य निर्माण होत नाही. कारण केवळ वैचारिक पातळीवरील ही विसंगती आहे. पण मनुष्यस्वभावातून ही विसंगती आपल्याला जाणवते तेव्हा तेथे हसू येते. अगदी एकसारखे दिसणारे दोघे जुळे भाऊ होते. त्यातील एकजण पाण्यात बुडून मेला. नंतर पुढे दुसऱ्या भावाला एक गृहस्थ भेटले. त्यांनी त्या भावाला काय विचारावे ? "अरे, बुडून मेला तो कोण ? तू का तुझा

भाऊ ?'' या प्रश्नातली विसंगती आपल्याला जाणवते आणि आपल्याला हसू कोसळते. मनुष्यस्वभावाची एक गंमत आपल्याला येथे समजते. अज्ञान, मूर्खपणा, बावळटपणा त्यातून व्यक्त होतो. म्हणून हे हास्य निर्माण होते.

एका थापाड्या माणसाला आपल्याजवळच्या वस्तूंचा संग्रह कसा दुर्मिळ आहे हे सांगण्याची फार हौस होती. एकदा त्याने एक लहान आकाराची कवटी लोकांना दाखविली आणि मोठ्या आढ्यतेने सांगितले-

''ही कवटी कुणाची आहे माहीत आहे ? प्राचीन इतिहासातील प्रसिद्ध पुरुष चेगीझखान याची आहे.'' एकानं आश्चर्य व्यक्त करीत प्रश्न केला, ''असं ? पण ही तर लहान मुलाची कवटी दिसते !'' ताबडतोब त्या थापाड्याने उत्तर दिले, ''करेक्ट ! चेगीझखानच्या लहानपणाचीच ही कवटी आहे !'' येथेही विसंगतीतून हास्य निर्माण होते. कारण त्या थापाड्या माणसाचा वेळ मारून नेण्याचा स्वभाव त्यातून व्यक्त होतो. म्हणून आपल्याला हसू कोसळते.

मानवी स्वभावातील विसंगतीतून असे अनेक हास्यकारक प्रसंग निर्माण होताना दिसतात. त्याचा प्रत्यय आपल्याला नेहमी येतच असतो. आपण नेहमी असे अनुभव घेतच असतो. चांगल्या श्रेष्ठ साहित्यात असे अनेक वेगवेगळ्या प्रकारचे अनुभव व्यक्त होत असतात. प्रत्येक अनुभवाला त्याचा स्वत:चा असा एक घाट असतो. हे त्याचे वेगळेपण अभिजात साहित्यात नेमकेपणाने टिपले जाते. विनोदी साहित्यातही अनुभवांचा असा वेगळेपणा योग्य रितीने व्यक्त होत असेल तर ते विनोदी साहित्यही अभिजात साहित्यात जमा होऊ शकेल, असे जाणत्यांना वाटते.

ज्येष्ठ लेखक आणि समीक्षक प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी यासंबंधी लिहिताना एके ठिकाणी म्हटले आहे- ''विनोदी साहित्यात जर प्रत्येक अनुभवाची ही अपूर्वाई, हे वेगळेपण टिपले जात नसेल किंवा विनोदाच्या निर्मितीमुळे ते टिपण्याच्या मार्गात काही अडचणी येत असतील तर मग ते विनोदी साहित्य अभिजात साहित्य असू शकत नाही असे म्हणावे लागेल. आपण जेव्हा एखादा सामान्य विनोदी फार्स बघतो तेव्हा आपल्याला असे जाणवते की यातली माणसे, त्यांचे स्वभावविशेष, त्यांच्या प्रतिक्रिया यात एक प्रकारचा सारखेपणा,ढोबळपणा आहे. पण मोलियरच्या विनोदी नाटकात इतक्या विविध प्रकारच्या विनोदी व्यक्तिरेखा आहेत आणि मानवी स्वभावातले इतके बारकावे त्याने टिपले आहेत की, विनोदी साहित्यात प्रत्येक व्यक्तीचा आणि प्रसंगाचा वेगळेपणा पुष्कळशा प्रमाणात चित्रित करता येतो, हे मान्य करावे लागेल.''

याचे स्पष्टीकरण करताना ते पुढे म्हणतात- ''मराठीतल्या विनोदी साहित्याकडे पाहिले तर सुदामा, बंडूनाना, पांडुतात्या ही पात्रे ढोबळ वाटतात. त्यांच्या प्रतिक्रिया ठराविक वाटतात पण चिमणराव, गुंड्याभाऊ, चिमणरावची बायको काऊ, तिची मैत्रीण गुलाब दिघे इ. मंडळी मानवी स्वभावातल्या विविधतेचे दर्शन घडवतात. त्यांच्या

स्वभावातले त्याप्रकारचे बारकावे चिं. वि. जोशी यांनी जसे दाखवले आहेत, तसे अनेक गंभीर लेखकांनाही दाखवता आलेले नाहीत. तेव्हा अभिजात साहित्यातील प्रमुख विशेष- मनुष्यस्वभावातली विविधता- हा तरी विनोद साहित्यात असू शकतो, हे मान्य करावयास हवे.''

मात्र, अत्यंत स्फोटक, प्रचंड हास्य निर्माण करणाऱ्या विनोदी लेखनात अभिजात साहित्याचे गुणविशेष फारच कमी असतात हे त्यांचे मत चिंत्य आहे. विनोदी लेखकांनी ते गंभीरपणे लक्षात घेतले पाहिजे, यात काही शंका नाही.

मित्रहो, विनोदी लेखन हे अभिजात साहित्यात समाविष्ट होईल अगर न होईल. मी त्याची चर्चा आता करीत नाही. पण 'विनोद' ही फार मोठी शक्ती आहे हे तरी सर्वांना मान्य करावेच लागेल ना ? तेवढे आश्वासन मला पुरेसे आहे. या मानवी जीवनात दुःखच दुःख आहे. 'सुख पाहता जवापाडे दुःख पर्वताएवढे' असे तुकारामांनी म्हटलेच आहे. 'सर्व क्षणिकं, सर्व दुःखं' असे गौतम बुद्धांनीही सांगितले आहे. किंबहुना जीवनाचे मूळ रूपच दुःखमय आहे असेच तत्त्वज्ञांना वाटते. मनुष्य हा सुखासाठी जन्माला येतच नाही, अशीच त्यांची भूमिका आहे. हे दुःख नाहीसे करण्याची शक्ती कुणामध्येही नाही. ते निमूटपणे भोगणे एवढेच आपल्या हातात असते. पण हे दुःख नाहीसे करता आले नाही तरी ते विसरायला लावण्याची शक्ती विनोदात आणि हास्यात आहे. विनोद आणि त्याने निर्माण केलेले हास्य हा या जीवनातील संजीवनी मंत्रच आहे. विनोदाने निर्माण केलेले हास्य तुमचे दुःख विसरायला लावते, ते सहन करण्याची शक्ती तुम्हांला देते, इतकेच नव्हे तर, हे जीवन आनंदाने कसे जगावे याचा मंत्रही हे हास्यच देते. या मानवी जीवनात लागेल तेवढ्या उणिवा आहेत. अडाणीपणा आहे, मूर्खपणा आहे. स्वार्थी आणि मतलबी वृत्ती आहे. सर्वत्र विसंगतीच विसंगती आहे. मूर्ख, स्वार्थी, लंपट, गर्विष्ठ अशी माणसे भेटली तर काय त्यांच्यापुढे आपले डोके फोडून घ्यायचे ! हसून त्यांच्याकडे दुर्लक्ष करायचे हाच शहाणपणाचा मार्ग. विनोद अशा रीतीने माणसाला अधिक समजस, क्षमाशील व्हायला शिकवतो. हास्य हे माणसाच्या सुसंस्कृतपणाचे लक्षण आहे. म्हणून विनोद आणि विनोदी साहित्य यांचे महत्त्व सुसंस्कृत समाजात नेहमीच राहील असे मला वाटते.

कविवर्य बोरकरांची 'दूधसागरास' नावाची एक सुदर कविता आहे. त्यात ते म्हणतात—

*शिरि पडोत दैवदंड*
*आपण हांसू उदंड*
*ग्रीष्म असो जगत हसो ओसरोहि आसरा*
*या जगात हास्य उणे*

*हास्यविण दीन जिणे*
*हास्यशून्य जीवनास यौवनी जडे जरा*

* * *

साहित्याची, लेखनाची आवड असणारी माणसे पहिल्यांदा कवितेच्या वाटेला जातात असे म्हणतात. बऱ्याच लेखकांनी आपल्या प्रारंभीच्या काळात कविताच केल्या होत्या असे सांगतात. त्यांच्यापैकी फार थोडे पुढे कवी म्हणून प्रसिद्धीला येतात. काही थोडे गद्य लेखनाकडे वळतात तर बाकीचे सर्व जीवनातील धकाधकीत पुढे कविता करण्याचे विसरूनही जातात. होते ते सर्व बऱ्यासाठीच होते हे खरे. पण तरी कविता करणे हा प्रारंभ असतो. मग या प्रारंभीच्या काळात मी कवितेकडे कसा वळलो नाही ? आपण कवी व्हावे असे मला का वाटले नाही ? कविता मला आवडत नव्हती अशी काही वस्तुस्थिती नव्हती. काव्य मला तेव्हाही आवडत होते आणि आजही ते आवडते. मग मी कवी का नाही झालो ?

खरे म्हणजे कविता मला आवडते. एखादा सुंदर जीवनानुभव शब्दांच्या मितव्यय साधून, केवळ आपल्या कल्पनाशक्तीच्या सामर्थ्यावर, एखाद्या छान लयीत प्रत्ययकारी पद्धतीने व्यक्त करणे ही फार अवघड गोष्ट आहे.

कविता करणे ही फार सोपी गोष्ट आहे, असे तरुण इच्छुक लेखकांना वाटते आणि फार मंडळी कविता करू लागतात. त्यापैकी फारच थोड्या कवितांना-खरे म्हणजे नगण्य कवितांनाच— 'कविता' हे नाव देता येते. कविता करण्यापूर्वी काही पूर्वसिद्धता असावी लागते, अभ्यास करावा लागतो, इतर कवींच्या कविता वाचाव्या लागतात, आपल्या काव्यपरंपरेचाही अभ्यास करावा लागतो, याची जाणीव अनेक तरुण कवीना असल्याचे दिसत नाही.

पूर्वी एक तरी बरे होते कविता छंदोबद्ध असावी असा आग्रह असे. अक्षरगणवृत्ते, मात्रावृत्ते इत्यादीचा परिचय कवि होऊ इच्छिणाऱ्याला करून घ्यावा लागत असे. मात्रा कमीजास्त झालेल्या चालणार नाहीत, 'गतिभंग' नावाचा एक प्रकार असतो, त्याची भीती बाळगावी लागते, चरणातील अक्षरांची संख्या ठराविकच असली पाहिजे, त्यांचा लघुगुरू क्रमही ठरलेला असतो—असले अडसर कवींच्या मार्गात उभे असल्यामुळे कवीच्या संख्येवर मर्यादा राहात असे. आज ही बंधनेही उरलेली नाहीत. त्यामुळे कुणीही उठावे आणि कविता करावी अशी स्थिती निर्माण झाली. वाङ्मयीन क्षेत्रातील या उदारीकरणाच्या धोरणामुळे कवितेच्या क्षेत्रात हाहाकार माजला आहे. कवी हा टिंगलीचा विषय झाला आहे.

गणमात्रांच्या बंधनातून आपण कवितेला सोडवले हे एकूण ठीकच झाले. काही म्हटले तरी ती बंधने कृत्रिमच होती. पण ही बंधने काढून टाकताना दुसऱ्या काही अटी कवी होण्यासाठी लागतात हे कुणी सांगत नाही आणि परिणामी निकृष्ट कवितेची फार

मोठ्या प्रमाणात निपज होते.

मात्र, मला एक वेगळा विचार या ठिकाणी मुद्दाम मांडावासा वाटतो. कविता नेहमी छंदोविरहितच असायला पाहिजे असा आग्रह का ? छंदमुक्त कवितेचे मी स्वागत करतो. तीही मला आवडते. पण ती नेहमीच छंदमुक्त असायला पाहिजे असे मला वाटत नाही. छंद:शास्त्राचा फार मोठा वारसा परंपरेने आपल्याकडे आलेला आहे. त्याच्याकडे जागरूक दृष्टीने पाहून, त्याचा यथोचित उपयोग करण्याने आपल्या काव्यवैभवात चांगली भरच पडेल असे मला वाटते.

या छंदात कितीतरी विविधता आहे. 'विद्युन्माला' सारखे अगदी छोटे वृत्त आहे. 'कशासाठी पोटासाठी ! घंटाळ्याच्या घाटासाठी' हे त्याचे साधे उदाहरण. तर शार्दूविक्रीडीत, मंदारमाला यासारखी दीर्घ वृत्ते आहेत.

अक्षरगणवृत्तात ऱ्हस्वदीर्घाच्या (म्हणजे लघुगुरूंच्या) विशिष्ट मांडणीमुळे काही गमतीदार लयबद्धता येते. काही वृत्तांना जी नावे दिली आहेत त्यावरूनही त्यांच्या विशिष्ट लयीचा प्रत्यय येतो. उदा. 'भुजंगप्रयात' या वृत्ताची गती सापासारखी वर-खाली, वर-खाली अशी असते. 'अश्वघाटी' किंवा 'मंदारमाला' नावाच्या वृत्तात अश्वाच्या चालीची सूचना आहे. 'शार्दूलविक्रीडीत' वृत्तात शार्दूलाची म्हणजे सिंहाची गती सूचित आहे.

यमक-अनुप्रास इत्यादी शब्दालंकारांनाही आपण सध्या पारखे झालो आहोत. पण त्यांमध्येही अर्थपरिपोषाची शक्ती असते. अंत्ययमक, अंतर्यमक यामुळे लयीचे आघात जाणवतात. हे खरे नाही काय ?

लयीचे असे वेगवेगळे प्रकार आपल्याला छंदामधून मिळतात. त्यांचा आणि कवीच्या कवितेत जी भाववृत्ती प्रकट होते तिचा काहीच संबंध नसतो, असे छातीठोकपणे म्हणता येईल काय ? मला वाटते, असा संबंध असावा. त्याचा शोध घेतला पाहिजे. त्यासाठी काही प्रयोग करावयास पाहिजेत. म्हणून उमेदवार कवींनी हे जे आपले पूर्वसंचित आहे, ते अगदीच नाकारू नये असे मला वाटते.

शुद्ध काव्याला कवीच्या भावस्थितीखेरीज कोणतेच बंधन नसावे हे मान्य केले तरी एक प्रश्न उरतो. शुद्ध काव्याखेरीज इतर काव्यांना वाङ्मयात स्थानच नाही का ? संगीतात शब्दविहीन ख्याली संगीत हे 'शुद्ध संगीत' समजले जाते. पण शब्दयुक्त किंवा शब्दप्रधान असे संगीताचे प्रकार असतातच ना ? लययुक्त गद्य, भावगीत, नाट्यगीत, ठुमरी, कजरी, होरी, तराणा असे कमीजास्त शब्दयुक्त संगीताचे प्रकार असतात आणि प्रत्येकाला त्याचे त्याचे स्थान असते. समाजाला प्रत्येक प्रकाराची गरज असते असेही म्हणता येईल. तसेच कवितेच्या बाबतीत नाही का म्हणता येणार ? अगदी विशुद्ध काव्याखेरीज इतर प्रकारच्या कवितांचीही समाजाला गरज असते. फार मोठा काव्यगुण एखाद्या कवितेत नसला आणि रचनेची सफाई असली तरी ती मोहक होत नाही का ?.... आणि ज्यांना आपण मोठे कवी म्हणतो ते बोरकर, ग. दि. माडगूळकर,

कुसुमाग्रज यांनीही छंदोबद्ध रचना केली आहे हेही नवीन कवीनी विसरता कामा नये.

* * *

आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळून पन्नास वर्षे झाली. स्वतंत्र महाराष्ट्र राज्याची निर्मिती होऊनही तीन तपे लोटली. या तीन तपांत महाराष्ट्राच्या राजकीय आणि सामाजिक जीवनात खूप मोठे बदल घडून आले. प्रामुख्याने शिक्षणाचे क्षेत्र खूपच विस्तारले. त्यामुळे ग्रामीण भागातून नवीन सुशिक्षितांचा एक नवा वर्ग निर्माण झाला. वृत्तपत्रे, ग्रंथालये यांची संख्या वाढली. परिणामी वाचकवर्गही सर्वत्र वाढला. विविध प्रकारची संमेलने, चर्चा, परिसंवाद, मुलाखती या कार्यक्रमांनाही बहर आला. काव्यवाचन कथाकथन यांसारखे वाङ्‌मयीन पण मनोरंजक कार्यक्रम गावोगाव होऊ लागले. आजही ते होत आहेतच. यामुळे ग्रामीण भागातूनही नवा वाचकवर्ग आणि नवा लेखकवर्ग निर्माण झाला. याचा परिणाम म्हणून, पूर्वी पांढरपेशा मंडळीतच रमणाऱ्या साहित्यविश्वात 'ग्रामीण साहित्य' आणि 'दलित साहित्य' असे नव्या प्रकारचे साहित्य निर्माण होऊ लागले. ग्रामीण भागातून आणि दलित समाजातून नव्या जाणिवा असलेले अनेक नवे लेखक आणि कवी पुढे आले. 'ग्रामीण साहित्य', 'दलित साहित्य' याच नावाने त्यांचे लेखन ओळखले जाते. साहित्यातील अनुभवांच्या कक्षा त्यामुळे विस्तारल्या. म्हणून या साहित्याचे रसिकांनी स्वागत केले आणि ते योग्यच होते.

साहित्यात अशा प्रकारचे भेद मानावेत काय. असा एक प्रश्न नेहमी विचारला जातो. वस्तुत: साहित्य हे फक्त साहित्यच असते. ते चांगले किंवा वाईट असू शकते. बाकीचे भेदभाव किंवा वर्गीकरण करण्याचे काही कारण नाही. पण आपले सामाजिक जीवनच आज अशा प्रकारचे बनले आहे— आणि राजकीय उलाढालीनी त्यात अशी भर घातली आहे— की असे वर्गीकरण किंवा भेद सध्या आपण मान्य करीत आहोत. पण हा भेदभाव येथेच संपत नाही त्यातून स्वतंत्र वाङ्‌मयीन चळवळी उत्पन्न झाल्या आहेत आणि त्या त्या चळवळींनी आपले एक तत्त्वज्ञान निर्माण केले आहे. हे तत्वज्ञान साहित्याचा निकोप अभिवृद्धीस कितपत उपकारक आहे, हा खरा महत्त्वाचा प्रश्न आहे.

ग्रामीण साहित्याची चळवळ चालवणारे धुरीण असे मानतात की, महाराष्ट्रातील बहुसंख्य जनता ही ग्रामीण भागातच राहते. त्यांची स्वतंत्र बोली आहे. त्यांच्या जीवनाचे चित्रण करणे आणि तेही त्यांच्या बोलीतून हेच खरे अस्सल मराठी साहित्य होय. म्हणून ग्रामीण साहित्य लिहिणारे ग्रामीण लेखक हेच महत्त्वाचे मानले पाहिजेत. साहित्यात अशा प्रकारचा भेदभाव करून त्याला वेगळे निकष लावणे हे कितपत इष्ट, याचा विचार ही मंडळी करताना दिसत नाहीत. श्री. म. माटे, व्यंकटेश माडगूळकर किंवा शंकर पाटील यांचे लेखन ग्रामीण जीवनाचे चित्रण करते म्हणून ते श्रेष्ठ ठरत नाही. तर साहित्याच्या निकषावर ते गुणसंपन्न आहे, म्हणून त्यांचे लेखन महत्त्वपूर्ण ठरते, हे या चळवळीचे पुरस्कर्ते विसरतात असे वाटते. आणि तसा विचारच केला तर

ग्रामीण आणि शहरी हा भेद पूर्वी जेवढा ठळक होता तेवढा आज राहिला आहे काय ? ग्रामीण आणि शहरी यातील सीमारेषाही आता पूर्वीइतकी स्पष्ट राहिलेली नाही. ही दोन्ही जीवने एकमेकांत झपाट्याने मिसळली जात आहेत. म्हणून अशा चळवळीचे काही प्रयोजन नाही असे मला वाटते.

दलित साहित्याच्या बाबतीतही हेच म्हणता येईल. शतकानुशतके मूक राहिलेला हा समाज आता बोलू लागला आहे. आपल्या व्यथा, आपली दु:खे, समस्या आक्रोशाच्या स्वरूपात तो मांडीत आहे. कथा, कविता, कादंबरी, आत्मचरित्र यांतून त्या भावना तीव्रतेने व्यक्त होत आहेत. साहित्यातील अनुभवांचा परीघ त्यामुळे विस्तारत आहे, म्हणून हे लेखन स्वागतार्हच आहे. सुशिक्षित समाजाने या लेखनाचे आनंदाने स्वागत केलेच आहे. पण दलित साहित्य म्हणजे केवळ विद्रोह, केवळ प्रस्थापिताविरुद्ध बंडखोरी आणि चीड, अशी समजूत करून घेतल्यामुळे त्यांचे लेखन हे एकसुरी झाले आहे. नवनिर्मिती हा जर साहित्याचा हेतू मानला तर या प्रकारच्या साहित्यातून नवनिर्मिती फारशी होताना दिसत नाही. हे लेखक एक प्रकारच्या आवर्तात सापडले आहेत असे वाटते. त्यांचे लेखन वाचताना 'ती ती पदे नित्य फिरोनि येती' असा अनुभव वाचकांना येतो.

या साहित्याबाबत, जाणत्यांचा आणखी एक आक्षेप आहे. या समाजावरील अन्याय दूर व्हावा म्हणून शासन, विचारवंत, समाजधुरीण हे अनेक प्रकारांनी समाजाचे प्रबोधन करीत आहेत. त्यांचा काही परिणामही होत आहे हे नाकारता येणार नाही. पण हे साहित्य या सगळ्या उपक्रमांची दखल घेताना दिसत नाही. समाजात हळूहळू पण निश्चितपणे होणारा हा बदल ते नाकारीत आहेत की काय, असे वाटते. लेखकाने सर्व अनुभवांकडे तटस्थपणे किंवा अलिप्तपणे पाहिले पाहिजे आणि न्यायबुद्धीने त्यांचे चित्रण केले पाहिजे. साहित्यातले हे सनातन सत्य कुणीही विसरता कामा नये. या समाजातील लेखक हळूहळू या आवर्तातून बाहेर पडत आहेत ही आनंदाची गोष्ट आहे.

आणखी एक खटकणारी गोष्ट सहज आठवली म्हणून सांगतो. आपल्या समाजातील सुखदु:खे ही आपल्या समाजातील लेखकांनीच सांगितली किंवा लिहिली पाहिजेत— इतरांना तो अधिकार नाही अशीही एक चुकीची कल्पना काही मंडळींनी करून घेतली आहे असे वाटते. लेखक म्हणून एखाद्याची शक्ती किती हा खरा यातील महत्त्वाचा भाग ! तसा सामर्थ्यवान लेखक जर त्या समाजात निर्माण झाला तर त्याचे लेखन अधिक प्रत्ययकारी आणि अनुभवसमृद्ध होईल, यात काही शंकाच नाही. पण लेखकावरच काय, कुठल्याही कलावंतावर अशा प्रकारची बंधने कधीच घालता येणार नाहीत. कुणी ती मानणारही नाही.

या बाबतीत व्यंकटेश माडगूळकरांचा एक अनुभव सांगण्यासारखा आहे. एका विद्यापीठातील पदव्युत्तर परीक्षेचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्यांशी त्यांच्या एकदा गप्पागोष्टी

झाल्या. त्यावेळी एका विद्यार्थ्याने त्यांना प्रश्न केला-

"आमच्या समाजातील माणसांवर तुम्ही काय म्हणून लिहिता ? आमच्या समाजावर आम्हीच लिहू-"

माडगूळकर शांतपणे म्हणाले,

"लेखकावर अशी बंधने कधीच घालता येत नाहीत. मी अरण्यातल्या माकडांच्या जीवनावर 'सत्तांतर' नावाची कादंबरी लिहिली आहे. उद्या ते प्राणी जर मला म्हणाले की, तुम्हांला आमच्या जीवनावर लिहिण्याचा काय अधिकार ? आमच्या जीवनावर आम्हीच लिहू. मग त्याला मी काय उत्तर द्यायचे ?"

* * *

मित्रहो, बोलण्यासारखं पुष्कळ आहे. पण साहित्यातील सर्वच विषयांवर बोलण्याइतका माझा अभ्यास नाही. मी एक लेखक आहे. मी वाङ्मयाचा अभ्यासक नाही किंवा साक्षेपाने लिहिणारा समीक्षकही नाही. समग्र मराठी साहित्याचा आढावा घ्यावा एवढा माझा अभ्यास खरोखरीच नाही. माझे वाचन आणि माझी विचार करण्याची शक्तीही मर्यादित आहे. त्यामुळे शेवटच्या एकाच मुद्याकडे आपले लक्ष वेधून मी आता हे भाषण संपवणार आहे.

हे आपले अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन प्रतिवर्षी भरते. आपली मातृभाषा आणि तिच्यातील साहित्य यांच्या प्रेमामुळे आपण एवढ्या मोठ्या संख्येने येथे जमतो. साहित्यातील ठळक, बऱ्यावाईट घटना, नवे साहित्य, साहित्यातील नव्याने समोर आलेले प्रश्न यांवर आपण एकमेकांशी हितगुज करतो. चर्चा करतो. साहित्याचे व्यासपीठ म्हणजे काही न्यायालय नव्हे. साहित्यातील प्रश्न, समस्या यांचा येथे निर्णय करायचा नसतो. साहित्यात अंतिम असे काही नसते. निरनिराळ्या प्रश्नांतील सत्य आणि तथ्य हे समजावून घेऊन, त्यातील सत्याच्या जवळ जाण्याचा प्रयत्न आपण फक्त करीत असतो. व्याख्याने, चर्चा परिसंवाद यांचे हेच प्रयोजन असते. काही वेळा हा हेतू साध्य होतो, काही वेळा तो पुरेसा सफल होत नाही. तरीपण या गोष्टी घडतच राहिल्या पाहिजेत. साहित्यिकापासून तो सर्वसामान्य रसिकांपर्यंत सर्वांचेच त्यामुळे थोडेफार तरी प्रबोधन होते. आणि सर्वांचीच मने समृद्ध होतात. शेवटी साहित्यसंमेलन हा मातृभाषेचा महोत्सव आहे, पण समाजातील ती एक महत्त्वाची सांस्कृतिक घटनाही आहे. सांस्कृतिक चळवळीतला तो एक महत्त्वाचा टप्पा आहे. म्हणून अशा संमेलनाची परंपरा अखंडपणे चालूच राहिली पाहिजे. शेवटी आपल्या मराठी भाषेचे त्यातच हित आणि वैभव आहे.

आपल्या मराठी भाषेचे पुढचे भवितव्य काय, अशी चिंता आज अनेकांना वाटते. वैज्ञानिक प्रगती, औद्योगीकरण, वाढती कारखानदारी यांसारख्या प्रचंड घडामोडींमुळे इंग्रजी भाषेचे महत्त्व दिवसेंदिवस वाढतच आहे. ते कमी होण्याची चिन्हे नाहीत.

पारतंत्र्याच्या काळात आम्ही देशी भाषा आणि राष्ट्रीय शिक्षण यांचा जयघोष करीत होतो. स्वातंत्र्य मिळाले आणि भाषावार प्रांतरचनाही झाली. पण या पन्नास वर्षात आमच्या भाषांची पुच्छप्रगतीच झाली आहे. गावोगाव इंग्रजी माध्यमाच्या शाळा निघाल्या आहेत आणि आमची मराठी मुले अगदी प्राथमिक शिक्षणही इंग्रजीतून घेत आहेत. त्यांच्या मातृभाषेचीच आपण हेळसांड करीत आहोत, याचे भान त्यांच्या पालकांना राहिलेले नाही. प्रथम मातृभाषा आणि नंतर इतर भाषा, हे शिक्षणशास्त्रातील मूलभूत तत्त्वच आम्ही वाऱ्यावर फेकून दिले आहे. आमची मुले मातृभाषेऐवजी परकीय भाषा प्रथम शिकत आहेत. मातृभाषेचा अभ्यास हा नंतर! स्वतंत्र राष्ट्रातील समाज हा स्वाभिमानी असला पाहिजे ना ? आपला धर्म, आपली संस्कृती, आपल्या चालीरीती, आपल्या परंपरा, इतिहास आणि हे सर्व जिच्यातून व्यक्त होते, ती आपली भाषा याबद्दल आपल्याला योग्य तो अभिमान आणि प्रेम असले पाहिजे. पण आज मराठी भाषा राहते की नष्ट होते असा प्रश्न विचारवंतांना पडला आहे. मराठी भाषा नाहीशीच होईल ही भीती अतिशयोक्तीची आहे असे मानले तरी ती फक्त बोलीभाषा म्हणूनच राहील, समर्थ अशी ज्ञानभाषा असे स्वरूप तिला कधीच प्राप्त होणार नाही, ही भीती मात्र खरी ठरेल की काय, असे वातावरण आज निर्माण झाले आहे.

मग याच्यावर उपाय काय ?

इंग्रजी ही आज अत्यंत समर्थ आणि विश्वभाषा झाली आहे. तिच्यावर बहिष्कार घालून मुळीच चालणार नाही. नवीन पिढीला ती भाषा आता शिकावीच लागेल आणि त्यात हानीकारक काही नाही. बहुभाषिक होण्याचाच हा काळ आहे. पण मराठी भाषेला प्रतिष्ठा मिळावी यासाठी उपाय काय ? शासनाचा कारभार पूर्णपणे मराठीतून चालावा, न्यायालयातील सर्व कामकाज मराठीतून व्हावे, मराठी शाळा आणि संस्था यांना शासकीय संरक्षण आणि अनुदान मिळावे, मराठी मातृभाषा असलेल्या आणि मराठी माध्यमातून शिक्षण घेणाऱ्यांना शासकीय सेवेत प्राधान्य द्यावे, कलेच्या क्षेत्रातील मराठी चित्रपट आणि नाटक यांना करसवलती आणि इतर आर्थिक साहाय्य मिळावे, अशा अनेक गोष्टी आज सुचवल्या जात आहेत, हे सर्व योग्यच आहे आणि महाराष्ट्र शासन यातील काही गोष्टी करीतही आहे. पण ही फक्त शासनाने उचलावयाची जबाबदारी आहे असे मानून चालणार नाही.

आज खरी आवश्यकता आहे ती मराठी माणसाची मानसिकता बदलण्याची. आमच्या मातृभाषेबद्दल आम्हालाच खरखुरे प्रेम आणि जिव्हाळा नाही. आमच्या भाषेसंबंधी आम्हांलाच न्यूनगंड आहे. आमच्या मुंबईतला मराठी माणूस हा इतरांशी बाहेर हिंदीत किंवा इंग्रजीत संभाषण करतो. आपण मराठीतून बोललो तर समोरच्या माणसाला ते समजणार नाही असे आम्हांला वाटत असते. ते पुष्कळदा खरे नसते. मुंबई ही महाराष्ट्राची राजधानी आहे. येथे मराठीला प्रतिष्ठा असलीच पाहिजे. येथे राहणाऱ्या

अमराठी माणसालासुद्धा कामचलाऊ मराठी समजलेच पाहिजे. लिहिता आले नाही तरी मोडके तोडके मराठी त्याला उच्चारता आले पाहिजे, असे आम्हांला मुळीच वाटत नाही. कलकत्त्यात राहणाऱ्या परप्रांतीय माणसाला थोडेसे तरी बंगाली शिकावेच लागते. चेन्नईत राहणाऱ्या परप्रांतीयांना थोडीशी तरी तमिळ भाषा शिकावीच लागते. नाहीतर त्याला अनेक अडचणीना तोड द्यावे लागते. पण मुंबईत राहणाऱ्या अमराठी माणसाला मराठीचा एक शब्द न उच्चारता जन्मभर आनंदाने राहता येते. अशी आमची स्थिती आहे. खरे म्हणजे मुंबईतल्या अमराठी माणसाला मराठी भाषा अजिबात समजत नाही अशी वस्तुस्थिती मुळीच नाही. त्याला ती लिहिता येत नसेल किंवा ती सफाईने बोलता येत नसेल. पण कामचलाऊ मराठी त्याला समजते. पण आम्हीच त्याच्याशी मराठीतून बोलण्याचा प्रयत्न करीत नाही. त्याला ती समजेल की नाही अशी आम्हांला भीती वाटते हा न्यूनगंड नव्हे तर दुसरे काय आहे ? (गंमत अशी की, पुष्कळदा दोन अपरिचित माणसे मुंबईत बाहेरच्या व्यवहारात हिंदीत किंवा इंग्रजीत बोलतात आणि थोड्या वेळाने दोघांच्याही लक्षात येते की, आपण दोघेही मराठी माणसेच आहोत !) आपला जास्ती जास्त व्यवहार हा मराठीतून व्हावा ही इच्छाशक्तीच आमची नाहीशी झाली आहे. मग मराठीला प्रतिष्ठा मिळणार कशी ?

आमच्या दुकानावरील पाट्या बव्हंशी इंग्रजीत ! आमच्या घराच्या प्रवेशद्वारावर आमची नावे इंग्रजीत- रोमन लिपीत ! आमच्या शहरी माणसाच्या बोलण्यात वाक्यागणिक इंग्रजी शब्दांचा वापर. आम्ही काम करतो तेथील कार्यालयात-मग ते शासकीय कार्यालय असो, शाळा किंवा महाविद्यालय असो, किंवा खाजगी संस्था असो- तेथे उपस्थितीपटावरील आमची स्वाक्षरी- नुसती आद्याक्षरे-पण ती सुद्धा इंग्रजीत ! माझ्या महाविद्यालयातील उपस्थितीपटावर सर्व, प्राध्यापक-मित्रांची आद्याक्षरे इंग्रजी, हे मी डोळ्यांनी पाहिले आहे, आणि सर्वत्र हीच स्थिती आहे. माझ्या एका प्राध्यापक मित्राला एकदा मी हटकले तेव्हा तो हसून म्हणाला, "काय करणार ' पडले वळण इंद्रियासी !..." मी त्याचे आभार मानले. म्हणालो, "बाबा, निदान हं, प्रतिक्रिया तरी तू मराठीतून दिलीस ! तुझं कल्याण असो !" सुशिक्षित घरातले आम्ही एकमेकांना पत्रे लिहिणार तीसुद्धा अनेकदा इंग्रजीत. फार काय, बारसे, मुंज, लग्न, विवाहाचा वाढदिवस यासारख्या आमच्या कार्यक्रमाची निमंत्रणपत्रिकासुद्धा शुद्ध इंग्रजीत ! 'गुडमॉर्निंग', 'गुड नाईट', 'थॅंक यू' हे शिष्टाचाराचे शब्द तर जणू मराठीच झाले आहेत. हे सर्व कशासाठी ? आपल्या मातृभाषेतून सर्व व्यवहार करणे आम्हांला कमीपणाचे, गावंढळपणाचे वाटते काय ? हा न्यूनगंड नव्हे तर काय आहे ? म्हणून मराठी माणसाची मानसिकता बदलण्याची खरी गरज आहे.

आमची मुले, नातवंडे यांना आम्ही कॉन्व्हेन्ट स्कूलमध्ये किंवा इंग्रजी माध्यमाच्या शाळेतच मोठ्या हौसेने घालणार. हा या वयातच कसा इंग्रजी शब्द बोलतो, कसा 'वन,

टू, थ्री' म्हणतो, त्याला 'ए बी सी डी' कशी आत्ताच पाठ आहे, हा 'संडे' म्हणतो, 'बर्थ डे' म्हणतो, 'अंकल आणि ऑंटी' म्हणतो. आईला 'मम्मी' म्हणतो याचे आम्हांला केवढे कौतुक !.... माझा नातू जेव्हा 'सदुसष्ट' म्हणजे नेमके किती जसे मला विचारतो आणि 'सिक्स्टी सेव्हन' म्हटल्यावर त्याला जेव्हा समजते, तेव्हा मला फार वाईट वाटते. आम्ही मराठी माणसेच आमच्या मातृभाषेचे खरे शत्रू आहोत. दुसऱ्याला दोष कशासाठी द्यायचा ? पन्नास वर्षापूर्वी आम्ही आमची राजकीय गुलामगिरी संपवली. पण तिच्यापेक्षाही वाईट असलेली सांस्कृतिक गुलामगिरी मात्र भूषण म्हणून आम्ही मिरवीत आहोत.

कुठलाही समाज प्रगतिपथाकडे जातो तो त्या समाजात नांदणाऱ्या जिद्द, स्वाभिमान, सत्त्व या गुणांमुळे. जो समाज आपले सत्त्व जतन करतो त्यालाच काही भवितव्य असते. पण हे आमचे सत्त्वच आज नाहीसे झाले आहे. आमच्या समाजाला स्वत:चा कसलाच आकार नाही. चिखलाच्या गोळ्याला कसलाच स्वत:चा आकार नसतो. तो नुसताच लिबलिबीत गोळा असतो. त्याला एका बाजूने लाथ मारली तर तो दुसऱ्या बाजूला जातो. तिकडून लाथ घातली तर आणखी कुठेतरी जातो. कारण त्याला कसलाच स्वत: आकार धारण करण्याची इच्छा नसते. पण हाच जर गोळा म्हणेल, मी नुसता चिखलाचा गोळा राहणार नाही, मी एक आकार धारण करीन, मी एक मूर्ती होईन. तर त्याचे भवितव्य बदलते. या गोळ्याची एक सुबक मूर्ती होते आणि त्या गोळ्याला लाथ मारणारे लोकच त्या मूर्तीच्या पाया पडतात. तिच्यापुढे लोटांगण घालतात. तिला उच्चासनावर बसवतात.

आम्ही मराठी माणसे या साध्या दृष्टांतावरून काहीच शिकणार नाही का ?

मित्रहो, माझे भाषण संपले. आपण खूप सहनशीलता दाखवून ते ऐकून घेतलं याबद्दल मन:पूर्वक धन्यवाद.

# मुंबई : १९९९

# वसंत बापट

साहित्यप्रेमी भगिनीनो आणि बंधूंनो, अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या ७२ व्या अधिवेशनासाठी आपण सारे जमलो आहोत. या अधिवेशनाच्या अध्यक्षपदासाठी नियुक्त केलेल्या मतदारांनी ही जबाबदारी माझ्याकडे सुपूर्द करण्याचा निर्णय घेतला, माझा आणि माझ्यापेक्षाही मराठी कवितेचा बहुमान केला, याबद्दल आरंभीच मी मतदारांचे आभार मानतो. हे मतदार वस्तुत: साहित्य महामंडळाच्या विविध घटक संस्थांचे प्रतिनिधी होते. साहित्य महामंडळाच्या सर्व घटक संस्थांनी बहुमताने माझ्या बाजूने आपला कौल दिला म्हणून हा सन्मान मला प्राप्त झाला आपणा सर्वांच्या विश्वासाला पात्र ठरण्याचा प्रयत्न मी मनापासून करीन, एवढेच आश्वासन मी आपल्याला देऊ इच्छितो.

आरंभीच मला, जन्मभर माझ्या मनात दृढ झालेल्या निष्ठांचा उल्लेख केला पाहिजे. एस. एम. जोशी आणि महाराष्ट्राची माऊली म्हणजे साने गुरुजी, यांनी माझ्या पिढीला जीवननिष्ठा दिल्या. ज्ञानेश्वरीमध्ये अर्जुन श्रीकृष्णाला सांगतो - 'कृष्णा, माझा कसला आला आहे पराक्रम ? हा पार्थु द्रोणाचा केला' - म्हणजे द्रोणाने मला घडवले तशी, जगायचं कशासाठी ही शिकवण मला आणि माझ्या पिढीला मिळाली ती एस एम. जोशी आणि साने गुरुजी यांच्यासारख्या साधुचरित समाजनेत्यांकडून. सामाजिक न्यायाच्या कैवारासाठी आणि अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी शक्ती आणि बुद्धी पणाला लावा, हे त्यांनी आम्हांला शिकवलं. साने गुरुजींची यंदा जन्मशताब्दी साजरी होते आहे. 'अरे पुन्हा आयुष्याच्या पेटवा मशाली', असं त्यांना कुणी सांगण्याची गरज नव्हती. त्यांचं जीवन म्हणजे रात्रंदीस चाललेला युद्धाचा प्रसंग होता. त्यांच्या धगधगत्या मशालीसारख्या जीवनावर आम्ही आमच्या पणत्या लावून घेतलेल्या आहेत. १९४२ च्या अखेरच्या बंडात 'करेंगे या मरेंगे' असा निर्धार करून जनतेला निर्भयतेची दीक्षा दिली गांधीजींनी. म्हणून, प्राण जाण्याचा धोकाही लहान माणसांनी पत्करला. त्यामुळे तर मी त्या अखेरच्या बंड्यात सामील व्हायला कचरलो नाही. राज्य पुनर्रचना करताना मराठी भाषकांवर अन्याय होऊ नये या तिरीमिरीनं संयुक्त महाराष्ट्रासाठी केवढं तरी आंदोलन उभं राहिलं त्या वेळीही आम्ही न मोरारजीभाईंची भीती बाळगली, न

जवाहरलाल नेहरूंसारख्या महनीय व्यक्तित्वाला शरण गेलो. मी आंदोलनाचा प्रचार केला. पोवाडे गात मी आणि माझे सहकारी गावोगाव फिरलो. चिनी फौजांनी भारतावर आक्रमण केलं तेव्हा 'उत्तुंग आमुची उत्तर सीमा इंच इंच लढवू', या निर्धाराचा पुकार मी आणि माझ्या सहकाऱ्यांनी सर्वत्र केला. त्याची कोणी टिंगलटवाळी केली म्हणून अंतर्यामीचा आवाज आम्ही दाबून टाकला नाही. इंदिरा गांधींनी पुकारलेल्या आणीबाणीच्या काळात माझी पन्नाशी उलटलेली होती, तरीही आणीबाणीच्या विरोधात जे साहित्यिक उभे राहिले त्यांच्यामधे मीही निश्चितपणे होतो. कवीने आपली लेखणी हुकूमशाहीकडे गहाण टाकता कामा नये हीच माझी भूमिका होती. 'आमंत्रण' या शीर्षकाच्या कवितेत मी लिहिलं होतं-

*'सत्यभार पेलत असता ज्यांचा देह झुकला नाही*
*त्रैलोक्याच्या राज्यासाठी ज्यांनी आत्मा विकला नाही*
*मूर्तिमंत मृत्यूचीही आमने सामने भेट होता*
*ज्यांच्या थडथड नाडीमधला ठोका मुळीच चुकला नाही*
*ज्यांच्या अस्थी वज्रबीजे, नसांत उकळणारे रक्त*
*शारदेचे आमंत्रण... आज त्यांनाच आहे फक्त'*

या काळामध्ये 'धी न्यू ग्रेट इंडियन सर्कस', 'माझे विद्यापीठ', 'बुद्धिवंत', 'कशासाठी तारुण्याचा होम आम्ही केला होता ?' अशा अनेक कवितांतून मी आणीबाणीची छीथू केली होती, खणखणीत निषेधही केला होता आणि प्रतिज्ञेवर सांगितलं होतं- 'नाचणार नाही मी सबळांच्या तालावर... शेवटला उंच सूर मुक्तीला वाहिन मी । गीत नवे गाइन मी ।।'

मी आपणास ग्वाही देऊ इच्छितो की मी सदैव विचार-स्वातंत्र्य आणि उच्चार-स्वातंत्र्य याचाच पुरस्कर्ता राहीन आणि सर्व मराठी साहित्यसेवकांनी आपलं आत्माविष्काराचं स्वातंत्र्य अबाधित राखलं पाहिजे, असंच माझं मत आहे. लोकशाही शासनपद्धती सर्वांत आदर्श शासनपद्धती नसेलही पण मानव-समाजातली, कमीत कमी जबरदस्ती करणारी, आणि जास्तीत जास्त न्याय्य पद्धत लोकशाही हीच आहे. आविष्कार स्वातंत्र्याचा प्रश्न लोकशाही मानणाऱ्या समाजात अतिशय महत्त्वाचा ठरतो. आविष्कार आणि व्यक्तिस्वातंत्र्य यांना देखील मर्यादा असल्या पाहिजेत हे मान्य केलं तरी त्या मर्यादा आपणच सामंजस्य आणि सुसंवाद यांच्या बळावर ठरवायला हव्यात. परंतु आज धर्म, सर्वकल्याण आणि सामाजिक हित यांचे आपणच मक्तेदार आहोत असं काही लोक मानतात. ते आपल्याच शहाणपणावर संतुष्ट असतात. आपल्या मतापेक्षा वेगळं मत त्यांना सहन होत नाही आणि ते जुलूम-जबरदस्तीच्या साहाय्यानं, आपल्यापेक्षा भिन्न मत असलं तर त्याला चिरडू पाहातात. आपला देश खंडप्राय आहे आणि त्यातले बरेच भाग मागासलेले आहेत. अशा स्थिती अनिर्बंध स्वातंत्र्याची कल्पना स्वीकारता

येत नसेलही, पण स्वातंत्र्याच्या संकल्पनेला अधिकाधिक मान्यता कशी मिळेल याचा आपण विचार करायला हवा. उदाहरणासाठी सेन्सॉर बोर्डच घ्या. सद्य:स्थितीत पूर्व परीक्षण अपरिहार्य असेलही पण ते कमीत कमी जाचक कसं होईल याचा विचार खूपच महत्त्वाचा ठरतो. गतानुगतिकेच्या आंधळ्या बळावर सेन्सॉर बोर्डाची रचना कायम मानता येणार नाही. त्याच्यावरील प्रतिनिधित्वाचा सतत नव्यानं विचार करावा लागेल. विशिष्ट कलाकृतीवर बंधन घालण्याचा निर्णय सेन्सॉर बोर्डानं घेतला तर तो आपण मान्य करायला हवा आणि समजा, बोर्डाचा निर्णय अस्वीकार्य आहे असं वाटलं तरी तो फिरवण्यासाठी एखाद्या शक्तिशाली संस्थेनं किंवा व्यक्तीनं धाकदपटशाचा मार्ग स्वीकारणं हे सर्वथा गैर आहे. नॉर्वे, स्वीडन, डेन्मार्क इत्यादी देशांत नग्नतेचं आणि लैंगिक विकृतीचं दर्शन खुशाल जाहीरपणे केलं जातं. परंपरेने चालत आलेले निर्बंध तिथे काढून टाकण्यात आलेले आहेत. पण सहनशील वृत्तीने हा अतिरेक येथील जनतेने सहन केल्यामुळे त्या देशांतलं लोकमतच आता नग्नतेच्या या दर्शनाला विटलं आहे. अश्लीलतेवर निर्बंध नसल्यामुळे समाजालाच ती नकोशी झाली आणि अश्लील प्रदर्शनं मांडणाऱ्यांना आळा बसला हे लक्षात घेण्यासारखं आहे. आज आपल्या देशताही चित्रपट आणि तेही दूरदर्शन मार्फत घरोघर पोचल्यामुळे हिडीस दृश्यं, व्रीडाकर म्हणजे लाज आणणारी दृश्यं, ओंगळ हावभाव यांचा अतिरेक मुलाबाळांपर्यंत गेलेला आहे. ढिश्याव ढिश्यांवच्या घनचक्कर लढायाही, त्यांची अविश्वसनीयता सहज लक्षात येईल इतक्या बंधनांपलीकडे गेलेल्या आहेत. खरं म्हणजे आता लहान मुलांनाही घनचक्कर लढायांचं लटकेपण चांगलं ठाऊक झालेलं आहे. ओंगळपणा आणि हिंसा यांच्या गळामिठीतून आपले चित्रपट सुटतील आणि त्याचं श्रेय लोकांना आलेल्या त्यांच्या उबगालाच द्यावं लागेल. माझ्या बोलण्याचा अर्थ असा नाही की आपण बीभत्सतेचं खुले आम स्वागत करावं. माझं म्हणणं एवढंच आहे की बीभत्सता, जीवनाची कुरूपता, विकृती यांचं दर्शन नकोसं होऊन कलात्मक सौदर्याचा वेध समाजाच्या मनाला लागावा, यासाठी निर्बंधाचा अनिर्बंध उपयोग करून चालणार नाही. चांगल्या कलाकृतीचं दर्शन समाजाला वारंवार घडलं पाहिजे. म्हणजे हिणकस काय आणि चांगलं काय हे आपोआपच उमजू लागेल. प्रश्न एखाद्या नाटकावर किंवा चित्रपटावर दंडुकेशाहीने बंदी आणून अपप्रवृत्तीचं निर्मूलन करण्याचा नाही. त्यापेक्षा समाजाची एकंदर अभिरुची वाढवण्याची नितांत आवश्यकता आहे आणि हे काम कायद्यापेक्षा शिक्षणानेच साधू शकेल, यावर माझा विश्वास आहे.

आज समाजापुढे सर्वांत मोठा प्रश्न आहे तो सर्व क्षेत्रांतला बाजारूपणा नाहीसा करायचा. या बाजारूपणामुळेच शिक्षणाच्या क्षेत्रात प्रचंड हानी होते आहे. याचा विचार स्वतंत्रपणे योग्य व्यासपीठावरच व्हायला हवा. मी आज फक्त, मातृभाषेच्या अवहेलनेमुळे समाजाचं जे प्रचंड नुकसान होतं आहे, त्याच्याकडे आपलं लक्ष वेधू इच्छितो. एकसंध

महाराष्ट्राची संकल्पना विशद करताना अनेक महनीय व्यक्तींनी मराठी भाषेचं हे राज्य होणार आहे असं चित्र रंगवलं होतं. प्रत्येक संमेलनात मराठीच्या नावाने गळा काढणं बस झालं, असं कुणी म्हणतात. साहित्य संमेलनात साहित्याच्या विकासाचा आढावा घेणं, त्यातील आकृतिबंधांची चिकित्सा करणं, साहित्यातलं सरस-नीरस कोणतं त्याच्यावर बोट ठेवणं हीच कामं प्राधान्यानं व्हायला हवीत असं विचारवंत म्हणतात आणि त्यांचं म्हणणं पटण्यासारखंच आहे पण साहित्याचा संसार ज्या भाषेच्या अस्तित्वावर उभा राहतो ते अस्तित्वच जर धोक्यात येताना दिसू लागलं तर साहित्यिकांनी अस्वस्थ होणं स्वाभाविक नाही का ? मराठी भाषा जर मुमुर्षू झाली, मराठी संस्कृतीला, समाजाला जर घरघर लागली तर मराठी साहित्याच भविष्य वेगळं सांगावं लागणार नाही. आज शिक्षण, शासन आणि लौकिक व्यवहार या प्रत्येक क्षेत्रात मराठीला रक्तक्षय झालेला आहे असं दिसतं आहे. या सर्वांगीण शक्तिपाताचं भान ज्या तीव्रतेनं आपल्या सर्वांना व्हायला हवं तसं ते होताना आज दिसत नाही. शैक्षणिक विश्वात मराठी आक्रसत चालली आहे. लौकिक व्यवहारात मराठीचा पराभव झालेला आहे आणि ज्या शासनानं मराठीचा ध्वज खांद्यावर घ्यावा, तेही मराठीच्या विकासाची चिंता वहात नाही, हे सर्व आपल्या दुर्दैवाचे दशावतार आहेत. ज्या प्रदेशातल्या हजारो बालकांना बिगर मराठी — म्हणजे इंग्रजी माध्यमाच्या शाळांत पालक आपखुशीनं पाठवतात त्याला काय मराठी भाषेचं राज्य म्हणता येईल ? मोठ्या शहरांत तर सोडाच पण छोट्या छोट्या गावांत इंग्लिश माध्यमाच्या शाळा फोफावतात. लहान-मोठे, गरीब-श्रीमंत, सुशिक्षित-अशिक्षित — सगळ्याच पालकांना आपल्या मुलामुलींना इंग्लिश माध्यमातून शिकवण्याची इच्छा अनावर असते. यापुढे इंग्रजीचा आश्रय केल्याशिवाय तरणोपाय नाही, असं म्हणत तळमळणाऱ्या मुलखाला कशाला म्हणायचं मराठीचं राज्य ? आणि समाजात ढोंग मात्र असं बोकाळलं आहे की, आम्ही बालकांच्या सर्वांगीण विकासासाठी शिबिरं भरवतो, संस्कार वर्ग चालवतो पण इथे आपल्या बाळाला झोपवण्यासाठी अंगाईदेखील कुणी मराठीत गात नाही ! 'ये रे ये रे पावसा' म्हणत बाळगोपाळ पावसात भिजत नाहीत', 'गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या'च्या लयीवर कुणी फेर धरत नाहीत. चिऊकाऊच्या गोष्टी आपण आपल्या मुलांना सातशे वर्ष सांगत आलो, आता ते बंद ! टिंव्कल टिंव्कल, बाबा ब्लॅकशीप, हम्टी डम्टी यांची पोपटपंची मुलांना करायला लावतात कोण ? आणि वर बाळ 'नर्सरी ऱ्हाइम्स' किती छान गातो, असं कौतुकही करतात. आपलं बाळ एबीसीडी लिहायला लागल, त्याला 'वन् टु हंड्रेड' पाठ आहे अशी शेखी मिरवतात. 'लिपेर्यथावत् ग्रहणेन वाङ्मयम्। नदीमुखेनैव समुद्रमाविशत्॥' म्हणजे 'जणू लिपीरूप नदीमधून रघू शिरे वाङ्मयसागरात' - यातली गंमत आता हरवली. आता एबीसीडीच्या शिडीवरून बाब्या इंग्लिश लिटरेचरमध्ये प्रवेश करता झाला याचं कौतुक होईल. त्यातही लिटरेचर म्हणजे शेली, कीट्स, शेक्सपियर नाही हं ! फक्त

पेपरबॅक, रहस्यकथा, कामकथा आणि कॉमिक्स ! ही उच्च विद्या मुलं घेतील. थोडी बुद्धिमान् मुलं विदेशी विद्यापीठांतही शिकायला जातील पण बाकीचा गळाठा ? तो मराठीला मुकलेला आणि इंग्रजीत वाट चुकलेला, असा नुसता चाचपडत राहील. 'बालकुमारांच्या शिक्षणाचं आदर्श माध्यम म्हणजे त्यांची मातृभाषा', हे जगातल्या मोठमोठ्या शिक्षणतज्ज्ञांचं सांगणं. मातृभाषेत शिक्षण घेण्याचा प्रत्येक बालकाला जन्मसिद्ध अधिकार आहे. तो नाकारण्याचा पालकांना काय अधिकार ? आपल्या मुलांना इंग्रजी माध्यमात कोंबण्याचा प्रकार आपण केव्हा थांबवणार ? हवं ते माध्यम स्वीकारण्यात मात्र व्यक्तिस्वातंत्र्याचा विजय आहे म्हणे ! महाराष्ट्राच्या शासनाने असा कायदा केला पाहिजे की, सर्व मुलांनी त्यांची मातृभाषा असणाऱ्या माध्यमाच्या शाळेतच गेलं पाहिजे. ज्या बालकांची प्रथम भाषाच इंग्लिश असेल त्यांनी जावं इंग्लिश माध्यमाच्या शाळेत ! एरवी शिक्षण मातृभाषेतच घेतलं पाहिजे. ही केवळ पहिली पायरी झाली. मराठी मुलखात अशी व्यवस्था पाहिजे की, विद्येच्या सर्व शाखांत मराठीच्या एका प्रश्नपत्रिकेचा अंतर्भाव असलाच पाहिजे, मग माध्यम कोणतंही असो. विज्ञान-तंत्रज्ञान, स्थापत्य, व्यापार, वैद्यक, व्यवस्थापन या सर्व विद्याशाखांसाठी इंग्लिश शिवाय पानही हलणार नाही, हा सिद्धांत म्हणजे शुद्ध भ्रम आहे, फसवणूक आहे. दुनियेमधे किती तरी देशांत सर्व प्रकारच्या शिक्षणशाखांत इंग्रजीची कुबडी घेण्याची गरज भासलेली नाही. इंग्लिश भाषेची सुविधा आपल्याला उपलब्ध आहे तर तिचा उपयोग का करून घेऊ नये, हा प्रश्नही फसवा आहे — आपल्या भाषेच्या ज्ञानकथा वाढवण्याऐवजी निमूटपणे भाषेची कोंडी करणारा आहे. वादासाठी इंग्लिश भाषेचा अभ्यास आपल्या आंतरराष्ट्रीय संबंधांसाठी जरूरीचा आहे असं मानलं तरी त्याचा अर्थ एवढाच की इंग्लिश भाषा हा विषय म्हणून उत्तम शिकला पाहिजे. माध्यम म्हणून इंग्रजीची गरज नाही. अगदी प्राथमिक स्तरापासून मातृभाषेबरोबरच इंग्रजी भाषा शिकवावी, पण माध्यम म्हणून स्वीकारू नये.

आपल्याला कदाचित् चमत्कारिक वाटेल पण प्राथमिक शिक्षणापासूनच मराठीची हेळसांड करण्याची रीत आमच्या शिक्षणव्यवस्थेत केलेली आहे. प्राथमिक शिक्षणाचा ढाचाच बदलला पाहिजे. बालवाडीपासून प्राथमिक शिक्षणाच्या सर्व स्तरांवर आपण मुलांना अनेक भाषा शिकवल्या पाहिजेत. मराठी, इंग्रजी किंवा हिंदी, जवळच्या एखाद्या प्रदेशाची भाषा आणि संस्कृतदेखील, प्राथमिक शाळेपासूनच शिकवता येईल. मुलं पटापट भाषा शिकतात. भाषाशिक्षणाला बोजा समजतात ते पालक किंवा शिक्षक ! सर्वांनी बहुभाषक होण्याची आपल्या संघराज्यात गरजच आहे. बाकी विषयांची भारूडभरती करण्यापेक्षा बालकांच्या शिक्षणात लेखन, वाचन आणि अंकगणित एवढ्यापुरतीच शिक्षणाची सीमा ठेवली तरी चालेल.

भाषाशिक्षणात उच्च स्तर आणि निम्न स्तर असला भेदाभेद असता कामा नये.

तसंच पीसीएम आणि पीसीबी यांनाच महत्त्व देण्याचा वेडेपणा थांबवून मराठीचा अभ्यासही समान महत्त्वाचा मानला पाहिजे. वैद्यक, स्थापत्य, तंत्रज्ञान अशा विद्याशाखांत मराठीची गरज नाही असं मानणं चुकीचं आहे. ज्या समाजात आपल्या शिक्षणाचं विनियोजन करायचं असतं त्या क्षेत्रातील कामकाजासाठी सर्वांना लोकभाषा आलीच पाहिजे. आपल्या कामासाठी इंग्रजीचा आश्रय करावा हे केवळ हितसंबंधांसाठी तथाकथित सुशिक्षित लोक मानतात. आपण इंग्रजी शब्दांचा माग केला की, ते न समजणाऱ्या लोकांना फसवता येतं आणि आपला स्वार्थ साधता येतो.

मायभाषेचा आग्रह प्रत्येक क्षेत्रात कदाचित धरता येणार नाही. विशेषत: उच्च न्यायालय आणि सर्वोच्च न्यायालय यांतील सुरळीत कारभारासाठी सर्व संघराज्याला संपर्कभाषेचा स्वीकार करावाच लागेल. सर्व प्रदेशांतील उच्च न्यायालयांचे निवाडे सर्व प्रदेशांत समजावे लागतील आणि सर्वोच्च न्यायालयालाही भिन्न भिन्न उच्च न्यायालयांतील विचारविमर्श जाणन घ्यावा लागेल.

मराठी भाषेवरचं आमचं प्रेम म्हणजे दुसऱ्या भाषांचा द्वेष नव्हे. खरं म्हणजे ज्या क्षणी आपण भाषिक राज्यांची कल्पना प्रत्यक्षात आणली त्या क्षणी विविध प्रदेशांतील भाषांच्या जाणकारीचं आपण स्वागतच करायला हवं होतं. साने गुरुजींच्या आंतरभारतीचा स्वीकार त्यांच्या जन्मशताब्दीच्या वर्षात तरी आपण करू या ! कोणी म्हणतील, 'भाषा भाषा, शिकाव्या तरी किती भाषा ?' हा प्रश्न आज हास्यास्पद वाटतो याचं कारण आपण सर्व क्षेत्रांतच नवा विचार करायला नाराज असतो. नाखूश असतो. आपल्या प्रदेशात एक पाठ्यपुस्तक मंडळ आहे. पाठ्यपुस्तक निर्मितीशिवाय या मंडळाकडे अभ्यासक्रमाच्या नवनिर्मितीचं कामही दिलेलं आहे. गेल्या कित्येक वर्षांत या मंडळानं अभ्यासक्रमाच्या नवनिर्मितीच्या क्षेत्रात शून्य काम केलेलं आहे. या मंडळावर कोणत्या व्यक्ती नेमल्या जातात ? मंडळावरील प्रतिनिधित्व जिल्हावार किंवा जातवार ठरवलं जातं. नवा शैक्षणिक विचार करण्याची कुवत असणाऱ्या माणसांना त्यात स्थान नसतं. जीवनाच्या अनेक क्षेत्रांत खाजगीकरणाला वाव दिला जात आहे अनेक क्षेत्रांत शिथिलीकरण, उदारीकरण होत आहे. मग पाठ्यपुस्तकांच्या बाबतीत तरी शासनाचा एकाधिकार कशाला ? असा एकाधिकार नसताना पाठ्यपुस्तकं चांगली निघत होती. मग आता यापुढेही नव्या तज्ज्ञांना, विचारवंतांना त्यांची प्रयोगशीलता उपयोगात आणायला का मनी असावी ? इतर प्रांतांच्या नागरिकांनी आपली मुलं महाराष्ट्रातील शाळांत घालताना त्यांना शिक्षण नेमकं कसं मिळणार आहे याची चिंता केलेली नाही आणि आपणही त्यांची चिंता केलेली नाही. पण महाराष्ट्रातल्या सर्व मुलांची तरी आपण कुठे चिंता करतो आहोत ? उदा. आदिवासी मुलांना शिकवताना, त्यांना सहज समजेल अशा भाषेत प्राथमिक शिक्षण तरी आपण देतो का ? पहिली तीन वर्ष त्यांना त्यांच्या भाषेत शिकू द्यावं आणि क्रमश: त्यांना प्रमाणभाषा अवगत होईल असं करावं, अशी ताराबाई

मोडक यांची सूचना होती. त्या सूचनेचं काय झालं ? मी नुकतंच, विदर्भात 'झाडी' भाषेत साहित्य निर्माण झालेल पाहिलं. अहिराणी, खानदेशी, डांगी, ठाकरी, कोकणी अशा नाना प्रकारच्या बोली बोलणारे लोक आता शिक्षित होणार आहेत, मुख्य प्रवाहात येणार आहेत याचा विचार कोण करणार आहे ? पुन्हा बोली केवळ विभागीय असतात असं नव्हे, त्या उपेक्षित जाती जमातीच्याही असतात.

परिवर्तन ही संज्ञा व्यापक आहे आणि सखोलही आहे. परिवर्तन केवळ समाजाच्या बांधणीपुरतं मर्यादित नाही. प्रत्येक क्षेत्रात कालानुरूप बदल करण्याची गरज असते हे परिवर्तनावर श्रद्धा असणाऱ्या सर्वांनी ओळखलं पाहिजे. मराठीच्या प्राणप्रतिष्ठेसाठी पायाभूत आहे ते शिक्षण, हे ओळखून शिक्षणाची आमूलाग्र फेररचना करायला आपण प्राधान्य दिलं पाहिजे.

शिक्षणानंतर प्रश्न येतो लौकिक व्यवहाराचा. महाराष्ट्रात लौकिक व्यवहारांतही मराठीची पीछेहाट झालेली आहे. टपालखाते, तारखाते, दूरध्वनी येथील सर्व व्यवहारांचे अर्ज आणि तर्जुमे महाराष्ट्रात तरी मराठीतच असले पाहिजेत. रेल्वे, बसगाड्या, आगगाड्या, विमानतळ — दळणवळणाची सगळी खाती पाहावी तर कुठेही मराठीच्या वापराचा आग्रह नाही. बँका, स्टॉक एक्सचेज, व्यापारी संघटना आणि त्यांचे व्यापार.... कुठेच मराठीची गरज भासत नाही. त्यामुळे मराठी जनता म्हणजे केवळ दुसऱ्यांच्या ओंजळीने पाणी पिणारी रयत झाली आहे. आर्थिक उलाढालीच्या केंन्द्रात मराठीला स्थान नाही. मग मराठी माणसं नोकरीपेशाकडे वळतात. पण या पेशात देखील सगळा बडिवार आहे तो इंग्रजीचा. पत्रव्यवहाराच काम म्हणावं तर तिथे मराठीला स्थान नाही. हिशेबठिशेब करायला मराठीत आकडेमोड थोडीच करायची असते ? जणू इथे एक स्वर्गीय आकाशवाणी झाली आहे — रामा होऽऽ तुम्ही भांडी घासा. घाट्यांनो, माथाड्यांनो तुम्ही हमाली करा. सखुबाई, सोनुबाई तुम्ही कथलाचे वाळे घालून फार तर केळी विका आणि ग्रॅज्युएट देशी साहेबांनो, तुम्ही बाबू पीछेलाल इंग्रजीत बड्या अन्य भाषिकांचे मोस्ट ओबीडियन्ट सर्व्हंट व्हा.

खरोखर इंग्लिश हा विषय न घेता शालान्त परीक्षा का उत्तीर्ण होता येऊ नये ? शासनाच्या सूचना मराठीऐवजी इंग्रजीत का असतात ? बँकांमध्ये लोकभाषेऐवजी आग्रह धरला जातो हिंदीचा. तिथे हिंदी भाषेचे तज्ज्ञ अधिकारी म्हणून घेतले जातात 'अरे भाई, इंग्लिश मे या हिंदी मे बोलो। तुमचा इकडे तिकडे आम्हांला नाही समजने' — असं आम्हांला मराठी मुलखात ऐकावं लागतं. महाराष्ट्राच्या राजधानीत साधा बस कंडक्टर आणि पाशिंजर यांचं संभाषण मराठीऐवजी बंबय्या हिंदीतून होतं. मराठी बोलणाऱ्यांची संभावना 'ए तात्या' किंवा 'ए मावशीबाय' अशी केली जाते. मुंबईतली कार्यालयं आणि दुकानं यांच्यावरील पाट्या मराठीत असाव्यात एवढा देखील नियम आपल्याकडे नाही. खरं म्हणजे मराठी भाषेत पाटी लावण्याचा कायदा, १९४८

साली, स्पष्ट शब्दांत काय म्हणतो ते पहा —

***The Bombay Shop and Establishments Act, 1948***

***20 A. Name boards to be in Marathi*** -- *The name boards of every establishment shall be in Marathi in Devnagari Script.*

*Provided that, it shall be permissible for the employer to have the name board in any other language or, languages or script or scripts (in addition to Marathi in Devnagarı Scrıpt).*

**मुंबई दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८**

**२० अ. नामफलक मराठीत असावा**

प्रत्येक आस्थापनेचा नामफलक मराठीत असावा. परंतु मालकाला (मराठी भाषेत आणि देवनागरी लिपीत असेल त्या खेरीज) मराठीबरोबर इतर कोणत्याही एक किंवा अनेक भाषांत किंवा भाषांमध्ये आणि लिपीत किंवा लिप्यांमध्ये नामफलक लावण्याची परवानगी असेल.

कितीही आक्रोश केला तरी मराठीचा भाग्योदय होईल की नाही, याविषयी मी साशंक आहे. मराठी मुमुर्षू आहे म्हणजे तिला मरण्याची इच्छा आहे, याचं कारण मराठी माणसांचाच मराठीला जगवण्याचा विचार मरू घातलेला आहे. मरणवांच्छेने — Death wish — पछाडलेल्या माणसाचं मरण अटळ झालेलं असतं. मराठीची दुर्दशा अन्य भाषकांनी केलेली नाही. मराठीला मारण्याचा कट न हिंदीच्या समर्थकांनी केला आहे, न इंग्रजीच्या. आपणच आपल्या भाषेचे मारेकरी व्हायला खुशीने तयार झालो आहोत. हे बोलणं कुणाला आततायीपणाचं वाटेल पण ते सत्य आहे. मायभाषा जगवण्यासाठी तिच्या पुत्रांनीच आपली प्रबळ इच्छाशक्ती जागृत केली पाहिजे. आपल्या समाजाच्या चिरफळ्या उडालेल्या आहेत. धर्माच्या नावाने, जातीपातीच्या लेबलाखाली, पक्षपंथांच्या अभिनिवेशानी आपल्या ऐक्यभावनेला केव्हाच मूठमाती दिलेली आहे. प्रदेशाप्रदेशांतले तणाव उणावलेले नाहीत. अनुशेषांची आकडेवारी मांडून आपण आपल्या अंतर्गत बेबनावांचं प्रदर्शन मांडत असतो. दलित आणि दलितेतर, मनुवादी आणि मन्वंतरवादी, नागर आणि ग्रामीण अशी विषमतेची नाना रूपं आहेत. 'तुम्ही एक वर्तुळ आखून आम्हांला त्याच्या बाहेर ठेवता, आम्ही तुमच्यापेक्षा मोठं वर्तुळ काढून तुम्हांला आमच्यातच ठेवतो', अशी भावना व्यक्त केली तरी ती लक्षात कोण घेतो ? तीच गोष्ट आहे मराठीविषयीच्या अभिमानाची. मराठी मनाला हवं आहे तरी काय, याचा आज कोणीच गंभीरपणे विचार करत नाही. आता मराठी भाषेचा अभिमान असणाऱ्यांनी स्वत:ची एक व्यापक सनद निर्माण करण्याची आवश्यकता आहे. हे काम केन्द्र शासनाचं नाही, राज्य शासनाचंही नाही. साहित्य मंडळाच्या नेतृत्वाखाली मराठीच्या

सुपुत्रांनी आणि मानकऱ्यांनी मराठीची महासनद (मॅग्ना चार्टा) सिद्ध करणं आवश्यक आहे. शैक्षणिक, शासकीय आणि लौकिक — तिन्ही क्षेत्रांत मराठीच्या अभ्युदयाच्या दृष्टीने आपल्या काय मागण्या आहेत ते आपण स्पष्ट आणि तपशीलवार सांगितलं पाहिजे. या सनदेत दर्शवलेल्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार पक्षातील दृष्टीने आणि अभंग एकोप्याने आपणास परिश्रम करावे लागतील. संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसारखाच आज मराठीच्या जीवनमरणाचा प्रश्न आहे. आपापल्या राहुट्यांवरील बावटे खाली करून मराठीच्या अस्मितेचा एकच ध्वज आपल्या माथ्यावरच्या आभाळात फडकला पाहिजे. महाराष्ट्राच्या राजधानीत विज्ञान आणि तंत्रज्ञान यांचा अद्ययावत अभ्यास करणारे बुद्धिमंत आहेत. विद्यापीठांची अभ्यासमंडळं आहेत. शासकीय आणि निमशासकीय संस्था आहेत. कोशकार आणि संशोधक आहेत. निर्भयपणे मायमराठीचा पुरस्कार करणारे भाषाभिमानी आहेत. महामंडळाने आणि घटक संस्थांनी हे कार्य एकजुटीनं करायचं ठरवलं तर सर्व संबंधितांच्या साहाय्यानं एक प्राणभूत व्यापक योजना करणं, हे केवळ स्वप्न नाही; माझं एकट्याचं तर ते असूच शकत नाही. मुंबई आणि महाराष्ट्रातील आकाशवाणी आणि दूरदर्शन केन्द्रं मराठीचा कितपत मान राखत आहेत ? महाराष्ट्रातील शिक्षणसंस्था आणि विद्यापीठं मराठीच्या विकासासाठी काय परिश्रम करायला तयार आहेत ?— या सर्व बाबींचा विचार करून मराठीची महासनद निर्माण करण्याचा शुभारंभ आपण तत्काळ केला तर ते अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचं अलौकिक यश ठरेल असा मला विश्वास वाटतो.

मराठीच्या भवितव्याविषयी मी काही विचारप्रदर्शन केलं आणि जी खास माझी प्राणशक्ती असं मी म्हणतो त्या कवितेविषयी मी काही बोलतच नाही हे अनेकांना विपरीत वाटेल. मतदारांनी तुम्हांला मराठी कवितेचे आजन्म सेवक म्हणून निवडून दिलं आहे तर तुम्ही कवितेसंबंधी बोला, साहित्यासंबंधी बोला, अशी अपेक्षा आपल्यातीलच काही जण करतील. या विषयासंबंधी बोलण्यापूर्वी मला आपल्याला जाणीव करून द्यायची आहे ती ही की, राजवंश येतात आणि जातात, युगकर्ते पुरुष आणि महान सम्राट अशी बिरुदंही आपण अनेकांच्या मागे लावतो पण आता मागे नजर टाकली तर असं दिसतं की समाजाचं चैतन्य कवितेमधून प्रकट होतं, आणि म्हणून कालखंड मोडले जातात ते राज्यकर्त्यांच्या नावाने नव्हेत तर त्या त्या काळातील कवींच्या नावाने. नाममात्र एखादा कालखंड राणी एलिझाबेथ म्हणून ओळखला जातो पण वस्तुत: तो असतो शेक्सपिअरचा कालखंड. आपण म्हणतो यादवकालीन जमाना पण त्याची ओळख ज्ञानेश्वरांसारख्या कवीमुळेच अधिक सार्थ ठरते. हे मी एक कवी म्हणून बोलत नाही. वाङ्मयेतिहासातील एक सत्य, एक वस्तुस्थिती म्हणून मी हे आपणास सांगितलं.

मराठी वाङ्मयाची सद्य:कालीन विशेषता कोणती ? ज्यांना आपण तळागाळाचे प्रतिनिधी म्हणतो त्या लेखकांनी साहित्यामध्ये सर्व कोंडलेले प्रवाह मोकळे केले

आहेत, असं आपल्याला दिसतं. दलित साहित्य आणि दलित साहित्यिक यांच्यासाठी दुसरी पंगत मांडणं व त्यांचे पाट आडवे ठेवणं मला मंजूर नाही. दलित साहित्याने विशेषत: कवितेने, एकूणच मराठी साहित्याच्या साचलेल्या पाण्यावर नवे संस्कार केले आहेत असं मी मानतो. आधुनिक मराठी कवितेत बोरकर, कुसुमाग्रज, मर्ढेकर. पु. शि. रेगे, इंदिरा प्रभृतीनी जुन्या मळवाटांऐवजी नव्या वाटा निर्माण केल्या. मराठी कवितेवर त्यांचं ऋण आहेच पण दलित कवीच्या विद्रोहानं कवितेच्या अंत:स्वरूपाला निराळं आणि मोठं बळ दिलं हेही आपण ओळखलं पाहिजे. हे खरं की, चांगल्या दलित लेखकांची पहिली साहित्यकृती आत्मचरित्रपर असते आणि दुर्दैवाने या पहिल्या कृतीचीच त्यांनी शेवटची कृती करून टाकली आहे. असं दिसतं. या घटनेला कारण हेच आहे की दलित साहित्याला दलितेतर साहित्यापासून आपण अलग काढत असतो. मराठीच्या मुख्य प्रवाहाला नवं वळण देण्याची, नवी कलाटणी देण्याची त्याची शक्ती आपण ओळखतच नाही. जीवनाचं दर्शन घडवताना वरवरच्या थरातल्या जीवनाचं गुळगुळीत दर्शन घडवण्याऐवजी तळागाळातील जीवनाची भीषणता प्रतिबिंबित करण्याची ऊर्मी दलितेतर लेखकांतही बळावायला हवी. याचं थोडंबहुत दर्शन, मुक्त झालेल्या स्त्रीवादी लेखनात घडतं. पुरुषी वर्चस्वाखाली निर्माण झालेल्या साहित्यातून दिसणाऱ्या भोगवादी आणि लंपट जीवनचित्रणापेक्षा काही लेखिका, आज स्त्रीजीवनाचे वाभाडे कसे निघत आहेत याचं मर्मस्पर्शी दर्शन घडवताना दिसतात. म्हणजेच एका निराळ्या संदर्भात हे दलितांहून दलित असलेल्या समाजाचं चित्रण असतं. प्रेरणेचे झरे आकाशातून पडणाऱ्या पाणलोटांचे कशाला असले पाहिजेत ? त्यापेक्षा भूगर्भातून उसळणाऱ्या झऱ्यांचं महत्त्व अधिक आहे. माझ्या प्रतिपादनाचा अर्थ असा नाही की, दलित लेखकांनी लिहिलेलं सर्वच साहित्य मला उच्चतर वाटतं. दलितांचं साहित्य हे फक्त आत्मकथनापुरतं मर्यादित राहू नये, तर त्यांनी कल्पनेच्या भेदक नजरेने एकूण दुनियादारीची चित्रंही काढावीत. म्हणजेच त्यांच्या साहित्याच्या दर्शनाने एकूणच मराठी कथा कादंबऱ्यांचा जुना ठसा पुसून जाऊन त्यात अभिनव जीवनदर्शन घडू लागेल. दलित साहित्य आणि दलितेतर साहित्य असा भेद साहित्यात करणं चुकीचं आहे. दलित साहित्याने एकूणच साहित्याला आपण शक्तीचं वरदान दिलं पाहिजे

कविता गवताऐसी उदंड झाली तर काही बिघडलं नाही, पण ती भुसकट पेढा झाली आहे, चैतन्य हरवून बसली आहे हे आजचं दृश्य आहे. एक तर कविता छंदोमुक्त होता होता ती आपलं सर्वस्व गमावून बसली आहे, याची अनेक निदर्शनं आहेत. पहिली गोष्ट अशी की कविता ही कलाकृती आहे ही जाणीवच नाहीशी झाली आहे. त्यामुळे एकूणच कविता आकृतिबंधविरहित झालेल्या आपल्याला दिसतात. कविता म्हणजे भाषेचं उत्कट रूप असायला पाहिजे. त्याऐवजी भाषेचा अघळपघळपणा, रचनेचं ढिसाळपण आणि निरर्थक पुनरुक्ती यांनीच कवितेच्या विश्वात थैमान मांडलेलं

दिसतं. पूर्वीचे कवी दुसऱ्यांचं अनुकरण करीत असत म्हणे, पण आताचे कवी तर स्वतःचंच अनुकरण पुन्हा पुन्हा करत असतात आणि एकाच कवितेची पुन्हा पुन्हा आवृत्ती काढीत असतात. कविता काय आणि इतरही साहित्यप्रकार काय, निर्मात्याच्या अनुभवसंपन्नतेशी त्यांचं नातं दृढ झालेलं असलं पाहिजे. ही अनुभवसमृद्धी जर तोटकी असेल तर तो पोकळपणा साहित्याच्या निर्मितीतही जाणवल्याशिवाय राहात नाही. आपण कवितेतील युगं फारच स्वस्त करून टाकली आहेत. स्वातंत्र्यपूर्व आणि स्वातंत्र्योत्तर अशा दोन युगांची कल्पना मी समजू शकतो. पण साठोत्तरी कविता, सत्तर ते ऐंशी या दशकातली कविता असल्या कालखंडांची गणना ढिसाळ पायावर केली आहे. काळ आणि समाज यांचं प्रतिबिंब कवितांत पडतं; नाही असं नाही. पण काळ आणि परिस्थिती यांच्या पल्लाड प्रबळ भावनांचं उत्कट दर्शन घडविणारी कविताही असते, याचा आपल्याला विसर पडलेला आहे. अधू दृष्टीने केलेल्या समीक्षेमुळे प्रतिभावंतांनी निर्माण केलेल्या रसपूर्ण कवितेवरील, सामर्थ्यसंपन्न कवितेवरील लक्ष उडून चाललं असून तात्कालिक स्वरूपाच्या संसृतिटीकेवर आधारलेली कविता वाढू लागली आहे, मान्यता पावू लागली आहे.

कवितेच्या रहग्रहणाची चांगलीच गोची झालेली आहे. कवितेत काव्यात्मता किती आहे यापेक्षा काव्यात्मतेच्या आभासावरच मंडळी खूष असतात. कविता शिकवणाऱ्यांनी तर अनन्वित अत्याचार चालविलेले असतात. अर्ध्याकच्च्या ज्ञानाच्या आधारावर पुस्तकातले कवितापाठ शिकवले जातात. शिक्षणाच्या मंस्थांची संख्या आता खूप वाढलेली आहे. त्यामुळे अर्ध्याकच्च्या समजुतीचे गुणाकारही खूप वाढत जातात. कवितांचे चुकीचे अर्थ लावण्यापेक्षा आणि त्यांच्यावर मनमानी टीकाटिपणी करण्यापेक्षा अभ्यासक्रमात कवितांचा अंतर्भाव करू नका असं सांगण्याची वेळ आली आहे.

काव्यविश्वातल्या दुरवस्थेला केवळ अध्यापक आणि समीक्षकच जबाबदार नाहीत. स्वतःच्या करणीचे कवीनीच ही स्थिती ओढवून घेतली आहे. 'कविता ही आकाशीची वीज आहे. तिला धरू पाहणाऱ्या शंभरांतले नव्व्याण्णव जळून जातात', असं केशवसुत म्हणाले होते. या न जळलेल्या एक टक्क्यात आपला समावेश असावा अशी कोणी अपेक्षा ठेवली तर ती योग्य म्हणता येईल पण हा विवेक न ठेवता गद्यप्राय ओळीच्या चवडीवर चवडी रचणारी माणस कवित्वावर आपला हक्क सागत आहेत. या मंडळीना सांगावंसं वाटतं, जरा सबूर. पांढऱ्यावर काळं करण्यापूर्वी जरा आत्मचिंतन करा. आपण कोणतं व्रत घेतो आहोत याचं भान ठेवा. मैफलीचा नाद सोडा. कविसंमेलनात घुसण्यासाठी तळमळू नका. अनेकदा तर कविसंमेलनं म्हणजे कवीची साठमारी वाटू लागते. 'आम्हांला एक चान्स द्या' म्हणून कवी अजीजी करतात. आपण सूर्यकुळाचे वंशज आहोत याचा त्यांना विसर पडतो. परिणामी ते तर हास्यास्पद ठरतातच, पण एकूण कविता हा विषयच समाजाच्या लेखी उपहासाचा विषय ठरतो

कवीनी आत्मसन्मानाची बूज राखली तर तेही आपल्या भाषेच्या प्रगल्भतेचं एक सुचिन्ह ठरेल. काही प्रसंगी तर कवीची संख्या श्रोत्यांच्या संख्येपेक्षा अधिक झालेली असते. अशा वेळी मला वाटतं की कवीना प्रेक्षागृहात बसवावं आणि जे कोणी श्रोते उरतील त्यांना व्यासपीठावर बसवावं. एके काळी सपक प्रेमकवितांनी आणि सांकेतिक निसर्गकवितांनी उच्छाद मांडला होता. आता ती जागा उथळ सामाजिक जाणिवेनं आणि विद्रोहाच्या भडक भाषेनं घेतली आहे. एक गोष्ट उघड आहे. विद्रोही साहित्यानं, विशेषत: कवितेनं, एका नव्या युगाचं प्रवर्तन केलं. गेल्या २५-३० वर्षात साहित्याचं आळलेलं, थिजलेलं तळं फोडून टाकण्याचं बरंचसं श्रेय विद्रोही साहित्यालाच दिलं पाहिजे, पण विद्रोहाची भाषा बटबटीत झाली, काल्पनिक दु:खांसाठी कविता जर सतत आक्रोश करू लागली तर विद्रोहाच्या भावनेतील शक्ती क्षीण होत जाते. सूचकतेची धार बोथट होत जाते.

आज समाजातील नवे नवे घटक आपली प्रखर जीवनदृष्टी घेऊन साहित्याच्या विश्वात येत आहेत त्यांचं सर्वांनी आनंदानं स्वागत केलं पाहिजे. शिक्षणाचे आणि त्यातही साहित्याचे संस्कार आत्मसात करण्याचं प्रमाण वाढत चाललं आहे. छोटी साहित्य संमेलनं अधिकाधिक संख्येनं भरत आहेत, ही घटनाही स्वागतार्ह आहे. परंतु क्रीडा क्षेत्रातून ज्याप्रमाणे आपण जात व धर्म यांवर आधारलेलं वर्गीकरण कालबाह्य ठरवून रद्द केलं, त्याप्रमाणे साहित्याच्या क्षेत्रातही धर्म, पंथ, जाती यांची लेबलं माथ्यावर लावलेली संमेलनं भरवू नयेत. महाराष्ट्राचं क्षेत्र आता विस्तारानं खूप वाढलेलं असल्यामुळे विभागवार संमेलनं भरवणं मात्र अपरिहार्यच झालं आहे. कोकण, विदर्भ, मराठवाडा, दक्षिण महाराष्ट्र, उत्तर महाराष्ट्र अशी विभागीय संमेलनं सांस्कृतिक वातावरणाच्या दृष्टीनं लाभदायकच आहेत. परंतु मुस्लिम साहित्य संमेलन, ख्रिश्चन साहित्य संमेलन, नवबौद्ध साहित्य समेलन यांचे वेगळे प्रपंच मांडू नयेत अशी मी सर्व संबंधित मंडळीना मनापासून विनवणी करतो. तीच गोष्ट स्त्रियांचे वा स्त्री-वाद्यांचे वेगळे गोट निर्माण करण्याची. संत वाङ्मयात जशी महान संतपुरुषांबरोबर जनाई, मुक्ताई, कान्होपात्रा, बहिणाई यांची कर्तुकी कमी मोलाची नाही, तशीच आधुनिक साहित्यातील मानकऱ्यांमध्ये रमाबाई रानडे, लक्ष्मीबाई टिळक, कुसुमावती देशपांडे, कमलाबाई देशपांडे, बहिणाबाई चौधरी, दुर्गा भागवत, इरावती कर्वे, मालतीबाई बेडेकर, इंदिरा, शांता शेळके, संजीवनी मराठे, पद्मा गोळे, शिरीष पै यांचीही कर्तुकी महत्त्वाची आहे. अगदी अलीकडच्या काळातही मराठी साहित्य निर्मितीत कथा का कवितांच्या क्षेत्रात दर्जेदार लेखन करणाऱ्यांत गौरी देशपांडे, आशा बगे, सानिया, प्रतिमा इंगोले, शांताबाई कांबळे, मल्लिका अमरशेख, अरुणा ढेरे, प्रभृती अनेक लेखिकांचा समावेश आहे. आता लेखिका आणि लेखक अशा भेद कल्पनेला जागा उरलेली नाही.

आता मुंबईमध्येही तीन साहित्य संमेलनं भरत आहेत. परंतु अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन हे परिवर्तनविन्मुख आहे असं विधान काही लोक सर्रास करतात

हे आपण पाहतो. परंपरावादी आणि परिवर्तनवादी यांच्यात पाचर ठोकली पाहिजे असं जे मानतात त्यांची मला कीव येते. प्रत्येक प्रतिभावंत लेखक परिवर्तनासाठीच आसुसलेला असतो असं मी मानतो. जग अथवा समाज यांचं स्वरूप काय आहे याची जाणीव झाल्यानंतर हे स्वरूप कसं असावं, 'ते आपण सांगितलं पाहिजे, अशी प्रेरणा त्याच्या अंतर्यामी असते. आहे आणि असावं यांतलं अंतर मिटवून एकजिनसी समाजाने उन्नतीच्या मार्गाने वाटचाल करावी अशी सर्वच परिवर्तनवाद्यांची वृत्ती असते. व्यापक आणि सखोल अर्थाने प्रत्येक नवनिर्मितीचा उगम याच वृत्तीतून होतो. हा रोमॅंटिसिझम असेल तर आपण सगळेच रोमॅंटिक असतो. सर्व प्रकारची गुलामगिरी नष्ट व्हावो, दासवृत्ती मावळून जावी हाच परिवर्तनाचा आशय आहे ना ? कृतिशूर परिवर्तनवादी अनेक विधायक आणि विघातक कृतीच्या द्वारे जो परिणाम घडवू पाहतात, तोच परिणाम प्रतिभावंत साहित्यिकांनाही अभिप्रेत असतो. किंबहुना कृतीच्या मागे स्फूर्ती देण्याचं काम साहित्यानं केलेलं असतं. साहित्यिकांना केवळ वाचिवीर म्हणणं बरोबर नाही. उलट द्रष्टेपणानं ते भविष्यकाळाच्या वाटा दाखवीत असतात. ते प्रचारक नसतात पण प्रसारक असतात. प्रचार हा 'मोले घातले रडाया' या न्यायाने तरी होतो किंवा मर्यादित स्वार्थासाठी होतो. पण 'अंत:स्फूर्ती'ने सुचलेले विचार समर्थ शब्दांच्या माध्यमातून जे प्रसृत करतात त्याला प्रसार म्हणतात. आपल्या पसंतीला न उतरलेल्या विचारांना जे दडपशाहीने, बाहुबळाने नष्ट करू पाहतात, त्यांना शरण न जाण हा साहित्यिकांचा धर्मच आहे. साहित्य आणि कला यांच्या क्षेत्रात भलाई आणि बुराई दोन्ही असू शकतात. पण मी म्हणेन तीच भलाई असा हेका चालवण्याचं कोणालाही कारण नाही. 'न्यून ते पुरते आणि अधिक ते सरते' करून घेण्याचं काम काळच करत असतो. म्हणून आपण परिवर्तनाचे पुरस्कर्ते असतो, त्याप्रमाणे आविष्कार स्वातंत्र्याचेही पाठिराखे असलं पाहिजे.

आपण सारे एका युगांताच्या आणि नवयुगाच्या सीमारेषेवर आज उभे आहोत. पण मानवाचा इतिहास आपल्याला सांगतो की, सर्व क्षणिक असलं तरी गेल्या पाच-सात हजार वर्षांत सुस्थिर झालेली शाश्वत जीवनदृष्टी म्हणूनही काही निर्माण झाली आहे, तिचं श्रेय समग्र मानवी इतिहासालाच आहे. हिंसा आणि बळजबरी अभद्र आहेत, संकुचित स्वार्थापेक्षा सर्वकल्याणाची कल्पना आपण स्वीकारली पाहिजे, विकसित केली पाहिजे, हे आज अवघ्या दुनियेचं मत झालं आहे. युगान्त आणि युगजन्म या संकल्पना जरी आपण स्वीकारल्या नाहीत तरी हा दोन शतकांचा संधिकाल तरी आहे ! यंदा तर अनेक थोर पुरुषांची जन्मशताब्दी आली आहे. पण आज मला विशेष लक्ष वेधावंसं वाटतं ते साने गुरुजीच्या जन्मशताब्दीसंदर्भात. विसाव्या शतकाचा पूर्वार्ध साने गुरुजीच्या जीवनकार्यामुळे चैतन्याने भारला गेला. आणि त्यांच्या मृत्यूनंतरच्या अर्धशतकात त्यांचं स्मरण आपल्याला 'संतत स्फुरणदायी' ठरलं आहे. विद्यालयं, ग्रंथशाळा,

इस्पितळं, सांस्कृतिक संस्था अशी अनेक कार्यक्षेत्रं साने गुरुजींच्या स्मरणाने सजग झाली आहेत. पण साहित्य संमेलनात मला सर्वाधिक महत्त्वाचं वाटतं ते त्यांचं साहित्य आणि संस्कृतिदर्शन. भारतीय संस्कृतीचा विशाल दृष्टिकोन त्यांनी वारंवार स्पष्ट करून सांगितला. त्यांनी ज्यांना आदर्श पुरुषोत्तम मानलं त्यांत स्वर्गीय रवीन्द्रनाथही होते. 'यत्र विश्वं भवति एकनीडम्' म्हणजे ज्ञानेश्वरांच्या शब्दांत सांगायचं तर 'हे विश्वचि माझे घर, ऐसी जेयांची मति स्थिर' असं मानवी जीवन घडवण्याची प्रेरणा रवीन्द्रनाथांनी आपल्याला दिली. त्याचाच भारतापुरता आविष्कार साने गुरुजींच्या आंतरभारतीत झाला आहे. कोणाला कदाचित वाटेल की भाषणाच्या आरंभी मायमराठीचा जागर करू पाहणारा अध्यक्ष भाषणाच्या भरतवाक्यात आंतरभारतीची महती कोणत्या हेतूने सांगत आहे ! मी नम्रपणे सांगू इच्छितो की मराठीवर माझं नितांत प्रेम आहे आणि म्हणूनच मला सर्व भारतीय भाषाही प्रिय आहेत. साने गुरुजी म्हणत, 'जो आपल्या आईवर प्रेम करत नाही तो भारतमातेवर काय प्रेम करणार ?' भारतीय भाषांबाबतही आपण हाच विचार केला पाहिजे. भारत हा अनेक आवाजांचा कोलाहल होता कामा नये, तो एक महान् वाद्यमेळ झाला पाहिजे.

*'श्रुतिसुंदर वाद्यवृन्द भारतात वाजे*  
*विविध रंग विविध अंग भारती विराजे*  
*या सहस्रवीणेवर नित नवीन फुलति सूर*  
*भावगंध, काव्यबंध रचिति ज्ञानराजे'*

भारतीय भाषांनी एखाद्या सुरेल वाद्यमेळाप्रमाणे परस्परांचं स्वरसौंदर्य वाढवलं पाहिजे, हे सांगण्याचा या गीताचा रोख आहे. हा वाद्यवृन्द केव्हा सुरेल होईल ? जेव्हा अनेक जनजीवनांचं सौंदर्य आपल्या जा। ावा समृद्ध करील तेव्हा ! एकविसाव्या शतकाच्या उंबरठ्यावर उभ्या असलेल्या भारताने हे साने गुरुजींचं स्वप्न प्रत्यक्षात आणण्याचा निश्चय करावा असं मला वाटतं. या स्वप्नाची अर्थपूर्ण परिसमाप्ती व्हायला हवी आहे. प्रेम, शांती करुणा आणि विधायक अस्मिता या मूल्यांचा हार्दिक स्वीकार मानवजातीने केला तरच विश्वकल्याणाची पहाट क्षितिजावर दिसू लागेल. अशा क्षणाला सर्व दुनियेची प्रार्थना एकच असू शकेल — जी माझ्या ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या समापनाच्या वेळी केली आहे. ज्ञानेश्वरीतील पसायदान म्हणजे विश्वकल्याणाचं महावाक्य आहे. मानव कल्याणाचा तो ओजस्वी साक्षात्कार आहे.

आपण सर्वांनी माझं भाषण शान्तपणे ऐकून घेतलं, माझ्या विवेचनाचाही आपण समतोल चित्तानं विचार करावा, स्वीकार करावा अशी प्रार्थना करून हे प्रदीर्घ झालेलं भाषण संपवतो.

□□□

## बेळगाव : २०००

# डॉ. य. दि. फडके

मराठी भाषा आणि साहित्य यावर प्रेम असलेल्या मित्रांनो,

आज बेळगावात भरत असलेल्या ७३ व्या 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलना'चे अध्यक्ष म्हणून आणि माझी अविरोध निवड केली, याबद्दल मी प्रथम आपले मन:पूर्वक आभार मानतो.

बेळगाव ही संयुक्त महाराष्ट्राची गंगोत्री आहे, असे मंयुक्त महाराष्ट्राचे उद्गाते आचार्य अत्रे म्हणत असत. २६, २७ व २८ मे १९२९ रोजी येथे 'काळ'कर्ते शिवराम महादेव परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली 'साहित्य संमेलन' भरले होते. त्या संमेलनाचा कार्यक्रम यंदा जसा आहे तसाच तीन दिवसांचा होता. बेळगाव महाराष्ट्राचे की कर्नाटकाचे या प्रश्नावरील वादामुळे तीन दिवसांतील बराच वेळ खर्च झाला. त्यामुळे "निबंधवा, परिचयविधी वगैरे कार्यक्रम आणि इतर महत्त्वाच्या विषयावरील चर्चा होऊ शकली नाही." [शं. वि. जोगळेकर (प्रकाशक) महाराष्ट्र साहित्य संमेलन, समग्र अहवाल, मे १९२९, पृ. ६] येथे १९४६ च्या मे महिन्यात भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष गजानन त्र्यंबक माडखोलकर यांनी अध्यक्षीय भाषणात तत्कालीन राजकीय नेत्यांच्या उदासीनतेचा नि:संदिग्ध शब्दांत निषेध करून "मराठी लेखक आणि पत्रकार यांच्या वतीने महाराष्ट्र एकीकरणासाठी झटण्याची हाक महाराष्ट्रातील सर्व पक्षांच्या, जातीच्या आणि धर्माच्या कार्यकर्त्यांना दिली होती." या मराठी शहरात उभे राहून बोलताना येथे धुमसत असलेल्या मराठी-कानडी वादाची आठवण होणे अपरिहार्य आहे, असे सांगून "सरहद्दीचा हा प्रश्न महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या प्रतिनिधींची संयुक्त समिती नेमून गुण्यागोविंदाने सोडविणेच समंजसपणाचे ठरेल." असे माडखोलकरांनी मत व्यक्त केले होते.

"महाराष्ट्र आणि कर्नाटक या दोन राज्यांची भाषा भिन्न असली तरी संस्कृती एक आहे, उपास्य एक आहे, परंपरा एक आहे आणि इतिहासही एक आहे," याची माडखोलकरांनी श्रोत्यांना आठवण करून दिली होती. "धर्म, संस्कृती, इतिहास, वाङ्मय, संगीत आणि व्यापार यांपैकी महाराष्ट्राच्या जीवनाची कोणतीही कला घ्या, ती कर्नाटकाच्या वैशिष्ट्याने संस्कारित आणि समृद्ध झालेली आढळेल," अशी ग्वाही

त्यांनी अध्यक्षीय भाषणात दिली होती.

१ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आल्यानंतर ठाणे येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष रा. श्री. जोग यांनी आपल्या भाषणात "महाराष्ट्र संयुक्त झाला खरा परंतु तो अ-खिल झालेला नाही," याबद्दल खंत व्यक्त केली. जोग म्हणाले, "नियतीचा दुर्विलास असा की ज्या बेळगावामध्ये संयुक्त महाराष्ट्राच्या कल्पनेची घोषणा साहित्य संमेलनाने केली ते बेळगावच खिल राहिलेले आहे. न्याय, तत्त्व, लोकमत इत्यादी सर्व दृष्टींनी ते महाराष्ट्राल येणे व राहणे योग्य असतानाही केवळ राजकारणातील डावपेचामुळे ते महाराष्ट्रास दुरावले आहे आम्हां साहित्यिकांना राजकारण कळत नसेल पण एवढे खास समजू शकते की एका सरळ आणि न्याय्य गोष्टीबाबत राजकारणी लोकांनी एवढा प्रचंड घोळ आणि गोधळ घालून ठेवला आहे की त्याला राजकारणाच्या इतिहासातही तोड सापडणार नाही."

मुंबईसह महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले त्यालाही चाळीस वर्षे झाली. इतिहासाची विचित्र लीला अशी की मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षाला आजही संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीबद्दल तसेच अद्याप अनिर्णित राहिलेल्या सीमाप्रश्नाबद्दल संमेलनाच्या पूर्वाध्यक्षांनी वेळोवेळी व्यक्त केलेल्या मतांची आपल्यासारख्या मराठी भाषा आणि साहित्य यावर प्रेम करणाऱ्या रसिकांना आठवण करून देणे भाग पडत आहे. लोकांची स्मृती अल्पजीवी असल्यामुळे इतिहासाचे लेखन करणाऱ्याला समाजाच्या स्मृतीच्या रखवालदाराची भूमिका वठवणे अटळ होते. विसाव्या शतकातील महाराष्ट्राचा राजकीय इतिहास आठनऊ खंडांमध्ये लिहिण्याचा उद्योग मी गेली ३५ वर्षे करीत आहे. त्यासाठी पूर्वतयारीदाखल केलेल्या संशोधनाची सुरुवात मी संयुक्त महाराष्ट्र चळवळीबद्दलचा इंग्रजी प्रबंध लिहून केली. स्वतंत्र भारतातही सीमा भागातील मराठी भाषकांवर चार दशकांहून अधिक काळ अन्याय होत आहे. त्यांच्या गाऱ्हाण्यांची दखल घेऊन अन्यायनिवारणाबाबत ठोस उपाययोजना करणे केंद्रशासनाला तसेच संसदेला अद्याप शक्य झालेले नाही. महाराष्ट्र सरकारला तसेच महाराष्ट्र विधानमंडळालाही हा प्रश्न निकडीचा वाटत नाही. महाराष्ट्रातल्या कोणत्याही सत्ताधारी पक्षाच्या सरकारचे अस्तित्व सीमाप्रश्न सोडविण्यावर अवलंबून नाही. महाराष्ट्रातील विरोधी पक्षही अधूनमधून सत्ताधारी पक्षाविरुद्ध वापरण्याचे एक हत्यार म्हणून सीमाप्रश्नाचा उपयोग करीत असतात. हा प्रश्न कधीकधी रस्त्यावर आणणारे प्रादेशिक पक्षही जेव्हा युतीच्या अगर आघाडीच्या सरकारातील भागीदार बनवतात तेव्हा हा प्रश्न सोडविण्याच्या दिशेने कृती करताना दिसलेले नाहीत. मराठी भाषक मतदारांना सीमाप्रश्नाबाबत सुरुवातीस होती तितकी आस्था राहिलेली नाही. ते उदासीन त्यामुळे महाराष्ट्रातील सर्व राजकीय पक्षांचे नेते आणि कार्यकर्ते उदासीन अशी गेली काही वर्षे अवस्था असल्यामुळे अलीकडच्या वर्षात साहित्य संमेलनांच्या अध्यक्षीय भाषणांमध्येही सीमाप्रश्नांचे विवेचन करणे दूरच

राहिले, या प्रश्नाचा उल्लेखही केला जात नाही. निराधार परित्यक्त्या महिलेप्रमाणे सीमाभागातील स्त्री-पुरुषांची दुरवस्था झाली आहे. या दुरवस्थेबद्दल मौन बाळगण्यापेक्षा तिला जबाबदार असलेल्या सरकारांच्या, लोकप्रतिनिधींच्या आणि मतदारांच्या अनास्थेबद्दल साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरून स्पष्टपणे बोलणे हे मराठी भाषक लेखक म्हणून मला कर्तव्य वाटते. बेळगावात साहित्य संमेलन भरविण्याचे साहित्य महामंडळाने निश्चित केल्यावरच अध्यक्षपदासाठी माझे नाव सुचवणाऱ्यांना आवश्यक असलेली संमती मी दिली.

अध्यक्ष म्हणून बिनविरोध निवड झाल्यानंतर अनेक ओळखीच्या तसेच अनोळखी व्यक्तींनी पत्रे लिहून, खासगीरीत्या किंवा जाहीरपण अध्यक्षीय भाषणात मी कोणत्या विषयांना स्पर्श करावा किंवा करू नये याबद्दल सूचना केल्या. १९४३ साली सांगलीत भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. म. माटे यांनाही अध्यक्षीय भाषणात काय काय यावे याबद्दलच्या अपेक्षा कळविण्यात आल्या होत्या. "त्या सर्वांचा परामर्श घेणे म्हणजे लोकांनी दिलेल्या विषयांवर जमलेल्या लोकांसमोर अध्यक्ष नावाच्या माणसाने एक भाषण करणे एवढाच प्रकार होईल", असे बापूसाहेब माटे यांना वाटले आणि 'ऐकावे जनाचे, करावे मनाचे' या सूत्रानुसार त्यांनी आपल्याला महत्त्वाच्या वाटणाऱ्या विषयांचे विवेचन केले. तोच मार्ग मीही अनुसरला आहे.

साहित्यिकांनी राजकारण हा विषय वर्ज्य मानावा आणि सरस्वतीच्या दरबारात प्रवेश करताना राजकारणाचे जोडे बाहेर काढून ठेवावेत अशी सूचना पारतंत्र्याच्या काळात केली जात होती, तशीच ती आताही भारताच्या स्वातंत्र्याचा तसेच संविधानाचा सुवर्णमहोत्सव साजरा झाल्यानंतर केली जाते. साहित्य आणि राजकारण यांना एकमेकांपासून अलग ठेवण्याच्या प्रयत्नांना धुळे येथे १९४४ साली भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष भा. वि. वरेरकर यांनी निकराचा विरोध केला. साहित्य आणि राजकारण यांच्यामधील संबंध अभेद्य असून जीवनाचा मूळ पायाच पारतंत्र्याच्या काळातही कित्येक वर्षे राजकारणावर आधारलेला असल्यामुळे साहित्यासारख्या जीवनसंग्रामातील प्रमुख शस्त्राची राजकारणापासून फारकत करता येत नाही, असे वरेरकरांनी बजावले होते.

१९६४ साली मडगाव येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष वि. वा. शिरवाडकर उर्फ कुसुमाग्रज यांनी संमेलनात राजकारण आणू नका म्हणणाऱ्यांना विचारले होते, "राजकारणाची इतकी धास्ती का, म्हणून ? राजकारण आणि साहित्य या परस्परांना कधीही न भेटणाऱ्या समांतर रेषा आहेत असे मानणे साहित्याच्या बाजूने अडाणीपणाचे आणि राजकारणाच्या बाजूने धूर्तपणाचे लक्षण आहे. रस्त्यावरच्या कोलाहलापासून दूर असलेल्या ऐनेमहालात आपण वास्तव्य करीत आहोत, असा आभास त्यामुळे साहित्यिकाच्या मनात उत्पन्न होतो आणि या आभासाला हारतुरे घालून वेळप्रसंगी दान-देणग्या देऊन राजकारणी लोक साहित्याची विचारशीलता आपल्या

राखीव क्षेत्रापासून दूर ठेवीत असतात.''

आपला देश पारतंत्र्यात खितपत पडलेला असतानाही मराठी साहित्य संमेलनांनी राजकारणाकडे पाठ फिरवलेली नव्हती. मा. श्री. अणे, शि. म. परांजपे, वा. म. जोशी, कृ. प्र. खाडिलकर, वि. दा. सावरकर, शं. द. जावडेकर, लक्ष्मणशास्त्री जोशी, न. वि. गाडगीळ, वा. कृ. चोरघडे, व्यंकटेश माडगूळकर, वसंत बापट हे पूर्वाध्यक्ष साहित्यिक तर होतेच शिवाय स्वातंत्र्यलढ्यात त्यांनी विजनवास किवा कारावासही सोसला होता. मराठी साहित्य संमेलनाला राजकारणाचे वावडे नव्हते. भाषावार प्रांतरचना, गोव्याचे विलिनीकरण, सीमाप्रश्न यांसारखे प्रश्न भाषाविषयक आणि संस्कृतीशी संबंधित वाटले तरी त्यांना महत्त्वाचे राजकीय परिमाण असते आणि त्यांचे तात्कालिक तसेच दूरगामी राजकीय परिणामही होत असतात, याचे आपण सर्वांनी भान ठेवणे आवश्यक असते. स्वातंत्र्यपूर्वकाळात परक्या राजकर्त्यांनी जप्त केलेल्या पुस्तकांचा प्रश्न असो की निजामाच्या हैदराबाद संस्थानात केली जाणारी उर्दू भाषेची सक्ती असो, अगर महाराष्ट्र विद्यापिठाची मागणी असो, या प्रश्नांबाबत मतप्रदर्शन करताना शि. म. परांजपे, श्री. व्य. केतकर, द. वा. पोतदार, न. र. फाटक वगैरे अध्यक्षांनी राज्यकर्त्यावर निर्भयपणे टीका केलेली आढळते.

यंदाच्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षीय भाषण म्हणजे सीमाप्रश्नाविषयीचा निबंध होऊ नये. त्या शिळ्या कढीला ऊत आणण्याची नसती उठाठेव करू नये, झाले गेले विसरून जावे आणि २१ व्या शतकाला सामोरे जाण्यासाठी सज्ज व्हावे, असा सल्ला मला काही जणांनी मित्रत्वाच्या भावनेने दिला. हा प्रश्न सुटावा म्हणून निश्चित आणि समाधानकारक तोडगा सुचवा नाहीतर तोड बंद ठेवून जे जे होईल ते ते पहा, असेही मला काही जणांनी सांगितले. आपण अखिल भारतीय दृष्टिकोनातून सीमाप्रश्नाकडे पाहतो असे म्हणणारी मंडळी साळसूदपणे सवाल विचारतात, अखेर बेळगाव, कारवार, खानापूर, चिकोडी, हुकेरी, सुपा, हल्याळ, हुमणाबाद, भालकी, संतपूर आणि आळंद या तालुक्यातील गावे महाराष्ट्रात असली काय किवा कर्नाटकात असली काय सगळी भारतातच आहेत ना मग भाऊबंदकी कशासाठी ? हा प्रश्न फक्त मराठी भाषकांनाच विचारला जातो. तोच प्रश्न कन्नड भाषकांना कोणीही विचारीत नाही.

स्वातंत्र्यापूर्वकाळातल्या हिदुस्थानात तेलुगु आणि कन्नड भाषक नेत्यांनी एकीकरणासाठी प्रथम पुढाकार घेऊन परिषदा भरवल्या आणि वेगळ्या भाषिक प्रांताच्या निर्मितीसाठी आग्रही भूमिका घेतली. त्यांच्या तुलनेने मराठी भाषक नेत्यांनी महाराष्ट्राच्या एकीकरणाबाबत सौम्य व संमजस भूमिका घेतली. ती त्यांनी भाषावार प्रांतांबाबत विचार करताना स्वीकारलेल्या व्यापक दृष्टिकोनामुळे आणि स्वातंत्र्य मिळविण्यास अग्रक्रम दिल्यामुळे हे लक्षात घेतले पाहिजे.

१९२९ साली साहित्य संमेलन बेळगावात भरवावे असे आमंत्रण १९२८

साली ग्वाल्हेर येथे मा. श्री. अणे यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या साहित्य संमेलनाच्या वेळी देण्यात आले. ते स्वीकारले जाणार असे दिसू लागताच कर्नाटकातून काही जण ग्वाल्हेरला गेले आणि त्यांनी त्यास विरोध केला. मराठी साहित्य संमेलन बेळगावात भरवणे कर्नाटक एकीकरणाच्या तत्त्वास विघातक ठरेल म्हणून बेळगावचे आमंत्रण स्वीकारू नये, अशा आशयाच्या तारा ग्वाल्हेरला जिल्ह्यातील निरनिराळ्या संस्थांच्या नावाने पण सर्व बेळगावातून पाठविण्यात आल्या. कर्नाटक प्रांतिक कॉंग्रेसच्या समितीच्या वतीनेही अशी तार पाठविण्यात आली होती. ३ जून १९२८ रोजी दत्तोपंत बेळवी यांच्या अध्यक्षतेखाली येथे भरलेल्या सभेत भुजंगराव दळवी, डॉ. साठे आणि गंगाधरराव देशपांडे यांची भाषणे झाली आणि साहित्य संमेलनाचा उद्देश भाषावार प्रांतांच्या प्रश्नाला हात घालण्याचा नसल्याचा खुलासा करण्यात आला. दत्तोपंत बेळवी १९२९ च्या मे महिन्यात बेळगावात भरलेल्या कर्नाटक एकीकरण परिषदेचे स्वागताध्यक्ष होते. आपण कन्नडिग आहोत आणि आपल्याला कर्नाटकाचा आणि कन्नड भाषेचा अभिमान वाटतो, असे त्यांनी 'केसरी'ला मराठीत पत्र पाठवून जाहीर केले होते. ('केसरी', १९ मार्च १९२९)

एखाद्या भाषेवर प्रेम असणे किवा तिचा अभिमान बाळगणे म्हणजे दुसऱ्या भाषेचा दुस्वास करणे नव्हे. कर्नाटक एकीकरण परिषदेच्या बहुसंख्य कार्यकर्त्यांनी १९२८ साली हे तारतम्य दाखवले नाही. १९२८ साल इतिहासात संस्मरणीय ठरले ते सायमन आयोगावर देशातल्या बहुतेक सर्व राजकीय पक्षांनी बहिष्कार घातल्यामुळे आणि ठिकठिकाणी काळी निशाणे हातांत घेऊन त्या आयोगाच्या भेटीच्या वेळी निदर्शने करण्यात आल्यामुळे. तसेच 'स्वागत' १९२९ च्या मे महिन्यात बेळगावात भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनासाठी येणाऱ्या लोकांचे करावे, असे कर्नाटक एकीकरण परिषदेतील अतिरेकी मंडळींनी १९२८ साली ठरवले होते. तसे केल्यास त्याचे परिणाम चांगले होणार नाहीत, असे बेळवी, चौगुले, पोतदार, चिकोडी वगैरे बेळगावच्या पुढाऱ्यांनी बजावल्यामुळे प्रत्यक्षतः बेळगावच्या १९२९ च्या साहित्य संमेलनाच्या वेळी विरोधाचे प्रदर्शन कोठेही दिसले नाही.

ज्याप्रमाणे कर्नाटक एकीकरणाला महाराष्ट्राने कधीही विरोध केला नाही त्याप्रमाणे सबंध बेळगाव जिल्हाच महाराष्ट्रात समाविष्ट करावा, अशी मागणीहो कोणी १९२८-२९ साली केल्याचे आढळत नाही. २ एप्रिल १९२९ च्या 'केसरी'च्या अंकात महाराष्ट्राची भूमिका स्पष्ट करण्यात आली. "बल्लारी जिल्ह्यातील काही तालुक्यांसंबंधाने कर्नाटक प्रांतिक कॉंग्रेस कमिटीने मागणी केली, तेव्हा 'केसरी'चे संपादक केळकर कॉंग्रेसने नेमलेले पंच होते. १९२० साली राष्ट्रीय सभेची नवी घटना अंमलात आली. महाराष्ट्राला जर अगदी काटेकोरपणाने भांडून भाऊबंदकी साधावयाची असती तर बल्लारी जिल्ह्यातील काही भागासंबंधाने जसा कर्नाटकाने हक्क सांगितला व पंचायत

नेमून घेतली तशी गोष्ट महाराष्ट्रासही काही भागासबंधाने करता आली असती. परंतु त्याने ती तेव्हा केली नाही वास्तविक महाराष्ट्राला बेळगाव जिल्ह्याच्या पश्चिम तालुक्यांपैकी काही भागासंबंधाने असा हक्क सांगता येईल.''

दत्तोपंत बेळवी, गंगाधरराव देशपांडे, न. चि. केळकर आणि शि. म. परांजपे हे सगळे नेते लोकमान्य टिळकांचे शिष्य होते आणि कॉंग्रेसचे सदस्यही होते. भाषावार प्रांतरचना व्हावी, असे त्यांना वाटत असले तरी स्वातंत्र्यलढा यशस्वी होईपर्यंत या प्रश्नावर दुफळी माजवणे त्यांना योग्य वाटत नव्हते म्हणून हे सर्व नेते मराठी व कन्नड भाषकांमध्ये समेट घडवून आणण्याचा प्रयत्न करीत होते. मे अखेर भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाआधी त्याच महिन्यात बेळगावात भरलेल्या कर्नाटक एकीकरण सभेच्या चौथ्या परिषदेत गंगाधरराव देशपांडे यांनी समेट घडवून आणण्याचा अयशस्वी प्रयत्न केला, तेव्हा त्यांचा अतिरेकी प्रतिनिधीनी अपमान करून त्यांना ठरावही मांडू दिला नाही. त्या ठरावात काही फेरफार करून न. चि. केळकर यांनी मराठी साहित्य संमेलनाच्या विषयनियामक मंडळापुढे ठराव मांडला. बेळगाव जिल्हा हा कर्नाटकाचा एक भाग आहे व या जिल्ह्यात कानडी ही प्रमुख म्हणजे बहुसख्याकांची भाषा आहे, असे ठरावातील पहिल्या कलमात स्पष्टपणे नमूद करण्यात आले होते. हे पहिले कलम संमेलनाध्यक्ष शिवरामपंत परांजपे यांना व्यक्तिशः मान्य असले तरी ते साहित्य संमेलनाच्या अधिकार क्षेत्रात येत नसल्यामुळे शिवरामपंतांनी ते नियमबाह्य ठरवले आणि ते वगळून उरलेला ठराव त्यांनी स्वतःच संमेलनाच्या खुल्या अधिवेशनात मांडला

दुरुस्त केलेला हा ठराव केळकर, गंगाधरराव देशपांडे आणि बेळवी यांना मान्य नव्हता. त्यामुळे या तिघांनी विरुद्ध मत नोदविले. मात्र बाकी सर्वजण अनुकूल असल्यामुळे ठराव प्रचंड बहुमताने मंजूर करण्यात आला. या २४व्या ठरावात खालील कलमे होती. १) बेळगाव जिल्ह्यातील महाराष्ट्रीयांनी कानडी भाषेला या जिल्ह्यातील प्रमुख भाषा या नात्याने मान द्यावा. २) त्याबरोबरच या जिल्ह्यातील कर्नाटकीय लोकांनीही मराठी ही महत्त्वाची भाषा या नात्याने तिलाही योग्य तो मान द्यावा. संमेलनाचा समारोप करताना अध्यक्ष शिवरामपंत परांजपे म्हणाले, ''आम्ही एखाद्या भाषेचा फाजील अभिमान न धरता हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत एकच देश आहे असे मानतो. तेव्हा आपणही बेळगाव महाराष्ट्रात आहे का कर्नाटकात आहे असले वाद उकरून न काढता देशाच्या लढ्यात सर्वांच्या बरोबरीने भाग घ्यावा ही विनंती '' (शं. वि. जोगळेकर : उपरोक्त, पृ. ३९) साहित्य संमेलन पार पडल्यानंतर त्याचा आढावा घेताना 'केसरी'ने 'वारा सुटला पण आग विझली' असा निष्कर्ष काढला होता ('केसरी' ४ जून १९२९)

बेळगाव जिल्हा कर्नाटकाचा भाग असल्याबद्दल महाराष्ट्रातील नेत्यांचे एकमत असले तरी त्याचा अर्थ बेळगाव शहर व त्यालगतची प्राधान्याने मराठी भाषकांची वस्ती

असलेली गावे यांवरचा हक्क त्यांनी कायमचा सोडून दिला असा करणे चुकीचे होईल. आधी स्वराज्य मिळवण्यास अग्रक्रम द्यावयाचा आणि मग भाषावार प्रांतरचना करताना आपोआप निर्माण होणारा सीमाप्रश्न वाटाघाटी करून सोडवावयाचा अशी मराठी भाषकांची रणनीती होती. बेळगाव जिल्हा आणि बेळगाव शहर यांची गल्लत केली ती कर्नाटकाच्या नेत्यांनी. १९६६ साली म्हैसूर सरकारने Maharashtra and Mysore · Facts Relating to Border Dispute नावाची इंग्रजी पुस्तिका प्रकाशित केली. तीत पृ. २८ व २९ वर २९ मे १९२९ रोजी न. चि. केळकर आणि अन्य नेत्यांनी प्रकाशित केलेल्या पत्रकातील दोन परिच्छेद उद्धृत केले आहेत. त्यात तीन वेळा बेळगाव जिल्हा एवढाच उल्लेख केलेला असतानाही बेळगाव शहर असे शब्द घुसडून म्हैसूर सरकारने महाजन आयोगाचीही जाणूनबूजून दिशाभूल केलेली दिसते. बेळगाव जिल्हा कर्नाटकाचा भाग असून तो कर्नाटकातच राहील असे केळकरांचे म्हणणे होते. त्यांनी बेळगाव शहराचा उल्लेखही केलेला नसताना जिल्हा आणि शहर यांची सोयिस्कर गल्लत करून म्हैसूर सरकारने महाजन आयोगाला सादर केलेल्या ज्ञापनात नुसता बेळगाव असा संदिग्ध उल्लेख केला म्हैसूर राज्याचे वकील नंबियार यांनी न्या. मेहेरचंद महाजन यांच्यासमोर बाजू मांडताना त्याचेच अनुकरण केले. (Report of the Commission on Maharashtra-Mysore-Kerala Boundary Disputes Volume I, 1967, p 87) बेळगावात आधी भरलेल्या दोन संमेलनामध्ये बेळगावच्या प्रश्नाचा कसा विचार करण्यात आला होता, त्याच्या इतिहासाची आठवण ५४ वर्षानंतर करून देणे समयोचित ठरेल, असे मला वाटते.

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या अभिवृद्धीसाठी भारतीय संघराज्यात एकसंध, एकभूमी असलेला संयुक्त महाराष्ट्र हवा, अशी मागणी १९३९ साली अहमदनगर येथे भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष दत्तो वामन पोतदार यांनी प्रथम अध्यक्षीय भाषणात केली. १९४६ साली बेळगावात तिचा पुनरुच्चार करून माडखोलकरांनी त्याबद्दल विस्ताराने विवेचन केले. पोतदार आणि माडखोलकर या दोघानीही महाराष्ट्रातील राजकीय नेत्यांच्या उदासीनतेवर झोड उठवली पोतदारानी १९३९ सालीच राजकीय नेत्यांना इशारा दिला. "वेळ तर येऊ द्या, मग पाहू" असे धोरण या प्रश्नाबाबत ठेवू नये. या धोरणाने सर्व रंग बिघडेल आणि पस्ताव्याची पाळी येईल" 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'च्या तत्कालीन घटनेनुसार माडखोलकरांचे अध्यक्षपद ललित साहित्य विभागापुरतेच मर्यादित होते. तरीही बुद्धिपुर:सर औचित्यभग करून त्यानी सयुक्त महाराष्ट्राची मागणी या एकाच विषयाची अध्यक्षीय भाषणात चर्चा केली कारण "नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यत पसरलेल्या महाराष्ट्राचे जोपर्यंत एकीकरण होत नाही, तोपर्यंत मराठी भाषा आणि साहित्य यांचा सर्वांगीण उत्कर्ष होणे अशक्य आहे," असे त्यांना वाटत होते.

१९४६ पासून १९६० पर्यंत साहित्य संमेलनाचे व्यासपीठ म्हणजे संयुक्त

महाराष्ट्राचे रणक्षेत्र बनले होते महाराष्ट्राचे वेगळे राज्य अस्तित्वात आल्यावरही गोमंतकाचा व सीमाभागाचा प्रश्न संमेलनाच्या कार्यक्षेत्रात येतो असे सांगून १९६२ साली सातारा येथे भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष न. वि. उर्फ काकासाहेब गाडगीळ यांनी अध्यक्षीय भाषणात साहित्य संमेलनाची जबाबदारी तसेच त्याच्या मर्यादा स्पष्ट केल्या. "साहित्य संमेलन हे महाराष्ट्रीय मनांमध्ये काय खळबळ माजली आहे, हे सांगणारे एक साधन आहे. महाराष्ट्रीयांच्या आकांक्षा बोलून दाखविणारी ही एक संस्था असून तिला मिळालेली प्रतिष्ठा लक्षात घेता तिने आपले कार्य निर्भयपणे पण जबाबदारीने पार पाडले पाहिजे. काय हवे आहे, काय इष्ट आहे, काय अन्याय होत आहे या सर्वांचा जाहीर उच्चार येथून झाला पाहिजे. प्रत्यक्ष चळवळ करणारी संस्था ही नव्हे. ते कार्य राजकीय पक्षांनी करावयाचे असते."

१९४६ च्या साहित्य संमेलनामुळे महाराष्ट्रात सर्वपक्षीय 'संयुक्त महाराष्ट्र परिषद' स्थापन करण्यात आली. मुंबईसह महाराष्ट्र राज्याच्या निर्मितीचा प्रश्न आणि सीमाप्रश्न वाटाघाटी करून सामोपचाराने सोडविण्याचे संयुक्त महाराष्ट्र परिषदेचे सर्व प्रयत्न अयशस्वी ठरले. राज्य पुनर्रचना आयोगाने मराठी भाषकांच्या मागण्या फेटाळल्यानंतर १८ नोव्हेंबर १९५५ ते ५ फेब्रुवारी १९५६ या कालावधीत मोर्चे, निदर्शने, हरताळ, लाठीहल्ले, महाराष्ट्रवादी नेत्यांची धरपकड, अश्रुधुराचा वापर, गोळीबार यांमुळे सत्ताधारी कॉंग्रेस पक्षाविरुद्ध पश्चिम महाराष्ट्रात आणि सीमाभागात जनमत प्रक्षुब्ध झाल्याचे स्पष्ट झाले. मुंबईत आणि बेळगावात झालेल्या गोळीबारात निरपराध माणसे बळी पडली. १९५६च्या जुलै-ऑगस्टमध्ये कॉंग्रेसचे खासदार व्ही. के. ढगे यांनी १९ बैठका आयोजित करून सीमाप्रश्नाबाबत तोडगा काढण्याचा प्रयत्न केला पण हटवादी कन्नड भाषक खासदारांमुळे तो निष्फळ ठरला. सीमा भागातील मराठी भाषकांनी सत्याग्रह, करबंदीची चळवळ, उपोषणे वगैरे स्वातंत्र्यलढ्यात वापरण्यात आलेल्या उपायांचा अवलंबही केला; पण कायदा आणि सुव्यवस्था राखण्याच्या नावाखाली दडपशाहीचे धोरण स्वीकारण्याखेरीज कर्नाटक सरकारने दुसरा कोणताही प्रतिसाद दिला नाही. खेडे हा घटक मूलाधार मानावा तसेच भौगोलिक सलगता, सापेक्ष बहुसंख्या आणि ग्रामपंचायतीपासून राज्यविधानसभेपर्यंतच्या निवडणुकीत व्यक्त झालेली लोकेच्छा या अन्य तत्त्वांची त्याला जोड देऊन सीमा निश्चित कराव्यात अशी महाराष्ट्राची आरंभापासून आजतागायत भूमिका आहे, पण कर्नाटक सरकारने ती कधीही मान्य केली नाही आणि महाजन आयोगानेही अहवालात कर्नाटक सरकारची री ओढली. त्यामुळे 'जैसे थै' ही अवस्था आजतागायत कायम राहिली. ती बदलण्यासाठी महाराष्ट्र सरकारनेही आजपर्यंत काही ठोस उपाययोजना केल्याचे दिसत नाही आणि केंद्रशासनही हालचाल करण्यास तयार नाही.

भारतीय संविधानातील तिसऱ्या क्रमांकाच्या कलमानुसार भारतीय संघराज्यात

एखाद्या घटक राज्याचे विभाजन करणे, नवे घटक राज्य अस्तित्वात आणणे, घटक राज्याचा भूप्रदेश वाढवणे किवा कमी करणे, त्याचे नाव बदलणे किवा त्याच्या सीमा बदलणे हे सर्व अधिकार सर्वस्वी संसदेला देण्यात आले आहेत. त्यासाठी जे विधेयक मांडणे आवश्यक असते ते केवळ केद्रशासनालाच संसदेत सादर करता येते. बिनसरकारी प्रस्ताव अगर विधेयक सादर करून खासदाराला सभागृहात चर्चा घडवून आणता येते; पण केद्र सरकारने त्याचा तत्त्वत: स्वीकार करून सरकारी विधेयकाच्या स्वरूपात ते सादर करणे आवश्यक असते असे विधेयक संसदेत मंजूर केले जाण्यापूर्वी ते संबंधित राज्यांच्या विधानमंडळांकडे पाठवून त्यांना विशिष्ट मुदतीत विधेयकाबद्दल मते व्यक्त करण्याची संधी देणे राष्ट्रपतीवर म्हणजे केद्रशासनावर बंधनकारक असते. मात्र राज्यविधानमंडळाने एकमताने अगर बहुमताने मजूर केलेला पस्ताव किवा शिफारस स्वीकारण्याचे बंधन केद्रशासनावर नसते याचाच अर्थ असा की, सीमाप्रश्न सोडविण्याची जबाबदारी मुख्यत: आणि मूलत: संसदेची आणि केद्रशासनाची आहे गेल्या ४४ वर्षात केद्रात विविध राजकीय पक्षांची मंत्रिमंडळे आली आणि गेली. त्यांच्यापैकी कोणत्याही केद्रीय मंत्रिमंडळाने पुढाकार घेऊन सीमाप्रश्न सोडविण्यासाठी प्रयत्न केला नाही. श्रीमती इंदिरा गांधी यांनी महाजन आयोगाची नियुक्ती केली तीही सेनापती बापट, बा रं सुंठणकर, बळवंतराव सायनाक आणि पुंडलीकजी कातगडे यांनी २० मे १९६६, रोजी प्राणांतिक उपोषण सुरू केल्यानंतर.

१ नोव्हेबर १९५६ रोजी म्हैसूर राज्य अस्तित्वात आल्यानंतर त्या राज्याचे मुख्यमत्री निजलिगप्पा बेळगाव शहराच्या प्रश्नाचा एकदा निर्णय लागला असून तो कायम स्वरूपाचा असल्यामुळे त्याबाबत फेरविचार करण्याचा प्रश्नच उद्भवत नाही, असे म्हणू लागले तर केद्रीय गृहमंत्री गोविद वल्लभ पत आणि द्विभाषिक मुंबई राज्याचे मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण पश्चिम विभागीय मंडळामार्फत सीमाप्रश्न सोडवला जाईल, असे जाहीर आश्वासन देऊ लागले. २५ एप्रिल १९६० रोजी द्विभाषिक मुंबई राज्याची पुनर्रचना करणारा कायदा संसदेने मजूर केला तोपर्यन सीमाप्रश्न विचाराधीनच राहिला.

महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आल्यानंतर यशवतराव चव्हाण आणि बसप्पा जत्ती या दोघा मुख्यमंत्र्यांनी महाराष्ट्राचे दोन आणि कर्नाटकाचे दोन असे चार प्रतिनिधी एकत्र येऊन सीमाप्रश्नाचा अभ्यास व चर्चा करतील आणि अहवाल सादर करतील अशी ५ जून १९६० रोजी घोषणा केली सीमा निश्चित करताना भौगोलिक दृष्ट्या लगत असलेल्या भूप्रदेशाचा विचार व्हावा याबाबत चौघा सदस्यामध्ये झालेले एकमत वगळले तर अन्य प्रश्नांबाबतचे मतभेद मिटले नाहीत. खेडे हा मूलभूत घटक मानावा, निवडणुकीद्वारा व्यक्त झालेली लोकांची इच्छा हीदेखील महत्त्वाची मानावी. कोणती भाषा बोलणारे लोक वादाचा विषय बनलेल्या सीमाभागात बहुसख्य आहेत, हे ठरवताना कोकणी आणि मराठी भाषकांचा एकाच गटात समावेश करावा आणि बिदर जिल्ह्यातील

वादग्रस्त प्रदेशाबाबतचा तंटा मिटला असे न समजता त्याचा फेरविचार व्हावा यापैकी कोणतीही सूचना कर्नाटकाच्या प्रतिनिधींनी आणि १९६७ मध्ये महाजन आयोगाने मान्य केली नाही. महाजन आयोगाने तर निश्चित तत्त्वांच्या आधारे सीमाप्रश्न सोडवण्याचा प्रयत्न केल्यास अडचणी अधिकच वाढतील, असे मत व्यक्त केले. महाजन आयोगाचा अहवाल आपल्याला सर्वस्वी अनुकूल आहे, हे लक्षात घेऊन १९६७ पासून कर्नाटक सरकारने त्यातील शिफारशी केंद्र सरकारने आणि महाराष्ट्र सरकारनेही स्वीकाराव्यात अशी सोयीची भूमिका घेतली. सीमाप्रश्नाची कोंडी आजतागायत तशीच आहे. ती फोडण्यासाठी केंद्रशासनाने कधीही पुढाकार घेतला नाही आणि महाराष्ट्र सरकारनेही त्यासाठी केंद्रसरकारवर दबाव आणला नाही.

राज्याराज्यांमधील तंट्याबाबत चौकशी करून सल्ला देण्यासाठी आंतरराज्य परिषद स्थापन करावी, अशी तरतूद संविधानाच्या शिल्पकारांनी २६३व्या कलमात केलेली होती. आंतरशासकीय संबंधांबद्दल सल्ला देण्यासाठी अमेरिकेच्या संघराज्यात एक आयोग नियुक्त केला जातो. त्या धर्तीवर भारतातही आंतरराज्य परिषद नेमावी, अशी १९६९ साली प्रशासकीय सुधारणा आयोगाने आणि १९८८ साली सरकारिया आयोगाने शिफारस केली. १९९० मध्ये डाबर इंडिया लिमिटेड विरुद्ध उत्तर प्रदेश सरकार या खटल्याचा निकाल देताना सर्वोच्च न्यायालयानेही २६३ व्या कलमातील तरतुदीनुसार आंतरराज्य परिषद स्थापन करण्याची आवश्यकता असल्याचे मत व्यक्त केले. पंतप्रधान विश्वनाथ प्रतापसिग यांच्या नेतृत्वाखालच्या जनता दलाच्या अल्पायुषी सरकारने अखेर १९९० साली आंतरराज्य परिषद स्थापन केली. गेल्या दहा वर्षात या परिषदेनेही सीमाप्रश्न सोडवण्याच्या दृष्टीने काही ठोस पावले उचलल्याचे दिसत नाही विभागीय मंडळांप्रमाणे (झोनल कौन्सिल) आंतरराज्य परिषददेखील निष्क्रिय ठरली आहे. संविधानाचे पुनरावलोकन करण्यासाठी यदाच नेमण्यात आलेल्या ११ सदस्याच्या आयोगात न्या. सरकारिया यांचाही समावेश करण्यात आला आहे. आतरराज्य परिषद नेमण्याची १९८८ साली शिफारस करणारे न्या. सरकारिया आणि त्यांचे सहकारी आंतरराज्य परिषदेच्या आजवरच्या कामगिरीचा आढावा घेणार आहेत की नाहीत, कोण जाणे ! आंतरराज्य परिषदेला शोभेच्या बाहुलीची कळा आलेली आहे.

कोणताही तंटा सोडवण्यासाठी आवश्यक त्या इच्छाशक्तीचा मुळातच अभाव असेल तर घटनेत नुसत्या तरतुदी असून काय उपयोग ? दोन किवा दोहोपेक्षा जास्त राज्यांमध्ये अगर संघशासन आणि राज्यशासन यांच्यामध्ये कायदेशीर तरतुदीबाबत अगर वास्तविक स्थितीबद्दल तंटा उद्भवला तर त्याचा निर्णय देण्याची मूल अधिकारिता (ओरिजिनल ज्युरिसडीक्शन) घटनेच्या १३१व्या कलमान्वये फक्त सर्वोच्च न्यायालयाला देण्यात आली आहे. पश्चिम बंगाल, राजस्थान आणि कर्नाटक या राज्याच्या केंद्रशासनाविरुद्धच्या तंट्यांच्या तीन प्रकरणाचा सर्वोच्च न्यायालयाने निर्णय दिला

आहे. केवळ कायदेशीर हक्काबाबतचे प्रश्नच नव्हेत तर राजकीय स्वरूपाच्या प्रश्नांबाबतही निर्णय देणे सर्वोच्च न्यायालयाने वर्ज्य मानलेले नाही. महाराष्ट्र राज्याने कर्नाटक राज्याबरोबरचा सीमेबाबतचा तंटा मिटवण्यासाठी का कोण जाणे सर्वोच्च न्यायालयाकडे धाव घेतलेली नाही. सीमाप्रश्नाचा एकदाचा सोक्षमोक्ष लावण्यासाठी हा सनदशीर मार्ग एकदा वापरून तरी पाहण्यासारखा आहे.

सीमाप्रश्न सोडवण्याची केंद्र सरकारची खरोखरच इच्छा असेल तर या सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नाचा विचार करून आपल्या मताबाबतचा अहवाल सादर करावा, ही कामगिरी घटनेच्या १४३व्या कलमानुसार सर्वोच्च न्यायालयाकडे सोपवण्याचा अधिकार राष्ट्रपतीना वापरता येईल. त्याचा वापर राष्ट्रपतीनी काही वेळा केलाही आहे. ४४ वर्षे लोबकळत राहिलेल्या सीमाप्रश्नाबाबत राष्ट्रपतीनी म्हणजे केद्रशासनाने सर्वोच्च न्यायालयाचे मत अजमावून पाहण्याचा विचारही केलेला दिसत नाही. इच्छा असेल तर मार्ग सापडतो म्हणतात. जोपर्यंत केंद्र सरकारकडे तसेच महाराष्ट्र सरकारकडेही इच्छाशक्तीचा अभाव आहे, तोपर्यत सीमाप्रश्नाचे हे घोगडे असेच भिजत पडणार. हा प्रश्न सोडवणे ही साहित्य संमेलनाच्या अध्यक्षाची जबाबदारी नाही. ती ज्यांची आहे ते याबाबत उदासीन आहेत, या वस्तुस्थितीची संमेलनाच्या काही पूर्वाध्यक्षांप्रमाणे सर्व सबंधितांना पुन्हा एकदा आठवण करून देणे, हे त्याचे कर्तव्य आहे.

अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे रूपांतर सीमा परिषदेत झाले आहे की काय असे आपल्यापैकी काहीना वाटले असेलही. अनेक वर्षे साहित्य संमेलनाच्या विषयसूचीत समाविष्ट असलेल्या सीमाप्रश्नाबाबत अलिकडच्या वर्षातील संमेलनाध्यक्षांनी मौन धारण केलेले आढळल्यामुळे या प्रश्नाची आठवण करून देणे अटळ झाले. १९६० च्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष रा. श्री. जोग यांनी डांगी ही मराठीवर आधारलेली बोली असल्याचे भाषिक अभ्यासाच्या आधारे सिद्ध केले होते; पण मुंबईसह महाराष्ट्राचे वेगळे राज्य अस्तित्वात यावे, यासाठी अधीर झालेल्या नेत्यांनी "केवळ राजकीय कार्यसाधनेपायी त्यावर पाणी सोडल्याचे" दिसल्यावर रा. श्री. जोग यांना अध्यक्षीय भाषणात त्याबद्दलचे दुःख व्यक्त केल्याशिवाय राहवले नाही. महाराष्ट्राने डांग गमावल्याचा उल्लेखही न केल्यास ती कर्तव्यच्युती होईल, असे त्यांना वाटले. बेळगावसकट सीमा भागातील मराठी प्रदेशावर महाराष्ट्रातील सर्व राजकीय पक्षाच्या नेत्यांनी अद्याप पाणी सोडलेले नसले तरी गेली तीन दशके हा प्रश्न सोडविण्याची त्यांना निकड वाटलेली नाही. एवढेच नव्हे तर त्यांची उदासीनता वाढलेली आहे, या वस्तुस्थितीचा उल्लेखही न केल्यास ती कर्तव्यच्युती होईल, असे मला वाटते.

संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या काळात "दबदबा कोर्ट कचेरीचा, खोट्या वकिलीचा, परक्या भाषेचा, आम्ही नष्ट आता करणार" असा निर्धार संयुक्त महाराष्ट्राच्या पोवाड्यात कविवर्य वसंत बापट यांनी व्यक्त केला होता. महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले

त्यालाही यंदा चाळीस वर्षे पुरी होतील. आर्थिक व्यवहार, राज्यकारभार, विद्यापीठातील शिक्षण, न्यायदान वगैरे मराठीतूनच होईल, अशी अपेक्षा होती. मराठी राजभाषा नव्हती तेव्हाही माधव ज्युलियन मायबोलीबद्दल म्हणत होते, "हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडू, वसे आमुच्या मात्र हृन्मंदिरी, जगमान्यता हीस अर्पू प्रतापें, हिला बैसवू वैभवाच्या शिरीं" मराठीला राजभाषा म्हणून मान्यता मिळाली. १९७९ हे वर्ष राजभाषा म्हणून साजरे करण्यात आले. १९८५ सालापर्यंत शासकीय व्यवहारात शंभर टक्के मराठीचा वापर केला जाईल, अशी घोषणाही करण्यात आली; पण प्रत्यक्षत: २००० सालातही तिला मूर्त रूप मिळाल्याचे दिसत नाही. ४ फेब्रुवारी १९६७ रोजी नागपूर विद्यापीठाच्या दीक्षान्त समारंभात भाषण करताना दत्तो वामन पोतदार म्हणाले, "स्वतंत्र राज्य असावे तर त्याची स्वतंत्र भाषा असावी. ते राज्य जनसामान्यांचे असावे तर अशी भाषा जनसामन्यांची असावी. स्वत:च्या भाषेची घोडी असल्याशिवाय स्वातंत्र्याला शोभा नाही आणि जनसामान्यांना वाचा नाही." इंग्रजी भाषेच्या घोडीवरून खाली उतरण्याचा आपल्याला धीर होत नाही. इंग्रजीच्या खिडकीतून आपण जगाकडे पाहतो, एवढेच नव्हे तर आपण कसे दिसतो किवा आहोत, तेही इंग्रजीच्या आरशात पाहून आपण ठरवीत असतो.

अलीकडे माहिती आणि तंत्रविद्येच्या क्षेत्रात क्रांती झाल्यापासून इंग्रजी भाषेचे वर्चस्व कमी होण्याऐवजी अनेक पटीनी वाढले आहे. इ. स. २०५० मध्ये इंग्रजीचा वापर करणारे लोक सबंध जगाच्या एकूण लोकसंख्येमध्ये पन्नास टक्क्याहून अधिक असतील असा भवितव्यशास्त्राच्या (फ्युचरॉलॉजी) अभ्यासकांचा अंदाज आहे. ब्रिटिश साम्राज्याचा अस्त झाला तरी इंग्रजी या ज्ञानभाषेच्या अजगराने भारतीय भाषांना घातलेला विळखा अधिकच घट्ट झालेला आहे. ऑक्सफर्ड इंग्रजी शब्दकोशाच्या १९२८ सालच्या आवृत्तीत दोन लाख शब्दांचा संग्रह केलेला होता. १९८९ च्या आवृत्तीत दोन लाख चाळीस हजार शब्द होते. तर इ. स. २०१० मध्ये हीच संख्या ६ लक्ष शब्द इतकी असेल. इंग्रजी भाषा हेच मुख्यत: इंटरनेटचे माध्यम असल्यामुळे ती आता अर्ध्या अधिक जगाची भाषा बनली आहे. १९९९ साली सायबर विश्वात सीडी-रॉमच्या रूपात प्रसृत करण्यात आलेल्या एनकार्टा जागतिक इंग्रजी शब्दकोशात एक लाख शब्द असले तरी त्यात शब्दांबरोबरच त्यांचे संदर्भ आणि व्युत्पत्तीही पाहता येतात, असे ब्रायन ॲपलयार्डने लंडनच्या 'संडे टाइम्स'मधील लेखात नमूद केलेले आढळते. शब्दसंपत्ती तसेच एकाच शब्दाच्या अर्थाच्या अनेक छटा या बाबतीत इंग्रजी भाषा जशी गर्भश्रीमंत आहे, तशी मराठी नाही. असे असतानाही "मराठी भिकारीण झाली तरीही कुशीचा तिच्या तीस केवी त्यजी ?" असा प्रश्न माधव ज्युलियन यांच्याप्रमाणे आजही विचारण्यासारखा आहे.

वर्णमालेचा वापर ही मानवी इतिहासातील पहिली क्रांतिकारक घटना म्हणता

येईल. पंधराव्या शतकाच्या मध्यावर दुसरी क्रांतिकारक घटना घडली. गटेबर्गने पहिली पाने मुद्रित केली तेव्हा हस्तलिखितांचे युग संपून छापील पुस्तकांचे युग सुरू झाले. छापखान्यामुळे युरोपात गद्यलेखास काव्यलेखनापेक्षाही जास्त महत्त्व दिले जाऊ लागले. बोलले जाते ते वाङ्मय आणि लिहिले जाते ते साहित्य असे मानले तर मराठीत विशेषतः गद्यलेखनास जोरदार चालना मिळाली ती १९ व्या शतकाच्या सुरुवातीस मराठी वाङ्मयास मुद्रणाची जोड मिळाल्यानंतर. लहानमोठ्या समुदायास काही सांगणे आणि त्याने ते ऐकणे यापेक्षा एकट्याने मुद्रित मजकुराचे मूकवाचन करून मनन आणि चिंतन करण्यास महत्त्व आले, ते १९व्या शतकाच्या उत्तरार्धात.

न्या. रानडे यांनी घेतलेल्या मराठी साहित्याच्या आढाव्यानुसार १८१८ ते १८९६ या जवळजवळ ८० वर्षांच्या काळात मराठीत ९१५८ पुस्तके प्रकाशित झाली. शिवरामपंत परांजपे यांनी बेळगावच्या साहित्य संमेलनात दिलेल्या माहितीनुसार १९११ ते १९२० या दशकात ४१२६ मराठी पुस्तके प्रकाशित झाली. १९३२ ते १९६२ या तीस वर्षांच्या काळात चाळीस हजार मराठी पुस्तके प्रकाशित झाली, अशी माहिती १९६२ साली साताऱ्यास भरलेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात न. वि. गाडगीळ यांनी दिलेली आढळते. साक्षर मराठी भाषकांची एकूण संख्या लक्षात घेता मराठीत दरवर्षी प्रकाशित होणाऱ्या पुस्तकांची संख्या फार मोठी किंवा नजरेत भरण्याजोगी आहे, असे म्हणता येत नाही. "थोडे दिन तरी मद्य वर्ज्य करा, तोच पैसा भरा ग्रंथांसाठी" या महात्मा जोतीराव फुले यांनी गेल्या शतकात केलेल्या विनवणीकडे त्यांच्या समकालीनांनी दुर्लक्ष केले, तसेच आपणही आज करीत असतो.

"या देशात ग्रंथकारास उत्तेजन द्यावे व स्वस्त दराने ग्रंथ प्रसिद्ध व्हावे" या हेतूने 'लोकहितवादी' गोपाळ हरी देशमुख आणि न्या. रानडे यांनी ११ मे १८७८ रोजी पुण्यात मराठी ग्रंथकारांचे संमेलन भरविले. दरसाल पाच रुपयांचे ग्रंथ घेण्याची इच्छा असलेल्यांनी सही करावी आणि एक हजार माणसांच्या सह्या मिळाल्यास 'मराठी ग्रंथोत्तेजक मंडळी' स्थापन करून चागले ग्रंथ लिहून घेऊन ते छापण्याची योजना आम्ही हाती घेऊ, असे लोकहितवादी आणि रानडे यांनी ७ फेब्रुवारी १८७८ रोजी 'ज्ञानप्रकाश' मध्ये जाहीर पत्रक प्रसिद्ध करून आवाहन केले होते; पण ग्रंथकारांनी त्यांना फारच थोडा प्रतिसाद दिला. १८७८ ते १९०८ या तीस वर्षांत सहा ग्रंथकार संमेलने भरली. १९०९ पासून ती 'महाराष्ट्र साहित्य संमेलन' या नावाने भरू लागली. १९५४ मध्ये त्यांचे 'अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलन' असे नामांतर करण्यात आले. 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'च्या मार्फत भरवली जाणारी साहित्य संमेलने १९६५ पासून अ. भा. साहित्य महामंडळामार्फत भरू लागली.

ग्रंथकारांच्या संमेलनात भाग घेणारी मंडळी मोजकी असत आणि स्वखर्चाने ती संमेलनास येत असत. १९०९ साली 'मराठी साहित्य परिषदे'ने बडोद्यात भरवलेल्या

संमेलनास सयाजीराव गायकवाड यांचा राजाश्रय लाभला होता. या संमेलनास हजर असलेल्या राजवाड्यांनी लिहिले आहे, "संमेलनाला दोन अडीच हजारांची रक्कम मिळाली. ही रक्कम म्हणजे फार जबरी झाली असे नाही. परंतु दरवर्षी पाऊणशे टिकल्या जमविता जमविता जेथे मारामार पडत असे त्या मानाने यंदाचे साल चिटणिसांना बऱ्यातले गेले यात संशय नाही." १७ मे १९२५ रोजी पुण्यात इतिहासाचार्य राजवाड्यांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या शारदोपासक संमेलनास ८२ साहित्यसेवक स्वखर्चाने हजर होते. या संमेनास वास्तविक खर्च पाचपन्नास रुपयेसुद्धा झाला नाही, असे दत्तो वामन पोतदार यांनी स्वागताध्यक्ष या नात्याने केलेल्या भाषणात म्हटलेले आढळते.

स्वातंत्र्योत्तर काळात मंत्री किंवा खासदार अगर आमदार असलेल्या व्यक्ती साहित्य संमेलनाच्या स्वागताध्यक्ष होऊ लागल्या. १९५४ साली दिल्लीत भरलेल्या संमेलनाचे अध्यक्ष लक्ष्मणशास्त्री जोशी, स्वागताध्यक्ष न. वि. गाडगीळ आणि उदघाटक जवाहरलाल नेहरू हे तिघेही सत्ताधारी कॉंग्रेस पक्षाशी संबंधित स्वातंत्र्यसैनिक आणि लेखक होते. संमेलनाच्या संयोजनात सत्ताधारी पक्षाचे प्रस्थ वाढू लागले. सत्ताधारी पक्षाला पसंत पडतील असे ठराव प्रथम विषय नियामक समितीत आणि नंतर खुल्या अधिवेशनात मंजूर व्हावेत, यासाठी प्रयत्न होऊ लागले.

१९५७ साली औरंगाबादला भरलेल्या साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष देवीसिंग चौहान द्विभाषिक मुंबई राज्याच्या कॉंग्रेस मंत्रिमंडळात उपमंत्री होते. अनेक भाषांवर प्रभुत्व असलेले ते एक विद्वान संशोधक होते. तसेच हैदराबाद मुक्तिलढ्यातही त्यांनी सक्रिय सहभाग घेतला होता. संमेलनाच्या अर्थसंकल्पात वीस हजार रुपयांची तरतूद करण्यात आली होती आणि आवश्यक निधीसाठी जिल्हा लोकल बोर्ड आणि काही नगरपालिका यांच्याकडून देणग्या गोळा करण्यात आल्या होत्या. देवीसिंग चौहान आणि न. वि. गाडगीळ यांनी संमेलनाने द्विभाषिक राज्याच्या विरुद्ध ठराव मंजूर करू नये, यासाठी प्रयत्न केले पण संमेलनाध्यक्ष अनंत काणेकर यांनी ठाम भूमिका घेतल्यामुळे कॉंग्रेस नेत्यांचे डावपेच यशस्वी ठरले नाहीत स्वागताध्यक्ष पहिल्या दिवशीचा कार्यक्रम संपल्यावर मुंबईस निघून गेले. औरंगाबादच्या साहित्य संमेलनास मी हजर होतो. सत्तेच्या राजकारणाचे संमेलनावर पडलेले सावट मी पाहिलेले आहे. संमेलनाध्यक्षांनी आपल्या भाषणातील टीकेचा सूर सौम्य केला नाही तर स्वागताध्यक्ष आणि संमेलनाचे बरेच पदाधिकारी राजीनामे देऊन पेचप्रसंग निर्माण करतील अशी भाषा ऐकू येत होती. गावातल्या अनेक प्रमुख आणि सत्प्रवृत्त व्यक्तीना पुढे करून आपल्यावर दडपण आणण्याचे प्रयत्न झाल्याचे अनंत काणेकरांनी 'मराठा' वृत्तपत्रास दिलेल्या मुलाखतीत सांगितले. "संमेलनाध्यक्षांचे भाषण आधी छापण्यासाठी येते, याचा फायदा घेऊन त्यातील मुद्यांबद्दल अध्यक्षांवर दडपण आणण्याचा प्रयत्न झाला" तेव्हा काणेकरांसारख्या प्रसन्नवदन जगन्मित्रालाही चीड आली. "परीक्षेचा पेपर चोरून

आणणाऱ्या विद्यार्थ्यांची नीती आणि ही (राजकारण्यांची) नीती यात फरक काय ?'' असाही काणेकरांनी जाहीर प्रश्न विचारला. ('मराठा' : १२ मे १९५७)

दादर सार्वजनिक वाचनालयाने ६, ७ व ८ फेब्रुवारी १९९९ रोजी शिवाजी पार्कमध्ये आयोजित केलेल्या ७२व्या अ. भा. साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष मनोहर जोशी यांनी तर एक विक्रमच केला. समारोपाच्या वेळी संमेलनाध्यक्ष वसंतराव बापटांनी बाळासाहेब ठाकरे यांच्यावर टीका करू नये, अशी त्यांनी विनंती केली. अध्यक्षांनी तिच्याकडे दुर्लक्ष करून शिवसेनाप्रमुखांवर झोड उठवली त्यामुळे संमेलनाचा नूर बदलून गेला. संमेलनाध्यक्षांना आपल्या तालावर कळसूत्री बाहुल्याप्रमाणे नाचवता येईल, ही सत्ताधाऱ्यांची कल्पना चुकीची ठरली. करदात्यांकडून गोळा केलेल्या पैशांतून लाखो रुपयांचे अनुदान जाहीर करावयाचे आणि नंतर ते रोखून धरावयाचे हा गैरप्रकारही गतवर्षी प्रथमच घडला. पारतंत्र्याच्या काळात साहित्यसंस्था आणि साहित्यिक एकत्र येऊन साहित्य संमेलन भरवीत असत. बडोदे, इंदूर, ग्वाल्हेर, कोल्हापूर, औंध वगैरे संस्थानांचे राजे महाराजे साहित्य संमेलने यशस्वी व्हावीत म्हणून मदत करीत असत.

अलीकडच्या वर्षात राजकीय नेतेच साहित्य संमेलन आयोजित करीत आहेत. ७२ वे अ. भा. म. साहित्य संमेलन भरवणाऱ्या संस्थेच्या वार्षिक अहवालात दिलेल्या माहितीनुसार परळी वैजनाथ येथे भरलेल्या ७१ व्या संमेलनाच्या थोडे दिवस आधी म्हणजे १९ एप्रिल १९९८ रोजी दादर सार्वजनिक वाचनालयाच्या प्रमुख कार्यवाहांना ''मुख्यमंत्र्यांच्या कार्यालयातून दूरध्वनी आला. तेथील अधिकाऱ्यांनी विचारणा केली की पुढील साहित्य संमेलन दादरमध्ये व्हावे, अशी मा. मुख्यमंत्र्यांची इच्छा आहे. आपली संस्था या संमेलनाचे आयोजकत्व स्वीकारण्यास तयार आहे काय ? मा. मुख्यमंत्री श्री. मनोहर जोशी यांच्याशी प्रत्यक्ष दूरध्वनीवर बोलून संमेलनाचे आयोजकत्व स्वीकारण्यास अनुमती दिली. सुदैवाने माननीय मुख्यमंत्र्यांनी शासकीय अनुदान त्वरित दिल्याने काम सुलभ झाले... संस्थेचे अध्यक्ष श्री. सुधीर जोशी (शालेय शिक्षणमंत्री, महाराष्ट्र राज्य) तसेच मा. मुख्यमंत्री श्री. मनोहर जोशी यांनी या संपूर्ण आयोजनात कुठेही हस्तक्षेप केला नाही. आवश्यक तेथे मार्गदर्शन जरूर केले व त्यामुळेच हे संमेलन यशस्वी होऊ शकले.'' संमेलनाचा हा अधिकृत अहवाल वाचताना मला एक प्रश्न पडला. संमेलनाध्यक्ष वसंतराव बापट यांनी समारोपाच्या वेळी शिवसेनाप्रमुख श्री. बाळासाहेब ठाकरे यांच्यावर टीका करू नये, या स्वागताध्यक्षांनी केलेल्या विनंतीला मार्गदर्शन म्हणावयाचे की हस्तक्षेप अगर स्वागताध्यक्षांनी संमेलनाध्यक्षांच्या वाजवी अधिकारांवर केले अनधिकृत अतिक्रमण ? साहित्य संमेलने सत्ताधीशांच्या मर्जीप्रमाणे भरू लागली की असे गैरवर्तन होणे अपरिहार्य होते. मराठी साहित्य संमेलनांचा साधार. सविस्तर किवा समग्र इतिहास लिहिण्याच्या फंदात आजपर्यंत कोणी पडलेले नाही. २१व्या शतकात कोणी असा इतिहास लिहून प्रसिद्ध केला तर आपण कोठून

निघालो आणि कोठे येऊन पोहोचलो हे समजावून घेणे पुढील पिढ्यांना शक्य होईल.

मराठी भाषेचे आणि साहित्याचे रूप हळूहळू कसे पालटले आणि आजही कसे बदलते आहे हे पाहणेही आवश्यक आहे. १९३९ साली कोल्हापूरात भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष सयाजीराव गायकवाड यांनी मराठी वाङ्मय विशिष्ट वर्गाने विशिष्ट वर्गासाठीच लिहिले गेल्यामुळे ते एकांगी झाले असल्याची रास्त टीका केली. "जुन्या ग्रंथांस सर्व जातीच्या लेखकांचा हात लागलेला आहे, पण गेल्या पन्नास वर्षातल्या कादंबऱ्यांची, नाटकांची किवा गोष्टीची पात्रे पांढरपेशा वर्गातली व मुंबई-पुण्याकडील दिसतात. कोणी आपल्या पात्रांस मुद्दाम वाकडी वाट काढून हिमालयावर किवा मलबारात नेले तरी तेथले वर्णन पुण्यामुबईस लागू पडते. शेतकऱ्यांच्या तोडातील भाषा व त्यांचे विचार हेही शहरात राहणाऱ्या लोकाचेच असतात. काही लेखकानी जरी इतर वर्णाना किवा वर्गाना घुसडण्याचा प्रयत्न केला तरी ते पांढरपेशेच इतर वर्गाची सोगे घेऊन आल्यासारखे दिसते." पांढरपेशे, मध्यमवर्गीय, उच्चभ्रू, शहरी भागातले वगैरे शब्द वापरून बहुसंख्य मराठी लेखक उच्चवर्णीय, उच्च समजल्या जाणाऱ्या जातीत जन्मलेले असल्याच्या वस्तुस्थितीकडे स्वातंत्र्यपूर्वकाळात लक्ष वेधले जात असे. १८८५ सालच्या ग्रंथकार सभेत सहभागी होण्याचे निमंत्रण नाकारताना जोतीराव फुल्यांनी रोखठोक शब्दांत न्या. रानड्यांना पत्र पाठवून कळवले होते, "तसल्या लोकांनी (म्हणजे आर्यब्राह्मणांनी) उपस्थित केलेल्या सभांनी व त्यांनी केलेल्या पुस्तकातील भावार्थाशी आमच्या सभाचा व पुस्तकांचा मेळ बसत नाही."

मराठी साहित्य 'ब्राह्मणी' असल्याबद्दल फुले आणि सयाजीराव गायकवाड यांचे एकमत होते. १९४३ साली सांगलीत भरलेल्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष श्री. म. माटे यांनीही संमेलनाच्या व्यासपीठावरून असेच मत व्यक्त केले होते. "एक गोष्ट विसरून किवा नाकारून चालावयाची नाही. ती ही की विद्येच्या क्षेत्रात ब्राह्मणांचे वर्चस्व फार आहे. ग्रंथ लिहिणे, कोश तयार करणे, वर्तमानपत्रे चालविणे, प्रवचन करणे, व्याख्याने देणे, प्रचार कार्यासाठी दौरे काढणे, सरकार-दरबार गाजविणे, सरकारच्या विधिमंडळात त्याच्याशी हमरीतुमरीस येणे, रेडिओवर बोलणे आणि न्यायमंदिरात कायद्याचा कीस काढणे किवा शब्दच्छल करणे हे उद्योग एका विद्येच्या क्षेत्रातूनच उगम पावतात." १९४३ साली माटे यांनी वर्णिलेले मराठी साहित्यसृष्टीचे ब्राह्मणी रूप गेल्या चाळीस वर्षात हळूहळू बदलत गेले तरी अद्याप ते पुरते पालटलेले नाही.

१९०९ सालातील साहित्य संमेलनाचे अध्यक्ष कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांनी त्यांचे समकालीन ललितलेखक, "आपली जुनी कसदार मराठी विसरून नवीन संस्कृत शब्दांनी नटविलेली इंग्रजी पद्धतीची मराठी बनवीत आहेत," या वस्तुस्थितीची दखल घेतली होती. कोणताही समाज जेव्हा जिकला जातो तेव्हा त्याच्या भाषेत जेत्यांच्या भाषेची भेसळ झाल्याशिवाय राहात नाही. मराठ्यांच्या इतिहासाच्या साधनांच्या

आठव्या खंडाच्या प्रस्तावनेत इतिहासाचार्य राजवाडे यांनी लिहिले आहे, "१२९० पर्यंत सर्व महाराष्ट्रात व १३९५ पर्यंत कदाचित पुढेही काही काळपावेतो महाराष्ट्राच्या ज्या भागात स्वराज्य होते तेथे शुद्ध निर्भेळ मराठी भाषा बोलण्यात व लिहिण्यात येत असे. दरबारी लिहिण्यात मुसलमानांचे राज्य चालू असता इ. स. १६२८त शंभर शब्दांमध्ये सरासरीच्या मानाने१४ शब्द मराठी येत. शिवाजीचे राज्य चालू असता इ.स. १६७७त शेकडा ६२ शब्द मराठी येत आणि शाहू राज्यावर असता इ. स. १७२८त शेकडा ९३ शब्द मराठी येऊ लागले. परराज्याचा भाषेवरती केवढा परिणाम होतो त्याचा हा रोखठोक ताळा आहे."

फार्सी बोलणाऱ्या मुसलमानांचे राज्य महाराष्ट्रावर ३५० वर्षे होते. 'वाहवा, बेलाशक' यांसारखे कित्येक उद्गारवाचक शब्द 'व', 'अगर', 'की' यांसारखी उभयान्वयी अव्यये, 'दर, 'देखील', 'बद्दल', 'ऐवजी', 'शिवाय', 'बाबत' यांसारखी शब्दयोगी अव्यये 'हर एक', 'जण' यांसारखी सर्वनामे राजवाड्यांच्या मते फार्शीतून मराठीत आली आणि ती जनसामान्यांच्या भाषेतही इतकी एकजीव झाली की त्यांचे मूळ फार्सीत आहे, हे कोणी सांगितले तरी त्यावर विश्वास ठेवणे अनेकांना अवघड होते.

निबंधमालेच्या पहिल्याच अंकात 'मराठी भाषेची सांप्रतची स्थिती' या विषयावरच्या निबंधात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी फार्सी भाषेतील शब्द मराठीत मिसळल्यामुळे तिला नवे वळण लागून झोकदारपणा व आवेश हे गुण मराठीत जास्त आले असे मत व्यक्त केले आहे. "त्या भाषेच्या मिसळण्याने आपल्या भाषेचे अहित न होता हितच झाले" असे त्यांनी लिहिले आहे. इतिहासाचार्य राजवाड्यांच्या इंग्रजी शब्दांवर जसा कटाक्ष होता तसा फार्सी व अरबी या भाषांतील शब्दांवर नव्हता कारण या भाषांची घडण मराठी भाषेच्या स्वरूपाशी जशी जुळवण्यासाठी आहे तशी इंग्रजी भाषेची नाही, असे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी १९२७ साली पुणे येथे भरलेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात म्हटलेले आढळते. मराठी साहित्य संमेलनांचे अध्यक्षपद भूषविणारे कोल्हटकर, कृष्णाजी प्रभाकर ग्वाडिलकर हे प्रतिभावंत नाटककार तसेच कविवर्य माधवराव पटवर्धन यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात नाटक किंवा काव्य या वाङ्मयप्रकाराबाबत विवेचन केलेले नाही. त्यांनी मराठी भाषेशी संबंधित प्रश्नांचाच ऊहापोह केला आहे, हे लक्षात घ्यावयास हवे. फार्सी अरबी शब्दाचे उच्चाटन करून मराठी भाषेचे शुद्धीकरण करण्याची जी मोहीम स्वातंत्र्यवीर सावरकरांनी स्वीकारली तिच्या मुळाशी हिंदुमुसलमानामधील तेढ असली तरी ती कोल्टकरांच्या मते शाश्वत स्वरूपाची आहे, असे समजण्याचे कारण नाही. भाषेच्या शुद्धीकरणाबद्दल कोल्हटकरांनी १९२७ साली उपस्थित केले प्रश्न आजही विचारण्याजोगे आहेत. "उद्या आपल्या कर्नाटकस्थ बंधूंशी जर आपली अशीच तेढ उत्पन्न झाली तर मराठी भाषेतील कर्नाटकी शब्द काढून टाकण्यास आपण तयार होऊ का ? मुसलमानांच्या चढाईच्या धार्मिक

धोरणाने आपणांस चीड येणे रास्त असेल, पण त्याचे शासन मराठी व्याकरणाचे निर्बंध निमूटपणे पाळणाऱ्या बिचाऱ्या मुसलमानी शब्दांस करण्यात काय हंशील ? त्याने मुसलमानांचे काहीच नुकसान होण्यासारखे नसून आपल्या भाषेचे मात्र अपरिमित नुकसान होणार आहे.''

१९२७ ते १९४७ या काळात हिंदू व मुसलमान यांच्यामधील तेढ वाढत गेली. या काळात माधवराव पटवर्धन आणि स्वातंत्र्यवीर सावरकर या दोघा संमेलनाध्यक्षांची नावे भाषाशुद्धीच्या चळवळीशी निगडित झाली खरे म्हणजे 'भाषाशुद्धि' हा शब्द माधवराव पटवर्धनांना मान्य नव्हता. 'धर्मशुद्धि' या अर्थी हा शब्द स्वीकारवाचक आहे, तर भाषाशुद्धीमध्ये तो बहिष्कारवाचक होतो. इंग्रजीतील'प्युरिझम' या शब्दाचे हे निव्वळ भाषांतर आहे, असे माधवराव पटवर्धनांनी १९३६ साली जळगावात भरलेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात नमूद केले आहे.

स्वातंत्र्यवीर सावरकरांच्या मते मराठी भाषेवर मुख्यत: उर्दू नि इंग्रजी या दोन परकीय भाषांचे आक्रमण चालू होते. त्यातही उर्दू शब्दांचे उच्चाटन करण्यास त्यांनी प्राधान्य दिले. त्यामुळे खेड्यापड्यातल्या सर्वसामान्य माणसाच्या बोलीभाषेत सर्रास वापरले जाणारे 'कायदा', 'खटला', 'वकिल', 'हजर' असे शब्द वापरण्याऐवजी 'विधि' किवा 'निर्बंध', 'अभियोग','विधिज्ञ', 'निर्बधपंडित', 'उपस्थित' हे शब्द भाषाशुद्धिवादी साहित्यिक वापरू लागले. त्यामुळे ग्रंथातील प्रमाण किवा शिष्ट समजली जाणारी भाषा अधिकच संस्कृतप्रचुर किवा 'ब्राह्मणी' बनली आणि सामान्य माणसापासून ती अधिकच दूर गेली.

महानुभावपंथाचे प्रवर्तक श्रीचक्रधर स्वामी यांनी आपल्या शिष्यांना 'महाराष्ट्री वसिजे' असा आदेश दिला. 'महाराष्ट्र भास जेथ जेथ वर्ते तो महाराष्ट्र' अशी महानुभावांची व्यापक दृष्टी असली तरी 'विधीद्रीपासोनि दक्षिण दिशेसी : कृष्णानदीपासुनि उत्तरेशी : झाडीमंडळापासोनि पश्चिमेशी : कोकणपर्यंत'' अशा महाराष्ट्राच्या सीमा त्यांनी निश्चित केल्या होत्या. या पंथाचे पहिले आचार्य नागदेवभट्ट अथवा भटोबास यांना त्यांचे शिष्य केशवराज सुरि यांनी एकदा सांगितले, ''मी उद्धरण, संसरण ही प्रकरणे संस्कृतात पद्यरूपाने रचावी म्हणतो.'' नागदेव म्हणाले, ''नको गा, केशवदेवा : येणे माझिया स्वामीचा (म्हणजे चक्रधरांचा) सामान्य परिवारु नागवैल की : येणे माझिया म्हातारिया नागवतिल'' असेही उत्तर नागदेवाचार्यांनी दिल्याचे 'स्मृतिस्थळ' सांगते. मराठीचा पक्ष हा स्त्रियांचा, शूद्रातिशूद्रांचा म्हणजेच सामान्य जनतेचा आहे, अशी चक्रधर स्वामी आणि जोतीराव फुले यांची धारणा होती. संस्कृत ही देववाणी मानली जात असली तरी ती संख्येने अतिशय थोड्या पंडितांची भाषा होती. मराठीच्या उदयकाळापासून सामान्य माणसांची भाषा आणि अभिजनांची भाषा यांच्यामध्ये संघर्ष निर्माण झालेला दिसतो. प्रथम संस्कृत, नंतर मध्ययुगात फार्सी, अरबी आणि १९व्या शतकात इंग्रजी या भाषा

शिकण्याची संधी बहुतेक सर्व स्त्रियांना आणि शूद्रातिशूद्रांना नाकारली गेल्यामुळे त्यांच्या तोंडची मराठी दूषित न होता शुद्ध राहिली. 'भाषादूषण' या शीर्षकाच्या निबंधात विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी लिहिले आहे, "आपल्या बायकांच्या भाषेस अजून आपल्याप्रमाणे परभाषेचा विकार जडला नाही. यास्तव त्यांचे बोलणे अगदी शुद्ध धरण्यास चिंता नाही. असेच वृद्ध मनुष्यांचे व ज्यांस इंग्रजीचा गंधही लाभला नाही, अशा एकंदर सर्व लोकांचेही बोलणे शुद्धतेचे उत्कृष्ट प्रमाण होय."

स्त्रियांचे मराठी बोलणे शुद्ध असल्याचे प्रमाणपत्र विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी दिले तरी त्यांच्या काळातील एक लेखिका काशीबाई कानिटकर यांनी आपल्या आत्मचरित्रात लिहिले आहे, "बायकांनी शुद्ध बोलणेसुद्धा लोकांना आवडायचे नाही. माझ्या सासूबाई शास्त्र्यांची मुलगी होत्या. तिनेसुद्धा शुद्ध बोलता कामा नये. त्यांनी मुंबईस 'ममई' म्हणावयाचे 'पुन्हा' असे न म्हणता 'मातक्यान' म्हणावयाचे अशासारखी घरातली पद्धत असे." ज्यांचे बोलणे शुद्ध असल्याचे मान्य केले जात असे त्यांनी एखादा लेख लिहिला तरी व्याकरणाचे ज्ञान नसल्यामुळे तो कोणाकडून तरी 'शुद्ध' करून घ्यावा लागत असे. १ मे १८८१ रोजी 'पूर्वीच्या स्त्रिया व हल्लीच्या स्त्रिया' हा काशीबाई कानिटकरांचा पहिला लेख सुबोध पत्रिकेने छापला तो त्यांच्या समवयस्क चुलत चुलत सासऱ्यांनी शुद्ध लिहिल्यामुळे.

आपण लिहिलेला 'शिवाजीचा पवाडा' शुद्ध करण्याविषयी बाबा पदमनजी आणि गगाधरशास्त्री यांनी मदत केल्याबद्दल जोतीराव फुले यांनी त्यांचे प्रस्तावनेत आभार मानलेले आढळतात. 'गुलामगिरी' या त्यांच्या गाजलेल्या पुस्तकावर निबंधमालेत विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी झोड उठवताना जोतीरावांचे व्युत्पत्तिशास्त्र व व्याकरणविषयक अज्ञान, ऱ्हस्व, दीर्घ, अनुस्वार यांची वानवा वगैरेची टर उडवली आहे. ती लक्षात घेऊन 'गुलामगिरी'च्या पहिल्या आवृत्तीतील "भाषेचा दुर्बोधपणा, दूरान्वय वगैरे काढून शुद्धाशुद्ध पाहून" जोतीरावांचे स्नेही स्वामी रामय्या व्यंकय्या अय्यावारू यांनी 'गुलामगिरी'ची दुसरी आवृत्ती १९११ साली प्रसिद्ध केली.

मराठीचे पाणिनी दादोबा पांडुरंग तर्खडकर यांच्या लघुव्याकरणात 'शुद्ध कसे बोलावे आणि शुद्ध कसे लिहावे हे व्याकरण शिकल्याने समजते' असे सूत्र सांगितले आहे. बोलण्याच्या व लिहिण्याच्या कलेवर हुकमत मिळवण्यासाठी व्याकरणाचे ज्ञान उपकारक ठरते. प्राचीन तसेच मध्ययुगीन मराठीत कोशांप्रमाणेच व्याकरणग्रंथांचाही अभाव होता. मराठी शिकण्याची पोर्तुगीज आणि इंग्रज राज्यकर्त्यांना गरज व निकड वाटू लागल्यावर त्यांनी पुढाकार घेतल्यामुळे मराठीत प्रथम कोश तसेच व्याकरणग्रंथ यांची रचना होऊ लागली. इंग्रजी शिकण्यासाठीही मराठी व्याकरणाचे ज्ञान असणे आवश्यक असते, या जाणिवेतून दादोबांनी मराठीचे प्रथम मोठे तसेच नंतर लघु व्याकरण तयार केले. नाना प्रकारचे कोश आणि व्याकरणग्रंथ रचणाऱ्यांची मराठीतील

दीर्घ परंपरा अलीकडे फार क्षीण झाली आहे. मराठीत लिहिताना चुका करू नयेत, असे जोतीराव फुले व काशीबाई कानिटकर यांना वाटत असल्यामुळे आपल्या पत्रातील वा लेखातील ऱ्हस्वदीर्घादी सर्व चुका नीट करून त्याची प्रत वर्तमानपत्राकडे पाठविण्याची खबरदारी ही मंडळी घेत असत. आज अनेक लेखकांना, पत्रकारांना, आकाशवाणी, दूरचित्रवाणी, जाहिरात वगैरे प्रसारमाध्यमांशी संबंधित व्यक्तीना एवढेच नव्हे तर शाळेत शिकवणाऱ्यांना शुद्ध कसे बोलावे आणि शुद्ध कसे लिहावे यासाठी व्याकरणाचे ज्ञान आवश्यक वाटत नाही. त्यामुळे मराठी भाषेच्या क्षेत्रात सध्या शुद्ध लेखनाबाबत अनागोदी माजल्यासारखी दिसते.

१८९८ साली काशिनाथ नारायण साने, रामचंद्र परशुराम गोडबोले व शंकर रामचंद्र हतवळणे या तिघांनी शुद्धलेखनातील सुधारणेसंबंधीच्या प्रश्नास चालना दिली. त्याबद्दलचे विचार 'काळ' पत्रात व्यक्त करताना शिवरामपंत परांजपे यांनी लिहिले होते, "इतर भाषांप्रमाणे मराठी भाषा ही काही स्वत:च्या व काही दुसऱ्याच्या भांडवलावर व्यापार करणारी पेढी आहे. ही जिच्यावर आपली देवघेव चालविते ती सारीच रक्कम हिच्या घरची आहे, असे नव्हे, हिचा मोठा सावकार म्हटला म्हणजे संस्कृत भाषा होय. अरबी, फारशी वगैरे सावकारांपासूनही हिने काही ऐवज आणिलेला आहे. हल्ली हिला एक नवीन सावकार (इंग्रजी) भेटला आहे. त्याने बाकीच्यांना हुसकून देऊन इतर ठिकाणी जसे आपले वर्चस्व बसविले आहे. तसेच अरबी, फारशी वगैरे सर्व दुकानांची खाती बंद करून जो लागेल तो ऐवज आपणांकडून घेऊन जाण्याविषयी याने मराठी भाषेवर जबरदस्ती चालू केली आहे. मराठी भाषेत हल्ली इंग्रजीतून पुष्कळच शब्द येत आहेत."

मराठी भाषेच्या लेखनपद्धतीविषयीच्या शंभर वर्षापूर्वीच्या वादात शिवरामपंत परांजपे यांनी परंपरावादी भूमिका उचलून धरली. अन्य भाषेतून मराठी भाषेत आलेले शब्द मुळात जसे लिहिले जात असतील, तसे मराठीत सामान्यत: लिहावे, असे शिवरामपंतांचे म्हणणे होते. याउलट, गणित, गोकुळ, घटित यांसारख्या शब्दांतील उपांत्य स्वर संस्कृतामध्ये ऱ्हस्व असला तरी साने, गोडबोले व हतवळणे यांनी मराठीसाठी सुचविलेल्या सुधारित नियमानुसार या शब्दांचे उपांत्य स्वर दीर्घच असले पाहिजेत. म्हणजे वर उल्लेखितलेले शब्द 'गणीत', 'गोकूळ', 'घटीत' असे लिहावेत, असे त्यांनी सांगितले. १९०४ साली नवी क्रमिक पुस्तके छापण्याचा प्रश्न निर्माण झाला. तेव्हा ती सुधारित नियमानुसार छापावीत असा साने, गोडबोले व हतवळणे या परिवर्तनवाद्यांनी प्रयत्न केला. हा वाद गव्हर्नर मॅकीनन यांनी १९०५ मध्ये परंपरावाद्यांच्या बाजूने निर्णय देऊन मिटवला तेव्हा परिवर्तनवाद्यांवर इंग्रज राजकर्त्यांचा वरदहस्त असल्याचा संशय आपोआपच निराधार ठरला. शुद्धलेखनात सुधारणा करण्याचे प्रयोग व प्रयत्न न. चि. केळकर व माधवराव पटवर्धन यांनी जसे केले, तसेच 'महाराष्ट्र

साहित्य परिषदे'ने आणि 'मुंबई विद्यापीठा'ने स्वातंत्र्यपूर्व काळात केले. द्विभाषिक मुंबई राज्यात १९५७ साली औरंगाबादच्या साहित्य संमेलनात मराठी शुद्धलेखन मंडळाने आणि १९५८ मध्ये 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'ने व 'विदर्भ साहित्य संघा'ने हे नियम तयार केले. मराठी साहित्य महामंडळाने सुचवलेले शुद्धलेखनाविषयीचे नियम १९६२ मध्ये महाराष्ट्र शासनाने मान्य केले. शुद्धलेखनाचा पुनर्विचार करण्यासाठी साहित्य महामंडळाने १९९० साली समिती नेमल्यानंतर डॉ. द. न. गोखले यांनी १९९३ साली शुद्धलेखन-विवेक हे अत्यंत उपयुक्त पुस्तक प्रकाशित केले. तरीही लेखक,प्रकाशक, पत्रलेखक, वृत्तपत्रकार, शिक्षक वगैरे मंडळी शुद्धलेखनाचे जुने किंवा नवे नियम पाळीत नसल्याचे आढळते. आपल्या लेखनपद्धतीच्या शुद्धाशुद्धतेविषयीच्या कल्पनांचा वारंवार पुनर्विचार करण्याची आवश्यता असली तरी मराठीला मराठीचे नियम पाहिजेत, संस्कृतचे नकोत, याचे सतत भान ठेवणे जरूर आहे.

अलीकडे 'साठोत्तरी साहित्य' ही कालदर्शक संज्ञा समीक्षक सर्रास वापरतात. १ मे १९६० रोजी महाराष्ट्र राज्य अस्तित्वात आले. त्याच दिवशी राज्याचे पहिले मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांनी राजकारभार इंग्रजीऐवजी मराठीतून चालवण्याच्या इष्ट आणि निकडीच्या कार्यास चालना देण्यासाठी 'भाषा संचालनालय' स्थापन केले जाणार असल्याचे जाहीर केले. मराठी साहित्याच्या तसेच इतर क्षेत्रांतील महत्त्वाच्या संशोधनकार्यास उत्तेजन देण्याचाही सरकाराचा इरादा असल्याचे त्यांनी घोषित केले. शब्दकोश व इतर मार्गदर्शक ग्रंथ तयार करण्याकरिता एक भाषा सल्लागार मंडळ तसेच 'महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ' स्थापन करण्यात आले. मंडळाने अनेक प्रकल्प हाती घेतले. ते आजही पुरे झालेले नाहीत. प्रागैतिहासिक काळापासून ते १९२० पर्यंतचा महाराष्ट्राचा इतिहास पाच खंडांमध्ये लिहून प्रकाशित करण्याच्या प्रकल्पास १९ मार्च १९६५ रोजी जारी करण्यात आलेल्या शासकीय आदेशानुसार मान्यता देणात आली. वा. वि. मिराशी, न. र. फाटक, ग ह. खरे आणि गोवर्धन पारीख हे पहिल्या, दुसऱ्या, चौथ्या आणि पाचव्या खंडाचे संपादक कालवश झाल्यामुळे वि. गो. खोबरेकर यांनी लिहिलेला १७०८ ते १८१८ हा मराठा कालखंडाचा दुसरा भाग तेवढा आजपर्यंत प्रकाशित झाला. २० ऑगस्ट १९९० ते ३१ मार्च १९९५ पर्यंत साहित्य संस्कृती मंडळाचा अध्यक्ष या नात्याने मी या प्रकल्पाला चालना देण्याचा प्रयत्न केला. प्राचीन महाराष्ट्राच्या इतिहासाच्या खंडाचा पहिला भाग शां. भा. देव यांनी पुरा करून मंडळाकडे सोपवला. मध्ययुगीन कालखंडासबंधीचे (इ. स. १३१८ ते १६१७) प्रा. ग. ह. खरे यांचे अपुरे हस्तलिखित त्यांचे विद्यार्थी गो. त्र्यं. कुलकर्णी यांनी पुरे केले. याच कालखंडातील 'महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास' डॉ. म. श्री. माटे यांनी लिहून पूर्ण केला. २३ मार्च १९९५ रोजी शिवसेना-भाजप युती सरकारचे मुख्यमंत्री मनोहर जोशी आणि सांस्कृतिक कार्यविभागाचे मंत्री प्रमोद नवलकर यांना मी

पाठवलेल्या अध्यक्षपदाच्या राजीनाम्याच्या पत्रासोबत काही टिपणे जोडून आजवर अपुऱ्या राहिलेल्या प्रकल्पांची आणि मंडळाकडे सादर करण्यात आलेल्या देव, कुलकर्णी आणि माटे यांच्या हस्तलिखितांबाबत माहिती दिली होती. वरील तीन हस्तलिखितांपैकी एकही गेल्या पाच वर्षात प्रसिद्ध झालेले नाही.

इतिहासाचार्य राजवाडे अधूनमधून इतिहाससंशोधनाच्या स्थितीबाबतचे लेख प्रसिद्ध करीत असत. १९१६ सालच्या एका लेखात त्यांनी आशावादी भूमिकेतून लिहिले, "ह्या कामी सरकारी मदत बहुतेक नाहीच म्हटले तरी चालेल. नाही म्हणायला पारसनिसांच्या इतिहाससंग्रहाच्या प्रकाशनार्थ सरकार दोन अडीच हजार रुपये देते. येथील सरकारचे ब्युरोक्रॅटीक रूप बदलून त्याची Legislative & Executive रचना जेव्हा लोकाधीन होईल तेव्हा मायेची माणसे अधिकारारूढ होऊन आम्हा संशोधकांचे पांग फिटले तर फिटतील. मंडळ किवा संस्था किवा पीठ म्हटले म्हणजे त्याला घर हवे, संदर्भग्रंथसंग्रह हवा व कारखाना हवा. देशातील मायेच्या सरकाराचे योग्य साहाय्य अशा प्रयत्नांना आवश्य हवे असते. मायेचे स्वदेशी सरकार जर पुढे-मागे बनून आले, तर ते इतिहाससंशोधनाच्या कामाला सढळ साहाय्य करील." पारतंत्र्याच्या काळात राजवाडे आणि ज्ञानकोशकार केतकर या महापंडितांना सरकारचे साहाय्य मिळाले नाही, त्या दोघांनाही राजाश्रय मिळाला असता तर तो नको होता, असे म्हणता येत नाही. त्या दोघांचा मोठेपणा असा की, सरकारचे साहाय्य मिळाले नाही म्हणून हाती घेतलेले काम सोडून ते हरी, हरी म्हणत स्वस्थ बसले नाहीत. तुटपुंजा का होईना लोकाश्रय पुरेसा मानून राजवाड्यांनी इतिहासाच्या साधनांचे बावीस खंड हयातीत प्रसिद्ध केले आणि डॉ. केतकरांनी महाराष्ट्रातील ज्ञानकोशाचे २३ खड १२ वर्षाच्या काळात संपादित करून प्रकाशित केले आणि त्याचे संच ग्राहकांनी खरेदी करावेत म्हणून पायपीट केली. महाराष्ट्राने स्वत्वाचे म्हणजेच अस्मितेचे भान ठेवावे आणि परक्या राजकर्त्यानी लादलेल्या बौद्धिक गुलामगिरीतून मुक्त व्हावे, यासाठी राजवाडे आणि केतकर यांसारख्या पंडितांनी आजन्म परिश्रम व प्रयत्न केले.

१९६० नंतर 'मायेचे स्वदेशी सरकार' आल्याने दिसताच लक्ष्मणशास्त्री जोशी, वि. भि. कोलते, न. र. फाटक, ना. गो. कालेलकर, मे पुं. रेगे, सेतुमाधवराव पगडी वगैरे व्यासंगी विद्वानांनी आणि पु. ल. देशपांडे, ग. दि. माडगूळकर, आ. रा. देशपांडे (अनिल), अनंत काणेकर वगैरे प्रतिभावंतांनी मराठी साहित्य आणि संस्कृती मंडळाचे सदस्य म्हणून २० खंडांच्या विश्वकोशाच्या निर्मितीला हातभार लावला. लोकशाहीत साहित्यिकांनी सरकारशी सदैव सहकार्य किवा कायम असहकार करावयाचा नसतो. लोकशाही सरकार भाषा व साहित्य ह्यांच्या उन्नतीसाठी उत्तेजन देत असेल आणि अर्थसाहाय्य करीत असेल तर ते केवळ आपले कर्तव्य करीत आहे, उपकार करीत नाही अशी भावना लोकशाहीत नागरिकांनी मनात बाळगावी. शतकानुशतके

राजेमहाराजे किवा नबाब अगर बादशहा यांचे प्रजाजन म्हणून जगण्याची सवय असलेल्या समाजात लोकशाहीत सरकार आणि नागरिक यांच्यामधील संबंध वेगळ्या प्रकारचे असतात आणि असावेत, ही कल्पना रुजलेली नाही. लोकांनी निवडून दिलेले प्रतिनिधी आणि त्यांमधून नेमण्यात आलेले मंत्री म्हणजे राजे किवा सरदार अगर शिलेदार नव्हेत. त्यांनी 'जनता दरबार' भरविणे किवा 'पालकमंत्री' म्हणवून घेणे लोकशाहीला साजेसे नाही. साहित्य संमेलन म्हणजेही सरस्वतोचा दरबार नाही. मायबोलीवर प्रेम करणाऱ्या माणसांचा तो मेळावा असतो. साहित्य संमेलनाचे व्यासपीठ म्हणजे राजसिंहासन नव्हे. आपली मायभाषा बोलणाऱ्या शेकडो हजारो लोकांशी संवाद साधण्याची सोयिस्कर अशी ती जागा आहे. सरकार, आश्रयदाते आणि लेखक, विचारवंत वा कलावंत, याचक असे नाते राजेशाहीत एकपक्षीय हुकूमशाही किवा लष्करशहांच्या राजवटीत असल्याचे दिसते. आपण लोकशाही गणराज्याचे नागरिक असून सरकार, हस्तक्षेप करून घटनेने दिलेले मूलभूत अधिकार हिरावून घेण्याचा प्रयत्न करीत असेल तर स्पष्ट शब्दांत त्याचा निषेध करणे हेही आपले कर्तव्य ठरते.

१९६० नंतर महाराष्ट्र शासनाने साहित्य संस्कृती मंडळाला अनेक प्रकल्प पूर्ण करण्यासाठी दरवर्षी लाखो रुपयांचे अर्थसाहाय्य केले. प्रकल्प अपुरे राहिले असतील तर त्याबद्दल सरकारला सर्वस्वी जबाबदार धरणे योग्य होणार नाही. साहित्य संस्था आणि साहित्यिक यांनाही अपयशाबद्दल जबाबदार धरण्याची आवश्यकता आहे. परिभाषा संग्रह धरून २० खंडांचा विश्वकोश संपादित करून तो प्रकाशित करण्याची योजना नोव्हेबर १९६० रोजी साहित्य संस्कृती मंडळाची स्थापना होताच कार्यान्वित करण्यात आली. ती चार दशके पूर्ण होत आली, तरी पूर्ण झालेली नाही. लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या हयातीत विश्वकोशाचे १४ खंड प्रकाशित झालेले त्यांना पाहता आले. कुमारासाठी आणि किशोरांसाठी असे दोन स्वतंत्र कोश करण्याची योजना कार्यान्वित केली जाऊनही आजतागायत ती पुरी झालेली नाही.

९ ऑक्टोबर १९६९ रोजी चार खंडांमध्ये 'वाङ्मयकोश' प्रकाशित करण्याचा प्रकल्प तसेच नव्याने 'मराठी शब्दकोश' तयार करण्याचा प्रकल्प साहित्य संस्कृती मंडळाने हाती घेतला. वाङ्मयकोशाचा पहिला खंड (इ.स. १०५० ते १८५७) गं दे. खानोलकर यांनी संपादित करून तो १९८१ साली प्रसिद्ध केला. चौथा खंड वाङमयीन समीक्षेतील संज्ञासंबंधीचा आहे. मी मंडळाचा अध्यक्ष असताना या चौथ्या खंडाच्या रचनेस चालना दिली. संपादक- समन्वयक डॉ. विजया राजाध्यक्ष यांनी संपादक मंडळातील ज्येष्ठ तसेच तरूण समीक्षकाच्या मदतीने सज्ञा कोशांची मुद्रणप्रत मंडळाला सादर केली; पण अद्याप ती ग्रंथरूपाने प्रकाशित झालेली नाही. मराठी ग्रंथकार (१८५८ ते १९७५) आणि (१०५० ते १९७५) या सुमारे नऊशे वर्षांच्या काळातील ग्रंथ यांचा परिचय करून देणाऱ्या वाङ्मयकोशाच्या दोन खंडांची हस्तलिखिते

*सुधारित स्वरूपात प्रकाशित करण्याचे सप्टेंबर १९९० ते मार्च १९९५ पर्यंतच्या काळातले माझे प्रयत्न सफल झाले नाहीत.*

शब्दकोशाचा एकही खंड आजतागायत प्रकाशित झालेला नाही. १९८० साली टिळक स्मारक ट्रस्टने शब्दकोश सिद्ध करण्याची जबाबदारी स्वीकारली आणि त्या संस्थेने १९९० च्या जून अखेरीस शब्दकोशांचे चार खंड तयार करून मुद्रणप्रती मंडळाला सादर केल्या. मी मंडळाची सूत्रे हाती घेतल्यानंतर त्या चार तज्ज्ञांकडून तपासून घेतल्या. त्यापैकी एकाही तज्ज्ञाला कोशाचे काम समाधानकारक वाटले नाही. तिघा तज्ज्ञांनी तर शब्दकोशाच्या सदोष मुद्रणप्रतीमध्ये सुधारणा करण्याचा खटाटोप करण्यापेक्षा त्या प्रकाशित करण्याचा विचारच सोडून द्यावा, अशी सूचना केली. ज्या संस्थेतून शब्दकोशाचे काम काढून घेण्यात आले होते, तिलाच ते युती शासनाच्या काळात पुन्हा देऊ करण्यात आले. नंतर ते नागपुरातही करण्याचा प्रयत्न झाला, पण फलनिष्पत्ती शून्य. करदात्यांचे लक्षावधी रुपये पाण्यात गेले. सेवानिवृत्त झालेल्या ज्येष्ठ व्यक्तीसाठी आखलेली रोजगार हमी योजना समजून असे मोठे प्रकल्प राबविण्यात आले तर ते सिद्धीस जाणे फार अवघड होते. इतिहासाचार्य राजवाडे म्हणत असत, "पगार देऊन संग्राहक व संशोधक मिळवण्याचा प्रयत्न व्यवहार्य नाही. पगार देऊन सांगकामे कारकून मिळतात, युक्तीने, बुद्धीने व मन:स्फूर्तीने संशोधन करणारे इसम मिळत नाहीत."

आणीबाणीत कऱ्हाड येथे भरलेल्या साहित्य संमेलनात ६ डिसेंबर १९७५ रोजी अध्यक्षीय भाषण करताना दुर्गाबाई भागवत म्हणाल्या, "पारतंत्र्याच्या काळात लेखकाला जेवढी प्रतिष्ठा होती तेवढी नंतर राहिलेली नाही. सुरक्षिततेचा आभास निर्माण झाला. पैसा जास्त मिळतो. सरकार दरबारी मानाची स्थानं, पारितोषिक मिळतात. किताबही मिळतात, पण वैचारिक क्षेत्रात, जनमानसात लेखकांना अधिकारित्व राहिलेले नाही. कारण या परिस्थितीत स्वत्वाची कसोटी लेखकाला स्वत:ला आवश्यक वाटत नाही." देशभर आणीबाणी लादणाऱ्या केंद्र सरकारातील एक ज्येष्ठ मंत्री स्वागताध्यक्ष असताना त्यांच्या समक्ष हजारो लोकांच्या साक्षीने आविष्कारस्वातंत्र्य हिरावून घेणाऱ्या केंद्र सरकारचा दुर्गाबाईंनी निर्भयपणे व नि:संदिग्ध शब्दांत निषेध केला आणि नंतर कारावासही सोसला. त्यामुळे पारतंत्र्याच्या काळात लेखकाला आणि साहित्य संमेलनाला असलेली प्रतिष्ठा त्यांनी पुन्हा मिळवून दिली.

शासनावर साहित्यिकांनी कायमचा बहिष्कार टाकणे आणि सदैव असहकार करणे मात्र लोकशाहीत उचित व इष्ट ठरणार नाही. १९६० नंतर मराठी भाषा आणि साहित्य यांचा विकास करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने काहीही केले नाही, असे म्हणणे मात्र अन्यायाचे ठरेल. ना नफा ना तोटा या तत्त्वाधारे ग्रंथ प्रकाशित करून ते कमीत कमी किमतीत सामान्य वाचकाला उपलब्ध करून देणे शासनालाच शक्य असते

विज्ञान, गणित, तंत्र व कारागिरी, वैद्यक, आरोग्य, शरीरविज्ञान, इतिहास, साहित्यशास्त्र व समीक्षा, क्रीडा, ललितकला, इतर मानव्यविद्या व सामाजिक शास्त्रे, भाषा, व्याकरण व लिपी वगैरे नानाविध विषयांवरील ग्रंथ, अन्य भाषांतील महान ग्रंथांची मराठी भाषांतरे, लोकहितवादी, महात्मा जोतीराव फुले, आगरकर, राम गणेश गडकरी, अण्णाभाऊ साठे वगैरेंचे समग्र वाङ्मय, पां. वा. काणे, धर्मानंद कोसंबी या महापंडितांचे ग्रंथ सामान्य वाचकालाही सरकारने घस सोसून अतिशय कमी किंमतीत उपलब्ध करून दिले. प्रकाशनाचा व्यवसाय किफायतशीर व्हावा यासाठी धडपडणाऱ्या खासगी मालकीच्या संस्थांना असे ग्रंथ छापणे शक्य नसते. ग्रंथ विक्रेते शासकीय प्रकाशनांची विक्री करण्यास तयार नसतात. कारण त्यांना दलालीदाखल मिळणारी रक्कम फारच थोडी वाटते. शासकीय मुद्रणालयातील कर्मचाऱ्यांना पुस्तकांची विक्री करण्यात बिलकुल रस नसतो. वितरणव्यवस्था सदोष व असमाधानकारक असल्यामुळे दर्जेदार ग्रंथही सरकारी गोदामात धूळ खात पडतात, हे खरे असले तरी ग्रंथजत्रेत किवा पुस्तक प्रदर्शनात सरकारी प्रकाशने मांडली गेल्यास त्यांचा बऱ्यापैकी खप होतो, याचा अनुभव साहित्यसंस्कृती मंडळाचा अध्यक्ष या नात्याने मी घेतला आहे.

१९६० नंतर महाराष्ट्र शासनाने येथे अनुदान संस्कृती निर्माण केली असा एक आक्षेप घेण्यात येतो. नवलेखकांना अनुदान, वाङ्मयीन वा वैचारिक नियतकालिकांना अनुदान, संशोधन प्रकल्पांना अनुदान, साहित्य महामंडळासकट साहित्य संस्थांना देण्यात येणारे अनुदान, साहित्य संमेलनांना अनुदान अशी नाना प्रकारची अनुदाने दिली जात असतात. अंशत: अनुदान वर्षानुवर्षे दिले गेल्यानंतरही वाङ्मयीन वा वैचारिक अगर संशोधनपर लेख छापणारी नियतकालिके फार काळ जगू शकत नाहीत. त्यांच्या वर्गणीदारांच्या किवा जाहिरातीच्या संख्येत वाढ होत नाही. त्यांचे नियमाने प्रकाशन करणे अवघड होते. कागदाचा तसेच छपाईचा खर्च दिवसेदिवस वाढत गेल्यामुळे अनुदानापोटी दिली जाणारी रक्कम अपुरी पडते. ती वाढवून आणि सरकारी जाहिराती देऊन अशा मासिकांना जगवावे यासाठी कविवर्य ना. धो महानोर यांनी आमदार असताना शिफारशी केल्या. त्या तत्त्वत: शासनाने स्वीकारल्याची पाचसहा वर्षापूर्वी घोषणाही केल्या, पण नंतर त्याची अंमलबजावणी झाल्याचे दिसत नाही. आंध्रातील मराठी 'साहित्य परिषदे'तर्फे प्रकाशित होणारे 'पंचधारा', औरंगाबादहून निघणारे 'अस्मितादर्श', अनुष्टुभ् प्रतिष्ठानने 'अनुष्टुभ्', धुळ्याचे 'संशोधक', 'भाषा आणि जीवन', 'नवभारत', 'समाज प्रबोधन पत्रिका', साहित्य संस्थांची नियतकालिके वगैरे दर्जेदार नियतकालिके चालू राहणे मराठी भाषा आणि साहित्य यांच्या विकासासाठी आवश्यक आहे.

१९६० नंतरच्या काळात साहित्य संस्कृती मंडळाने स्थापत्य शिल्पकोश, आयुर्वेदीय शब्दकोश यांच्याखेरीज गुजराती-मराठी, उर्दू-मराठी, कन्नड-मराठी, सिंधी-

मराठी वगैरे शब्दकोश प्रसिद्ध केले. दक्षिण कारवारची कोकणी, काणकोणची कोकणी, कासरगोडची मराठी, गोव्यातील गावडी, ठाण्यातील वारली, माडिया गोडांची बोली, तेलंगणातील अरे मराठा समाजाची भाषा वगैरेच्या अभ्यासावर आधारलेली पुस्तके प्रकाशित करण्यात आली.

साठोत्तरी साहित्यसृष्टीत दलित, ग्रामीण तसेच स्त्रीवादी साहित्य, आदिवासी आणि भटक्या विमुक्त जातीतील लेखकांचे साहित्य, ख्रिस्ती, इस्लाम आणि बौद्ध धर्मीय लेखकांचे साहित्य असे विविध प्रवाह निर्माण झाले. समाजाच्या कनिष्ठ समजल्या जाणाऱ्या वर्गामध्ये तसेच जातीमध्ये जन्मलेले आणि खेड्यापाड्यांत वाढलेले सुशिक्षित तरुण नजरेत भरण्याइतक्या संख्येने मराठीत लिहू लागले. प्रस्थापित मध्यमवर्गीय उच्चवर्णीय साहित्यिक वापरीत असलेल्या शिष्टमान्य किवा प्रमाणभाषेच्या मिरासदारीला बोलीभाषांच्या वापरामुळे आव्हान मिळाले. 'ब्राह्मणी' किवा वर्णश्रेष्ठत्वाच्या भावनेतून निर्माण झालेले साहित्य हाच मुख्य प्रवाह मानावयास हे नवे बंडखोर लेखक तयार नव्हते. १९६० पूर्वी अण्णाभाऊ साठे, बंधुमाधव, शंकरराव खरात हे लेखक कथा व कादंबऱ्या लिहीत होते, पण त्या साहित्य प्रकारांचा आढावा घेताना प्रस्थापित समीक्षक त्यांचा नामनिर्देशही करीत नसत. मग त्यांचे साहित्यगुण जोखणे दूरच राहिले. १८५० ते १९५० या मराठी कादंबरीच्या पहिल्या शतकाचा इतिहास लिहिणाऱ्या कुसुमावती देशपांडे यांना अण्णाभाऊंच्या एकाही कादंबरीचा उल्लेख करावासा वाटला नाही. मात्र वि. स. खांडेकरांनी १९५९ साली 'फकिरा' कादंबरीला लिहिलेल्या प्रस्तावनेत प्रांजळपणे कबुली दिली, "माझ्यासारखे पांढरपेशे लेखक घराच्या खिडकीतून किवा गच्चीत टाकलेल्या आरामखुर्चीतून बाहेरचं जीवन अनुभवतात. तसं अण्णाभाऊंचं नाही. टीपकागद जसा झटकन ओली अक्षरं टिपतो त्याप्रमाणे लहानपणापासून खेडेगावातील दलितांच्या आयुष्यातली आसवं अण्णाभाऊंच्या कलावंत मनानं टिपून घेतली आहेत. नुसती आसवंच नाहीत तर त्यांच्या आशाआकांक्षा, त्यांचे रागलोभ सारं काही त्यांनी आत्मसात केलं आहे. शहरातला पांढरपेशा मनुष्य लिहितो तसलं शुद्ध गद्यही अण्णाभाऊ सहजतेनं लिहितात. खेड्यातील बोली हा तर त्यांचा तळहाताचा मळ आहे.

"दलिताला आपले जीवनाचे स्पष्ट प्रतिबिब आजच्या मराठी साहित्यात दिसत नाही. आजचे साहित्य आरशासारखे स्वच्छ असावे आपला चेहरा आहे तसा दिसावा असं वाटणं गैर नाही." दलितांनी दलित जाणिवेतून दलितांविषयी लिहिलेले साहित्य अशी या साहित्याची व्याख्या आज अनेक जण करतात. मराठी हीच दलितांची भाषा आणि त्या भाषेतून सर्वांना ज्ञान मिळाले पाहिजे असा आग्रह धरणारे 'महानुभाव' पंथीय साहित्यिक ते आमचे साहित्यिक असे अण्णाभाऊंना वाटत होते. माणसाला माणूस म्हणून जगता आले पाहिजे असा दावा मांडून ज्यांनी दलितांच्या भाषेत महाराष्ट्राला सुंदर ज्ञानेश्वरी दिली ते आमचे साहित्यिक आणि चुकलेले महाराचे मूल कडेवर घेऊन

जाणारे एकनाथ ते आमचे साहित्यिक'' असे अण्णाभाऊंनी १९५८ च्या दलित साहित्य संमेलनात जाहीर केले होते.

केवळ कणव किंवा भूतदया यावर आधारलेल्या साहित्यास मानवतावादी साहित्य म्हणणे बरोबर नाही. समतेवर आधारलेल्या समाजाची निर्मिती करणे आणि माणसाला माणूस म्हणून जगण्याची समान संधी मिळणे संघर्षाशिवाय शक्य नाही, असे आजच्या बहुतेक दलित साहित्यिकांना वाटते. आपल्या देशातील मूलत: अन्याय्य आणि विषम वर्णजातिव्यवस्था नष्ट केल्याशिवाय येथे खरा बंधुभाव किंवा भगिनीभाव निर्माण होणार नाही. फक्त दारिद्र्यनिर्मूलनावर भर देऊन हे उद्दिष्ट साध्य होईल, असे त्यांना वाटत नाही.

दलित साहित्य आणि ग्रामीण साहित्य हे साहित्याचे भिन्न प्रकार आहेत, असे शरच्चंद्र मुक्तिबोध मानीत असत. ग्रामीण साहित्याला सर्वांगीण परिवर्तनाची निकड वाटत नसल्याचे दिसते. वर्णव्यवस्था आणि जातिव्यवस्था याविरुद्ध ग्रामीण साहित्य बंड करण्यास सज्ज झालेले दिसत नाही. ग्रामीण साहित्याचे निर्माते सर्वांगीण परिवर्तनाचे साधन म्हणून साहित्याचा वापर करण्यास तयार नाहीत. शहरात राहून गावाकडच्या गोष्टी सांगताना त्यांना वाटणारी गावाबद्दलची ओढ व्यक्त होते. याउलट खेड्यात जन्मलेल्या आणि बालपण व्यतीत केलेल्या दलित लेखकाने कुटुंबातील वडिलधाऱ्यांची ससेहोलपट आणि संघर्ष पाहिलेला असतो आणि त्यामुळे कोवळ्या वयात झालेला कोंडमाराही अनुभवलेला असतो. म्हणून त्याला खेड्याची ओढ वाटत नसते. 'जग बदल घालुनी घाव, सांगून गेले भीमराव' ही दलित साहित्याची मूळ प्रेरणा आहे. ग्रामीण साहित्य घाव घालून जग बदलण्याची भाषा करीत नाही.

१९८० साली लक्ष्मण माने यांचे 'उपरा' हे आत्मवृत्त प्रसिद्ध झाले. १९८४ साली त्यांनी 'बंद दरवाजा' ठोठावला आणि १९९० साली 'त्यांनी 'पालावरचं जग' शब्दांकित केले. भटक्या आणि इंग्रजी राजवटीने 'गुन्हेगार' असा शिक्का मारलेल्या विमुक्त जातीत जन्मलेल्यांचे अनोखे जीवनानुभव आणि त्यांच्या बोली यांची ओळख मराठी साहित्यसृष्टीला प्रथमच झाली. लक्ष्मण गायकवाड यांच्या 'उचल्या' या आत्मचरित्रात तेलुगु, हिंदी आणि ग्रामीण मराठी यांच्याबरोबरच मराठवाडी बोली यांची सरमिसळ झाली आहे. अण्णाभाऊ साठे, लक्ष्मण माने, लक्ष्मण गायकवाड, बेबी कांबळे वगैरेंच्या लेखनात शिष्टमान्य प्रमाणभाषा आणि बोलीभाषा यांचा जसा मिलाफ झालेला दिसतो तसा शंकरराव खरात आणि दया पवार यांच्या आत्मचरित्रात आढळत नाही. 'तराळ-अंतराळ' किंवा 'बलुतं' या आत्मचरित्रांतील निवेदनात ग्रामीण भागातील दलितांच्या बोलीतील शब्द येत असले तरी निवेदनाची भाषा ही मुख्यत: शिष्टमान्य प्रमाण मराठी भाषा आहे.

अलीकडे वडोदरा येथील भाषा संशोधन प्रकाशन केंद्रातर्फे डॉ. सुधीर देवरे

यांनी प्रकाशित केलेला 'ढोल' या नियतकालिकाचा दुसरा अहिराणी अंक वाचला. अहिराणी, पावरी, भिली, देहवाली, राठवी भिली, कुकणा डांगी, डुंगरी भिली, पंचमहाली भिली आणि भांतु अशा एकूण आठ बोलीमध्ये 'ढोल' प्रसिद्ध करण्यात येते. नाशिक, नंदुरबार, धुळे आणि जळगाव या महाराष्ट्रातील चार जिल्ह्यांत आणि गुजरातमध्येही अहिराणी ही बोलीभाषा वापरली जाते. ज्ञानभाषा, व्यवहारात सर्रास वापरली जाणारी भाषा आणि ग्रंथलेखनाची भाषा असा तिहेरी विकास झाल्याखेरीज कोणत्याही बोलीभाषेस प्रमाणभाषा म्हणून मान्यता दिली जात नाही. अहिराणी बोलीतील नियतकालिके आणि वेगवेगळ्या विषयांवरची पुस्तके प्रसिद्ध होऊ लागली की, कालांतराने अहिराणीस प्रमाणभाषा म्हणून मान्यता मिळेलही. अहिराणी बोली भाषेत लिहिलेल्या 'काळोख आजूनबी तश्याच' या लेखाच्या आरंभीच्या आठदहा वाक्यांमध्ये लाइट, टी. व्ही., टेलिफोन, कॉलेज, कॉम्प्युटर, फॅक्स, मेडिकल ऑफिसर, गाऊन, मास्क, ग्लोव्ह्ज, पेशंट, बॅटरी, क्वार्टर या इंग्रजी शब्दांनी गर्दी केलेली दिसली. लेखक व्यवसायाने डॉक्टर असल्यामुळे इतक्या इंग्रजी शब्दांचा भडिमार सहजगत्या लेखकाने केला असावा. मात्र नंतर मुसळधार पावसात रात्रीच्या काळोखात पंधरावीस झोपड्यांच्या वस्तीत जाऊन एका अडलेल्या बाळंतिणीची त्याने सुटका केली. मुलगा जन्माला आला हे ऐकताच दिवसभर उपाशी पोटी कळा सोसून दमलेल्या त्या भिल्लीणीला गाढ झोप लागून ती घोरू लागली. सरपटत झोपडीतून डॉक्टर बाहेर पडले तेव्हाही घनदाट काळोख होता. 'आठे पहाट तरी कैन्ह व्हत व्हयी का ?' असा प्रश्न पडलेल्या डॉ. मोहन माजगावकरांच्या मनात मात्र सगळा काळोख भरला होता. आपला अनुभव डॉक्टरांनी अहिराणीत शब्दबद्ध केल्यामुळे जितका परिणामकारी झाला आहे, तितका तो शिष्टमान्य प्रमाणभाषेत मी आपणांस सांगितल्यामुळे परिणामकारक वाटलाही नसेल. बोलीभाषेतला जिवंतपणा साचेबंद प्रमाणभाषेत आणणे अवघड असते. ती किमया बोलीभाषा वापरणाऱ्याला विनासायास साधता येते.

१९६७ साली भोपाळच्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात वि. भि. कोलते म्हणाले, "सध्या अस्तित्वात असलेली सुशिक्षितांच्या तोडची मराठी भाषा ही तरी एक प्रादेशिक बोलीच होती. ती बोलणाऱ्या लोकांनी आधुनिक मराठी वाङ्मय प्रथम विपुल प्रमाणात निर्माण केले. तिचेच व्याकरण तयार करण्यात आले. वस्तुत: ते संपूर्ण मराठीचे व्याकरण नव्हे, कारण त्यात मराठीच्या इतर बोलीचा विचार झालेला नाही. या तथाकथित मराठी व्याकरणाच्या अनुषंगाने शुद्धाशुद्धतेचे मानदंड तयार झाले म्हणून इतर बोलीतील ध्वनिसमूहांवर अशुद्धतेची लांछनमुद्रा लावण्यात आली." १९७५ अखेरीस कऱ्हाडला भरलेल्या साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात दुर्गाबाई भागवत म्हणाल्या, "शिष्टभाषा व बोलीभाषांचं अभिसरण साहित्यिक वातावरणाला पोषक आहे, मारक नाही, बोलभाषेत कितीही लिहिलं आणि प्रमाणित भाषेनं लोकभाषा

कितीही आत्मसात केली तरी जिथं असंदिग्ध, विदग्ध आणि शास्त्रीय अभिव्यक्ती लागते तिथं प्रमाणित भाषाच काय ती उपयुक्त होते व ती टिकूनही राहते.''

सध्या शिष्टमान्य वा प्रमाण मानल्या जाणाऱ्या मराठी भाषेचे रूपांतर एकविसाव्या शतकात देवनागरी लिपी अनुसरणाऱ्या इंग्रजाळलेल्या मराठीत होण्याची शक्यता निर्माण झालेली आहे; छापखान्याच्या प्रभावाचे वर्णन करताना त्याची सर्वात मोठी मर्यादा बहिणाबाई चौधरींनी एका कवितेत सांगितली आहे :

*नानाजीचा छापखाना । त्यात मोठे पुठ्ठे ॥*
*तसे शाईचे डराम । आन कागदाचे गठ्ठे ॥*
*किती शिश्याच्या चमट्या । ठसे काढले त्यावर*
*कसे निंघती कागद । छापीसनी भराभर ॥*
*चाले छाप्याचं यंतर'। जीव आठ बी रमतो*
*टाकीसनी रे मंतर । जसा भगत घुमतो ॥*
*मानसापरी मानूस । राहतो रे येडजाना*
*अरे व्हतो छापीसनी । कोरा कागद शहाना ॥*

छापलेली पुस्तके वाचून माहिती मिळवता येते. माहिती आणि ज्ञान हे शब्द माधवराव पटवर्धनांसारख्या पंडित कवीने समानार्थी म्हणून जळगाव साहित्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात वापरले होते. आता माहिती म्हणजे ज्ञान नव्हे याची बहुतेकांना जाणीव असते. ज्ञान वाढले तरी शहाणपण येतेच असे नाही. विसाव्या शतकाच्या अखेरीस छापखान्याऐवजी इंटरनेटचा वापर माहिती आणि ज्ञान यांचा प्रसार करण्यासाठी केला जात आहे. छापखान्यामुळे कोरा कागद शहाणा होतो पण माणूस वेडाच राहतो, असे निरक्षर बहिणाबाईंना वाटत होते. 'मानसा, मानसा कधी व्हशीन मानूस ?' हा त्यांचा प्रश्न आजही कालबाह्य झालेला नाही. माहितीच्या महाजालात २१व्या शतकात माणूस पुरता अडकलेला असेल तेव्हा बहिणाबाईंनी ५० वर्षापूर्वी मराठीत विचारलेला प्रश्न मराठी भाषकांनाही इंग्रजीत विचारावा लागेल, कारण माहितीच्या महाजालाचे माध्यमच इंग्रजी आहे.

१९२५साली पुण्यात भरलेल्या शारदोपासक संमेलनात इतिहासाचार्य राजवाड्यांनी मराठी भाषा मरणाच्या पंथाला लागली असून पन्नपंचवीस वर्षांनी सर्व महाराष्ट्र इंग्रजी भाषा शुद्ध किंवा अपभ्रष्ट अशी हॉगकाँगमधील पीज्यन इंग्लिशप्रमाणे बोलू लागेल, असे भाकित वर्तवले होते. त्यांचे हे 'अभद्रभविष्य' खरे ठरलेले नाही, असे मत रा. श्री. जोग यांनी १९७४च्या इचलकरंजी येथील साहित्य संमेलनाच्या स्मरणिकेतील लेखात व्यक्त केले. मात्र राजवाड्यांची मूळ तक्रार आणि भीती यांचे निवारण झालेले नाही, हेही त्यांनी मान्य केले.

कन्नड भाषा शिकण्याची सक्ती कर्नाटक राज्यात करण्यात आली, पण मराठी भाषा शिकण्याची सक्ती करावी, असा विचारही महाराष्ट्र राज्य सरकारने आजतागायत केलेला नाही. आता तर प्राथमिक शाळेत मुलांना पहिल्या इयत्तेपासून इंग्रजी शिकवण्याचा महाराष्ट्र राज्य शासनाने निर्णय जाहीर केला आहे. त्यामुळे ग्रामीण जनतेला जागतिकीकरणाच्या प्रक्रियेला सामोरे जाण्यास मदत होईल आणि कालांतराने इंग्रजी भाषेमुळे मराठी भाषा श्रीमंत होईल, अशा शब्दांत महाराष्ट्राच्या सध्याच्या शिक्षणमंत्र्यांनी या निर्णयाचे समर्थन केले. 'परमेश्वरा, त्यांना क्षमा कर, आपण काय करीत आहोत ते त्यांना कळत नाही' अशी ख्रिस्ताने प्रार्थना केली होती म्हणतात. राजवाड्यांनी मात्र १९२५ साली अशी प्रार्थना केली नाही. त्यांच्या मते महाराष्ट्रापुढे तीन मार्ग होते. १) इंग्रजीचा आश्रय करावा २) किंवा मराठीला चिकटून राहावे किंवा ३) इंग्रजीच्या हल्ल्याने मराठीचा जेवढा चुराडा होईल तेवढा निमूटपणे व संतभावाने होऊन द्यावयाचा.

कोमेनिअस या शिक्षणशास्त्रवेत्याने म्हटले आहे, " To attempt to teach a foreign language before the mother tongue has been learned is as irrational as to teach a boy to ride before he can walk."

जपान या राष्ट्राला सध्या विकसित राष्ट्रांच्या रांगेत तसेच सायबर विश्वातही मानाचे स्थान दिले जाते. १७७१ पर्यत जपानी भाषेची चिनी भाषेवर भिस्त होती. चिनी भाषेतला शब्द घेऊन त्याला आपल्या भाषेतले प्रत्यय लावून जपानी भाषा बनवण्याचा खटाटोप जपानी लोकांना करावा लागला. १७८८ पासून प्रथम ते डच भाषा शिकू लागले. १८१७ मध्ये साबुरो फुजायने आपल्या देशबांधवांना इंग्रजी भाषेचा परिचय करून दिला. युकिची फुकुझावा याने १८८२ साली 'जिजि' (काळ) हे वर्तमानपत्र जपानी भाषेत सुरू केले. पन्नास ग्रंथ लिहून त्याने आधुनिक कला व शास्त्रीय ज्ञान जपानी भाषेत प्रकट करता येते, याची खात्री पटवली. (वि. कृ. नेरूरकर : मराठीचा संसार, १९२८, पृष्ठे ७५-७९.) जागतिकीकरणाला सामोरे जाण्यासाठी जपानला महाराष्ट्राप्रमाणे इंग्रजी भाषेचे स्तोम माजविण्याची आवश्यकता भासत नाही. तेथील सर्व व्यवहार जपानी भाषेतच केले जातात.

अलीकडच्या वर्षांत लेखकांच्या व कलावंतांच्या आविष्कारस्वातंत्र्याच्या मूलभूत अधिकारावर आघात करून ते हिरावून घेण्याचे वाढते प्रकार घडत आहेत आणि कायदा आणि सुव्यवस्था या संज्ञा एकाच वेळी एकत्रितरीत्या वापरल्या जात असल्या तरी त्यांचा अर्थ भिन्न आहे. दोहोंपैकी एकाची निवड करून त्याला प्राधान्य देण्याचा प्रश्न निर्माण झाला की प्रशासक सुव्यवस्था राखण्यास प्राथम्य देतात आणि कायदा हाती घेणाऱ्याकडे दुर्लक्ष करतात. अलीकडे पाणी केव्हा पेट घेईल याचा नेम नसतो. 'वॉटर' चित्रपटाची पटकथा केंद्रीय माहिती व प्रसारण खात्याच्या मंत्री महोदयांना आक्षेपार्ह वाटली नाही तरी वाराणशीत मूठभर लोकांनी चित्रीकरणात विघ्ने आणली

आणि चित्रीकरण थांबवून चित्रपटाशी संबंधित व्यक्तींना वाराणशीबाहेर जावे लागले. सुव्यवस्थेला धोका पोहोचेल आशा कारणाने जिल्हाधिकाऱ्याने चित्रीकरणात व्यत्यय आणणाऱ्यांना पाठीशी घातले. ज्यांच्यापासून लेखकांना आणि कलावंतांच्या जिवाला धोका असतो, अशा बलदंड नेत्यांच्या आणि त्यांच्या कुटुंबियांच्या सुरक्षिततेसाठी शेकडो पोलीस आणि डझनभर मोटारी तैनात केल्या जातात आणि करदात्यांच्या पैशांतून कोट्यवधी रुपये खर्च केले जातात. त्यामुळे या मोजक्या माणसांना आविष्कारस्वातंत्र्याचा मनमुराद उपभोग घेता येतो. त्यांचे उपद्रवमूल्य लक्षात घेऊन नाट्यपरिनिरीक्षण मंडळाने मंजूर केलेली नाटकाची संहिता या बड्या धेंडांना दाखवून त्यांची मान्यता मिळवणे मी मी म्हणणाऱ्या नाटककारांना किंवा चित्रपटनिर्मात्यांना अपरिहार्य होते. आता चित्रपट किंवा नाट्यपरिनिरीक्षण मंडळाचे प्रमाणपत्र महत्त्वाचे असत नाही. सुपरसेन्सॉर म्हणून अनधिकृतरीत्या काम करणाऱ्यांची मर्जी सांभाळणे महत्त्वाचे असते. त्यांच्यासाठी नाटकाचे किंवा चित्रपटाचे खास खेळ आयोजित करणे भाग पडते.

१९९४ च्या ऑगस्टमध्ये फ्रान्सच्या घटनेविषयीच्या परिषदेने एक अत्यंत महत्त्वाचा निर्णय दिला. दूरचित्रवाणी, नभोवाणी व वृत्तपत्रे यांनी फ्रान्सच्या सरकारला मान्य नसलेले परकीय भाषेतील शब्द वापरू नयेत या आशयाचे कायदे तेथील संसदेने केले होते. फ्रेच भाषेतून इंग्रजी शब्द आणि वाक्प्रयोग हद्दपार करणे, हे त्या कायद्यांचे उद्दिष्ट होते. फ्रान्सच्या संविधानानुसार १७८९ च्या फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळी जारी करण्यात आलेल्या मानवी अधिकारांच्या जाहीरनाम्यास संरक्षण देण्यात आले आहे. अलीकडे फ्रान्सने परकीय शब्दांची हकालपट्टी करण्याबाबत केलेले कायदे १७८९च्या मानवी अधिकारांच्या जाहीरनाम्यातील आविष्कारस्वातंत्र्याच्या हमीशी विरोधी आहेत, असे कारण देऊन घटनेविषयीच्या परिषदेने ते अवैध ठरवले, फ्रेंच भाषेच्या शुद्धीकरणापेक्षा व्यक्तीचे अधिकारस्वातंत्र्य जास्त महत्त्वाचे ठरल. मात्र फ्रान्समधील सरकारी कर्मचाऱ्यांना परकीय भाषेतील शब्द वापरण्यास केलेला प्रतिबंध वैध ठरवण्यात आला.

लोकशाहीत विचारांचा मुकाबला विचारांनी करावयाचा असतो. भारतीय घटनेने दिलेला आविष्कारस्वातंत्र्याचा अधिकार वापरताना घटनेच्या शिल्पकारांनी नमूद केलेले निर्बंध लेखकांनी, कलावंतांनी, प्रसारमाध्यमांनी जसे पाळावयास हवेत तसेच ते सरकारने किंवा त्यांच्या समर्थकांनीही पाळले पाहिजेत. कोणीही मर्यादा ओलांडल्या की त्याचे कृत्य वाजवी आहे की नाही हे ठरवण्याचा अधिकार न्यायपलिकेस असतो. मोर्चे आणून, विधानमंडळांच्या सभागृहाबाहेर अगर सभागृहात हुल्लड माजवून, पुस्तकांच्या होळ्या पेटवून, त्यांच्यावर बंदी आणून आविष्कारस्वातंत्र्य हिरावून घेणाऱ्या असहिष्णू लोकांची संख्या वाढते आहे. नेत्यांचे दैवतीकरण करण्याची प्रवृत्ती, जातीविषयीचा व धर्माचा दुरभिमान या दुष्प्रवृत्ती वाढीस लागल्या की कोणाच्या भावना केव्हा दुखावतील

याचा नेम नसतो. आविष्कारस्वातंत्र्यावर आघात करण्याच्या सवयीस वेळीच आळा घातला नाही, तर लोकशाहीचे रूपांतर प्रथम झुंडशाहीत आणि नंतर एकपक्षीय हुकूमशाहीत किंवा लष्करशाहीत होते.

आपल्या तसेच इतरांच्या आविष्कारस्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी सदैव दक्षता, सहिष्णुता व संयम बाळगण्याची आवश्यकता असते. आविष्कारस्वातंत्र्यावर हल्ले होतील तेव्हा निर्भयपणे आपले मत मांडताना किमतही मोजावी लागते. ती मोजण्याचे सामर्थ्य आपणा सर्वांना लाभेल अशी आशा व्यक्त करून मी आपली रजा घेतो.

# संदर्भ-सूची
## (चिकित्सा)
### (सुरुवातीचा अंक खंडाचा व त्यानंतरचा अंक पृष्ठाचा आहे. कंसात उपनाम, स्थळ, अभ्यासविषय वगैरेंचा उल्लेख आहे.)

□□□

# संदर्भ-सूची

## अध्य य भाषणे

**(सुरुवातीचा अंक खंडाचा व त्यानंतरचा अंक पृष्ठाचा आहे. कंसातील उपनामे त्या त्या पृष्ठावर आढळतात. त्यांचा उल्लेख एकदाच केला आहे. तीच बाब नावांच्या लेखनपद्धतीची. इतरत्र कंसात स्थळ, त्या व्यक्तीचा विषय वगैरे माहिती जरूर तेथे दिली आहे. अधोरेखित अंक त्या व्यक्तीच्या अध्यक्षीय भाषणाची सुरुवात दर्शवितो.)**

---

□□□

# संदर्भांचे विश्लेषण

तीनही खंडातील संदर्भांचा तथ्यांकशास्त्रानुसार विचार करता येईल. मात्र तथ्यांकशास्त्राला आवश्यक अशा काही गोष्टी या मोजमापापूर्वी लक्षात ठेवणे आवश्यक आहे.

एक, प्रत्येक संदर्भित व्यक्तीच्या नावाची वारंवारता अध्यक्षीय भाषणातील पृष्ठानुसार घेतली आहे. एका पृष्ठावर अनेकदा ते नाव असले तरी वारंवारता एकच धरली आहे. ही केवळ नावाच्या वारंवारतेची मोजणी आहे.

दोन, यावरून व्यक्तीच्या माहात्म्याचे, त्याच्या साहित्यिक गुणवत्तेचे निष्कर्ष काढता येणार नाहीत. फक्त मराठी परंपरेत त्या व्यक्तीच्या स्मरणानुसार त्याचे स्थान ठरविण्यास मदत होईल. व्यक्तीचे विस्मरण हा बदलत्या अभिरुचीचा परिणाम असणे शक्य आहे. मात्र ही बदलती अभिरुची प्रागतिक आहे असे ठामपणे म्हणता येणार नाही. बदलामधेही टिकून राहणारी स्मृती अर्थातच महत्त्वाची आहे.

तीन, प्रत्येक खंडात दहा किंवा दहापेक्षा जास्त वारंवारता असणाऱ्या व्यक्ती प्रथम दिल्या आहेत. दहा हा आकडा केवळ सोयीसाठी धरला आहे तीनही खंडांचा विचार करता ७३ भाषणात एकंदर ३० वेळा नावाची वारंवारता आली तर ते नाव महत्त्वाचे मानता येईल. अर्थात प्रत्येक भाषणानुसार वारंवारता घेणे अधिक फायद्याचे ठरले असते.

या व्यक्तीमध्ये प्रामुख्याने साहित्यिक आहेत हे खरे. पण त्याचबरोबर इतिहास, संशोधक, राजकारणी, संस्कृत व इंग्रजीतील महनीय, परभाषेतील साहित्यिक यांचाही समावेश केला आहे.

आधी जन्मलेल्या व्यक्तीना दीर्घ काळाचा फायदा मिळणार आहे. व्यक्तीच्या जन्मवर्षाचा विचार करून वारंवारता काढल्यास फरक पडेल.

उल्लेख आणि त्या व्यक्तीच्या विचारांचा प्रभाव यात संबंध शोधण्यास विषयांची सूची तयार करावी लागेल.

काही नावांचा उल्लेख स्पष्ट नसल्यामुळे सूचीमध्ये चुकून काही वेळा दोन वेगळ्या नोंदी आल्याची शक्यता नाकारता येत नाही.

अध्यक्षाच्या भाषणात उल्लेखित होणाऱ्या सर्वच व्यक्ती साहित्यिक नाहीत. त्यामुळे संदर्भ-सूचीतील एकूण संदर्भित संख्या लक्षात घेणे जरुरीचे नाही.

उपस्थित असलेल्या साहित्यिकाचे नाव घेणे आणि भाषणाच्या ओघात साहित्यिक म्हणून व्यक्तीचा उल्लेख होणे यात मोजणीमध्ये फरक केलेला नाही. त्यामुळेही उल्लेखाचा थेट गुणवत्तेशी संबंध जोडणे अवघड आहे.

| नाव | खंड १ | खंड २ | खंड ३ | एकूण वारंवारता |
|---|---|---|---|---|
| अत्रे | ११ | १० | १५ | ३६ |
| आगरकर | १७ | १२ | १० | ३९ |
| ह. ना. आपटे | ३२ | १६ | २० | ६८ |
| डॉ. आंबेडकर | १ | १ | २९ | ३१ |
| एकनाथ | २३ | २४ | २ | ४९ |
| करंदीकर विंदा | - | ११ | ६ | १७ |
| कालिदास | २० | १० | १७ | ४७ |
| कुसुमाग्रज | ३ | ६ | २२ | ३१ |
| न. चिं. केळकर | ३१ | १५ | ११ | ५७ |
| डॉ. केतकर | १६ | १३ | १० | ३९ |
| केशवसुत | १० | २७ | १९ | ५६ |
| श्री. कृ. कोल्हटकर | ३२ | ८ | ७ | ४७ |
| वासुदेव खरे | ११ | १ | २ | १४ |
| कृ. प्र. खाडिलकर | १८ | ४ | ११ | ३३ |
| वि. स. खांडेकर | १४ | ८ | १३ | ३५ |
| गडकरी | २३ | ८ | १५ | ४६ |
| महात्मा गांधी | १८ | २० | ९ | ४७ |
| सयाजीराव गायकवाड | १९ | २ | ४ | २५ |
| गिरीश | १० | १ | १ | १२ |
| चिपळूणकर | ३५ | १८ | ९ | ६२ |
| वा. म. जोशी | १८ | १० | ७ | ३५ |
| ना. वा. टिळक | १५ | ३ | २ | २० |
| लोकमान्य टिळक | ४२ | २६ | १६ | ८४ |
| तुकाराम | ३५ | ३४ | २२ | ९१ |
| पु.ल. देशपांडे | - | ४ | १० | १४ |
| ज्ञानेश्वर | ४८ | ५५ | ३७ | १४० |
| नामदेव | १० | १२ | ४ | २६ |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| निजाम | १० | १ | ० | ११ |
| शि. म. परांजपे | १४ | ८ | १३ | ३५ |
| ना. सी. फडके | १९ | ८ | ६ | ३३ |
| महात्मा फुले | ४ | ७ | २२ | ३३ |
| बोरकर | ४ | १० | १० | २४ |
| भगवद्गीता | १४ | १० | ५ | २९ |
| भाडारकर रा गो. | १५ | ७ | ० | २२ |
| विनोबा भावे | - | १७ | ७ | १७ |
| महाजनी वि. मो. | १२ | १ | १ | १४ |
| मर्ढेकर | १ | १७ | १८ | ३६ |
| श्री म माटे | ९ | ८ | ११ | २८ |
| माडखोलकर | १४ | १३ | ४ | ३१ |
| व्यंकटेश माडगूळकर | - | ११ | ११ | २२ |
| माधव ज्युलिअन | १७ | ११ | १३ | ४१ |
| मुक्तेश्वर | १० | ८ | ० | १८ |
| मोरोपत | २२ | ६ | ४ | ३२ |
| यशवंत | १० | ४ | ० | १४ |
| वि का राजवाडे | ३९ | १५ | १६ | ७० |
| न्या रानडे | २३ | १४ | १० | ४७ |
| रामदास | २४ | २१ | १२ | ५७ |
| लोकहितवादी | १६ | ९ | १० | ३५ |
| वरेरकर | १७ | ९ | ५ | ३१ |
| वामन पंडित | १० | २ | ५ | १७ |
| वैद्य चिं. वि. | १९ | २ | ० | २१ |
| रियासतकार सरदेसाई | १२ | २ | २ | १६ |
| साने गुरुजी | २ | १० | ७ | १९ |
| सावरकर | १९ | ८ | १९ | ४६ |
| शिवाजी महाराज | १९ | १९ | १२ | ५० |
| शेक्सपिअर | १२ | १० | १२ | ३४ |

यावरून काही निरीक्षणे नोदवता येतील.

पहिल्या पायरीवर ३० च्या वर वारंवारता असणाऱ्यांची उतरती श्रेणी अशी : ज्ञानेश्वर - टिळक - राजवाडे - तुकाराम व चिपळूणकर - आपटे व कोल्हटकर - न.

चिं. केळकर

पायरी दोन : ज्ञानेश्वर - तुकाराम

पायरी तीन : ज्ञानेश्वर

तीनही पायऱ्यांचा एकत्र विचार केला तर वरील सर्वांची श्रेणी उतरत्या क्रमाने अशी लागते.

ज्ञानेश्वर - तुकाराम - लो. टिळक - राजवाडे - ह. ना. आपटे - चिपळूणकर - न. चिं. केळकर - कोल्हटकर

यातील पहिले दोन संत, टिळक हे राजकीय नेते व विद्वान राजवाडे इतिहास-संशोधक. त्यानंतरचे तिघे साहित्यिक. मराठी परंपरेत केवळ निखळ ललित साहित्याचा बडेजाव नाही हे यातून दिसते. संत वाङ्मयाचा प्रभावही जाणवण्यासारखा आहे. मराठीचे हे मानदंड मानता येतील.

या खालोखाल एकूण वारंवारता २० ते ३० अशी पाहिली तर उतरत्या क्रमाने येणारी नावे अशी,

पायरी १ : रामदास - एकनाथ, गडकरी, न्या रानडे - मोरोपंत - कालिदास

पायरी २ : केशवसुत - लो. टिळक - एकनाथ - रामदास - महात्मा गांधी

पायरी ३ : डॉ. आंबेडकर - फुले, तुकाराम व कुसुमाग्रज - ह. ना. आपटे

तीनही पायऱ्यांचा एकत्र विचार केला तर वरील सर्वांची श्रेणी उतरत्या क्रमाने अशी लागते.

तुकाराम - लो. टिळक - राभदास - केशवसुत - एकनाथ - न्या. रानडे व म. गांधी व कालिदास - गडकरी - फुले - मोरोपंत - डॉ. आंबेडकर व कुसुमाग्रज

यातील काही व्यक्तीच्या बाबतीत सहजपणे काही गोष्टी दृष्टोत्पत्तीस येतात.

१९४९ ते १९७५ या दुसऱ्या पायरीवर ज्ञानेश्वर व केशवसुत यांचे महत्त्व वाढलेले दिसते. तर १९४९ पासून पुढे २००० पर्यंत आगरकर, ह. ना. आपटे, न. चिं. केळकर, डॉ. केतकर, श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, चिपळूणकर, लो. टिळक, मोरोपंत, राजवाडे, न्या. रानडे यांचे महत्त्व हळूहळू कमी होते. डॉ. आंबेडकर, फुले व कुसुमाग्रज यांचे महत्त्व मात्र वाढलेले दिसते.

आपण श्रेणीचे दोन वर्ग केले कोणत्याही पायरीवर ३० च्या वर वारंवारता असणारा एक वर्ग व दुसरा कोणत्याही पायरीवर २० ते ३० एवढी वारंवारता असणारा वर्ग. या वर्गातील व्यक्तीची तीनही पायऱ्यांवरील एकूण वारंवारता पाहिली तर कमाल वारंवारता ज्ञानेश्वरांची (१४०) व किमान वारंवारता डॉ आंबेडकर व कुसुमाग्रजांची (३१) आहे.

पण तीनही पायऱ्यांच्या एकूण वारंवारतेमध्ये १४० ते ३१ यात इतरही काही व्यक्ती येतात. त्या सर्वांची उतरत्या क्रमाने आता पुन्हा एकदा श्रेणी पाहू.

१४० - ज्ञानेश्वर, ९१ तुकाराम, ८४ - लो. टिळक, ७०-राजवाडे, ६८-ह ना. आपटे, ६२-चिपळूणकर, ५७-रामदास व न. चिं. केळकर, ५६-केशवसुत, ५०-शिवाजी महाराज, ४९-एकनाथ, ४७-श्री. कृ. कोल्हटकर, कालिदास, महात्मा गांधी व न्या. रानडे, ४६-गडकरी व सावरकर, ४१-माधव ज्युलियन, ३९-आगरकर व डॉ. केतकर, ३६-मर्ढेकर व अत्रे, ३५-खांडेकर, वा. म. जोशी, शि. म. परांजपे व लोकहितवादी, ३४-शेक्सपिअर, ३३-खाडिलकर, फडके, फुले, ३२-मोरोपंत, ३१-कुसुमाग्रज, माडखोलकर आंबेडकर व वरेरकर.

यातील शिवाजी महाराज, महात्मा गांधी, कालिदास, शेक्सपिअर यांचा अपवाद करता बाकीचे ३१ मराठी लेखनातून दिसणारे मानदंड आहेत असे संदर्भाच्या वारंवारतेचा निकष लावला तर म्हणता येईल.

या ३१ व्यक्तीमधील ह. ना. आपटे, न. चिं. केळकर, श्री. कृ कोल्हटकर, वि दा सावरकर, माधव ज्युलिअन, डॉ. केतकर, आचार्य अत्रे, वि.स. खांडेकर, वा स. जोशी, शि म. परांजपे, खाडिलकर, फडके, कुसुमाग्रज, माडखोलकर आणि वरेरकर अशा एकूण १५ व्यक्ती साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी होत्या. म्हणजे सुमारे २१ टक्के अध्यक्ष हे संदर्भाबाबत महत्त्वाचे आहेत.

संदर्भसूचीकडे काळजीपूर्वक पाहिल्यास आणखी काही गोष्टी सहजपणे जाणवतात.

गिरीश, ना वा. टिळक, मोरोपंत, यशवंत, वामन पंडित या साहित्यिकांचे तर सयाजीराव गायकवाड, डॉ. भांडारकर, वि. मो. महाजनी, कृ. पां. कुलकर्णी, चि. वि. वैद्य, रियासतकार सरदेसाई यांचे महत्त्व १९४७ नतर संपुष्टात येते, त्यांचे उल्लेख अभावानेच येतात. भगवद्गीतेचा संदर्भही क्षीण होतो. १९७६ नंतर मुक्तेश्वर व मुकुंदराय या पूर्वीच्या बऱ्यापैकी संदर्भित अशा कवीचा पूर्ण विसर पडतो.

एरवी महत्त्वाच्या वाटणाऱ्या चिं. वि. जोशी, भा. रा. तांबे, दत्तो वामन पोतदार, बालकवी, ग. दि. माडगूळकर, पु. शि. रेगे, नारायण सुर्वे, शंकरराव खरात, इंदिरा संत यांचे उल्लेख विखुरलेले पण संख्येने कमी आहेत

दोन-चार वेळा उल्लेखित साहित्यिक विचारवंत बरेच गुणवत्तेने श्रेष्ठ असणारे साहित्यिक आहेत.

पहिल्या पायरीवर भवानराव पंतप्रतिनिधी हे अध्यक्ष आहेत, पण त्यांचा उल्लेख अन्यत्र कुठेही येत नाही. दुसऱ्या पायरीपासून त्यांचे संदर्भ येतात

दुसऱ्या पायरीवरील वि. द. घाट्यांची स्थिती समान आहे. त्यांचा पुढे तिसऱ्या पायरीवर उल्लेख होतो. तिसऱ्या पायरीवरील शेवटचे अध्यक्ष य. दि. फडके तसेच यू. म. पठाण यांचा उल्लेख इतर कोणाही अध्यक्षांच्या भाषणात नाही. व्यक्तीची साहित्यिक जगतातील आठवण आणि अध्यक्षपदावरील निवड यात संबंध नसल्याची ही उदाहरणे फारशी भूषणावह नाहीत.

तिसऱ्या पायरीवर (१९७६-२०००) २२ अध्यक्ष आहेत. १९८९ ते २००० या बारा वर्षांच्या अलीकडच्या काळात के. ज. पुरोहित, यू. म. पठाण, मधु मंगेश कर्णिक, रमेश मंत्री, राम शेवाळकर, ना. सं. इनामदार, द. मा. मिरासदार व य. दि. फडके या ८ अध्यक्षांची दखल १९७५ पर्यंत अजिबात घेतली गेलेली नाही. तिसऱ्या पायरीवरही यातील बहुतेकांचा उल्लेख अत्यल्प आहे. म्हणजे अगदी अलिकडच्या काळातील अध्यक्षांची निवड ही एरवी अनुल्लेखनीय अशाच व्यक्तीची सातत्याने होते की काय अशी शंका येण्यास ही संख्या पुरेशी आहे. उलट पुरोहित, मिरासदार, कर्णिक, इनामदार या साहित्यिकांचे स्मरण इतर अध्यक्षांना फारसे होऊ नये ही गोष्ट अध्यक्षीय भाषणांचा आवाका किती सीमित आहे असेही दाखविते. आत्मनिवेदनात दंग झालेले अध्यक्ष आणि मुख्य साहित्यधारेत अनुल्लेखित असणारे अध्यक्ष या दोन गोष्टी एकमेकास पूरक आहेत असे दिसते.

१९६४ मधील शिरवाडकर हे प्रतिष्ठित व उल्लेखित असे शेवटचे साहित्यिक अध्यक्ष. त्यानंतर प्रतिष्ठित पण विरळ उल्लेखाच्या अध्यक्षांचा काळ येतो. १९८९ पासून मात्र बेताची प्रतिष्ठा असलेले व एरवी दखल न घेण्याजोगे असे साहित्यिक अध्यक्ष प्रामुख्याने दिसतात. मराठी विचार-शैलीचा प्रवास हा ऱ्हासमानतेकडे जाणारा प्रवास आहे की काय अशी शंका यातून स्थितिप्रिय विचारवंतांना वाटेल तर साहित्य संमेलनाचे हे बदलते स्वरूप असून यातून भविष्यकाळातील वैचारिक स्वरुपाचा अंदाज बांधता येईल असे आशावादी विचारवंतांना वाटेल.

## परिशिष्ट-१

# चिकित्सा

जानेवारी २००१ ला ७४ वे अखिल भारतीय मराठी साहित्य समेलन इंदूर येथे झाले. अध्यक्षा होत्या विजया राजाध्यक्ष.

परस्पर संबंधविषयक प्रश्नात राजाध्यक्ष साहित्य आणि समाज, साहित्य आणि वास्तव, साहित्य आणि राजकारण आणि मराठी लेखक, कवी आणि मराठी समाज या संदर्भात बोलतात. लेखक हा लौकिक व्यवहारात गुंतलेला असतो, त्यातूनच त्याला लेखनाची सामग्री मिळते, मात्र यापलिकडचे जग हे लेखकाला खुणावते असे त्या म्हणतात. लेखकाचा वर्तमानकाळाशी यामुळेच अशत.च संबंध असतो. लेखकाच्या भोवती सुंदर व कुरुप असे दोन्ही प्रकारचे बहुरंगी वास्तव असते. त्या वास्तवातील तपशील रिचवून लेखक एक व्यामिश्र प्रतीकच वास्तव म्हणून पाहतो आणि त्याच्या गाभ्यापर्यत जाण्याचा प्रयत्न करतो. भोवतालचा परिसर हा अवकाश व संवाद साधण्याचा-काल हा वर्तमानकाल. पण या अवकाश व काळातच लेखक अडकून पडत नाही, त्याचे विश्व याने सीमित होत नाही. साहित्यात अवकाशविरहीत काळ व कालविरहीत अवकाश असतो. लेखकाचा निर्मिती-प्रवास हा जीवनानुभवाच्या अंगाने होतो हे खरे पण केवळ जीवन पुरेसे नसते. मानवी जीवनातील तपशील बाजूला सारून त्या पसाऱ्यातला माणूस शोधण्याचा लेखक प्रयत्न करतो. साहित्य हे केवळ जीवन नव्हे, केवळ वास्तव नव्हे, वास्तव व कल्पनाशक्ती यांच्या ममन्वयातून निर्माण झालेले ते एक घटित आहे.

लेखक हा जीवनातील आनंद-स्थळे पाहतो आणि दु.खेही पाहतो. तो एकटाही असतो आणि अखिल मानवजातीतही पसरतो. जीवनाशी संघर्ष करत असतानाच हे सगळे बदलले पाहिजे अशी जिद्द तो बाळगतो त्यासाठी तो सघटितही होतो. दुर्दैवाचा अनुभवही घ्यायचा आणि ते संपावे म्हणून संघटित व्हायचे यातूनच समाजात परिवर्तन करण्याची उमेद येते. अगदी कलावादी लेखकही जीवनभान बाजूला ठेवत नाहीत. वास्तव जगातील बाह्यप्रेरणा व त्याची स्वत.ची अशी अंत:प्रेरणा यांचा समन्वय

लेखकाला साधायचा असतो.

मात्र भोवताल जाणून घेण्यासाठी ठिकठिकाणी प्रत्यक्ष जायची गरज नसते. कल्पनाशक्तीच्या बळावरही तो बाहेरचे जग समजू शकतो. लेखक दोन प्रकारच्या वास्तवात रहातो. एक बाह्य वास्तव व दुसरे आंतरिक वास्तव.

साहित्य आणि वास्तव याबाबचा राजाध्यक्षांचा हा दृष्टिकोन नवा नाही. वा. ल. कुलकर्णी, पु. शि. रेगे, गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर या पूर्वीच्या अध्यक्षांच्या भाषणातही असाच विचार आहे. हा विचारही मुळात मराठी साहित्यिकांनी इंग्रजी साहित्यविचारातून घेतलेला आहे. राजाध्यक्षांच्या भाषणात तो अधिक रोमँटिक पद्धतीने मांडला जातो. लेखकाची वृत्ती अंतर्मुख व बहिर्मुख अशी दोनही प्रकारची असते, 'लेखकाचे मन हे संभाषणसन्मुख असते, हे संभाषण स्वत:शी आणि इतरांशीही, - जे कधीच बोलू शकणार नाहीत त्यांच्याही वतीने स्वत:शी व इतरांशी 'भूतकाळही वर्तमानकाळाच्या संदर्भात समजून घेतलेला असतो', वाङ्मयात 'काळविरहीत अवकाश आणि अवकाशविरहीत काळ' असतो, 'लेखक एकीकडे रिता होतो आणि दुसरीकडे पुन्हा भरूनही येतो', 'लेखकाचा प्रवास जीवनानुभवाच्या अनुषंगाने होतो पण जीवन पुरेसे नाही ही प्रगल्भ जाणीव त्याला होते', अशी चमत्कृतिजन्य विधाने - ज्यांना एरवी 'ललित गद्य' म्हणून संबोधिले जाते- राजाध्यक्षांच्या भाषणात भरपूर आहेत. या लालित्यपूर्ण शैलीत आपण काही फार तरल असे सांगतो आहोत हा असा आव असतो; प्रत्यक्षात त्यात संकल्पनाबाबतची अस्पष्टता आणि विचारांचा सैलपणा यांचा तो परिणाम असतो. साहित्याची सामाजिक उपयुक्तता मान्य आणि अमान्य करण्याचेही धाडस नाही; उलट साहित्याची, बाह्यसंदर्भाशी फटकून राहणाऱ्या स्वायत्ततेची शक्यता स्वीकारण्याची ताकद नाही अशा दुहेरी पेचात सापडलेल्या मनाचे हे भिरभिरणारे स्वरूप अशा शैलीत दिसते.

या सावध, भिरभिरत्या विचारांची दैना साहित्य आणि राजकारण या वरील टिप्पणीतही दिसते. शासनाचे किंवा इतर संघटनांचे दडपण लेखकांवर येते. प्रतिगामी व पुरोगामी विचारांच्या दोन्ही संघटना त्याच्यावर नियंत्रण ठेवू पाहतात. मग त्याची घुसमट होते व तो लिहित नाही. (अर्थात् अशा घुसमटीने अनुत्पन्न अशा साहित्याचा दाखला देण्याची वेळच येत नाही.) पण श्रेष्ठ लेखकाबाबत असे घडत नाही असे म्हणून राजाध्यक्ष या स्वातंत्र्यवादी, स्वायत्ततावादी लेखकांची म्हणून कोणती उदाहरणे देतात हे पाहण्यासारखे आहे. मर्ढेकरांनी 'पिपांत मेले' ही कविता लिहिलीच ना ? असा एक सवाल त्या करतात. वस्तुत: या कवितेवर टीका झाली ती साहित्यविषयक मर्यादित लोकांच्या कळपात. त्या कवितेवर फार मोठे संघटित असे दडपण आले असे म्हणताच येणार नाही. मर्ढेकरांचे काय किंवा विंदा करंदीकरांचे काय - या दोघांच्या लेखनाची माहितीही नसणारे अनेक आहेत, साहित्याचे तथाकथित महान वाचक

वर्गातही ते आहेत, एवढेच काय राजाध्यक्ष म्हणतात त्या विद्यापीठीय पातळीवरही आहेत. मग कसले दडपण आणि कसली घुसमट ? एखाद्या साहित्यकृतीवर तत्कालीन मान्य निकषांच्या आधारे टीका झाल्यावरही ती साहित्यकृती पुढे टिकली की लगेच मुळात तिच्या आविष्करणावरच दडपण आले होते असे समजण्याचे कारण नाही.

शासने येवोत आणि जावोत, साहित्याचा मुक्त प्रवाह वाहतच रहातो. सत्य सांगण्याची लेखकाची नशा दडपता येत नाही. ना शासनाला ना कोणत्याही धर्माच्या हृदयसम्राटाला असे राजाध्यक्ष म्हणतात. यात प्रच्छन्नपणे श्री ठाकरे यांच्यावर टीका केल्याचे सुख आहे. लेखकाच्या या 'सत्य' सांगण्याच्या अधिकाराविषयी हिरिरीने बोलताना या आधीच्याच परिच्छेदात आपण लेखकाला 'तरी अंतिम सत्य कुठे सापडते ?' असं म्हटल्याचे विस्मरणही आहे. पण प्रश्न या चिमटे काढण्याच्या प्रवृत्तीचा किंवा पाठ्यांतर्गत विसंगतीचा नाही. साहित्याच्या शाश्वततेचे एक भ्रामक चित्र रंगविण्यातील व्यर्थतेचा आहे. जशी शासने येतात व जातात तसे साहित्यिकही येतात व जातात; साहित्यकृतीही येतात व जातात. कोणतेतरी शासन असणे आणि कोणतेतरी साहित्य निर्माण होणे हे माणसांच्या सामाजिक - अस्तित्वाचे केवळ परिणाम आहेत. त्यात शाश्वतता कसली ? 'शाळा येवोत जावोत, महाविद्यालये आणि विद्यापीठे येवोत जावोत, शिक्षणाचा प्रवाह वाहतच रहातो' असे म्हणण्यात काय विशेष आहे ? काय विचार-मंथन वगैरे आहे ?

राजकीय-सामाजिक-सांस्कृतिक ताणातून जेव्हा पेचप्रसंग निर्माण होतात तेव्हा प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे लेखक एक भूमिका घेतो, असे राजाध्यक्ष म्हणतात. उदाहरणादाखल १९७५ ची आणीबाणी, दलितांवरील अत्याचार आणि श्री. ठाकरे यांनी १९९८ साली वसंत बापटांच्या संदर्भात साहित्यिकांबाबत केलेली विधाने याचा उल्लेख त्या करतात. मुळात लेखकाने अप्रत्यक्षपणे भूमिका घेणे ही पळवाटही असू शकते. दुसरे असे की या भूमिका तो इतर माणसांप्रमाणे घेतो, साहित्यिक म्हणून घेत नाही असे म्हटले तर ? खरे म्हणजे साहित्य निर्माण करणे हे लेखक या व्यक्तीचे एक अंग असते. चळवळी करणे, कुटुंबियांसाठी घर शोधणे वा मागणे, सत्कार करवून घेणे, पुरस्कारासाठी आपले नाव पुढे करण्याची खटपट करणे, औपचारिक समारंभात मिरवणे, वशिला लावणे, शेजाऱ्यांशी भांडणे, शासकीय समित्यांवर वर्णी लावणे, कार्यक्रम करून पैसे मिळवणे, मुलामुलीच्या लग्नात व्यवहार म्हणून मागण्या करणे, समारंभात रुसणे फुगणे यात अडकणे वगैरे गोष्टी करताना तो सामान्य माणूसच असतो. राजाध्यक्ष समजतात त्याप्रमाणे, अखंड जीवन तो जीवनाचा, भोवतालातील माणसाचा शोध घेण्याचा, आपल्या आदिम वगैरे प्रेरणेची जपणूक करण्याचा प्रयत्न करतो ही सर्व मिथके आहेत. राजकीय चळवळीत कार्य करणारा माणूस कधीकधी लेखन करतो इतकेच. म्हणूनच तर सुर्व्यांना लेखकाने कार्यकर्तेपणात हरवून जाण्याची

*चिंता वाटते. यामधे तो 'लेखन-कला' विसरतो, चिंतन वगैरे बाजूला सारतो. तिसरे असे की राजाध्यक्षांनी वानगीदाखल दिलेल्या उदाहरणांचे व्यापकस्तरावर सर्वेक्षण करायला हवे. आणीबाणीमध्ये किती लेखकांनी प्रतिकारामधे प्रत्यक्ष भाग घेतला ?* किती लेखकांना मुळात आणीबाणी हा पेचप्रसंग वाटला ? आणीबाणीमध्ये शिस्तीचे एक भय निर्माण झाले होते, ते खरोखरीच सर्वांनाच अप्रिय होते का ? दलितांवरीलच काय कुठल्याही अत्याचाराच्या वेळी सवर्ण काय किंवा दलित काय लेखक म्हणून काय करतात ? वृत्तपत्रांमध्ये रोज बारीकसारीक अत्याचारांच्या, विपरित घटनांच्या, गुंडगिरीच्या, भावना बधिर करणाऱ्या बातम्या येतात. यात कितीदा एखाद्या लेखकाने ठामपणे प्रतिकार केल्याचे - व्यक्ती म्हणून का होईना - आपल्या वाचनात येते ? या सर्व संभाव्य टीकेतून साहित्यिकाला सोडविण्यासाठी राजाध्यक्ष बोरीस पास्तरनाकचे उदाहरण देऊन म्हणतात: स्तब्धता हीही एक भूमिका असते ! स्तब्धता हा लालित्यपूर्ण शब्द आहे; त्याचा निर्देश नाकर्तेपणा असाच संभवतो. मुळात पास्तरनाकचे उदाहरण - जे सर्वसामान्य मराठी वाचकाला पूर्ण अपरिचित असे - देण्याची जरुरीच काय ? आपल्याकडचे बहुसंख्य लेखक 'स्तब्धता' हीच भूमिका घेतात हे कोणालाही समजेल. नेमाडे ज्यांना 'लेखकराव' म्हणतात ते सर्व स्तब्धच असतात.

साहित्यविषयक प्रश्नांमध्ये राजाध्यक्षांच्या भाषणात साहित्याचा हेतू किंवा उपयोग, साहित्यातले मानदंड, साहित्य म्हणजे काय, साहित्यावरील टीका आणि प्रामुख्याने साहित्य निर्मिती यांचा उहापोह होतो. एका विशिष्ट वृत्तीतून ज्याला 'सत्यकथा' छाप वृत्ती असे कुणी खिजवण्यासाठी म्हणू शकेल - याबाबत त्यांनी मांडलेले विचार हे सर्वस्वी नवीन नाहीत पण निश्चितपणे दखल घेण्यासारखे आहेत. खरे म्हणजे पहिल्या पायरीवरील ह. ना. आपटे, न. चिं. केळकर, वा. म. जोशी, ना. गो. चापेकर, वि. स. खांडेकर, दुसऱ्या पायरीवरील जावडेकर, लक्ष्मणशास्त्री जोशी, अनिल, कुसमावती देशपांडे, वा. ल. कुलकर्णी, पु. शि. रेगे आणि तिसऱ्या पायरीवरील गंगाधर गाडगीळ, व्यंकटेश माडगूळकर, के. ज. पुरोहित, शांता शेळके यांच्या परंपरेतील हे भाषण आहे.

साहित्य-निर्मितीचा विचार राजाध्यक्षांनी विस्ताराने मांडला आहे. त्या सार्वकालीन लेखक आणि विशिष्टकालीन लेखक अशी लेखकांची प्रमुख विभागणी करून सार्वकालीन लेखक, त्याचा लेखन प्रवास, त्याची मानसिकता यांची चर्चा करतात. हा लेखक केवळ आधुनिक मराठीतला नव्हे (तसा तो असण्याची शक्यताही कमी), विश्वव्यापक विचार केला तरच त्याविषयी बोलता येईल. हा लेखक जीवनाचा अन्वयार्थ लावतो. लौकिक व्यवहारात गुंतून न पडता, पण त्याला पूर्ण फाटा न देता, त्या पलीकडचे असे काही तो पाहतो. त्याचे लेखन म्हणजे त्याच्या अंतर्मनाने स्वत:लाच घातलेली एक साद असते. या लेखन-प्रवासाला आरंभ असतो, अंत मात्र नसतो. निर्मितीची अद्‌भूत ठिणगी कशी व कधी पडते हे त्यालाही कळत नाही. निर्मितीची उत्स्फूर्तता ही

रोमँटिक प्रवृत्ती आणते तर तिचे नियमन करणे हे अभिजातवादी प्रवृत्ती आणते. (हे खरे नाही. मुळात रोमँटिक व अभिजातवादी हे वर्गीकरण अतिसुलभ आहे. अनिर्बंध उत्स्फूर्तता आणि काटेकोर नियमन यातून निर्मिती न होण्याचाच जास्त संभव आहे.)

तरुणपणी अनेकांना कविता लिहिण्याचे झटके येतात पण पुढे ते टिकत नाहीत. ज्यांचे टिकतात ते साहित्यिक होतात. आत्माविष्कार व संवाद या हेतुमुळे ते टिकतात. (येथे लेखक होणे ही एक दैवी शक्ती मानली जाते. प्रतिभा, निर्मितीचा मोलाचा अधिकार, निर्मितीमधील साहस, थरार, निर्मितीनंतर येणारा अलौकिक थकवा वगैरे शब्द हे साहित्य-निर्मितीला गूढस्वरुप देतात. प्रश्न असा आहे की जे थांबतात ते खरोखरच अभागी, दुबळे मानायचे का ? अशीही एक शक्यता आहे की साहित्य -निर्मितीतला फोलपणाही एखाद्याला जाणवतो. फोलपणा अशासाठी की साहित्यिकाला सत्य सापडतच नाही असे राजाध्यक्षही म्हणतात. जीवनाचा शोध घेताना किती दारे उघडता येतील याला अंत नसतो. शेवटी साहित्यिक एका अनाम परमशक्तीशी संवाद करू लागतो. एका आध्यात्मिक जाणिवेशी येऊन थबकतो. पण मग यासाठी साहित्य-निर्मितीचा दीर्घ प्रवासच आवश्यक आहे असे नाही. थोडक्यात शब्द खेळातून साध्या साध्या तपशिलांची मनोहारी मांडणी करणे, त्यात अर्थपूर्णता आणणे म्हणजे साहित्य लिहिणे हे एक टोक, तर एक तत्त्वज्ञान रचून त्यात परिपूर्णता शोधणे हे दुसरे टोक. साहित्य हे अर्धकच्चे तत्त्वज्ञानच असते. पण कुणी कविता-लेखन झटकून थेट तत्त्वचिंतनाकडे वळतो ही शक्यताही नाकारता येणार नाही. साहित्य-निर्मितीभोवतालचे गूढवलय जर बाजूला केले तर तत्त्वज्ञान गवसण्याची ती एक प्राथमिक अवस्था आहे असेही म्हणता येईल.)

साहित्याचा हेतू कलात्मक आनंद अनुभवणे हा एक. दुसरा वाचकाशी संवाद साधणे. साहित्याची वाचक-सापेक्षता राजाध्यक्ष नाकारत नाहीत. पण वाचकाचा संवाद हा पाठ्याशी, पाठ्यामधल्या लेखकाशी असतो, प्रत्यक्ष लेखकांशी नसतो हे मात्र त्यांना मान्य नाही. (खरे म्हणजे पाठ्याची संरचना आणि वाचक एवढे पुरेसे आहे, चांगल्या पाठ्याबाबत वाचक त्याची संरचनाही वेगळ्या पद्धतीने बार्त्स शकतो. या संदर्भात बार्तस The author is dead असे म्हणतो. मात्र राजाध्यक्षांची यावरची प्रतिक्रिया अशी. 'लेखकाला मृत्यू तर नाहीच, उलट त्याच्या जन्माला 'चौऱ्यांशी लक्ष फेरे' आहेत. बार्तसूचे अवतरण एक तर भलत्याच अर्थाने घेतलेले आहे किंवा संरचनावादी भूमिकेचे अनाकलन आहे एवढेच म्हणता येईल.)

लालित्यपूर्ण लेखनात निखळ विचार कसा बाजूला पडतो याचे आणखी एक बोलके उदाहरण: लेखन म्हणजे संवाद, आणि संवादामधे लेखक कलात्मक आनंद अनुभवतो या विधानाच्या पुष्ट्यर्थ राजाध्यक्षांनी केलेल्या विवेचनात दिसते. असा आनंद कालिदास-शेक्सपिअर यांनी, ज्ञानेश्वर, तुकाराम यांनी --- या दोन टोकातील सर्वच कलावंतांनी अनुभवला असे त्या म्हणतात. कशावरून ? हा पहिला कळीचा प्रश्न.

दुसरा प्रश्न असा की ही दोन 'टोके' कशी ? आणि पुढे या सर्वमान्य मानदंडांबरोबर राजाध्यक्ष जेव्हा डहाके, यादव, महानोर, सारंग, कानेटकर एवढेच नव्हे तर राजीव नाईक, विभावरी, मेघना पेठे यांचीही नावे घेतात, तेव्हा या गौरव-वृत्तीचे सखेद आश्चर्य वाटते. 'सर्वच कलावंत' म्हटले तर मग सार्वकालीन लेखकच त्यात येतील असे नाही. म्हणजे कोणत्याही सटरफटर लेखक-कवीला हा तथाकथित 'कलात्मक आनंद' अनुभवता येतो असे मान्य करावे लागेल आणि मग 'कलात्मक आनंद' हा 'लिहून छापून आणण्याच्या' सुखाच्या पातळीवर स्थिरावेल. प्रमेय आणि सिद्धता यामधील संबंधाबाबतचा हा वैचारिक गोंधळ आहे असे म्हटले तर ?

या प्रकारची अनेक विधाने इतरत्रही राजाध्यक्ष करतात. त्यांची मोजकी उदाहरणे अशी-

१. 'आनंदाच्या केंद्रस्थानी आपण--- या मानवी जीवनास एक शाश्वतता देत आहोत, ही भावना असते.' या जाणीवेमुळे 'त्याचे वाङ्मयीन वर्तन अधिकच जबाबदार होते.'

२. 'साहित्यात वाचकाच्या मनातील गोठलेला समुद्र प्रवाहित करण्याची शक्ती असते.' त्या समुद्रातील 'लाटालहरी कधी कधी लेखकानेही पाहिलेल्या नसतात. म्हणूनच तर लेखकाचे आविष्कारस्वातंत्र्य जितके महत्त्वाचे तितकेच वाचकाचे आस्वाद स्वातंत्र्यही महत्त्वाचे.'

यातली कार्यकारण मीमांसा अतार्किक आहे. आविष्कार स्वातंत्र्य समजू शकते कारण आविष्कार करण्यावर बाहेरून बंदी येऊ शकते. पण एखादा वाचक साहित्य वाचत असताना 'वाचनातून तू आनंद घेऊ नकोस' अशी बंदी कोण व कशी आणणार ? आस्वादस्वातंत्र्य हा शब्दप्रयोग भ्रामक आहे.

३. 'साहित्याच्या भाषेत दैनंदिन भाषेचे रंग मिसळलेले असतात.' (दैनंदिन) 'भाषेलाच साहित्यात एक काव्यात्म मूल्य प्राप्त होते.' कवी 'नवे शब्दही निर्माण करतो.' जुन्या शब्दांचे नूतनीकरण करतो...

'या प्रवासात भाषाही सोबतीला असते. कधी ती घडवावी लागते. पहिला शब्द सुचतो, दुसरा शब्दही ... पण कधी इतके विनासायास काहीच घडत नाही. वाट पाहावी लागते. ही प्रतीक्षा कधी जीवघेणीही ठरू शकते,

खरे म्हणजे अर्थ व शब्द यांचा मेळ न बसणे हा काही फक्त कवीचाच खास प्रश्न नसतो. मूलत: भाषेच्या स्वरूपाचाच तो एक भाग आहे. शब्द हा वास्तव असतो, अर्थ हा विवर्त (भासमान) असतो, असे भाषेबाबत भर्तृहरीने पूर्वीच म्हणून ठेवले आहे.

४. 'मराठी समीक्षेतही त्याचे (नकारवादाचे) प्रतिध्वनी उमटू लागले. जागतिकीकरणाच्या काळात हे अटळच आहे.'

कसे ? जागतिकीकरण म्हणजे नकारवाद असे समीकरण कशाच्या आधारावर मांडता येते ?

५. इलेक्ट्रॉनिक माध्यमातून व्यक्त होणारे वास्तव हे 'मूलभूत वास्तव नाही, त्यामुळे त्यात मूलभूत सत्यही नाही '

याचा अर्थ वास्तवात सत्य असते असा होतो. याला आधार काय ? मुळात सत्य म्हणजे काय ? सत्य हे सत्य असते, त्यात मूलभूत, वरवरचे, तात्कालिक असा फरक करता येईल ? साहित्यातील वास्तवाबाबतही त्यात मूलभूत सत्य नसते असे या तर्काने म्हणावे लागेल. किंबहुना रशियन रुपवादी तसे म्हणतातही. पण मग साहित्याने जीवनाचा अन्वयार्थ वगैरे लावण्याचा, समाज परिवर्तनाचे वगैरे भान निर्माण करण्याचा राजाध्यक्षांनी केलेला दावा सोडून द्यावा लागेल. एका बाजूला स्वायत्ततेचा आग्रह तर दुसऱ्या बाजूला जीवन संबद्धतेचा आग्रह या दोनही डगरीवर पाय ठेवण्यात समन्वयवादी कलावादीची वैचारिक स्तरावर कशी घसरण होते याचे हे आणखी एक उदाहरण आहे.

साहित्याचे प्रयोजन काय याचे तिसरेही उत्तर राजाध्यक्ष देतात आनद, संवाद यांच्याबरोबरच समाज परिवर्तनाचे भान निर्माण करणे हेही साहित्याचे काम साहित्य प्रत्यक्ष परिवर्तन घडवू शकत नाही, पण परिवर्तनातून मानसिकता निर्माण करू शकते असा हा मुद्दा (अर्थात बदलाची अपेक्षा ही प्रामुख्याने आर्थिक परिस्थितीतून निर्माण होते हे स्वीकारावेच लागेल. राजकीय, सांस्कृतिक आणि आर्थिक दडपणे झुगारण्याची तयारी शिक्षणाने होते, तद्नंतरच्या सांघिक प्रयत्नांनी होते येथे साहित्याचे स्थान काठावरचेच असते असे दिसते. फक्त राजकीय व्यवस्थेतील बदलासाठी साहित्याचा साधन म्हणून परिणामकारक वापर झाल्याची उदाहरणे आहेत.)

साहित्यातील वाद मांडण्यापूर्वी राजाध्यक्ष विशिष्टकालीन लेखक या वर्गाची चर्चा करतात. आजच्या विशिष्टकालीन साहित्याबाबत चर्चा होऊ लागली आहे. हे लेखक प्रस्थापित विरोधी भूमिका घेतात. मात्र सर्जनाने नवी वळणे घेतली असली तरी मूळ गाभा बदललेला नाही, असाही दावा राजाध्यक्ष करतात (मुळात विशिष्टकालीन लेखक ही वर्गवारीच स्पष्ट नाही व ती टिकणारीही नाही.) गेल्या पंचवीस वर्षात संताप व विद्रोह ही मानसिकता वाढलेली दिसते. (दलित लेखकांचे विद्रोही साहित्य व बंडखोर दलित लेखकांचे 'सत्यकथा' विरोधी साहित्य असे सरळपणे म्हणण्यात काय अडचण असावी ?) अनियतकालीकांची चळवळ ही विद्रोहाची सुरुवात होती. प्रस्थापित नियतकालीकांत (म्हणजे सत्यकथेत ?) विद्रोहाचा सूर उमटत होताच. पण या अनियतकालिकांनी 'सत्यकथे'ची होळी केली. या विद्रोहात नकारवाद आहे, विनाशवादी प्रवृत्ती आहे आणि ती राजाध्यक्षांना मान्य नाही. विद्रोही लेखकांनी प्रस्थापिततेला विरोध केला पण पुढे त्यांचे स्वत:चे काय झाले असा खोचक प्रश्न नेमाड्यांचे नाव न घेता राजाध्यक्ष विचारतात.

दलित साहित्यातील विद्रोहाला, सतापाला वैयक्तिक व सामाजिक कारणे होती असे राजाध्यक्ष म्हणतात. दलित साहित्याने अभिरुचीचे वळण बदललेले नाही असेही

त्या म्हणतात. दलित साहित्यातही त्यांची प्रस्थापितता आहे, कालचे बंडखोर आजचे प्रस्थापित आहेत, दलित साहित्यात, स्त्रियांचे चित्रण अपुरे आहे. पुढे प्रक्षोभ ही सार्वकालीन वाङ्मयीन प्रेरणा नसते असे विधान राजाध्यक्ष करतात. (हे पटण्यासारखे नाही. करुणा व प्रक्षोभ या प्रेरणा आहेतच. त्यांनी प्रेरित होऊन साहित्य निर्माण होणार नाही. हे कसे ? प्रक्षोभाचे शमन झाले पाहिजे ही व्यक्तीच्या मनोविकारांवरची मागणी ही प्रस्थापितता सुरक्षित राहण्यासाठीची आहे आणि अवाजवीही आहे.)

विद्रोही अतिरेकातून नकारवादी व विनाशवादी तत्त्वज्ञान येते, त्यातून सांस्कृतिक दहशतवात निर्माण होऊन प्रस्थापित सर्वच साहित्यावर नकाराची फुली मारली जाते, अशी चिंता राजाध्यक्ष व्यक्त करतात. (निराशवाद हा सक्रीयतेकडे क्वचितच नेतो. त्यामुळे त्यातून दहशतवाद निर्माण होतो असे म्हणणे संयुक्तिक नाही. विनाशवादातून ती शक्यता मात्र आहे. जेव्हा उलथापालथ, पूर्ण अपेक्षित असते तेव्हा सुक्याबरोबर ओले जळणारच. पण खरा प्रश्न वेगळाच आहे. जेव्हा संपूर्ण सामाजिक, राजकीय क्रांतीला समाज उद्युक्त होतो, तेव्हा त्याचे पडसाद साहित्यात उमटतात. संपूर्ण उलथापालथ केवळ साहित्यक्षेत्रात झाल्याची विश्वासार्ह उदाहरणे नाहीत. दलित साहित्याचा विद्रोह हा सामाजिक, राजकीय क्षेत्रातही प्रखरपणे होता. त्याची धग वाढली तर दलित साहित्य हे समकालीन (विशिष्टकालीन नव्हे) प्रस्थापित साहित्याला दूरच सारेल, सामाजिक राजकीय यंत्रणांनी तो विद्रोह विच्छिन्न केला किंवा लबाडीने त्याचा फक्त वापर केला तर दलित साहित्य हे मुकाटपणे प्रस्थापित साहित्यातील एक कोपरा होऊन बसेल. राजाध्यक्षांची चिंता ही पहिल्या शक्यतेबाबतची आहे. पण त्याला साहित्यिक काही करू शकणार नाहीत. दुसरे असे की आधुनिक मराठी वाङ्मयाची परंपरा दीड-दोनशे वर्षाची; हा काळ अल्प आहे. त्यामुळे ते टिकणे न टिकणे फारसे महत्त्वाचे नाही. कुठलीही क्रांती भूतकाळात दीर्घ परंपरा असणारे साहित्य मारू शकत नाही. उदाहरणच द्यायचे झाले तर इंग्लंडमधल्या अनेक उलथापालथीत शेक्सपिअर टिकलाच; आणि महाराष्ट्रातील उलथापालथीत—अगदी इंग्रजी शिक्षण ही एक उलथापालथ मानली तरी—ज्ञानेश्वर-तुकाराम टिकलेच. नेमाड्यांनी गाडगिळांच्या कथावाङ्मयावर फुली मारण्याने किंवा प्रस्थापितांनी नेमाड्यांच्या साहित्याकडे पाठ फिरवण्याने भयभीत होण्याचे कारण नाही, कारण हे नकार 'विशिष्टकालीन' आहेत, सार्वकालीन नाहीत. राजाध्यक्ष म्हणतात ती, 'ज्येष्ठांचा आपल्यावर प्रभाव पडू न देणे' हीही एक निरोगी भूमिका असू शकते.)

नेमाड्यांच्या 'देशीवादा' बद्दलही राजाध्यक्ष बोलतात. देशीवाद हे सार्वत्रिक सत्य आहे पण साहित्याच्या मूल्यमापनाचा एकमेव निकष नाही. परिसरात राहून परिसराकडे लेखक जातो. व्यापक मानवी पातळीवर देशीवाद उरत नाही. (यात नेहमीप्रमाणे राजाध्यक्ष दोन्ही बाजू सांभाळण्यात सावधपणा दाखवतात. पण मुळात

चर्चा अशी करत नाहीत. देशीवाद हा साहित्याची संस्कृतिबद्धता दाखवितो. त्या संस्कृतीबाहेरील वाचकांना एखादी साहित्यकृती आवडणे यात लगेच विश्वात्मकता शोधण्याचे कारण नाही. असा वाचक हा उत्सुकतेपोटी दुसऱ्या संस्कृतीत शिरतो किंवा सांस्कृतिक संदर्भाविना साहित्यकृतीच्या अर्धकच्च्या आकलनावर समाधान मानतो. मराठी माणसांचे इंग्रजी साहित्याचे आकलन या दुसऱ्या स्वरुपाचे जास्त प्रमाणात आहे. मराठीतही अशी उदाहरणे देता येतील. सदाशिवपेठी मध्यमवर्गीय ब्राह्मणवर्गाचे शंभर वर्षापूर्वीचे जीवन व त्याचे तपशील माहीत नसतील तर 'पण लक्षात कोण घेतो ?' खऱ्या अर्थाने समजणे अशक्य आहे. पोशाख, अन्न, कुटुंब-रचना, नातेसंबंध, ऋतु, भोवतालचा निसर्ग, राहणीमान, सण-उत्सव अशा अनेक गोष्टीतून विशिष्ट 'देशा'चे चित्र स्पष्ट होते. हे तपशील नाकारणे, अधांतरी मूल्ये व परंपरा मानणे, काल्पनिक विश्वात्मकता अतिसामान्य प्रसंगात शोधणे याला 'देशीवादा'चा आक्षेप आहे. कसेही केले तरी भाषांतरित साहित्य हे देशी साहित्यापेक्षा तेथील सर्वसामान्य वाचकांना हिणकसच वाटते यातच 'देशीवादा' चा प्रभाव स्पष्ट आहे. राजाध्यक्ष त्यावर बोलत नाहीत. त्याचा आक्षेप नेमाड्यांच्या पंथाच्या दबावतंत्रावर आहे. पण हा आक्षेप तात्कालिक आणि व्यक्तिलक्षी आहे, वैचारिक नाही.)

गंमत म्हणजे एकीकडे राजाध्यक्ष देशीवादावर आक्षेप घेतात तर दुसरीकडे समीक्षेच्या क्षेत्रात येणाऱ्या पाश्चात्त्य कल्पनांनीही धास्तावतात. पण मग उरते काय ? तर 'सत्यकथा' छापाचे लेखन आणि 'सत्यकथा' छापाची आस्वादक समीक्षा. 'सार्वकालीन' लेखकाचा शोध घेता घेता राजाध्यक्षांना 'सत्यकथा' छापाच्या लेखकांच्या मागे पडण्याचे, त्यांची प्रतिष्ठा कमी होण्याचे 'विशिष्टकालीन' दु:ख होत रहाते. साहित्यात मनोरंजन हवे पण केवळ तेच नको, त्याने प्रत्यक्ष समाज परिवर्तन न करता फक्त तशी मानसिकता तयार करावी. विद्रोह असतो, आहे पण संयमपणा जास्त मानवणारा, समीक्षा हवी पण ती सैध्दान्तिक नको अशी एकंदर कोणतीच स्थिर वैचारिक पाया नसणारी, 'सत्यकथा' परंपरेला साजेशी अशी भूमिका राजाध्यक्ष घेतात. आपण जे वाचले ते छान साहित्य अशी शांता शेळके यांची एकंदर भूमिका तर आपण ज्या पठडीला वाढलो व ज्या पठडीत लिहिले ती पठडी चांगली ही राजाध्यक्षांची भूमिका दोन्ही भाषणात 'माहेर ओढ' आहे, 'गेले ते दिन' ही खंत आहे.

मराठी भाषेसंबंधीचे राजाध्यक्षांचे विचार फारच वरवरचे व महाविद्यालयीन पातळीवरचे आहेत मराठीचा सर्वच क्षेत्रात उपयोग झाला पाहिजे. असे त्या म्हणतात. त्यासाठी शासकीय संस्था पुरेशा नाहीत कारण त्यात नोकरशाहीची मानसिकता असते. विद्यापीठांचा सहभाग असल्यास मराठीचे भवितव्य सुधारेल. यासाठी भाषाशास्त्र व मराठी या विभागांचे मनुष्यबळ वाढवा एवढी माफक मागणी राजाध्यक्ष करतात.

❑❑❑

# अध्यक्षीय भाषण

# विजया राजाध्यक्ष

---

चौऱ्याहत्तराव्या अखिल भारतीय मराठी साहित्य-संमेलनाचे उद्‌घाटक श्रीयुत प्रकाश भालेराव, स्वागताध्यक्षा श्रीमती सुमित्रा महाजन, त्र्याहत्तराव्या साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष डॉ. य. दि. फडके, व्यासपीठावर विराजमान झालेले पूर्वाध्यक्ष, अखिल भारतीय मराठी साहित्य-महामंडळाच्या अध्यक्षा डॉ. वसुंधरा पेंडसे-नाईक व अन्य पदाधिकारी, इंदूर येथील स्वागत-समितीचे कार्याध्यक्ष व अन्य सदस्य, महामंडळाच्या घटक संस्थांचे व संलग्न संस्थांचे पदाधिकारी, या भव्य, सुशोभित सभागृहात उपस्थित असलेले प्रतिष्ठित लेखक व कवी, आणि बृहन्महाराष्ट्रातील साहित्यप्रेमी बंधु-भगिनीनो,

## प्रास्ताविक

आरंभी मी आपल्या सर्वांना (आणि गेल्या आठनऊ महिन्यांत काळाच्या पडद्याआड गेलेल्या श्रेष्ठ साहित्यिकांच्या स्मृतीला) विनम्र अभिवादन करते, आणि आपण औदार्याने, विश्वासाने व प्रेमाने मला दिलेल्या या बहुमानाबद्दल मन:पूर्वक कृतज्ञता व्यक्त करते.

हा बहुमान स्वीकारताना माझ्या मनात आनंद आहेच, पण तो मुक्त, निरभ्र मात्र नाही. त्याभोवती एक धूसर आवरण आहे. त्यामुळे शुभ्र, विरळ ढगांच्या आत लपलेले हसरे चंद्रबिंब स्वच्छपणे दिसू नये, तशी काहीशी माझ्या मनाची या क्षणी अवस्था आहे. एक प्रश्न मनाला शंकाकुल करतो आहे : आपण माझ्यावर विश्वासाने टाकलेली अध्यक्षपदाची ही अवघड जबाबदारी मला पेलेल का ? या जबाबदारीचे तीन भाग असतात. त्यांपैकी पहिला : या व्यासपीठावरून त्याच्या आजवरच्या परंपरेला साजेल, त्याची प्रतिष्ठा सांभाळेल असा एखादा विषय मांडणे दुसरा भाग: या अध्यक्षपदाच्या सुमारे वर्षभराच्या वाटचालीत काही पदसिद्ध कर्तव्ये पार पाडणे, आणि तिसरा भाग: या दोहोबद्दल, माझ्याकडून असलेल्या आपल्या अपेक्षा यथाशक्ती पूर्ण करणे. त्यापैकी विषय या भागाबद्दल नंतर बोलते. अध्यक्षाची कर्तव्ये व अध्यक्षापासून असलेल्या रास्त अपेक्षा यांच्याबद्दल मात्र आत्ताच आपल्याला आश्वासन देते, की संमेलनाध्यक्ष या नात्याने या पदावरून जेवढे करता येईल, तेवढे कार्य मी मनापासून करीन. त्यासाठी

आवश्यक असलेले बळ माझ्यापाशी पुरेपूर नसेल कदाचित. पण आपल्या शुभेच्छा व सहकार्य या दोन्ही गोष्टी मला नेहमीच कर्तव्यसन्मुख ठेवतील,याबद्दल मला गाढ विश्वास वाटतो. त्या विश्वासामुळेच मनावरील दडपण थोडे कमी झाल्यासारखे वाटते.

माझे भाषण हा आपल्याशी केलेला संवाद-नव्हे, हृदयसंवाद-असणार आहे. एका सर्जनशील लेखकाचा हृदयसंवाद. तो लेखक म्हणजे व्यक्तिश: मी नव्हे. फक्त मी तर नव्हेच नव्हे. तो आहे लेखक हे नामाभिधान असलेला एक मूलादर्श. लेखक नावाची एक उत्कट मनोवृत्ती, लेखक नावाची एक अविचल निष्ठा; लेखक नावाची एक मूल्यसंहिता. या सगळ्यांचे प्रतीक असलेला लेखक हा सर्जनाच्या वाटेवरचा एक मुक्त प्रवासी असतो. तो सार्वकालीन असतो, आणि समकालीनही असतो. त्याचा हा प्रवास कसा असतो ? त्या प्रवासात काय घडते ? काय घडत नाही ? ते का घडत नाही ? या पूर्णापूर्णतेच्या ताळेबंदाचे त्याच्या मनात जुळत जाणारे स्वरूप कसे असते ? -लेखकाचा हा आंतरिक व बाह्य अंगाने होणारा प्रवास, कधी सहप्रवासी म्हणून तर कधी वाचक म्हणूनही न्याहाळताना मला स्वत:ला असे अनेक प्रश्न पडत राहतात. त्या प्रश्नांच्या अनुषंगानेच तुमच्याशी आज काही बोलावे असे मनात आहे.

## पूर्वाध्यक्षांची भाषणे

माझ्या मनोगताला आरंभ करण्यापूर्वी, साहित्य-संमेलनांच्या वेगवेगळ्या व्यासपीठांवरून झालेल्या अध्यक्षीय भाषणांतून मांडले गेलेले अनेक महत्त्वाचे विषय आठवतात. त्यांचा संक्षिप्त परामर्श घेणे येथे प्रस्तुत ठरेल असे वाटते. त्यातून, पूर्वाध्यक्षांच्या तेजस्वी परंपरेचे व त्यांनी अध्यक्षीय भाषणांतून दिलेल्या विचारधनाचे एक सलग, विविधांगी चित्र आपल्यासमोर उभे राहील. या पूर्वाध्यक्षांत, जे नुकतेच उलटले अशा विसाव्या शतकातील महनीय व्यक्ती, विचारवंत, समाजसुधारक, रसिकराज्यकर्ते, संशोधक, संतवाङ्मयाचे अभ्यासक, कादंबरी, कथा, नाटक, कविता, विनोद अशा विविध वाङ्मयप्रकारांतील सर्जनशील लेखक-कवी, समीक्षक, पत्रकार अशा आदरणीय व्यक्तींचा समावेश आहे. क्रियाशील, विचक्षण, उदारमतवादी, रसिक, अमोघ वक्तृत्वाची दैवी देणगी लाभलेल्या, कधी काही विशिष्ट राजकीय-सामाजिक विचारप्रणालीशी प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे बांधिलकी मानणाऱ्या नामवंतांची ही प्रभावळ आहे. साहित्य, संस्कृती, राजकारण, समाजकारण यांसारख्या विविध क्षेत्रांत या नामवंताचे अमोल योगदान आहे. त्यांच्या साहित्यामुळे, त्यातून घडलेल्या मार्गदर्शनामुळे संबंधित क्षेत्रांतील घडामोडींना नव्या दिशा मिळाल्या, कधी मूलगामी परिवर्तने घडली, कधी निदान तात्पुरते विचारमंथन तरी झाले; साहित्याच्या क्षेत्रात कधी अल्पकालीन तर कधी दूरगामी प्रभाव टाकणारे चैतन्य निर्माण झाले. त्या त्या काळातील वाचक-श्रोते अधिक जागृत झाले. त्यांच्या व आपल्या वतीने मी पूर्वाध्यक्षांच्या आपल्यावरील या ऋणाची

कृतज्ञ नोंद करते.

या पूर्वाध्यक्षांत सत्तर पुरुष व तीन स्त्रिया आहेत. मला त्या तिघींचा स्वतंत्रपणे निर्देश करावासा वाटतो. त्या अल्पसंख्य आहेत म्हणून नव्हे, तर त्यांच्या ठिकाणी वेगवेगळ्या वाङ्मयीन शक्तींचे प्रकटीकरण व एकत्रीकरण झाले आहे म्हणून. कुसुमावती देशपांडे (ग्वाल्हेर, १९६१) या पहिल्या स्त्री-अध्यक्ष. ललितलेखक व समीक्षक अशी जोड भूमिका त्यांनी बजावली. प्रत्यक्ष इंदूरशीच नव्हे तर एकंदर माळव्याशी त्यांचा जिव्हाळ्याचा संबंध होता. दुसऱ्या अध्यक्षा दुर्गा भागवत (कराड, १९७६). या तर इंदूरच्याच. त्यांच्या आयुष्याची पहिली सात वर्षे इंदूरमध्ये गेली, हे त्या अजूनही विसरलेल्या नाहीत. त्या ललितलेखक, संशोधक आणि अनेक विद्याशाखांच्या व्यासंगी अभ्यासक या रूपांत आपल्यासमोर सातत्याने आहेत. दुर्गाबाई आणीबाणीच्या काळात भरलेल्या साहित्य-संमेलनाच्या अध्यक्षा होत्या. त्या विपरित, अंधाऱ्या काळातील दुर्गाबाईंचे वर्तन अत्यंत तडफदार होते आणि त्याची व्यासपीठावरही प्रत्यक्ष प्रचीती आली. तेव्हापासून दुर्गाबाई हे आपल्या लेखी सदसद्विवेकबुद्धीचे प्रतीक झाले. तिसऱ्या अध्यक्षा शांता शेळके (आळंदी, १९९६). ललितलेखक, कवयित्री आणि सहृदय रसिक. या रसिकतेने किती ज्येष्ठ व तरुण लेखकांशी मनमोकळा संवाद साधला असेल आणि त्यांना प्रेरणा दिली असेल, याची गणतीच करता येणार नाही ! शांताबाईंच्या अनुषंगाने जरा वेगळी आठवण होते ती माई मंगेशकर यांची. त्यांचे हे जन्मशताब्दी वर्ष आहे. केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे तर एकंदर भारताच्या कानात अखंडपणे गुंजन करणारे अनेक अद्भूत स्वर—विशेषत: लता व आशा या नावांचे जणू षड्ज व गांधार हे स्वर—माईच्या कुशीतून जन्माला आले. अशा या भाग्यवान मातेचे इंदूर हे जन्मस्थान. शांताबाई या मंगेशकर कुटुंबातल्याच एक वाटाव्यात इतके शांताबाईंच्या शब्दांचे मंगेशकर कुटुंबीयांच्या स्वरांशी नाते जुळले आहे. या अर्थाने त्या इंदूरशीही जोडल्या गेल्या आहेत. या प्रकारे या तीन पूर्वाध्यक्षा इंदूरशी व मध्यप्रदेशाशी संबंधीत असाव्यात हा किती हृद्य योगायोग आहे ! ज्यांना या अध्यक्षपदाचा बहुमान दुर्दैवाने मिळाला नाही त्या इंदिरा संत व मालती बेडेकर या श्रेष्ठ लेखिकांचीही मला येथे प्रामुख्याने आठवण होते. जेव्हा मी सगळ्याच पूर्वाध्यक्षांशी—विशेषत: या स्त्री-पंचकाशी-माझी तुलना करू लागते, तेव्हा मला माझे लहानपण अधिकच प्रकर्षाने जाणवू लागते. या लहानपणाचा अधिकार गाजवून मी त्या सर्वांच्या शुभेच्छा व आशीर्वाद मागते. पण जे न मागताच मिळते, ते मागण्याची तरी काही आवश्यकता आहे का ? ते सगळे देणाऱ्यांचे हात आहेत. त्या हातांतून माझ्या ओंजळीत शब्द पडोत, आणि मला ते तुमच्यापाशी सुखरूप पोहचवता येवोत.

या पूर्वाध्यक्षांपैकी काहींनी त्यांना समकालीन असणाऱ्या मराठी वाङ्मयाचा चिकित्सक परामर्श घेतला; काहींनी स्वत:च्या निर्मितीच्या संदर्भात मार्मिक साहित्यचिंतन

केले; काहींनी साहित्य व संस्कृती, समाजकारण व राजकारण, मराठी भाषा व मराठी वाचक यांसारखे विविध विषय घेऊन काही मौलिक, विचारप्रेरक प्रश्न उपस्थित केले. त्यांतील काही प्रमुख, आजही कालबाह्य न झालेल्या विचारांकडे व प्रश्नांकडे मी आपले लक्ष वेधू इच्छिते. १८७८ साली न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या अध्यक्षतेखाली झालेले पहिले संमेलन आणि २००० साली डॉ. य. दि. फडके यांच्या अध्यक्षतेखाली झालेले त्र्याहत्तरावे संमेलन या दरम्यानच्या, जवळजवळ सव्वाशे वर्षाच्या काळातील असाधारण मनांच्या मंथन-चिंतनाचा एक ऐसपैस आलेख आपल्यासमोर व स्वत:समोरही रेखाटण्याचा माझा हेतू आहे. हे आपल्या भविष्यकालीन वाङ्मयीन वाटचालीचे संचित असणार आहे. नव्या शतकात पाऊल टाकताना ते संचित सोबतीला घेऊन जाणे आवश्यक आहे—आश्वासकही आहे. म्हणून त्यासंबंधी अगदी थोडक्यात व परिचयात्मक केलेली ही नोंद आहे.

साहित्य-संमेलनांचे स्वरूप कसे असावे, ती एक महत्त्वपूर्ण वाङ्मयीन घटना असल्यामुळे त्या स्वरूपात कोणते बदल करणे अपेक्षित आहे, व्यवहार्य आहे, संमेलनाध्यक्षांची निवडणूक कशा प्रकारे व्हावी, अध्यक्षांचे अधिकार कोणते, त्यांच्या कक्षेत काय काय येते, हा साहजिकपणेच अनेक अध्यक्षांच्या विवेचनाचा विषय झाला आहे. यांतील काही संमेलने महाराष्ट्राबाहेरही भरली. त्यामुळे बृहन्महाराष्ट्रातील लेखक, त्यांचे साहित्य, त्यांच्या वाङ्मयीन, शैक्षणिक, सांस्कृतिक व भाषिक समस्या यांविषयीही जिव्हाळ्याने बोलले-लिहिले गेले आहे. मराठी भाषा, तिचे दैनंदिन व शासकीय व्यवहारातील स्थान, तिचा संस्कृतीशी असलेला अविभाज्य संबंध, शास्त्रीय परिभाषेचे स्वरूप व कार्य, मराठीचे अध्ययन व अध्यापन, तिची लिपी यांसारख्या विषयांवर काही भाषणांत विचारमंथन आहे. मराठी भाषेविषयीचा प्रश्न हा या अध्यक्षीय भाषणांचा केंद्रबिंदू आहे, असे म्हटले तरी चालेल. त्याबरोबरच प्रादेशिक भाषांच्या विकासाचा प्रश्नही आस्थेने विचारात घेतला गेला आहे.

या उपरोक्त विषयांइतकेच महत्त्व मिळाले आहे ते अर्थातच ललितलेखनाचे स्वरूप व कार्य या विषयाला. त्या व्यापक विषयकक्षेत विविध वाङ्मयप्रकारांचे तात्त्विक रूप व त्यांची स्थितिगती यांचे विवेचन झाले. संतसाहित्य व बौद्ध-जैन वाङ्मय, मुस्लिम व ख्रिस्ती वाङ्मय, प्राकृत वाङ्मय, बालवाङ्मय, विज्ञानप्रसारक वाङ्मय, जनसाहित्य, ग्रामीण साहित्य, दलित साहित्य यांसारख्या प्रमुख प्रवाहांच्या संदर्भात संबंधित कालखंडातील त्यांचा भर लक्षात घेऊन चर्चा झाली. कोणत्याही भाषेतील साहित्यात कोशवाङ्मयाला विशेष महत्त्वाचे स्थान असते. ते वाङ्मय साहित्याच्या अभ्यासाला अनेकांगी संदर्भ पुरवत असते. मराठीत असे समृद्ध कोशवाङ्मय आहे. पण या क्षेत्रात अद्यापही विकासाला खूप अवसर आहे. या दृष्टीने शंकर गणेश दाते यांची अपूर्ण राहिलेली ग्रंथसूची व महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचा 'वाङ्मयकोश'

हे प्रकल्प शक्य तेवढ्या लवकर पूर्ण कसे होतील याकडे अभ्यासकांनी व शासनानेही लक्ष दिले पाहिजे. काही अध्यक्षीय भाषणांत अशा काही योजना विविध साहित्यसंस्थांना (मग त्या शासकीय असोत वा निम-शासकीय असोत.) कशा हाती घेता येतील यासंबंधी उत्तम सूचना आहेत. या दृष्टीने काही अध्यक्षांनी एक व्यवस्थित, गंभीर कार्यक्रमच सादर केला आहे. ललित साहित्य व समीक्षा यांचे परस्परसंबंध, नवसमीक्षेची दुर्बोधता, साहित्य व समाज आणि त्या संदर्भात मांडली गेलेली बांधिलकीबद्दलची अनुकूल-प्रतिकूल मते, शासन व साहित्य यांचे परस्परसंबंध आणि त्या अनुषंगाने आग्रहाने मांडलेला आविष्कार-स्वातंत्र्याचा विचार, राजकारण व साहित्य, प्रचार व साहित्य, जागतिक महायुद्धांचा व देशाच्या फाळणीचा लेखकाच्या मानसिकतेवर व निर्मितीवर झालेला खोल परिणाम, मराठी साहित्यकृतीची रुपांतरे व अनुवाद, वृत्तपत्रीय साहित्याची उपयुक्तता, मौखिक वाङ्मयाची व लोकसाहित्याची परंपरा आणि तिचे अभिरुचीच्या पोषणातील स्थान, यांसारख्या विषय-रेषा या वैचारिक आलेखावर कधी ठळकपणे तर कधी पुसटपणेही उमटलेल्या आहेत. स्त्रियांचे साहित्य या विषयाची रेषा मात्र नवल वाटावे इतकी पुसट आहे.

साहित्याच्या स्वरूपाची तात्त्विक चर्चाही झाली आहे. संस्कृत काव्यशास्त्राच्या अनुषंगाने झालेल्या चर्चेत साहित्याचे प्रयोजन, रसविचार, काव्यहेतू, काव्यानंद, प्रतिभेचे व प्रज्ञेचे रूप, निर्मितिक्रिया या अंगांना प्राधान्य मिळाले. तर भागवतधर्म, महाराष्ट्र-धर्म यांसारख्या पारंपारिक धर्मसंप्रदायांच्या वेधाबरोबरच आधुनिक उदारमतवाद, विवेकवाद, प्रबोधनयुग, मार्क्सवाद सावरकरवाद, गांधीवाद, आंबेडकरवाद, मानवतावाद इत्यादी विचारप्रणालीबद्दल, त्यांच्या ललित व वैचारिक, प्राचीन व अर्वाचीन साहित्यात पडलेल्या प्रभावाबद्दल मतमतांतरांची नोंद झाली. या भाषणांतून काही तत्कालीन प्रवृत्तीही अधोरेखित झाल्या. त्यात 'अव्यवस्थितप्रज्ञा'ची इंग्रजीच्या अर्धवट, अपरिपक्व संपर्कामुळे निर्माण झालेली, गोंधळलेली प्रवृत्ती (अनिल) आणि तरुण लेखकांची'दाखवेखोरी' ची प्रवृत्ती (पु.शि.रेगे) यांचा वेध इतका सूक्ष्मपणे घेतला गेला की आता त्या प्रवृत्तींना अध्यक्षांनी दिलेल्या संज्ञा या प्रचलित वाङ्मयीन चर्चेत मिसळून गेल्या आहेत. येथे विशेषत्वाने उल्लेख करावासा वाटतो तो न.चिं.केळकर यांनी मांडलेल्या 'सविकल्प समाधी' च्या उपपत्तीचा (बडोदे, १९२१). साहित्यातील 'धसमुसळेपणा'च्या प्रवृत्तीबद्दल आणि तिच्या आवश्यकतेबद्दल व परिणामाबद्दल विश्राम बेडेकर (मुंबई, १९८६) यांनी केलेले विवेचनही फार नेमके आहे. अशा रीतीने हे व्यासपीठ साहित्याच्या सैद्धांतिक व उपयोजित अशा दोन्ही स्वरुपांच्या विवेचनासाठी महत्त्वपूर्ण मानले गेले आहे.

या भाषणांतून वाङ्मयप्रकारांच्या स्थितिगतीबद्दल काही परामर्शात्मक वा तात्त्विक विचार व्यक्त केले गेले. त्या त्या अध्यक्षांच्या वैयक्तिक अनुभवानुसार व निवडीनुसार, कादंबरी, कथा, कविता यांची विशेषत्वाने चर्चा झाली. क्वचित चरित्रे-आत्मचरित्रे

यांनाही या चर्चेत स्थान मिळाले. गेल्या शतकाच्या पूर्वार्धात 'कलेसाठी कला की जीवनासाठी कला' हा वाद गाजला. त्या अनुषंगाने कला आणि नीती यांच्यातील संबंधांबद्दल व साहित्याच्या नैतिक प्रभावाबद्दल विचार मांडले गेले. पुरोगामी वाङ्मय, पावित्र्यविडंबन, नवमतवाद यांची साहित्यिक अंगाने चर्चा झाली. भाषाशुद्धीच्या चळवळीचा व मुक्तछंदाविषयी झालेल्या वादाचाही येथे उल्लेख केला पाहिजे. उत्तरार्धात नववाङ्मयाची-मुख्यत: नवकथा व नवकविता यांची-चर्चा अग्रभागी आली. त्यापूर्वी गीतकाव्यापासून महाकाव्यापर्यंतच्या काव्यप्रकारांचे स्वरूप व स्थान यांच्याबद्दल काही विचार व्यक्त केले गेले होतेच. ती एक प्रकारे वस्तुनिष्ठ चर्चा होती, तर नवकवितेसंबंधीच्या चर्चेत वैयक्तिक आवडनिवडही मिसळल्यामुळे समाधान व असमाधान या दोन्ही भावना होत्या. तक्रारी होत्या आणि निषेधही होता. नवकवितेच्या संदर्भाने साहित्यातील अश्लीलता, दुर्बोधता, विद्रूपता या प्रश्नाची विशेष हिरिरीने चर्चा झाली. यंत्रयुग, विफलतावाद यांच्याबद्दल बहुतांशी नापसंतीच व्यक्त केली गेली. तिला विरोधी असणारा सूरही उमटला. तो आता स्वप्नरंजन नको, वास्तवतावादच अधिक प्रस्तुत आहे ही भूमिका मांडणारा होता. साहित्याबद्दलच्या वेगळ्या अपेक्षांचे क्षितिज या भूमिकेतून मांडले जात होते.

साहित्याशी निकटपणे संबंधित असलेल्या प्रश्नांच्या चर्चेत साहित्य-परिषदांचे कार्य व एकसूत्रीकरण, ग्रंथालयांची व ग्रंथप्रसाराची आवश्यकता, वाङ्मयीन नियतकालिकांचे कार्य यांसारख्या विषयांचा समावेश आहे. काळ जसजसा पुढे सरकला तसतसे साहित्यावरील संपर्क-माध्यमांचे आक्रमण वाढू लागले; त्यांत नवनवीन माध्यमांची भर पडत गेली. त्यामुळे वाचन-संस्कृतीचे भवितव्य काय, एकंदर वाङ्मयीन संस्कृतीच क्षीण होत चालली आहे का, तिला संरक्षण कसे देता येईल, नवसंस्कृतीची निर्मिती कशी होईल, यांसारखे प्रश्न उपस्थित केले गेले. त्या दृष्टीने नवतारुण्यातील विद्यार्थ्यांवर व वाचकांवर कोणते संस्कार मराठी साहित्य करते, भाषा व साहित्य यांना प्राधान्य देणारा अभ्यासक्रम, मराठी माध्यमाचा संपूर्ण स्वीकार करून तयार केलेली क्रमिक पुस्तके, नवी अध्यापनशैली या मार्गांनी करता येतील, त्यांच्या मनावर स्वातंत्र्य, समता व बंधुत्व ही आदर्श मूल्ये या अराजकाच्या काळात कशी बिंबवता येतील-अशा तऱ्हेच्या अनेक चिंतांची, आस्थांची प्रकट नोद होऊ लागली. ही एका अर्थाने समकालीन व भविष्यकालीन वाचकाबद्दलची, त्याच्या अभिरुचीबद्दलची आणि त्याच्याशी असलेला संवाद अधिकाधिक दृढ कसा करता येईल याबद्दलची आस्था होती. अध्यक्षीय भाषणांतून ती आस्था वारंवार व्यक्त होणे अपरिहार्यच होते. अशा विविध परिघांत परस्परानुप्रवेश असलेला' प्रवास करत ही भाषणे आधिकाधिक समकालीन होत जाणे, हेही तितकेच अपरिहार्य होते. ही अपरिहार्यता बहुतेक अध्यक्षांना जाणवली असे सारांशरुपाने म्हणता येईल. या भाषणांतून संबंधित अध्यक्षांच्या साहित्यक्षेत्रातील अधिकाराची, व्यासंगाची व चिंतनाची प्रचीती येते असे

'हे तो प्रचीतीचे बोलणे' शाश्वत आधार देणारे ठरते.

या संदर्भात आणखी एक गोष्ट आवर्जून सांगितली पाहिजे. साहित्य-संमेलनांचे व्यासपीठ हे फक्त वाङ्मयीन प्रश्नांची चर्चा करण्यासाठीच असावे असा एक दृष्टिकोन असला, आणि बहुसंख्य पूर्वाध्यक्षांनीही तोच दृष्टिकोन स्वीकारलेला असला, तरी सर्वांनीच तो गृहीत धरला आहे, असा मात्र नाही. काही सामाजिक व राजकीय प्रश्नही या व्यासपीठावरून मांडले गेले आहेत. त्यांपैकी काही प्रश्नांची येथे फक्त नोद करते: भाषावार प्रांतरचना, अखंड महाराष्ट्र, संयुक्त महाराष्ट्राची चळवळ, गोव्याचे विलीनीकरण, कारवारचा महाराष्ट्रात समावेश, सीमाप्रश्न, कोकणी भाषा, मराठवाडा विद्यापीठाचे नामांतर, हिंदुत्वनिष्ठा, धर्मनिरपेक्षता—हे सर्व प्रश्न त्या त्या काळात महत्त्वाचे होते. ते मांडणाऱ्या अध्यक्षांच्या त्यांच्यासंबंधी काही भूमिका, काही विचारप्रणाली होत्या. राजकारणाने आता आपल्या जीवनाला सर्वांगीण स्पर्श केला आहे. त्यामुळे हे प्रश्न वगळून चालणार नाही हे निर्विवाद आहे. गेल्या वर्षी डॉ य. दि. फडके यांनी आपल्या भाषणात सीमाप्रश्नाला प्राधान्य देऊन त्याची सांगोपांग मांडणी केली. त्यासाठी त्या त्या प्रश्नांचा सखोल व्यासंग पाहिजे. तो ज्यांच्याजवळ आहे ते विचारवंत व लेखक अन्य व्यासपीठांवरूनही त्या प्रश्नांना सामोरे जातात. त्यांपैकी काही प्रमुख साहित्यिक व्यासपीठे महाराष्ट्र साहित्य परिषद, मुंबई मराठी साहित्य संघ, पत्रकार संघ, विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद, गोमंतक साहित्यसेवक मंडळ, मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश यांसारख्या संस्थांची आहेत. यांपैकी काही संस्था व्यापक स्वरूपाची साहित्यसंमेलने सातत्याने आयोजित करत आल्या आहेत. महाराष्ट्र साहित्य परिषद ही १९०६ साली स्थापन झालेली ज्येष्ठ साहित्यसंस्था तर १९१२ पासून १९६५ पर्यंत-म्हणजे अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ अस्तित्वात येईपर्यंत-अखिल भारतीय स्वरूपाची संमेलने आयोजित करत असे. यांपैकी विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद, गोमंतक साहित्यसेवक मंडळ यांच्यातर्फे झालेल्या संमेलनांची अध्यक्षीय भाषणे ग्रंथरूपाने उपलब्ध आहेत. ती भाषणे वाचल्यानंतर या संमेलनांचेही योगदान किती मोलाचे आहे हे जाणवते. याशिवाय इतर छोटीमोठी साहित्य-संमेलनेही आहेत. दलित, विद्रोही, ख्रिस्ती, मुस्लिम, समरसता, कामगार, जनवादी यांसारख्या संमेलनांचाही येथे आवर्जून उल्लेख केला पाहिजे. तीही पाहिजेत आणि त्यांची गंभीरपणे दखलही घेतली पाहिजे. या सर्व संमेलनांचा व त्यांच्या अध्यक्षपदांवरून झालेल्या भाषणांचा एकत्रित विचार केल्याखेरीज आपल्या विचारवत-कलावंत लेखकांना कोणते प्रश्न त्या त्या वेळी निकडीचे वाटले याचे सर्वसमावेशक चित्र आपल्यासमोर येणार नाही. आज स्वतंत्र विदर्भाचा आणि त्याला विरोधी असा अखंड महाराष्ट्राचा प्रश्नही पुन्हा अग्रभागी आला आहे. हे प्रश्न नवे नाहीत. काही पूर्वाध्यक्षांच्या भाषणांतून तो मांडला गेला होता. आर्थिक, सामाजिक, राजकीय अशा त्रिविध संदर्भात मांडल्या

गेलेल्या या प्रश्नाबाबत अनुकूल व प्रतिकूल अशा दोन्ही भूमिका घेतल्या गेल्या आहेत. माझी या प्रश्नासंबंधीची भूमिका पूर्णत: वाङ्मयीन व भावनिक आहे. मला अगदी मनापासून वाटते, की 'प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा' हे श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचे महाराष्ट्र गीत हेच आमचे खरे गीत. बहु असोत; ते सुंदर व संपन्नही असोत-आहेतच; पण ते या साकल्याच्या प्रदेशातील 'बहु असोत'. हा महाराष्ट्र अखंड राहो.

अध्यक्षीय भाषण हे अध्यक्षाने स्वत:च्या समग्र वैचारिक-वाङ्मयीन प्रवासाच्या एका महत्त्वाच्या टप्प्यावर अंतर्मुख वृत्तीने केलेले भाष्य असते—निदान असावे आणि ते त्याच्या निवडीचेही असावे. म्हणूनच मीही माझा विषय मोकळेपणाने निवडला. लेखक नावाचा एक मूलादर्श. विषयाच्या या सर्वसाधारण स्वरूपाला शीर्षक द्यायचेच झाले, तर ते "लेखक : सार्वकालीन आणि समकालीन" असे देता येईल. त्याच्या, दोन्ही पूर्णत: परस्परभिन्न नसलेल्या-किंबहुना बहुतांशी परस्परसंबद्ध असलेल्या-अस्तित्वासंबंधीचा हा संवाद आहे.

## इंदूरविषयी

इंदूरसारख्या आतिथ्यशील, कलाप्रेमी व मनमोकळ्या स्वभावाच्या शहरात माझे हे संवादरूप विचार मांडण्याचे भाग्य मला लाभत आहे. येथे होत असलेले हे तिसरे साहित्य-संमेलन. पहिले १९१७ साली गणेश जनार्दन आगाशे यांच्या अध्यक्षतेखाली झाले; दुसरे १९३५ साली भवानराव पंतप्रतिनिधी यांच्या अध्यक्षतेखाली झाले. ही दोन्ही संमेलने फार चांगली झाली, असे इतिहास सांगतो. या दोन्ही अध्यक्षांनी महत्त्वाचे विचार मांडले. काही महत्त्वाच्या ठरावांचाही पुरस्कार झाला. गणेश जनार्दन आगाशे यांच्या भाषणात त्यांनी वाङ्मयीन परीक्षण-समितीत शासननियुक्त सदस्यांबरोबर लोकनियुक्त सभासदही असावेत, असा एक महत्त्वाचा मुद्दा मांडला होता. त्या संमेलनात शिक्षणाचे माध्यम मराठी असावे असा ठराव पास केला गेला होता. भवानराव पंतप्रतिनिधी यांनी मराठी माणसांची एकजूट असली पाहिजे, वेगवेगळ्या वादांत त्यांनी आपली शक्ती विनाकारण खर्ची घालू नये असे सांगून, चांगल्या अभिरुचीला पोषक, उन्नतीला प्रेरक व सामाजिक ऐक्य घडवून आणणारे साहित्य निर्माण करण्याचे आवाहन केले होते, विद्यार्थ्यांमध्ये स्वावलंबन उत्पन्न होईल अशा स्वरूपाची प्राथमिक शिक्षण देणारी क्रमिक पुस्तके निर्माण करण्याचा उपक्रम साहित्य-परिषदांनी हाती घ्यावा, अशी शिफारस केली होती. दोन्ही भाषणांतील शासन आणि समाज, मराठी माणसाचे ऐक्य, मराठी भाषा आणि मोकळे वैचारिक वातावरण यासंबंधी व्यक्त केलेल्या प्रतिक्रिया आजही लक्षणीय वाटतात. काही विषय कधीच कालबाह्य होत नाहीत, फक्त त्यांचे तपशील व संदर्भ बदलतात.

अशी समृद्ध साहित्यिक-सांस्कृतिक परंपरा असलेले हे इंदूर. ती परंपरा निर्माण करण्यात येथील राज्यकर्त्यांचा-म्हणजेच होळकर घराण्याचा सहभाग फार मोठा होता. मल्हारराव होळकर हे माळव्यांचे राज्यसंस्थापक. त्यांच्याच कल्पक, डोळस हेतूमधून इंदूर हे सुंदर शहर निर्माण झाले. तुकोजीराव होळकर व यशवंतराव होळकर यांनी मल्हाररावांची परंपरा पुढे चालवली. १७२८ ते १९४८ या अखंड २२० वर्षांच्या प्रदीर्घ कालखंडात होळकर राजवंशाने इंदूरचा-एकूण माळव्याचाच-सर्वांगीण विकास केला. मल्हाररावांचे सुपुत्र खंडेराव. त्यांना वीरमरण आल्यानंतर (१७५४) मल्हाररावांनी एक श्रेष्ठ धारिष्ट्य दाखवले. त्यांनी खंडेरावांची पत्नी अहिल्याबाई यांना सती जाऊ दिले नाही. राज्यकारभाराचे उत्तम प्रशिक्षण दिले. खंडेरावांच्या मालोजीराव या अल्पवयीन मुलाकडे पेशव्यांनी सुभेदारीची वस्त्रे दिली खरी, पण तो लहान होता म्हणून आणि पुढे आठनऊ महिन्यांतच त्याचा मृत्यू झाला म्हणून अहिल्याबाईंकडेच राज्याची सर्व व्यवस्था सोपवली. अहिल्याबाईंनी तीस वर्षे (१७६६-१७९५) समर्थपणे राज्यकारभार सांभाळला. त्यांच्याच कारकिर्दीत इंदूरऐवजी महेश्वर ही माळव्याची राजधानी झाली.

अहिल्याबाई हे एक विलक्षण व्यक्तिमत्त्व होते. त्या प्रदेशाच्या राज्यकारभाराची जबाबदारी स्वीकारल्यावर अहिल्याबाईंनी दाखवलेल्या कर्तृत्वाला इतिहासात तोड नाही. अत्यंत चोख व निष्कलंक कारभारामुळे त्यांनी प्रजेला आपलेसे केले. धनदौलतीला तृणवत मानणारी, शत्रूंना जरबेत ठेवणारी व स्वकीयांना आधार देणारी, उदार, दानशूर अशी ही स्त्री माळव्याच्या लोकमानसात रुजलेली आहे. 'देवी', 'लोकमाता', 'पुण्यश्लोक', 'साध्वी' ही यथार्थ नामाभिधाने अहिल्याबाईंनः लाभलेली आहेत. ही ऐतिहासिक काळातील, पुरातन पंचकन्यासमूहातील प्रातःस्मरणीय अशी दुसरी अहिल्या होती.

वर उल्लेखिलेल्या राज्यकर्त्यांमुळे व विशेषत: अहिल्याबाईंमुळे माळव्याचा व इंदूर या शहराचा चौफेर विकास झाला; अनेक साहित्यिक-सांस्कृतिक संस्थांची स्थापना झाली. बृहन्महाराष्ट्रातील भाषिक समस्येची सोडवणूक करण्याचा प्रयत्न या संस्था प्राणपणाने व व्रतस्थपणे करत आहेत. त्यांना आपण सर्वांनीच मन:पूर्वक सहकार्य दिले पाहिजे.

इंदूरच्या सांस्कृतिक जीवनाचा साहित्यनिर्मिती हा एक महत्त्वाचा पैलू आहे. येथे साहित्यनिर्मितीला अनुकूल असे वातावरण सुसंस्कृत राज्यकर्त्यांमुळे निर्माण झाले व येथील साहित्यप्रेमी मंडळींनी ते चैतन्यशील ठेवले. राजकवी भा.रा.तांबे हे ग्वाल्हेरचे राजकवी. तांब्यांनी रसिकांना वाहिलेली काव्यसुमने रसिकांनी आजही आपल्या स्मरणाच्या गाभाऱ्यात ताजी, टवटवीत ठेवली आहेत. तांब्यांची गीतगंगा अजूनही वाहती आहे. राजकवी रा. अ. काळेले, भवानीशंकर पंडित, भालचंद्र लोवलेकर या कवींचेही मराठी कवितेला महत्त्वाचे योगदान आहे. मध्यप्रदेशातील वातावरणाचे अत्यंत देखणे चित्र तांब्यांच्या व लोवलेकरांच्या कवितांतून रेखाटले गेले आहे. लोवलेकरांच्या 'चोरलकाठ',

'श्यामाराणी' 'मिलाफ येथे मळवाटांचा', 'माळवीण' या कविता येथे सहज आठवतात. अशा कितीतरी जुन्यानव्या, वेगवेगळ्या साहित्यप्रकारांत निर्मिती करणाऱ्या आजच्या लेखकांची नावेही येथे सहजपणे आठवतात. येथे वि. सी. सरवटे यांच्या 'मराठी साहित्यसमालोचन' या महत्त्वपूर्ण वाङ्मयीन इतिहासाची नोद केली पाहिजे. साहित्याच्या अनुषंगाने विशेष आवर्जून उल्लेख येथील रंगभूमीचा केला पाहिजे. या क्षेत्रातील बाबा डिके प्रभृती कलावंतांनी ही रंगभूमी आजतागायत चैतन्यशील ठेवली. प्रतिभावान चित्रकार ना. श्री. बेंद्रे व चिंचाळकर गुरूजी आणि शिल्पकार र.कृ.फडके यांचेही येथे स्मरण होते. धार काय किंवा देवास काय इंदूरहून सास्कृतिकदृष्ट्या भिन्न नाहीत. सी. के. नायडूंपासून क्रीडाविश्वातही इंदूरचे नाव झळकते आहे. समाजकारण व राजकारण या क्षेत्रांतही मध्यप्रदेश मागे नाही. या संदर्भात या संमेलनाच्या स्वागताध्यक्षा श्रीमती सुमित्रा महाजन यांचा स्वतंत्र उल्लेख करावासा वाटतो.

अशा या संस्कृतिसंपन्न नगरीत पाऊल टाकल्यानंतर मनात अनेक सुंदर स्मरणे जागी होतात. रामूभैय्या दाते यांच्यासारखी बहुरंगी, रसिक व्यक्ती या नगरीला एक वेगळे चैतन्य देऊन गेली. कुमार गंधर्वांचे गाणे येथे फुलले. ते सूर वातावरणात अद्यापही तरंगत आहेत-आणि तरंगत राहतील.

तो विलक्षण स्मरणानुभव मनात सामावून घेतच आता मुख्य विषयाकडे वळते ।

हा विषय, आधी म्हटल्याप्रमाणे, लेखक या नामाभिधानाच्या एका मूलादर्शाच्या संदर्भात मांडायचा आहे. त्याचा प्रवास कधी दुरून, तर कधी जवळून, पण सततच त्याची आश्वासक सोबत घेऊन न्याहाळायचा आहे. त्याची सार्वकालीन व समकालीन अशी दोन्ही रूपे डोळ्यांसमोर ठेवून, या संवादाच्या प्रवाहात आणि मार्यादित कालावधीत जेवढे काही सामावले जाईल तेवढे मी सांगणार आहे. भाषा ही मूलत: संवादासाठीच असते. पण लेखकाच्या वैयक्तिक व वाङ्मयीन जीवनात काही क्षण असे येतात, की शब्द हा आपल्या लेखनसरणीचा एक अतूट भाग असला, त्या शब्दाशी जिव्हाळ्याचे नाते जुळलेले असले, तरी तो आपल्यापासून दूर गेला आहे, जणू आपली त्याच्यावर काही सत्ताच नाही, असे वाटू लागते. पण एक अनाम, अदृष्ट शक्ती बळ देते, आणि विश्वासही देते. लौकिकाचा प्रकाशझोत अंगावर पडलेला असला, आणि त्यामुळे मन:स्थिती काहीशी संकोचलेली, अवघडलेली असली, एकांत हाच आपल्या प्रकृतिधर्माशी अधिक जुळणारा असे मनापासून वाटत असले, तरी आणखी एक अलौकिक शुभ्र प्रकाशकिरण आपल्या अंगावर पडतो आहे, असा कोणत्याही सर्जनशील लेखकाला येणारा सुंदर अनुभवही येतो. त्या अनुभवात आपणही सहभागी व्हाल, आणि आपल्याशी होणारा माझा संवाद त्या प्रतिसादामुळे अधिकाधिक जिव्हाळ्याचा होत जाईल, असा विश्वासही वाटतो. हा लेखकाचा आत्मविश्वास नव्हे, तर वाचकांच्या व श्रोत्यांच्या प्रतिसादातून लाभलेला विश्वास. मला या क्षणी त्या प्रतिसादाचे मोलच करता येत नाही.

मी लेखक या महाजातीत समीक्षकाचाही अंतर्भाव करते. तोही वेगळ्या प्रकारचा सर्जकच असतो. सर्जनाच्या वाटेवर अखंडपणे वाटचाल करणाऱ्या लेखकाला आस्वादक वृत्तीने न्याहाळताना, त्याच्या लेखनाविषयी काही मर्मदृष्टी देणारी निरीक्षणे करताना, विश्लेषण करताना आणि या निरीक्षण-परिक्षणांतून त्या लेखकाविषयी एक वाङ्मयीन भाष्य करताना समीक्षकाच्या या सर्जन क्षमतेचा प्रत्यय येतो. सर्जनाची ही दोन्ही रूपे माझ्या मनात असतील. समीक्षक असतील तसे वाचकही असतील. या तिघांचा, विशेषत: लेखकाचा, वर उल्लेखिलेल्या दोन्ही संदर्भात शोध घेणे ही माझ्या विषयाची सर्वसाधारण कक्षा आहे.

## सार्वकालीन लेखक

या संवादाचा आरंभ आपल्या मनात असलेल्या पहिल्या प्रश्नापासून करू, साहित्य म्हणजे नेमके काय ? या प्रश्नाचे वेगवेगळ्या काळांतील अनेक प्रतिभावंत लेखकांनी व समीक्षकांनी दिलेले, आपापल्या दृष्टिकोनानुसार व व्यसंगानुसार साहित्याचे वेगवेगळे पैलू अधोरेखित करणारे उत्तर आपल्या स्मरणात आहेच. त्याला आणखी एका संदर्भाची जोड दिली पाहिजे. ती ही, की साहित्य म्हणजे एकाच प्रकारचे साहित्य नव्हे. त्याची अनेक रूपे असतात. ते ज्या वेगवेगळ्या भाषांत लिहिले जाते, त्या भाषांतील साहित्यात ती रूपे प्रतिबिंबित होतात. त्या भाषा आपल्याला येत असल्या-नसल्या, आणि म्हणून त्या भाषांतील साहित्य आपण वाचलेले असले-नसले, तरी त्यांचे अध्याहृत भान आपल्याला असतेच. दूरचे प्रदेश तर सोडाच; एकाच देशात अनेक प्रदेश असतात, आणि त्यांत निर्माण होणाऱ्या साहित्यालाही त्या त्या स्थानिक संदर्भाची जोड असते. स्थानिक बोलीच्या काही छटा त्या साहित्यांतील भाषेलाच नव्हे तर अनुभवांनाही प्राप्त होतात आणि त्या अत्यंत लक्षणीय असतात. हे सगळे प्रवाह मिळूनच साहित्य नावाचा अथांग समुद्र अस्तित्त्वात येतो. या समुद्राला आणखी किती नवनवीन प्रवाह येऊन मिळणार आहेत याचे भाकीत कधीही वर्तवता येणार नाही. तसा प्रयत्नही कोणी करू नये. उलट, या सगळ्या प्रवाहांचे एकमेकांत होणारे विलीनीकरण जमेला धरूनच आणि ते स्वागतार्ह मानूनच साहित्याचा विचार करावा. हा एका अर्थाने विश्वसाहित्याचाच विचार असतो. कोणत्याही श्रेष्ठ लेखकाच्या मनातील साहित्याबद्दलची संकल्पना तो संदर्भ घेऊनच घडत असते. एका व्यापक, सार्वकालीन लेखक-संकुलाचा आपण एक भाग आहोत, आणि तरीही आपण वैशिष्ट्यपूर्ण व स्वायत्त आहोत, अशी त्याची संमिश्र भावना असते, नंतर त्या भावनेचेच वाङ्मयीन भूमिकेत परिवर्तन होते. आता या नव्या शतकात तशी व्यापक भूमिका लेखकाने स्वीकारणे अधिकच निकडीचे झाले आहे.

असे हे एक सर्वदूर पसरलेले आणि तरीही स्वायत्तता हे मूल्य मानणारे लेखक

संकुल आहे. या संकुलातील लेखक जसा स्वत:शी बोलतो, तसा तो आपल्या भाषेत, शैलीत सर्वांशी बोलतो. त्याचे वैयक्तिक आस्थाविषय व अनुभव, त्यांच्या अनुषंगाने त्याने केलेली आशयसूत्रांची, रूपबंधांची व शैलीची निवड, त्याच्या काळाच्या प्रवृत्ती आणि त्याचे जीवनचिंतन हे सगळे त्याच्या बोलण्यातून व्यक्त होते. त्याच्या या अखंड स्वगत-संवादातून तो आपल्या भोवतालाचा व या आदिम, सनातन खळाळत्या जीवनप्रवाहाचा अन्वयार्थ लावत असतो. तो प्रत्यक्षात इतर पुष्कळ लौकिक व्यवहारात गुंतलेला असेल. तसे मर्यादितपणे जीवनात गुंतणे मानवप्राणी म्हणून आवश्यक व अटळ असतेही. त्याखेरीज त्याला लेखनाची सामग्री मिळत नाही. ही सामग्रीच आधी अर्थपूर्ण अनुभवात रुपांतरित होऊन नंतर जीवनाचा अर्थ लावण्यासाठी आवश्यक असलेल्या ऊर्मीला, प्रेरणेला चालना देते; पण कालांतराने व समांतरपणेही तीच सामग्री लेखकाला या गुंत्यातून सुटका कशी करून घ्यायची, मुक्ती कशी साधायची, याची दिशाही दाखवते. दैनंदिन जीवनात कमीअधिक गुंतलेल्या या लेखकाला एक दूरचे क्षितिज नेहमीच खुणावत असते, आणि तो आपल्या प्रत्येक लेखनरूप कृतीतून, तिच्यात सामावलेल्या प्रत्येक शब्दातून त्या क्षितिजाच्या दिशेने पुढे जात असतो. ही एक विशुद्ध, गंभीर अशी आंतरिक प्रेरणा असते. अंतर्मनाने स्वत:लाच घातलेली एक साद. आसमंतात अस्फुट असलेली एक साद. समष्टिमनाच्या अंतरंगातही काही अस्फुट, मुके पडसाद असतात. त्यांना केशवसुतांच्या शब्दात 'वाचाळ', मुखर करणे हीही लेखकाची आणखी एक प्रेरणा असते. या साद-पडसादांचा ठावठिकाणा शोधताना, त्यांचा मागोवा घेताना, पाठलाग करताना, लेखक त्या प्रक्रियेतील अलौकिक आनंद घेतो, आणि थकवाही अनुभवतो. पण त्या थकव्यातही कृतार्थतेची भावना असते. या नादिष्ट प्रवासात तंद्रेचे क्षण टिपायचे, तसे विफलतेचेही. पण ते दोन्ही क्षण सुंदर असतात.

असा हा संमिश्र, गुंतागुंतीचा प्रवास. त्या वाटेवर असंख्य वळणे, आणि तितकीच, किंबहुना अधिकच आडवळणेही. ती स्वीकारत, 'खळखळे, अडखळे, सुके, कधी फेसाळे' अशा या वाटेवरून चालत कधीच पूर्ण न होणारा, ईप्सित मुक्काम न गाठणारा हा प्रवास करत राहणे हे लेखकाचे प्राक्तन असते. त्या वाटेवरचे पहिले पाऊल त्याने उचललेले असते. एकदा ते उचलले की दुसरे पाऊल उचलणे क्रमप्राप्त असते. मग तिसरे, मग चौथे. पावले पडतच राहतात; आणि कविवर्य बोरकरांच्या शब्दांत त्या 'पावलांपुरता प्रकाश' ही सोबतीला असतो. म्हणून लेखकाचा आपल्या वर्तमानकाळाशी अंशत:च संबंध असतो; विलग व्यक्ती न राहता लेखकांच्या संकुलाशी अनुबंध जोडलेला हा लेखक 'नाव आहे चाललेली / कालही अन् आजही' असे गाणे म्हणत पुढे जात असतो.

या प्रवासाला अंत नसतो, हे खरेच. पण स्वत:च्या ऐलतीरावरून होणारा

विशिष्ट आरंभ मात्र असतो. त्या आरंभीच्या पहिल्या निमिषात असे काय घडते, की ज्यामुळे तोवर लौकिक आयुष्य जगणारा तुमच्या आमच्यासारखा एक माणूस स्वत:चा पहिला शब्द लिहितो ? चुकतमाकत का होईना, सर्जनाच्या वाटेवरचा एक प्रवासी होतो ? ही निर्मितीची अद्‌भूत ठिणगी कशी व कधी पडते ? ते अंशत: कळते, पूर्णत: कळते, की कळतच नाही ?— कधीच कळत नाही ?

सगळे कळत नाहीच. पण लेखक अखंडपणे, अथकपणे शोध मात्र घेत राहतो. बहुतेक लेखकांना जाणवते, की आपल्या आयुष्याच्या प्रवासाप्रमाणेच आपल्या निर्मितीचा प्रवासही एका खडकाळ प्रांतातून सुरू झाला आहे. 'खडकाळ प्रांत हो, ही जेथून निघाली/पथ शोधित आली रानातून अकेली' अशीच ही सर्वसाधारण लेखक-कथा असते. आरंभीची पावले टाकत असताना, भोवती प्रोत्साहक असे फारसे काही जवळ नसते. परंपरेचे, संस्कारांचे आधार नंतर हाती येतात त्यापूर्वी जवळ असते ती फक्त एक ठिणगी. पण प्रकाशाचा तेवढा एक थेबही पुरेसा वाटतो, अंगात ऊब आणतो. ती ऊब अंगप्रत्यंगात पसरते, आणि मग जे काही सुचलेले असते ते शब्दांत सांगण्याची ऊर्मी मनात जागी होते. हे असते निर्मितीचे प्राथमिक मानसशास्त्र. ती मुळी एक अनावर इच्छाच असते. त्या वेळी मनात दुसरा कोणताही हेतू नसतो, अन्य कोणतेही बाह्य हिशेब नसतात. शब्दांशीही—किंवा भाषेशीही—धड भेट झालेली नसते. रूपबंध वगैरे गोष्टी तर खिजगणतीतच नसतात. पण तरीही लेखन घडतेच. या निर्मितीत आधी उत्स्फूर्तता असते. पुढे तिच्यात नियमही येतात. ते नियम शिस्त देतात. चांगला लेखक बाहेरून लादलेले नियम कधीच स्वीकारत नाही. पण स्वनिर्मित नियमही असतात. त्या नियमांतून काही वेगळेही हाती लागते. लेखन असे उत्स्फूर्त, रोमॅंटिक प्रवृत्तीचे असो किंवा त्या उत्स्फूर्ततेतही काही बंधने शोधणारे आणि त्यांचे सहजपणे पालन करणारे म्हणून अभिजाततावादी प्रवृत्तीचे असो,—खरा प्रश्न ते वाचकांशी संवाद-संप्रेषण साधते की नाही, हा असतो.

कधी हा एक तात्पुरता झटका ठरतो. सामान्यत: तो कवितेचा असतो. (आणि तो पुष्कळांना विशेषत: कोवळ्या वयात येतो. पुढे तो टिकत नाही.) पण ज्यांच्या रक्तात निर्मितीची वाहिनी असते, त्यांना हे झटके पुन्हापुन्हा येतात; त्यांच्या हातून लेखनाची कृती अनावरपणे पुन्हापुन्हा घडते. हाच असतो एका लेखकाचा जन्म. या अवस्थेत आत्माविष्काराची व संवादाची जाणीव केंद्रस्थानी असते. मनात थरथरणाऱ्या अनेक ज्योती असतात, काही ज्वालाही असतात. त्या वाचकाच्या मनातही लावाव्या, पेटवाव्या अशी तीव्र इच्छा निर्माण होते कधी प्रकट होऊन, कधी अंतर्हित राहून, कधी आपल्या पात्रांच्या माध्यमातून लेखक हे उद्दिष्ट साधतो. त्या पात्रांत लेखकाचेच आवाज दडलेले असतात. त्यांनाच लेखक मुक्त करतो, चिरंतन करतो. या कृतीत तो अंतर्मुख व बहिर्मुख अशा दोन्ही वृत्तींचा समन्वय साधतो. म्हणजेच तो ते पात्र

असतोही, आणि नसतोही. त्याला त्या पात्रांच्या आवाजाखेरीज दुसरा आवाज नसतो आणि तरीदेखील तो स्वत:चा आवाज सांभाळत असतो. या आवाजांतून असंख्य ठिणग्या कशा स्फुरतात हे फार सुस्पष्टपणे, तार्किक पातळीवर सांगता येणे कठीण असते. वाङ्मयीन प्रवासाचे पुढचे टप्पे गाठल्यानंतरही ते गूढ पूर्णपणे उकलत नाही. म्हणून तर निर्मितीमधील साहस, थरारी आणि नशा कायम राहते. या अर्थाने लेखनाच्या वाटेवरचे प्रत्येक पाऊल महत्त्वाचे असते; आणि ही पावले जसजशी पुढे पडत जातात, तसतशी ती अधिकाधिक तलस्पर्शी जीवनजाणिवा स्वत:भोवती लपेटत जातात.

त्यातील सर्वात महत्त्वाची जाणीव कोणती, यासंबंधीचा निर्णय ज्या त्या लेखकाच्या प्रतिभाधर्मावर अवलंबून असतो. पण सर्व प्रतिभाधर्माच्या लेखकांना एकत्र जोडणारी एक मूलभूत जाणीव म्हणजे निर्मिती हा आपला एक मोलाचा अधिकार आहे आणि तिच्यात आपले एक फार मोठे कर्तव्यही सामावलेले आहे. या दोन्ही गोष्टी निष्ठेने बजावण्यासाठी आपले जीवन व लेखन या दोन्ही सरणी मूल्ययुक्त असल्या पाहिजेत. अवतीभवती सुंदर व कुरुप असे दोन्ही प्रकारचे, बहुरंगी वास्तव आहे. या सौदर्याचे व कुरूपतेचे अनेक उपप्रकार आहेत. हे वास्तव ठिकठिकाणी आहे. ते प्रत्यक्षपणे व कल्पनेने अनुभवण्याची, जाणण्याची एक दैवी शक्ती आपल्यात आहे. आपण तिला न्याय दिला पाहिजे. वास्तव हे मुळी एक व्यामिश्र प्रतीकच आहे. त्यातील लौकिक तपशील वगळून नव्हे तर ते आपल्यात रिचवून आपण त्या प्रतीकाच्या गाभ्यापर्यत पोहोचले पाहिजे. ते पोहोचणे हीच तेथपर्यत पोहोचताना घ्याव्या लागणाऱ्या परिश्रमांची, त्यामुळे येणाऱ्या अलौकिक थकव्याची भरपाई. तेच खरे पारितोषिक. तेच या प्रवासात आपल्यापुढे ठाकलेल्या अनेक जीवनविषयक व वाङ्मयविषयक प्रश्नांचे आपल्याला मिळालेले उत्तर. ते उत्तर हेच एक मूल्य. तोच सर्जनशील जगण्याचा केंद्रस्वर.

त्या जगण्यात लेखकाचे मन हे सदैव संभाषणसन्मुख असते. हे संभाषण स्वत:शी, आणि इतरांशीही-जे कधीच बोलू शकणार नाहीत त्यांच्याही वतीने स्वत:शी व इतरांशी. ते संभाषण मुख्यत: स्वत:च्या काळाच्या संदर्भात चालते. मनाचा समग्र चित्रपट तेथे उलगडतो. त्या चित्रपटात काही फ्लॅश-बॅक्स असतात, आणि ते नजिकच्या वा दूरच्या, वैयक्तिक व सर्वसाधारण भूतकाळाशी संबंधित असतात. पण तो भूतकाळही वर्तमानकाळाच्या संदर्भातच समजून घेतलेला असतो. या अर्थाने, साहित्यात ज्याला भूत, वर्तमान, भविष्य अशी कोणतीच प्रचलित विशेषणे निश्चितपणे लावता येणार नाहीत असा एक विशेष काळ वावरतो. त्या काळाचे प्रतिबिंब लेखकाने निर्माण केलेल्या अवकाशाच्या व व्यक्तिरेखांच्या माध्यमांतून परावर्तित होते. कादंबरी व कथा या वाङ्मयप्रकारांत व्यक्तिरेखा असतात, त्यांचे एकस्तरीय व बहुस्तरीय आवाज असतात. कवितेत—विशेषत: भावकवितेत—व्यक्तिरेखा नसल्या किंवा विरळपणेच

असल्या तरी कवीचा आवाज असतोच. आणि तिन्ही प्रकारात, इतकेच काय नाटक या वाङ्मयप्रकारातही एक आवाज तरी लेखकाचाच असतो.

लेखक, काल व अवकाश या दोहोतील परस्परसंबंधांचा शोध घेतो. निर्मितीच्या वाटेवर त्याला काल व अवकाश यांच्यातील विविध प्रकारचे संबंध जाणवतात, आणि ते त्याच्या साहित्यकृतीतून व्यक्त होतात. हरिभाऊंच्या सदाशिवपेठेत, गाडगिळांच्या 'किडलेली माणसे' सारख्या कथेतील चाळीत, बोरकरांच्या 'जपानी रमलाची रात्र' या कवितेमधील मंत्रमुग्ध शयनमहालात, मर्ढेकरांच्या 'पिपांत मेले' या कवितेतील चिंचोळ्या पिपात असे काही संबंध अध्याहृत आहेत. 'त्रिधा राधा' या पु. शि. रेगे यांच्या कवितेत अवघे आभाळ हाच एक अवकाश आहे, आणि त्याला काळच नाही. असा कालविरहित अवकाश आणि अवकाशविरहित कालही वाङ्मयात असू शकतो. असा हा विलक्षण कालावकाश सोबतीला घेऊन लेखकाचा प्रवास चाललेला असतो.

या प्रवासात भाषाही सोबतीला असते कधी ती घडवावीही लागते. पहिला शब्द सुचतो, दुसरा शब्दही. त्याप्रमाणेच पहिली प्रतिमा, दुसरी प्रतिमाही. पण कधी इतके विनायास काहीच घडत नाही. वाट पाहावी लागते. ती प्रतिक्षा कधी जीवघेणीही ठरू शकते. पण 'शुभ्र काही जीवघेणे' शोधण्याचा ध्यास असलेला लेखक ती प्रतीक्षाही आतुरतेने व आनंदाने करतो. सुचलेला पहिला शब्दच लेखकाला जणू आपल्या ताब्यात घेतो आणि त्या मुक्त बंदिवासात लेखक शेवटच्या शब्दापर्यंत पोचतो. मध्ये विराम, कष्ट, फेरफार, अंतच वाटावा इतके दीर्घ थांबणे-असे सगळे काही असते. पण तरीही शेवटचा शब्द लेखकासाठी थांबलेला असतोच ! पण दरम्यानच्या 'अब्द अब्द' शब्दांचा लोट अंगावर घेऊन लेखक एकीकडे रिता होतो आणि दुसरीकडे पुन्हा भरूनही येतो.

अशा तऱ्हेने दैवी आशीर्वादाची व मानवी प्रयत्नांची देणगी मिळालेला लेखक 'अम्लान प्रतिभाकळ्या उमलल्या आहेत चोहीकडे' अशा निर्मितीच्या अद्‌भूत प्रदेशात प्रवेश करतो. त्यापूर्वीचा प्रत्येक क्षण बिकट असतो. तो सोसण्यासाठी धार हवा, तकवा हवा. तो दाखवल्यानंतर लागणारा प्रदेश हा अवघ्या मानवजातीसाठीच सौंदर्य, प्रतिष्ठा व न्याय यांची मागणी करणारा प्रदेश असतो. हे जाणवल्यानंतर वाङ्मयीन प्रयोजनांचे अग्रक्रम पक्के होतात. तडजोडी होत नाही, प्रलोभने खुणावत नाहीत. त्यात रंजन हे प्रयोजन पूर्णत: अनुपस्थित असते, असे नाही. पण ते दुय्यम स्थानावर असते. ते पहिल्या स्थानावर नेणाऱ्या लेखकाला 'सार्वकालीन' असण्याचा अधिकार उरत नाही. तोही लेखकच, पण सार्वकालीन नव्हे.

या अद्‌भूत प्रदेशात एखादा स्तब्धतेचा पट्टाही असतो. ही स्तब्धता कधी जीवघेणी असते, तर कधी पर्युत्सुक, आसमंताशी 'जन्मांतरीचे नाते' सांगणारी. या प्रदेशात व स्तब्धतेच्या पट्ट्यातही लेखक आपले गाणे गातच असतो, आणि त्या

गाण्यात त्याचे अवघे अस्तित्व आणि अवघी सद्सद्विवेकबुद्धी सामावलेली असते.

येथे एक प्रश्न उपस्थित होतो. लेखक म्हणजे कादंबरीकार, कथाकार, नाटककार, कवी—आणि अन्य वाड्मयप्रकारांचा निर्माताही. या लेखकात लेखिकाही समाविष्ट आहे का ? या प्रश्नाला माझे उत्तर 'होय' असे असले, तरी काही भेदांची दखलही घेतली पाहिजे. या संदर्भात स्त्रीच्या देहाचा व त्यातून जन्मलेल्या काही आग्रहांचा व द्वंद्वांचा उल्लेख केला पाहिजे. आग्रह हा, की देह ही स्त्रीची नियती नाही, ती तिची शक्ती आहे. ही शक्ती जननशक्तीहून वेगळी आहे. लेखन ही गर्भात मूल वाढवण्याइतकी व त्याला जन्म देण्याइतकी स्वाभाविक गोष्ट नाही. त एक क्रियाशील, सुजाण घटित आहे. ती लेखकाची आणि लेखिकेचीही चिरंतन, आंतरिक गरज आहे.

स्त्रीचा देह जसा वेगळा, अनेक स्थित्यंतरांतून जाणारा, तसे तिचे मन, भावविश्वही वेगळे, आणि तिची भाषाही वेगळी. पण हे वेगळेपण संपूर्ण मात्र नाही. स्त्री व पुरुष-म्हणजेच लेखिका व लेखक—यांचे एक सामायिक असे जग असते, सामायिक संस्कृतीही असते. पण या सामायिक वर्तुळाभोवतीच एक चंद्रकोरीच्या आकाराची कडा असते. त्या कडेला Wild zone असे नाव दिले गेले आहे. एक वैराण, ओसाड, मोकळा प्रदेश. तिथे असते पुरुषप्रधान संस्कृतीने उभारलेली एक दृश्यादृश्य बंदीशाळा. त्या बंदीशाळेत होत असलेले देहमनाचे शोषण. कोंडलेले श्वास. आत जळत राहिलेले अश्रू. स्त्री या कुरुप अनुभवांबद्दल लिहिते—आता तर अधिक निकडीने लिहिते. पण याच बंदीशाळेत तिला तिच्या मुक्तीचे द्वारही दिसते. त्या द्वाराच्या मुखापाशी असते ते तिचे गर्भाशय आणि त्यात रुजलेली निरागस, हसरी स्वप्ने. त्या स्वप्नांना दिलेले स्तन्य. ही स्वप्ने ओटीत पुंजावताना वेदना असतात, पण एका अकल्पित क्षणात त्या वेदना संपवणारी, निर्भर आनंद देणारी तुर्यावस्थाही असते. ते असते विदेहीपण. त्या विदेहीपणात ओसाड, वैराण प्रदेशाच्या सीमारेषा उल्लघून साक्षात मुक्तीच्याच प्रदेशात स्त्री प्रवेश करते. तेथे पुरुषाला प्रवेश नाही, तेथे फक्त स्त्री नावाचे आभाळ आहे आणि त्यात जिचा कधीही क्षय होत नाही अशी चंद्रकोर आहे. ही चंद्रकोर स्त्रीच्या निर्मितीलाही एक तिचेच असे वेगळे रूप देते.

हे काही अंशी खरेच आहे पण तरीही निर्मितीच्या वाटेवरील स्त्रीचा प्रवास पुरुषासारखाच असतो; तिचा शोध व ध्यास तोच असतो, निष्ठा व मूल्ये तीच असतात, कालावकाशाशी असणारे नाते तेच असते आणि निर्मितीप्रक्रियेत करावी लागणारी प्रतीक्षाही तीच असते. काही मानसिक व सामाजिक प्रश्न यांचे वेगळेपण खरे असले, तसे ते असणे आवश्यकही असले, ती स्त्रीवादी लेखनामागील प्रभावी प्रेरणा असली, तरी त्यामुळे सार्वकालीन निर्मितीस्वभाव बदलत नाही.

निर्मितीच्या या धूसर आणि नितळही वाटेवर लेखक अखंडपणे क्रियाशील असतो. त्यावेळी लेखन हीच त्याची एकमेव प्रधान कृती असते. येथे एकान्तही असतो

आणि लोकान्तही असतो. 'स्व'शी सहवास असतो, आणि अवघ्या मानवजातीशी सान्निध्य असते. निसर्गाची गूढ नि:श्वसिते या वेळी ऐकू येतात. हे सगळ एका व्यापक सहअस्तित्वाच्या भावामुळे स्वत:त रुजवता येते. म्हणूनच स्वेतरांशी विलीनत्वाची व एकात्मतेची नाती जडतात. स्वत:साठी घेतलेले अनुभव इतरांसाठीही घेतले आहेत, तो जणू कुणा दैवी शक्तीने आपल्याकडे पाठवलेला एक संदेश आहे, असा प्रत्यय येतो. तो प्रत्यय हेच लेखकाचे सार्थक असते.

हा प्रवास मूलत: लेखकाच्या जीवनानुभवाच्या अनुषंगाने होतो, हे खरेच; पण प्रगल्भ जाणिवेच्या अवस्थेत लेखकाला उमगते, की केवळ जीवन पुरेसे नाही. मानवी जीवनाच्या शोधात पुष्कळ तपशील गोळा होतात; पण ते तपशील महत्त्वाचे नाहीत. त्यांच्या पसाऱ्यातील 'माणूस' हाती लागला पाहिजे. तो अजून सापडलेला नाही, असा कबुलीजबाब स्वत:शीच देऊन, लेखकाचा प्रवास पुढे चालू राहतो. साहित्य म्हणजे केवळ जीवन नव्हे, त्याला संपूर्णपणे विरोधी असेही काही नव्हे. ते वास्तव व कल्पनाशक्ती यांच्या समन्वयातून निर्माण झालेले एक घटित आणि एक मिथकही असते. ते निष्ठेने घडवायचे; त्यात स्वत:चा जीव ओतायचा. तो भाषेतही ओतायचा. असे अनेक निर्णय घेत लेखक पुढे जात असतो.

मानवी जीवनाच्या पसाऱ्यात लेखक ज्याचा शोध घेत असतो तो माणूस हा एका चक्रव्यूहात, भुलभुलैय्यात सापडलेला असतो. त्यांतून त्याला कल्पनाशक्तीच्या साहाय्याने सोडवण्यासाठी त्याला सोबत देण्यासाठी, त्याच्या इच्छा, सुखदु:खे, स्वप्ने जाणून घेण्यासाठी, करुणेची भावना व द्रष्टेपणाची शक्ती यांची आवश्यकता असते. भवितव्य हे वर्तमानाइतके स्पष्ट दिसावे लागते. त्यासाठीही कल्पनाशक्तीचे साहाय्य लागते. 'गर्दीत माणसांच्या माणूस शोधतो मी' असे स्वत:ला बजावत माणसाचा वर्तमान—जमले तर त्याचे भविष्यही—जाणून घ्यायचे; पण मुख्य म्हणजे त्याच्याशी असलेले आपले नाते ताडून पाहायचे. हेच लेखकाचे प्रधान आणि अंतिमही प्रयोजन असते.

हा शोध कधी पूर्ण होत नसतो. या शोधात एक दार उघडले तरी त्याच्या आत आणखी एक दार असते. अशी असंख्य दारे. लेखकाला त्यांतील किती दारे उघडता येतात हे त्याच्या सृजनशक्तीवर अवलंबून असते. पण आधी बंद दारे उघडण्याची प्रेरणा व नंतर तिचे ध्यासात झालेले रूपांतर लेखकाला एक दैवी बळ देते. मर्ढेकरांनी म्हटले आहे, "कितीक दालने / धुंडाळीत आलो; / उत्कंठा ही ल्यालो / स्वप्नांतली." त्यांना त्या शोधात परमशक्ती भेटावी असे वाटत होते. पण शेवटी माणूस हीच एक परमशक्ती नाही का ? या शोधाच्या शेवटी लेखकाला कोण भेटते ? की कोणीच भेटत नाही ? कोणी भेटो वा न भेटो, त्याचा हा शोध स्वत:सिद्धपणे महत्त्वाचा असतो.

हा शोध घेणाऱ्या व्यक्तिमत्त्वाचा एक महत्त्वाचा विशेष म्हणजे जीवन आपल्याहून कितीतरी अधिक मोठे आहे ही जाणीव. या जाणिवेमुळे जीवन अधिकाधिक आत्मसात करण्याचा आणि त्याचे विश्लेषण करण्याचाही ध्यास जन्माला येतो. जीवनाचे 'स्वसंवेद्य आत्मरूप' दिसते. त्यासाठी उत्कट व शांत संवेदनस्वभाव असला पाहिजे. समोरच्या संभारातील नेमका आकार पाहण्याची नजर, नेणिवेतील सुप्त व तार्किकतेपारचे, आदिम व आधुनिक असे दोन्ही जातीचे अनुभव आत्मसात करण्याची शक्ती पाहिजे. मुख्य म्हणजे तो अलौकिक ध्यास पाहिजे त्या ध्यासामुळे लेखकाचे अंतर्जीवन अत्यंत क्रियाशील होते आणि तो बाह्य जीवनातही मुक्तपणे झेपावू शकतो. काही वेळा तो एकटाही असतो. येथे 'आपुलाचि वाद आपणांसि'; किंवा 'माझ्या घरी मी वऱ्हाडी' अशी परिस्थिती असते. हा एकट्याचा संघर्ष, एकट्याची आशा, एकट्याचे परकेपण आणि एकट्याचा आवाजही. पण या सगळ्यामध्ये 'विश्वमाजी' स्फुरत पसरण्याचा विलक्षण अनुभवही अध्याहृत असतो. मग काहीच परके राहत नाही. लेखक आत्मीयतेने या बहुरंगी जीवनातील आनंद-स्थळे पाहतो, त्याप्रमाणेच दु:खेही पाहतो. स्वाभिमानाने स्वीकारलेले दुर्दैव, हताश नव्हे तर उत्तेजित करणारे विलक्षण पराभव, इतरांच्या आधाराने नव्हे तर स्वसामर्थ्याच्या प्रत्ययाने दिलेली झुंज व तिच्यातून मिळालेले विजयही... असे हे जीवनभर खेळणारे हारजितीचे प्रवाह असतात. ते प्रवाह आपल्या जनसाहित्यात, आदिवासी साहित्यात, ग्रामीण साहित्यात-आणि विशेषत: स्त्री साहित्यात व दलित साहित्यात-वाहताना दिसतात. तेथे मानहानीची, उपेक्षेची वेदना आहे, कधी न बुजणाऱ्या जखमा आहेत. त्यांचे संदर्भ व्यक्तिपरत्वे व समाजपरत्वे बदलले तरी साहित्यात त्यांना शाश्वततेचे रंग प्राप्त होतात. ते व्यक्त करताना 'हे सगळे बदलले पाहिजे' अशी गाढ करुणेतून जन्मलेली जिद्द लेखकाच्या ठिकाणी निर्माण होते त्यासाठी काही वेळा संघटितही व्हावे लागते. त्याखेरीज परिवर्तनाच्या पाऊलखुणा उमटत नाहीत. म्हणजे या दोन वाटा असतात. एका वाटेवर स्वत:पुरता त्या दुर्दैवाचा अनुभव घ्यायचा, आणि दुसऱ्या वाटेवर ते संपावे म्हणून संघटितही व्हायचे. या दोन्ही वाटा महत्त्वाच्या असतात. सामाजिक बांधिलकी आणि तिच्यातून निर्माण होणाऱ्या संघटना व चळवळी यांचा या व्यापक स्तरावर विचार केला तर त्या लेखकाच्या स्वातंत्र्यावर बंधने आणतात असे वाटणार नाही. ते स्वातंत्र्य जपूनही एक जबाबदार नागरिक म्हणून लेखकाला आपला त्यातील सहभाग दाखवता येईल. कलावादी लेखकांनीही अशा प्रकारचा सहभाग अप्रत्यक्षपणे मान्य केला आहे. कलावादी लेखनाची केंद्रे वेगळी असतील, पण म्हणून काही जीवनभान सुटत नाही. ते सार्वकालीन आहे, आणि म्हणून त्याचा साहित्यातून होणारा आविष्कारही सार्वकालीन आहे. ती एक बाह्य प्रेरणांचा सन्मान करणारी आदिम अंत:प्रेरणाच आहे. साहित्यात त्या दोन्ही प्रेरणांचा समन्वय असतो. तो समन्वय साधणे सोपे नाही. त्यातून द्वंद्वे निर्माण होतात, आणि

द्वंद्वातून दु:ख. ते टाळण्यासाठी ठराविक, सुरक्षित वाटांवरूनच चालण्याचा मोह होतो. त्यातून तडजोडी येतात 'आतला आवाज' घुसमटतो. तो नेहमी मोकळा, भोवतालाशी सुसंवादी ठेवणे हे लेखकाचे भागधेय असते, आणि सार्थकही.

भोवताल जाणून घेण्यासाठी ठिकठिकाणी प्रत्यक्ष गेले पाहिजे, सतत चालले पाहिजे असे नाही. कल्पनाशक्तीच्या बळावर लेखक उघड्या खिडकीतून जेवढे पाहतो, तेवढेच—किंबहुना त्याहून अधिकच—बंद खिडकीतूनही पाहू शकतो. म्हणूनच प्रकाशाइतकाच अंधारही खरा. त्यातही प्रकाशाची वर्तुळे, वलये दिसू शकतात. या प्रक्रियेत स्वत:बाहेर जाऊन आणखी एक जीवन जगण्याची संधी असते. येथेही विषय शोधावे लागत नाहीत, ते सापडत जातात. लेखकाने सगळ्या विषयांबद्दल लिहिले पाहिजे असे नाही. न लिहिलेल्या विषयांमधील आविष्कारांच्या शक्यता त्याने जाणलेल्या असूनही, तो लिहीतही नाही. कोणीतरी म्हटले आहे, "True paradises are those which the writer has lost." पण ते गमावलेले स्वर्गही लेखकाच्या मनात वस्ती करून असतात. काही विषय तर त्याचे नसतातच. त्यावर लिहिण्याचा व्यर्थ आटापिटाही करू नये. काही विषय लेखकाच्या साध्या स्मरणशक्तीशी संबंधित असतात. पण लेखकाजवळ आणखीही एक अनपेक्षितपणे जागी होणारी स्मरणशक्ती असते. एखादा अगदी लहानसाच प्रसंग घडतो, आणि त्याच्या अनुषंगाने लेखकाला आपल्या भूतकाळातील तत्संबंधित तपशिलांच्याच नव्हे तर शब्दस्पर्शरूपरसगंधांच्या अनुभवाने मूर्त झालेल्या अनेक आठवणी येतात. गो. वि. (विंदा) करंदीकर यांच्या 'पानगी' या लघुनिबंधाची येथे कोणालाही सहज आठवण होईल.

लेखकाचा कोणत्याही विषयावर लिहिणे हा उद्देश नसतो. कोणत्याही विषयासाठी लिहिणे हाही उद्देश नसतो. अनेक समकालीन प्रश्न समोर असतात. वेगवेगळ्या कारणांमुळे दुभंगत, शतखंडित होत चाललेले मानवी जीवन असे अनेक प्रश्न निर्माण करते. त्यांतील एखादा प्रश्नही त्या मानवी जीवनातील सुखदु:खांची, आशानिराशेची, प्रेमद्वेषाची, स्वप्नाची व स्वप्नभंगाची, हारजितीची कथा सांगण्यास पुरेसा असतो. अर्थात त्याची सार्वकालीन परिमाणे, त्याचे समकालीन संदर्भ तात्पुरते अग्रभागी ठेवून ती सांगता आली तर. ती कथा ज्यांना हे सगळे सापडत नाही, सापडले तरी सांगता येत नाही, किंवा सांगितले तरी ते पूर्ण, अंतिम नसते, अशा माणसांची, त्यांच्या आयुष्याची रूपककथा असते. त्या रूपककथेत लेखकही सामील असतो. बांधलेला नव्हे, सामावलेला. त्याला तरी अंतिम सत्य कुठे सापडते ? पण हे माहीत असूनही त्याचा शोध संपत नाही. या शोधाच्या एखाद्या टप्प्यावर संधिप्रकाशाची वर्षे येतात; *मृत्यूच्या सावल्याही पडतात. तेही मानवी अनुभवच. ते घेताना स्वत:च्या आवाक्यापलीकडील* एका अनाम परमशक्तीशीही संवाद सुरू होतो. म्हणूनच एखादे मर्ढेकर 'मी एक मुंगी, तू एक मुंगी' हे माणसांचे समूहगीत म्हणतानाच, 'माझ्या ज्ञानाचे कुंपण *स्मशानात'*

अशी कबुली देतात, "किती वितीचे जीवन माझे / तुलाच ठावे सदारंग तू" या आध्यात्मिक जाणिवेपाशी येऊन थबकतात. हा शांत संवादही सार्वकालीन असतो. त्याच्या मुळाशी असलेली आत्मजाणीव अनुभवणे, ते 'स्वसंवेद्य आत्मरूप' पाहणे, हेच लेखकाचे स्वप्न असते.

लेखकाला त्याच्या विषयासंबंधी-त्याच्या आशय-रूपासंबंधी एकच भान नेहमी ठेवावे लागते : तो त्या विषयाबरोबर सदैव असला पाहिजे; त्याने त्या विषयाचे तऱ्हेतऱ्हेने पोषण केले पाहिजे. ते झाले तरच प्रतिभेची किमया त्यातून रसप्रसन्न फुलोरे निर्माण करते. ते फुलोरे सुंदर विषयातून फुलतात, तसे कुरूप विषयातूनही. येथे त्याज्य, निषेधार्ह असे काही नाही. सांगणे महत्त्वाचे आणि त्या सांगण्यात प्रस्तुतता असणे, संयतपणा असणे हे महत्त्वाचे. हे कलात्मक संतुलन. भय, कुरुपता, बीभत्सता, अश्लीलता, क्रौर्य, हिंसा इत्यादी भावनाविकारांचा आणि त्यातून येणाऱ्या आक्षेपांचा विचार या पद्धतीने केला, की हे सगळे अखेर वाङ्मयीन दृष्ट्या सुंदर कसे होते, याचा प्रत्यय अनेक श्रेष्ठ साहित्यकृतींतून येतो.

लेखकाला जे आतून स्फुरलेले असते, आणि म्हणून आविष्कारयोग्य वाटते ते वाचकाच्या सांकेतिक अभिरुचीला कितीही न रुचणारे असले तरी लेखक ते लिहितोच. आपला तो अधिकार बजावतोच. ते लिहू की नको, असा प्रश्न त्याला पडत नाही. तो वाचकाच्या संभाव्य नापसंतीची, समीक्षकाच्या आक्षेपांची, धार्मिक, सामाजिक व सांस्कृतिक परंपरांच्या दडपणाची आणि शासनाच्या किंवा इतर काही स्वघोषित अधिकारपदे भूषविणाऱ्या प्रतिगामी—आणि पुरोगामीही—विचारसरणीच्या सघटनांची कदर न करता लिहितो. जणू स्वत:ला स्वत:चे देणे देण्याइतके हे प्रकटीकरण त्याला महत्त्वाचे वाटते. हे प्रत्येक लेखकाला जमतेच असे नाही. त्या लेखकांना अभिप्रेत असो वा नसो, ही विविध प्रकारची दडपणे त्यांच्या निर्मितीशक्तीवर—कदाचित त्या लेखकांच्याही नकळत—नियंत्रण आणत असतात. त्यामुळे जे सुचलेले असते ते मुक्तपणे लिहावे असे वाटत नाही. हे लिहिलेलेच पाहिजे का, असा प्रश्न पडतो. काही वेळा ते नियंत्रण इतके जबरदस्त असते, की मनातील बीजे बाहेर न फुटता आतल्या आतच घुसमटतात किंवा मरून जातात. पण श्रेष्ठ लेखकाबाबत असे घडत नाही. तो ही सर्व दडपणे झुगारून लिहितो. यालाच लेखकाने उपभोगलेले पहिले आविष्कारस्वातंत्र्य असे म्हणता येईल. ते त्याच्यापासून कोणीही हिरावून घेऊ शकत नाही. वादंग निर्माण होते, सेन्सॉरच्या कात्रीची भाषा व कृती होते ती कोणत्याही माध्यमातील प्रकाशनाच्या स्वातंत्र्याबद्दल. प्रथम स्वायत्त, (चांगल्या अर्थाने) अनिर्बंध लेखन स्वत:पुरते केल्यानंतर मग या आनुषंगिक प्रकाशनस्वातंत्र्याची गळचेपी झाली, तर वाचकाशी स्वभावत:च अपेक्षा असलेला हृदयसंवाद खंडित झाल्याची लेखकाला चिंता वाटते. पण अंतिम अर्थाने त्याला संवादातील या विक्षेपाची फारशी पर्वा नसते. या वेळी राजकीय-सामाजिक

शक्तीचा उन्मत्तपणे वापर करणारी माणसे मनस्ताप देतात; वेळेचे, शक्तीचे खच्चीकरणही करतात; पण ते तात्पुरतेच. मर्ढेकरांच्या 'पिंपात मेले' किंवा 'हाडांचे सापळे हासती' यासारख्या कवितांवर विंदा करंदीकरांनी 'वक्रतुंड महाकाय' ही कविता लिहिलीच ना ? 'घाशीराम कोतवाल' या नाटकांवर तेंडुलकर यांचे 'सखाराम बाईंडर' आलेच ना ? ती सत्य सांगण्याची नशाच असते. काम्यूने म्हटले आहे, "Liberty is the right not to lie." लेखक सत्य सांगण्याचा अधिकार जितका जतन करतो तितके त्या अधिकाराचे समाजात अधिकाधिक दान होत असते. स्वत:ला प्रतीत झालेले सत्य सांगताना कोणताही सत्ताधारी, कोणत्याही धर्माचा हृदयसम्राट, कोणतेही शासन वा स्वत:ला शासन मानणारा पक्ष हा लेखकाचा मालक होऊ शकत नाही. हे सगळे लेखकाच्या प्रतिभेच्या मालकीचे असते. कृपा असलीच तर ती त्या शक्तीची, अन्य कोणत्याही शक्तीची नाही. सानेगुरुजींच्या कवितेतील एका शब्दांत बदल करून म्हणायचे तर, लेखकाचे एकच सांगणे असते : "खरा तो एकची धर्म / जगाला सत्य अर्पावे ।।" आणि हा अर्पणाचा भाव सार्वकालीन असतो. शासने येवोत आणि जावोत, साहित्याचा मुक्त प्रवाह वाहतच राहतो.

अशी ही सर्जनाची वाट. ती चालणाऱ्या लेखकाला पाहणाऱ्या, वाचणाऱ्या वाचकांचे दोनतीन प्रश्न असतात. त्यातील एक साधा प्रश्न हा की लेखक कसे लिहितो ? यासंबंधी वाचकांच्या काही रोमँटिक कल्पना असतात. म्हणजे प्रात:काळ, निसर्गरम्य वातावरण वगैरे. या बाह्य गोष्टी झाल्या. निर्मितीच्या क्षणी, कोरा कागद समोर असताना, लेखकाच्या मनावर प्रचंड ओझे असते. ते पेलणे सोपे वाटू लागते ते एका विशिष्ट टप्प्यापाशी पोचल्यानंतर. पण तिथे पोचणे न पोचणे हे लेखकाच्या संपूर्णपणे ताब्यात नसते. त्यात थोडा दैवाचा, योगायोगाचा भागही असतो. पण या कल्लोळातून जाताना एखादा क्षण—नव्या उन्मेषांनी थरारणारा क्षण—पुढे ठाकतो. काहीशा अनपेक्षितपणेच. एखाद्या बंदिशीत, ठराविक आलापीनंतर षड्ज लागावा किंवा 'विस्तीर्ण पोकळीचा गंधार सापडावा' तसा. त्या क्षणी लेखकाची अनंत स्मरणे जागी होतात आणि संवादशक्ती तीव्र होते.

हा लेखकाचा वाचकाशी सुरू झालेला संवाद. शब्दांनील संवाद. त्या क्षणी लेखकाचे विलगपण संपते; संवादाच्या सुंदर जाणिवेतून जन्मलेला कलात्मक आनंद लेखक अनुभवतो. तो कालिदास-शेक्सपिअर यांनी, ज्ञानेश्वर-तुकारामांनी, मर्ढेकर-सुर्वे-डहाक्यांनी, बालकवी-महानोरांनी, पेंडसे-श्याम मनोहरांनी, भाऊ पाध्ये - ढसाळांनी, माडगूळकर- यादवांनी, गाडगीळ-जी. ए. -सारंगांनी, गडकरी-कानेटकरांनी, तेंडुलकर-राजीव नाईक यांनी, इंदिरा, नीरजा, प्रज्ञा लोखंडे यांनी, विभावरी-मेघना पेठे यांनी- या दोन किंवा त्याहीपलीकडच्या टोकांतील सर्वच कलावंतांनी अनुभवला. यात वेगवेगळे काळ, वेगवेगळी स्थळे, वेगवेगळे समाज, वेगवेगळ्या प्रवृत्ती, वेगवेगळ्या शैली

आणि वेगवेगळ्या विचारसरणी आहेत हे खरेच. पण तो आनंद एकच आणि सार्वकालीन आहे.

या लेखकाला वाचकाचा प्रतिसाद मनापासून हवा असतो. हेच वाचकाच्या 'लेखक का लिहितो ?' या दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर आहे. लेखक सर्जक खराच; पण वाचक या सहसर्जकाखेरीज त्या सर्जनाला पूर्णत्व येत नाही. वाचकालाही या सहभागात आनंद असतो. लेखकाचा पहिला आनंद सर्जन हा आणि दुसरा आनंद सहसर्जनाला चालना देणे हाही. प्रख्यात समीक्षक Hans Robert Jauss याने म्हटल्याप्रमाणे वाचकाचे एक 'अपेक्षा-क्षितिज' (Horizon of expectations) असते. त्या अपेक्षा पूर्ण व्हाव्यात असे त्याला मनापासून वाटते. पण त्या पूर्ण झाल्या नाहीत तरी तो फार नाराज होत नाही. अनपेक्षित असे काही स्वीकारणे, ते आश्चर्य अनुभवणे, त्यासंबंधी पुढे-मागे जात चिंतन करणे व भाकितेही करणे-आणि या अर्थाने लेखकाच्या सर्जनात सहभागी होणे हे वाचकाने लेखकाला रसिक वृत्तीने दिलेले एक सहकार्य असते. या प्रतिसादाचा एक सिद्धांतही नव्या समीक्षेत मांडलेला आहे. लेखक आहे, म्हणूनच वाचकही आहे. त्या लेखकाला कसे नष्ट करणार ? 'The author is dead हे रोलाँ बार्त्‌सचे प्रख्यात घोषवाक्य कसे मान्य करणार ? लेखकाला मृत्यू तर नाहीच, उलट त्याच्या जन्माला 'चौऱ्यांशी लक्ष फेरे' आहेत. वाचकाशी बोलून लेखक एकप्रकारे भारमुक्त होतो. त्याच्या अवघ्या अस्तित्वाला एक सुंदर हलकेपण प्राप्त होते.

वाचकाचा आणखी एक प्रश्न असतो : लेखक जे लिहितो ते खरे, म्हणजे प्रत्यक्षात घडलेले असते का ? साहित्यातील वास्तवतावादाशी अगदी प्राथमिक पातळीवर सबंधित असलेला असा हा प्रश्न आहे. या प्रश्नाचे साररूप उत्तर असे, की लेखक दोन प्रकारच्या वास्तवात राहतो. त्यातील एक बाह्य वास्तव, पण आणखी एक-लेखकाला कदाचित अधिक महत्त्वाचे वाटणारे-आंतरिक वास्तव असते. ते त्याला 'मी कोण आहे ?' या प्रश्नाचे उत्तर देते; आणि 'मी आहे' हा आत्मविश्वासही देते. त्या आत्मविश्वासाच्या बळावर तो कधीकधी वास्तवापलिकडच्या आणखी एका वास्तवाकडे म्हणजे अतिवास्तवाकडेही जातो. पण त्याचा आतड्याचा संबंध आंतरिक व बाह्य या दोन वास्तवांशीच असतो. आंतरिक वास्तव हे अबोलपणे त्याच्यात वास्तव्य करून असते; बाह्य वास्तव मात्र त्याला वेगवेगळ्या प्रकारे प्रकटपणे गुंतवत असते. कारण त्यात वेगवेगळ्या प्रकारचे सामाजिक-राजकीय-सांस्कृतिक ताण असतात; त्या ताणांतून काही पेचप्रसंगही उद्‌भवतात. त्या वेळी लेखकाला प्रत्यक्षाप्रत्यक्ष अशी काही भूमिका घ्यावीच लागते. त्याची स्तब्धता हीही त्याची एक भूमिका असू शकते. (बोरीस पास्तरनाक हे त्या भूमिकेचे एक उत्तम उदाहरण.) भारतात १९७५ साली पुकारलेली आणीबाणी हा एक राजकीय पेचप्रसंग होता; दलितांवर व स्त्रियांवर होणारे अत्याचार हे सामाजिक पेचप्रसंग तर वारंवार उद्‌भवतात; १९९८ साली मुंबईला झालेल्या

साहित्य-संमेलनाच्या संदर्भात शिवसेनाप्रमुखांनी काढलेले अवघ्या कलावंतविश्वाचीच मानहानी करणारे उद्गार हा एक मूलभूत सांस्कृतिक पेचप्रसंग होता. त्या वेळी झालेला लेखकांचा उद्रेक अजूनही आठवतो. अशा वेळी संघटित व्हावेच लागते. चळवळ उभारावीच लागते. या चळवळी एकंदर समाजाला सतर्क ठेवतात. हा भोवतालाला लेखकाने दिलेला प्रतिसाद आहे; त्याची सार्वकालीन प्रेरणा लेखकाच्या प्रतिष्ठेची व स्वातंत्र्याची जपणूक आणि एकंदर मानवी मूल्यांची जपणूक हीच आहे. या सार्वकालीन प्रेरणेचा उगम वास्तवाच्या परिपूर्ण भानातच असतो.

ही आपल्या मानव असण्याची आणि म्हणून एकंदर मानवजातीच्या नियतीत आपण सहभागी असण्याची व्यापक पातळीवरील जाणीव आहे. एखाद्या पेचप्रसंगाच्या संदर्भात संबंधितांवर दोषारोप करणे किंवा त्यांचा निषेध करणे, (किंवा त्यांचे समर्थनही करणे.) हे तरी का करावेसे वाटते ? ही सहभागाची जाणीव असते म्हणूनच ना ? तिच्यामुळे प्रश्न कायमचे सुटतातच असे नाही, पण एकंदर समाज निश्चितपणेच बदलतो. त्याची एकूण संवेदना बदलते, दृष्टिकोनही बदलतो

हे झाले संवेदनायुक्त समाजाविषयी. पण आणखी एक वेगवेगळ्या कारणांमुळे ज्याची संवेदना विच्छिन्न झालेली आहे असा एक समाजही असतो. लेखकाने त्याच्या विच्छिन्न झालेल्या स्वप्नांना जागवले पाहिजे. त्याच्याशी संवाद साधला पाहिजे. कुसुमाग्रजांच्या एका कवितेत महात्मा फुले, लोकमान्य टिळक, शिवाजी, महात्मा गांधी व डॉ. आंबेडकर या पुतळ्यांचा एका नि:स्तब्ध रात्री परस्परांशी झालेला अश्या समाजविषयीचा संवाद येथे आठवतो. त्यांनी असे उपरोधानेच, पण हताशपणे का बोलावे ? त्यांच्या स्वप्नांना असे विशिष्ट यंत्रणेत किंवा जाति-व्यवस्थेत, विचारसरणीत का घुसमटावे लागावे ? या पुतळे झालेल्या महामानवांच्या स्वप्नांना पुन्हा जागवणे, पुन्हा एकदा त्यांच्यात चैतन्य ओतणे, हेही लेखकाचे उद्दिष्ट असते. कुसुमाग्रजांची ती कविता बाह्यत: हास्यकारक असली तरी तिच्या अंतरंगात एक शोकात्मिका लपलेली आहे. हास्यरसातील करुणरस शोधणे, जीवनाच्या तार्किकतेत दडून बसलेली असंबद्धता शोधणे हेही लेखकाला आवाहक वाटते. ही दोन जीवनरूपे बाह्यत: वाटतात तितकी एकमेकांपासून विलग किंवा परस्परविसंगत नाहीत. जीवन हे पूर्णत: सुखात्म नाही आणि पूर्णत: शोकात्मही नाही. ते संमिश्र आहे आणि म्हणून तर लेखकाला शतकानुशतके खिळवून ठेवणारे आहे.

लेखकाशी संबंधित असलेल्या वाचक या घटकाप्रमाणेच समीक्षक या दुसऱ्या घटकाचाही येथे विचार केला पाहिजे. समीक्षक निर्मिती ही प्रधान गोष्ट मानून तिचे काही नियम, काही रूपे यांचा शोध घेतो. हा शोध जितका लेखक-वाचक यांच्यासाठी असतो, तितकाच स्वत: समीक्षकासाठीही असतो. तो आस्वादक, चिंतनगर्भ वृत्तीने घेतला जातो. साहित्याचे प्रयोजन, त्याचे रूप-तंत्र वा भाषा, सुंदर-विरूप घाट,

भव्योदात्त, शाश्वत, शोकात्म व सुखात्म अशी रूपे, काव्यरूपे व कथनरूपे, एखाद्या साहित्यकृतीचे व तिच्या निर्मात्याचे परंपरेतील स्थान, साहित्याचे काल-प्रतिबिंब उमटवण्याचे भविष्यवेध घेण्याचे सामर्थ्य-आणि असे आणखीही काही समीक्षकाचे चिंतनविषय असतात. त्यामागे तात्त्विक बैठक असते, आणि तौलनिक दृष्टीही असते. त्यांच्या अनुषंगाने साहित्यकृतीच्या अर्थाचा निर्णय करणे व मूल्यमापन करणे हे समीक्षकाचे कार्य असते. हे कार्य करत असताना समीक्षकाने लेखकाला सहृदयतेने समजून घेतले पाहिजे; उलटपक्षी लेखकानेही समीक्षकाची सोबत नाकारता कामा नये. तिच्यावर लेखक सर्वस्वी अवलंबून असतो, असे नाही. अखेर त्याची वाट त्यालाच, एकट्याने चालायची असते. पण आपल्या आसपास वाचक व समीक्षक आहेत ही भावना लेखकाची वाटचाल अधिक अर्थपूर्ण करू शकते.

लेखकाला आस्वाद हवाच असतो. तात्त्विक समीक्षेबद्दल व तिच्यातील संकल्पनांच्या गुंत्यांबद्दल मात्र त्याच्या मनात नाराजी असते. समीक्षक काही वेळा आपली अधिकार-कक्षा ओलांडतो, असेही सर्जनशील लेखकाला अधूनमधून वाटते. समीक्षकांच्या वेगवेगळ्या भूमिकांचे, आग्रहांचे लेखकावर दडपण येते. त्यामुळे लेखक व समीक्षक यांच्यातील दुजाभाव वाढतो. ही लेखकाच्या निर्मितीच्या आनंदावर आलेली अभ्रे असतात. पण तो आनंद अबाधित असतो. म्हणून पुन्हा तो आनंद घेणाऱ्या लेखकाकडेच वळू.

या आनंदाच्या केंद्रस्थानी आपण या प्रवाही, सुखदु:खमिश्रित, चैतन्यशील मानवी जीवनाला एक शाश्वतता देत आहोत, ही भावना असते. ही जाणीव लेखकाच्या मनात, क्वचित का होईना, वीज चमकावी तशी चमकते. मग त्याचे वाङ्मयीन वर्तन अधिकच जबाबदार होते. ही स्फुरणे शाश्वत असतात, आणि ती अक्षरांतील, शब्दांतील तर खऱ्याच, पण काळांतील फटीही भरून काढतात. त्यामुळे काळाला एक सलग, अप्रतिहत प्रवाह प्राप्त होतो; उत्तरकालीन मानवी जीवनाच्या अनंत शक्यता या प्रवाहात प्रतिबिंबित झालेल्या असतात. या अर्थाने लेखक काळावर आपली लेणी खोदतो. आणि आपल्या अनुयायांसाठीही तसा अवसर ठेवतो. या अर्थानेही लेखकाला मृत्यू नसतो, आणि त्याची कला ही नेहमी नियतीशी विरोधाचा डाव मांडलेली एक शक्ती ठरते. अनुषंगाने ती शक्ती सामाजिक परिवर्तनांनाही प्रेरणा देते.

लेखक समाज बदलण्यासाठी लिहीत नाही, पण त्या समाजात भान निर्माण करण्यासाठी मात्र लिहितो. केशवसुतांनी "पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करी विधीने दिली असे, / टेकुनि ती जनताशीर्षावरि जग उलथुनियां देऊ कसे" असे म्हटले; मर्ढेकरांनी 'आण लोकांची अभागी' घेतली; अनिलांनी 'सारेच दीप कसे मंदावले आता' अशी खंत व्यक्त केली. त्यामुळे दिवे उजळले का ? एकाएकी प्रकाश पडला का ? अभागी लोकांचे दु:ख संपले का ? जग उलथून जाऊन समतेचे, 'शांतीचे

साम्राज्य' आले का ? - असे एकाएकी काहीच घडत नाही. पण ते घडावे अशी अपेक्षा मात्र समाजात निर्माण होते. हेच लेखकाचे साफल्य.

पुष्कळ वेळा अपेक्षाभंगाचे वैफल्यही असते आणि त्याचा लेखकाच्या मनावर फार मोठा ताण असतो. लेखनाच्या ऐन बहरातही तो ताण संपत नाही. म्हणून तर निर्मितीच्या झाडाला पुन्हापुन्हा बहर येत राहतो. "झाड माझे लाखमोली / लाल ज्याला फक्त पाने / आणि माझी बंडखोरी / घोषितो मी गात गाणे" हेच खरे. त्या झाडावर 'लांच्छनाच्या गंधरेखा' असतात, आणि शाश्वताला दिलेल्या आणभाकाही असतात. त्या आणभाका कधी संपत नाहीत, उलट त्यांच्यात भर पडत जाते. म्हणूनच लेखकाला वाङ्मयाच्या प्रवासाला निघताना आपली मूळ 'आण' कोणती होती, तिच्या कक्षा कशा विस्तारत गेल्या, कोणत्या आणभाका आपण पूर्वी केल्या आणि कोणत्या अपूर्ण राहिल्या, हे प्रश्न मनात ठेवून स्वत:च्या निर्मितीकडे मागे वळून पाहावेसे वाटते; तिच्याबद्दल चिंतन करावेसे वाटते. या चिंतनात त्याचे स्वत:चे मूल्यमापनही गर्भित असते.

आधी म्हटल्याप्रमाणे साहित्याच्या भाषेत दैनंदिन भाषेचे व बोलीचेही रंग मिसळलेले असतात. पण त्या भाषेलाच साहित्यात एक काव्यात्म मूल्य प्राप्त होते. हे मूल्य साहित्याच्या-विशेषत: कवितेच्या-भाषेला अनोखे सौदर्य देते. कवी शब्दांना ही नवी ओळख तर देतोच, पण नवे शब्दही निर्माण करतो. 'झपूर्झा' सारखा शब्द घ्या. 'जुने शब्द सुने होऊन वाजतात कसे बद्द निसूर', हेही खरे, आणि त्या जुन्या शब्दांचे कवीकडून होणारे नूतनीकरणही खरे. अखेर शब्द म्हणजे तरी काय ? ते कवीच्या मनातल्या दोन स्तब्धतांमधले पूल असतात. ते पूल ओलांडणारा, ते ओलांडणे जगणारा कवी म्हणतो, "जगाच्या आरंभी शब्द होता, आणि जगाच्या अंतीही शब्दच असेल." विंदा करंदीकरांच्या कवितेमधील ओळीतील एका शब्दात बदल करून सांगायचे झाले तर, "विलयाची जर वेळच आली, शब्द राहू दे पुन्हा गरोदर !" शब्दांप्रमाणेच साहित्याची रूपेही मुक्त असतात आणि तीही शब्दांप्रमाणेच दोन रिकाम्या जागांमधील एखाद्या प्रकाशबिंदूसारखी लेखकाच्या दृष्टीसमोर चमकतात. आखणी असतेच; पण आखणीआधी हा चमकता प्रत्यय असतो.

सार्वकालीन लेखक वाचकालाही हा प्रत्यय देतो. म्हणून तर परस्परसंवाद सिद्ध होतो. कधी तो संवाद सहज नसतो; कधी तो विरोध-न्यासामुळे मिळालेल्या एखाद्या धक्क्यासारखा असतो. त्या वेळी वाचकाचा प्रश्न असतो : 'मी एक मुंगी' असे कोणता कवी म्हणेल ? 'मी पांडुरंग सांगवीकर आज उदाहरणार्थ पंचवीस वर्षाचा आहे. खरं तर तुम्हाला वगैरे सांगण्यासारखं एवढंच' असे कोणता नायक म्हणेल ? येथे वाचकाची त्या संकल्पनांशी संबंधित असलेली पूर्वस्मरणे जागृत होऊन धक्का बसतो; पण तो धक्काही कालांतराने संवादाची अद्भूत किमया घडवून आणतो. ती घडेल या विश्वासानेच

वाचकालाही ते पूल ओलांडण्याची प्रेरणा देणारे, रिकाम्या फटीतील प्रकाशबिंदूंकडे खुणावणारे साहित्य हे कोणत्याही काळातील वाचकाचे साहित्य-म्हणून अक्षर साहित्य. अशा साहित्यात वाचकाच्या मनातील गोठलेला समुद्र प्रवाहित करण्याची शक्ती असते. त्या समुद्रात उचंबळणाऱ्या लाटालहरी कधीकधी लेखकानेही पाहिलेल्या नसतात. म्हणूनच तर लेखकाचे आविष्कारस्वातंत्र्य जितके महत्त्वाचे तितकेच वाचकाचे आस्वादस्वातंत्र्यही महत्त्वाचे. वाचकाला अशा अंतर्बाह्य प्रेरणा देणाऱ्या साहित्यकृती या एखाद्या दीपस्तंभासारख्या असतात. शाश्वताच्या, समुद्रावर, वेगवेगळ्या काळात उमटलेल्या लाटालहरीतून उचंबळून व विरून गेलेला, पुन्हा उचंबळणारा आणि आपल्या शाश्वताच्या किनाऱ्यावर येऊन विसावलेला लेखकाच्या प्रतिभेचा तो एक उत्कट उद्रेक असतो. कितीही उत्पात घडले तरी हा उद्रेक शाश्वत असतो. म्हणूनच सार्वकालीन लेखकाने आपल्या निर्मितीला दिलेले प्रतीकात्मक शीर्षक असते : "मागील पानावरून पुढे चालू..."

## विशिष्टकालीन लेखक

सार्वकालीन साहित्याबद्दलचा-लेखकाबद्दलचा-मांडलेला दृष्टीकोन हा आदर्शवादी दृष्टिकोन आहे. पण तोच साहित्याविषयीचा एकमेव दृष्टिकोन मात्र नाही गेल्या पंचवीस तीस वर्षात आणि त्यांच्यापूर्वीच्याही दशकात अधूनमधून या दृष्टिकोनाला छेद मिळाला, विरोध झाला. त्या विरोधाला वेगवेगळे तत्कालीन संदर्भ होते. त्यातच आणखी काही नव्या संदर्भाची भर पडून आता लेखकाच्या, म्हणजे आजच्या विशिष्टकालीन लेखकाच्या व साहित्याच्या सद्यकालीन स्थितीबद्दल नव्याने विचार होऊ लागला आहे. याचा अर्थ साहित्याच्या व लेखकाच्या मूलभूत प्रवृत्तीच बदलल्या, नष्ट झाल्या, त्यांची जागा सर्वस्वी नव्या प्रवृत्तीनी घेतली असा मुळीच नाही. तसे कधीच होत नाही. पण आधी उल्लेखिलेल्या काही नव्या संदर्भामुळे काही नवे प्रवाह मात्र आले. त्यांचा उगम प्रस्थापितता-विरोधी भूमिकेत आहे असे सर्वसाधारणपणे म्हणता येईल. त्याच भूमिकेबद्दल मी थोडे सविस्तरपणे बोलणार आहे. माझ्या भाषणाचा हा उत्तरार्ध त्याच्या पूर्वार्धाशी बव्हंशी संवादी आहे, कारण सार्वकालीन लेखकाच्या प्रवृत्तिविशेषाचा मूळ गाभा बदललेला नाही, आणि म्हणून सर्जनाच्या प्रवासाची वाटही बदललेली नाही. पण या उत्तरार्धात तिने काही नवी वळणे मात्र घेतली. त्यापैकी काही निवडक वळणांचा येथे विचार करायचा आहे. नव्या शतकाच्या आरंभी ती भूमिका विचारात घेणे प्रस्तुत ठरेल असे वाटते.

गेल्या पंचवीस-तीस वर्षातील वाङ्मयीन व अवाङ्मयीन अशा दोन्ही स्वरूपांच्या विविध घटनांनी जग ढवळून निघाले. या उलथापालथीचा परिणाम साहित्यावरही झाला. लेखकाच्या मनात अस्थिरतेची, बेचैनीची भावना निर्माण झाली. त्यामुळे काही

लेखकांची एकंदर मानसिकताच बदलली. संताप व विद्रोह ही त्या मानसिकतेची प्रमुख केंद्रे बनली. 'जुने जाऊं द्या मरणालागुनि' हा सूर आला. हे जुने म्हणजे केवळ पारंपरिक नव्हे, तर जे प्रस्थापित होते तेही. मराठीतील अनियतकालिकांची चळवळ या विद्रोहातूनच जन्माला आली. तोवरच्या वाङ्मयीन नियतकालिकांत हा विद्रोहाचा सूर अधूनमधून उमटत होताच. पण आता तोच अग्रभागी आला. या अनियतकालिकांतील एकंदर लेखनात—विशेषत: कवितेत—एक हादऱ्याचे, धक्क्याचे काव्यशास्त्र अनुस्यूत आहे. या कवितेत नवे, धीट, रूपसंलग्न व भाषिक प्रयोग झाले. आणखीही नवे काही घडले. ते सगळेच स्वीकारणीय, स्वागतार्ह होते असे नाही. या अनियतकालिकांपैकी काहीनी केलेली 'सत्यकथे'ची होळी ही एक प्रतीकात्मक कृती होती. तिच्यातील आततायीपणा वगळून, तिच्यातील नकारवादाची व विनाशवादी प्रवृत्तीची चिकित्सा केली पाहिजे. खरे म्हणजे दरम्यान पुरेसा अवधी गेल्यामुळे ऐतिहासिक तारतम्याने या एकंदर चळवळीचेच विश्लेषण केले पाहिजे. त्या विश्लेषणातून प्रस्थापिततेबद्दलची त्यांची सकंल्पना कोणती होती, ती एक होती की अनेकविध होती, त्या प्रस्थापिततेला विरोध कोणत्या स्थानिक व जागतिक, समाजिक कारणांतून झाला, तो कोणी केला, त्या विरोधकांचे पुढे काय झाले—असे पुष्कळ महत्त्वाचे विचार हाती लागतील. एका अनियतकालिकात 'हल्ली लेखकाचा लेखकराव होतो तो का ?' हा लेख प्रसिद्ध झाला तो फार गाजला. त्या अनुषंगाने एक प्रश्न मनात येतो : "लेखक वेगळे व लेखकराव वेगळे असे काही असते का ? तसे मानणाऱ्या लेखकांचेही कालांतराने लेखकराव होतात का ?" त्याच अनुषंगाने सार्वकालीन व विशिष्टकालीन, प्रस्थापित व अप्रस्थापित, पारंपरिक व प्रयोगशील अशा सर्वच प्रकारच्या लेखकात कोणत्या समान प्रवृत्ती असतात हे शोधता येईल; या शोधात त्या समान प्रवृत्तींचा परास्परानुप्रवेश होतोच; आणि म्हणून, वर म्हटल्याप्रमाणे, विशिष्टकालीन लेखक हा सार्वकालीन लेखकाला संलग्न असतो.

दलित साहित्याचे काही प्राथमिक आविष्कार अनियतकालिकांच्या चळवळीत आढळतात. दलित साहित्यात व्यक्त झालेल्या संताप व विद्रोह या भावनांना केवळ वाङ्मयीन नव्हे, तर त्यांच्याहून कितीतरी पटीने अधिक महत्त्वाची अशी वैयक्तिक व समाजशास्त्रीय कारणेही होती. दलित साहित्यानेही वास्तवतावादाचे एक प्रखर रूप दाखवले. साहित्य फक्त नागर मध्यमवर्गीयांचे, सवर्णाचे नाही, ते शोषित-वंचितांचेही आहे-म्हणून सर्वांचे आहे हा मूलभूत विचार दलित साहित्याने रुजवला.

साहित्याच्या क्षेत्रात मानवी अनुभवांचा, त्यातील सुखदु:खांचा, संघर्षाचा, अन्यायांचा, मानहानींचा जितका व्यापक पैसा सामावला जाईल तितका तो हवाच आहे. त्यातून नवी जीवन-सामग्री पुढे येते, आणि तिचे भान नव्या वाङ्मयीन जाणिवा निर्माण करते. म्हणून या नव्या, काहीशा आक्रमक विद्रोही साहित्याचे स्वागत केले

पाहिजे. पण त्या साहित्याची अतिरिक्त प्रशंसा करण्याचेही कारण नाही. अखेर तो समग्र साहित्याचाच एक भाग आहे. म्हणून समग्र साहित्याबाबतचे वेगवेगळ्या प्रकारचे असमाधान व तक्रारी दलित साहित्याबाबतही असू शकतात. त्यातील उणिवा आवर्त निर्माण करू शकतात. हे सगळे मोकळेपणाने, कोणतेही दडपण न बाळगता सांगितले पाहिजे. दलित साहित्याने आपल्या अभिरुचीचे वळण मूलभूतपणे बदलले का ? नसल्यास त्यातील काही दोष व उणिवाच या अपयशाला कारणीभूत आहेत का, हेही शांतपणे, विवेकाने तपासून पाहिले पाहिजे. असा खुला दृष्टीकोन दलित लेखकांनाही आवडेल, स्वागतार्ह वाटेल-निदान वाटावा. आज एकीकडे पारंपरिक अभिरुची व दुसरीकडे ही काहीशी अपराध-गंडातून वा दडपणातून आविष्कृत होत असलेली नवी अभिरुची यांचे चमत्कारिक मिश्रण झाले आहे. ते एकंदर साहित्याच्या विकासाला उपकारक ठरेल असे वाटत नाही. या दडपणामुळे वर उल्लेखिलेल्या विद्रोही साहित्याच्या मूल्यमापनातही एकांगीपणा येतो. त्या साहित्यातील नव्या वळणांचीही फारशी दखल घेतली जात नाही. एक प्रतिनिधिक उदाहरण द्यायचे झाल्यास ते नामदेव ढसाळ या समर्थ दलित कवीचे देता येईल : 'गोलापिठा'पासून आरंभ करून 'या सत्तेत जीव रमत नाही' या संग्रहापर्यंतचा या कवीचा आविष्कार कसा बदलत गेला ? काही समकालीन कवीच्या आविष्काराशी त्याचे नाते आहे का ? असे काही प्रश्न ढसाळांप्रमाणेच इतर अनेक दलित लेखकांबद्दलही उपस्थित करता येतील. दलित आत्मकथांच्या संदर्भात 'आमचा बाप आन् आम्ही' या आत्मकथानाचे रूप कसे वेगळे आहे, आज प्रस्थापित दलितांची वाङ्मयीन भूमिका कोणती आहे, कालचे बंडखोरच आज प्रस्थापित झाले आहेत का, त्यांना प्रस्थापित नसलेल्या दलित लेखकांबद्दल कोणत्या वाङ्मयीन व समाजशास्त्रीय भूमिकांतून विचार करावासा वाटतो, दलित साहित्य प्रामुख्याने कविता व आत्मकथन या दोन रूपांतच का अडकवल्यासारखे झाले, या साहित्यातील स्त्रीचित्रण पुरेसे समग्र आहे का, - असे व यासारखे कित्येक प्रश्न आहेत. त्यांची उत्तरे समकालीन लेखकांनी, समीक्षकांनी व वाचकांनी शोधली पाहिजेत. या अप्रस्थापित साहित्याचा खरा न्याय या प्रकारच्या शोधातून मिळेल.

गेल्या पंचवीस वर्षातील स्त्रीवादी साहित्य हाही प्रस्थापितताविरोधी दृष्टिकोनाचाच एक भाग आहे. त्यामागे स्त्रीमुक्तीची भक्कम चळवळ आहे. नव्या जाणिवेतून लिहिल्या गेलेल्या या स्त्री-साहित्याने व स्त्रीवादी साहित्याने एका नव्या जगाचे दर्शन घडवले. पुरुषी अहंकाराचा, त्यातून होणाऱ्या स्त्रीच्या शोषणाचा सर्वतोपरी निषेध केला. आधी वेगळ्या संदर्भात उल्लेखिलेल्या वैराण, मुक्त प्रदेशाचा शोध आजच्या काही लेखिका घेत आहेत. या शतकात तो शोध निश्चितच अधिकाधिक जिद्दीने घेतला जाईल व स्त्री-साहित्याची शाखा डवरून जाईल. पुरुषरूप प्रस्थापिततेला विरोध करण्याची मग आवश्यकताच उरणार नाही अशी आपण आशा करूया.

प्रस्थापितताविरोधाच्या संस्कृतीचे आणखी एक रूप प्रायोगिक नाटके व तत्संबंधित रंगभूमी यांच्यात दिसते. काही प्रायोगिक नाटकांतील संताप व विद्रोह, आपण ज्या कालखंडातील साहित्याचा व चळवळीचा विचार करत आहोत, त्या कालखंडातील एकंदर साहित्यातही दिसतात. तो आजच्या मानसिकतेचाच एक भाग आहे. या मानसिकतेचा केंद्रस्वर जॉन ऑस्बोर्नच्या एका गाजलेल्या नाटकाचे शीर्षक वापरून बोलायचे झाल्यास, look back in anger हा आहे. ते संतापाने मागे वळून पाहणे खरे होते. कारण त्याला सामाजिक व वाङ्मयीन भूतकाळ जबाबदार होता. पण म्हणून पुढे पाहतानाही मनात प्रक्षोभच असावा का ? look forward in anger असेही म्हणायचे का ? प्रक्षोभ (anger) ही अशी एक सार्वकालीन वाङ्मयीन प्रेरणा नसते. त्याचे उद्रेक झाले पाहिजेत हे खरे, पण ते शमले पाहिजेत हेही तितकेच खरे.

या व वर उलेखिलेल्या इतर क्षेत्रांतील साहित्याकडून एक प्रकारचे नकारवादी व विनाशवादी तत्त्वज्ञान स्वीकारले जाते आहे, अशी भीती वाटते. दुर्दैवाने ती भीतीही फार स्पष्टपणे बोलून दाखवली जात नाही. कारण साहित्याच्या क्षेत्राला आज एक प्रकारच्या सांस्कृतिक दहशतवादाची लागण झाली आहे. तिचा प्रतिवाद विरळपणेच होताना दिसतो. आपण जे साहित्य मानतो तेवढेच फक्त अस्तित्वात आहे असे गृहीत धरून उरलेल्या साहित्यावर एक मोठी नकाराची फुली मारली जाते. गंमत म्हणजे कधी या फुल्या एकमेकीवरही मारल्या जातात ! हे टाळता येणार नाही का ? नजिकच्या ज्येष्ठांबद्दल इतकी अनास्था का असावी ? हॅरोल्ड ब्लूम या समीक्षकाने तर याला 'प्रभावचिंता'च (anxiety of influence) म्हटले आहे-म्हणजे ज्येष्ठांचा आपल्यावर प्रभाव तर पडणार नाही ना, अशी चिंता-आणि म्हणून ज्येष्ठांशी संघर्ष. खरे तर चिंतामुक्त मनाने, सुसंस्कृतपणे, वादसंवादाच्या सुरात विवेचन व्हावे. त्या प्रकारचे विवेचन वाङ्मयाच्या प्रतिष्ठेला उठाव देणारे ठरेल.

साहित्यक्षेत्रात अलीकडे 'देशीवादा'बद्दलचा आग्रह प्रविष्ट झाला आहे. लेखकाची मुळे त्याच्या मातीत रुजलेली असतात, ही देशीवादाची सूत्ररूप भूमिका. ते एक सार्वत्रिक सत्य आहे, पण तो श्रेष्ठ साहित्याच्या मूल्यमापनाचा एकमेव निकष मात्र नाही. लेखकाचे त्यापलीकडे असलेले काही आस्थाविषयक असतात, आणि ते त्याला व्यापक पातळीवरील मानवी जीवनाचा शोध घेण्यास प्रेरक ठरतात. परिसरात राहूनही परिसराबाहेर पडता येते; आपल्या मातीची महती गातगातच विश्वात्मक प्रत्ययांचा ध्यासही उरी बाळगता येतो. तो ध्यास निर्मात्याला शोधक व तत्त्वचिंतक अशा दोन्ही भूमिकांकडे पायरीपायरीने घेऊन जातो. येथे लेखक पूर्ण, परिपक्व होतो. पण हा प्रतिवादही अनाग्रही वृत्तीने नेहमीच स्वीकारला जात नाही. त्यामुळे वाचकही भांबावतो. त्याच्या मनावर या मतमतांतरांचा दबाव येतो. त्याच्या मनातील श्रेष्ठ साहित्याबद्दलचे निकष डळमळू लागतात. त्यातून एकीकडे प्रतिकारकेंद्री साहित्य व दुसरीकडे दबावकेंद्री

वाचन अशी परिस्थिती निर्माण होते. ती साहित्यसमीक्षेच्या मोकळ्या विकासाला हितकारक नाही, एवढेच संक्षेपाने म्हणता येईल.

प्रस्थापितता- विरोधी संस्कृतीला असलेले हे वर उल्लेखिलेले संदर्भ मनात बाळगून, आणि अन्य काही तत्सम संदर्भाचे अध्याहृत भान ठेवून, आता पुन्हा आजच्या बेचैनीच्या मानसिकतेकडे येऊ. या मानसिकतेत, वर उल्लेखिलेला नकारवाद, विनाशवाद केंद्रस्थानी आहे. लेखकाच्या मृत्यूची घोषणा रोलॉ बार्तसने केली. त्यापूर्वीच नीत्शेने देवाच्या मृत्यूची घोषणा केली होती. आता साहित्याचाच मृत्यू घोषित केला जात आहे. सगळे मृत्यू किंवा अंत. इतिहासाचा अंत, विचारप्रणालीचा अंत - आणि साहित्याचाही अंत त्यामुळे प्रश्न असा पडतो, की मग जन्म कशाचा ? की हा साहित्यातील एक प्रलयकालच आहे ? काही विशिष्ट विचारप्रणालीकडून आता साहित्य नावाची काही वस्तूच मानली जात नाही. साहित्य ही खरोखरीच अशी इतिहासजमा झालेली गोष्ट आहे का ? मला तर हा प्रश्नदेखील फार अस्वस्थ करतो— आणि माझी ही भावना आपणा सर्वांच्याच मनात असणार याची मला खात्री आहे. कारण साहित्य हे आपणा सर्वांचेच दुसरे जीवन आहे, दुसरे घर आहे. ते कोसळले तर आपण जायचे कुठे ? नवा कोणता निवारा ? नवा कोणता आधार ? पण हे साशंक प्रश्न कशाला ? आपल्याला असे पोरके करण्याचा कोणाला अधिकारच नाही !

या प्रकारच्या नकारवादी तत्त्वज्ञानाचा उगम आज (चांगल्या अर्थाने) पारंपारिक असलेल्या प्रस्थापित मूल्यांना दडपण्याच्या, त्यांचे उच्चाटन करण्याच्या प्रवृत्तीत व तिच्यातून निर्माण झालेल्या परिस्थितीत आहे. ज्यांचे उच्चाटन केले जात आहे, ती मूल्ये पुरस्कृत करणाऱ्या श्रेष्ठ लेखकांवरचा व अभिजात साहित्यकृतीवरचा विश्वासच उडत चालला आहे. त्यांचे संस्कार नकोत. कारण मागे उल्लेखिलेली प्रभावचिंता. सर्वत्र एक प्रकारची साशंकता. विचारसरणी अशी, की मूल्यांना महत्त्वच नाही. कारण सर्व मूल्ये ही फक्त कोणाची ना कोणाची तरी मते असतात. मग त्यांचे इतके प्रस्थ कशाला माजवायचे ? अशा या वैचारिक वातावरणात साहित्याच्या विकासाला व संवर्धनाला जीवनसत्त्वासारखी आवश्यक असणारी रसिकसापेक्ष सलगता, समीपता टिकणार कशी, असा आणखी एक प्रश्न निर्माण होतो. तोही मला अस्वस्थ करतो. हे विचार आपल्यापासून अजून खूप दूर आहेत, अगदी तुरळकपणेच ते आपल्या साहित्यसमीक्षेत मांडले जात आहेत, ही त्यातल्या त्यात दिलासा देणारी गोष्ट. पण या विचारांचा आपल्याकडेही अचानक स्फोट होणार नाही कशावरून ?

याचा अर्थ नवे दृष्टीकोन समजून घेऊ नयेत, स्वीकारू नयेत असा मुळीच नाही. त्यांतील काही विचार समीक्षेतही मांडले जात आहेत. त्यामुळे मराठी समीक्षेनेही नवी रूपे धारण केली आहेत. तरुण समीक्षकांचा एक लक्षणीय वर्ग मराठीत उदयाला आला आहे. तो साहित्याचा नव्या दृष्टिकोनांतून विचार करतो, नवे सिद्धांत मांडतो. हे

सगळे पटले न पटले, तरी ते समजून घेणे ही आपली वाङ्मयीन जबाबदारी आहे. येथे कोणतेही पूर्वग्रह कामाचे नाहीत. अस्तित्ववाद, घटितार्थशास्त्र, कथनमीमांसा, चिन्हमीमांसा, विरचनावाद, उत्तर-आधुनिकवाद, स्त्रीवाद यासारख्या साहित्य-समीक्षासंलग्न विचारसरणींशी आधी ओळख करून घेऊन मगच त्यांच्याबद्दल मतप्रदर्शन करणे योग्य; पण तसे घडताना दिसत नाही. त्यामुळे लेखक व समीक्षक यांच्यामधील पूर्वापारच्या द्वंद्वाला वेगळ्या पद्धतीने पुन्हा एकदा वाचा फुटली आहे. समीक्षा दुर्बोध आहे ही तक्रार पूर्वी होती, आजही आहे; आणि म्हणून 'आम्हांला समीक्षा नकोच !' अशी घोषणाही.

मार्क्सवादी, फ्रॉईडवादी, रूपवादी, घटितार्थशास्त्रवादी, विरचनावादी, स्त्रीवादी असे काही विशिष्ट समीक्षादृष्टिकोन योजून नवसमीक्षा लिहिली जात आहे. अशा या समीक्षकांनी साहित्याबद्दलची पूर्वकाळातील संकल्पना अंतर्बाह्य बदलून टाकली आहे. स्त्रीवाद्यांना ते साहित्य पुरुषप्रधान संस्कृतीचे साधन वाटले; मार्क्सवाद्यांना ते भांडवलशाही सांस्कृतिक वर्चस्वाचे छुपे साधन वाटले; नव-फ्रॉइडवाद्यांना ते आदिम प्रेरणा व नवे उद्रेक दडपणारे वाटले. त्यांची या ना त्या पद्धतीने नव्या डाव्या राजकीय व सामाजिक प्रणालीशी साहित्याशी सांगड घालण्याची दृष्टी आहे. साहित्य हे एकाधिकारशाहीचे प्रतीक, अभिजनवादी, दमनशील आणि म्हणून मानवी स्वातंत्र्याला विघातक या हर्बर्ट मार्क्यूज या जहाल राजकीय तत्त्ववेत्त्याच्या सिद्धांताला या नवसमीक्षकांनी या ना त्या प्रकारे मान्यता दिलेली दिसते. सारांश, समीक्षा एका टोकाकडून दुसऱ्या टोकाकडे चालली आहे. या प्रवासातही नकारवादच आहे. साहित्याच्या प्रस्थापित आकृतिबंधांना नकार, अर्थनिर्णयनाच्या प्रस्थापित पद्धतींनाही नकार आणि त्यांच्या जागी नवे आकृतिबंध व नव्या पद्धती आणण्याचा आग्रह. यातून उद्भवलेला हा वाङ्मयीन पेचप्रसंगाचा काळ आहे. मराठी समीक्षेतही त्याचे प्रतिध्वनी उमटू लागले आहे. जागतिकीकरणाच्या काळात हे अटळच आहे. विशिष्ट वारे विशिष्ट प्रदेशात, विशिष्ट अवकाशात आता वाहणार नाहीत. ते वारे सर्वदूर वाहणार : सातासमुद्रापलीकडून येथे येत राहणार. हे आदानप्रदान व्हावेच. त्याबद्दल काही वाद नाही. खरा प्रश्न ते वारे कोणती वाफ निर्माण करतात, त्या वाफेतून तयार झालेल्या किती ढगांतील किती सरी येथे बरसून येथील संदर्भाचे अंकुर जोपासतात, फुलवतात, हा आहे. नुसती 'अवडम्बरलीं ढगें किती तरि / रविकिरणांचा चूर होतसे' अशी परिस्थिती नको. हे नवे प्रवाह येथे निर्माण होणाऱ्या साहित्याबाबतही नवी मर्मदृष्टी कशी देत आहेत, याचा प्रत्यय पाहिजे. त्यांचे मराठी साहित्याच्या संदर्भातील ओढूनताणून केलेले नव्हे, तर स्वाभाविक उपयोजन पाहिजे. ते अजिबात होत नाही असे नव्हे; पण पुरेसे व ठसठशीतपणे होत नाही. त्यामुळे सर्जनशील साहित्यावरील समीक्षेचे वर्चस्व वाढत आहे की काय, अशी शंका येते.

हे सगळे पाश्चात्त्य देशात घडत आहे. पण येथेही ती लाट फुटायला फारसा

अवधी राहिला आहे असे वाटत नाही. समग्र साहित्याचा विचार ही आता तेथेच नव्हे तर येथेही एक कालबाह्य गोष्ट होऊ पाहत आहे. तो विचार मुळात विद्यार्थ्यांवरच ठसला नाही, तर उद्या त्यांच्यातून निर्माण होणाऱ्या वाचकांवर तरी कसा ठसेल ? साहित्याच्या अभ्यासाला आवश्यक असलेले परिप्रेक्ष्य या भविष्यकालीन वाचकाला तरी कसे प्राप्त होईल ? आपल्या विद्यापीठात अद्याप तरी समग्रतेला प्राधान्य असलेला अभ्यासक्रम सुरक्षित आहे. तो तसाच राहो.

येथे थोडे विषयांतर करून दोन गोष्टी नमूद कराव्याशा वाटतात : या अभ्यासक्रमाची आखणी करताना संबंधितांचे लक्ष ग्रामीण परिसरातील विद्यार्थ्यांवरही राहावे. शहरातील विद्यार्थ्यांना ज्या शैक्षणिक सोयी उपलब्ध असतात, त्या ग्रामीण विद्यार्थ्यांच्या वाट्याला येत नाहीत हे तर खरेच; शिवाय त्यांचे साहित्यिक-सांस्कृतिक प्रश्नही वेगळे असतात. ते प्रश्न शहरी विद्यार्थ्यालाही कळले पाहिजेत. आज विद्येच्या क्षेत्रातील या दोन घटकांची परस्परांशी मैत्र जडण्याची नितांत आवश्यकता आहे. त्यामुळे भविष्यकालीन वाचनसंस्कृतीचे चित्र काही अंशी तरी बदलेल.

आणखी एक गोष्ट : मराठी भाषेच्या भवितव्याबद्दल आपणा सर्वांनाच सखोल आस्था आहे—आणि चिंताही आहे. मराठीचा सर्व क्षेत्रांत प्रवेश व उपयोग झाला पाहिजे. या महत्त्वपूर्ण कार्यात शासकीय व निमशासकीय अशा सर्व संस्था आणि अन्य क्षेत्रातील तज्ज्ञ व्यक्ती यांचा सहभाग असावा. तसा तो आज काही प्रमाणात आहेही पण शासकीय, निमशासकीय व स्वायत्तही पातळीवरील सहभागात, नाही म्हटले तरी, एक प्रकारचे नोकरशाहीचे प्राबल्य असणारे मानसशास्त्री व व्यवस्थापनशास्त्र सहेतुकपणे वा अहेतुकपणे प्रविष्ट होते. त्यापासून अलिप्त असणारी, तुलनेने अधिक स्वायत्त असणारी विद्यापीठे या कामात हिरिरीने सहभागी झाली तर मराठीचे भवितव्य निश्चितपणे सुधारेल. पण त्यासाठी विद्यापीठाच्या विविध विभागांचे—आणि या विशिष्ट संदर्भात भाषाशास्त्र व मराठी या विभागांचे मनुष्यबळ वाढले पाहिजे. असे ऐकिवात आहे, की महाराष्ट्रातील काही विद्यापीठांतील रिकाम्या जागा भरायच्या नाहीत असे शासकीय धोरण आहे. प्राथमिक व माध्यमिक शाळांतील अध्यापकांची आणि कनिष्ठ व उच्च महाविद्यालयीन प्राध्यापकांची हीच परिस्थिती. त्यांच्या आर्थिक व शैक्षणिक मागण्यांची तत्परतेने दखल घेतली जात नाही. प्राथमिक शिक्षक सुस्थितीत राहिला आणि पायरीपायरीने हीच सुस्थिती महाविद्यालयांतील व विद्यापीठांतील शिक्षकांपर्यंतही पोचली तर शिक्षणाचीच नव्हे तर समकालीन साहित्याचीही परिस्थिती सुधारेल. कारण शिक्षणाचे क्षेत्र हे वाङ्मयीन संस्कृतीच्या संगोपन-संवर्धनाचे एक महत्त्वाचे केंद्र आहे. आजच्या या विशिष्टकालीन लेखकांनीही ते समजून घेतले पाहिजे. आपला उद्याचा वाचक मुख्यत: तेथे आहे; तेथून तो वाङ्मयीन शिदोरी घेऊन वेगवेगळ्या व्यावसायिक क्षेत्रांत जाईल; पण तेथेही त्याचे वाङ्मयावर प्रेम राहील; - अशा अपेक्षेने शिक्षणाच्या क्षेत्राकडे पाहिल्यास साहित्याचा

हा विलयकाळ-म्हणजे तथाकथित विलयकाळ-थोपवण्याची समकालीन लेखकाची उमेद वाढेल.

या विशिष्टकालीन लेखकाने आणखी एका गोष्टीकडे लक्ष पुरवणे अगत्याचे आहे. अवतीभवती खूप वाङ्मयीन कार्यक्रम चालू असतात, विपुल सभासंमेलनेही भरतात, विपुल पुस्तके निर्माण होतात, पुरस्कारांची संख्याही वाढली आहे. या सगळ्यांची लेखक व वाचक यांच्या संदर्भातील प्रस्तुतता किती ? त्यातून साहित्याला काही नवी दिशा मिळण्याची चिन्हे प्रकट होत आहेत का ? की हा सगळा शासनाच्या श्रीमंत प्रायोजकांच्या, लहानमोठ्या संस्थांच्या, प्रकाशकांच्या औदार्याचा व उत्साहाचा भाग आहे ? साहित्याच्या क्षेत्रात या सगळ्या घटनांची आवश्यकता आहेच; पण त्यांचे प्रमाण निखळ निर्मितीवर प्रत्यक्षाप्रत्यक्ष दडपण तर आणत नाही ना ? लेखनात काही अवाङ्मयीन हेतू तर शिरत नाहीत ना ? एकीकडे हे लोकप्रिय रंजक कार्यक्रम तर दुसरीकडे फक्त विद्यापीठीय वर्तुळातच फिरत राहिलेली बौद्धिक चर्चासत्रे. या दोहोंत काही संवाद हवा. आज त्या संवादाच्या अभावामुळे आपण सगळेच अधिकाधिक बंदिस्त होत चाललो आहोत की काय, आपल्या क्षितिजाचा विस्तार होण्याऐवजी संकोच होतो आहे की काय, अशी शंका येते. आपल्या लेखनाच्या व वाचनाच्या नेमक्या प्रयोजनांचे आपल्याला विस्मरण होऊ लागले आहे का ? नवे साहित्यविषयक संकेत निर्माण होत आहेत का ? समीक्षेत—किंबहुना सर्वच वैचारिक क्षेत्रांत— आता jargon चे प्राबल्य वाढले आहे का ? त्यामुळे गाभ्यातील विचारांची घुसमट होते आहे का ? की मुळात त्या विचारांची निपजच घटू लागली आहे ?—असेही प्रश्न पडू लागतात. भूतकाळातील लेखकालाही हे प्रश्न अगदीच पडले नसतील असे नाही. पण या प्रस्थापितताविरोधी संस्कृतीच्या आगमनाला तोंड देणाऱ्या समकालीन लेखकाला ते चिंताग्रस्त करत आहेत. निर्मितीच्या सार्वकालीन शक्तीची जपणूक कशी करायची, हा प्रश्न जर त्याला खरोखरीच पडला असेल, तर त्याने वर उल्लेखिलेल्या या सांस्कृतिक क्षीणतेची दखल घेणे आता क्रमप्राप्त आहे. खुल्या दारांचा भास निर्माण करणारा, त्यातून येणारे पाश्चिमात्य वारे झोंबरे आहेत की सुखद याचा विचार न करणारा, सवंग कल्पनांना व सरणींना औदार्याच्या गोंडस नावाखाली निवारा देणारा 'हस्तिदंती मनोरा' जितक्या लवकर उद्ध्वस्त होईल, आणि जितक्या लवकर समकालीन लेखकांचे पाय येथील भुईवर टेकतील, ते लेखक येथील प्रश्नांची दखल घेतील, आणि त्यापल्याडच्या व्यापक प्रश्नांकडेही जातील, तितक्या वेगाने त्यांचा भविष्यकाळही सुंदर होईल. असे काही भुईवरचे लेखक आज आपल्या अवतीभवती आहेत; त्यांचे अग्रक्रम पक्के आहेत. त्यामुळे निर्मितीच्या निखळ, सार्वकालीन आनंदात ते रमले आहेत, विशिष्टकालीन राहूनही सर्जनाचा तो सार्वकालीन प्रवास ते करत आहेत, ही मराठी साहित्याच्या सुदैवाची गोष्ट आहे.

वर उल्लेखिलेल्या सांस्कृतिक क्षीणतेचा परिणाम फक्त साहित्यावरच नव्हे, तर एकंदर सामाजिक जीवनावरही होत आहे. त्यातून अनेक पारंपारिक संस्थांबद्दल साशंकता निर्माण झाली आहे. सर्वाधिक आघात धर्म, विवाह, कुटुंब यांसारख्या संस्थांवर होत आहेत. भ्रष्ट व्यक्तिवाद वाढत आहे. त्यामुळे एकंदर परस्परसंवाद तुटत चालला आहे. या सर्व कारणांमुळे आजच्या सामाजिक-राजकीय जीवनात व व्यक्तिमनात एक प्रचंड ताण जाणवतो. कधीकधी त्याचा भार असह्य होतो. भ्रष्टाचाराची, हिंसाचाराची, स्त्रियांवर व दलितांवर होणाऱ्या अत्याचारांची वेगवेगळी रूपे अधोरेखित करणाऱ्या वृत्तपत्रांतील बातम्या वाचल्यानंतर हादरल्यासारखेच होते. पण बहुसंख्य वाचक त्या वाचण्यात अधिक रमतात. खुनी लोकांची आत्मकथने किंवा अपहरणाच्या रोमहर्षक कथा ते अधिक चवीने वाचतात. अशा विपरीत काळात आपल्याला शासनाकडून पुरेसे संरक्षण मिळत नाही, कारण ते शासनही निर्मळ नाही, या विचारामुळे हादरा आणखी वाढतो. आरती प्रभूंची एक ओळ आहे : "अधांतरी काळजी आणखी पाण्यावर भोवरा". एकच भोवरा नव्हे, तर अनेक भोवरे.

असे वाटते, की हा मूलादर्शाच्या स्थित्यंतरांचाच काळ आहे. सगळे उलटेपालटे झाले आहे. साहित्यापुरते बोलायचे तर, लेखक हा निर्माता नव्हे तर एक मृत जीव. साहित्यकृती या अनेकार्थसूचक नव्हेत तर अर्थरिक्त, संरचना नव्हे तर विरचना. पूर्वसूरीचे संस्कार नकोत : कारण प्रभावचिंता. लेखक नाही तशी संहिताही नाही, फक्त अर्थनिर्णयन आहे. या उलथापालथीमुळे एका भासमान मुक्तीचा प्रत्यय. समकालीन लेखक आणि त्याचे साहित्यही या उलथापालथीच्या भोवऱ्यात सापडले आहे.

आणखी एक नवा भोवरा आहे. त्याला तंत्रवैज्ञानिक क्रांती असे नाव आहे. या नव्या युगाच्या पाऊलखुणा आहेत. म्हणून त्या नव्या पिढीच्या वाटा आहेत. त्यांच्याशी समरस होण्यात, ती सगळी कौशल्ये आत्मसात करून घेण्यात काहीच गैर नाही. पण हे करताना मूळ वाटेचे विस्मरण घडता कामा नये. त्या वाटेवर शब्द आहे. दृश्य-श्राव्य प्रतिमा, दूरचित्रवाणी, संगणकाचा पडदा यांच्या जंजाळात तो शब्द हरवता कामा नये. 'कौन बनेगा करोडपती' मधला अमिताभ आपल्या जादूभरल्या आवाजात फक्त पंधरा प्रश्नांत करोडपती होण्याचे आश्वासन देतो. ते स्वप्न पाहणाऱ्या समोरच्या व्यक्तीला प्रत्येक प्रश्न सांगताना म्हणतो, "..ये रहा आपके कम्प्युटर स्क्रीनपर!" ते सगळे पाहावेसे वाटते. त्यात एक प्रकारचे बौद्धिक रंजनही आहे. पण पाठोपाठ आपल्या मनाच्या पडद्यावरही प्रश्न उमटतो : कॉम्प्युटर स्क्रीनवर न येणारे असे किती तरी गहन प्रश्न आपल्या अवतीभवतीच्या जगात आहेत. त्यांची दखल आजच्या लेखकाने घेतली पाहिजे. आधी त्याने घेतली तर मग वाचक घेतील. त्यामुळे वाचन-संस्कृती सुरक्षित राहील.

आजच्या electronic संस्कृतीबद्दल तशी तक्रार नाही. पण त्या संस्कृतीची

जीवनदृष्टी वेगळी आहे, हे भान आपल्याला असले पाहिजे. त्या माध्यमांतून प्रकट होणाऱ्या वास्तवाचे स्वरूपही वेगळे आहे. ते मूलभूत वास्तव नाही; त्यामुळे त्यात मूलभूत सत्यही नाही. या माध्यमांमुळे निर्माण होणाऱ्या संप्रेषणाचे स्वरूपही वेगळे आहे. लेखकाची वैयक्तिक स्फुरणे, त्यांच्याबद्दल वाचकाला वाटणारी अखंड जिज्ञासा, वाचकाचे एकान्तातील मुक्त वाचन आणि त्यात सामावलेला आनंद यांच्यावर अभ्रे येऊ लागली आहेत. त्यामुळे स्वायत्त लेखन-वाचनाबद्दलची संकल्पना बदलणार का ? साहित्याचा अधिकारच कमी होणार का ? —अशा शंका निर्माण होऊ लागल्या आहेत.

या शंकांचे आजच्या लेखकावर असणारे दडपण प्रचंड आहे. ते दूरच्या ओझ्याचे दडपण असेल कदाचित, पण ते ओझे आपल्यालाही कधीतरी पेलावे लागणार का ? याचे त्याच्या मनात भय आहे. स्वत:ला या सर्वांगीण स्थित्यंतराचा साक्षी मानून त्याने हे सगळे समजून तर घेतले पाहिजेच; त्याला साक्षीभावाने प्रतिसादही दिला पाहिजे. पण तो देताना आपला मूळ स्वभाव, आपला मूळ शब्द प्राणपणाने सांभाळला पाहिजे.

सार्वकालीन लेखक हा या विपरीत परिस्थितीपासून कधीच संपूर्ण मुक्त नसतो. त्यालाही निर्मितीला असणारी ही विविध आव्हाने स्वीकारतच पुढे जावे लागते. ज्ञानेश्वर-तुकारामांसारख्या सार्वकालीन कवींपुढेही तऱ्हेतऱ्हेची आव्हाने होती. तरीही 'ऐसी अक्षरें रसिकें मेळवीन' ही त्यांची प्रतिज्ञा होती; 'आम्हां घरीं धन शब्दांचीच रत्नें' हीच त्यांची मूलभूत प्रचीती होती. काळानुसार आव्हाने बदलतात. निरक्षरता, जातिवाद, नियतिवाद, अंधश्रद्धा, मूल्यांचे उच्चाटन यांनी बुजबुजलेल्या या काळाची आव्हाने वेगळी आहेत. ती अधिकाधिक अवघडही होत चालली आहेत, हे खरेच. पण ती पेलण्याची निर्मितीशक्ती तीच आहे ना ? म्हणून तर आजचा समकालीन लेखक हा सार्वकालीन लेखकाच्याच प्रेरणा-प्रवृत्ती घेऊन आपली वाटचाल करत आहे

त्याची जिद्द कायम आहे आणि आशावादही कायम आहे. सर्व तऱ्हेची आक्रमणे असूनही तो स्वायत्त आहे. नकारवाद पूर्वीही होता; पण हा लेखक पुरस्कार करत आहे तो स्वीकारवादाचा. या काही वर्षांत नव्याने निर्माण झालेल्या वाङ्मयीन, सांस्कृतिक परिस्थितीबद्दल त्याच्या मनात काही शंका आहेत, काही प्रश्नही आहेत. पण तरीही त्याची जिद्द कायम आहे. सार्वकालीन व विशिष्टकालीन लेखकांच्या भेटीचे स्थळ म्हणजे ही जिद्द, हा आशावाद आणि हा स्वीकारवाद. या स्थलावकाशात तुकोबांच्या भेटीला शेक्सपिअर येतो किंवा आजचा एखादा नारायण सुर्व्यांसारखा सूर्यकुलातील कवीही येतो. तो आशावादी सुरात म्हणतो : "सर्व काही आजच्याहून जास्त बरे असेल."

आता एका नव्या शतकाचा प्रात:काळ सुरू होत आहे. हा कदाचित नव्या

वाङ्मयाचाही प्रात:काळ असेल. त्यात सार्वकालीन वाङ्मयीन प्रवृत्तींचे तेजोमय किरण असतील, आणि त्यांतून निर्माण झालेल्या अभिजात साहित्यकृतींचे ग्रह, तारेही असतील. ते व्यक्तींच्या आणि समाजाच्या मनातील अवकाशाला नेहमीच प्रेरणा देत राहतील. सार्वकालीन व समकालीन प्रवृत्तींचे हे प्रतिभाधर्मी मिलन चालूच राहील.

## समारोप

गेले शतकही आशेचे व श्रद्धेचे शतक होते. त्या शतकाच्या विविध घडामोडींत व स्थित्यंतरांत आपण सर्वच या ना त्या तऱ्हेने सहभागी होतो. हे स्थित्यंतर वंचितांना नवे भान देणारे ठरले. त्यात स्त्रिया होत्या, दलित होते, शोषणाचे बळी ठरलेले असंख्य अभागी जीव होते. त्यांना अधिकाधिक सुखस्वास्थ्याचे व संरक्षणाचे आश्वासन देणे ही आजच्या कलावंत-विचारवंतांची आणि माध्यमांची मोठी जबाबदारी आहे. पुढे नेमके काय घडेल हे निश्चितपणे कोणालाच सांगता येणार नाही. पण ही कदाचित मानवी जीवनातील नव्या भानाच्या वृद्धीची एक अवस्था असेल. या भानातून आणखी एक स्थित्यंतर घडेल आणि ते अधिक प्रेरक, अधिक सुखद असेल. 'सर्व काही आजच्याहून अधिक बरे असेल', या आशेनेच आपण नुकत्या चालू झालेल्या एकविसाव्या शतकाकडे पाहूया.

अशा नव्या शतकाच्या काकड आरतीच्या वेळी लेखकांच्या मनात भय नको. मलिन, कुरुप घटनांचे स्मरण नको. स्मरण जागवावे ते फक्त सार्वकालीन जीवन सत्याचे. हे सत्य गेल्या काही दशकांत तात्पुरते हरवले असेल तर ते पुन्हा निर्धाराने शोधले पाहिजे. त्यात आपला आवाज व आपला प्राण ओतला पाहिजे. लेखकाला एका कधी न थकणाऱ्या आवाजाचे दैवी देणे मिळाले आहे. त्यातून भोवतालच्या समाजाला आधार सापडला पाहिजे. आपले आत्मभान कोणीतरी जागवत आहे, असा दिलासा मिळाला पाहिजे. हे आव्हान आजवरच्या श्रेष्ठ लेखकांनी स्वीकारले व पेलले. ते आजचा लेखकही अनेक अडथळ्यांची शर्यत ओलांडत पेलेलच. म्हणून तोही सार्वकालीनच. तो लेखकच इतर सर्जक शक्तींच्या सहकार्याने 'दुरितांचे तिमिर' नाहीसे करील-आणि आपले सर्वांचेच 'स्वधर्मा'चा सूर्य पाहण्याचे स्वप्न प्रत्यक्षात आणील.

तो सूर्य नुकता कुठे उगवला आहे. आपण त्याला उद्देशून, सार्वकालीन लेखकाच्या आवाजात आपला आवाज मिसळून म्हणूया, "सुस्वागतम्."

धन्यवाद.

'शैली – वैज्ञानिक समीक्षा हे एक शास्त्र आहे;
आणि कलाही. याचा प्रत्यय देणारा
हा त्रिखंडी ग्रंथ.'

'पाश्चात्य आणि भारतीय साहित्यशास्त्रात
तुलना नसणारा, विचारांच्या आधारे
भाषाघटितांची चिकित्सा करणारा,
साहित्य समीक्षेत नवा पायंडा पाडणारा
हा अपूर्व ग्रंथ.'

'अध्यक्षीय भाषणांच्या आधारे मराठी
विचारवंतांच्या वैचारिक प्रक्रियांचे वैचारिक
पध्दतींचे आणि वैचारिक गुणवत्तेचे
एका शतकाच्या कालपटलावर चित्र रेखाटणारा
हा प्रयोगशील ग्रंथ.'

'मराठी भाषा आणि साहित्य यांच्या नव्या
दमाच्या अभ्यासकांना आवाहन करणारा
हा नवीन ग्रंथ.'

दिलीपराज प्रकाशन प्रा. लि., पुणे.